सत्कार्योत्तेजक सभा — धुळे

[श्री रामदास आणि रामदासी मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झालेला]

श्री

# महाराष्ट्रधर्मग्रंथमाला

ग्रंथ चवथा

# महाराष्ट्रधर्म

अर्थात्

## मराठ्यांच्या इतिहासाचें आत्मिक स्वरूप

---

मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ।
ये विषयीं न करितां तकवा । पूर्वज हांसती ॥

---

लेखक

भास्कर वामन भट, वकील, धुळें

---

विजया दशमी १८४७

---

किंमत तीन रुपये

हा ग्रन्थ विश्वनाथ गणेश जावडेकर बी. ए. एल्. एल्. बी. यांनीं धुळें
येथें गल्ली नंबर १ घर नंबर ५ मध्यें आत्माराम प्रिंटिंग आणि
पब्लिशिंग लि. कंपनीच्या आत्माराम छापखान्यांत छापिला
व भास्कर वामन भट यांनीं तेथें च प्रसिद्ध केला.

श्री

## महाराष्ट्रधर्मग्रन्थमाला

[ १ ] श्री ज्ञानेश्वरी, संपादक रा. राजवाडे, किंमत रु. ४

[ २ ] त्र्यंबकरायकृत बालबोध, संपादक रा. चांदोरकर, किं. १।

[ ३ ] श्री ज्ञानेश्वरांचें योगवासिष्ठ, संपादक रा. चांदोरकर, किं. ।॥।

[ ४ ] श्री महाराष्ट्रधर्म, लेखक रा. भट, किंमत रु. ३

सत्कार्योत्तेजक सभा—धुळें

# प्रस्तावना

महाराष्ट्रा खेरीज हिंदुस्थानांतील इतर कोणत्या एखाद्या प्रांतांत जर मराठ्यांच्या इतिहासाचा अभ्यास, चर्चा व संशोधन होत असेल तर तो प्रांत ह्मटला ह्मणजे बंगाल इलाखा हा होय. कलकत्ता येथें प्रसिद्ध होणाऱ्या मॉडर्न रिव्ह्यू मासिकांत बऱ्या च वर्षा पूर्वी पासून मराठ्यांच्या इतिहासा संबंधीं संशोधनात्मक व चर्चात्मक लेख प्रसिद्ध होत असून हल्लीं हि तो क्रम सुरू आहे. या मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या लेखां पैकीं बरेचसे लेख प्रो. यदुनाथ सरकार यांचे व इतर कांहीं दुसऱ्या लेखकांचे असतात. संशोधन करून प्राप्त झालेल्या नूतन माहितीच्या साह्यानें त्या लेखांची रचना करण्यांत येत असल्या मुळे या लेखा बद्दल थोडा बहुत आदर वाटला तथापि या लेखात व्यक्त होणारी लेखकांची मानसिक वृत्ति व या लेखांचे सर्व साधारण धोरण यांच्या योगाने हे लेख वाचून कोणत्या हि महा-राष्ट्रीयाच्या मनात खेद व आश्चर्य उत्पन्न झाल्या खेरीज रहाणें दुरापास्त आहे. या लेखांच्या वाचनाने आमच्या मना वर हि अशा च प्रकारचा परिणाम होत असे. ज्या उच्च ध्येया करितां महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यानी सतराव्या शतकांत महाराष्ट्रात स्वराज्य स्थापण्याचा प्रचंड खटाटोप केला त्या ध्येयांच्या स्वरूपाची अंधुक कल्पना हि व्यक्त करण्याचा प्रयत्न न करितां या लेखांत स्वराज्य स्थापना करण्यात द्रव्याच्या लूटी पलीकडे मराठ्यांचें कोणतें हि उच्च ध्येय नव्हते अशा प्रकारच्या असत्य ग्रहाचें प्रतिपादन केलेलें पाहून व असल्या प्रकारच्या लेखाच्या योगाने अत्यंत थोर अशा महाराष्ट्रीय राजकारणी पुरुषांची बदनामी सर्व जगभर झालेली पाहून आमचे मनांत खेद उत्पन्न व्हावा यांत नवल नाहीं. इंग्रजादि पाश्चात्त्य ग्रंथकारा पेक्षां यदुनाथादि बंगाली लोक महाराष्ट्रीयांस अधिक निकट आहेत. मराठे व बंगाली लोकांची संस्कृति व धर्म एक. असें असतां स्वराज्य स्थापनेचा प्रचंड खटाटोप करणाऱ्या महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्याच्या ध्येयाचें वास्तविक स्वरूप अवगत करून घेणें ही बाब बंगाली ग्रंथकारास सहज साध्य असतां तशा प्रकारचा यदुनाथादि बगाली

लेखकांनीं कांहीं एक प्रयत्न न करितां वरील प्रकारच्या असत्य ग्रहांचा प्रसार त्यांनीं केलेला पाहून आह्मास आश्चर्य वाटत असे. अशा प्रकारच्या मन:स्थितींत आपल्या थोर व वंद्य अशा पूर्वजांच्या बंगाली लेखकां कडून होणाऱ्या बदनामीचें निराकरण करून स्वराज्य स्थापना करण्यांत महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें याचें यथार्थ दिग्दर्शन करावें अशी स्फूर्ति आह्मास सन १९१८ सालच्या मॉडर्न रिव्ह्यू मासिकांत बंगाली ब्राह्मण हें टोपण नांव धारण करणाऱ्या एका लेखकानें लिहिलेला लेख वाचून झाली.

वर दर्शविल्या प्रमाणें यदुनाथादि बंगाली लेखकांचे मराठ्यांच्या इतिहासा संबंधीं लेख प्रसिद्ध होण्यास सुरुवात होण्या पूर्वी महाराष्ट्रांतील इतिहास संशोधकांचें लक्ष मराठ्यांच्या इतिहाससंशोधना कडे वेधले गेले होतें. पुरातत्व-भूषण रा. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे, कै. न्या. मू. महादेव गोविंद रानडे, कै. राजाराम शास्त्री भागवत इत्यादि विद्वानांनीं स्वराज्य स्थापन करण्यांत मराठ्यांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचे होतें या संबंधाची चर्चा, व्याख्यान व लेख द्वारा करण्यास सुरुवात करून आपले सिद्धांत प्रकट केले होते. या विद्वान् गृहस्थांनीं प्रकट केलेल्या सिद्धांता संबंधीं बरीच चर्चा महाराष्ट्रांत आज पावेतों होत आली आहे. या सर्व चर्चेतून निष्पन्न झालेला बहुमान्य सिद्धांत ह्मटला ह्मणजे “ **महाराष्ट्रधर्मस्थापना हें मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेचें ध्येय होतें** ” हा होय. हा सिद्धांत महाराष्ट्रात जरी बहुमान्य झाला तथापि महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ काय करावयाचा व या संज्ञेत कोण कोणत्या बाबींचा समावेश होतो या बद्दल बरीक भरपूर मतवैचित्र्य व अनिश्चितपणा आज पावेतों कायम राहिला आहे.

महाराष्ट्रीय व बंगाली इतिहास संशोधकांनीं मराठ्यांच्या इतिहासा संबंधीं प्रसिद्ध केलेल्या वरील चर्चात्मक लेखात ग्रथित केलेल्या सिद्धांताच्या दृष्टीनें महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ व व्याप्ति यांचा समाधानकारक उलगडा करणें हें अत्यंत महत्वाचें व जरूरीचें झाले. या संज्ञेच्या अर्थाचा व व्याप्तीचा योग्य व समाधानकारक खुलासा केला गेल्यास मराठ्यांच्या स्वराज्य स्थापनेच्या ध्येयाच्या स्वरूपा संबंधाच्या बंगाली लेखकांच्या असत्य ग्रहांचें निराकरण व महाराष्ट्रीय विद्वानांच्या साशंक व अनिश्चित ग्रहांचें समाधान असें द्विधा कार्य सिद्ध होण्याचा सुसमय प्राप्त झाला. या सुसमयाचा फायदा घेण्याचें आह्मा आपल्या मनाशीं ठरवून प्रस्तुतच्या

प्रबंध रचनेस प्रारंभ केला. हा निश्चय करण्या पूर्वी मराठ्यांच्या इतिहास साधनांच्या पंधराव्या खंडाचा आम्हीं जरा बारकाईनें अभ्यास केला होता. हा अभ्यास केल्या नंतर " महाराष्ट्रांतील व्यवहारनिर्णय पद्धति " या विषया वर एक निबंध तयार करून भारतइतिहाससंशोधकमंडळा पुढें शके १८३६ सालांत आम्हीं प्रथम वाचला. पंधराव्या खंडांत ज्या स्वरूपाचे कागदपत्र प्रसिद्ध करण्यांत आले होते त्या च स्वरूपाचे कागदपत्र मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १६, १७, १८ व २० यांत पंधराव्या खंडाच्या प्रसिद्धी नंतर लागोपाठ प्रसिद्ध झाले. या कागदपत्रांच्या आधारें वरील विषया वर आणिक दोन निबंध भारतइ.सं.मंडळाच्या वार्षिक संमेलन प्रसंगीं शके १८३७ व १८३८ सालांत आम्हीं वाचले. या लेखांच्या रचनेस्तव वरील साधन खंडांतील कागदपत्रांचें वाचन व अभ्यास चालू असतां " महाराष्ट्रधर्म " या संज्ञेचा खरा अर्थ व व्याप्ति पूर्णपणें आमच्या लक्षांत आली होती. या मुळें प्रस्तुतचा प्रबंध रचण्याचा विचार आम्हीं नक्की करून हें कार्य करण्यास सुरुवात केली. दोन प्रकरणें तयार होऊन तिसरें प्रकरण कच्चें लिहून झालें असतां आमचे मित्र रा. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं हा प्रबंध " **रामदास आणि रामदासी** " मासिकांत छापून प्रसिद्ध करण्या बद्दल आग्रह धरिला. सर्व प्रबंध लिहून तयार नसल्या मुळें हा मार्ग स्वीकारण्यास आह्मीं बरे च आढे-वेढे घेतले. परंतु त्यांनीं माझ्या ह्मणण्या कडे लक्ष न देतां " **रामदास आणि रामदासी** " मासिकांत प्रबंध छापण्यास सुरुवात केली. या नंतर प्रबंध पुरा लिहून काढण्या संबंधींच्या आमच्या जबाबदारीचें स्वरूप पालटल्या मुळें तो लिहून पुरा करण्याची जोराची निकड आमचे मागें लागली. या निकडी मुळें हा प्रबंध आमचे हातून पुरा होऊन तो ग्रंथरूपानें प्रसिद्ध होण्याचा योग आला या बद्दल परमेश्वराचे जितके आभार मानावे तितके थोडे च होणार आहेत. आमचे मित्र रा. देव यांनीं रामदास आणि रामदासी मासिकांत प्रबंध छापण्याचा आग्रह धरिला नसतां तर कदाचित् हा प्रबंध छापून प्रसिद्ध होण्याचा योग हि आला नसता. आमच्या या प्रबंधाच्या प्रसिद्धी मुळें मराठ्यांच्या इतिहासाच्या संशोधनांत अल्पशी भर पडली आहे असें तज्ञांचें मत झाल्यास एका दृष्टीनें रा. देव यांचा आग्रह उपकारक च झाला असें ह्मणण्यास हरकत नाहीं.या प्रबंधांत आम्हीं केलेलीं विधानें व प्रति-पादिलेले सिद्धांत मराठ्यांच्या इतिहासाच्या साधन ग्रंथांत प्रसिद्ध झालेल्या

कागदपत्रांच्या आधारें करण्याची शक्य तितकी खबरदारी घेतली आहे. कल्पनेच्या भराऱ्या मारण्याच्या मोहास सहसा आह्मी बळी पडलों नाहीं. या प्रबंधाच्या निर्मिती संबंधीं वरील अल्पसा खुलासा करून आह्मी हा प्रबंध महाराष्ट्र इतिहासजिज्ञासूंच्या सेवेस सादर करून ही अल्पशी प्रस्तावना पुरी करितों.

आश्विन शुद्ध १० शके १८४७ }
धुळें. } भास्कर वामन भट

# अनुक्रमणिका
## व
# प्रकरणवार सूची

## प्रकरण पहिलें



## प्रकरण दुसरें

अर्थ-" मराठ्याच्या सत्तेचा उ कर्ष " या ग्रंथात रानड्यांनी मराठ्यांच्या सत्तेचें बीज कसें पेरलें गेलें या विषयी केलेल्या विवेचनाचे स्वरूप-एका मोठ्या अगर एकजीव झालेल्या राष्ट्राचा जो धर्म तो महाराष्ट्रधर्म "--श्रुतिस्मृतिप्रणीत आचार विषयक विधी निषेध रूपी अज्ञानाच्या शृंखला तोडणे हे महाराष्ट्रीय संतांचे युरोप खंडातील " रेफर्मेशनच्या " चळवळीच्या उत्पादका सारखें ध्येय होतें व त्यांनी प्रतिपादिलेला जो धर्म तो महाराष्ट्रधर्म असा न्या. रानड्याचा सिद्धांत- कै. राजाराम शास्त्री भागवत याचे महाराष्ट्रधर्माच स्वरूपा बद्दलचे विवेचन-महाराष्ट्रधर्म म्हणजे कर्मठाचा कोता धर्म नव्हे, तर ज्ञानेश्वरानी जीर्णोद्धार केलेला संतांचा विशाल धर्म असा शास्त्रीबुवाचा सिद्धात--राजवाडे याचे महाराष्ट्रधर्माचे स्वरूपा विषयीचे विवेचन - सरदेसाई याचें विवेचन--कै. लिमये याचे विवेचन-- रा. ब. भाडारकर याचे भागवत धर्माविषयीचे विवेचन--महाराष्ट्रधर्म या संज्ञेच्या अर्था बद्दल मागील विवेचना वरून दृष्टोत्पत्तीस येणारे मतवैचित्र्य--या मतवैचित्र्यातून शिवाजी महाराजांच्या स्वराज्य स्थापनेचे महाराष्ट्रधर्म स्थापना हे ध्येय होते हा निष्पन्न होणारा सर्व साधारण व सर्व संमत सिद्धात. २२-४९

## प्रकरण तिसरें

**शिवकालीन स्वराज्य स्थापनेचें व तदनंतरच्या स्वराज्याच्या विस्ताराचें महाराष्ट्रधर्म स्थापना हें च ध्येय होते या सिद्धांता वर येणारे आक्षेप व त्यांचे निरसन व महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ व व्याप्ति स्पष्ट करणारा ऐतिहासिक पुरावाः**-शिवाजी महाराजांचे समकालीन व त्यांच्या पश्चातचे पुढारी याचे ध्येय कोणत्या स्वरूपाच होते हे सिद्ध करणारा पुरावा पुढे येण्याची आवश्यकता-महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ व या संज्ञेत समाविष्ट होणाऱ्या बाबी निश्चित होण्याची आवश्यकता--कोणत्याहि राष्ट्राचे विवक्षित काळी कोणते ध्येय होते हे ठरविण्याचा शास्त्रशुद्ध मार्ग-राष्ट्राच्या पुढाऱ्यानी त्यांच्या ध्येया विषयी प्रगट केलेले विचार व तत् सिध्यर्थ केलेलें कार्य, त्या च प्रमाणे सामान्य व्यक्तींनी पुढाऱ्याचे ध्येया संबंधी प्रगट केलेले विचार यावरून ध्येयाची निश्चिती करणे-महाराष्ट्रीय पुढाऱ्याच्या ध्येया विषयींचा पुरावा दोन प्रकारचा--प्रत्यक्ष व अनुमानिक-- महाराष्ट्रीय समाजाचे पुढारी दोन प्रकारचे-एक हरिकथा निरूपणी पुढारी व दुसरे राजकारणी पुढारी-शिवपूर्वकालीन राजकारणी पुढाऱ्यांच्या ध्येया विषयींच्या माहितीची अल्पता--शिवपूर्वकालीन हरिकथा निरूपणी पुढाऱ्याच्या ध्येया विषयींच्या माहितीची विपुलता-देवगिरीच्या यादवा नंतरच्या व शिवाजी महाराज अवतीर्ण होण्या पूर्वीच्या काळातील महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांच्या ध्येया विषयींचा पुरावा व त्या वरून निष्पन्न होणारे सिद्धांत--शिवपूर्व काळच्या भरतखंडातील क्षत्रिय

राजांच्या ध्येयाचें स्वरूप-मुसलमानी सत्ता महाराष्ट्रांत स्थापन होऊन शिवाजी महाराज अवतीर्ण होई तोंपर्यंत विजयनगरच्या हिंदुराजसत्तेच्या ध्येयाचें स्वरूप-शिवाजी महाराज अवतीर्ण होण्यापूर्वी महाराष्ट्रांत स्वराज्याची स्थापना करण्याचे झालेले प्रयत्न व ते प्रयत्न करणाराचें ध्येय- शहाजी राजे यांच्या ध्येया विषयी विवेचन--शिवकालीन महाराष्ट्रीय राजकारणी पुढारी व त्यांच्या ध्येयाचें स्वरूप — शिवाजी महाराजांचे ध्येया संबंधीचा पुरावा —शहाजीचे उद्गार—रामचंद्र निळकंठ याचे उद्गार— समर्थ रामदासस्वामीचे उद्गार— शिवराज प्रशस्तींतील गागाभट्टांचे शिवाजीचे ध्येया विषयीचे उद्गार — सप्त प्रकरणात्मक चरित्रातील उल्लेख—शिवदिग्विजय बखरींतील उल्लेख—शिवाजीनें मिर्झाराजा जयसिंग यास लिहिलेल्या पत्रांतील शिवाजीचे ध्येया विषयींचा उल्लेख-शिवाजी महाराजांचे अवतार समाप्ती पासून मराठी साम्राज्य लयास जाई तों पावेतों झालेल्या महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांच्या ध्येयाचे स्वरूप- संभाजीच्या ध्येयाचें स्वरूप- राजारामाच्या ध्येयाचें स्वरूप-शाहू महाराजांच्या ध्येयाचें स्वरूप-बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब पेशवे याच्या ध्येयाचें स्वरूप-सुरवातीपासून शेवट पावेतों मराठी राज्याच्या ध्येयाचें गोविंदराव काळे यांनीं केलेलें दिग्दर्शन—नाना फडणीसांच्या ध्येयाचें स्वरूप— यशवंतराव होळकर याच्या ध्येयाचें स्वरूप—देवगिरीच्या यादवाचे काळापासून शिवाजी महाराज अवतीर्ण होई तो पावेतों झालेल्या महाराष्ट्रीय हरिकथा निरूपणी पुढाऱ्याच्या ध्येयाचें स्वरूप-ज्ञानेश्वर, एकनाथ, नामदेव, सेना न्हावी, सरस्वती गंगाधर, त्र्यंबकस्वामी, महालिंगदास इत्यादिकांच्या ध्येयाचें स्वरूप— शिवाजी महाराजाच्या समकालीन महाराष्ट्रीय समाजाच्या हरिकथा निरूपणी पुढाऱ्याच्या ध्येयाचें स्वरूप--रामीरामदास, समर्थ रामदास स्वामी व तुकाराम बुवा यांच्या ध्येयाचें स्वरूप- मराठ्यांच्या स्वराज्य स्थापनेच्या व विस्ताराच्या ध्येयाच्या स्वरूपा विषयीं महाराष्ट्रीय व महाराष्ट्रेतर सामान्य जन यांच्या कल्पना--वंशपद्धतीच्या कल्पांचे महाराष्ट्रीय समाजाच्या स्थितीचें वर्णन-शिवाजी महाराज अवतीर्ण होण्या पूर्वी पासून तो मराठी साम्राज्य लयास जाई तों पावेतों महाराष्ट्रीय साम्राजाच्या हरिकथा निरूपणी व राजकारणी पुढाऱ्यांचें ध्येय महाराष्ट्रधर्मस्थापना हें होतें या सिद्धांताची शाबिती--महाराष्ट्रधर्म ह्मणजे श्रुतिस्मृति प्रणीत धर्म-महाराष्ट्रधर्मस्थापना हे च मराठ्यांच्या स्वराज्य स्थापनेचें व विस्ताराचें ध्येय होतें हें सिद्ध करणाऱ्या मराठ्यांच्या राजकिय धोरणांतील व राज्यपद्धतींतील कित्येक बाबी--या बाबीचे प्रकार दोन--मराठ्यांच्या राजसत्तेच्या व राजव्यवस्थेच्या सर्व साधारण धोरणांत अतर्भूत होणाऱ्या बाबींचा पहिल्या प्रकारांत समावेश होतो--श्रुतिस्मृतिधर्मान्वये महाराष्ट्रीय समाजातील प्रत्येक व्यक्तीस आचरण करणं भाग पडत असें हे दर्शविणाऱ्या बाबी--क्षत्रियवर्णी राजाची श्रुतिस्मृतिधर्मान्वयें लक्षणें--या पैकी शिवाजी महाराजांचे ठाई कोणती होतीं याचें दिग्दर्शन

## प्रकरण चवथें



## प्रकरण पांचवें

---

# शुद्धिपत्र

( या शुद्धिपत्रांत महत्वाच्या अशुद्ध शब्दांचीं शुद्ध रूपें दिलीं आहेत )

| अशुद्ध रूप | पान | ओळ | शुद्ध रूप |
|---|---|---|---|
| त्यांच्या | ९ | ११ | आपल्या |
| उत्तर | १३ | १७ | उत्तरेकडील |
| ज्या | १५ | २६ | त्या |
| समजत. | १५ | ३० | समजत |
| वापरला आहे. | १६ | २६ | वापरला आहे |
| भगवत | २७ | ३० | भागवत |
| भगवतद्गीतेंत | ३३ | २ | भगवद्गीतेंत |

| | | | |
|---|---|---|---|
| स्वष्टपणें | ४४ | १४ | स्पष्टपणें |
| अस्त्विांत | ४४ | १५ | अस्तित्वांत |
| तप्रीत्यर्थ | ४५ | १५ | तत्प्रीत्यर्थ |
| सिद्धांत | ४८ | २८ | सिद्धांता |
| पुराव्या | ५१ | ३ | पुरावा |
| क्षत्रियेत्तर | ५५ | ३० | क्षत्रियेतर |
| आधारवर | ६३ | २८ | आधारावर |
| महत् | ६५ | ४ | महान् |
| कर्नाकट | ६७ | २१ | कर्नाटक |
| राजसूत्रे | ६७ | ३१ | राज्यसूत्रें |
| असें | ७३ | १८ | अश्या |
| नवावताराः | ७८ | १५ | नवावतार· |
| अंत·स्त्व | ८० | १५ | अंतःस्थ |
| अनुमान निघणारे | ८० | १६ | निघणारें अनुमान |
| त्यांच्या | ८१ | २१ | आपल्या |
| स्वरूपाचे | ८३ | २९ | स्वरूपाचे बाबतींत |
| त्यां | ९१ | २ | या |
| भ.डकथांच्या | ९६ | २५ | भाकड कथांच्या |
| किंवा त्या चित्याचे | १०१ | १७ | किंवा चित्याचें |
| राहिली तरी | १०१ | १९ | राहिली तिची सेवा कराल तरी |
| मनबदारी | १०१ | २४ | मनसबदारी |
| ध्येयाचे | १०६ | १ | ध्येयाचे |
| रघुनानाथ | १११ | २७ | रघुनाथ |
| वैशम्य | ११५ | १७ | वैषम्य |
| थर्मराज्य | १२५ | २२ | धर्मराज्य |
| मुखवालोकन | १३२ | ९ | मुखावलोकन |
| भगवन्नमस्मरण | १४५ | २२ | भगवन्नामस्मरण |
| नमादेवांचें | १४५ | २२ | नामदेवांचे |
| सगुणा. | १४७ | २ | स गुणः |
| भावबंधनाचा | १५७ | १२ | भवबंधनाचा |
| जनत्पेंत | १७४ | ७ | जनतेंत |
| नाममहिन्याचे | १७४ | १५ | नाममहिम्याचे |
| णर्तव्य | १९० | १ | कर्तव्य |

| | | | |
|---|---|---|---|
| महोत्साहकः | २१९ | २१ | महोत्साहः |
| स्थूलक्षः | २१९ | २१ | स्थूललक्षः |
| सत्पवावशुचिः | २१९ | २२ | सत्यवावशुचिः |
| व्यसनोश्चैव | २१९ | २४ | व्यसनश्चैव |
| स्वरन्धगोतान्वी | २१९ | २५ | स्वरन्धगोत्पान्वी |
| शाहागिरीकडे | २२१ | ४ | जहागिरीकडे |
| कौटिल्य शुक्रादि | २२३ | ३० | कौटिल्य शुक्रादिकृत |
| हीन भूतीका | २३१ | १९ | हीन भृतिका |
| शटाश्व | २३१ | २० | शटाश्च |
| सदसद | २३१ | २६ | सदसत |
| पुरोधाश्व | २३२ | ५ | पुरोधाश्च |
| द्रूत | २३२ | ७ | दूत |
| दशमांशाधिकोः | २३३ | ८ | दषमांशाधिकाः |
| मन्त्रविद्र | २३४ | ११ | मन्त्रविद्रा |
| सामदानज्व | २३४ | ३० | सामदानश्च |
| भूतश्वमा | २३५ | १८ | भूतश्चैमा |
| जार्तिर्ज्ञान्तः | २४२ | २२ | ज्योतिर्ज्ञान्त. |
| बलाध्यक्षदिकः | २४२ | २३ | बलाध्यक्षादिक· |
| प्राणे·कंठगतैऽरपि | २४८ | २१ | प्राणैःकंठगतैरपि |
| जीर्वानां | २५४ | १ | जीविनः |
| मनुमृतींत | २६८ | ९ | मनुस्मृतींत |
| स्त्रीबाभ्यु | २६८ | ११ | स्त्रीबालाभ्यु |
| अधर्म्मा | २७५ | ६ | अधर्म्या |
| हयस्या | २७५ | ७ | ह्यस्या |
| अभिवृध्य्यर्थ | २८१ | १२ | अभिवृध्यर्थ्य |
| यस्मिन्देश च आचारो | ३०१ | १२ | अस्मिन्देशे आचारो |
| क्रतुर्भिर्विधि धैरा | ३०३ | ८ | क्रतुभिर्विविधैरा |
| कूटैरायुधैर्हन्या | ३१५ | १७ | कुटैरायुधैर्हन्या |
| दूषयच्चास्य | ३१६ | ९२ | दूषयेच्चास्य |
| ९५ | ३१६ | २२ | १९५ |
| परिसास्तथा | ३१६ | २३ | प्राकारपरिखास्थता |
| येच्चैने | ३१६ | २४ | येच्चेनं |
| ९६ | ३१६ | २४ | १९६ |

| | | | |
|---|---|---|---|
| निंदतो | ३१७ | २३ | निंहतो |
| परितश्चिर | ३१८ | ४ | परितश्चिर |
| सेन्धवम् | ३१८ | ५ | सेन्धनम् |
| मैलयाजयेत | ३१८ | २७ | मेलयाजयेत |
| परी | ३१८ | २९ | परो |
| गृहण्यकुरुते | ३३९ | १० | गृह्णकुरुते |
| दुहित | ३३९ | ११ | दुहितृ |
| बंधु शिष्य | ३४० | २३ | बंधु· शिष्यः |
| गृण्हातीत | ३४१ | ३ | गृण्हातीति |
| स्थितमिती | ३४१ | ३ | स्थितमिति |
| बाधरः | ३४२ | २० | बधिरः |
| माहान्ति | ३४७ | ५ | महान्ति |
| ये | ३५९ | १५ | ते |
| सवपामपि | ३५९ | २५ | सर्वेषामपि |
| सर्वैषामपि | ३५९ | २७ | सर्वेपामपि |
| सर्वाग्येतान्य | ३५९ | ३१ | सर्वाण्येतान्य |
| प्रवृतं | ३६० | ३ | प्रवृत्तं |
| प्रवृतं | ३६० | ५ | प्रवत्तं |
| निवृंत | ३६० | ६ | निवृत्तं |
| भूनाव्यतेति | ३६० | ६ | भूतान्यत्येति |
| दमाहिंमा | ३६० | २८ | दमोहिंसा |
| यध्यागेना | ३६० | २९ | यध्योगेना |
| पडळी | ४६२ | २४ | पडली |
| पुढाऱ्यांस | ४६८ | २० | पुढाऱ्यांच्या वंशजास |
| श्नेह | ४६८ | २८ | स्नेह |
| रा. बापट | ५०८ | ८, ९, १७ २२, २५, २७ व २८ | रा. पेंडसे |



*

श्री

# महाराष्ट्रधर्मग्रन्थमाला

ग्रन्थ चवथा



# महाराष्ट्रधर्म

अर्थात्

## मराठ्यांच्या इतिहासाचें आत्मिक स्वरूप



( लेखक—भास्कर वामन भट )



## प्रकरण पहिलें

### मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाविषयींच्या मतवैचित्र्याचें दिग्दर्शन व त्याची मीमांसा

कोणत्याहि राष्ट्राचा इतिहास दोन पद्धतीनें लिहितां येतो. ह्या दोन पद्धति ह्मणजे एक भौतिक व दुसरी आत्मिक. मराठ्यांच्या इतिहाससाधनांच्या पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेत प्रसिद्ध इतिहाससंशोधक पुरातत्वभूषण रा. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनीं या दोन्ही पद्धतींचें स्पष्टीकरण खालीं लिहिल्या प्रमाणें केलें आहे. "धर्म, नीति, विद्या, समाज, व्यापार, कृषि, कला, कौशल्य, कायदेकानू, राजकारण व तत्सिध्यर्थ केलेल्या अतःस्थ व बहिस्थ खटपटी इतक्या सर्वांच्या प्रगतीचा किंवा विगतीचा कालक्रमाने यथास्थित, बांधेसूत, पद्धतवार व सप्रमाण विचार केला जाऊन तो पुन्हां आत्मिक व भौतिक रीत्या झाला ह्मणजे राष्ट्राचें चरित्र समग्र कळलें असें होतें. येथें आत्मिक व भौतिक शब्द कोणत्या अर्थांचे वाचक आहेत, तें सांगितलें पाहिजे. धर्म, नीति, विद्या, राजकारण इत्यादि राष्ट्राच्या चरित्राची जीं निरनिराळीं अंगे सांगितलीं त्यांचा विचार दोन तऱ्हेनें करितां येईल. हीं

अंगें कार्यांच्या रूपानें फलित झालेलीं पाहून त्या फलित रूपांचें पद्धतवार वर्णन करण्याची एक तऱ्हा आहे व हीं च अंगे कारणरूपानें असलेलीं पहाणें म्हणजे वर सांगितलेल्या फलित कार्यांचीं कारणें म्हणून त्यांचा विचार करणें, म्हणजे च दुसऱ्या तऱ्हेचा अंगिकार करणे होय. पहिल्या तऱ्हेला मी भौतिक म्हणतो व दुसरीला मी आत्मिक ह्मणतों. ...... भौतिक पद्धतीनें कोणत्याहि राष्ट्राच्या राजकीय गतिस्थितींचा विचार करावयाचा म्हणजे त्या राष्ट्रांत झालेल्या अंतःस्थ कलहांची व बहिस्थ कलहांचीं वर्णनें द्यावयाचीं, म्हणजे राष्ट्रांतील बंडांची, निरनिराळ्या पक्षांच्या, वर्गांच्या व जातींच्या चढाओढींचें व परराष्ट्रांशीं झालेल्या लढायांचीं वर्णनें द्यावयाचीं आणि आत्मिक पद्धतीनें राष्ट्राच्या गतिस्थितींचा विचार करावयाचा ह्मणजे अंतःस्थ व बहिस्थ कलहांच्या उत्पत्तीचीं कारणें, त्या राष्ट्रांतील एकंदर लोकसमूहांत आत्म्याच्या उन्नतावनत वृत्तीपैकीं कोणत्या वृत्तींचें विशेष प्राबल्य आहे त्याचा सूक्ष्म विचार, त्या राष्ट्रांतील मोठमोठ्या तटाच्या पुरुषांच्या राजकीय मतांचें सशास्त्र दर्शन इत्यादि प्रश्नांची चर्चा करावयाची. राष्ट्राच्या राजकीय गतिस्थितींचा भौतिक व आत्मिक दृष्ट्या जो विचार त्यास च राष्ट्राचा राजकीय इतिहास म्हणतात."

रा. राजवाडे यांनीं वर्णिलेल्या ह्या दोन्ही पद्धतींच्या दृष्टीनें विचार केला असता आपणांस असें आढळून येतें, कीं मराठ्यांचा भौतिक इतिहास लिहिण्याचें बाबतीत कांहीं स्वकीय व कांहीं परकीय लोकांनी थोडेफार प्रयत्न केले आहेत. हे प्रयत्न म्हणजे अगदीं समाधानकारक झाले आहेत, अशांतला मुळींच भाग नाहीं. कारण मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें गेल्या तीस पस्तीस वर्षांपासून अल्पस्वल्प प्रमाणानें प्रसिद्ध होत असून आजपावेतों उपलब्ध झालेली किती तरी साधनसामुग्री अद्याप पावेतों प्रसिद्ध व्हावयाची आहे. सर्व प्रकारचीं इतिहाससाधनें पूर्णपणें प्रसिद्ध झाल्याखेरीज प्रमाणभूत इतिहासग्रंथ निर्माण होणें शक्य नाहीं, हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. ही गोष्ट लक्षांत घेता तुटपुंज्या माहितीच्या आधारें लिहिलेले मराठ्यांचे भौतिक इतिहासग्रंथ बेताच्या च किंमतीचे असावयाचे हें उघड आहे. मराठ्यांच्या भौतिक इतिहासग्रंथरचनेचे बाबतींत वरील प्रकारची स्थिति आपणास आढळून येते. मराठ्यांच्या आत्मिक इतिहासग्रंथरचनेसंबंधी स्थिति वरील स्थितीपेक्षां हि अधिक शोचनीय आहे. आत्मिक पद्धतीनें लिहिलेला मराठ्यांचा इतिहासग्रंथ आजपावेतों एकच प्रसिद्ध झाला आहे. तो ग्रंथ

ह्मटला ह्मणजे कै. न्यायमूर्ति रानडे यांचा इंग्रजी भाषेंत लिहिलेला Rise of the Maratha Power, "मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष" हा होय. अपुऱ्या साधनसामुग्रीवर रचलेली भौतिक इतिहासाची इमारत डळमळीत च असावयाची व तो च नियम आत्मिक ऐतिहासिक ग्रंथांसहि लागू आहे. मराठ्यांच्या इतिहासाच्या भौतिक व आत्मिक इतिहासग्रंथ रचनेच्या बाबतींत झालेल्या आजपर्यंतच्या प्रयत्नांचें स्थूल स्वरूप वरील प्रकारचें आहे. कोणत्या हि राष्ट्राचा निवळ भौतिक इतिहासग्रंथ लिहिणाऱ्या ग्रंथकारास देखील, अल्प प्रमाणानें कां होईना, परंतु त्या राष्ट्राच्या चारित्र्याचा विकास कोणत्या तत्वापासून झाला. याचें थोडक्यांत दिग्दर्शन करणें प्राप्त असतें. ह्या तत्वास अनुसरून मराठ्यांच्या भौतिक इतिहासग्रंथलेखकांनीं मराठ्यांच्या चारित्र्याचा विकास कोणत्या तत्वापासून झालेला आहे, याचें थोडें फार दिग्दर्शन करण्याचा प्रयत्न केलेला आहे. मराठ्यांच्या निरनिराळ्या भौतिक व आत्मिक इतिहासग्रंथलेखकांनीं मराठ्यांच्या सत्तेच्या उत्कर्षाच्या व प्रसाराच्या बाबतींत केलेल्या मीमांसेचा विचार केला असतां असें आढळून येतें, कीं मराठ्यांच्या सत्तेच्या उत्कर्षाच्या व प्रसाराच्या कारणमीमांसेसंबंधीं तीन निरनिराळे पंथ व तीन निरनिराळ्या विचारपरंपरा आहेत. ह्या तीन पंथांचें व त्यांच्या विचारपरंपरेचें स्वरूप खालीं दर्शविल्या प्रमाणें आहे.

**पहिला पंथ** परदेशस्थ युरोपीय ग्रंथकारांचा, दुसरा महाराष्ट्रेतर हिंदी ग्रंथकारांचा व तिसरा पंथ खुद्द महाराष्ट्रीय ग्रंथकारांचा. आतां ह्या तीन पंथांच्या विचारपरंपरा कोणत्या स्वरूपाच्या आहेत, त्या तशा बनण्यास कोणतीं कारणें झालीं इत्यादि बाबींचें प्रथम थोडक्यांत दिग्दर्शन करून नंतर ह्या तीन पंथांच्या विचारपरंपरांपैकीं सत्यपरंपरा कोणती, याचें दिग्दर्शन करण्याचें आह्मीं योजिलें आहे. भोंवतालच्या मोठमोठ्या पर्वतश्रेणीवर पेटणारे प्रचंड वणवे पाहून सपाट प्रदेशावर राहणाऱ्या खेडवळ लोकांच्या मनाची जशी स्थिति होते त्याच स्वरूपाची कांहीं अंशीं युरोपीय ग्रंथकारांच्या मनाची स्थिति सोळाव्या व सतराव्या शतकांत एकाएकीं झालेल्या मराठ्यांच्या सत्तेच्या उत्कर्षाकडे त्यांचें लक्ष वेधल्यानें झाली. भरतखंडाच्या राजकीय क्षितिजावर मराठ्यांचा उदय झाल्यापासून एका अर्ध शतकांत हा हा म्हणतां मराठ्यांच्या सत्तेचा प्रसार चोहोंबाजूंनीं सर्वत्र झालेला पाहून कोणास हि विस्मय व आचंबा वाटल्यावांचून राहणार नाहीं. ही एवढी प्रचंड घडामोड

अस्तित्वांत येण्यास कोणतीं तत्वें कारणीभूत झालीं ह्याबद्दलची उपपत्ती लावतांना मराठ्यांचा इतिहास लिहिणाऱ्या विदेशीय लेखकांचा अगदीं घोटाळा उडून जाऊन ह्या बाबतींत त्यांची सपशेल दिशाभूल झालेली आपणास आढळून येते. ह्या दिशाभुलीचा परिणाम असा झाला आहे, कीं मराठे लोक हे निवळ लुटीच्या आशेनें पेंढारी लोकाप्रमाणें स्वराज्य स्थापन करण्यास व आपल्या सत्तेचा सर्व भरतखंडभर प्रसार करण्यास उद्युक्त झाले, असा विदेशीं युरोपीय ग्रथकारांनीं ठाम सिद्धांत ठरवून टाकला आहे. या मताचे प्रमुख अध्वर्यु म्हणजे ग्रँट डफ प्रभृति इंग्रजी ग्रंथकार होत. ह्या पंथापैकीं कांहीं प्रमुख ग्रंथकारांच्या मतांचे नमुने पुढे देतों. ग्रॅटडफचे विचार खालील प्रमाणें आहेत.:—

The preeminence to which the Marathas had attained was animating & glorious. But in their conquests no other nation can sympathise. They were not animated by that patriotism which devotes itself for its country's weal or its country's glory. The expansion of their sway carried no freedom even to Hindus, except freedon of opinion.........destretion, rapine, oppression, tyranny were their more certain concomittants.

मराठ्यांनी संपादन केलेली श्रेष्ठता स्फूर्तिदायक व अभिमानास्पद होती. परंतु त्यांच्या देश पादाक्रांत करण्याच्या कार्याबद्दल परकीय राष्ट्रास सहानुभूति वाटणें शक्य नाहीं. स्वदेशाचे वैभव व कल्याण यांस वाहिलेल्या स्वदेशाभिमानाच्या भावनेनें मराठे प्रेरित झालेले नव्हते. त्यांच्या राजसत्तेच्या विस्तारामुळें खुद्द हिंदुलोकांना देखील मतस्वातंत्र्याव्यतिरिक्त दुसरें स्वातंत्र्य प्राप्त झालें नव्हतें. नासधूस, लटालूट, जुल्म आणि स्वैरसत्ता यांचें साहचर्य मराठी सत्तेसमवेत असावयाचें, हें निश्चितपणें ठरलेलें होतें.

सर जॉन सीलीचें मत खालील प्रमाणें आहे—

In the Maratha movement there never was any thing elevated or patriotic, but that it contiuned from first to be an organisation of plunder.

उच्च भावना अगर स्वदेशाभिमान यांचा मराठ्यांच्या राजविस्ताराचें कार्यांत पूर्ण अभाव होता. प्रथमपासून शेवटपर्यंत मराठी राज्य म्हणजे लूट करणारी एक संस्था होती.

कर्नल टॉड म्हणतोः—

Though professing the same creed a wider sentiment divided the Marathas from tha Rajputs than from the despots of Delhi; whose tyrannical sway was more endurable, because less degrading than the rapacious meanness of the southerner. The Marathas were associations of vampires who drained the very life blood wherever the scent of spoil attracted them.

" रजपुत आणि मराठे जरी एकधर्मी होते, तरी दिल्लीच्या जुलमी बादशाहाबद्दल रजपुतांची जी मनोभावना होती तीहून फार निराळ्या प्रकारची मनोभावना मराठ्यांविषयीं त्यांचे मनांत वसत होती. दक्षिणेकडील मराठ्यांच्या लुटारू क्षूद्रपणापेक्षां दिल्लीच्या बादशहाची जुलमी सत्ता रजपुतांना जास्त सह्य भासत असे. व्हँपायर पक्षांच्या टोळ्याप्रमाणें मराठे लोक ज्या ज्या ठिकाणीं लुटीचा सुगावा लागे त्या त्या ठिकाणी धाड घालून त्या पक्षाप्रमाणें जीवित्व-साधनरूपी रुधिराचें शोषण करून घेत असत. "

शिवाजी महाराजाबद्दल व मराठ्यांच्या राज्यविस्ताराबद्दल अगदीं अलिकडे व्हिनसेंटस्मिथ यानें ऑक्सफर्ड हिस्टरी ऑफ इंडिया या ग्रंथांत खालील मत प्रदर्शित केलें आहे.

But the fact that Shivaji possessed and practised certain virtues must not obscure the truth that he was primarily a fierce robber chieftain, who inflicted untold misery on hundreds of thousands alike, merely for the sake of gain, using without scruple all kinds of cruelty & treachery to attain his wicked ends. The Maratha state at any stage whether during Shivaji's life-time or in its later developments under the Peshwas & the chiefs who replaced them as leaders, never served any good purpose or conferred any benefit upon India except in so far as it gratified Hindu sentiment in the particular ways above stated. The Maratha independent rule in all its varieties until 1818 was the rule of profeesed robbers. In short the Marathas were robbers by profession

whose activities could not be endured by decent neighbours. They were openly leagued with all the ruffians who came to the front in a time of disorder, & the suppression of their lawless rule was the first duty of that Government, which in spite of itself has become the controlling power in India.*

"शिवाजीचे ठायीं कांहीं अपूर्व सद्गुण वसत होते व ते गुण तो आपल्या आचरणांत आणित असे यामुळें स्वतःच्या फायद्या करितां व आपले दुष्ट हेतु साध्य करण्याकरितां हजारो लोकांस असंख्य यातना देणारा तो एक भयंकर चोरांचा नायक होता ह्या सत्य गोष्टीचा लोप होऊं देता कामा नये. मराठ्यांचें राज्य मग तें शिवाजीच्या काळांतलें असो अगर त्याच्या पश्चात् त्याच्या जागीं पुढारी ह्या नात्यानें बसलेल्या पेशव्यांचे काळांतलें असो, त्यापासून कोणतें हि चांगलें कार्य झालें नाहीं, अगर त्याचे योगानें हिंदुस्थानचें कोणत्याहि प्रकारचें हित झालेलें नाही. नाहीं म्हणावयास लुटीची लालसा तृप्त करण्याची सवड कांहीं हिंदुलोकांना मराठ्याच्या राजसत्तेमुळें प्राप्त झाली इतकें च. इ. स. १८१८ पावेतों मराठी राज्याची निरनिराळी रूपांतरें म्हणजे धडधडीत चोरांचें राज्य होतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हटलें म्हणजे मराठे हे धंदेवाईक चोर असून त्यांचें वर्तन सभ्य शेजाऱ्यास असह्य होण्या सारखें होतें. बेबंदशाहीच्या काळांत समाजाचें धुरीणत्व प्राप्त करून घेणाऱ्या राक्षसी पुरुषांशीं मराठ्यांनीं राजरोस स्नेहसंबंध ठेविला होता. प्रस्तुत काळीं ज्या लोकांच्या हातीं त्यांचे इच्छेविरुद्ध हिंदुस्थान देशाची सत्तासूत्रें आलीं आहेत त्या लोकांचें आद्य कर्तव्य मराठ्यांच्या बेलगामी राज्याचा नायनाट करणें हें होते."

मराठ्यांच्या सत्तेच्या उत्कर्षाच्या व प्रसाराच्या कारणमीमांसे संबंधीं इंग्रज इतिहासकारांच्या मताचे नमुने वरील स्वरूपाचे आहेत. आतां ह्या

* मराठ्यांच्या इतिहासाची साधनसामुग्री हल्लीं इतकी प्रसिद्ध झाली आहे कीं तिजकडे स्मिथचें लक्ष जाऊन त्यानें तिचा अभ्यास केला असतां तर मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाविषयीचा दीडशें वर्षांचा वरील स्वरूपाचा पुरातन दुराग्रह त्यानें व्यक्त करण्याचें धाडस कधीं हि केलें नसतें. परतु वरील प्रकारचे वेडगळ प्रलाप जाणून उमजून म्हणा अगर निवळ अज्ञानानें म्हणा अद्याप पावेतों हि स्मिथ सारखे विद्वान इंग्रज इतिहासकार सत्यवत म्हणून निःशंकपणें जाहिर करण्यास धजावतात, हें पाहून विस्मय वाटल्याखेरीज रहात नाहीं.

पंथांतील इतिहासकारांची वरील स्वरूपाची विचारपरंपरा बनण्यास कोणती कारणें झालीं याचा थोडक्यांत शोध घेणें जरूर आहे. विदेशीय युरोपीय लोकांस त्यांचा भरतखंडांत प्रथम प्रवेश झाल्यापासून आजतागाईत एतद्देशीय उच्च वर्णांतील लोकांशीं दळणवळण ठेवण्याचा म्हणण्यासारखा कधीं हि अवसर मिळाला नाहीं. हे लोक चातुर्वर्ण्यबाह्य असल्याकारणानें त्यांचा स्पर्श झाला असतां सचेल स्नान केलें पाहिजे, अशी आपलेकडील उच्चवर्णीय लोकांची एके काळीं भावना होती.* निव्वळ स्पर्शास्पर्श झाला असतां जेथें एवढी अडचण उत्पन्न व्हावयाची त्या ठिकाणीं हरएक प्रकारच्या सामाजिक कार्यांत असल्या परदेशस्थ लोकांचे एतद्देशीय लोकांशीं साहचर्य होऊन परस्परांचा विचारविनिमय होणें त्या काळीं जवळ जवळ अशक्य होतें असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. परदेशस्थ युरोपियन व एतद्देशीय लोकांच्या परस्परांतील दळणवळणास अशा प्रकारच्या अडचणी असल्याकारणानें त्या काळीं स्वराज्यस्थापनेस उद्युक्त झालेल्या महाराष्ट्रांतील क्षत्रिय व ब्राह्मण वर्णांच्या पुढाऱ्यांचीं मनें कोणत्या विचारांनीं भारलीं होतीं, याची कल्पना तत्कालीन युरोपियन परदेशस्थांस होणें जवळ जवळ अशक्य होतें. मुख्यत्वें करून ह्या अडचणीमुळें तत्कालीन विदेशीय युरोपियन ग्रंथकारांस मराठ्यांच्या राज्याच्या व सत्तेच्या प्रसाराचें हृद्गत् समजलें नाहीं व यामुळें त्यांनीं लिहिलेल्या इतिहासग्रंथांत त्या संबंधाचा कोठेंहि मागमूस आढळत नाहीं. ह्या वरील अडचणीमुळें महाराष्ट्रिय पुढाऱ्यांच्या मनोभावनीविषयीं विदेशीय युरोपियन ग्रंथकार पूर्णपणें अज्ञानी होते व या मुळें त्यांचे मतीस जें वाटलें तें त्यांनीं लिहिलें असा प्रकार घडून आला.

वर दर्शविलेल्या अडचणीखेरीज हें कार्य योग्य प्रकारें पार पाडण्याच्या मार्गांत विदेशीय युरोपियन इतिहासग्रंथकारांच्या मार्गांत दुसऱ्याहि कांहीं

---

* के० सर दिनकरराव राजवाडे व्हॉइसरॉय सारख्या बड्या अधिकाऱ्याच्या भेटीस जात तेव्हां बरोबर पाण्यानें भरलेली सुरई नेत असत. भेटीचे प्रसंगीं हस्तांदोलन झाल्यावर बरोबर नेलेल्या पाण्यानें हात धुवून टाकण्याचा त्यांचा प्रघात असे. युरोपियन लोक मांसाहारी असल्याकारणानें त्यांच्या हस्तस्पर्शाच्या दोषपरिहारार्थ हात धुवून टाकण्याचा त्यांचा प्रघात असल्याचे सर दिनकरराव यांनीं एका ले. गव्हर्नरास सांगितल्याचें त्यांच्या चरित्रांत नमूद आहे. (ओक यांनीं लिहिलेलें चरित्र पहा).

अडचणी होत्या. परदेशस्थ युरोपियन लोकांचा हिंदुस्थानांत प्रवेश होऊन थोडींबहुत वर्षे गेल्यानंतर शिवाजी महाराजांचा जन्म होऊन त्यांच्या अवतारकृत्यास आरंभ झाला. इंग्रज, फ्रेंच, पोर्तुगीज इत्यादि विदेशीय लोकांचे डोळ्यांसमोर हा हा म्हणतां सर्व भरतखंडभर मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष होऊन प्रसार झाला. ह्यामुळें भरतखंडाचे आधिपत्याबद्दल पुढें मागें प्रतिस्पर्धी या नात्यानें मराठ्यांबरोबर झगडा करण्याचा प्रसंग येईल, ही गोष्ट दूरदर्शी इंग्रजांचे मनांत तेव्हांच येऊन चुकली असली पाहिजे. एकदां ही गोष्ट लक्षांत येऊन गेल्यावर पुढें मागें होणाऱ्या प्रतिस्पर्ध्यांच्या कृत्यांचें यथातथ्य वर्णन इंग्रज इतिहासग्रंथकारांकडून व्हावें हें मानवी स्वभावाशीं बरेंच विसंगत दिसतें. मराठ्यांचें राज्य लयास जाऊन इंग्रजांची सत्ता भरतखंडांत स्थापित झाल्यानंतरच्या काळांत तर मराठ्यांच्या कृत्यासंबंधीं वस्तुविपर्यास करण्यास अधिक च कारणे उत्पन्न झालीं. मराठी साम्राज्य लयास जाऊन इंग्रजी सत्ता सर्वत्र स्थापित झाल्यानंतर मराठ्यांचें राज्य न्यायाचें, नीतीचें व लोकास सुखप्रद नसल्याकारणाने तें लयास जाऊन त्या ठिकाणीं न्यायी इंग्रजांचें राज्य स्वाभाविकपणें च स्थापन केलें गेलें अशा प्रकारचीं शब्दचित्रें रंगवून जित लोकांचे नजरेस तीं वारंवार पडतील, अशा प्रकारची योजना करणें, हा राजकारणाचा एक भाग च होऊन बसतो व हें कार्य अनेक इतिहासलेखक ग्रंथद्वारें करूं लागतात. अर्थात् ह्या कालांत निर्माण झालेल्या ग्रंथांत अगर लेखांत मराठ्यांविषयीं अगर त्यांच्या हेतु व कृति विषयीं प्रशंसापर उद्गार आढळणें दुरापास्त आहे. विदेशीय युरोपियन ग्रंथकारांनीं मराठ्यांच्या इतिहासलेखनाचे बाबतींत जे प्रमाद प्रथमतः निवळ अज्ञानानें केले ते च प्रमाद मराठी सत्तेच्या ऱ्हासा नंतरच्या काळांत जाणून उमजून वर दर्शविलेल्या राजकीय धोरणास अनुसरून केले असण्याचा संभव आहे. परंतु कारणें कांहीं हि असोत, त्यांचा परिणाम एक च झाला आहे, तो हा च कीं, मराठ्यांच्या सत्तेच्या उत्कर्षाशीं व तिच्या बुडाशीं कोणत्या हि उच्च प्रकारचे हेतु नसून निवळ लुटीच्या लालसेनें शिवाजी महाराज स्वराज्य स्थापण्यास व त्याचा प्रसार करण्यास उद्युक्त झाले व त्यांच्या पश्चात् ह्या च हेतूनें प्रवृत्त होऊन स्वसत्तेचा सर्व भरतखंडभर मराठ्यांनीं प्रसार केला, असें विदेशीय इतिहासलेखकांचें मत प्रचलित झालें आहे. मराठ्यांच्या आत्मिक इतिहासासंबंधीं जे तीन पंथ प्रथम दर्शविले त्या पंथापैकीं पहिल्या पंथाचीं मतें कोणत्या स्वरूपाचीं

आहेत व तीं तशीं बनण्यास कोणतीं कारणें झालीं, याचें दिग्दर्शन येथपावेतों केलें. आतां दुसऱ्या पंथाच्या मताचें स्वरूप व त्याच्या उत्पत्तीचीं कारणें यांचें थोडक्यांत प्रतिपादन करूं.

हा **दुसरा पंथ** म्हटला म्हणजे महाराष्ट्रेतर हिंदी लोकांचा होय. या पंथाच्या अनुयायांमध्यें बंगाली, पंजाबी, गुजराथी, रजपूत, मुसलमान इत्यादिकांचा समावेश होतो. मराठ्यांच्या सत्तेच्या कारणमीमांसेसंबंधीं ह्या पथाचें मत हि बहुतेकांशीं पहिल्या पंथाच्या मतासारखें आहे. ह्या पंथांतील बहुतेक सर्व लोकांचें असें मत आहे कीं मराठे केवळ परप्रांतांतील लोकांस लुबाडून त्यांची संपत्ती धुवून नेण्याकरितां निरनिराळ्या प्रांतावर सालोसाल मोहिमा करीत. ह्या पेक्षां त्यांचें मनामध्यें कोणत्याहि प्रकारचें उच्च धोरण नव्हतें. पहिल्या पंथांतील इतिहासलेखकांना त्यांच्या मताचें समर्थन करण्यास ह्या पंथांतील लोकांनीं मराठ्यांविषयीं काढलेल्या उद्गारांचा फार चांगला उपयोग होतो व सकृत्‌दर्शनीं असा भास होतो कीं, "खरें च, धर्म, आचार, विचार इत्यादि बाबतींत मराठ्यांशीं ततोतंत सदृश्य असलेले महाराष्ट्रेतर हिंदी लोक ज्या अर्थी मराठ्यांविषयीं आपला प्रतिकूल अभिप्राय व्यक्त करितात व विदेशीय युरोपियन ग्रंथकारांच्या मराठ्यांविषयींच्या मताचा अनुवाद करितात त्याअर्थी विदेशीय युरोपियन ग्रंथकारांच्या मतांत निःसंशय कांहीं ना कांहीं तरी थोडे फार तथ्य असलें पाहिजे. आतां ह्या पंथांतील लोकांच्या मतांचे कांही नमुने खालीं देतो.

प्रोफेसर कालीप्रसन्न बानर्जी यांनीं 'हिस्टरी ऑफ बेंगॉल इन दि एटिंथ सेंचरी' या ग्रंथाचे १६२-१६३ पानावर मराठ्यांच्या बंगाल प्रांतावरील स्वाऱ्यांचें मोठे भयानक चित्र काढलें आहे. त्या ग्रंथांतील एतत् विषयीं उतारा येथें न देतां मळ ग्रन्थ वाचून पाहण्याबद्दल आम्ही वाचकांस नम्र सूचना करितो.

इ. स. १७५७ ते १८०३ पावेतों मराठ्यांच्या ताब्यांत असलेल्या ओरिसा प्रांतांतील मराठ्यांच्या राज्या संबंधी ओरिसा प्रांतांतील लोकमत खालील प्रमाणें असल्याचें मेजर थॉर्न यानें "Memoirs of the wars in India" या पुस्तकांत नमूद केलें आहेः-

Almost satisfactory confidence was shown by all the priests and officers belonging to that extraordinary temple as well as by the inhabitants of Jagannath

both in their present situation and in the future protection of the British Government. The memory of these fifty years haunted the whole population like a nightmare long after it ( orissa ) passed under British Rule. The Marathas had made themselves hated by every class of people and even the priests of Jagannath had learnt to detest their coreligionists for their endless extortions and rapine. . [·Hunter's orissa. ]

"जगन्नाथ येथील लोकांनीं व तेथील नामांकित देवळाच्या अधिकाऱ्यांनीं व पुजाऱ्यांनीं त्यांच्या प्रस्तुतच्या स्थिती बद्दल व भावी कालांत इंग्रजी राज्यांत त्यास प्राप्त होणाऱ्या सुरक्षिततेबद्दल बहुतेक समाधानकारक असा भरंवसा दर्शविला. ओरिसा प्रांत इंग्रजी अमलाखालीं आल्या नंतर कित्येक काळ पावेतों त्या प्रांतांतील लोकांच्या मनांत मागील पन्नास वर्षांच्या ( मराठ्यांच्या राज्याबद्दलच्या ) आठवणी भयंकर स्वप्ना प्रमाणें डांचत असत. प्रत्येक जातीचे ओरिसा प्रांतांतील लोक मराठ्यांचा द्वेष करीत असत आणि जगन्नाथ देवळाचे पुजारी देखील त्यांच्या स्वधर्मियांच्या ( मराठ्यांच्या ) अखंड लुटालुटीमुळें व पैसे उपटण्याच्या संवयी मुळें त्यांचा तिरस्कार करीत असत."

सन १९१८च्या डिसेंबरच्या मॉडर्न रिव्ह्यूचे अंकांत बंगाली ब्राह्मण ह्या सही खालीं प्रसिद्ध झालेल्या लेखात लेखकाने खालील मत व्यक्त केलें आहे."

That they ( Maratha Brahmins ) were not actuated by the same feelings in the days of the Peshwas is due to the fact that the virtue of patriotism as understood in these days was unknown in India.

"पेशव्यांच्या काळांत महाराष्ट्रीय ब्राह्मणांचे ठिकाणीं प्रस्तुत काळीं देशाभिमान ह्या संज्ञेनें व्यक्त होणाऱ्या भावना वसत नव्हत्या. हल्लींच्या काळीं देशाभिमान ह्या संज्ञेंत ज्या भावनांचा समावेश होतो असें समजण्यांत येतें तशा प्रकारच्या भावनांचा समावेश ह्या संज्ञेंत होतो अशी त्या काळच्या हिंदुस्थानांतील लोकांची समजूत नव्हती."

अगदीं अलिकडे स्वामी विवेकानंद व प्रोफेसर यदुनाथ सरकार ह्या दोन सुप्रसिद्ध बंगाली विद्वानांचीं मतें अनुक्रमें प्रबुद्ध भारत व मॉडर्न रिव्ह्यू या मासिकांत प्रसिद्ध झालीं आहेत, तीं हि प्रस्तुत मुद्याच्या दृष्टीनें विचारांत घेण्यासारखीं आहेत.

सन १९१९ सालच्या जानेवारी महिन्याच्या [illegible] मासिकाचे अंकांत Historical evolution of India ह्या लेखांत स्वामी विवे-कानंदांनीं मराठ्या संबंधी खालील उद्गार काढले आहेत:—

We have seen throughout the history of India, a spiritual upheaval is almost always succeeded by political unity extending over a more or less area of the continent, which in its turn helps to strengthen the spiritual aspirations that it brings into being. But the speritual aspirations that preceded the rise of the Maratha or Sikh empire were entirely reactionary. We seek in vain to find in the court of Lahore or Poona even a ray of reflection of that intellectual glory which surrounded the court of the Moghuls much less the brilliance of Malwa or Vijayanagar. It was intellectually the darkest period of Indian history and both these meteoric empires representing the upheaval of mass fanaticism and hating culture, with all their hearts, lost their motive power as soon as they succeeded in destroying the rule of the hated Mahemedans.

"हिंदुस्थानच्या इतिहासाचा विचार केला असतां असें दिसून येतें कीं केव्हां हि देशांत धर्मजागृती झाली कीं त्याच्या मागोमाग देशांतील बऱ्याच मोठ्या भागांत राजकीय सत्तेचें एकीकरण होते. ह्या राजकीय एकीकरणास धर्मजागृतीचे योगानें फिरून बळकटी येते. परंतु मराठ्यांच्या अगर शिखांच्या उत्कर्षापूर्वी अस्तित्वांत आलेली धर्मजागृती प्रतिगामी स्वरूपाची होती. पुणें अगर लाहोर येथील दरबारांत माळवा अगर विजयनगर येथील राजघराण्यांचें वैभव आढळण्याचे लांबच राहो परंतु दिल्ली येथील मोगल राजदरबारांत दृग्गोचर होणाऱ्या बौद्धिक वैभवाचे एक अल्प बिंब हि दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. बौद्धिक दृष्ट्या मराठी राज्याचा कांळ अत्यत हीन असा होता, आणि त्या काळाच्या सामान्य जनतेच्या धर्मवेडाच्या वर्चस्वानें आणि सर्व प्रकारच्या संस्कृतीच्या द्वेषाने युक्त अशी हि उल्कारूपी साम्राज्यें द्वेष्य अशा मुसलमानी सत्तेचा नायनाट त्यांचे कडून झाल्या नंतर त्यांच्या निर्मितीचा मूळभूत हेतु नष्ट होऊन लयास गेलीं."

प्रोफेसर यदुनाथ सरकार यांचा, १९१९ च्या जून महिन्याच्या मॉडर्न रिव्ह्यूमध्ये "Lessons from the career of Shiwaji" या मथळ्याखाली एक लेख प्रसिद्ध झाला आहे. त्या लेखांत स्वराज्यस्थापना व त्याचा विस्तार करण्यास शिवाजी महाराज कोणत्या हेतूने प्रवृत्त झाले होते याची मीमांसा प्रोफेसर सरकार यांनी खालीं लिहिल्याप्रमाणें केली आहे.

From time immemorial it had been the aim of the typical Hindu King to set out early every autumn ( See Manu VII 99-100, 182 ) to extend his kingdom at the expense of his neighbours. Indeed the Sanskrit Law Books lay down such a course the necessary accomplishment of a true Kshatriya chief. In more recent times it had also been the practise of the Mehommedan Soverigns in Northern India and Deccan alike. But these conquerors justified their territorial aggrandisement by religions motives. According to Quaranuic Law there can not be peace between a Mehommedan King and his neighbouring 'Infidel' states. The latter are Dar-ul-Harb or legitimate seats of wars and it is the Muslim King's duty to slay and plunder them till they accept the true faith and become Dar-ul-Islam, after which they will become entitled to his protection.

The coincidence between Shiwaji's foreign policy and that of a Quaranic sovereign is so complete that both the history of Shiwaji by his courtier Krishnaji Anant and the Persian official history of Bijapur use exactly the same word 'Mulukgiri' to describe such raids into neighbouring countries as a regular political ideal. The only difference was that in theory at least an orthodox Muslim King was bound to spare the other Muslim states in his path and not to spoil or shed the blood of true believers, while Shiwaji ( as well as the Peshwas after him ) carried on his Mulukgiri into all neighbouring Native states,

Hindus no less than Islamic and squeezed rich Hindus as mercilessly as he did Mehommadans. Then again the orthodox Islamic King, in theory at least aimed at annexation and conversion of other states, so that after the short sharp agony of conquest was over the latter enjoyed peace like the regular parts of his dominion. But the object of Shiwaji's military enterprises, unless his court historian Sabhasad has misrepresented it, was not annexation but mere plunder or to quote his very words the Maratha forces should feed themselves at the expense of foreign countries for eight months every year and levy black-mail.

अनादि कालापासून नमुनेदार हिंदुराजाचा प्रघात म्हटला म्हणजे शरद्ऋतुचे सुरवातीस शेजारच्या राजाचा मुलूख आपल्या राज्यांत सामील करण्याकरितां त्या मुलखावर स्वारी करण्याकरितां निघावयाचें हा होय. खऱ्या क्षत्रिय राजाचें हे कर्तव्य असल्याचें हिंदुधर्मशास्त्रग्रंथांत लिहिलेलें आहे. ( पहा, मनु अध्याय ८ श्लोक ९९ ते १००, १८२) आधुनिक कालांत उत्तर आणि दक्षिणेकडील मुसलमान राजांनीं ह्या प्रघातास अनुसरून वागण्यास सुरवात केली होती. महमदी राजे कुराणाच्या आज्ञेचे सबबीवर ह्या प्रघाताचें समर्थन करीत असत. महमदी राजाच्या शेजारील काफिर राजाशीं सख्यत्वानें नांदणें कुराणाच्या आज्ञेच्या विरुद्ध आहे. अशा प्रकारचीं महमदी राजाच्या शेजारील काफीर राज्यें कुराणाच्या आज्ञेप्रमाणें दर-उल-हर्ब म्हणजे लढाई करण्यास योग्य अशीं क्षेत्रें समजलीं जातात. अशा क्षेत्रांतील लोक महमदी धर्माचा स्वीकार करून तीं क्षेत्रें दर-उल-इसलाम ह्या संज्ञेस पात्र होऊन महमदी राजाचे रक्षणास पात्र समजलीं जात तोंपर्यंत ह्या क्षेत्रांतील लोकांस ठार मारणें आणि त्यांना लुटणें हे महमदी राजाचें कर्तव्य समजलें जात असे. शिवाजीमहाराजांच्या परराज्या विषयींच्या धोरणांत आणि कुराणांत वर्णन केलेल्या महमदधर्मी राजाच्या परराष्ट्रीय धोरणांत इतकें साम्य आहे, कीं शिवाजीमहाराजांचा बखरकार कृष्णाजी अनंत आणि विजापूरच्या बादशाहांचा दरबारी फारशी इतिहासकार या दोघांनी शेजारच्या राज्याच्या मुलखावर स्वाऱ्या करण्याच्या राजकीय ध्येयाचें वर्णन करण्या करितां मुलुखगिरी हा एकच शब्द वापरला आहे. हिंदु आणि

मुसलमान राजांच्या राजकीय ध्येयांत फरक इतकाच होता कीं, तात्विक दृष्ट्या कुराणधर्माभिमानी महमदी राजा त्याच्या शेजारच्या महमदी राजाच्या प्रदेशावर स्वाऱ्या न करणें आणि त्याच्या राज्यातील महमदी प्रजेस ठार न मारणें हे आपलें कर्तव्य समजत असे. परंतु शिवाजी आणि त्याच्या पश्चात् त्याच्या जागीं स्थानापन्न झालेले पेशवे त्यांच्या शेजारच्या राज्याच्या मुलुखावर, मग ते हिंदु असोत अगर मुसलमान असोत, मुलुखगिरी करीत असत व त्या प्रमाणें मुसलमान लोकांकडून निर्दयपणें पैसे लुबाडून घेत. त्याच प्रमाणें हिंदु लोकांकडून हि पैसे लुबाडून घेत असत. याशिवाय वरील दोन्ही धर्मीय राजांच्या ध्येयांत तात्विक दृष्टया आणिक एक फरक होता. शेजारील राजाचा मुलुख पादाक्रांत करून त्या प्रदेशांतील लोकांस मुसलमान धर्माची दीक्षा देणें हें महमदी राजाचें कर्तव्य समजलें गेल्या कारणानें नवीन प्रदेश जिंकतांना त्या प्रदेशांतील लोकांस जेत्या महमदी राजा कडून जी कांहीं दुःखें व वेदना सोसाव्या लागत त्या त्यानीं सोसल्या नंतर त्या प्रदेशांतील लोकांस त्या महमदी राजाच्या सत्ते खालील इतर प्रदेशांतलि लोकां प्रमाणें शांतता अनुभविण्यास सांपडत असे. परतु शिवाजीच्या दरबारांतील बखरकार कृष्णाजी अनंत सभासद यानें शिवाजीच्या मुलुखगिरीच्या हेतूविषयीं वस्तुविपर्यास केला नसल्यास शिवाजीच्या लष्करी स्वाऱ्यांचें धोरण शेजारच्या राज्याचा मुलुख आपल्या राज्यास सामील करणें हा नसून निवळ त्या राज्याच्या मुलखांत लुटालूट करणें अथवा खुद्द सभासदाचे भाषेंतच बोलावयाचें म्हटलें म्हणजे बारा महिन्या पैकीं आठ महिने मराठी सैन्यानें परकीय राजाचे प्रांतांत यथेष्ट चरावें व त्या प्रांतांतील लोकांना लुटावे हा होता.

---

१ प्रोफेसर सरकार यानीं प्रदर्शित केलेले वरील विचार वाचून कोणास हि त्यांच्याविचारसरणीचा आचंबा वाटल्यावांचून रहाणार नाहीं. त्यांच्या विचारसरणींत व्यक्त होणाऱ्या त्यांच्या मनोरचनेचें आविष्करण प्रस्तुत स्थळीं करणें जरूर आहे. सत्यशोधन व सत्यकथन हें सर्व श्रेष्ठ ध्येय कोणत्या हि इतिहासकाराचें असलें पाहिजे, हा सर्वमान्य सिद्धांत आहे. परंतु या सिद्धांताचे कसोटीस उतरणारे इतिहासकार फारच थोडे आढळतात. प्रो. सरकार यांचे वरील विचार वाचले म्हणजे ते त्यांचे लेखणींतून उतरत असतां इतिहासलेखकाच्या उच्च ध्येयापासून ते निःसंशय घसरलेले दिसतात. मराठ्यांविषयीं पूर्वग्रहानें कलुषित झालेल प्रो. सरकार यांचें मन वरील विचारांच्या बुडाशीं आहे, असें त्यांच्या वरील लेखाचें वरवर परीक्षण करणारास हि दिसून येणार आहे. प्रो. सरकार यांची वरील लेखांतील विचारसरणी किती सदोष

व असंबद्ध आहे, याचें आम्ही थोडक्यांत दिग्दर्शन करितों. हिंदुस्थानवर स्वाऱ्या करणाऱ्या परकीय मुसलमानधर्मीय राजांनीं हिंदुस्थानांत शिरून कोणत्या प्रकारचा धिंगाणा घातला, संपत्तीची लूट, स्त्रियांच्या पातिव्रत्याचा भंग, धर्माकरितां हजारों निरपराधी लोकांच्या कत्तली, मूर्ति व देवळें यांची फोडाफोड व जाळपोळ इत्यादि नाना प्रकारचीं अनन्वित कृत्यें कशीं केलीं, हें सर्वांस महशूर आहे च. मुसलमान बादशहांचे शिरोमणि औरंगजेब यांचें चरित्र व इतिहास लिहिणाऱ्या प्रो. सरकारांना वरील बाबीसंबंधीं खडानखडा माहिती असली पाहिजे हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. परंतु वरील सर्व प्रकार कुराणाच्या आज्ञेच्या आधारावर मुसलमानी राजे करीत, सबब त्याबद्दल त्यास विशेष दोष देतां येत नाहीं, अशी प्रो. सरकार यांनीं मुसलमानी राज्यकर्त्यांतर्फे वकिली लढविली आहे. आतां मराठ्यांचे बाबींत प्रो. सरकार यांचे त्या च मुद्यांविषयीचे विचार किती वेडगळपणाचे व एखाद्या तुटपुंज्या इतिहासकारास शोभतील असे आहेत, ते पहा.मुसलमानी सत्ता हिंदुस्थानांत स्थापित होऊन औरंगजेबाचे पश्चात तिचा मराठ्यांचे हातून लय होई तोंपर्यंत हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांतील हिंदुमुसलमान राजांबरोबर मोंगल बादशहांचीं युद्धें चालू होतीं व त्या युद्धांत हि मुसलमानधर्मी मोंगलांचे हातून वरील प्रकारचीं अनन्वित कृत्यें घडत असत. परंतु वर दर्शविल्याप्रमाणें प्रो. सरकार यास त्यांत कांहीं दोष ठेवण्याखारखे आढळत नाही. परंतु शिवाजी महाराजांनीं असलें एखादें हि कृत्य ( हिंदुस्थानावर स्वाऱ्या करणाऱ्या मुसलमानधर्मीय राजांनीं व मोंगलबादशहांनीं केलेल्या वरील कृत्यांपैकीं संपत्तीची लूट त्याखेरीज दुसरीं कोणतीहि कृत्यें शिवाजीमहाराजांनीं केलीं नाहींत, अशी इतिहासाची साक्ष आहे, ही गोष्ट ह्या ठिकाणीं लक्षांत ठेवणें जरूर आहे. ) केलेल त्यांना योग्य व क्षम्य वाटत नाही. कां ? तर कुराणग्रंथासारख्या एखाद्या ग्रंथाचा त्यांचें कृत्यास आधार नाहीं म्हणून. प्रो. सरकार हे पर्शियन भाषाभिज्ञ असल्यामुळें व कदाचित् संस्कृतभाषेशीं व एकेकाळीं ती भाषा बोलणाऱ्या लोकांच्या संस्कृतीशीं त्यांचा विशेष परिचय नसल्याकारणानें वरील अवतरणांचे आरंभीं ज्या मन्वादि स्मृतीतील राजांच्या कर्तव्याविषयीचे आधार प्रो. सरकार यांनीं नमूद केले आहेत, ज्या मन्वादि स्मृति धार्मिक हिंदुराजास कुराणा इतक्याच आज्ञापालनत्वाचे बाबतींत शिरसामान्य असतात व मुसलमानधर्मी राजे कुराणास जितकें पवित्र मानीत व त्यांतील आज्ञांस अनुसरून आचरण करीत त्याचप्रकारें हिंदु राजे हि स्मृत्यादि ग्रंथांतील आज्ञास पवित्र मानून त्यास अनुसरून वागणें आपलें कर्तव्य समजत. ह्या गोष्टीचा त्यांना विसर पडला असावा असें दिसतें. पूर्वकालीन हिंदुराजांचीं अनेक ताम्रशासनें अलीकडे प्रसिद्ध झालीं आहेत. ह्या ताम्रशासनांच्या सुरवातीस च ताम्रशासन काढणाऱ्या हिंदुधर्मीय राजांच्या प्रशस्त्या असतात. त्या प्रशस्त्यांतून "मन्वादि स्मृतींतील धर्मास अनुसरून राज्य करणारे" अशा प्रकारचीं बिरुदें त्या हिंदुधर्मीय राजांनीं धारण केल्याचें आढळून येतें. ह्या वरून पूर्वकालीन हिंदुधर्मी राज

मन्वादिस्मृतीस अनुसरून राज्य करीत असत हें सिद्ध होत आहे. ह्या बाबीची प्रो. सरकारास जाणीव असती तर वरील प्रकारचे विचार प्रसिद्ध करण्यास ते प्रवृत्त झाले नसते. आतां दुसऱ्या एका मुद्याचें थोडें विवेचन करणें जरूर आहे. शिवाजी महाराजांच्या मुलुखगिरी बद्दल प्रो. सरकार हे त्यास दोष देत असून निवळ लुटीवांचून त्यांचा दुसरा कांहीं हेतु नव्हता असा सिद्धांत त्यांनीं ठोकून दिला आहे. हा सिद्धांत किती असत्य आहे हें समजणें फार कठीण नाहीं. तें कसें तें पहा. शिवाजी महाराजांनीं स्वराज्याची स्थापना ज्या प्रदेशांत केली तो प्रदेश मुसलमानी राजसत्तेच्या कक्षेखालीं होता हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. त्याचप्रमाणें ह्या प्रदेशाच्या आजूबाजूचा चोहोंकडचा प्रदेश मुसलमानी राजसत्तेच्या अमलाखालील होता हें हि सर्वास अवगत आहे. शिवाजी महाराजांचे दृष्टीनें तो प्रदेश शत्रूचा प्रदेश असून त्यांतील प्रजा मग ती कोणत्याहि जातीची अगर धर्माची असो शत्रु-प्रजा होती ही गोष्ट समजण्यास कठीण नाहीं. महाराष्ट्रधर्म रक्षणार्थ स्वराज्य स्थापना करून त्या स्वराज्याचा विस्तार करणें हें शिवाजी महाराजांचें ध्येय होतें. हें ध्येय सिद्ध करण्याची खटपट त्यांच्या सर्व आयुष्यभर चालू होती व त्यांचे निधनापर्यंत तें पूर्णपणें सिद्धीस गेलें नव्हतें. वर दर्शविलेल्या परि-स्थितींत शिवाजी महाराजांना स्वराज्याचा विस्तार करून महाराष्ट्र धर्माची स्थापना कर्तव्य असल्याकारणानें मुसलमानी राज्यांच्या कक्षेंतील प्रदेशावर स्वाऱ्या करून तो प्रदेश स्वराज्यांत सामील करणें अपरिहार्य होतें. मुसलमानी शत्रुराजाच्या प्रदेशां-तील प्रजा यद्यपि हिंदुधर्मीय असल्या तरी तो प्रदेश जिंकून स्वराज्यांत सामील होई-पर्यंत शत्रुप्रजा या नात्यानें त्यांच्याशीं वर्तन केल्याखेरीज शिवाजी महाराजास अन्य मार्ग नव्हता. अशा प्रकारच्या स्वाऱ्यांत हिंदुधर्मीय लोकांस शत्रुप्रजा या नात्यानें न लेखितां कांहीं निराळ्या प्रकारें शिवाजी महाराजांनीं लेखावयास पाहिजे होतें अशी अपेक्षा करणें शुद्ध वेडगळपणाचें आहे. शिवाजी महाराजांचा बखरकार कृष्णाजी अनंत यानें वापरलेला मुलुखगिरी हा शब्द स्वराज्य प्रसारार्थ मुसलमानी राजांचे ताब्यांतील प्रदेशावर सालोसाल शिवाजी महाराज ज्या स्वाऱ्या करीत त्यांचें दिग्द-र्शन करण्याकरतां वापरला आहे. असें शिवाजी महाराजांनीं स्वराज्य स्थापना व स्वराज्य विस्तार कोणत्या परिस्थितींत केला या बाबीचा पूर्वग्रहानें न पछाडलेल्या कोणत्या हि माणसानें विचार केला असता त्याचें मत झाल्यावांचून राहणार नाहीं. शिवाजी महाराजांनीं शत्रुप्रदेश काबीज करून तो स्वराज्यांत सामील केला म्हणजे तेथील प्रजेस ते किती प्रेमानें वागवीत व त्यांच्या सुखाबद्दल किती काळजी बाळगीत याबद्दल वाटेल तितका पुरावा मराठ्यांच्या इतिहास साधन ग्रंथांत प्रसिद्ध झालेला आहे. शिवाजी महाराजांचें निधनानंतर पेशव्यांचे कारकीर्दींत स्वराज्य विस्ताराचें कार्य सतत चालूच होतें. व हें कार्य चालू असतां मुसलमानी अमलाखालील प्रदेशावर सालोसाल

आतां या पंथाचे हें मत अशा प्रकारचें बनण्यास कोणतीं कारणें झालीं, हें ठरवितांना तत्कालीन भरतखंडांतील राजकीय परिस्थितीचा थोडाबहुत विचार करणें जरूर आहे. शाहुमहाराजांच्या स्थापनेपासून तों थेट शेवटच्या बाजीराव पेशव्यांचे काळापावेतों सर्व भरतखंडाचें वर्चस्व साध्य करण्याकरितां झगडणाऱ्या इंग्रज फ्रेंच, हैदर, टिपू, निजाम, इत्यादिकांमध्यें मराठे हे प्रमुख होते. जो पावेतों इंग्रजांचें प्रस्थ विशेष माजलें नव्हतें तोंपावेतों मराठ्यांचे शत्रू उत्तरेकडील मोगल व दक्षिणेकडील विजापूरकर इत्यादि मुसलमान बादशाह हे होते. भरतखंडाचा जो जो प्रांत मोगल बादशहांचे अगर दक्षिणेकडील मुसममान बादशहांचे सत्तेखालीं होता तो तो प्रांत त्यांचे सत्तेखालून सोडवून स्वराज्यांत सामील करणे ही स्वराज्य स्थापनेची व विस्ताराची एक मुख्य बाब होती व या बाबीच्या सिद्धीस्तव सालोसाल निरनिराळ्या दिशेनें निरनिराळ्या प्रांतावर स्वाऱ्या करून ते प्रांत स्वराज्यांत सामील करण्यांवाचून मराठ्यांना गत्यंतर नव्हते. मोगल व मुसलमान हे मराठ्यांचे शत्रू ठरल्या कारणानें अर्थातच त्यांच्या सत्तेखालीं राहणाऱ्या प्रजाजनांना, मग ते कोणत्या हि जातीचे अगर धर्माचे असोत, शत्रूच्या ठिकाणीं लेखून त्यांच्यापाशीं, तो प्रांत स्वराज्यांत सामील होई तों पर्यंत, शत्रु-

---

स्वाऱ्या करण्याचा परिपाठ सर्व हिंदुस्थानभर स्वराज्य स्थापित होई तों पर्यंत त्यांना चालू ठेवणें जरूर होतें. ह्या स्वाऱ्यांत वर दर्शविल्याप्रमाणेंच मुसलमानी राज्यांतील हिंदु लोक मराठ्यांचे धर्मबांधव असले तरी त्यांना शत्रुप्रजेप्रमाणेंच लेखून तत्कालीन युद्ध नीतीस अनुसरून मराठे लोक त्यांचेपाशीं वर्तन करीत असत. युरोपांतील सर्व राष्ट्रांतील लोक ख्रिस्ती धर्मानुयायी आहेत. तथापि त्यांचेमध्यें युद्ध सुरू झालें असतां परस्पराशीं लढणार लोक ख्रिस्त धर्मानुयायी आहेत या गोष्टीची परस्परास पूर्ण जाणीव असून हि ते परस्पराशी शत्रूच्या नात्यानें वर्तन करण्यास चुकत नाहींत ही गोष्ट कोणत्याहि इतिहासकारास सांगावयास पाहिजे असें नाही. विसाव्या शतकांतील अत्यंत सुसंस्कृत राष्ट्रांतील लोकांची जेथें ही कथा, तेथें सतराव्या किंवा अठराव्या शतकांतील मराठे लोक त्यांच्या शत्रूच्या प्रांतांतील हिंदुधर्मीयाशीं युद्धनीतीस अनुसरून कठोर प्रकारचें वर्तन करीत असत ही गोष्ट प्रो. सरकारसारख्या इतिहासज्ञास दोषास्पदच कां वाटावी ही आश्चर्याची गोष्ट आहे. प्रो. सरकार यांच्या मराठ्यांविषयींच्या पूर्वग्रहानें दूषित असलेल्या मनाच्या ह्या केवळ चेष्टा आहेत, असें ह्या प्रश्नाचा निर्विकारपणें विचार करणाऱ्या कोणत्या हि माणसास वाटल्यावांचून रहाणार नाही.

त्याचे नात्यानें वर्तन करणे मराठ्यांना प्राप्त होते. * शत्रुप्रदेशांत नासधूस जाळपोळ, लुटालुट इत्यादि कर्मे प्रस्तुत काळीं प्रागतिक व सुसंस्कृत ह्मणविणाऱ्या राष्ट्रांतील लोक बिनदिक्कत करितात हें सर्वांस महाशूर आहे. अशा स्थितींत त्या काळांत शत्रु प्रांतांतील लोकांशीं मराठ्यांनी वरील परिस्थितींत जें वर्तन केलें त्यांत कांही अमानुषपणा केला असें कधीं हि ह्मणतां येणार नाहीं. वरील परिस्थितींत मराठ्यांनीं केलेल्या ह्या वर्तनाचा अनुभव त्या प्रांतांतील लोकांना जसा आला तसा त्यांनीं मराठ्या संबंधीं आपला अभिप्राय नमूद करून ठेविला. परंतु स्वराज्य स्थापनेच्या व प्रसाराच्या बुडाशीं मराठ्यांचें कोणत्या स्वरूपाचे ध्येय होतें, हें ठरवितांना पुरावा म्हणून वरील मते कोणीहि न्यायी मनुष्य जमेस धरणार नाहीं.

---

* एका देशाचे राजानें त्याच्या शत्रू राजाच्या प्रजेशीं कोणत्या प्रकारें वर्तन करावें या विषयीं चिटणीस कृत राजनीतींतील खालील उतारा लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

" शत्रूच्या प्रजा आहेत त्या जो कालपर्यंत आपल्या जहाल्या नाहींत तोंवरि त्यास लुटाव्या, माराव्या, त्याचा अनेक प्रकारें करून नाश करावा. आपल्या असे जाहल्यावरि त्याचें पालन पुत्रवत् करावें याच प्रमाणें कपट युद्ध करावें. " ( चिटणीसकृत राजनीति पान ८३ )

राजनीतींतील वरील उताऱ्यांतील तत्वास अनुसरून शिवाजी महाराज व त्यांच्या पश्चात् महाराष्ट्राचे दुसरे पुढारी यांचें वर्तन होतं हें उघड आहे. शुक्रनीतीच्या पहिल्या अध्यायाचे ७६६ श्लोक व ७६८ ते ७७० हे हि शिवाजी महाराजांनीं स्वराज्य स्थापनेचे बाबतीत जें धोरण स्वीकारलें होतें त्यावर चांगला प्रकाश पाडणारे असून ते फार महत्वाचे आहेत. सबब त्यांचें भाषांतर आम्ही येथें देतो.

( ७६६ ) संकट काळीं राजानें डोंगरी किल्याचा आश्रय करावा, आणि तेथें राहून लूट व मारामाऱ्या करून आपलें राज्य परत मिळवावें.

( ७६८–७७० ) राजानें लुटारुप्रमाणें त्याच्या शत्रूची सर्व दिशांस असलेली संपत्ति लुबाडून घ्यावी.

शिवाजी महाराजांस मुसलमानांचे दास्यांतून महाराष्ट्र देशांस व त्यांतील लोकांस मुक्त करावयाचें होतें. हें कार्य साध्य करण्याकरितां त्यांनीं प्रथम विजापूर बादशहाचे डोंगरी किल्ले हस्तगत केले व कितीएक नवीन बांधले. त्याचप्रमाणें सुरत, बारशिलोर, कारंजें इत्यादि शहरें लुटून अपार संपत्ति मिळविली. अशा रीतीनें मिळविलेल्या सर्व पैशाचा विनियोग शिवाजी महाराजांनीं स्वराज्याचा विस्तार करण्याकडे केला. शुक्रनीतींतील वरील तत्वें प्रत्यक्ष आचारणांत शिवाजी महाराजांनीं आणली हें त्यांच्या चरित्रावरून उघड होत आहे.

मराठ्यांच्या सत्तेचा पाया घातला गेल्यापासून तों अखेर तिचा लय होईपर्यंत असा अल्प हि काळ गेला नाहीं कीं, ज्या काळांत मराठ्यांना थोडी-बहुत शांतता मिळून जिंकलेल्या प्रदेशांत स्थिरस्थावर करून तेथें सुराज्याचा प्रचार करण्यास त्यांना अवसर मिळाला. त्या काळांत असे कित्येक प्रांत होते कीं, जे आज मराठ्यांचे ताब्यांत तर कांहीं काळानें फिरून मोंगलांच्या अगर मुसलमानांच्या सत्तेखालीं जात. कालांतरानें ते च प्रांत फिरून मराठे मोंगलांपासून अगर मुसलमानापासून काबिज करून घेत. अशा प्रकारच्या घालमेलीच्या व अस्वस्थतेच्या काळांत शत्रुप्रदेशांतील लोकांशीं मराठ्यांनीं केलेलें वर्तन, स्वराज्यस्थापनेच्या व प्रसाराच्या कामीं त्यांचे हेतू कोणते होते हे ठरवितांना लक्षात घेणें कधीं हि वाजवी व समंजसपणाचें होणार नाहीं. वरील परिस्थिति लक्षांत घेतली असतां ह्या पंथांतील लोकांची मराठ्यांच्या स्वराज्य स्थापनेच्या व प्रसाराच्या हेतूविषयीं वर दर्शविलेल्या स्वरूपाचीं मतें बनण्यास कोणतीं कारणें झाली आहेत हें उघड दिसून येत आहे. मुसलमान व बंगाली लोकांचीं मतें ह्या बाबतींत प्रामुख्यानें पुढें करण्यांत येतात. परंतु आतां च दर्शविलेल्या परिस्थितीचा विचार करितां ह्या मतामध्यें म्हणण्यासारखे तथ्य नाहीं असें कोणासहि कबूल करणें भाग आहे. बंगाल प्रांत मुसलमानी सत्तेखालीं असल्या कारणानें तो प्रांत सोडवून स्वराज्यांत सामिल करण्याची कामगिरी नागपूरकर भोसल्यांकडे आली होती व ती कामगिरी बजावीत असतां शत्रुप्रदेश समजून जे प्रकार तत्कालीन राजनीतीस व युद्ध पद्धतीस अनुसरून मराठ्यांनीं केले असतील, त्यांवरून मराठ्यांच्या हेतूसंबंधीं भलतीं अनुमानें काढणें कधीं हि रास्त होणार नाहीं. दुसऱ्या पंथाचीं मतें व त्यांची कारणमीमांसा हीं अशा प्रकारचीं आहेत. आतां तिसऱ्या पंथाच्या म्हणजे खुद्द महाराष्ट्रीय इतिहासग्रंथलेखकांच्या मतांच्या विचाराकडे वळूं.

वर दर्शविलेला **तिसरापंथ** ह्मटला ह्मणजे खुद्द महाराष्ट्रीयांचा च होय. मराठ्यांचें राज्य लयास जाईतोंपर्यंत मराठे लोक प्रत्यक्ष स्वराज्य स्थापनेच्या व प्रसाराच्या महत्कार्यांत दंग झाले असल्या कारणानें, त्यांच्या स्वतःच्या चारित्र्याचे वर्णनात्मक ग्रंथ निर्माण करण्यास त्यांना ह्मणण्यासारखा अवसर मिळाला नाहीं व तशा प्रकारची ह्मणण्यासारखी ग्रंथरचना हि पण त्यांच्या हातून त्या काळीं झाली नाहीं. तथापि अलीकडे मराठ्यांच्या इतिहासाचीं जीं साधनें उपलब्ध झालीं आहेत व होत आहेत त्या इतिहाससाधन-

ग्रंथांतून प्रसंगोपात स्वराज्यस्थापनेच्या व प्रसाराच्या महत्कार्यास ते कोणत्या हेतूंनीं उद्युक्त झाले याविषयींचे उल्लेख अनेक ठिकाणीं आढळतात. इंग्रजी सत्ता महाराष्ट्रांत स्थापन होऊन १८५७ सालच्या बंडा नंतर कांहीं काळ पावेतों महाराष्ट्रांतील विद्वान लोकांपैकी कोणाचें हि लक्ष ह्या बाबींकडे गेले नाहीं. ह्या नंतर मराठी राष्ट्राच्या चारित्र्याचा विचार करणारे जे कांहीं थोडे विद्वान लोक महाराष्ट्रांत निर्माण झाले त्यांच्या मनावर इंग्रजी राज्याची शिस्त व लखलखीतपणा यांचा परिणाम बेसुमार झाला असल्याकारणानें व स्वतःच्या पूर्वजांविषयींचें ज्ञान फक्त विदेशीय युरोपियन ग्रंथ-कारांच्या ग्रंथांवरूनच प्राप्त झालें असल्याकारणानें त्यांचीं मतें स्वतःच्या पूर्वजां-विषयीं अगदीं विपरीत बनलीं गेलीं होतीं हा एक अपूर्वच प्रकार महाराष्ट्रांत होऊन गेला. पराक्रमी बापाचे वेडगळ व अज्ञानी पोर बाप मेल्यानंतर जसें आपल्या बापास मूर्ख कोटींत काढतें तशा पैकींच कांहींसा चमत्कारिक प्रकार महाराष्ट्रांत घडून आला. अशा प्रकारच्या माहाराष्ट्रिय विद्वानापैकीं कै. रा. ब. गोपाळराव हरी देशमुख हे एक नमुनेदार गृहस्थ होत. रावबहादुरांना आ-पल्या पूर्वजांच्या कृतींत तिळमात्र बरेंपणा भासला नाहीं व त्याबद्दल त्यांस अभिमान बाळगण्यासारखे हि पण कांहीं दिसलें नाहीं. शिवाजी महाराजांच्या सप्तप्रकर्णात्मक चरित्रास कै. रावबहादूर निळकंठ जनार्दन कीर्तने यांनीं जी प्रस्तावना जोडली आहे त्या प्रस्तावनेंत या पंथांतील वरील स्वरूपाच्या मताचें एक नमुनेदार उदाहरण दिलें आहे, तें जसेच्या तसेच आम्ही वाचकांस सादर करितो. कीर्तन्यांनीं मत प्रदर्शित करणाऱ्या गृहस्थाचा नामनिर्देश केलेला नाहीं. परंतु ते विचार रा. ब. देशमुखांच्या विचाराशीं तंतोतंत जुळत असल्याकार-णानें ज्या मुद्याचें आम्ही विवेचन करित आहोत त्या मुद्याच्या दृष्टिनें फार महत्वाचे आहेत.

" मला हिंदुस्तानचा इतिहास चांगलासा माहित नाहीं. मी जातीचा महाराष्ट्र ब्राह्मण पडलों म्हणून मला पुष्कळ इंग्रज लोक आमच्या संस्थानाच्या इतिहासाच्या संबंधानें प्रश्न करितात तेव्हां त्यांचे उत्तराची मी हेळसांडच करितों. या विषयावर नवीन ग्रंथ होतात ते वाचण्याचे खटपटीत हि मी पडत नाहीं. लहानपणीं शाळेत असतां मी ' मरेज ब्रिटिश इंडिया ' हा ग्रंथ वाचला तेव-ढाच काय तो. हिंदुस्थानच्या इतिहासाचे अध्ययन करावें असें मला वाटत नाहीं. कां की, कोणी स्वदेशाचा किंवा कांहीं मुमताचा अभिमान धरून सत्याची निष्ठा बागळन जन्मादारभ्य मेहनत केल्याचीं उदाहरणें त्यांत मुळींच सांपडत

नाहींत. जिकडे पहावें तिकडे स्वार्थ व आपलपोटेपणा प्रबल दिसतो. एका राजानें दुसऱ्यास मारावें, त्यास आणखी कोणी येऊन मारावे, व केवळ आपमतलबाकरितां त्यांचें राज्य हिरावून घ्यावें, अशा ज्यांच्या कृती, ज्यांच्यापासून लोककल्याण झालेंच नाहीं, अशांचा इतिहास परिश्रम करून शिकणें म्हणजे काळ व्यर्थ घालविणें होय. मराठ्यांच्या इतिहासाविषयीं म्हणाल तर हेंच माझें मत आहे. जिकडे पहावे तिकडे लूट व आपमतलब यांवांचून त्यांचें कृतीत कांहीं दिसत नाहीं. शिवाजी झाला तरी काय? तो दगेखोर कपटी होता. अफजुलखानास कसें त्यानें विश्वासघात करून मारिलें."

रावबहादुरी वळणाचीं वरील मतें ज्या काळीं महाराष्ट्रांत वावरत होतीं, त्याच काळांत महाराष्ट्रांत असा एक पंथ निर्माण झाला कीं, त्या पंथांतील लोकांस आपले पूर्वज फार मोठे होते व त्यांनीं स्वराज्यस्थापनेसारखें महत्कृत्य कांहीं तरी उच्च हेतूनें प्रवृत्त होऊन केलें असलें पाहिजे व ह्या प्रश्नाचा सांगोपांग उलगडा होण्याकरितां मराठ्यांच्या इतिहासाची साधनसामुग्री हुडकून काढून ती प्रसिद्ध करणें हें पहिलें अत्यंत महत्वाचें काम आहे, असें वाटूं लागलें. ह्या पंथांचे अध्वर्यु कै. विष्णुशास्त्री चिपळोणकर हे होत. त्यांनीं लिहिलेला इतिहासावरील निबंध वाचून अंतःकरण स्फुरण पावणार नाहीं असा महाराष्ट्रिय विरळा. वरील प्रकारची ह्या प्रश्नासंबंधीं नवीन विचाराची दिशा शास्त्रीबोवांनीं महाराष्ट्रांतील लोकांस दर्शविली इतकें च नाहीं, तर त्यांच्या प्रोत्साहनानें निर्माण झालेल्या काव्येतिहाससंग्रह मासिक पुस्तकाचेद्वारें मराठ्यांच्या इतिहासाची साधनसामुग्री हळुं हळूं प्रसिद्ध होण्यास हि सुरवात झाली. ह्या नंतर मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपासंबंधाच्या रावबहादुरी वळणाच्या मतांत स्थित्यंतर होण्यास झपाट्यानें सुरवात झाली. इ. स. १८९८ सालांत हाताच्या बोटांवर मोजण्या इतक्या अल्प अशा विचारी, बुद्धिवंत, निस्पृही व महाराष्ट्रीय संस्कृतीचे अभिमानी अशा पुढाऱ्यापैकीं प्रसिद्ध इतिहाससंशोधक रा. राजवाडे यांनीं मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांचा प्रथम खंड प्रसिद्ध केला. ह्या खंडाचे प्रस्तावनेंत मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाची थोडक्यांत परंतु अर्थपूर्ण व मार्मिक रीतीनें महाराष्ट्रियास रा. राजवाडे यांनीं ओळख करून दिली आहे. या नंतर सन १९०० सालांत मराठ्यांच्या इतिहास साधनाच्या चवथ्या खंडाच्या प्रस्तावनेंत फिरून याच प्रश्नाची चर्चा रा. राजवाडे यांनी केली आहे. सन १९०० सालाचे सुमारास कै. न्यायमूर्ति

रानडे यांनीं मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष ह्या नांवाचा इंग्रजी ग्रंथ मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाच्या विवेचनार्थ लिहून प्रसिद्ध केला. मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपासंबंधीं विवेचन मराठी रियासतकार रा. सरदेसाई यांनी हि आपल्या ग्रंथांत बरेच विस्तृत रीतीनें केले असून कै. न्यायमूर्ती रानडे व रा. राजवाडे याच्या मतांचें हि त्यांनीं परीक्षण केलें आहे. अगदीं अलीकडे कै. प्रोफेसर हरीभाऊ लिमये यांनीं सन १९१८ सालच्या डिसेंबर महिन्याच्या मद्रासच्या इंडियन रिव्हयु मासिकाचे अंकांत किंकेड साहेबांच्या मराठ्यांच्या इतिहासावरील प्रसिद्ध केलेल्या टीकेंत या प्रश्नासंबंधीं आपलें मत प्रदर्शित केलें आहे. कै. लिमये यांच्या विवेचना खेरीज वरील इतर विवेचनें प्रसिद्ध झाल्या नंतर आज पावेतों मराठ्यांच्या इतिहाससाधनसामुग्रींत फार च मोठी भर पडली आहे. ह्या सर्व साधनांचे आधारें मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाचें जरा विस्तृत विवेचन करणें अवश्य झालें आहे व याच हेतूनें प्रवृत्त होऊन आम्ही हा लेख लिहिण्यास उद्युक्त झालों आहोत. सोळाव्या शतकापासून अठराव्या शतका पावेतों मराठ्यांनीं स्वराज्यस्थापना व स्वसत्ताप्रसार यांचे प्रीत्यर्थ जे प्रचंड प्रयत्न केले ते निवळ लुटीच्या लालसेनें केले नसून कांहीं उच्च प्रकारच्या ध्येयाचे सिद्ध्यर्थ केले होते असें ह्या पंथांतील वर नमूद केलेल्या विद्वानांनीं केलेल्या चर्चेवरून निष्पन्न झालें आहे. ह्या ध्येयाचें स्वरूपवर्णन व त्यासंबंधीं वर दर्शविलेल्या महाराष्ट्रीय विद्वानांनीं केलेली चर्चा यांचें स्थूल दिग्दर्शन पुढील भागांत करण्याचें ठरवून हें प्रकरण आम्ही येथें पुरें करितों.

---

## प्रकरण २ रें

### मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाविषयीं विवेचन करणाऱ्या महाराष्ट्रीय पंथापैकीं आधुनिक काळीं निर्माण झालेल्या प्रागतिक शाखेंतील विद्वानांच्या मतांचें दिग्दर्शन व त्यांनीं केलेल्या विवेचनांचा निष्कर्ष.

मराठ्यांच्या स्वराज्य स्थापनेच्या व प्रसाराच्या हेतूंचे बाबतींत विदेशीय युरोपियन इतिहासग्रंथलेखकांनीं जीं मतें प्रतिपादि ल्याचें मागील भागांत नमूद केलें आहे, त्याचा मतांचा अनुवाद करणारा इतिहासले खकांचा एक पक्ष खुद्द

महाराष्ट्रियांमध्यें प्रथम कसा निर्माण झाला व कालांतरानें तो पक्ष नाहींसा होऊन त्या ठिकाणीं स्वराज्यस्थापना व त्याचा प्रसार मराठ्यांनीं कांहीं उच्च हेतूनें प्रवृत्त होऊन केला होता असें प्रतिपादन करणारा महाराष्ट्रीय इतिहास लेखकांचा आधुनिक काळीं एक प्रागतिक पक्ष कसा अस्तित्वांत आला याचें दिग्दर्शन मागील लेखांत आम्ही यथामति केलें आहे. प्रस्तुतच्या लेखांत या पक्षांतील कांहीं अग्रेसरव्यक्तींच्या या संबंधाच्या मतांचा व विचारसरणीचा वाचकवर्गास परिचय करून देण्याचें आम्हीं ठरविलें आहे. या आधुनिक कालीं निर्माण झालेल्या पक्षांतील प्रमुख व्यक्ति म्हणजे कै. न्यायमूर्ति रानडे, रा. राजाराम शास्त्री भागवत, राजश्री विश्वनाथ काशिनाथ राजवाडे, रा. सरदेसाई, कै. प्रोफेसर हरीभाऊ लिमये, रावबाहादुर प्रभाकरपंत भांडारकर या होत. आतां या व्यक्तींच्या मतांचे क्रमशः दिग्दर्शन आम्ही करितों—

कै० न्यायमूर्ति रानडे मुंबईस असतांना त्यांनीं जी धर्मपर व्याख्यानमाला सुरू केली, त्या मालेंत " रामदास " यांचेवर त्यांनीं एक व्याख्यान दिलें. त्या व्याख्यानांत रामदासांच्या व शिवाजीमहाराजांच्या चरित्राविषयीं चर्चा करून न्यायमूर्तींनीं व्याख्यानाचे शेवटीं समर्थांच्या चरित्राचें रहस्य खालील उद्गारांत दर्शविलें आहे:—

जसें गीतारहस्य एका श्लोकांत सांगितले आहे, तसाच समर्थांचा उपदेश अर्ध्या ओवींत आहे, ती अर्धी ओवी ही " मराठा तितुका मिळवावा महाराष्ट्र धर्म वाढवावा. " मराठा हा शब्द व्यापक आहे. शिवाजीमहाराजांच्या पदरीं ब्राह्मण, शेणवई प्रभु आदिकरून सर्व प्रकारचे मराठे होते. महाराष्ट्र धर्म हा हिंदू धर्माहून भिन्न आहे त्याच्या तोडीचा जेमतेम इंग्रजी शब्द Patriotism हा होईल. या प्रमाणें न्या० रानड्यांनीं रामदासांच्या उपदेशाचें रहस्य महाराष्ट्रधर्म असल्याचें सांगून महाराष्ट्रधर्माचा अर्थ हि दिला आहे. परंतु या व्याख्येंत महाराष्ट्रधर्म कशापासून भिन्न आहे, हें दर्शविण्याकरितां वापरलेल्या हिंदूधर्म या संज्ञेची त्याचप्रमाणें Patriotism या शब्दाची व्याख्या बरीच अनिश्चित असल्या कारणानें न्यायमूर्तींच्या वरील उद्गारावरून विशेष प्रकारचा बोध असा कांहीं होत नाहीं. यानंतर सन १९०० सालांत Rise of the Maratha Power " मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष. " या नावांचा न्यायमूर्तींचा मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाची चर्चा करणारा ग्रंथ प्रसिद्ध झाला. या प्रसिद्ध ग्रंथांत १७

१ धर्मपर व्याख्याने पान २२६ पहा..

व्या व १८ व्या शतकांत महाराष्ट्र देशाच्या परिस्थितीचें दृष्टीनें तो प्रांत स्वराज्यस्थापनेस व स्वराज्याच्या जोपासनेस कसा योग्य होत चालला होता, याचें दिग्दर्शन सुरवातीस करण्यांत आले आहे. त्याचा संबंध प्रस्तुत विवेचनाशीं म्हणण्यासारखा नसल्या कारणानें त्या संबंधाची चर्चा तूर्त या ठिकाणीं करण्याचें कारण नाहीं. या ग्रंथाच्या तिसऱ्या भागांत, मराठ्यांच्या सत्तेचें बीज कसें पेरलें गेलें या बद्दल न्यायमूर्तींनीं जें विवेचन केलें आहे व त्यामध्यें जीं मते व्यक्त केलीं आहेत त्यांचा त्रोटक सारांश खालीं लिहिल्याप्रमाणें आहे:—

मुसलमानी अंमल महाराष्ट्रांत सुरू होतां च सुमारें २।३ शें वर्षें महाराष्ट्रियांमध्ये धर्मजागृति सुरू होऊन तिचे कार्य दोन तिनशें वर्षें चालू होतें. मुसलमानी धर्माच्या एकेश्वरी मताचा परिणाम तत्कालीन महाराष्ट्रांतील साधुसंतांचे मनांवर फार झाला व एकंदर मुसलमानांच्या संसर्गाचे योगानें हिंदु मनास जरा निराळें वळण लागलें. राम आणि रहीम हे दोघे एक च आहेत. जातीभेद व आचारविषयक धार्मिक वर्तनाचा भाग एका बाजूस ठेवून एक परमेश्वरावर भाव ठेवावा व सर्वांभूतीं परमेश्वर आहे, अशी भावना करून अखिल प्राणीमात्रांशीं प्रेमानें वागावें असा महाराष्ट्रांतील सर्व साधुसंत महाराष्ट्रीय जनतेस उपदेश करूं लागले. त्याकाळीं धर्मप्रेमाचें पुनरुज्जीवन आणि धर्माच्या शुद्ध स्वरूपाबद्दल अभिमान यांचें वारें महाराष्ट्रांत सर्वत्र संचार करूं लागलें होते. अशा परिस्थितींत समर्थांनीं सर्व मराठ्याचें एकीकरण करून एका मोठ्या अथवा एकजीव झालेल्या राष्ट्राच्या धर्माचा प्रसार सर्वत्र करण्याबद्दल शिवाजी महाराजांस उपदेश केला. शिवाजी महाराजांच्या धोरणाचा मुख्य हेतु व सर्वस्व समर्थांचा हा उपदेश मूर्तिमंत सिद्ध करणें यांत होता. या ठिकाणीं न्यायमूर्तींचीं इंग्रजी वाक्यें जशींच्या तशींच देणें जरूर आहे.

Shiwaji's teacher Ramadas tersely put this concep tion of Shiwaji's aims and policy in his verses of advice, communicated to his unfortunate son Sumbhaji to unite all who were Marathas & propagate the duty or Dharma of a Great Rashtra or united nation. This was the whole end and aim of Shivaji's Policy. (Rise of the Maratha Power Page 53 )

संभाजीस समर्थांनीं लिहिलेल्या पत्रांतील

**मराठा तितका मेळवावा । महाराष्ट्र धर्म वाढवावा ।**
**ये विषयीं न करितां तकवा । पूर्वज हांसती ।**

या प्रसिद्ध ओव्यांचें भाषांतर वरील वाक्यांत न्यायमूर्तींनीं दिलें आहे. एका मोठ्या अगर एकजीव झालेल्या राष्ट्राचा जो धर्म तो महाराष्ट्रधर्म व त्याचा सर्वत्र प्रसार करण्याबद्दल समर्थांचें शिवाजीस सांगणें होतें व हें घडवून आणण्या करितां शिवाजीनें स्वराज्य स्थापनेचा सर्व खटाटोप केला, असा न्यायमूर्तींचे म्हणण्याचा आशय आहे. धर्मपर व्याख्यानांत या कल्पनेचा जवळ जवळ द्योतक असा इंग्रजी शब्द Patriotism असल्याबद्दल न्यायमूर्तींच्या म्हणण्याचा आम्ही वर उल्लेख केलेला च आहे. स्थूलदृष्ट्या न्यायमूर्तींची वरील कल्पना मनोवेधक आहे. परंतु या कल्पनेच्या योगानें मनाचें समाधान पूर्णपणें व्हावें तसें होत नाहीं व महाराष्ट्रधर्माची मूर्तिमंत कल्पना व व्याप्ति आपल्या मनःचक्षूंपुढें उभी रहात नाहीं. तथापि मराठ्यांच्या आत्मिक इतिहासाच्या चर्चात्मक वाङ्मयाचे दृष्टीनें विदेशीय युरोपियन ग्रंथकारांच्या भ्रामक कल्पनां पेक्षां वरील कल्पनेचे योगानें या प्रश्नाच्या चर्चेचे बाबतींत निःसंशय मोठी प्रगति झाली, ही गोष्ट निर्विवाद आहे. न्यायमूर्तींचा मराठी सत्तेचा उत्कर्ष हा ग्रंथ वाचल्यानंतर सर्वत्रांचे मनांत जो एक विचार सहज येतो. तो येथें नमूद करणें जरूर आहे. कारण त्या विचाराच्या दृष्टीनें महाराष्ट्र धर्मांचे स्वरूपाबद्दल न्यायमूर्तींची कल्पना काय होती याची थोडी बहुत कल्पना होते. १५ व्या शतकांत 'रेफर्मेशन' या नांवानें संबोधिल्या जाणाऱ्या विचारक्रांतीची लाट जशी यूरोपखंडांत उत्पन्न होऊन तिचा त्या खंडांतील सर्व राष्ट्रांत प्रसार झाला व एका नवीन युगास प्रारंभ झाला तशा च तऱ्हेचा कांहीं अंशीं प्रकार १५ व्या शतकापासून १७ व्या शतका पर्यंत हिंदुस्थानांत घडत होता. महाराष्ट्रांत स्वराज्य स्थापनेस जीं अनेक कारणें झालीं त्यां पैकीं प्रमुख कारण वरील विचारक्रांति हें होय असा न्यायमूर्तींचा सिद्धांत आहे. युरोपखंडांतील ख्रिस्तीधर्मानुयायी व्यक्तींच्या विचारस्वातंत्र्यावर कॅथालिक पंथाच्या धर्मगुरुंनीं घातलेल्या कृत्रिम धर्मबंधनांचा नाश करण्याचा युरोपांतील रेफर्मेशनच्या चळवळीच्या उत्पादकांचा हेतु होता. शिवपूर्वकालीन महाराष्ट्रांत श्रुतिस्मृतिप्रणीत आचारविषयक धर्माच्या विधिनिषेधरूपी शृंखला झुगारून देण्याचा साधुसंतांनीं वरील रेफर्मेशनच्या चळवळीच्या उत्पादकांच्या प्रयत्नासारखा प्रयत्न केला असें न्यायमूर्तींचें मत आहे.

युरोपखंडांतील देशांच्या इतिहासग्रंथांचें न्यायमूर्तींचें परिशीलन फार दांडगें व गाढ असून त्यांच्या मनाचा स्वाभाविक कल आचारविषयक धर्माच्या विधिनिषेधरूपी आज्ञांच्या प्रतिकूल असल्या कारणानें शिवकालीन महाराष्ट्रांत घडलेल्या क्रांतीच्या उपपत्तीचा विचार करीत असतां युरोपांतील रेफमेशन या नांवानें प्रसिद्ध असलेल्या विचारक्रांतींत व महाराष्ट्रांतील विचारक्रांतींत बरेंच साम्य भासावें हें अगदीं स्वाभाविक आहे. वरील दोन देशांच्या विचार क्रांतींत न्यायमूर्तींना भासमान झालेल्या साम्यावरच " मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष " या न्यायमूर्तींच्या ग्रंथाची उभारणी करण्यांत आली आहे. न्यायमूर्तींच्या या ग्रंथांतील विवेचनासंबंधीं एक महत्वाचा मुद्दा लक्षांत बाळगणें जरूर आहे. तो हा कीं, महाराष्ट्रीय साधुसंतांनीं दोन तीनशें वर्षे महाराष्ट्रांतील जनतेस सतत उपदेशिलेल्या धर्माचे योगानें ( ज्या धर्मास न्यायमूर्ति भागवतधर्म अथवा महाराष्ट्रधर्म समजतात ) स्वराज्यस्थापनेच्या महत्कार्यास लागणारे स्वार्थत्यागादि लोकोत्तर गुण महाराष्ट्रीय जनतेंत निर्माण झाले. अशा प्रकारच्या गुणांनीं युक्त अशा जनतेचा व विपुल द्रव्य, राजकारणी चतुर दक्ष सल्लागार, एकनिष्ठ धाडसी व शूर मदतगार, घोडदळ, हत्यारें व युद्धोपयोगी सामुग्री आणि एकनिष्ठ सेना इत्यादि शिवाजी महाराजांनीं जमविलेल्या स्वराज्यस्थापनोपयोगी साधनांचा मिलाफ होऊन महाराष्ट्रांत स्वराज्यनिर्मिति झाली असा सिद्धांत न्यायमूर्तींनीं स्थापित केला आहे. त्यांचा दुसरा सिद्धांत असा आहे कीं, वरील साधनांच्या मिलाफानें महाराष्ट्रांत स्वराज्यस्थापना झाल्यानंतर त्या साधनांपैकीं महाराष्ट्रधर्म हें जें एक साधन त्या साधनाचा म्हणजे महाराष्ट्रधर्माचा प्रसार करण्याविषयीं शिवाजी महाराजांचे पश्चात् संभाजीस रामदासांनीं उपदेश केला. स्वराज्यस्थापनेस भागवतधर्म अथवा महाराष्ट्रधर्म कारणीभूत झाला व स्वराज्यस्थापना झाल्यानंतर स्वराज्याच्या प्रसाराचा हेतु भागवतधर्म अथवा महाराष्ट्रधर्म हा च होता, अशा प्रकारची न्यायमूर्तींची विचारसरणी आहे. न्यायमूर्तींप्रमाणेंच ज्या विद्वानांनीं आपलीं मतें या विषयासंबंधीं प्रदर्शित केलीं आहेत व ज्यांच्या मतांचें दिग्दर्शन आम्हीं पुढें करणार आहों, त्यांनीं या दोन्ही मुद्यांसंबंधीं चर्चा करून आपआपले सिद्धांत नमूद केले आहेत. यापुढें न्यायमूर्तींखेरीज दुसऱ्या विद्वानांच्या मतांचें दिग्दर्शन करण्यांत येईल ते वेळीं वर दर्शविलेल्या दोन्ही मुद्यांसबंधीं त्यांचे सिद्धांत काय आहेत याचें हि दिग्दर्शन आम्हीं करणार आहोंत.

कै. न्या. मू. रानड्यांच्या मतांचें दिग्दर्शन केल्यानंतर महाराष्ट्रांतील दुसरे विद्वान् गृहस्थ कै. राजाराम शास्त्री भागवत यांचे, महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ व व्याप्ति या संबंधी विचार कोणत्या स्वरूपाचे आहेत याचें दिग्दर्शन या ठिकाणीं करणें जरूर आहे. शास्त्रीबोवांनीं महाराष्ट्रधर्माविषयीं केलेलें प्रवचन बरेंच विस्तृत असून तें स्वतंत्र ग्रंथरूपानें प्रसिद्ध करण्यांत आलेलें आहे. शास्त्रीबोवांच्या या विषयासंबंधीं मतांचें परिपूर्ण व यथायोग्य दिग्दर्शन करण्यास्तव त्यांच्या लेखांतील बरेच विस्तृत उतारे या प्रबंधांत देणें अपरिहार्य झालें आहे. ब्राह्मण सभेच्या आश्रयाखालीं भरलेल्या एका सभेंत शके १८१७ चे कार्तिक शु. १३ स शास्त्रीबोवांनीं महाराष्ट्रधर्म या विषयावर लिहिलेला आपला प्रबंध वाचला.

महाराष्ट्र धर्माचे स्वरूपाबद्दल ज्यांत विवेचन केलें आहे असा हा एक स्वतंत्र प्रबंधच आहे. शास्त्रीबोवांचें विवेचन विद्वत्ताप्रचुर आहे. महाराष्ट्रधर्मा बद्दल आजपावेतों प्रसिद्ध झालेल्या विवेचनात्मक लेखामध्यें हा लेख अत्यंत महत्त्वाचा असून श्रेष्ठ दर्जाचा आहे. असें जरी आहे तथापि शास्त्रीबोवांच्या विवेचनास ऐतिहासिक पुराव्याचा पाया अत्यंत अल्प आहे अशी तो प्रबंध वाचणाऱ्या कोणत्याहि वाचकांची खात्री झाल्याखेरीज राहणार नाहीं. शास्त्री बोवांचा मानसिक कल समाजसुधारणेकडे होता ही बाब सर्वांस अवगतच आहे. समाज सुधारक या नात्यानें त्यांची जीं मतें बनलीं होतीं त्या मतांस अनुसरून बऱ्याच अंशानें महाराष्ट्र धर्माचें विवेचन शास्त्रीबोवांनीं केलें आहे असें जो पुरावा ह्या ग्रंथांत पुढें दाखल करण्यांत येणार आहे त्यावरून दिसून येईल. शास्त्रीबोवांनीं स्वीकारलेल्या विवेचन पद्धतीची व त्यांनीं काढिलेल्या सिद्धांताची थोडक्यांत ओळख वाचकांस करून देणें जरूर आहे. सबब त्या कार्याकडे आम्ही आतां वळतों. शास्त्रीबोवांनीं आपल्या प्रबंधाचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग केले आहेत. पूर्वार्धांत प्रथमतःच ज्या धर्माचें निरूपण भगवद्गीतेंत झालें आहे तो धर्म “ भागवतीधर्म ” या नांवानें नांवाजला आहे व हा भागवती धर्म महाराष्ट्र धर्माचा पाया समजावा असें शास्त्रीबोवांनीं आपलें मत नमूद केलें आहे. यानंतर वरील धर्माचे दोन संप्रदाय एक “ कर्मकांड ” किंवा कर्मठांचा संप्रदाय ” व दुसरा ज्ञानकांड किंवा “ ब्रह्मज्ञान्यांचा संप्रदाय ” असल्याचें शास्त्रीबोवांनीं सांगून पुढे वैदिक, औपनिषद आणि भगवद्गीता या धर्मांच्या मुख्य तत्त्वांचे विशदीकरण त्यांनीं केलें आहे. ... अग्निहो-

मान्स आणि यज्ञभागाच्या लांबलचक खटपटी करून मरणानंतर प्यावयास अमृत, खावयास कल्पवृक्षांची फळें, हुंगण्यास पारिजातांचीं फुलें, बागबगीच्या-मध्यें नानाप्रकारच्या क्रीडा करण्यास अप्सरा हें वैदिक धर्मीय कर्मठांच्या संप्रदायाचें ध्येय आहे. "आरण्यवास पत्करून ध्यानादि साधनांचे साह्यानें निर्विकार परमात्मस्वरूप ज्ञात करून घेऊन जन्ममरणाचे क्लेश चुकवावयाचे" हें वैदिक धर्मीय ब्रह्मज्ञान्यांच्या संप्रदायांचें ध्येय आहे. ध्येयाच्या दृष्टीनें हीं दोन्हीं ध्येयें स्वार्थी आहेत. ह्या दोन्ही ध्येयांच्या अगदीं उलट भागवती धर्माचें ध्येय आहे. ब्रह्मज्ञानाचा बेमालूम मिलाफ ज्यांत अखेरीस होतो त्या परमात्म्यास कोणत्या हि प्रकारचा विकार नसून तो निरंतर शांतीनें भरलेला आहे, अर्थात् त्यास इतरांची कळकळ असण्याचा संभव नाहीं.

कळकळ हा एक प्रकारचा विकार आहे. हा विकार एकदा जोरावूं लागला म्हणजे हळूहळू शांतीचा फडशा उडतो आणि चळवळीस सुरवात होते "भागवती धर्मांतील ईश्वरास भक्ताची कळकळ असते. जे अनन्यभावानें त्यास शरण जातात त्या सर्वांचें योगक्षेम तो चालवतो इतकेंच नाहीं तर प्रसंगीं आळवल्यास तो धांवतो आणि पावतो...... .. भागवती धर्मांतील ईश्वराची सगळी प्रवृत्ति केवळ परार्थ आणि ती हि विशेषें-करून भक्तासाठीं असते. भागवती धर्मांतील ईश्वराच्या आंगीं भक्तांचा पक्ष-पात आणि भक्तांचा छळ करणारांचा द्वेष हे दोन विकार खिळलेले असल्या-मुळें भागवती धर्मांतील ईश्वर निरंतर शांतीचें माहेर राहूं शकत नाहीं. जर भक्तांचा छळ चाललेला नाहीं, जर भक्तांवर संकट कोसळलेलें नाहीं तर भाग-वती धर्मांतील ईश्वर शांतीचें माहेरघर आहे पण भक्ताचा छळ होऊं लागला किंवा भक्तावर संकट वोढवलें कीं, भागवती धर्मांतील ईश्वराची शांति आटली.

ह्या प्रमाणें शास्त्रीबोवांनीं कर्मठांचा वैदिकधर्म ब्रह्मज्ञान्यांचा वैदिकधर्म व भागवतधर्म यांचें थोडक्यांत स्वरूपवर्णन केलें आहे.

या नंतर शास्त्रीबोवांनीं बौद्ध आणि जैन धर्मांच्या प्रसाराची कारण-मीमांसा देऊन त्या धर्मांचा ऱ्हास कुमारिलानें कोणत्या युक्तीनें घडवून आणिला याचें विवेचन शास्त्रीबोवांनीं पुढील प्रमाणें केलं आहे. "वैदिक धर्माचे नियम जरी सख्त होते, तरी विधर्मी वैदिक धर्मी होऊं शकत असे, इतकेंच नाहीं तर वैदिक धर्मीयांमध्यें हि अगदीं खालच्या वर्गांतल्या पुरुषास प्रसंगीं हळुहळू वर चढण्यास सवड सांपडून आणि अगदीं वरच्याहि

वर्गांतल्या पुरुषास प्रसंगी हळुहळू खालीं उतरण्याची तजवीज केलेली असे. आणि प्रसंगीं जशी आपआपसांमध्यें तशी प्रसंगीं विधर्मीयांशींहि बेटीव्यवहारास आडकाठी नव्हती ह्या प्रमाणें विधर्मीयांचा वैदिक धर्मीयांमध्यें आगम होत असून वैदिक धर्मीयांमध्यें हि गमागम चाललेला असे." ह्या प्रमाणें वैदिक धर्माची व्यवस्था असल्याचें वर्णन करून शास्त्रीबोवा म्हणतात.

"या मूळच्या जिवंत पात्राकडे लक्ष पोंचवून कुमारिलानें बौद्धांस आणि जैनांस कर्मठांच्या मंडळींत सहज ढकलून दिलेलें दिसतें."

ह्या प्रमाणें विवेचन केल्यानंतर जसा कुमारिलानें वैदिक कर्मठांच्या धर्माचा जीर्णोद्धार केला तसा शंकराचार्यांनीं औपनिषद धर्माचा केला. म्हातारपणीं वानप्रस्थ बनून पुढें कांहीं वर्षांनीं परिव्राजक किंवा "संन्यासी" अशी व्यवस्था वैदिकधर्मीयांमध्यें शंकराचार्यांचे काळीं कायम होऊन राहिलेली होती. याच जन्मीं यौवनावस्थेंत क्रियाकलापाच्या अनुष्ठानानें चित्तशुद्धि झाल्यानंतर म्हातारपणीं वानप्रस्थपणा आणि अखेरीस संन्यास अशी जी व्यवस्था वैदिक धर्मीयांनीं लावून ठेविली होती ती स्वतःच यौवनावस्थेंत संन्यास घेऊन शंकराचार्यांनीं झुगारून दिली. "ज्या दिवशीं वैराग्य उत्पन्न होईल त्या च दिवशीं संन्यास घ्यावा" असें उपनिषदांमध्यें एक वचन आहे. त्या वचनाच्या जोरावर कर्मठांनीं कल्पिलेल्या क्रमावर शंकराचार्यांनीं पाणी ओतलें.

वैदिकधर्मी म्हणत कीं, वेदांतल्या क्रियाकलापाचें अनुष्ठान या च जन्मीं अर्थात यौवनावस्थेंत होईल तेव्हां म्हातारपणीं ब्रह्मज्ञानाचा अधिकार येईल, आणि शंकराचार्यांनीं तर असें ठरविलें की, जर ब्रह्मज्ञानाकडे ओढा आहे तर चित्तशुद्धि झालेली च असली पाहिजे. मग चित्तशुद्धीचें कारण जो वेदांतला क्रियाकलाप त्याचें अनुष्ठान जर ब्रह्मज्ञानाच्या अधिकाऱ्यानें या जन्मीं केलेलें आढळलें नाहीं तर ते पूर्वजन्मीं केलेलें समजावें. या प्रमाणें पूर्वजन्माचा चंचूप्रवेश एकदां झाला म्हणजे या जन्मीं वेदांतल्या क्रियाकलापाचें अनुष्ठान करण्याची जरुरी उरली नाहीं. आणि त्यामुळें कर्मकांडाकडे सहज च गौणत्व येऊन ब्रह्मज्ञानाकडे मुख्यत्व आलें. वेदाक्षर शूद्रानें ऐकूं नये किंवा बोलूं नये हें कर्मठांचें म्हणणें शंकराचार्यांनीं सर्वस्वी कबूल केलें. ब्रह्मज्ञानाची पायरी वेदाच्याहि वरती ठरवून तिचा लाभ शूद्रांस हि स्मृतीच्या द्वारें करून घेतां येईल अशी व्यवस्था लावून ठेवल्यामुळें ब्रह्मप्रतिपादन

करणाऱ्या स्मृतींचें माहात्म्य जितकें वाढलें तितकेंच कर्मठांच्या श्रुतीचें माहात्म्य मावळलें.

ह्याप्रमाणें ब्रह्मज्ञान्यांच्या संप्रदायाची महती वर्णन करून त्याचे योगानें कर्ममार्गावरील लोकांची श्रद्धा नाहींशी झाल्याचें शास्त्रीबोवांनीं सांगितलें च आहे. यापुढें बौद्ध आणि जैन यांच्या अंतीम ध्येयांतील आणि ब्रह्मज्ञान्यांच्या अंतीम ध्येयांतील तफावत खालील प्रमाणें शास्त्रीबोवांनीं दर्शवून बौद्ध आणि जैन धर्माचा लोप कसा होत गेला याचें दिग्दर्शन खालीं लिहिल्याप्रमाणें केलें आहे.

" मरणोत्तर शून्यांत लय होणें हा जसा बौद्धांचा तसाच जैनांचा मोठा पुरुषार्थ आहे. वेदांत्याचा मरणोत्तर लय व्हावयाचा तो ब्रम्हरूपी एका उत्तमोत्तम वस्तूंमध्यें. लय होण्याची आशा असली म्हणजे ज्या प्रकारचे लोकोत्तम स्फुरण आंगी येण्याचा संभव आहे त्या प्रकारचे लोकोत्तर स्फुरण शून्यांत लय होण्याच्या आशेनें येण्याचा संभव नाहीं...... सारांश जो भरींवपणा जसा भागवती धर्मांत तसा औपनिषदी धर्मांत सांपडतो, तो भरींवपणा कोणास हि बौद्धांच्या किंवा जैनांच्या धर्मांत सांपडण्याचा संभव नाहीं आणि जर भरींवपणा नाहीं तर धर्म उघड मृगजळाच्या योग्यतेचा झाला. हा भरींवपणा परार्थपणाचें वारे आंगीं भरलेल्या संन्याशांनीं दृष्टीपुढ ठेवतांच मरणोत्तर शून्यांत स्वतःस बुडवून घेऊं इच्छिणाऱ्या बौद्धांच्या आणि जैनांच्या तोंडास पाणी सुटून त्यांची प्रवृत्ति औपनिषद धर्माकडे अनायासें झालेली असण्याचा संभव आहे. जी अवतारी कळा कुमारिलामध्यें होती तिच्या पेक्षां अधिक अवतारी कळा शंकराचार्यांमध्यें होती."

या नंतर भागवत धर्माचा जीर्णोद्धार कोणी व कशा रीतीनें केला याचें विवेचन खालीं लिहिल्या प्रमाणें रा. रा. भागवत यांनीं केलें आहे.

" पण जी श्रुतींच्या गौणपणाची वाट शंकराचार्यांनीं सुचविली होती त्याच वाटेनें पाऊल पडलेल्या वैष्णवांनीं " गीता सुगीता कर्तव्या किमन्यैः शास्त्रसंग्रहैः । या स्वयं पद्मनाभस्य मुखपद्माद् विनिःसृता " असा मोठा सिद्धांत केला होता त्या मुळें साक्षात् विष्णूच्या मुखकमलांतून निघालेली गीता मात्र वैष्णवांमध्यें कंठीं आणि संग्रहीं ठेवण्यास लायक ठरून वेदाची मातब्बरी मनस्वी उतरली होती. या प्रमाणें भगवद्गीता मात्र काय तो मातब्बरीचा ग्रंथ मानणाऱ्या आणि तिच्या अनुरोधानें श्रुतींचा हि अर्थ लावणाऱ्या

वैष्णवांमध्यें रामानुज अवतरला. जीवात्म्याचें परमात्म्याशीं नातें सेव्याचे असून हे दोहोंमधील सेवकाचें आणि सेव्याचें नातें निरंतर राहावयाचें हा एक वैष्णवांचा मुख्य सिद्धांत आहे. ह्या वैष्णवांच्या मुख्य सिद्धांताच्या अनुरोधानें उपनिषदांचा अर्थ रामानुजानें लाविला आणि भागवती धर्माचा जीर्णोद्धार केला.

ह्या प्रमाणें पूर्वार्धांत शास्त्रीबोवांनीं विवेचन केलें आहे. आतां शास्त्रीबोवांच्या उत्तरार्धांतील विवेचनाचें थोडक्यांत दिग्दर्शन करूं.

प्रथम मराठीमंडळ उर्फ समाज व इतर हिंदी मंडळें उर्फ समाज यांची शास्त्रीबोवांनीं तुलना करून महाराष्ट्रांतील ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य इत्यादि वर्णांतील व्यक्तींनीं व स्त्रियांनीं वर्णव्यवस्थेनुरूप ठरलेल्या कर्म व गुण यांहून व्यतिरिक्तत्व कित्येक प्रसंगीं कसें व्यक्त करून दाखविलें, याचें थोडक्यांत दिग्दर्शन केलें असून महाराष्ट्रीय समाजांत दिसून येणारा हा प्रकार इतर हिंदी समाजांत क्वचित् आढळण्यांत येतो असें म्हटलें आहे. शास्त्री बोवांचा हा सिद्धांत नीट रीतीनें समजावा एतदर्थ त्यांचीं च एकदोन वाक्यें येथें उतरून घेतों.

" इतर मंडळांतील ब्राह्मण प्रायः निव्वळ भिक्षाबहादुर आणि कर्मठ असून ब्राह्मणेतर तलवार बहादुर असत. मराठी मंडळींतील ब्राह्मणांमध्यें जसें भिक्षेला निर्वाह करून मंडळांतल्या आचांडाळ लोकांच्या आध्यात्मिक उन्नतीसाठीं आपला देह चंदनाप्रमाणें झिजविणारे नामांकित भगवद्भक्त होऊन गेले, तसेच नामांकित तलवार बाहादुर होऊन गेले. इतकें च नव्हे तर ब्राह्मणेतरांमध्यें ही जशी भगवद् भक्तींत आणि लोकांच्या आध्यात्मिक उन्नतीसाठीं चालविलेल्या प्रयत्नांत तशी मुत्सद्दीपणांत हि ब्राह्मणांच्या अगदीं बरोबरीची प्रसंगीं ब्राह्मणांस हि खालीं पाहूं लावणारी अशी नामांकित मंडळी होऊन गेली. " शास्त्रीबोवांच्या या वाक्यावरून त्यांच्या वरील सिद्धांताचा अर्थ वाचकांचें लक्षांत येईल च. याचें कारण शास्त्रीबोवांच्या मतां प्रमाणे महाराष्ट्रीय समाजांचा धर्म आणि सारस्वत यांचा भरींवपणा महाराष्ट्रियांच्या सारस्वतांतून त्यांच्या धर्मांत हुडकीत गेलें पाहिजे असें शास्त्रीबोवांनीं आपलें मत दिलें आहे.

या प्रमाणें विवेचन करून " मराठी धर्माचे इतिहासानिशीं स्वरूप. " ह्या मथळ्याखालीं बौद्ध धर्माच्या सुरवातीपासून शालिवाहन शकाच्या ११ व्या शतकापर्यंतच्या महाराष्ट्राच्या स्थितीचें थोडक्यांत सिंहावलोकन करून त्या शतकाअखेर दक्षिणेंत मराठी, कानडी, व तैलंगी मंडळांत तीन गाद्या स्थापन होण्याचा रंग दिसूं लागला असें शास्त्रीबोवांनीं म्हटलें

आहे. मुकुंदराजानें वैदिक धर्माच्या औपनिषद् भागाचा प्रचार करण्याकरितां जयंतपाळ राजाचे कारकीर्दीत विवेकसिंधु नांवाच्या ओवीबद्ध ग्रंथाची रचना केली. परंतु शास्त्रीबोवांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे "मराठी लोकांचा ब्रह्मज्ञानाकडे कल नाहीं, याचें मुख्य कारण हें दिसतें कीं, आंगीं चळवळीचें वारें विशेष भरलेलें असल्यामुळें त्यांस स्वस्थ बसणें एकंदरींत आवडत नाहीं; आणि त्यामुळें ब्रह्मज्ञानाच्या शुष्क गोष्टी सांगत बसणें हे त्यांस एक प्रकारच्या नामर्दपणाचें लक्षण भासतें. ह्या कारणास्तव मुकुंदराजाचा प्रयत्न मराठी मंडळांमध्यें फलद्रूप झाला नाहीं. जयंतपाळच्या पश्चात् देवगिरीच्या जाधवांचे कारकीर्दीत महाराष्ट्राची प्रगति चांगली होऊन मराठ्यांचें पाऊल पुढें पडलें. रामदेवरावाचे कारकीर्दीतील विशेष महत्वाची गोष्ट म्हटली ह्मणजे ज्ञानेश्वरानें ज्ञानेश्वरीची रचना करून भागवती धर्माचा जीर्णोद्धार केला ही होय. हा जो भागवती धर्माचा देशी जीर्णोद्धार झाला त्याच्या पलीकडे आतां पुन्हां त्या धर्माचा जीर्णोद्धार होणें शक्य दिसत नाहीं. ही त्या धर्माच्या जीर्णोद्धाराची पराकाष्ठा झाली आहे. ह्या नंतर शास्त्रीबोवांनीं ज्ञानेश्वरी ग्रंथाच्या ध्येयाचें जें वर्णन केलें आहे त्याचें थोडक्यांत दिग्दर्शन करितो—

मरणोत्तर मानवी जीवात्म्याचा परमात्म्या मध्यें लय होऊन मानवी प्राण्यास मुक्ति प्राप्त होते हा सिद्धांत कांहीं वावगा नाही. परंतु मरण्याच्या पूर्वीच मानवी प्राण्यास मुक्ति प्राप्त होते असा शंकराचार्यांचा एक सिद्धांत आहे. तो एकंदरींत मानवी मतीस थोडा विलग भासतो. शंकराचार्यांच्या वरील सिद्धांताप्रमाणें वैष्णवांचा एक सिद्धांत असा आहे कीं, मरणोत्तर जीवात्म्याचें परमात्म्याशीं सेवकपणाचें नातें निरंतरचें राहातें. हे दोन्ही सिद्धांत ज्ञानेश्वरांनीं सोडून देऊन मानवीप्राण्यांचे मरणापूर्वी सेव्य सेवकाचे नातें असून भक्तीचे द्वारें मरणोत्तर जीवात्म्याचे परमात्म्याशीं तादात्म्य होऊन मानवी प्राण्यास मुक्तीचा लाभ होतो असा सिद्धांत ज्ञानेश्वरांनीं घालून देऊन भक्तीची पायरी मुक्तीच्या हि वरची ठरविली आहे. ज्ञानेश्वरांनीं हें कार्य देशी भाषेंत ज्ञानेश्वरीची रचना करून केलें. "कुळ ब्राह्मणाचें, साहाशास्त्रें हातचा मळ झालेला, योगाचा अभ्यास केलेला, असा तीन प्रकारचा विशिष्टपणा अंगीं जडलेला असतां हि केवळ भक्तीनें नामांकित झालेल्या नामदेवाच्या पायीं स्वतःच पडून ज्ञानेश्वरांनी मराठी ब्राह्मणांस अत्युत्तम उदाहरण घालून दिलें आणि हेंच धोरण ठेवून जातीची मातब्बरी मुळींच

न मानणाऱ्या पंढरपूरच्या सांप्रदायाची स्थापना केली.

ह्या नंतर शास्त्रीबोवांनीं " कर्म, धर्म, स्वधर्म " इत्यादि भगवत् द्गीतेंत येणाऱ्या निरनिराळ्या शब्दांचें विवेचन करून खालील सिद्धांत ग्रथित केला आहे.

" या प्रमाणें ज्या अर्थी इंग्रजींत Duty शब्दाची योजना करण्यांत येते; त्या अर्थी मराठींत " स्वधर्म " शब्दाची योजना करता येण्याजोगें निरूपण ज्ञानेश्वराकडून करण्यांत आलें आहे. अशा प्रकारचें कर्म, धर्म आणि स्वधर्म या तिहींचें हि सुरेख निरूपण करून मराठी मंडळांतल्या लोकांस जशी दिशा निराळी दाखविली तशी वाट हि निराळी दाखवून ठेविली आहे. "

ज्ञानेश्वराच्या चरित्राचें रहस्य शास्त्रीबोवांनीं खालील प्रमाणें वर्णिले आहे.

ज्ञानेश्वरांचा जन्म केवळ परार्थ दिसतो. जंगलांत फळेमुळें भक्षण करून किंवा अंगास राख फासून केवळ स्वतःसाठीं मुक्ति मिळवावी, मठिकेंत ब्रम्हांडीं प्राण नेऊन स्वतःचा तितका अर्थ साधून घ्यावा, असला कोतेपणा ज्ञानेश्वरामध्यें नव्हता. जातीनें कोणी कितीहि निकृष्ट असला तरी त्या सर्वांच्या हातीं भक्तीरूपी चिंतामणी लागावा, हा ज्ञानेश्वरी अवताराचा मोठा हेतु होता. ह्या प्रमाणें ज्ञानेश्वरांच्या चरित्राचें रहस्य सांगून ज्ञानेश्वरींतील खालील ओव्या त्यांच्या ध्येयाचा विश्वव्यापीपणा दर्शविण्याकरितां शास्त्रीबोवांनीं दिल्या आहेत.

**आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।**<br>
**तोषोनि मज द्यावें । पसाय दान हें ॥**<br>
**जे खळाची वेंकटी सांडो । तया सत्कर्मीं रती वाढो**<br>
**भूतां परस्परें पडो । मैत्र जीवांचे ॥**<br>
**दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्म सूर्यें पाहो ।**<br>
**जो जे वांछील तो तें लाहो । प्राणि जात ॥**<br>
**वर्षत्व सकळ मंगळी । ईश्वर निष्ठांची मांदियाळीं**<br>
**अनवरत भूतळीं । भेटों तया भूता ॥**<br>
**चला कल्पतरूंचे अरव । चिंतामणीचे गांव ।**<br>
**बोलते जे अर्णव । पीयूषाचे ।**<br>
**चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जो तापहीन ।**<br>
**ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ।**<br>
**किंबहुना सर्व सुखीं । पूर्ण होऊनी तिहीं लोकीं**

अजि जो आदिपुरुषीं । अखंडित ॥"

या प्रमाणें ज्ञानेश्वरीचें रहस्य शास्त्रीबोवांनीं कथन केल्यावर मानवी समाजाच्या घटनेबद्दलचा एक आद्य सिद्धांत शास्त्रीबोवांनीं ग्रथित केला आहे. मानवी समाजास खटाऱ्याची उपमा देऊन शास्त्रीबोवा म्हणतात ह्या खटाऱ्यास दोन चाकें जरूर हवींत एक आध्यात्मिक व एक दरबारी. दरबारीखातें मंडळरूपी ( समाजरूपी ) पुरुषाच्या कायेच्या ऐवजीं असून, आध्यात्मिक खातें वाचेच्या आणि मनाच्या ऐवजीं आहे. रणवीरांची तलवार हा दरबारी खात्याचा पाया आहे. आणि धर्मवीरांची सरस्वति हा आध्यात्मिक खात्याचा पाया आहे. या प्रमाणें शूरांच्या हातांतली तलवार आणि संतांच्या तोंडांतली सरस्वति या अनुक्रमें उग्र आणि शांत स्वरूप धारण करणाऱ्या देवी एकदां प्रसन्न झाल्या म्हणजे मंडळास कसलीही वाण पडत नाहीं. देशी किंवा व्यापक आणि कर्मठ किंवा कोते अशी आध्यात्मिक खात्याचीं दोन मुख्य पोटखातीं असतात. देशी किंवा व्यापक खातें असतें त्याचें दफ्तर जिवंत देशी भाषेंत असून कर्मठ किंवा कोत्या खात्याचें दफ्तर मृतभाषेंत असतें. मंडळाचें अध्यात्मिक आणि कर्मठखातें हीं दोन्हीं जेव्हां समतोल असतात तेव्हां समाज सुस्थितींत असतो या दोन्ही खात्यांच्या समतोलपणांत बिघाड झाला कीं समाज अवनत होतो ! ह्या प्रमाणें सिद्धांत ग्रथित करून ज्ञानेश्वराचे काळीं हीं दोन्हीं खातीं अनुक्रमें ज्ञानेश्वर व हेमाडपंतासारखा मनानें थोर व हाडानें सुधारक ब्राह्मण यांचे हातांत असल्या कारणानें मराठा समाज सशक्त आणि सतेज होता.

ह्या नंतर दक्षिणेवर मुसलमानांची टोळधाड येऊन स्वराज्य कशा रीतीनें लयास गेलें त्याचें वर्णन करून शास्त्रीबोवांनीं खिस्ती, मुसलमानी व ज्ञानेश्वरींत प्रतिपादिलेला धर्म यांची तुलना करून ज्ञानेश्वरींत कथन केलेल्या मराठी धर्माचा विशाळपणा व श्रेष्ठपणा खिस्ती व महंमदी धर्मापेक्षां किती अधिक आहे याचें दिग्दर्शन केलें आहे. मुसलमानी अमलांत कालांतरानें मराठ्यांचें वर्चस्व कशा रीतीनें वाढत जाऊन अखेरीस विजापूर दरबारांत मराठी भाषेचा शिरकाव कसा झाला हें हि शास्त्रीबोवांनीं विशद करून दाखविलें आहे. नंतर एकनाथांनीं भागवत ग्रंथाची मराठी भाषेंत रचना करून मराठी भाषेच्या जीर्णोद्धाराचा पाया दुसऱ्यानें घातला व त्या पायास बळकटी आणण्याकरितां एकनाथांचा अवतार संपण्यापूर्वीच रामदास व तुकाराम या दोन महापुरुषांचा जन्म झाला. रामदास आणि तुकाराम यांच्या प्रमाणेंच

वामन व शेख महंमद हे हि ह्या कार्याचे त्या काळीं आधारस्तंभ झाले. आणि मराठा मंडळाचा फिरून उद्धार होण्याचा रंग दिसूं लागला. याच सुमारास शिवाजी जन्मास आला व त्याचे हातून दरबारी खात्याचा रोपा लावला गेला. शिवाजीचे ठिकाणीं आध्यात्मिक तेजहि वसत होतें. परंतु रामदासामध्यें प्रखर स्वरूपाचें आध्यात्मिक तेज वसत होतें. त्या स्वरूपाचें आध्यात्मिक तेज शिवाजीमध्यें नव्हतें. दरबारी खात्याचा शिवाजी व आध्यात्म खात्याचा रामदास त्या काळीं पुढारी झाले व महाराष्ट्र मंडळास उच्च स्थिति प्राप्त झाली.

या प्रमाणें विवेचन करून ' मराठा तितुका मेळवावा, महाराष्ट्र धर्म वाढवावा ' या प्रसिद्ध उक्तीचें विवरण शास्त्रीबोवांनीं केलें आहे. " मराठा ' या शब्दांत मुसलमान यांचा समावेश होतो कीं नाहीं अशी पृच्छा शास्त्रीबोवांनीं केली असून त्या बद्दल थोडी चर्चा करून शास्त्रीबोवा म्हणतातः—

" ज्या धर्मासाठीं शिवाजीचा अवतार झाला तो धर्म **कर्मठांचा कोता धर्म नव्हे तर ज्ञानेश्वरांनीं जीर्णोद्धार केलेला संतांचा विशाल धर्म होय.** " ह्या प्रमाणें शास्त्रीबोवांनीं आपले मत प्रकट केल्यानंतर शास्त्रीबोवा पुढें म्हणतात.

"**मराठी**" शब्दाचा अर्थ मराठी ज्याची जन्मभाषा तो. आणि ( महाराष्ट्रधर्म ) म्हणजे ज्यांत मुसलमानांचाहि समावेश सहज होऊं शकतो तो ज्ञानेश्वरांनीं जीर्णोद्धार केलेला भागवतीधर्म असें समजल्याविना गती नाहीं. "

याप्रमाणें महाराष्ट्रधर्माचें स्वरूप व व्याप्ती शास्त्रीबुवांनीं वरील प्रबंधांत दर्शविली आहे. वर दिलेल्या विस्तृत उताऱ्यांवरून शास्त्रीबोवांच्या मतांचें स्वरूप व दिशा वाचकांच्या पूर्ण लक्षांत आली असलेच. कै. न्या. मू. रानड्याप्रमाणेंच राजारामशास्त्री भागवत यांचीं मतें समाज सुधारणेच्या बाबतींत फार प्रागतिक स्वरूपाचीं होतीं व त्या मतांची छटा महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ व व्याप्ती यांच्या शास्त्रीबोवांनीं केलेल्या विशदीकरणावर पूर्णपणें पडलेली आहे हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. महाराष्ट्रधर्म या संज्ञेच्या अर्थाचे व व्याप्तीचे बाबतींत स्थूल दृष्ट्या न्या. मू. रानडे व भागवत यांच्या मतांत जवळ जवळ एकवाक्यता असल्याचें वरील उताऱ्यावरून दिसून येतें. शिवाजीचें क्षात्रतेज आणि रामदासाचें आत्मतेज यांचे योगानें महाराष्ट्रांत स्वराज्याची निर्मिती झाली असें शास्त्रीबोवांनीं प्रतिपादन केलें आहे. ज्ञानेश्वर, एकनाथ,

रामदास, तुकाराम, वामन शेखमहंमद इत्यादि साधुसंतांनीं उपदेशिलेल्या भागवती धर्माचे योगानें महाराष्ट्रीय समाजाचे ठायीं स्वराज्यस्थापनेस लागणारी पात्रता आली असा शास्त्रीबोवांचा सिद्धांत आहे. स्वराज्यस्थापना करण्यांत शिवाजी महाराजांचे ध्येय कोणतें होतें याचें दिग्दर्शन त्यांनीं आपले प्रबंधाचे शेवटीं केलें आहे. परंतु त्यांच्या पश्चात् कोणत्या ध्येयास्तव मराठ्यांच्या सत्तेचा प्रसार सर्व हिंदुस्तानभर महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांनी केला याचा स्पष्ट उल्लेख शास्त्रीबोवांचे विवेचनांत कोठें हि आलेला नाहीं हे लक्षांत ठेवणें जरूर आहे.

आतां या पंथांतील जे दुसरे एक प्रमुख विचार प्रवर्तक व ज्यांनीं या संबंधाचे आपले विचार न्यायमूर्ती रानड्यांच्या पूर्वीच प्रदर्शित केले होते असे राजश्री राजवाडे यानीं महाराष्ट्र धर्माचे विवेचन केल्याचा जो सुरवातीस आम्हीं उल्लेख केला आहे त्याचें थोडक्यांत दिग्दर्शन करितों.

मराठ्यांच्या इतिहास साधनांच्या प्रथम खंडाचे प्रस्तावनेंत रा० राजवाडे यांनीं महाराष्ट्र धर्माच्या व्याप्तीबद्दल व अर्थाबद्दल विवेचन केलें आहे. समर्थांनीं शिवाजी महाराजांचे मरणानंतर संभाजीस जें उपदेशपत्र पाठविलें त्यांतील " मराठा तितुका मेळवावा " इत्यादि सुप्रसिद्ध उक्तीचें आधारें हें विवेचन केलेलें आहे. महाराष्ट्रातील लोकांवर मुसलमानी सत्तेखालीं कोणतीं संकटें ओढविलीं; त्यांचा महाराष्ट्रावर कोणता परिणाम झाला याचे राजवाड्यांनीं प्रथम मार्मिक वर्णन करून नंतर महाराष्ट्र धर्माची व्याख्या त्यांनीं दिली आहे. ख्रिस्ती धर्म, महमुदीधर्म, यहुदीधर्म यांच्या सारखा महाराष्ट्र धर्म आहे कीं काय ? त्याच प्रमाणें महाराष्ट्र धर्म म्हणजे हिंदु धर्म च कीं काय ? अशी पृच्छा करून राजवाडे म्हणतातः- " ख्रिस्ती धर्म, महंमुदीधर्म अगर यहुदीधर्म यांच्या सारखा महाराष्ट्र धर्म नाहीं. त्याच प्रमाणें महाराष्ट्र धर्म म्हणजे केवळ हिंदु धर्म हि नव्हे. महाराष्ट्र धर्माची व्याख्या हिंदुधर्माच्या व्याख्येहून हि जास्त विस्तृत आहे. या प्रमाणें विवेचन करून राजवाड्यांनीं महाराष्ट्र धर्माचें पृथःकरण खालीं लिहील्याप्रमाणें केलें आहेः—

हिंदु धर्म + धर्म स्थापना + गोब्राह्मणप्रतिपाल=स्वराज्यस्थापना + एकीकरण + धुरी धारण=महाराष्ट्रांतील हिंदु धर्म.

महाराष्ट्रेतर प्रांतांतील धर्मास सहिष्णु हिंदु धर्म व महाराष्ट्रांतील हिंदु धर्मास

जयिष्णु हिंदु धर्म म्हटल्यास चालेल असा अभिप्राय आपलें म्हणणें जास्त विशद करण्या करितां रा. राजवाडे यांनीं व्यक्त केला आहे. कै० न्यायमूर्ती रानड्यांनीं महाराष्ट्रधर्माबद्दल व्यक्त केलेल्या अभिप्राया नंतर राजवाड्यांच्या वरील स्पष्टीकरणाच्या योगानें या विषयसंबंधाच्या मतांत किती तरी प्रगति झाली आहे. कै० रानड्यां प्रमाणें राजवाड्यांचें युरोपीयन राष्ट्रांच्या इतिहासग्रंथांचें परिशीलन गाढ व दांडगे आहे. याहून हि राजवाड्यांचा विशेष म्हटला म्हणजे मराठ्यांच्या इतिहास रचनेस उपयुक्त अशा हजारों समाज, धर्म, नीति, कायदा, राजकारण, अर्थशास्त्र, इत्यादी विषयींच्या स्वराज्यकाळांतील कागदपत्रांचा राजवाड्यांनीं काळजीपूर्वक अभ्यास करून ते प्रसिद्ध केले आहेत हा होय. या खेरीज जात्याच राजवाड्यांचें मन महाराष्ट्रीय संस्कृतीचें पूर्ण अभिमानी आहे. या सर्व कारणामुळें महाराष्ट्र धर्माची व्याख्या वरील प्रमाणें त्यांचे हातून व्हावी हें यथायोग्य च आहे असें म्हटलें पाहिजे. वरील मराठ्यांच्या इतिहास साधनांचा प्रथम खंड प्रसिद्ध झाल्यानंतर सन १९०० सालांत राजश्री राजवाडे यांनीं इतिहास साधनांचा चौथा खंड प्रसिद्ध केला. त्या खंडाच्या प्रस्तावनेंत राजवाड्यांनीं फिरून या विषयाचें विस्तृत विवेचन केलें आहे. या हि विवेचनांत प्रदर्शित केलेले विचार महत्वाचे असल्या कारणानें त्याचें एथें थोडक्यांत दिग्दर्शन करितों. प्रथम ऐतिहासिक प्रसंग या संज्ञेची व्याख्या राजश्री राजवाडे यांनीं केली असून नंतर खालील विचार त्यांनीं व्यक्त केले आहेत. महाराष्ट्राच्या इतिहासाचा आत्मा दर्शविण्याचें काम अद्याप पावेतों कोणत्याहि महाराष्ट्राच्या इतिहासकारानें केलेलें नाहीं. राष्ट्राचा इतिहास हा त्या राष्ट्रांतील मोठमोठ्या व्यक्तींच्या चरित्रांचा च बऱ्याच अंशानें बनलेला असतो. परंतु महाराष्ट्रांतील मोठमोठ्या ऐतिहासिक व्यक्तींच्या चरित्रांचें जितकें परिपूर्ण ज्ञान असावयास पाहिजे तितकें उपलब्ध नसल्या कारणानें महाराष्ट्राचा इतिहास बराच अपुरा आहे. मराठी बखरकारांनीं व त्यांच्या बखरींचें भाषांतर करणाऱ्या ग्रॅन्ट डफनें महाराष्ट्रीय समाजाला सजीव करणाऱ्या महाकारणांचा उल्लेख आपल्या ग्रथांत केलेला नाहीं. परंतु या महाकारणांच्या द्योतक शब्दांचा बखरकारांनीं उल्लेख केलेला आहे. परंतु ग्रॅन्ट डफला या शब्दाची ओळख हि असल्याचें दिसून येत नाहीं. या महाशब्दाची ओळख कैलासवासी न्या. रानडे व रा. भागवत यांच्या लेखांनीं प्रथम महाराष्ट्रीय वाचकांस झाली. न्या. रानडे व भागवत यांना हा शब्द प्रथम दासबोधांत आढळला व तेवढ्यावरच समा-

धान मानून या विद्वान् द्वयांनीं या शब्दाचा अर्थ त्यांच्या पूर्वग्रहात्मक समजुतीस अनुसरून केला. १६ व्या शतकांत क्याथॉलिक धर्मा विरुद्ध जी क्रांति झाली तशाच प्रकारची क्रांति सनातन धर्मा विरुद्ध भक्तिमार्गानें केली. धर्म या शब्दाचे अर्थ मराठी भाषेंत चार आहेत. १ गुण २ कर्तव्य ३ दान ४ अत्यंतिक दुःखध्वंसांचा मार्ग. पैकीं चौथा अर्थ महाराष्ट्र धर्म या शब्दांतील धर्म या पदाचा करून महाराष्ट्र धर्म म्हणजे सनातन धर्माच्या विरुद्ध असा एक धर्मपंथ असावा अशी वरील दोघा विद्वानांनीं आपली समजूत करून घेतली. परंतु रामदासांची व बखरकारांची अशी समजूत नव्हती. रामदासानें क्षात्रधर्म, सेवाधर्म, राजधर्म, स्त्रीधर्म, पुरुषधर्म वगैरे जे शब्द योजिले आहेत त्यांत धर्म या शब्दाचा अर्थ कर्तव्य असा स्पष्ट आहे. तोच प्रकार महाराष्ट्रधर्म या शब्दाचा आहे. महाराष्ट्रधर्म म्हणजे सर्व महाराष्ट्राचे सर्व मराठा समाजाचे कर्तव्य असा रामदासांचा आशय आहे. महाराष्ट्र धर्मांत मराठा जेवढा असेल तेवढ्याची व्याप्ति करावी असा रामदासांचा कटाक्ष होता. महाराष्ट्रधर्म हा राजकीय उन्नतीचा मार्ग नसून धर्मोन्नतीचा जर पंथ असता तर त्यांत भारत वर्षांतील इतर हिंदूंचा हि समावेश करावा असा रामदासांनीं स्पष्टोल्लेख केला असता. संतमंडळींच्या भक्तिमार्गांत हिंदु, मुसलमान, ब्राह्मण, अतिशूद्र वाटेल तो खपत असे. परंतु मराठ्यांचा जो महाराष्ट्र धर्म त्यांत अस्सल मराठा जो असेल तो च सामावला जाई. धर्म, धर्मस्थापना, हिंदुधर्म, इत्यादि दासबोधांतील शब्द दुःखध्वंसाचा मार्ग या अर्थींच योजिलेले आहेत. परंतु सेवाधर्म, राजधर्म, स्त्रीधर्म, महाराष्ट्रधर्म इत्यादि शब्द दासबोधांत जेथें जेथें योजिले आहेत तेथें तेथें धर्म या शब्दाचा अर्थ कर्तव्य असा आहे. "मराठा तितुका मेळवावा, महाराष्ट्रधर्म वाढवावा" या वाक्याचें भाषांतर 'Unite all who are Marathas together and propogate the Dharma ( religion of Maharastra ) असें न्यायमूर्ति रानड्यांनीं केलें आहे. धर्म या शब्दाचा आत्यंतिक दुःखध्वंसाचा मार्ग म्हणून जो चौथा अर्थ आहे तो न्यायमूर्तींनीं स्वीकारला आहे व तो अर्थांत चुकलेला आहे. महाराष्ट्रधर्म हा शब्द शके १६४९ त च रामदासांनीं प्रथम बनविला. शिवाजीच्या वेळीं झालेल्या राज्यक्रांतीचें मूळ तत्कालीन धर्म समजुतींत होते. परंतु न्यायमूर्ति रानडे जी धर्मक्रांति म्हणतात तिचा वाचक महाराष्ट्रधर्म नव्हता. शिवकालीन धर्म समजुतीला न्यायमूर्ति रानडे धर्मक्रांति

म्हणून संज्ञा देतात परंतु तें हि निरधार आहे. एक धर्माचा लोप होऊन त्या ठिकाणीं दुसऱ्या धर्मांची स्थापना अगर एक धर्मांतील एका दुष्ट मतांचा नाश करून त्या ठिकाणीं दुसऱ्या मतांची स्थापना होते त्यास धर्मक्रांति म्हणून म्हणतात. परंतु या दोन्ही प्रकारच्या धर्मक्रांतींपैकीं एकांत हि शिवाजीच्या वेळच्या धर्मसमजुतींचा अंतर्भाव होत नाहीं. हिंदुधर्म, सनातनधर्म, भक्तिमार्ग, उपासना मार्ग, यांचे विषयीं १५ व्या शतकापेक्षां १७ व्या शतकांत मराठ्यांना अत्यंत उत्कट अभिमान वाटूं लागला व या सर्वांचा द्वेष करणारा जो महंमदी धर्म तो हांकून लावण्यास मराठे उद्युक्त झाले. सनातन धर्माच्या विरुद्ध भक्तिमार्गाचा उदय होऊन मराठ्यांच्या मनाचा कोतेपणा नाहींसा झाला व तेणें करून दोहों बाजूंनीं स्वतंत्र होण्याची उत्कट इच्छा मराठ्यांचें मनांत बाणली व मराठ्यांनीं स्वराज्य स्थापिलें अशी न्यायमूर्तींनीं जोडलेली कार्यपरंपरा चुकीची आहे. हें दाखविण्यास भक्तिमार्गाच्या उत्पत्तीचा व प्रगतीचा इतिहास संक्षेपानें सांगितला पाहिजे.

श्रीमत् शंकराचार्यांच्या उदयामुळें बौद्ध धर्माचा लोप होऊन सनातन धर्माची स्थापना महाराष्ट्राच्या बऱ्याच भागांत इ. स. सहाव्या ते आठव्या शतकाचे दरम्यानचे कालांत झाली. जैन, लिंगायत, मानभाव इत्यादि पंथांचा उदय होऊन प्रसार झाला. या पंथांच्या संसर्गानें सनातन धर्माच्या गोटांतील कांहीं व्यक्तींनी भक्तिमार्ग, उपासनामार्ग या नांवाखालीं मोडणारी सनातन धर्माची एक शाखा काढिली. याच शाखेला भक्तिपंथ म्हणून ह्मणतात. या पंथाचें प्राबल्य इ. स. १३१८ पासून सन १६१९ सालीं अहमदनगरची मनसबगिरी शहाजीला मिळे तोपर्यंत सर्व महाराष्ट्रभर अव्याहत सुरू होतें. भक्तिमार्गाची इहलोकाबद्दल तिटकारा उत्पन्न करणारीं तत्वें होतीं. सनातन धर्माला त्रासून ज्या भक्तिमार्गाची कांस महाराष्ट्रांतील लोकांनीं धरिली त्या पासून त्यांना कांहीं फलप्राप्ति झाली नाहीं. सबब सनातन धर्माकडे लोकांची मनें वळलीं. याच वेळीं समर्थ रामदास स्वामी, रंगनाथस्वामी, मोरया देव इत्यादि सनातन धर्माभिमानी पुरुष उत्पन्न झाले व त्यांनीं महाराष्ट्रधर्माचा उपदेश केला. समर्थांनीं नवीन बनविलेल्या महाराष्ट्रधर्म या शब्दाचा नीट अर्थ न कळल्यामुळें न्यायमूर्तींनीं रामदासाच्या महाराष्ट्र धर्माची व संताच्या भक्तिमार्गाची तद्रूपता कल्पिली. व एकाच्या गुणाचा आरोप दुसऱ्यावर केला. शिवाजीमहाराजांच्या वेळच्या राज्यक्रांतीला

समर्थांनीं उपदेशिलेला महाराष्ट्रधर्म कारण झाला. संतांचा निवृत्तिमार्ग कारण झाला नाहीं. या प्रकारें रा. राजवाडे यांनीं विवेचन करून बखरींतील महाराष्ट्रधर्मसंबंधाच्या आढळणाऱ्या उल्लेखांच्या अर्थाचें स्पष्टीकरण केलें आहे. या विवेचनाचे शेवटीं रा. राजवाडे यांनीं खालील मत प्रगट केलें आहे. " वास्तविक पाहिलें असतां महाराष्ट्रधर्माच्या अर्थाची व्याप्ति किती आहे याचा अंदाज बखरकारांच्या उल्लेखावरून व रामदासांच्या लिहिण्यावरून व्हावा तितका होत नाहीं. शंकेला जागा पुष्कळच रहाते. " या शेवटील वाक्यावरून महाराष्ट्रधर्म या शब्दाच्या व्याप्तीबद्दल अनिश्चितपणा अद्यापपावेतों हि किती आहे हें स्पष्ट दिसून येत आहे. वरील विवेचनानंतर अगदी अलीकडे महाराष्ट्र धर्ममाला या नांवाच्या पुस्तक माले पैकीं पहिलें पुष्प शके १८३९ सालांत सातारा शहरीं प्रसिद्ध झालें. त्या पुष्पांत रा.राजवाडे यांनीं महाराष्ट्र धर्माचा अर्थ व व्याप्ति या संबंधीं कांहीं विचार प्रदर्शित केले आहेत त्यां पैकीं कांहीं महत्वाच्या मुद्यांचा या ठिकाणीं उल्लेख करणें जरूर आहे. महाराष्ट्रांच्या वसाहती ज्या प्रदेशांत झाल्या त्या सर्व प्रदेशाला वसाहतकारांच्या नांवावरून महाराष्ट्र ही संज्ञा मिळाली. वसाहतींत राहिल्यावर धर्माचें जें रूप महारट्टामधे प्रचलित झालें त्या धर्मरूपाला महाराष्ट्रधर्म असें नांव पडलें. या प्रमाणें महाराष्ट्रधर्म या संज्ञेची उपपत्ति देऊन रा. राजवाडे यानीं ह्या संज्ञेची व्याप्ति खालील प्रमाणें दर्शविली आहे. "व्यक्ति, समाज, देव व इतर प्राणिमात्र यांच्या संबंधानें धनात्मक किंवा ऋणात्मक जें जें म्हणून कर्तव्य तें सर्व धर्म होय. महारट्टांची अशीं जीं सर्व कर्तव्यें त्या सर्वांना महाराष्ट्र धर्म ही संज्ञा आहे. महाराष्ट्रधर्म या शब्दाचे दोन अर्थ आहेत. मराठाक्षत्रियांचा धर्म असा पहिला व पुरातन अर्थ आणि महाराष्ट्रांतील सर्व आर्यांचा सामान्य धर्म हा दुसरा व अर्वाचीन अर्थ. शिवाजीला उद्देशून समर्थांनीं जें पत्र लिहिलें त्यांत पहिला अर्थ अभिप्रेत आहे; आणि दासबोधांत दोन्ही अर्थ विवक्षित आहेत.

वरील प्रमाणें रा. राजवाडे यांचे महाराष्ट्र धर्माच्या अर्थाबद्दल व व्याप्तीबद्दल अगदीं अलीकडचे उद्गार आहेत. आतां या विषयासंबंधीं चर्चा करणाऱ्या आधुनिक इतिहास लेखकांपैकीं मराठी रियासतकार रा. सरदेसाई यांच्या मतांचें थोडक्यांत दिग्दर्शन करूं:—

रा. सरदेसाई यांनीं या विषयासंबंधीं आपले ग्रंथांत बरेंच विस्तृत विवेचन केलें आहे. कै० न्यायमूर्ति रानडे आणि रा.राजवाडे यांनीं या विषया-

संबंधीं केलेल्या विवेचनाचें विस्तृत परीक्षण करून वरील दोघा विद्वान् व्यक्तींच्या मतातील ग्राह्याग्राह्यतेचा भाग त्यांनीं दर्शविला आहे. परंतु या विषयाचे बाबतींत आजपावेतों झालेल्या चर्चेचें दिग्दर्शन व परीक्षण करण्या पलीकडे त्यांनीं आपलें स्वतःचें निश्चित असें या संबंधाचें मत दर्शविलेलें नाहीं. एकंदरींत रा. सरदेसाई यांचा कल रा. राजवाडे यांच्या मताकडे झुकता आहे. या बाबतींत रा. सरदेसाई यांनीं प्रदर्शित केलेल्या विचारां पैकीं खालील भाग महत्वाचा असल्या कारणानें तो येथें नमूद करणें जरूर आहे. ( मराठी रियासत भाग २ अवृती २ पान१०४)

" रामदासाच्या उपदेशांतील महाराष्ट्रधर्म म्हणजे प्राक् कालिन् साधुसंतांनीं दाखविलेला प्रकार तर खराच; परंतु त्यांहून कांहीं जास्त अर्थाचा समावेश त्यांत होत होता. नाहींतर " महाराष्ट्र " हा शब्द योजण्याचें प्रयोजन नव्हते.त्या शब्दांत पुष्कळ अर्थ भरलेला आहे.महाराष्ट्र देशाची रचना;त्यांतील लोकांच्या अंगचे पाणी, व प्रयत्न केला असतां बाहेर येणारें त्यांचे सामर्थ्य इत्यादि गोष्टींचा रामदासांचे मनांतील अर्थ या शब्दांत व्यक्त होतो. पूर्वीच्या साधूंच्या उपदेशाची दिशा केवळ वैराग्याची होती. स्वदेशाचे व स्वराष्ट्राचे संबंधाने लोकांचें कर्तव्य म्हणून कांहीं आहे, व ते त्यास समजावून दिलें पाहिजे, या गोष्टी त्या साधूंच्या विचारांत नव्हत्या. विशुद्धांतःकरणानें परमेश्वर भक्ति करावी, या पलीकडे त्याचे विचार गेले नाहींत.रामदास विद्वान् बहुश्रुत व देशकालज्ञ होता.त्यानें अर्धे आयुष्य जगाचा अनुभव घेण्यांत व लोकनिरीक्षण करण्यांत घालविले होतें. लोकांनीं ऐक्य करून स्वराज्य स्थापन करावें; स्वराज्य स्थापनेवांचून स्वधर्मोन्नति व्हावयाची नाहीं; धर्म व राष्ट्र यांचा निकट संबंध आहे, असा त्याच्या उपदेशाचा अर्थ होता."

वरील प्रमाणें सरदेसायांच्या विवेचनाचा निष्कर्ष त्यांच्याच शब्दांत दर्शविला आहे.

अगदीं अलीकडे कै० प्रोफेसर हरीभाऊ लिमये यांनीं मिस्टर किंकेड यांच्या मराठ्यांच्या इतिहासाच्या परीक्षण लेखांत मराठ्यांच्या आत्मिक इतिहासाच्या स्वरूपासंबंधीं कांहीं विचार व्यक्त केले आहेत. हे विचार एका विद्वान् महाराष्ट्र इतिहासाभिमानी गृहस्थाचे असल्याकारणानें त्याचे येथें दिग्दर्शन करणें जरूर आहे.

* As it is he ( Mr. Kincaid ) devotes only six pages to the subject, and even in them his inveterate

* "मराठ्यांचा इतिहास" ह्या ग्रंथाचे प्रो. लिमये यांचे मद्रास इंडियन रिव्ह्युच्या सन १९१८ च्या डिसेंबर महिन्याच्या अंकातील परिक्षण पहा.

habit of story telling is once again in evidence. He states the bare fact that there came into existence the beginnings of a national feeling, but dese not explain at any length how it came about. The work of the Saints of Maharashtra has been differently estimated by different people. While Ranade compares it to that of the protestant Reformers of Europe and credits them with having brought about the spiritual emancipation of the national mind, Mr. Rajawade denounces all the Saints except Ramdas as the Champions of passivity and invertebrate. Mr. Rajawade contends that it was Ramdas alone who preached activity and infused that new spirit into the Marathas which enabled them to do the work of national regeneration. We confess our sympathies are decidedly with Ranade and his way of arguing the point. We must at the same time explicitly disassociate ourselves from the view that the national movement in Maharashtra at the time of Shiwaji was based upon religion. This is the view usually held. This has been reiterated and emphasised by Mr. Rajawade. Ranade seems to support it. The only supposition on which this view could be rendered tenable is that the religion of the Hindus was in danger at the time and to save that religion political independence was necessary. Such a hypothesis has we think no foundation in fact. so it was not the material Power to bring about their political Independence that was lacking but rather the moral force that would exalt and ennoble the political ideal of the Marathas. It was this factor that was created by the Saints, that was their contribution to the national cause. They preached freedom from conven— tion, taught to look beyond the immediate concerns

of themselves and their families, and exhorted them to live a higher and nobler life. The lives of many of the Saints constitute a practical protest against the conventions of caste, the scathing criticism of Tukaram of the the social order and of the customs of the people are burnt into the heart of the reader even today. While Ramdas went still further by giving a practical turn to all this preaching and exhortation. we are inclined to hold that there were two factors in the national movement of Maharashtra. That representing national power was contributed by the Maratha nobles who opposed Shiwaji in the first instance, the moral force of the movement was derived from the preaching of the great saints, while Shiwaji stands for the synthesis of the two. Himself the son of a great Maratha nobleman and as such possessed of power and influence, he was thoroughly imbued with the spirit of the teachings of the Saints. Inspired by their high ideals he strove to realise them in his life and in doing so, he was prepared to risk both his power and position. That is the significance of Shiwaji's life work and it is that which entitles him to rank by the side of the greatest of the world's heroes.

वरील प्रो० लिमये यांच्या इंग्रजी भाषेंतील लेखाचा सारांश खालील प्रमाणें आहे:—

मि० किंकेड यांनीं आपल्या ग्रंथाचीं फक्त सहा पानें या विषयाचे प्रतिपादनार्थ खर्च केलीं आहेत. या विषयाचें प्रतिपादन करीत असतां गोष्टी कथन ( Story telling ) करण्याची त्यांचे ठिकाणीं दृढावलेली संवय दृष्टोत्पत्तीस येते. शिवकालीन महाराष्ट्रांत राष्ट्रीय भावना अस्तित्त्वांत आली ही बाब मि. किंकेड यांनीं आपले ग्रंथांत नुसती नमूद करण्यापलीकडे कांहीं केलेलें नाहीं. कोणत्या कारणांच्या योगानें ही भावना त्या काळचे महाराष्ट्रांत उत्पन्न झाली याचें सोपपत्तिक विवेचन करण्याचा प्रयत्न त्यांनीं बिलकूल

केलेला नाहीं. त्या काळच्या महाराष्ट्रीय संतांच्या कामगिरीची किंमत निरनिराळ्या लोकांनीं निरनिराळ्या प्रकारें केलेली आहे. युरोप खंडांतील प्रॉटेस्टंट धर्मीय सुधारकांनीं केलेल्या कार्याशीं संतांच्या कामगिरीची तुलना न्या. रानडे यांनीं केली असून, महाराष्ट्रीय समाजाच्या दास्याचें बंधविमोचन महाराष्ट्रीय संतांनीं केलें असें त्यांनीं प्रतिपादन केलें आहे.रामदासाखेरीज बाकीचे महाराष्ट्रीय संत निवृत्तीचे भक्त असून त्यांनीं केलेल्या उपदेशाच्या योगानें महाराष्ट्रीय समाज निःसत्त्व आणि पंगू झाला असें राजवाड्यांनीं प्रतिपादन केलें आहे. प्रवृत्ति मार्गाचा उपदेश महाराष्ट्रीयांस फक्त रामदासांनीं केला असून राष्ट्रीय उद्धारास लागणारें नूतन आत्मिक बल महाराष्ट्रीयामध्यें त्यांनींच उत्पन्न केलें असें राजवाड्यांचे ह्मणणें आहे. या मुद्यासंबंधीं रानड्यांची विवेचन पद्धति निश्चितपणें आह्मांस अधिक ग्राह्य वाटते असें आह्मी प्रांजलपणें कबूल करतों. असें जरी आहे तथापि शिवकालीन महाराष्ट्रांत जी राष्ट्रीय चळवळ अस्तित्वांत आली ती धार्मिक स्वरूपाची होती हें मत बरीक आम्हांस मान्य नाहीं, असें स्वष्टपणें नमूद करणें जरूर आहे. शिवकालीन महाराष्ट्रांत अस्त्विांत आलेली राष्ट्रीय चळवळ धार्मिक स्वरूपाची होती असा सर्वसाधारण समज असून तो दृढ करण्याचा रा. राजवाडे यांचा प्रयत्न आहे. रानड्यानांहि हा सिद्धांत मान्य आहे. या मतांत कांहीं तथ्य आहे असें फक्त एक बाब खरी आहे असें मानलें तर ठरणार आहे. ती बाब ह्मटली म्हणजे त्या काळीं हिंदुधर्मावर संकट आलें असून त्या संकटातून धर्माचा बचाव करण्याकरितां राजकीय स्वातंत्र्याची आवश्यकता होती ही होय. परंतु हें मत तत्कालीन वस्तुस्थितीच्या प्रत्यक्ष पुराव्यांवरून खरें ठरण्यासारखें नाहीं. त्याकाळीं महाराष्ट्राचें राजकीय स्वातंत्र्य साध्य करण्यास लागणाऱ्या भौतिक साधनांचा अभाव होता असें नाहीं. परंतु ही गोष्ट साध्य करण्यास लागणारें आत्मिक बल बरीक त्या काळच्या मराठ्यांच्या ठिकाणीं नव्हतें. हें आत्मिक बल महाराष्ट्रीय साधुसंतांनीं निर्माण केलें आणि महाराष्ट्राच्या राष्ट्रीय उन्नतीच्या कार्यास साधुसंतांकडून जी मदत झाली ती हीच होय. औपचारिक गोष्टीकडे दुर्लक्ष करण्यास व आपापल्या वैयक्तिक संसारापलीकडे नजर देऊन उच्च व श्रेष्ठ ध्येयाप्रीत्यर्थ आयुष्य वेंचण्यास महाराष्ट्रांतील लोकांस साधुसंतांनीं शिकविलें. जातीभेदामुळें उत्पन्न झालेल्या कृत्रिम बंधनाचा निषेध त्या काळच्या कित्येक साधुसंतांनीं आपल्या स्वतःच्या वर्तनानें व्यक्त केला

आहे. त्या काळच्या सामाजिक स्थितिबद्दल आणि लोकांच्या चालीरीतीबद्दल तुकारामानें जी कडक टीका केली आहे ती प्रस्तुत काळच्या वाचकांच्या अंतःकरणांत चांगली भिनण्यासारखी आहे. संतांच्या पुढें एक पाऊल रामदासानें टाकून संतांच्या शिकवणीस कृतीचें स्वरूप दिलें. त्या काळच्या महाराष्ट्राच्या राष्ट्रीय चळवळीचें पृथक्करण केलें असतां दोन बाबींच्या संमिश्रणानें ती चळवळ बनली गेली असें आम्हांस वाटतें. ही चळवळ यशस्वी होण्यास लागणारें भौतिक सामर्थ्य त्या काळच्या ज्या मराठा सरदारांनीं प्रथम शिवाजीस विरोध केला व नंतर त्यास जे सामील झाले त्यांचे कडून प्राप्त झाले. ही चळवळ यशस्वी होण्यास लागणारें आत्मिक बल त्या काळच्या साधुसंतांच्या शिकवणीमुळें उत्पन्न झालें. या दोन्ही शक्तींचें संमिश्रण त्य काळीं शिवाजीचे ठायीं झालें होतें. शिवाजी हा एका मोठ्या सरदाराचा मुलगा असल्यामुळें त्याचे हातीं सत्ता असून त्याचें लोकांवर फार वजन होतें. या शिवाय साधुसंतांची शिकवण त्याचे मनावर पूर्णपणे बिंबली होती. साधुसंतांच्या उच्च ध्येयानें प्रेरित होऊन शिवाजीनें स्वतःच्या कृतीनें ती ध्येयें मूर्तिमंत सिद्ध करण्याचा खटाटोप केला व तत्प्रीत्यर्थ त्यानें आपली सत्ता आणि मालमत्ता ही धोक्यांत घालण्यास मागेपुढें पाहिलें नाहीं. शिवाजीच्या चरित्राचें हेंच रहस्य असून याच योगानें जगाचे पाठीवर जे महान् पुरुष होऊन गेले त्यांचे मध्यें त्याची गणना करणें प्राप्त होतें. प्रो. लिमये यांच्या मताचा कल न्या. रानडे यांच्या मताशीं जुळता आहे असें वरील लेखावरून स्पष्ट होत आहे.

प्रो. लिमये यानीं वरील प्रमाणें आपले मत व्यक्त केल्या नंतर अगदीं अलीकडे रा. ब. प्रभाकर रामकृष्ण भांडारकर यांचा "श्री तुकाराम चरित्र" या मथळयाखालीं सन १९२१ सालच्या मार्च महिन्याच्या नवयुग मासिकाच्या अंकांत एक लेख प्रसिद्ध झाला आहे. त्या लेखांत १६व्या व १७ व्या शतकांत मराठ्यांच्या सत्तेच्या उत्कर्षाच्या व प्रसाराच्या कारण मीमांसेबद्दल कांहीं विचार त्यांनीं प्रदर्शित केले आहेत. हे विचार एका विद्वान् महाराष्ट्रीयाचे असल्याकारणानें प्रस्तुत विषयाच्या चर्चेच्या दृष्टीनें त्यांचे या ठिकाणीं थोडक्यांत दिग्दर्शन करणें जरूर आहे. सदर लेखाचे १५१ पानावर रावबहादूर म्हणतातः—" भागवतधर्माच्या बहुतेक शाखांचे व त्यांतहि वारकरी पंथाचे जातीभेद मोडणें हें ध्येय होतें. तत्कालीन साधुसंतांनीं उपदेश एक प्रकारचा व प्रत्यक्ष आचरण निराळया प्रकारचे असा खोटा भेद कधींच

केला नाहीं. " याप्रमाणें रावबहादुरांनीं सिद्धांत नमूद करून नंतर वरील सिद्धांत शाबीत करण्याकरितां स्पर्शास्पर्श, खाद्यपेय, रोटीबेटी व्यवहार इत्यादि बाबतींत ठरलेल्या विधिनिषेधरूपी आज्ञांचे विरुद्ध आचरण ज्या साधुसंतांनीं केलें अशा साधुसंतांचा नामनिर्देश आपल्या लेखांत केला आहे. यानंतर पंढरपूर येथील विठ्ठलाच्या पूजेविषयीं बरीच ऐतिहासिक दृष्टया चर्चा करून न्या. रानड्यांच्या " मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष " या ग्रंथांतील सिध्दांताच्या चर्चेकडे ते वळले आहेत. ही चर्चा करीत असतां महाराष्ट्रधर्म म्हणजे मराठी संतांनीं उपदेशिलेला धर्म असे रानड्यांनीं वरील ग्रंथांत प्रतिपादिलें असल्याचा उल्लेख करून तें प्रतिपादन त्यांनीं कसें मनोवेधक रीतीनें केलें आहे हें त्यानां दर्शविलें आहे. या प्रमाणे चर्चा केल्यानंतर रा० ब० म्हणतात " परंतु या प्रकाराचे Rhetoric (वक्तृत्व) एका बाजूस सारून जो वाचक स्वतःस प्रश्न करील कीं, मराठ्यांच्या उत्कर्षास संतमंडळ कारण आहे असें न्या० नीं आपल्या ग्रंथांत साधार दाखवून दिलें आहे काय ? त्यांच्या सहज लक्षांत येण्यासारखें आहे कीं, या साठी अवश्य असलेल्या प्रमाणांचा त्या ग्रंथांत अभाव आहे. एवढेंच नव्हे तर या संतमंडळासंबंधानें अगदीं उलट दिशेचेही विचार सुचण्यासारखे आहेत "... " आमच्याकडील बहुतेक सर्व संतांस ऐहिक राज्य म्हणजे तुच्छ, त्याच्याविषयीं विचारहि करणें योग्य नाहीं असें वाटलें. सारांश महाराष्ट्रांतले जें संतमंडळ झाले तें पुढें येणाऱ्या उदयकालाचे सूचक नसून महाराष्ट्राच्या राजकीय अवनतीचें द्योतक आहे असें म्हणावें लागतें. "

वरील विचार व्यक्त केल्यानंतर न्या. मू. रानड्यांचें विवेचन कसें चुकीचें आहे याचे दिग्दर्शन रावबहादुरांनी आपल्या लेखांत केलें आहे. हें विवेचन केल्यानंतर रा. ब. नीं शिवाजी महाराजांबद्दल खालील उद्गार काढले आहेतः—

" या दिशेनें विचार केला म्हणजे शिवाजीच्या कर्तृत्व शक्तीचा विशेषच अचंबा वाटतो. अवतारी पुरुष ह्मणवून घेण्यास कोणी योग्य असल्यास त्यापैकी एक शिवाजी असा सहज उद्गार निघतो आणि यदा यदा हि धर्मस्य इत्यादि उक्तीचा प्रत्यय धर्म राज्याबाहेरील विषयांतहि येतो असें वाटूं लागतें. "

शिवाजी महाराजासंबंधीं वरीलप्रमाणें आपलें मत नमूद करून रा. ब.

रामदासाकडे वळले आहेत. रामदासीपंथ व वारकरी सांप्रदाय या संबंधीं रा. ब. म्हणतातः—

" न्या. रानडे यांच्या संतांच्या कामगिरी संबंधाचे विचार मान्य नाहींत अशी मंडळी अलीकडे आढळण्यांत येऊं लागली आहेत. परंतु या मतभेदाच्या मुळाशीं रामदासीपंथ व वारकरी पंथ यांच्या मधील पूर्वीपासून चालत आलेलें द्वंद अंशतः तरी आहे असें खेदानें म्हणावें लागतें. ही मंडळी वारकरी पंथांच्या संतांस नेभळे, पंगु इत्यादि विशेषणें लावते. त्यांच्या मतें रामदासाचा उपदेश मात्र राष्ट्रहितकारक आहे व शिवाजीनें मराठ्यांच्या राज्यांची स्थापना केली तिचें श्रेय रामदासासच दिलें पाहिजे.........वस्तुतः प्रकार असा आहे कीं, मराठ्यांच्या राज्यस्थापनेचें श्रेय रामदासास यत्किंचितहि नाहीं ही गोष्ट कै. भागवत व प्रो. भाटे यांच्या लेखांवरून स्पष्ट आहे. रामदास व तुकाराम यांपैकीं कोणाच्याहि उपदेशाचें शिवाजीच्या काळीं राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेस साह्य झालें नाहीं. "

या प्रमाणें रा.ब. भांडारकर यांनीं वारकरी व रामदासी सांप्रदाय याविषयी आपलें मत प्रगट केलें आहे. त्यांच्या मतांच्या वरील सारांशावरून त्यांच्या विचारांची ओळख वाचकांस पटण्यासारखी आहे. रा. ब. प्रार्थनासमाजिष्ट असून मूर्तिपूजा, जातिभेद इत्यादि गोष्टी त्यांना मान्य नाहींत ही बाब लक्षांत घेतली असतां रा. ब. ची विचारसरणी वरील पद्धतीची आहे यांत नवल वाटण्यासारखे कांहीं नाही. पूर्वेतिहास निरीक्षणाचे बाबतींत असे नेहमी दृष्टोत्पत्तीस येते कीं, निरीक्षण करणाऱ्या व्यक्तीचीं मते ज्या स्वरूपाचीं असतात त्या मतास अनुरूप असा पूर्वेतिहास त्यास भासूं लागतो. आम्ही केलेल्या या विधानाचा प्रत्यय, रा. ब. चें वरील मतांचे परीक्षण प्रस्तुत ग्रंथाचे पुढील भागांत महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ व व्याप्ती यांबद्दल जो पुरावा आम्ही सादर करणार आहोंत त्या पुराव्याच्या दृष्टीनें केलें असतां, येणार आहे.

मराठ्यांच्या इतिहासासंबंधीं चर्चा करणाऱ्या विद्वान् व्यक्तींचे महाराष्ट्र धर्माच्या अर्थ व व्याप्ती संबंधीं अत्यंत मत वैचित्र्य असल्याचें आतां पावेतों केलेल्या विवेचना वरून कोणास हि सहज समजण्या सारखे आहे. या प्रश्नासंबंधीं विद्वानांच्या मतांत ज्या ठिकाणीं इतकें मतवैचित्र्य आढळून येतें त्या ठिकाणीं सामान्य जनतेच्या महाराष्ट्र धर्माचा अर्थ व व्याप्ती

या संबंधीं कांहीं विचित्र कल्पना असाव्यात यांत कांहीं नवल नाहीं. थोड्याच दिवसांपूर्वी महाराष्ट्र धर्मा संबंधीं प्रसिद्ध झालेल्या एका लेखांत लेखकानें खालील विचार प्रदर्शित केलें आहेत. नमुन्यादाखल त्या लेखांतील कांहीं वाक्यें खालीं देतों.

"स्वदेशाभिमान हा शब्द इंग्रजी भाषेंतून आपल्याकडे आला आहे परंतु आपले कडील महाराष्ट्रधर्म या शब्दांत तो अर्थ असून त्या शब्दांत नसलेला आणखी जास्त अर्थ आहे. महाराष्ट्रधर्म म्हणजे नुसतां देशाभिमान नव्हे, तर भगवंताचें अधिष्ठान असलेला देशाभिमान.- ईश्वर भक्तीनें अधिष्ठित अशी देशभक्ति. समर्थ कालीं महाराष्ट्र धर्म हा शब्द स्वदेश भक्ति याच अर्थी वापरला जात असे व यांत होणाऱ्या सद्गुणाचा बोध महाराष्ट्र धर्म या शब्दानें होत असे. महाराष्ट्र धर्म या शब्दांत आणखी एक विशेष आहे; तो असा कीं, या शब्दांत कर्तव्याचा बोध होतो. या शब्दा प्रमाणें स्वदेशविषयक अभिमानाच्या केवळ मानसिक वृत्तीचाच बोध होतो असें नव्हे. नुसता देशाविषयीं अभिमान मनांत असला; म्हणजे तो महाराष्ट्र धर्म नव्हे, महाराष्ट्र धर्म म्हणजे देश हिताची कांहीं तरी कृति व्हावयास पाहिजे. देशाभिमान कृतींत उतरला, म्हणजे तो महाराष्ट्रधर्म ही संज्ञा पावतो."

महाराष्ट्र धर्माच्या स्वरूपासंबंधीं शक्य तितक्या कल्पनांचा गोंधळ वरील उताऱ्यात दृष्टीस पडत असल्या कारणानें सामान्य जनांच्या महाराष्ट्र धर्माच्या अर्थ व व्याप्ती संबंधाच्या प्रचलित समजुतीचा नमुना म्हणून वरील उतारा आम्ही येथें मुद्दाम दिला आहे.

महाराष्ट्रांत अलीकडील उदयास आलेल्या मराठ्यांच्या आत्मिक इतिहास लेखकांपैकीं विद्वान् व पुढारी लेखकांच्या विवेचनाचें व चर्चेचें दिग्दर्शन आतां पावेतों थोडक्यांत केलें आहे. वर दर्शविलेल्या नाना प्रकारच्या मतांतून सर्व साधारण व सर्व संमत असा जो निष्कर्ष निघतो तो हा कीं छत्रपति शिवाजी महाराजांनीं स्वराज्य स्थापनेचें जें महत् कार्य केलें व त्यांच्या पश्चात् मराठ्यांच्या सत्तेचा व राज्याचा प्रसार ज्या अनेक थोर महाराष्ट्रीय पुरुषांनी केला त्या सर्वांचें ध्येय हें कार्य करण्यांत समर्थोक्तींत नमूद केल्या प्रमाणे धर्मस्थापना अथवा महाराष्ट्रधर्मस्थापना हें होतें. या सिद्धांत बद्दल आधुनिक महाराष्ट्रीय इतिहास लेखकांच्या मतांमध्यें कोणत्या हि प्रकारचा मतभेद नाहीं. धर्म अथवा महाराष्ट्र धर्म या संज्ञेचा अर्थ काय करावयाचा, त्याची व्याप्ति किती, त्यांत कोण कोणत्या बाबींचा

समावेश होतो, ही संज्ञा देशाभिमान, स्वदेश प्रेम, इत्यादि स्वरूपाच्या मनोभावना दर्शविणारी आहे अगर कांहीं विद्यमान विशिष्ट वस्तु दर्शविणारी आहे, इत्यादि बाबी संबंधीं मतवैचित्र्य किती व कोणत्या स्वरूपाचें आहे हें वरील विवेचना वरून स्पष्ट होत आहे. पहिल्या भागांत नमूद केलेलीं विदेशीय युरोपियन इतिहासकार व महाराष्ट्रेतर हिंदी इतिहासकार यांचीं मतें या बाबती संबंधीं कशीं चुकीची आहेत हें हि या भागांतील विवेचना वरून स्पष्ट झालें आहे. आतां धर्म अथवा महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ व व्याप्ति ठरविण्यास उपयुक्त अशा प्रकारचा पुरावा पुढील भागांत नमूद करण्याचें ठरवून हा भाग आह्मी येथें पुरा करितों.

---

# प्रकरण ३ रें

## शिवकालीन स्वराज्यस्थापनेचें व तदनंतरच्या स्वराज्यविस्ताराचें " महाराष्ट्रधर्मस्थापना " हेंच ध्येय होतें या सिद्धांतावर येणारे आक्षेप व त्यांचें निरसन व महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ व व्याप्ति स्पष्ट करणारा ऐतिहासिक पुरावा.

मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाविषयीं विवेचन करणाऱ्या आधुनिक विद्वानांपैकीं कै. न्या. रानडे, कै. राजारामशास्त्री भागवत, कै. प्रो. लिमये व रा.राजवाडे इत्यादि विद्वानांच्या मतांचें दिग्दर्शन मागील भागांत करण्यात आलें आहे. या पंथांतील बहुतेक सर्व विद्वानांच्या मतांचा निष्कर्ष महाराष्ट्रधर्मस्थापना हें शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थापनेचें व त्यांच्या पश्चात् मराठ्यांनीं केलेल्या स्वराज्यविस्ताराचें ध्येय होतें हें स्पष्ट झालेलें आहे. तथापि वरील विद्वानांच्या मतांवर कदाचित् असा आक्षेप येण्याचा संभव आहे कीं, न्या. रानडे इत्यादि विद्वानांनीं शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थापनेचें ध्येय महाराष्ट्रधर्म स्थापना हें होते हा जो सिद्धांत ठरविला आहे तो " मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा " या एकट्या समर्थांच्या उक्तीचें आधारावर ठरविला आहे. शिवाजी महाराजांच्या पूर्वीं, त्यांच्या हयातींत व त्यांच्या पश्चात् महाराष्ट्रीय समाजाचें समर्थांप्रमाणेंच शिवाजी महाराज व दुसरे हि कांहीं कार्यकर्ते पुढारी होते.

तरी या सर्व पुढाऱ्यांचें राजकीय ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें याबद्दलचा साग्र पुरावा पुढें आल्याखेरीज वरील सुप्रसिद्ध समर्थोक्तींत दर्शविलेलें ध्येय हेंच ध्येय सर्व महाराष्ट्रीय समाजाच्या पुढाऱ्यांचें होतें असें विधान करणें वाजवी होणार नाहीं. हा आक्षेप क्षुल्लक स्वरूपाचा आहे असें म्हणतां येणार नाहीं. ऐतिहासिक सत्यकथनाच्या दृष्टीनें या आक्षेपाचें पुराव्याचे आधारें निरसन होणें जरूर आहे. या आक्षेपापेक्षांहि जो दुसरा एक बलवत्तर आक्षेप पुढें येणार आहे व ज्या आक्षेपाचें निरसन करणें अत्यंत महत्वाचें आहे तो आक्षेप असा कीं, मराठी राज्याची स्थापना व त्याचा विस्तार हीं महत्कार्यें घडवून आणण्याकरितां ज्या महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनीं अपरंपार उद्योग व साहस केलें त्या पुढाऱ्यांचें ध्येय या सर्व खटपटी करण्यांत महाराष्ट्रधर्मस्थापना हेंच असल्याचें जरी पुराव्यावरून सिद्ध झालें तथापि महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ काय करावयाचा व या संज्ञेंत कोणकोणत्या बाबींचा समावेश होतो म्हणून समजावयाचें? या आक्षेपांचा समाधानकारक खुलासा होणें अवश्य आहे. मागील भागांत मराठ्यांच्या आत्मिक इतिहासलेखकांनीं या संज्ञेचा अर्थ काय केला आहे याचें त्रोटक परंतु यथातथ्य दिग्दर्शन केलें आहे. हें विवेचन वाचलें असतां महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ काय करावयाचा या संबंधीं महाराष्ट्रांतील नामांकित व जाड्या विद्वान् व्यक्तींमध्यें अत्यंत तीव्र असें मतवैचित्र्य असल्याचें आढळून येतें. अशा स्थितींत महाराष्ट्रधर्म या संज्ञेच्या अर्थासंबंधीं विवेचन करणाऱ्या विद्वानांपैकीं कोणत्या विद्वानाचें मत ग्राह्य समजावयाचें या विषयीं मन गोंधळून जातें. महाराष्ट्रीय समाजाच्या भविष्यकालीन चारित्र्याच्या दृष्टीनें वर दर्शविलेल्या दुसऱ्या आक्षेपाचें असलल पुराव्याचे आधारें निरसन होणें हें फार महत्वाचें आहे. पूर्वेतिहासाच्या अभ्यासाचा व मननाचा हेतु भाविष्य काळीं राष्ट्रीय चारित्र्यास योग्य प्रकारचें वळण लावण्यास उपयुक्त असा बोध प्राप्त करून घेणें हा असतो. हें तत्व लक्षांत घेतलें असतां वरील आक्षेपांचें निरसन योग्य प्रकारें झाल्याखेरीज महाराष्ट्राच्या पूर्वचारित्र्याची खरी कल्पना आपणांस व्हावयाची नाहीं व भविष्यकाळीं महाराष्ट्रानें पूर्व संस्कार व परंपरा यांस अनुसरून आपलें पाऊल कोणत्या मार्गानें आक्रमावयाचें हें हि निश्चितपणें ठरवितां यावयाचें नाहीं. यास्तव वर नमूद केलेल्या दुसऱ्या आक्षेपाचेंहि पुराव्याचे आधारें निरसन करणें अत्यंत अवश्य आहे. वरील दोन्ही आक्षेपांचे यथायोग्य व समाधानकारक निरसन ज्या पुराव्याचे आधारानें आम्ही करणार आहों तो पुरावा या भागाचे उत्तरार्धांत आम्हीं समग्र नमूद केला

आहे. तथापि या पुराव्यासंबंधीं कांहीं प्रास्ताविक स्थूल चर्चा करणें जरूर असल्या कारणानें तिकडे आतां आम्ही वळतों.

एखाद्या विवक्षित काळीं एखाद्या विवक्षित राष्ट्रांतील मानवी समाजाचें ध्येय कोणतें होतें हें निश्चित करण्याचा शास्त्रशुद्ध मार्ग म्हटला म्हणजे त्या राष्ट्रांतील त्या विवक्षित काळच्या पुढाऱ्यांनीं

( १ ) स्वतःचें ध्येयासंबंधीं प्रगट केलेले विचार

( २ ) स्वतःचें ध्येयाचे सिद्ध्यर्थ केलेलीं कार्यें

( ३ ) स्वतःचे ध्येयाचे सिद्ध्यर्थ चालविलेल्या खटाटोपी संबंधीं त्या काळच्या सामान्य व्यक्तींनीं प्रगट केलेले विचार, इत्यादि बाबींचें परीक्षण करणें हा होय. वरील तीन बाबीसंबंधीं उपलब्ध होणाऱ्या पुराव्यांवरून त्या राष्ट्राचें ध्येय ठरविलें पाहिजे हें उघड आहे. या तत्वास अनुसरून सोळा ते अठरा या शतकाचे दरम्यानच्या काळांत महाराष्ट्रांत झालेल्या मराठ्यांच्या उत्कर्षाचे व त्यांच्या सत्तेच्या प्रसाराचें ध्येय खरोखरच महाराष्ट्रधर्म स्थापना हेंच होतें कीं काय याची शहानिशा करण्याकरितां शिवपूर्वकालीं, शिवाजी महाराजांचे हयातींत व शिवपश्चात् काळीं महाराष्ट्रीय समाजाचे पुढारी कोण होते, त्यांचे ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें, व त्यांच्या ध्येयाचे सिध्यर्थ त्यांनीं कोणता खटाटोप व कार्यें केलीं या संबंधाच्या पुराव्याचा शोध करणें जरूर आहे. त्याचप्रमाणें वरील काळीं महाराष्ट्रीय व महाराष्ट्रेतर सामान्य लोकांनीं महाराष्ट्रीय पुढाऱ्यांच्या ध्येयाचे स्वरूपाबद्दल व तत्सिध्यर्थ त्यांनीं चालविलेल्या कार्याबद्दल कोणतीं मतें प्रदर्शित केलीं आहेत या संबंधाच्या पुराव्याचा शोध करणें जरूर आहे. अशा प्रकारच्या पुराव्याचा शोध घेतल्या नंतर त्या पुराव्यांवरून मागील भागांत दर्शविल्याप्रमाणें महाराष्ट्रधर्मस्थापना हेंच मराठ्यांच्या स्वराज्य स्थापनेचें व विस्ताराचें ध्येय होतें असें सिद्ध झालें तर वर दर्शविलेल्या आक्षेपांपैकीं पहिल्या आक्षेपाचें निरसन सहजच होणार आहे. आम्हीं यापुढें पहिल्या आक्षेपाचे निरसनार्थ जो पुरावा देणार आहों त्याच पुराव्याचे योगानें वर दर्शविलेल्या दुसऱ्या आक्षेपांत अंतर्भूत होणाऱ्या शंकांचा साग्र व तपशिलवार खुलासा होणार आहे. दुसऱ्या आक्षेपांतील शंकांचा खुलासा झाला म्हणजे महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ व व्याप्ति याची वाचकांस यथायोग्य कल्पना होणार आहे. उपलब्ध झालेल्या पुराव्यावरून वरील आक्षेपांचें निरसन होऊन कोणते

सिद्धांत निष्पन्न होतात याचें दिग्दर्शन सुरवातीसच करणें इष्ट नसल्याकारणानें तूर्त या बाबतींत आम्हास मुग्धता स्वीकारणें भाग आहे. आतां वर दर्शविलेल्या अक्षेपांच्या संबंधाचा पुराव्या नमूद करण्यापूर्वी वरील काळच्या महाराष्ट्रीय् पुढाऱ्यांच्या ध्येयाचें स्वरूप निश्चित करण्यास कोणत्या प्रकारचा पुरावा आपणांस उपलब्ध होणें शक्य आहे याचें दिग्दर्शन प्रथम करणें जरूर आहे. वरील काळांतील महाराष्ट्रीय पुढाऱ्यांच्या ध्येयाबद्दलचा पुरावा दोन प्रकारचा उपलब्ध होतो. एक प्रत्यक्ष व दुसरा अप्रत्यक्ष अथवा आनुमानिक स्वरूपाचा पुरावा होय. महाराष्ट्रीय पुढाऱ्यांच्या ध्येयाचा ज्या लेखांत साक्षात् उल्लेख करण्यांत आला आहे असे मराठी ऐतिहासिक वाङ्मयांतील लेख हा प्रत्यक्ष पुरावा होय. त्याचप्रमाणें त्या काळच्या पुढाऱ्यांनीं त्यांच्या ध्येयाचे सिध्यर्थ जीं कृत्यें केलीं त्यांचा उल्लेख ज्या लेखांत आढळतो या लेखांचाहि प्रत्यक्ष पुराव्यांत समावेश होतो. या शिवाय तत्कालीन महाराष्ट्रीय अगर महाराष्ट्रीय समाजेतर सामान्य जन यांचें त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजाच्या पुढाऱ्यांचें ध्येयाबद्दलचे विचार ऐतिहासिक वाङ्मयांतील ज्या लेखांत आढळतात ते लेखहि प्रत्यक्ष पुराव्याचे सदरांत पडतात. या प्रत्यक्ष पुराव्याशिवाय महाराष्ट्रीय समाजाच्या स्थितीची महाराष्ट्रीय-पुढाऱ्यांनीं केलेलीं वर्णनें मराठी पद्य वाङ्मयांत आढळतात. हीं वर्णनें कारितांना महाराष्ट्रीय समाजांतील व्यक्तींचे कोणते दोष नाहींसे होऊन त्या ठिकाणीं कोणत्या गुणांचें संवर्धन व्हावें अशा विषयीं लेखकांनीं आपले विचार प्रगट केलेले आहेत. या वर्णनावरून अप्रत्यक्ष रीतीनें महाराष्ट्रीय समाजाच्या पुढाऱ्यांच्या ध्येयाचे स्वरूपाबद्दल आपणांस बरीच यथायोग्य कल्पना होते. हा पुरावा अप्रत्यक्ष अथवा आनुमानिक स्वरूपाचा होय. पुराव्याचे दृष्टीनें वरील दोन्ही प्रकारचे लेख महत्वाचे असून त्यांच्या साह्यानें महाराष्ट्रीय पुढाऱ्यांचें शक सोळाशे ते शक अठराशें यांच्या दरम्यानचे काळांतील ध्येय आपणांस निश्चित करितां येण्यासारखें आहे.

वरील काळच्या महाराष्ट्रीय पुढाऱ्यांच्या ध्येयाचें स्वरूप निश्चित करण्यास कोणत्या प्रकारचा पुरावा आपणांस उपलब्ध होणें शक्य आहे याचें दिग्दर्शन येथ पावेतों करण्यांत आलें आहे. परंतु महाराष्ट्रीय समाजाचे पुढारी कोणास समजावयाचें हा एक महत्वाचा प्रश्न आहे, व या प्रश्नाची चर्चा करणें जरूर आहे. आतां महाराष्ट्रीय समाजाच्या पुढाऱ्या-संबंधीं आम्ही एक दोन महत्त्वाच्या बाबींचें दिग्दर्शन करितों.

महाराष्ट्रांतील देवगिरीच्या यादवांचें राजघराणें व त्यांचें राज्य लयास जाऊन त्या ठिकाणीं मुसलमानाची राजसत्ता स्थापन झाल्यापासून तों शिवाजी महाराज अवतीर्ण होई तों पर्यंत महाराष्ट्रीय समाजाच्या पुढाऱ्यांचे दोन वर्ग दिसून येतात.एक राजकारणी पुढाऱ्यांचा वर्ग व दुसरा पारमार्थिक अथवा हरिकथा निरूपणी पुढाऱ्यांचा वर्ग. महाराष्ट्रीय समाजाचे पुढारी कोणत्या प्रकारच्या व्यक्तीस समजले जात असें याचें दिग्दर्शन केल्यानंतर ह्या पुढाऱ्यांच्या ध्येया संबंधीं माहिती कोणत्या प्रकारची उपलब्ध होणें शक्य आहे या विषयींचे स्थूल दिग्दर्शन करूं. वरील काळांत राजकारणी पुढाऱ्यांच्या वर्गांत पडणाऱ्या महाराष्ट्रीयांचीं शें दोनशे नांवें मराठ्यांच्या इतिहासाच्या साधन-ग्रंथांतून व बखरीतून आपणांस आढळतील. यांपैकीं कांहीं थोड्या व्यक्ती खेरीज बाकीच्यांच्या चरित्राबद्दल व कृतीबद्दल म्हणण्यासारखी माहिती आपणांस उपलब्ध होत नाहीं. याच काळांतील पारमार्थिक किंवा हरिकथा निरूपणी वर्गांत पडणाऱ्या पुढाऱ्यांची माहिती राजकारणी वर्गांत पडणाऱ्या पुढाऱ्यांपेक्षां बरीच अधिक आपणांस उपलब्ध झाली आहे. या पुढाऱ्यांची मराठी भाषेंतील अफाट पद्यरूप ग्रंथसंपत्ति उपलब्ध झाली असून ती वरून त्यांच्या ध्येयाचें स्वरूपा विषयींची कल्पना आपणांस करतां येण्यासारखी आहे. त्याच प्रमाणें याच वर्गांतील कित्येक पुढाऱ्यांच्या चरित्राबद्दलची हि आपणांस बरीच माहिती उपलब्ध झाली आहे. ह्या माहितीचा या वर्गांतील पुढाऱ्यांचे ध्येय निश्चित करण्यास उपयोग होणार आहे.

आतां शिवाजी महाराजांचे जन्मापासून तों थेट मराठी राज्य नष्ट होऊन इंग्रजी सत्ता महाराष्ट्रांत स्थापन होई तों पर्यंत जो काल गेला त्या कालांत झालेल्या पुढाऱ्यांच्या ध्येयाबद्दलच्या पुराव्या संबंधीं विचार करूं. या काळांत झालेल्या दोन्ही प्रकारच्या पुढाऱ्यांच्या ध्येयाबद्दल व कृतीबद्दल माहिती पुष्कळ मोठ्या प्रमाणावर आपणांस उपलब्ध झाली आहे. या काळांतील पारमार्थिक वर्गांत पडणाऱ्या पुढाऱ्यां पैकीं बरेच पुढारी समर्थ सांप्रदायी होते, ही बाब विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. या काळांत राजकारणी पुरुषांची एक मोठी लाट महाराष्ट्रांत उत्पन्न झाली. या पुढाऱ्यांपैकीं बऱ्याच लोकांच्या ध्येयाची कल्पना मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनग्रंथांत प्रसिद्ध झालेल्या लेखांवरून आपणांस करितां येण्यासारखी आहे. त्याच प्रमाणें या पुढाऱ्यांच्या चरित्रांबद्दलहि बरीच माहिती उपलब्ध झाली असल्या कारणानें त्यांच्या

कृतीबद्दलहि बरीच माहिती आपणांस उपलब्ध झाली आहे. राजकारणी पुढाऱ्यांप्रमाणेंच त्या काळच्या पारमार्थिक पुढाऱ्यांच्या ध्येयाबद्दल व कृतीबद्दल आपणांस बरीच माहिती उपलब्ध झाली आहे. रामदासी वाङ्मय पुष्कळच प्रसिद्ध झालें असल्याकारणानें समर्थ सांप्रदायी पारमार्थिक पुढाऱ्यांच्या ध्येयाबद्दल व कृतीबद्दल सांगोपांग कल्पना करतां येण्यासारखा पुरावा उपलब्ध झाला आहे. वरील दोन्ही काळांत होऊन गेलेल्या पारमार्थिक पुढाऱ्यासंबंधीं एक महत्त्वाची बाब लक्षांत ठेवणें जरूर आहे. ती बाब ही कीं, या पुढाऱ्यांचे निरनिराळे दोन वर्ग स्पष्टपणें आढळून येतात. हरिकथा निरूपणी महाराष्ट्रीय पुढाऱ्यांपैकीं कांहीं निवृत्तीमार्गाचे व कांहीं प्रवृत्तीमार्गाचे भोक्ते व उपदेशक होते. या ठिकाणीं प्रवृत्ति व निवृत्ति या संज्ञांचा अर्थ स्पष्टपणें सांगणें जरूर आहे. जगांतील व्यवहाराबद्दल उदासीन राहून संसृतीचे फेऱ्यांतून मुक्तता करून घेणें यांतच मानवी जीविताचे साफल्य आहे असें मानून त्या प्रमाणें वागणें हें निवृत्तिमार्गाचें लक्षण होय. संसाराबद्दल उदासीन वृत्ति धारण न करितां संसारांत राहून परमार्थ साध्य करणें हें प्रवृत्तिमार्गाचें लक्षण होय. फार पुरातन काळापासून या दोन्ही मार्गाचे उपदेशक आपल्या समाजांत अवतीर्ण होत आले आहेत व त्या परंपरेस अनुसरून वर नमूद केलेल्या दोन्ही काळांत कांहीं निवृत्तीचा व कांहीं प्रवृत्तीचा उपदेश करणारे हरिकथानिरूपणी पुढारी महाराष्ट्रीय समाजांत उदयास आले. या महत्त्वाच्या बाबीखेरीज महाराष्ट्रीय पुढाऱ्यासंबंधीं जी आणीक एक बाब लक्षांत ठेवावयाची ती ही कीं, शिवाजी महाराज उदयास येऊन मराठी राज्य लयास जाई तो पर्यंत जे राजकारणी पुढारी होऊन गेले त्यांपैकीं कित्येकांचा त्या काळच्या पारमार्थिक पुढाऱ्यांशीं गुरु शिष्य संबंध होता. या दोन बाबी लक्षांत ठेवल्यानें मराठी सत्तेच्या उत्कर्षाची मीमांसा करणाऱ्या लेखक वर्गाच्या विवेचनांत जो एकदेशीपणा दिसून येतो तो नाहींसा होऊन त्या काळच्या महाराष्ट्राच्या राजकीय उन्नतीच्या कारणांची बरीच यथायोग्य कल्पना करणें सुगम होईल.

मराठ्यांच्या ऐतिहासिक वाङ्मय ग्रंथांतून महाराष्ट्रीय पुढाऱ्यांच्या ध्येयाचा साक्षात् उल्लेख ज्या लेखांत करण्यांत आला आहे ते लेख महाराष्ट्रीय समाजाच्या पुढाऱ्यांच्या ध्येयाचा प्रत्यक्ष पुरावा होत हें आह्मी वर नमूद केलें आहेच. अशा प्रकारचे लेख हे फार महत्वाचे आहेत. या लेखासंबंधीं एक गोष्ट लक्षांत ठेवावयाची ती ही कीं, महाराष्ट्रीय पुढाऱ्यांचें ध्येय निश्चित कर-

ण्याकरितां महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा उल्लेख ज्या लेखांत आला आहे त्या लेखांचाच नुसता विचार करून भागण्यासारखें नाहीं. ज्या लेखांतून स्वधर्म, धर्म, हिंदुधर्म, धर्मराज्य इत्यादि संज्ञांचा उल्लेख करण्यांत आला आहे अशा प्रकारच्या लेखांचाहि महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ निश्चित करितांना विचार करणें अवश्य आहे. कोणत्याहि भाषेंतील एखाद्या संज्ञेचा अर्थ करण्याची शास्त्रशुद्ध पद्धत म्हटली म्हणजे ती संज्ञा त्या भाषेंतील वाङ्मयांत कोठें कोठें आढळते, ती संज्ञा त्या विशिष्ट स्थळीं योजण्यांत लेखकाचा काय हेतु होता, कोणत्या पूर्वानुसंधानास अनुलक्षून ती संज्ञा लेखकानें योजिली आहे इत्यादि बाबींचें परीक्षण करून नंतर त्या संज्ञेचे अर्थ ठरविणें ही होय. या दृष्टीने हि महाराष्ट्रीय समाजाच्या पुढाऱ्यांच्या ध्येयाबद्दलच्या मराठी वाङ्मयांतील वरील स्वरूपाच्या उल्लेखांचें परीक्षण करणें हि अत्यंत महत्त्वाचे आहे. अशा प्रकारच्या परीक्षणानें सुरवातीस जे आक्षेप नमूद केले आहेत त्यांचें निरसन अर्थात्‌च होणार आहे. आतां ही प्रास्ताविक चर्चा पुरी करून वर दर्शविलेल्या काळांत होऊन गेलेल्या महाराष्ट्रीय पुढाऱ्यांच्या ध्येयाबद्दलचा पुरावा आह्मी नमूद करितों व त्या संबंधीं अवश्य तें विवेचन करण्याकडे आम्ही आतां वळतों.

**देवगिरीच्या यादवानंतरच्या व शिवाजी महाराज अवतीर्ण होण्यापूर्वीच्या काळांतील महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांचे ध्येया संबंधीचा पुरावा व त्यावरून निष्पन्न होणारे सिद्धांतः—**

वर दर्शविलेल्या तीन काळविभागां पैकीं देवगिरीच्या यादवानंतरच्या व व शिवाजी महाराज अवतीर्ण होण्यापूर्वीच्या काळांत महाराष्ट्रांत जे राजकारणी पुरुष होऊन गेले त्यांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें याच्या परीक्षणाकडे आतां आपण वळूं. सोळाव्या व सतराव्या शतकामध्यें महाराष्ट्रांत निर्माण झालेल्या मराठी राज्याच्या स्थापनेचा व प्रसाराचा हेतु महाराष्ट्रधर्म स्थापना हाच होता की काय या मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें आपण शिवपूर्वकालीन स्थितीचें परीक्षण करण्याचें ठरविलें आहे ही बाब लक्षांत घेतां मुसलमानांचा महाराष्ट्रांत प्रवेश होऊन त्यानीं तेथें आपलें राजकीय वर्चस्व स्थापित करण्यापूर्वी साधारण पणें महाराष्ट्रांत काय किंवा भरतखंडातील निरनिराळ्या प्रांतांत काय जे वैदिकधर्मी क्षत्रिय अगर क्षत्रियेत्तर राजे झाले त्यांच्या राजकीय सत्तेचें ध्येय कोणत्या

स्वरूपाचे असें याचा शोध घेणें जरूर आहे. कोणताहि मानवी समाज घ्या त्या समाजांत पूर्वपरंपरेशीं अगदीं विलग अशी कोणतीही नवीन बाब आकस्मित् रीतीनें कधींहि उत्पन्न होत नाहीं. त्या समाजाचा जो विशिष्ट स्वभाव असतो त्या विशिष्ट स्वभावाचा वेळोवेळीं बदलणाऱ्या परिस्थितींत संकोच अथवा विकास होत असतो. हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतांतील पुरातन काळच्या वैदिक धर्मी क्षत्रिय राजांची ताम्रपटावर कोरलेलीं शेंकडों दानपत्रें अलीकडे उपलब्ध होऊन प्रसिद्ध झालीं आहेत. या दानपत्रांचें परीक्षण वरील मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें केलें असतां असें आढळून येतें कीं, पुरातन काळचे वैदिकधर्मी राजे मन्वादि स्मृतींतील धर्माचे अनुयायी व त्या धर्माचे परिपालन करणारे असे म्हणवून घेण्यांत मोठें भूषण मानीत. या दानपत्रांच्या सुरवातीस दान देणाऱ्या राजांच्या गुण वर्णनांत वरील स्वरूपाचें उल्लेख आढळतात. उदाहरणा-दाखल एक दोन दान पत्रांतील अशा स्वरूपाचे उल्लेख आम्ही येथें नमूद करितों. दुसऱ्या धारासेनच्या वल्लभीशक २५२ च्या[१] ताम्रपटांत खालील वर्णन आढळून येतें.

"त्याचा मुलगा श्रीद्रोणसिंह ज्यानें धर्मराजाप्रमाणें मन्वादि प्रणीत विधि निषेधधर्माचें परिपालन केलें."

वरील ताम्रपटाप्रमाणेंच वल्लभीशक[२] २१० मधील ताम्रशासनांत खालील उल्लेख आढळतो.

"जो राजा युधिष्ठिर राजाप्रमाणें मन्वादि ऋषींनीं घालून दिलेल्या नियमाप्रमाणें वर्तन करितो.

वरील प्रकारच्या उल्लेखांवरून मन्वादि स्मृतींत सांगितलेल्या विधि निषेध धर्मास अनुसरून वागणारा राजा श्रेष्ठ समजला जात असे व वरील धर्मास अनुसरून वागणें हें प्रत्येक राजाचें कर्तव्य समजलें जात असें हें उघड आहे. वरील प्रकारच्या उल्लेखाशिवाय धर्माचें रक्षण करणाऱ्या, वेदवेदांगांचें व शास्त्रांचें अध्ययन करणाऱ्या त्याच प्रमाणें कृच्छ्र, अतिकृच्छ्र, चांद्रायण इत्यादि विधि करणाऱ्या ब्राह्मणांचा योगक्षेम चालविण्याकरितां जमिनी, व गांवें राजांनीं ब्राह्मणास दान दिल्याचें अनेक उल्लेख पुरातन ताम्रपटांतून आढळून येतात. त्यावरूनहि स्मृति धर्माचें परिपालन करणें हें त्या काळच्या

---

१ इंडियन ॲंटिक्वेरी भाग ८ पान ३०३. २ इंडियन् ॲंटिक्वेरी भाग ४ पान २१०.

राजकीय सत्तेचें ध्येय समजलें जात असें हें सिद्ध होतें. गोब्राह्मण प्रतिपालक या ज्या सुप्रसिद्ध पदवीनें शिवाजी महाराजांस संबोधण्यांत येत असे, त्या पदवीच्या उपपत्तीची मीमांसा केली असतां तिचा धागा शिवाजी महाराजां-पूर्वी अनेक शतकें होऊन गेलेल्या वैदिक धर्मी राजांचे कालापावेतों पोहों-चतो असें ताम्रशासनांतील वरील प्रकारच्या उल्लेखावरून उघड दिसून येणार आहे. मन्वादि स्मृतींत कथन केलेल्या धर्मास अनुसरून राजानें आपलें स्वतःचें वर्तन ठेवणे व त्याच्या प्रजेस हि त्या धर्मास अनुसरून वर्तन करावयास लावणें हें वैदिकधर्मी क्षत्रिय राजाचें श्रेष्ठ प्रकारचें कर्तव्य मुसलमानांची राजसत्ता हिंदुस्थानांत स्थापन होण्यापूर्वी समजलें जात असे, हे वरील प्रकारच्या उल्लेखावरून सिद्ध होत आहे. आतां मुसलमानांचा हिंदुस्थानांत प्रवेश होण्यापूर्वीपासून अस्तित्वांत असलेल्या या ध्येयांत मुसलमानांचें राजकीय वर्चस्व महाराष्ट्रांत स्थापन झाल्यानंतर कांहीं फेरफार झाला कीं काय अगर हें ध्येय लयास गेलें कीं काय याचा आपण शोध घेऊं. महाराष्ट्रांत मुसलमानी सत्ता स्थापन झाल्या पासून शिवाजी महाराज अवतीर्ण होई तों पर्यंत सर्व दक्षिण हिंदुस्थानांत परकीय सत्तारूपी अंधकार सर्वत्र सारखा पसरला होता असा वास्तविक प्रकार नव्हता मुसलमानी सत्तेशीं झगडा करून वैदिक धर्माचें रक्षण करणारें विजयनगरचें प्रसिद्ध राजघराणे त्या काळीं अस्ति-त्वांत होतें. त्या घराण्याच्या राजसत्तेच्या स्थापनेचा सूक्ष्मरीतीनें विचार केला असतां वैदिक धर्माचें रक्षणार्थ तें घराणें अस्तित्वांत आले असें दिसून येणार आहे. मुसलमान धर्म आणि वैदिक धर्म यांचा आचार विषयक बाबतींत अत्यंत विरोध आहे. मूर्तिपूजा, गोब्राह्मणाबद्दल आदर इत्यादि वैदिकधर्मानुयायी लोकांस प्रिय असलेल्या बाबींबद्दल मुसलमानांचे ठायीं अत्यंत द्वेष असे. मुसलमान राजांनी इनाम दिलेल्या जमिनीच्या व गांवांच्या सनदा बऱ्याच उपलब्ध झाल्या आहेत. काजीस दिलेल्या सनदांतून काजीनें करावयाच्या कामांपैकीं हिंदुलोकांच्या देवालयांतील मूर्ति फोडणें हें एक काजीचें काम असे. ( सनदा, पत्रें, वाड व पारसनीस पान ७७ व ८२. ) मुसलमान व श्रुतिस्मृत्युक्त धर्म यांत असलेल्या वरील विरोधाचे योगानें मुसलमान राजसत्तेखालीं हिंदु लोकांवर धर्माचे बाबतींत पराकाष्ठेचा जुलूम होत असला पाहिजे हें उघड आहे. अशा प्रका-रच्या जुलमी सत्तेखालीं सांपडलेल्या सर्व हिंदु वैदिक धर्मानुयायी लोकांचें ध्येय स्वधर्म रक्षण करणें हे ओघानें च प्राप्त झालें. वैदिक धर्माचें रक्षणार्थ

या काळीं खुद्द महाराष्ट्रांत कांहीं प्रयत्न झाल्याचें दिसत नाहीं. तरी महाराष्ट्राचे दक्षिण भागास लगत असलेल्या कर्नाटक प्रांतांत तशा प्रकारचा प्रयत्न बराच यशस्वी झाला होता असें त्या काळच्या इतिहासावरून दिसून येणार आहे. शके १२३४ म्हणजे इ. स. १३१२ सालीं देवगिरीच्या यादव घराण्यांतील शेवटचा पुरुष शंकरदेव हा मालिक काफूरबरोबर झालेल्या युद्धांत ठार होऊन महाराष्ट्रांत मुसलमानांची सत्ता स्थापन झाली. या सत्तेचें अधिष्ठान जें बहामनी राजघराणें तें घराणे इ. स. १३४७ पासून इ. स. १५२८ पावेतों अस्तित्वांत होतें. पुढें हें घराणे लयास जाऊन त्याचे ठिकाणीं निजामशाही, आदिलशाही, कुतुबशाही, बरीदशाही व इमादशाही अशीं पांच निरनिराळीं मुसलमान राजघराणीं अस्तित्वांत येऊन महाराष्ट्र देशाचे निरनिराळे भाग या राजघराण्यांच्या वर्चस्वाखालीं नांदत होते. बहामनी राजघराण्याची राजसत्ता इ. स. १३४७ सालात महाराष्ट्रांत स्थापित होण्यापूर्वी अकरा वर्षे म्हणजे इ. स. १३३६ सालाचे सुमारास महाराष्ट्राच्या दक्षिण कोपऱ्यास विजयनगर येथें एका नवीन हिंदु राजकीय सत्तेची प्रतिष्ठापना करण्यांत आली. ही राजसत्ता थोड्याच काळांत भरभराटीस लागून तिनें बहामनी राजघराण्यांशीं व त्याचे पश्चात् निजामशाही, आदिलशाही इत्यादि अस्तित्वांत आलेल्या राजघराण्यांशीं राजकीय वर्चस्वाचे बाबतींत स्पर्धा करण्यास सुरवात केली. विजयनगर येथील राजघराण्यांतील पुरुषांस वरील मुसलमान राजघराण्यांतील पुरुषांबरोबर १००।१५० वर्षे राजकीय वर्चस्वाकरितां सतत झगडत रहावें लागलें. अखेर शक १४८६ सालीं तालिकोट अथवा राक्षसतागडी येथें विजयनगरचा रामराजा व वरील मुसलमान राजघराण्यांचें कूट यांचेमध्यें मोठें घनघोर युद्ध होऊन विजयनगरचें राजघराणें लयास गेले. तालिकोट अगर राक्षसतागडीच्या लढाईच्या हकीकतीची एक पुरातन बखर उपलब्ध झाली आहे. त्या बखरींत हें युद्ध करण्यांत रामराजाचा हेतु काय होता हे खालील उताऱ्यांवरून दिसून येणार आहे. लढाईस निघण्यापूर्वी रामराजा त्याची आई चंद्रासाळा हिचा आशीर्वाद घेण्याकरितां गेला असतां रामराजानें त्याचे आईपाशीं खालील उद्गार काढल्याचें सदर बखरींत नमूद आहे:—

" चार पादशहा मिळोन हे मुलकावरी चाली करून येताती. हे धर्म मुलुख देवस्थान, अन्नच्छत्र व देवब्राह्मण स्थल असे. त्याचे तसवीस होऊ नये या करितां लस्कर, कटक बंदी करून आपण जाऊन त्यांस गोषमाला देऊन, आपणांसी निरोप देणें. "

बखरींतील वरील उल्लेखावरून शिवाजी महाराज अवतीर्ण होण्यापूर्वी कि विजयनगरच्या हिंदुराजघराण्यानें धर्म, देवस्थान, अन्नछत्र, देवब्राह्मण इत्यादिकांचें रक्षण करण्याकरिता मुसलमान राजघराण्याबरोबर झगडा चालविला होता हें उघड दिसत आहे. मुसलमान लोकांचा महाराष्ट्रांत प्रवेश होऊन त्यांची सत्ता स्थापन झाल्यापासून मुसलमानांनीं वरील बाबतींत अत्यंत विध्वंसक असें धोरण स्वीकारिलें होतें. त्यामुळें मुसलमानी राजसत्ता नाहींशी करून वरील बाबींचें रक्षण करणे हें प्रत्येक वैदिक धर्मानुयायी माणसाचें —मग तो ब्राह्मण असो वा क्षत्रिय असो, सामान्य जन असो वा राजकारणी अगर हरिकथा निरुपणी पुढारी असो —कर्तव्य होऊन बसलें. वरील काळांत महाराष्ट्रांत जे शें दोनशें राजकारणी पुरुष होऊन गेले त्यांच्या नांवांचा निर्देश व त्यांचा हुद्दा ह्या बाबी आज पावेतों प्रसिद्ध झालेल्या ऐतिहासिक लेखांतून फक्त आढळून येतात, परंतु या पलीकडे त्यांचें ध्येय काय होतें, त्यांनीं कृति काय केली याबद्दलची माहिती अद्याप पावेतों उपलब्ध झालेली नाहीं. हे सर्व राजकारणी पुरुष त्या काळीं महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागावर सत्ता चालविणाऱ्या आदिलशाही, निजामशाही, कुतुबशाही इत्यादि मुसलमान राजघराण्यांचे दरबारीं मोठमोठ्या हुद्यावर नोकर होते. राजकारणांशीं या लोकांचा वरिष्ठ हुद्याच्या नोकरीमुळें निकट संबंध येत गेल्या कारणानें या पुरुषांस राजकारणाच शिक्षण सहजच प्राप्त होत असे. परंतु महाराष्ट्रांत मुसलमानांची सत्ता स्थापन झाल्यामुळें त्यांच्या पूर्वापार धर्माच्या होणाऱ्या वाढत्या ऱ्हासास आळा घालून स्वधर्मरक्षण करणें अवश्य आहे अशा प्रकारची भावना त्या काळच्या वरील प्रकारच्या महाराष्ट्रीय राजकारणी पुरुषांचे ठायीं उद्भूत झाली होती कीं नाहीं हें दर्शविणारा पुरावा अद्यापपावेतों उपलब्ध झाला नाहीं. उलट पक्षीं निवळ बडेजावी व मुसलमान राजदरबारांत मान्यता मिळविण्याची हांव धरून एका वजनदार मराठा व्यक्तीनें दुसऱ्या त्याच्या स्वजातीय वजनदार मराठ्या व्यक्तीवर शस्त्र उपसल्याची बरीक त्याकाळचीं अनेक उदाहरणें आढळतात. मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांच्या पंधराव्या खंडांतील पान ६ वर वरील प्रकारच्या मनोवृत्तीचें निदर्शक असें एक उत्तम उदाहरण आहे. त्याचा या ठिकाणीं उल्लेख केल्यावांचून राहवत नाहीं. जानोजी पिसाळ या नांवाचा एक मराठा सरदार बेदरचे बादशहाचे दरबारांत नोकर होता. शिर्क्यांवर स्वारी करण्याचे कामीं त्याची व एका मुसलमान सरदाराची बादशहानें नेमणूक केली. ते उभयता सरदार आपल्या सेनेसह रडतोंडीच्या घाटापावेतों गेले. तेथें त्यांचे

मध्यें कांहीं कारणामुळें बेबनाव उत्पन्न होऊन ते उभयतां सैन्यासह बेदरास बादशहाकडे परत आले. बेदर येथें परत आल्यावर बादशाही दरबारांत त्या उभयतांमध्यें उत्पन्न झालेल्या लढ्याबद्दलचा प्रश्न निघाला ते वेळीं भरदरबारांत जानोजी पिसाळानें मुसलमान तुरुक सरदाराचे खांद्यावर तरवारीनें वार करून त्यास उभें चिरलें. हा सर्व प्रकार होत असतां उभयतांना सोडविण्याकरितां बादशहा पुढें सरसावला. एका नामांकित मुसलमान सरदाराचा बादशहाचे समक्ष अशा प्रकारें वध केल्याचा भयकर परिणाम जानोजीच्या लक्षांत येऊन त्याने बादशहास विनति केली कीं, आपला मुसलमान सरदार मारला गेला याबद्दल आपण दुःखी होऊं नये. मी मुसलमान होतों व माझ्याकडे शिर्क्यांवरील स्वारीचें काम सोंपवावें. मी शिर्क्यांचा पराजय केला तर ठीकच आहे; परंतु त्यांचा परजय न होतां मी लढाईत ठार मारला गेलों तर माझे पश्चात् माझा देह पुरून त्या जागेवर माझी कबर बांधण्यांत यावी व पीर जलालुद्दीन हें नांव त्या कबरेस देण्यांत येऊन सर्व लोकांनीं मराठ्यांचा वीर व मुसलमानांचा पीर या नांवाने मला संबोधावें; उजवे बाजूस मराठ्यांनीं व डावे बाजूस मुसलमानांनी पूजा करावी. त्याचप्रमाणे बादशहानी माझ्या कबरेची पूजा करण्याकरितां मुजावर ठेवावे व त्यास पांच चावर जमीन दिवा उदबत्तीकरितां इनाम द्यावी. वरील प्रमाणें सनद करून देण्याविषईं जानोजी पिसाळानें बादशहास विनंती केली. बादशहास ही गोष्ट मान्य होऊन त्यानें जानोजी पिसाळाच्या म्हणण्याप्रमाणें त्यास सनद करून दिली. त्यानंतर जानोजीनें शिर्क्यांवर स्वारी केली. मेळ्याचे रानांत जानोजी पिसाळ व शिर्के या उभयतांमध्यें मोठें युद्ध होऊन शिर्क्यांचा पराभव झाला व त्यानें आपल्या सैन्यासह पळ काढला. जानोजीस जरी युद्धांत यश आलें तथापि त्याचे पोटास वार लागून त्याचा कोथळा बाहेर आला. कदाचित् शिर्क्यांचे लोक परत फिरले तर त्यांचे हातीं सांपडूं नये म्हणून त्यानें आपलें शिर कापून तें व बादशहानें दिलेली सनद त्याचे एका आप्ताचे हवालीं केली व बादशहाने दिलेल्या सनदेंत लिहिल्याप्रमाणें शिराची व्यवस्था करण्यास त्यास सांगितलें. त्यानंतर जानोजीचें शरीर पुरण्यांत येऊन त्याचेवर कबर बांधण्यांत आली, व बादशाही सनदेप्रमाणें त्या पिरास इनाम जमीन वगैरे देण्यांत आली. तेव्हांपासून या जानोजीचे कबरेस पीर जलालुद्दीन अथवा मराठ्यांचा वीर व मुसलमानांचा

पीर या संज्ञेनें आज तागाईत लोक ओळखत आहेत[1]. जानोजी पिसाळाचे वरील चरित्रावरून त्याचे ठायीं अप्रतिम शौर्य व धाडस इत्यादि गुण उत्कटत्वानें वसत होते हें दिसून येतें; परंतु स्वदेशबांधव अगर स्वधर्मबांधव यांचे विषयीं त्याचे ठायी उच्च प्रकारच्या भावना असल्याचें आढळून येत नाहीं. त्या काळच्या महाराष्ट्रांतील सर्व साधारण वरिष्ठ प्रकारच्या मराठा व्यक्तीच्या मनोरचनेचें जानोजी पिसाळ ही व्यक्ति एक नमुनेदार उदाहरण आहे. याच काळांतील दुसरी सुप्रसिद्ध राजकारणी व्यक्ति म्हटली म्हणजे लुकजी जाधवराव शिंदखेडेकर ही होय. शहाजी बरोबर वैमनस्य येतांच नात्याचा संबंध एका बाजूस ठेवून त्याचे बरोबर युद्ध करून त्याचा नायनाट करण्याचा प्रयत्न करण्यास जाधवराव कचरला नाहीं असें त्या वेळच्या इतिहासावरून दिसून येत आहे. साधारणपणे वरील नमुन्याचे राजकारणी पुरुष त्याकाळीं महाराष्ट्रांत होते हें जरी खरें आहे तथापि स्वधर्मरक्षणार्थ मुसलमानी सत्ता झुगारून देऊन स्वराज्यस्थापना करण्याची कल्पना दक्षिण हिंदुस्थानांत त्याकाळीं कोणासच भावली नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. मुसलमानी सत्ते बरोबर दोन हात करून तिचा नायनाट करण्याचे प्रयत्न त्याकाळीं विजयनगरच्या राजघराण्यानें केल्याबद्दलचा उल्लेख वर आलाच आहे. या राजघराण्याच्या उदयाच्या वृत्तांतावरून धर्मरक्षणार्थच विजयनगरची राजकीय सत्ता निर्माण करण्यांत आली होती असें अनुमान काढणें प्राप्त होतें. हरिहर या नांवाच्या एका लहानशा जहागिरदाराकरवीं माधवाचार्य उर्फ विद्यारण्यस्वामींनीं महाराष्ट्र व मद्रास इलाख्याचे सरहद्दीवर महाराष्ट्राच्या पूर्व व दक्षिण कोपऱ्यांत हि अनागोंदी या नांवाच्या एका क्षुद्र खेड्यांत शके १२५७ चे सुमारास मुसलमानी सत्तेशीं झगडण्याकरितां एका नूतन राजसत्तेची प्रतिष्ठापना केली. माधवाचार्य ऊर्फ विद्यारण्य यांचें चरित्र सर्वांस श्रुत च आहे. वेदविद्या व इतर अनेक शास्त्रें यांचे संबंधीं त्यानीं केलेली ग्रंथरचना आजमित्तीस हि सर्व जगास वंद्य अशी आहे. माधवाचार्य ऊर्फ विद्यारण्य वैदिक धर्माचे कट्टे अभिमानी

---

१ हा पीर सातारा जिल्ह्यांतील कऱ्हाड नजीक मसूर गांवचे माळावर आहे. हल्लीं हि पीर जलालुद्दीन असच या पिरास लोक म्हणतात. पिराची जत्रा भरते तेव्हां हिंदु व मुसलमान असे दोघेहि या पिराची पूजा करितात. पिराचे खर्चाकरितां अद्याप पावेतों सरकारांतून इनाम जमीन चालू आहे.

होते, असें त्यांच्या चरित्रावरून दिसून येत आहे. अशा पुरुषानें विजयनगरच्या राजसत्तेचा जो रोपा लावला व जो मोठा वृक्ष झाल्यावर हे " धर्म मुलुख, देवस्थापना, अन्नच्छेत्र, व देवब्राह्मणस्थल " असें रामराजानें ज्याचें वर दर्शविल्याप्रमाणें वर्णन केलें आहे तो रोपा काय हेतूनें लावला या विषयीं तर्क करणें फारसें कठीण नाहीं. शिवाय विजयनगरच्या राजसत्तेच्या स्थापने पासून तों तिचा बींमोड होई तोंपर्यंत तिचे चरित्रावरून हि तिच्या निर्मितीचा हेतु मुसलमानी सत्तेचें दक्षिणेंतून उच्चाटन करून वैदिक धर्मावर आलेलें संकट नाहींसे करणें हाच असला पाहिजे असें अनुमान निघतें. विजयनगरच्या राज्यस्थापनेपासून तों तालीकोटची लढाई होऊन त्या घराण्याच्या सत्तेचा लोप होई तोंपर्यंत या राजघराण्याचे दक्षिणेंतील मुसलमानी राजघराण्याबरोबर सतत युद्ध चालू असे. हें युद्ध स्वधर्म रक्षणार्थ करावें लागे असें अनुमान रामराजाच्या वरील उक्तीवरून साहजिक रीतीनें निष्पन्न होत आहे. विजयनगरच्या राजसत्ते खालील प्रदेश वास्तविक पहातां महाराष्ट्रांत त्या काळीं मोडत नव्हता व हल्लीं हि मोडत नाहीं; तथापि दक्षिण हिंदुस्थानांतील महाराष्ट्राच्या आसपासच्या प्रदेशांतील राजकारणी पुढाऱ्यांच्या ध्येयाचे व मनोभावनांचे निदर्शक या दृष्टीनें विजयनगर येथील राजस्थापनेचें महत्व प्रस्तुत विषयाच्या चर्चेच्या दृष्टीनें फार मोठें आहे व याच दृष्टीनें विजयनगरच्या राज्यस्थापनेचा उल्लेख आह्मीं येथें केला आहे. खुद्द महाराष्ट्रांत विजयनगरच्या राज्यस्थापनेसारखा प्रयत्न त्या काळीं थोडाबहुत झाला असल्याचें मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांवरून दिसून येतें. म. इ. सा खं. १५ पान १४ वरील खालील उल्लेख ह्या मुद्याच्या दृष्टीनें महत्वाचा आहे. " त्या उपरी रताजी रूपाजी यादव यांनीं आउंदची देशमुखी करून पुंडावे केले. वणगोजी मुधोजीस मिळोन मुलखांमध्यें राजीक केले. आणि वणगोजी मुधोजीस आणून कऱ्हाडाचा कोट त्यास घेऊन दिलहा. मोठमोठे सावकार लुटिले. पनाळा गावतों राजीक केले. ते वख्ती वणगोजी मुधोजी पुंड जाहाले होते. पादशाहांनीं रताजी रूपाजी बहुत तलब केला ते हुजुर नयेत मग त्यांवेरी नामजादी करून रताजी रूपाजी जिवे मारिलें. " वरील हकिकतीच्या सत्यतेस बळकटी आणणारा पुरावा म. ई. सा. खं. १५ मध्यें रोहिडखोरे जेधे देशमुखांच्या कागद पत्रा पैकीं लेखांक ३२७ व ३२८ ही कान्होजी जेधे यास वणगोजी मुधोजी नाईक यानीं लिहिलेलीं दोन अस्सल पत्रें हा होय. शिवाजी महाराजानीं स्वराज्य

स्थापनेच्या कार्यात ज्या कान्होजी जेध्याची सहानुभूति व मदत मिळविण्याची खटपट केली त्याच कान्होजी जेध्याची मदत वणगोजी मुधोजी नाईकानें सुरू केलेल्या राजिकास मिळविण्याची खटपट केली होती असें वरील पत्रावरून सिद्ध होत आहे. वरील वर्णनांत " वणगोजी मुधोजी नाईक पुंड झाले होते " असें लेखक म्हणतो. याच लेखाचे उत्तरार्धात ( पान १६ ) शिवाजी महाराजा संबंधीं लेखकानें पुढील उद्गार काढले आहेत, " या उपरी शहाजी राजाचा लेक शिवाजी राजा जाला त्यानें पुंडावा करून पादशाहासी बिघाड केला. ' हा लेख लिहिणारानें वणगोजी मुधोजी व शिवाजी महाराज यानीं प्रचालित राजसत्ते विरुद्ध बंड करून स्वराज्य स्थापना करण्याच्या प्रयत्नास पुंडावा हा शब्द वापरला आहे. यावरून शिवाजी महाराज अवतीर्ण होण्यापूर्वी स्वराज्य स्थापना करण्याचा प्रयत्न कांहीं व्यक्तीकडून महाराष्ट्रांत झाला होता हें सिद्ध होत आहे. परंतु वणगोजी मुधोजी व रताजी रूपाजी यांचे हा प्रयत्न करण्यात कोणत्या स्वरूपाचें ध्येय होतें या संबंधीं अनुमान काढण्या इतपत पुरावा अद्याप पावेतों पुढें आलेला नाहीं. आतां या काळांतील दुसऱ्या एका मोठ्या राजकारणी व्यक्तीचा निर्देश करून त्या व्यक्तीच्या चरित्राचें परीक्षण करण्यास आह्मी सुरवात करितों. ही व्यक्ति म्हटली ह्मणजे शहाजी राजे भोंसले ही होय. अलीकडे प्रसिद्ध झालेल्या इतिहाससाधनांतून शहाजी राजाबद्दल बरीच नवीन माहिती उपलब्ध झाली आहे. या माहितीचे आधारें शहाजीराजे यांचे ध्येयाबद्दल बरेच निश्चित स्वरुपाचें अनुमान काढण्या इतपत पुरावा उपलब्ध झालेला आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. यांचे ध्येयाबद्दल ठाम सिद्धांत ठरविण्यास जश्या प्रकारचा पुरावा पाहिजे तश्या प्रकारचा पुरावा अद्याप पावेतों उपलब्ध झाला नसल्या कारणानें शहाजी राजे यांच्या ध्येयाच्या स्वरूपाच्या चर्चेच्या दृष्टीनें उत्तम मार्ग ह्मटला ह्मणजे उपलब्ध झालेल्या पुराव्यांवरून त्यांच्या ध्येयाच्या स्वरूपाबद्दल जीं कांहीं अनुमानें निघणें शक्य आहे त्यांच दिग्दर्शन करणें हा होय. तंजावर येथील भोंसले राजघराण्याची जी शाखा होती त्या शाखे-पैकीं एका राजपुरुषानें इंग्रजी सत्ता स्थापन होण्यापूर्वी भोंसले घराण्याच्या हकीकतीचा एक शिलालेख तंजावर येथील बृहदीश्वराचे देवालयांत खोदविला आहे. या शिलालेखांतील हकीकत कोणत्या पुराव्याचे आधारवर लेखकानें दिली आहे हें समजण्यास मार्ग नाहीं. अशा स्थितींत ऐतिहासिक सत्यक-थनाचे दृष्टीनें ह्या लेखांतील हकीकतीस कितपत किंमत द्यावयाची हा प्रश्न

आहे. या शिलालेखांत शिवाजी महाराजांचे शहाजी महाराजांबद्दल सोनो-पंतापाशीं खालील भाषण झाल्याचा उल्लेख आहे.

" शिवाजी राजे पुरंदगडांत होते त्यांनीं आपला मंत्री सुवर्ण नामक ब्राह्मण त्यास सोनोजीपंत म्हणवून येक त्यास बलाऊन एकांतीं सांगितले जे आमुचे वडील शाहजी राजे परम शूर आणि योगवंत ही त्यांनीं केलीं कामें हीं निर्मल मनकडून केलें परंतु त्यांत थोडा भाव सुचतो ते काय म्हणजे प्रथम निजामशाहा संगतीस होते, ते अल्लियदल शाहाचे बोधने करून त्याकडे आले. परतून निजामशाहांनीं बोलावितांच त्याकडे गेले पुन्हा अल्लीयदलशाहा-कडे ही आले ऐशा दोन तीन येरझारा झाल्या तशाचे संगतीस जितके दिवस होते कीं त्या त्यांचीं कामें निर्वेचन कडून करूनही त्या त्यांस त्यांचें ठाईं कपटच भासावयाजोगें झालें; परंतु आपले म्हणून विश्वास धरावयास ठाव नाहींस जाहल. त्या त्यांना कार्य करण्यावांचून सरनीते कार्यास त्यांस आप-ले करून घेऊन कार्यशेखर करून तदनुसार मान बहुमान केले ! यवदेंच परंतु मनकडून हे आपले म्हणून मानावयाजोगी करणी वडिलांकडून घडली नाहीं. ते कैशी म्हणजे थोर मनुष्याची येकाची संगती धरल्यावरी त्याशीं बिघडतांच नये ! कदाचित् बिघडावयाजोगें परतून त्यांशीं मिळूं नये ! हे तो प्रसिद्ध नीती असतां या रीती चालून बोले इतकी; यांसहीं वडील अंग-कडून शूर आाणि निर्वेचनेकडून वर्तल्या करितां कृत्रिमि यवनापासून वडिलांस इश्वरें राखिलें. "

तंजावरच्या शिलालेखांतील वरील हकीकतींत शहाजी महाराजांचें चरित्र बरेंच यथायोग्य रेखाटलेलें आहे. परंतु त्यांच्या ध्येयाचा मागमूस वरील वर्णनांत आढळून येत नाहीं. या वर्णनावरून शहाजी राजे अत्यंत पराक्रमी होते व प्रसंग पडेल त्याप्रमाणें ज्याची बाजू धरणें त्यांस इष्ट वाटे त्यांची बाजू ते घेत व मानमान्यता संपादन करीत असें दिसून येतें. राधामाधवविलासचंपू या नांवाचें जें काव्य अलीकडे प्रसिद्ध झालें आहे त्या काव्यावरून हि शहाजी राजे अत्यंत पराक्रमी होते ही गोष्ट निर्विवादपणें सिद्ध होत आहे. उत्तरेस शहाजहान व दक्षिणेस शहाजी यांना सृष्टीचे रक्षण करण्याकरितां ईश्वरानें नेमिलें आहे असें चपूंकारानें वर्णन केलें आहे. शहाजी राज्यांच्या पराक्रमा मुळें विजापूर बादशहाचे दरबारांत त्यांचें प्रस्थ बेसुमार वाढलें होतें. विजा पूरचे बादशहास शहाजी राजे यांनीं शके १५७८ त पाठविलेल्या पत्रांतील

भाषा व शहाजी राजे यांनीं त्या पत्रांत बादशहास दिलेली धमकावणी याव- रून हि चंपूकारानें शहाजी महाराजांच्या पराक्रमाच्या वर्णनांत कोणत्या हि प्रकारची अतिशयोक्ति केल्याचा संशय घेण्यास जागा नाहीं. आतां पावेतों केलेल्या विवेचनावरून शहाजी राजे यांचे ठायीं महत् पराक्रम, मानमान्यता व मुलुखप्राप्ति यांचा हव्यास या शिवाय काहीं गुण नव्हते असें विधान करण्याची प्रवृत्ति होण्याचा संभव आहे. परंतु याच ग्रंथांत वर्णन केलेली शहाजी राजांच्या चरित्राची जी दुसरी बाजू आहे ती हि त्यांच्या ध्येयाचें स्वरूप निश्चित करण्यास्तव विचारांत घेणें जरूर आहे. महाराष्ट्रांतील ऐति- हासिक पुरुषांच्या मुद्रांचें प्रदर्शन या आमच्या निबंधांत " प्रतिपच्चंद्रलेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता । शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते ॥ या शिवाजी महाराजांच्या मुद्रेविषयीं केलेल्या चर्चेंत शहाजी राजांच्या चरित्राची दुसरी बाजू मांडतांना आम्ही जे मुद्दे नमूद केले आहेत त्या मुद्यास बळकटी आणणारी राधामाधव विलास चंपू ग्रंथांत उपलब्ध झालेली शहाजी राजा- विषईची नवी माहिती येथें नमूद करून याच प्रश्नाची पुनर्चर्चा या ठिकाणीं करण्याचें आम्हीं योजिलें आहे. देवगिरीच्या यादवांची सत्ता महाराष्ट्रांत लयास जाऊन शिवाजी महाराजांचा उदय होई तों पर्यंत जो काळ गेला त्या काळांतील महाराष्ट्राच्या ठाणें कोंकण भागांतील महाराष्ट्रीय समाजाची स्थिति दर्शविणाऱ्या " ठाणें कोंकण प्रांताची बखर " या नांवाच्या एका पुरातन ग्रंथांतील उतारा पुढें आम्हीं दिला आहे. त्या उताऱ्यावरून त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजावर धार्मिक दृष्ट्या मुसलमानी सत्तेचा परिणाम कोणत्या प्रकारचा झाला होता याचें उत्तम चित्र महाराष्ट्रांतील एका सामान्य प्रतीच्या व्यक्तीनें काढलेलें दिसून येत आहे. हें चित्र लक्षांत घेतलें असतां त्या काळच्या एका सामान्य प्रतीच्या महाराष्ट्रीयास मुसलमानी सत्तेचे जे दुष्परिणाम महाराष्ट्रीय समाजावर झालेले दिसून आले ते शहाजी महाराजा सारख्या राजकारणी महाराष्ट्रीय पुढाऱ्याचे सहजच लक्षांत आले असले पाहिजेत असें अनुमान करणें सयुक्तिक होईल हें उघड आहे. राधा माधव विलास चंपूमध्यें शहाजी राजे यांचें पुढें दिलेलें जें वर्णन केलें आहे त्यावरून वरील अनुमान बरोबर असल्याचें दिसून येतें. राधा माधव विलास चंपूमध्यें चंपूकारानें शहाजी महाराजां- विषई खालील उद्गार काढले आहेत. ( पान २६३ )

**राजाहो नृपशाहजी यवन करावे बाद ।**
**हेजिब विधिसि बोलिला ऐसा द्विज संवाद ॥**

यथा

**व्यापिली हे अवनी यवनीं मुण वैदिकवाक सिणोन निजेली ।**
**यावरी साहेबकीर्त्तिची मूर्तिच आपली हे जीव हजिब केली ॥**
**शाहजी राजे व बादशाह आशि वृत्ति करूं विधिसंनिधि गेली ।**
**पत्र शशांक सिका वरी अंक करून जगत्रयि दाखउं नेली ॥ ७३ ॥**

मूर्च्छित झालेली वैदिक वाणी शहाजी राजांच्या परक्रमामुळें शुद्धीवर आली. व तिनें ब्रह्मदेवाकडून भरतखंडाची वाटणी शहाजी व शहाजहान यांचेमध्यें करवून घेतली असा भाव कवीनें वरील कवितेत व्यक्त केला आहे. शिवाजी महाराजास राज्याभिषेक करणारे वेदमूर्ती गागाभट्ट यानीं शिवराज प्रशस्तिमध्यें शहाजीराजे यांचे "क्षत्रधर्मस्य नवावतार" असें वर्णन केलें आहे. ह्या वर्णना वरूनहि शहाजी राजे यांची श्रुति स्मृत्युक्त धर्माचे अभिमानी व आधार स्तंभ अशी त्या काळीं सर्व भरत खंडांत ख्याती झालेली होती हें उघड आहे. चंपुकारानें शहाजी राजे यांचें केलेलें हे वर्णन लक्षांत घेतां मुसलमानी सत्तेचें महाराष्ट्रांतून उन्मूलन केल्याखेरीज वैदिक धर्माची स्थापना करणें शक्य नाही ही गोष्ट शहाजीराजे यांचे लक्षांत आली नसेल अशी कल्पना करणें निवळ धाष्टर्याचें होईल. येथ पावेतों शहाजी राजांच्या चरित्रावर अलिकडे उपलब्ध झालेली नवीन प्रकाश पाडणारी माहिती आह्मी थोडक्यांत दिली आहे. आतां ह्या माहितीच्या दृष्टीनें स्वराज्य स्थापनेच्या मसलतीशीं शहाजी राजे यांचा संबंध कितपत पोंहोचतो याची चर्चा करणें ओघानेंच प्राप्त होतें.

मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांच्या १५ व्या खंडामध्यें चाकणच्या ब्रह्मयांची जों पत्रें छापिलीं आहेत, त्यां पैकीं ले. ४३७ हें पत्र शके १५६१ आश्विन शु. ८ चें आहे. या पत्रावरून शिवाजी महाराजांस बारावें वर्ष लागण्यापूर्वीच चाकण परगणा त्यांनीं संपादन केला होता असें सिद्ध होत आहे. या पत्राच्या मित्तीच्या पूर्वीचें पत्र ज्यांत शिवाजी महाराजांनीं कोणताहि मुलूख संपादन केल्याची बाब नमूद केली गेली आहे असें अद्याप पावेतों उपलब्ध झालेलें नाहीं. अर्थात् स्वराज्य स्थापनेच्या मसलतीचा प्रारंभ वरील पत्राच्या मित्तीच्या पूर्वी झाला असला पाहिजे हें उघड आहे. मल्हाररामरावकृत शिवाजी महाराजांच्या सप्त प्रकरणात्मक चरित्रांत स्वराज्य स्थापनेच्या मसलतीचें साल शके १५६१ हें दिलें असून मल्हार रामरावनें त्या मसलती संबंधीं थोडी बहुत माहिती त्यांत दिली आहे,चाकणच्या ब्रह्मयांच्या वरील पत्राचें योगानें

सप्तप्रकरणात्मक चरित्रांतील स्वराज्यस्थापनेच्या मसलती संबंधाची बखरींतील हकीकत पूर्णपणें विश्वसनीय ठरत आहे. या स्वराज्यस्थापनेच्या मसलतीचे वेळीं शिवाजी महाराजांचे वयास बारा वर्षे हि पुरीं झालेलीं नव्हतीं, हें वर दर्शविलेंच आहे. एक लोकोत्तर पुरुष या दृष्टीनें विचार केला असतां एवढ्या अल्प वयांत स्वराज्यस्थापनेची कल्पना शिवाजी महाराजांचे मनांत उद्भूत होणें असंभवनीय होतें असें ह्मणतां येणार नाहीं. परंतु ही कल्पना अस्तित्वांत येतांच ती तात्काल अमलांत आणण्याचे बाबतींत दिसून येणारी दक्षता, त्या काळीं महाराष्ट्राच्या राजकीय परिस्थितींत झालेलें महत्त्वाचें स्थित्यंतर, शहाजी राजे यांस विजापूर बादशाहाचे दरबारीं प्राप्त झालेलें वर्चस्व इत्यादि बाबी ध्यानांत घेतल्या असतां स्वराज्यस्थापनेच्या मसलतीशीं शहाजी राजे यांचा संबंध निःसंशय असला पाहिजे असें अनुमान काढण्याकडे कोणाच्या हि मनाचा कल झुकल्यावांचून रहाणार नाही. या प्रश्नाची या दृष्टीनें चर्चा करण्याचे हेतूनें शहाजी राजे यांच्या चरित्रांतील कांहीं ठळक बाबी व त्यांच्या मित्या यांचें दिग्दर्शन करणें जरूर आहे. शके १५५८ सालांत ह्मणजे इ. स. १६३६ त निजामशाहीचा अंत होऊन त्याच सालीं शहाजी राजे यांनीं विजापूरचे बादशाहाची सरदारकी पत्करली. अवघ्या एक वर्षांनंतर म्हणजे १५५९ सालीं शहाजी राजानीं जिजाबाई साहेब व शिवाजी महाराज यांची दादोजी कोंडदेव व त्यांच्या पदरीं असलेले दुसरे नामांकित मुत्सद्दी यांच्या समवेत त्यांस जहागीर मिळालेल्या पुणें व सुपें प्रांताकडे रवानगी केली. विजापूरचे बादशहाचे दरबारांत प्रवेश झाल्यानंतर थोडक्याच काळांत शहाजी राजे यांनीं कर्नाटक प्रांतांतील बराच मुलूख काबीज करून विजापूरच्या राजसत्तेचे क्षेत्र बरेंच विस्तृत केलें. स्वपराक्रमानें काबीज केलेल्या मुलखां पैकीं बराच भाग शहाजी राजे यांनीं विजापूरचे बादशाकडून जहागिरी दाखल मिळविला. वरील सर्व गोष्टी ध्यानांत घेतल्या असतां त्या काळच्या दक्षिण हिंदुस्थानच्या राजकीय परिस्थितीचें चित्र खालीं वर्णन केलेल्या स्वरूपाचें आपल्या पुढें उभें राहतें. दक्षिणेंतील पांच मुसलमानी बादशाह्यां पैकीं प्रमुख अशा दोन, एक निजामशाही व दुसरी आदिलशाही त्यां पैकीं निजामशाहीस स्वराज्याच्या मसलतीचे सुरवातीपूर्वीच कायमची मूठमाती मिळाली होती. राहता राहिली आदिलशाही. तिजला उत्तरेकडील मोगलांचा शह लागला होता. अशा प्रकारच्या बिकट परिस्थितींत आदिलशाही राजसत्ता सापडली असतां शहाजी सारख्या प्रबल सरदारास आदिलशाहीचीं राजसूत्रें हालविणाऱ्या मुत्सद्यांनीं त्या सत्तेस बळकटी आणून

मोगलास वचक बसावा या हेतूस्तव आपल्या पदरीं ठेविलें. आदिलशाही दरबारांत प्रवेश झाल्यापासून शहाजी राजे यांनीं आदिलशाहीच्या दक्षिणेकडील कर्नाटक प्रांतांतील शत्रूंस जमीनदोस्त करण्याचा धूमधडाका लावला व थोड्याच काळांत दक्षिणेकडील बहुतेक सर्व प्रदेश आदिलशाही मुलखांत सामील करून घेऊन त्यां पैकीं बराचसा भाग त्यांनीं स्वतःस जहागिर दाखल मिळविला. थोडक्यांत वर्णन करावयाचें म्हणजे उत्तरेकडे प्रबळ अशी मोंगलाई सत्ता व दक्षिणेकडे खिळखिळी झालेली व जिचें युद्धसामर्थ्य शहाजीराजे यांचें हातीं होते अशी विजापूरची आदिलशाही, या प्रकारचें त्या काळचे दक्षिण हिंदुस्थानच्या राजकीय परिस्थितीचें चित्र आपल्या डोळ्यासमोर उभें राहतें. वरील प्रकारच्या राजकीय परिस्थितींत शहाजी राजे यांनीं पुणें व सुपें परगण्यांतील त्यांच्या जहागिरीची देखरेख करण्याकरितां म्हणून शिवाजी राजे यांस त्यांचे बरोबर दादोजी कोंडदेव, शंकराजी निळकंठ, बाळकृष्ण मुजूमदार, सोनोपंत व रघुनाथ बल्लाळ कोरडे इत्यादि हुशार व राजकारणी पुरुषांस बरोबर देऊन वर दर्शविल्याप्रमाणें शके १५५९ सालीं रवाना केलें. या सुमारास शिवाजी महाराज आठ अगर नऊ वर्षांच्या उमरीचे होते. शिवाजी महाराजाची वृत्ति कशा स्वरूपाची होती व त्यांच्या आकांक्षा कोणत्या स्वरूपाच्या होत्या याची कल्पना शहाजी राजे यांस शिवाजी महाराज विजापूर येथें त्यांचे संनिध राहत असतां पूर्णपणें झालेली होती. शिवाजी राजे यांचा स्वभाव व आकांक्षा यांना योग्य व अनुकूल अशी भूमि त्या विवक्षित काळीं शहाजी राजांच्या पुणें व सुप्या कडील जहागिरीचा प्रदेश असल्याचे शहाजीराजे यास वाटल्यावरून यानीं शिवाजी महाराजांची राहण्याची योजना त्याकाळीं त्या प्रदेशांत केली असावी असा तर्क करणें अयुक्तिक होणार नाहीं. शहाजीराजांच्या पुणें व सुप्याकडील जहागिरीच्या प्रदेशाची राजकिय परिस्थिति त्याच्या पूर्ववयांतील काळापेक्षा वरील विवक्षित काळीं म्हणजे शके १५५९ सालीं भिन्न स्वरूपाची बनली होती. शहाजी राजे यांच्या पूर्ववयांत निजामशाहीची सत्ता शाबूत स्थितींत असतां पुणें व सुपें हा प्रदेश स्वराज्य स्थापनेच्या दृष्टीनें निजामशाहीसारख्या प्रबल राजसत्तेच्या राजधानीच्या शहरासंनिध असल्याकारणानें सुरक्षित असा नव्हता. परंतु निजामशाही बुडाल्यानंतर या परिस्थितींत एकदम मोठें स्थित्यंतर घडून आलें. निजामशाही लयास गेल्याकारणानें पुणें व सुप्याकडील शहाजीराजे यांच्या जहागिरीच्या प्रदेशास शहाजी राजे यांच्या पूर्ववयांत नसलेला सुरक्षितपणा प्राप्त झाला. निजामशाही बुडाल्या

नंतर उत्तरेकडील मोंगली सत्तेचें केंद्रस्थान जें दिल्ली शहर तें पुणें व सुपें या प्रदेशापासून फारच लांब असल्याकारणानें या प्रदेशावर मोंगलांचा वचक राहणें अशक्य होतें. दक्षिणेकडील आदिलशाही सत्तेचें केंद्रस्थान जें विजापूर शहर तें हि पुणें व सुपें या प्रदेशापासून लांब असल्याकारणानें आदिलशाही-चा बचक या प्रदेशावर निजामशाही अस्तित्वांत असती तर तिच्या इतपत बसण्या सारखा नव्हता. शिवाय पुणें व सुप्याकडील शहाजी राजे यांच्या जहागिरीचा सर्व प्रदेश सह्याद्रि पर्वताच्या रांगास लागून असल्यामुळें शत्रूचे स्वारीपासून अल्प प्रयासानें रक्षण करण्यासारखा असा होता. या सर्व बाबीमुळें स्वराज्य स्थापनेच्या दृष्टीनें शहाजी राजे यांच्या पुणें व सुप्याकडील जहागिरीच्या प्रदेशास आदिलशाईच्या पडत्या काळांत विशेष प्रकारची अनुकूलता प्राप्त झाली होती हें उघड होत आहे. या शिवाय विजापूरची आदिलशाही सत्ता याच सुमारास खिळखिळी होऊन तिचीं सर्व सूत्रें शहाजी राजे यांच्या हातांत आल्यामुळें शहाजी राजे यांच्या पूर्ववयांत धर्मरक्षणार्थ स्वराज्यस्थापना करण्याचें कार्य, त्यांचे मनांत येऊन हि तें घडवून आणणें योग्य परिस्थितीचे अभावीं त्यांना दुष्कर भासलें, तें कार्य राजकीय परिस्थिति बदलून तिजला स्वराज्य स्थापनेच्या सिद्धीस अनुकूल असें रूप प्राप्त होतांच पुणें व सुप्याकडील जहागिरीच्या प्रदेशांत शिवाजीमहाराजांच्या करवी घढवून आणणें सुकर वाटल्यावरून त्या प्रदेशांत शिवाजीमहाराजांना पाठविण्याची योजना शहाजी राजे यांनीं मुद्दाम घडवून आणली असली पाहिजे असें मानण्याकडे मनाची प्रवृत्ति होते. शहाजीराजे यांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें व शिवाजीमहाराजांनीं सुरुं केलेल्या स्वराज्य स्थापनेच्या महत् कार्याशीं त्यांचा संबंध कितपत होता या प्रश्नाचा विचार करतांना वर नमूद केलेल्या बाबींकडे दुर्लक्ष करून चालावयाचें नाहीं. वरीलप्रमाणें शिवाजीमहाराजांची पुणें प्रांतीं शहाजीराजांनीं रवानगी केल्यानंतर लगेच दोन तीन वर्षांचे आंत त्याच्या वयास अवघीं बारा वर्षें पुरीं झालीं नसतील तोंच शके १५६२ त चाकण परगणा शिवाजी राजे यांनीं काबीज केल्याचा वर उल्लेख केलाच आहे. पुणें प्रांतीं येऊन अवघीं दोन तीन वर्षें झालीं नाहींत तोंच वरील प्रकारची महत्वाची कामगिरी शहाजी राजे यांच्या सल्ल्यावाचून घडली असेल असें अनुमान करणें जरा बिकट आहे. बखरकारांनीं पुणें व सुपें प्रांताकडे शिवाजी महाराजांच्या रवानगीची जी हकीकत दिली आहे ती लक्षांत

घेतां तीवरून असें दिसून येतें कीं, शहाजी राजे यांचे पदरीं त्यांच्या अंश-शाचीं वर नमूद केलेलीं कर्तबगार माणसें होतीं तीं त्यांनीं शिवाजी महाराजांबरोबर दिलीं होतीं. हीं सर्व माणसें शिवाजी महाराजांनीं सुरू केलेल्या कार्यात सामील होतीं. दादोजी कोंडदेव शिवाजी महाराजांनीं सुरू केलेल्या कार्याच्या विरुद्ध होते असा जो प्रचालित सर्वसाधारण समज आहे तो बरोबर नाहीं असें मानण्यास आधार आहे. शिवाजी महाराजांनीं दादोजी कोंडदेव यांचा सल्ला स्वराज्य स्थापनेच्या बाबतींत विचारला असतां त्यांनीं खालीलप्रमाणें शिवाजीस उत्तर दिल्याचें बखरींत वर्णिलें आहे.

"सर्व पृथ्वी यवनांनीं पादाक्रांत केली, स्थलें, किल्ले, जागा, फौज त्यांची भरली. या करण्यास आपणांस मातबर स्थळें असावीं, हिंदुराजे व हिंदुफौजा साह्यकर्त्या असाव्या, आपण परमश्रम साहसांनीं दुष्कर्म करावें, त्या समयीं ईश्वराची अनुकूलता व सिद्धपुरुषांचा आशीर्वाद असतां अशा गोष्टी घडतील." या प्रमाणें दादोजी कोंडदेव यांनीं सांगितलें असतां महाराजांनीं चित्तांत मसलत करण्याचे गुण सांगितले इतकें मात्र घेऊन दोष ठेविले नाहींत." वरील प्रमाणें बखरींत दिलेल्या वर्णनावरून स्वराज्य स्थापनेच्या कार्यास कोणत्या प्रकारची सामुग्री पाहिजे हें अप्रत्यक्ष रितीनें शिवाजी महाराजांस दादोजी कोंडदेव यांनीं सुचविलें हें उघड होत आहे. या बाबतींत दादोजी कोंडदेव यांची मनोरचना कोणत्या प्रकारची होती या संबंधीं अनुमान काढण्यास उपयुक्त अशा अलीकडे उपलब्ध झालेल्या पुराव्याचा हि प्रस्तुत स्थळीं विचार करणें जरूर आहे. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १५ लेखांक २६८ हा रोहिड खोरें गुप्ते—देशपांडे यांच्या दप्तरांपैकीं एक लेख आहे. हा लेख अस्सल नसून अस्सल लेखाची नक्कल आहे. तथापि एका पुरातन ऐतिहासिक घराण्याच्या दप्तरांपैकीं एक पुरातन लेख या नात्यानें त्यांतील मजकूर विश्वसनीय मानणें गैर वाजवी होणार नाहीं. या लेखावरून दादोजी कोंडदेवाचे मार्फतीनें दादाजी नरस प्रभु याचेपाशीं शिवाजी राजे यांनीं विजापूरचे बादशहाचे विरुद्ध कारस्थान रचलें होतें असें दिसून येत आहे. दादोजी कोंडदेवानें शिवाजी महाराजांचा पालक व शहाजीराजे यांचा विश्वासू कारभारी या नात्यानें शिवाजी महाराजांनीं सुरू केलेल्या स्वराज्यस्थापनेच्या कार्याबद्दल बाह्यात्कारीं नापसंती दर्शविणें यास भाग पडलें असावें असं बखरींतील हकीकत आणि पंधराव्या

खंडांतील वरील लेख यांचे वरून अनुमान काढणें प्राप्त होतें. शहाजी राजे यांनीं शिवाजी महाराजांबरोबर पाठविलेल्या पुरुषांच्या मनोरचनेचें जें दिग्दर्शन सप्तप्रकरणात्मक चरित्रांत करण्यात आलें आहे त्यावरून स्वराज्य स्थापनेशीं शहाजी राजे यांचा प्रथम पासूनच संबंध होता असें दिसून येतें. आतां दुसऱ्या एका महत्वाच्या मुद्याच्या विवेचनाकडे वळूं. शके १५६१ सालापासून शहाजी राजे यांस विजापूरच्या बादशहानें शके १५७० सालीं कैदेंत टाकी तों पावेतो ज्या बादशहाचे दरबारीं शहाजी राजे एक प्रमुख सरदार होते त्या बादशहाचे मुलखाचे लचके तोडण्याचा क्रम शिवाजी महाराजांनीं चालविला होता. शहाजी राजांचा शिवाजी महाराजांनीं सुरु केलेल्या स्वराज्यस्थापनेच्या महत्कार्याशीं जर खरोखरच कांहीं संबंध नसता व ते त्या कल्पनेस प्रतिकूल असते तर शिवाजी महाराजाचा बंदोबस्त शहाजी राजे यांचे करवीं करणें विजापूरचे बादशहास यत्किंचित् हि कठीण पडलें नसतें, परंतु "खाल्लें तर बाधतें आणि टाकलें तर शापतें" या ह्मणीप्रमाणें त्याकाळीं विजापूरचे बादशहाची स्थिती झाली होती. बादशाही दरबारांत शहाजी महाराजाचें सामर्थ्य इतकें जबरदस्त वाढलें होते कीं, त्याचा मुलगा शिवाजी बंडखोर निघाला ह्या सबबीवर त्यांची सरदारकी हिरावून घेणें शक्य नव्हतें. शिवाय बादशाहीचे शहाजी राजे हे आधारस्तंभ असल्याकारणानें त्यांस दरबारांतून हांकून देणें ह्मणजे स्वतःचाच घात करून घेण्यासारखें होतें. बरें, शहाजी राजे यांस दरबारांतून काढून न देतां कायम ठेवावें तर बादशाही मुलखाचे लचके तोडण्याची मुभा शिवाजी महाराजांस दिल्यासारखें झालें होतें. अशा पेंचांत विजापूरचा बादशहा सापडल्या कारणानें शहाजीस दरबारांतून हाकून देण्याचें धैर्य त्याचे हातून झालें नाहीं व बादशाही मुलखाचे लचके तोडण्याचें शिवाजी महाराजांनीं चालविलेलें कार्य त्यांस बंद करितां आलें नाहीं. वरील सर्व गोष्टींचा विचार करितां विजापूरचे बादशहाचे दरबारांत शहाजी राजे यांचें जें वर्चस्व होतें त्याचा त्यांनीं पूर्ण फायदा घेऊन शिवाजी राजे यांनीं चालविलेल्या स्वराज्य स्थापनेच्या कार्यास अप्रत्यक्ष रीतीनें उत्तम प्रकारची मदत केली असली पाहिजे असें अनुमान काढणें प्राप्त होतें. विजापूरचे बादशहाविरुद्ध शिवाजी महाराजांनीं चालविलेल्या खटपटी अखेर इतक्या विकोपास गेल्या कीं, शहाजीराजे यांस त्याचे पायीं कैद भोगावी लागून त्यांच्या प्राणावर हि संकट ओढवलें. या संकटांतून शहाजी राजे यांची मुक्तता

होतांच ज्या मुलाच्या अधिकपणामुळें त्यांच्या जीवावर संकट ओढवलें गेलें त्या मुलाच्या भेटीकरितां शहाजी राजे मुद्दाम कर्नाटक प्रांतांतून पुणें प्रांतीं आल्याचा सप्त प्रकर्णात्मक चरित्रांत उल्लेख आहे. बाप लेकांच्या भेटीची सप्त प्रकरणात्मक चरित्रांत जी हकीकत दिली आहे त्या हकीकतीवरून शिवाजी महाराजाचे कामगिरीबद्दल शहाजी राजे यांनीं यत्किंचित् हि नापसंती न दर्शवितां उलट त्यानीं केलेल्या कार्याबद्दल शहाजी राजे यांनों संतोष दर्शविल्याचा बखरींत उल्लेख आहे. शिवाजी महाराजांनीं चालविलेल्या कार्याबद्दल जर शहाजी राजे यांची खरोखर पसंती नसती व त्या कार्याशीं त्यांचा कांहीं संबंध नसता तर शहाजी राजे व शिवाजी महाराज यांच्या प्रेमाच्या भेटी होणें दुरापास्त होतें. परंतु बखरीमध्यें शाहाजी राजे व शिवाजी महाराज यांच्या प्रेमाच्या भेटी झाल्याचें नमूद आहे, इतकेंच नाहीं प'तु शिवाजी महाराज यांनीं सुरु केलेल्या स्वराज्यस्थापनेच्या कार्यांत त्यांची पूर्ण सल्लामसलत व अप्रत्यक्ष मदत होती असें सप्तप्रकरणात्मक चरित्रांतील खालील उल्लेखावरून सिद्ध होत आहे.

"आणि श्री जेजुरीचे देवास शहाजी महाराजांनीं नवस केला होता जे शिवाजी महाराज यांनीं हेतु धरिला कीं, राज्य साध्य करून देव गोब्राह्मण यांची पीडा परिहार करून धर्मस्थापना करावी तो सिद्धीस निर्विघ्न जावा म्हणजे लक्ष रुपयांचें सोनें घेऊन सोन्याच्या मूर्ति करून पाठवूं. याप्रमाणें तेथें कर्नाटकी कारागर याजपासून चांगल्या मूर्ति तयार करून पाठविल्या."

वरील उल्लेखावरून शिवाजी महाराजांनीं देव गोब्राह्मण यांची पीडा परिहार करून धर्मस्थापनेस्तव स्वराज्य स्थापना करण्याचें जें ध्येय ठरविलें होतें तें शहाजी राजे यांस अवगत असून तत्सिध्यर्थ त्यांनीं दैवी कृपा संपादण्याचा प्रयत्न केला होता असें सिद्ध होत आहे. शहाजी राजे यांच्या चारित्र्याच्या दुसऱ्या बाजूच्या विवेचनाच्या दृष्टीनें वरील पुरावा फार महत्त्वाचा आहे. देव गोब्राह्मण पीडा परिहार आणि धर्मस्थापना हीं कार्यें सिद्धीस जावीं अशी शहाजीराजे यांची फार आतुरता होती असें वरील उल्लेखावरून शाबीत होत आहे.

आतां शहाजी राजे यांच्या स्वराज्य स्थापनेच्या मसलतीच्या संबंधाच्याबाबतींत आणिक एका महत्वाच्या मुद्याची ह्या ठिकाणीं चर्चा करणें जरूर आहे.

चाकणच्या ब्रम्ह्यांच्या ज्या पत्राचा वर उल्लेख केला आहे त्या पत्रांवर " प्रतिपत्चंद्रलेखेव वर्धिष्णुर्वेविश्ववंदिता शाहाः सूनोः मुद्रा भद्राय राजते " अशी मुद्रा आहे. "प्रतिपदेच्या चंद्राप्रमाणें वाढणारी शहाजीचा मुलगा शिवाजी याची सर्व जगास वंद्य अशी ही मुद्रा शोभते. " असा ह्या मुद्रेंतील मजकुराचा अर्थ आहे. ही मुद्रा तींतील मजकुरानें व्यक्त केल्या जाणाऱ्या कल्पनेची द्योतक आहे. हें पत्र शके १५६१ सालचे आहे. ह्मणजे अर्थात् वरील मुद्रा ज्या कल्पनेची द्योतक आहे ती कल्पना शके १५६१ सालापूर्वी उद्भूत झाली होती हें उघड आहे. ह्या मुद्रेंत एक प्रकारचें भविष्य कथन केल्याचा भास होण्याचा संभव आहे. परंतु ह्या मुद्रेच्या सुमाराची महाराष्ट्रांतील राजकिय परिस्थिती लक्षांत घेतली असतां त्या परिस्थितीचें दृष्टीनें प्रतिपदेच्या चंद्राप्रमाणें वाढणारी व सर्व विश्वास वंद्य होणारी अशीं जीं विशेषणें बालशिवाजीच्या मुद्रेस लावण्यात आलीं आहेत तो निवळ कल्पना सृष्टींत भराऱ्या मारण्यापैकीं भाग नसून त्या काळच्या माहाराष्ट्राच्या राजकीय परिस्थतीचें पूर्णपणें आकलन करून वरील कल्पना कालांतरानें सिद्धीस नेण्याची धमक व भरंवसा ज्या व्यक्तीस वाटत असावा अश्या व्यक्तीनें ती निर्माण केली असली पाहिजे असें म्हणावें लागतें. अशी व्यक्ति शहाजी राजे यांचे खेरीज त्या काळीं महाराष्ट्रांत दुसरी कोणी हि नव्हती हे सांगावयास पाहिजे असें नाहीं. ही मुद्रा प्रचारांत आली ते वेळीं शिवाजी महाराज अगदीं अल्प वयी होते. असें स्थितींत ह्या मुद्रेंत व्यक्त केलेल्या कल्पनेचा उगम शिवाजी महाराजापासून झाला असण्याचा संभव कितपत आहे हा प्रश्न आहे. शिवाजी महाराजांपासून त्यांच्या इतक्या अल्प वयांत वरील मुद्रेतील कल्पनेचा उगम होणें अशक्य कोटींतील गोष्ट आहे असें नाहीं. परंतु आज पावेतों इतिहासप्रसिद्ध अश्या असामान्य थोर विभूतींच्या चरित्रांचा विचार केला असतां इतक्या अल्प वयांत वरील मुद्रेंत व्यक्त करण्यात आलेल्या कल्पनेच्या निर्मितीस लागणारी बुद्धीची प्रगल्भता असल्या व्यक्तिच्या ठाई असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. असे स्थितींत ही मुद्रा निर्माण होण्यापूर्वी स्वराज्य स्थापनेची मसलत शहाजी राजे व त्यांच्या पदरचे मुत्सद्दी यांच्या विचारें अमलांत आणण्याचे नक्की ठरून ती मसलत शिवाजी राजे यांचे करवीं सिद्धीस न्यावयाची असें ठरलें असलें पाहिजे व ह्या मसलतीच्या प्राणप्रतिष्ठेची द्योतक म्हणून वरील मुद्रा बालशिवाजी महाराजांच्या पत्रावर करण्याचा प्रघात सुरू झाला असला पाहिजे असें अनुमान निघतें. वरील मुद्रेसंबंधीं चर्चा येथे पुरी करून आम्ही आतां दुसऱ्या एका मुद्याकडे वळतों.

आतां पावेतों आम्ही शहाजी राजे यांच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयींच्या अनुमानिक पुराव्या विषयींची चर्चा केली आहे. ह्यापुढें वरील पुराव्या पेक्षांहि जास्त बळकट असा दुसरा कांहीं पुरावा उपलब्ध झाला आहे, त्या पुराव्यावरून कोणती बाब सिद्ध होते याचें दिग्दर्शन करून शहाजी राजे यांच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयींची चर्चा पुरी करूं. महाराष्ट्रांत स्वराज्य स्थापनेची मसलत ज्या काळीं सुरु करण्यांत आली त्यापूर्वी अनेक वर्षांपासून सर्व महाराष्ट्र देशभर अनेक देशमुख व देशपांडे यांचीं घराणीं ठिकठिकाणीं अस्तित्वांत होतीं. महाराष्ट्रांतील जनतेवर या घराण्यांची बरीच सत्ता व वजन असे. प्रचलित राजसत्ता धारण करणाऱ्या अधिकारी वर्गाचे खालोखाल महाराष्ट्रीय जनतेवर या घराण्यांच्या पुढाऱ्यांचे वजन व अधिकार चालत असे. असे स्थितींत कोणत्याहि नूतनराजसत्तास्थापनेच्छु व्यक्तीस स्वराज्य स्थापनेचें कार्य यशस्वी करण्यास्तव वरील घराण्याचे पुढाऱ्यांस आपले बाजूस आणणें अगर राजीखुषीनें ते आपल्या बाजूस न आल्यास त्यांचा नायनाट करणें भाग पडत असे. या दृष्टीनें स्वराज्य स्थापनेच्या सिद्ध्यर्थ शिवाजी महाराजांनीं सुरू केलेल्या अनेक खटपटी पैकीं त्या काळच्या देशमुख व देशपाडे घराण्यांच्या पुढाऱ्यांस आपल्या बाजूस वळवून घेणें अगर ते पुढारी राजीखुषीनें त्यांचे बाजूस न आल्यास त्यांच्याशीं विरोध करून शत्रुप्रमाणें त्यांचा नायनाट करण्याचा प्रयत्न करणें हा एक महत्त्वाचा भाग होता. शिवाजी महाराजांचा ज्या वरील प्रकारच्या घराण्यांशीं संबंध आला त्यांपैकीं मसूरचे जगदळे देशमुख हें एक घराणें होय. म. इ. सा. १५ व्या खंडामध्यें या घराण्याचें कागदपत्र छापिले आहेत. या कागदपत्रांवरून प्रथम पासून शेवट पावेतो या घराण्यांशीं शिवाजी महाराजांचें शत्रुत्वाचें नातें असल्याचें दिसून येतें. शिवाजी महाराजांचा या घराण्याशीं संबंध येण्यापूर्वी शहाजी राजे यांचा या घराण्याशीं संबंध असल्याचें व या घराण्यांशीं वागण्याचे शहाजी राजे यांचें जें धोरण होतें तेंच धोरण शिवाजी महाराजांनीं पुढें सुरू ठेविल्याचें दिसून येतें. या दोन घराण्यामध्यें कऱ्हाडच्या व मसुरच्या देशमुखीबद्दल वाद होता. आदिलशाही राजसत्तेची राजधानी जें विजापूर शहर त्या शहराशीं पुणें, सातारा या प्रांतास सोइस्कर व अगदीं नजीकचा असा दळण वळणाचा मार्ग कऱ्हाडच्या व मसूरच्या देशमुखी वतन गांवावरून होता. या कारणामुळे कऱ्हाडच्या व मसुरच्या देशमुखी वतनांत समाविष्ट होण्याऱ्या गांवावर ताबा असणें फार

महत्वाचें होतें. कऱ्हाडचे व मसुरचे देशमुखी वतन साध्य करण्याच्या खटपटी शहाजी राजे यांनीं स्वराज्याच्या मसलतीचे सुमारास व त्यापूर्वी स्वसत्तेच्या बळकटीस्तव कोणत्या प्रकारच्या केल्या या बद्दलचे १५ व्या खंडांत जे उल्लेख आले आहेत ते फार महत्त्वाचे असल्या कारणानें आम्ही खालीं देतों.

" या उपरी निजामशाहींतून शाहाजी राजे भोंसले हे विजापुरास आले. पादशाहानीं मनसफ दिली. ते वख्तीं यादवांचे भाऊबंद शाहाजी राजाकडे चाकर होते. त्यांनीं शाहाजी राजास मिळोन देशमुखीचा करिना सांगितला जे जगदळयाच्या घरामध्यें कोणी नाहीं. जगदळयाचें घर मोडिलें आहे. कऱ्हाडची देशमुखी आपल्याकडे केली पाहिजे, आमचा दावा आहे. ऐसें सांगितलें. मग शाहाजी राजांनीं पादशाहास अर्ज करून दौलतेचे भरीस देशमुखी कऱ्हाडची मागोन घेतली. मग आपला आजा नरसोजी हा मसूर परगण्याची देशमुखी व कसब्याची पटेलगी आपला वडील करित असतां शाहाजी राजे भोसले यांस यादव मिळोन देशमुखी कऱ्हाडची शाहाजी राजाकडे केली. हें वर्तमान ऐकोन कर्नाटकामध्यें बंगळूरास आपला आजा नरसोजी जगदळा गेला. तेथें शाहाजी राजाची भेटी घेतली.त्यास कऱ्हाडीचे देशमुखीची हकीकत सांगितली. ते वख्तीं शाहाजीराजे व जाधव यांनीं विचार करून दगा देऊन आपला आजा नरसोजी जगदळा मारिला. आपला बाप व आपला चुलता होता. या उपरी शाहाजी राजे यांनीं पिसळे म्हणून एका मऱ्हाठे चाकरीस ठेविले होते. त्यास लावून देऊन मोकदमीवरी दावा करविला. आणि मसूर परगणा शाहाजी राजे यांनीं जहागिर घेतली आणि मसुरीच्या कोटामध्यें आपलें ठाणें ठेविलें. ते वख्तीं पिसळयास लावून देऊन मसुरींची पाटिलकी व देशमुखी अनामत केली व दादोजी कोंडदेव शाहाजी राजाकडील सुभेदार यांस सांगून पिसळयास व आम्हांस गोत लावून दिलें. जे परगणे पाटणीचे स्थळीं खाने अजम लाडीखान हवलदार कऱ्हाडीचा व पाटणीचा एकच होता. त्यानें मसूर परगण्याचे पाटील व हक्क जवारींचें गोत व कसबे मसुरीचें बैते बलुते ऐसे मेळवून पिसळे व आपला चुलता व आपला बाप यांपाशी जमान घेऊन गोतानें निवाडा केला कीं, जगदाळे याची मसूर परगण्याची देशमुखी व कसब्याची पाटिलकी खरी असे. म्हणोन ग्वाही दिली. व कदीम भोगवट्याचे कागदपत्र फर्मान होते ते मनास आणून पिसळे खोटें केलें. तेव्हां पिसळे बोलिले कीं, आम्हांस भोंसल्यांनीं व घोरपड्यांनीं स्थळीं उभें केले. आपण भोंसल्यांचे चाकर असो, आ-

पल्यास मोकदमीसीं कांहीं संबंध नाहीं. ऐसें राजिपत्र लिहून दिलें. तेणें प्रमाणें लाडीखान हवलदारानें हक्क जवारींचें साक्षीनसीं माहाजर करून दिले. ते वख्ती देशमुखी व पाटिलकी पनाळा अमानत होती. मग आपला चुलता सुलतान महमूद पातशहा यासी जाऊन दुमाला फर्मान करून घेतले. पनाळच्या किल्लेदारास ताकीद घेतली. या उपरी भोंसल्यानीं ठाणांतील लोक काढून पिसळ्याचें नांव सारून आपला चुलता तानाजी जगदळा जिवें मारला आणि मागतीं देशमुखी शाहाजी राजांनीं आपल्याकडे घेतली. आपला बाप पाटिलकी करून होता. आपला जीव वांचवून देशमुखीचें नांव काढलें नाहीं. या उपरी भोंसल्याची जबरदस्ती देखोन आपला जीव वांचवून होते. या उपरी शाहाजी राजाचा लेक शिवाजाराजा झाला. त्यानें पुंडावा करून बादशाहाशीं बिघाड केला. ते वख्तीं आपला बाप बादशाही फौजेस मिळोन देशमुखीचा मजकूर करून देशमुखीचा हक्क घेऊं लागला. आबदुलखान हा जाऊळींत बुडविला, तेथें भोंसल्यांच्या सरदारांनीं पाळत करून वसंतगडीहून स्वारी जाऊन, तें ठाणें घेरून, आपला बाप दस्त करून वसंतगडास आणिला आणि त्याची गर्दन मारली. ते समयीं आपले नेणतेपण होतें. आपण धाकटे होता. मग आपली आई रायगडास जिजाई आवा, शिवाजी राजाची आई, तापासी गेली कीं, माझेंच वतन घेऊन आपले तीन खून केले आपले पोटीं एक मूल आहे, त्यास कौल दिला पाहिजे. ते वख्तीं शिवाजी राजे बोलले कीं, देशमुखी गोष्टी न करावी, कौलच आहे, देशमुखी गोष्ट न काढावी, ऐसें लिहिले आपले आईपासून घेतले कीं, पाटिलकी करून असावें. ऐसा कौल घेऊन मग आपले आईनें नेऊन शिवाजी राजास भेटविलें. त्यांनीं व्यंकाजी दत्तो याचे हातीं देउन, पाटिलकी दुमाला करून मसूरास पाठविलें. मसुरीची पाटिलकी करून होतों. " कऱ्हाड व मसुरच्या देशमुख वतनासंबंधींची वरील हाकीकत फार महत्त्वाची आहे.

शहाजी राजे आदिलशाही दरबारांत गेल्यानंतर त्यांनीं लागलीच पादशाहाकडून कऱ्हाडची देशमुखी सपादन केली. त्याचप्रमाणें मसूर परगणा हि त्यांनीं पादशाहाकडून जाहागीर मिळवून तेथें त्यांनीं आपलें ठाणें ठेविलें. कऱ्हाडची देशमुखी वर दर्शविल्याप्रमाणे संपादन केल्यानंतर मसूरच्या देशमुखी वतनाबद्दल शाहाजी राजे यांनीं त्यांचे हस्तकांचे मार्फतीनें जगदळयांचे बरोबर वाद उपस्थित केला. वर दर्शविलेल्या सर्व खटपटी शिवाजी महाराजाकरवीं पुणें व चाकण प्रांतांत स्वराज्य स्थापनेची मसलत सुरुं होण्यापूर्वी एक दोन

वर्षें अगोदर करण्यांत आल्या होत्या. विजापूरच्या दरबारांत प्रवेश झाल्या-नंतर शाहाजी राजे यास पुणें व सुपें यासारखे मौल्यवान प्रांत जहागिर मिळाले असतां हि कऱ्हाड व मसूर या ठिकाणच्या देशमुखी वतनासारख्या क्षुल्लक बाबी करितां त्यांनीं केलेल्या खटाटोपा वरून स्वराज्य स्थापनेच्या मसलतीस ती वतने संपादन करणें अवश्यक होते यास्तव त्यानीं तो खटाटोप केला असें अनुमान काढणें प्राप्त होतें. आतां स्वराज्यस्थापनेचा मसलतीचा उपक्रम ज्या प्रदे-शांत सुरू करण्यांत आला त्या प्रदेशां पैकीं रोहिडखोरें हा जो एक महत्त्वाचा भाग त्या भागांतील वजनदार अशा देशमुख घराण्याशीं शाहाजी राजे यानीं कोणत्या प्रकारचीं कारस्थानें केलीं होतीं, या संबंधाचा अस्सल व महत्त्वाचा पुरावा आम्ही खालीं नमूद करितों. या पुराव्यावरून स्वराज्यस्थापनेच्या मसलतीशीं शाहाजी राजे याच्या असलेल्या संबंधाचे बाबतींत आम्हीं काढलेल्या वरील अनुमानाच्या सत्यपणाविषयीं शंका घेण्यास जागा राहणार नाहीं असा आम्हांस भरंवसा वाटतो. भारत इतिहास संशोधक मंडळाच्या चतुर्थ संमे-लन वृत्तांत १५ व्या खंडांत ज्या रोहिडखोऱ्यांतील जेधे देशमुखांच्या घराण्याचें कागद पत्र छापिलें आहेत व त्याच घराण्याची एक शकावली कै. लो. बाळ गंगाधर टिळक यांनीं छापिली आहे. ही शकावली तिच्या दिलेल्या वर्णना-वरून फार जुनी असल्याचें व परंपरेनें त्या घराण्यापाशीं असल्याचें दिसून येत आहे. यास्तव तिच्या अस्सलपणाविषयीं कोणत्याहि प्रकारची शंका घेण्याचें कारण नाहीं. या शकावलींतील खालील नोंद फार महत्त्वाची असल्याकारणानें ती आम्ही जशीच्या तशीच देतों. ( भा. इ. सं. मं. च. सं. वृत्त पान १७९ )

" शके १५७१ विरोधी संवत्सर ज्येष्ठ शुध पूर्णिमा शाहाजी राजे कोंढाणास येऊन सोडिले ते समयीं कान्होजी नाईक जेधे व दादाजी कृष्ण लोहोकरे यांस सोडिले माहाराजांची व त्यांची भेटी जाली. ते समयीं महाराज बोलिले कीं, तुम्ही आम्हा मुळें बंदवानी श्रमी जालेस. याउपरी आम्ही पातशाहासी तह केला कीं, बारा गांवांतून मजुरा करून हुकूम प्रमाणें कर्नाटक प्रांतें मसलत करावी. त्यावरून बेंगरूळ प्रांत पांचा लक्ष होनाचा जाहागिर दिल्हा आहे या करितां आपणांस कर्नाटकाची मसलत करावी लागेल. तुमचें वतन मावळांत आहे. चिरंजीव राजश्री सिऊबा खेडेबारी यांस व पुणा आहेत. त्याजवळ तुम्ही जमावानसी राहावें. तुमची जबरदस्ती त्या

प्रांतें आहे, अवघे मावळचे देशमुख देखील त्यासी रुजू होऊन त्यांचे आज्ञेंत वर्तेत यैसा विचार करून जबरदस्तीने राहावें. **येकादी मोगलाईकडील फौज व इदिलशाहीकडील फौज आली तरी आपण इनाम राखावा त्यांसी लढाई करावी यैसी शफत इमान पुरस्कर बेलरोटीवर हात ठेवून घेतली** तैसेचि त्यांणींहि कान्होजी नाईकास शफत दिल्ही अणी कान्होजी नाईक व दादाजी कृष्ण यांस वस्त्र देऊन बराबर हुजऱ्या व पत्रें देऊन राजश्री सिवजी राजे यांजकडे पाठविलें." [१]

अलिकडे उपलब्ध झालेल्या शहाजी राजे यांच्या चरित्रासंबंधाच्या नूतन माहितीच्या आधारें त्यांच्या ध्येयाचें स्वरूपाविषयीं आम्ही जीं विधानें नमूद केलीं आहेत तीं बऱ्हंशीं बरोबर आहेत अशीं वरील पुराव्यावरून वाचकांची खात्री पटेल असा आम्हांस भरंवसा वाटतो. आतां पावेतों केलेल्या चर्चेचा निष्कर्ष थोडक्यांत दर्शवून आम्ही या विषयाची चर्चा येथें पुरी करितों.

१ शहाजी राजे श्रुतिस्मृत्युक्त धर्माचे पूर्ण अभिमानी असून त्यांना त्याकाळीं त्या धर्माचे आधारस्तंभ समजत असत व म्हणूनच गागाभट्टांनीं क्षत्रधर्मस्य नवावतारा: अशा प्रकारच्या विशेषणानें शिवराज प्रशस्तिमध्यें त्यांचा उल्लेख केला आहे.

२ शहाजी राजे यांच्या पूर्ववयांत दक्षिण हिंदुस्थानांतील निजामशाही व आदिलशाही सत्ता व उत्तरेकडील मोंगल बादशाही सत्ता या तिन्ही प्रबळ व जोमदार स्थितींत असल्यामुळें महाराष्ट्रांत, स्वराज्यस्थापनेस अनुकूल परिस्थिति नव्हती. यामुळें श्रुतिस्मृत्युक्त धर्माबद्दल अभिमान, महाराष्ट्रीय समाजावर मुसलमानी सत्तेच्या झालेल्या व होत असलेल्या दुष्परिणामाचें ज्ञान, अतुल पराक्रम व स्वराज्यस्थापनेस आवश्यक अशा सेनेचें स्वामित्व इत्यादि गुणांनीं शहाजी राजे संपन्न असतां स्वराज्य-स्थापनेची कल्पना त्यांचें मनांत उद्भूत झाली असून हि अनुकूल राजकीय परि-स्थितीच्या अभावीं त्यांनीं ती कल्पना सिद्धीस नेण्याचा प्रयत्न केला नसावा असें अनुमान करणें अप्रशस्त होणार नाहीं.

---

१ याच संमेलन वृत्ताच्या १८२।१८३ पानावरील शके १५८१ सालच्या नोंदींत अफजुलखानासबंधीं जो मजकूर आहे त्यांत वरील उताऱ्यांतील कराराचा फिरून उल्लेख करण्यांत आलेला आहे. म. इ. सा. खं. १५ लेखांक ३३६।३३७।-३३८ यांचे योगानें शकावलींतील वरील हकीकतीस चांगली बळकटी येते.

३ शहाजी राजे यांचे उत्तर वयांत निजामशाही राजसत्ता लयास गेल्या-नंतर हीनबल झालेल्या आदिलशाहीच्या दरबारांत त्यांनीं आपला प्रवेश करून घेऊन तेथें आपलें वर्चस्व स्थापित केलें. निजामशाहीच्या नाशामुळें दक्षिण-हिंदुस्थानच्या राजकीय परिस्थितींत स्थित्यंतर घडून आलें. त्यामुळें शहाजीराजे यांच्या पूर्ववयांत महाराष्ट्र देशाची स्वराज्यस्थापनेस प्रतिकूल असलेली राजकीय परिस्थिति अनुकूल झाली व त्यामुळें स्वराज्यस्थापनेची मसलत सुरू करण्याची कल्पना शहाजी राजे यांचे मनांत उद्भवली असली पाहिजे असें अनुमान करणें गैर होणार नाहीं.

४ श्रुति स्मृत्युक्त धर्माबद्दल जन्मसिद्ध अभिमान,मुसलमानी धर्म व संस्कृती-बद्दल पूर्ण तिटकारा व द्वेष, अपूर्वधाडस, व महान पराक्रम इत्यादि गुण शिवाजी महाराजांचे अंगीं वसत असल्याचें शहाजी राजे यांचे निदर्शनास विजापूर येथें शिवाजी महाराजांच्या व त्यांच्या घडलेल्या सहवासांत येऊन चुकलें होतें अशा स्थितींत स्वराज्यस्थापनेचें कार्य शिवाजी महाराजांचे करवीं सिद्ध कर-ण्याचें शाहाजी राजे यांनीं ठरविलें असावे असे अनुमान निघतें. पुणें व सुप्याकडील जहागिरकिडे शाहाजी राजे यांनीं दादोजी कोंडदेव यांची एकट्या-ची च रवानगी केली असें नसून शंकराजी निळकंठ, बाळकृष्ण मजमदार, सोनोपंत, व रघुनाथ बल्लाळ कोरडे इत्यादि पुढें प्रसिद्धीस आलेल्या मुत्सद्यांची शिवाजी राजे यांचे बरोबर शाहाजी राजे यांनीं रवानगी केली होती. यावरून वरील अनुमानास चांगली बळकटी येते.

५ शिवाजी महाराजांची रवानगी शाहाजी राजे यांनीं पुणें व सुपें प्रांताकडे केल्यापासून अवघ्या दोन वर्षांचे आंत [ म्हणजे जेधे शकावलींतील मिति प्रमाणें ज्यावेळीं शिवाजी महाराजांचें वय नऊ वर्षांचे होतें व आजप-र्यंत ग्राह्य धरण्यांत आलेल्या मितिप्रमाणें बारा वर्षांचें होतें ) स्वराज्यस्थापनेच्या मसलतीस प्रारंभ होऊन चाकण परगणा शिवाजी महाराजांनीं ताब्यांत घेतला असें सिद्ध झालें आहे. ही गोष्ट शिवाजी महाराजांच्या इतक्या अल्प-वयांत शाहाजी राजे यांच्या अनुमती वांचून घडणें दुरापास्त दिसतें.

६ स्वराज्यस्थापनेच्या सिद्धीच्या दृष्टीनें कऱ्हाड व मसूरच्या देशमुखी वतनाचें महत्त्व स्वराज्यस्थापनेची मसलत सुरु होण्यापूर्वीपासून शाहाजी राजे यांच्या लक्षांत आलें असलें पाहिजे असे त्यांनीं तें वतन मिळविण्याचे बाबतींत केलेल्या विचित्र खटपटी व अट्टाहास आणि या बाबतींत शाहाजी राजे

आणि शिवाजी महाराज यांच्या धोरणांत दिसून येणारे साम्य इत्यादि बाबी वरून सिद्ध होत आहे. स्वराज्य स्थापनेची मसलत शाहाजी राजे यांच्या सल्ल्यानें चालली असली पाहिजे असें अनुमान ह्या हि बाबी वरून निघतें.

७ स्वराज्य स्थापनेच्या मसलतीचे सुरवाती नंतर दहा वर्षांनीं मोंगल अगर आदिलशाही फौजेनें शिवाजी महाराजांचे मुलखावर स्वारी केल्यास शिवाजी महाराजास सर्व प्रकारची मदत व साह्यता करण्याचे बाबतींत शाहाजी राजे व कान्होजी नाईक जेधे यांचे दरम्यान झालेल्या करार मदारा विषयींचा जो उल्लेख जेधे[1] शकावलींत आला आहे त्यावरून स्वराज्य स्थापनेच्या मसलतीस सुरवात झाल्या नंतर दहा वर्षांनीं शाहाजी राजे यांची शिवाजी महाराजांनीं चालविलेल्या स्वराज्य स्थापनेच्या कार्याविषयीं पूर्ण सहानुभूति व मदत असल्याचे सिद्ध होत आहे.

ही बाब व वर नमूद केलेल्या साही बाबी व सप्त प्रकर्णात्मक चरित्रांत शाहाजी राजांनीं जेजूरीचे खंडोबास केलेल्या नवसाची हकिकत ह्या सर्वांचा समुच्चय दृष्टीनें विचार केला असतां धर्म स्थापनेस्तव शिवाजी महाराजांनीं सुरूं केलेल्या स्वराज्य स्थापनेच्या मसलतीस शाहाजी राजांची अंतःस्त पूर्ण मदत असल्याचें अनुमान निघणारें ऐतिहासिक सिद्धांताच्या स्वरूपाच्या अत्यंत समीप येऊन पोंहोचतें असें कबूल करण्यावाचून गत्यंतर नाहीं. शाहाजी राजे यांच्या चरित्राच्या दोन्ही बाजूची येथ पावेतों चर्चा करून आज पावेतों उपलब्ध झालेला नवीन पुरावा व त्यावरून निघणारी अनुमानें यांचे दिग्दर्शन आम्हीं केलें आहे. शाहाजी राजे यांच्या तोलाचा दुसरा महाराष्ट्रीय समाजाचा राजकारणी पुढारी त्याकाळीं दुसरा कोणी झाला नाहीं. सबब ही चर्चा येथें पुरी करून शिवकालीन महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांच्या ध्येयाच्या स्वरूपा विषयींच्या चर्चेकडे आतां आम्ही वळतों.

---

१ जेध्यांची शकावली हा लेख ऐतिहासिक सत्य कथनाच्या दृष्टीनें अत्यंत महत्वाचा आहे. ह्या शकावलींत कथन केलेल्या कित्येक बाबी म. इ. सा. खं. १५, १६, १७, व १८ यां मध्यें प्रसिद्ध झालेल्या अस्सल तत्कालीन पत्रावरून सिद्ध होत असल्याचें शकावली व वरील साधनें यांचा बारकाईने अभ्यास केला असतां दिसून येणार आहे ही बाब लक्षात घेतली असतां ही शकावली अत्यंत विश्वसनीय समजली पाहिजे.

## शिवकालीन महाराष्ट्रीय समाजाचे राजकारणी पुढारी व त्यांच्या ध्येयाचें स्वरूपः—

शिवाजी महाराजांचा अवतार महाराष्ट्रांत ज्या काळीं झाला त्या काळीं देशांत अनेक राजकारणी पुरुष उदयास आले. या सर्व राजकारणी पुरुषांचा नामनिर्देश या ठिकाणी करण्याचें प्रयोजन नाहीं. यांच्या चरित्राबद्दल जी थोडी-बहुत माहिती उपलब्ध झाली आहे ती वरून हे सर्व पुढारी शिवाजी महाराजांचे एकनिष्ठ अनुयायी असून स्वराज्य स्थापनेचें जे महत् कार्य शिवाजी महाराजांनीं सुरू केलें त्यांत ते सामील होते व त्यांची शिवाजी महाराजास मदत होती असें दिसून येतें. स्वराज्यस्थापनेचें जें ध्येय शिवाजी महाराजांचें होतें तेंच ध्येय त्यांना सामील असणाऱ्या व मदत करणाऱ्या इतर महाराष्ट्रीय पुढाऱ्यांचें असलें पाहिजे हें उघड आहे. अशा स्थितींत शिवाजी महाराजांचें स्वराज्य स्थापना करण्यांत कोणतें ध्येय होते या बद्दलच्या पुराव्याची प्रथम चर्चा करून ती वरून निष्पन्न होण्याऱ्या सिद्धांतांचें दिग्दर्शन केल्यानें शिव-कालीन महाराष्ट्रीय समाजाच्या सर्व पुढाऱ्यांच्या ध्येयाचे दिग्दर्शन केल्यासारखें होणार आहे. या दृष्टीने आह्मी प्रथम शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थाप-नेच्या ध्येया संबंधीं कोणत्या स्वरूपाचा पुरावा उपलब्ध होत आहे याचें दिग्द-र्शन करून नंतर त्या पुराव्याची चर्चा करण्याचें व त्या वरून निष्पन्न होणारे सिद्धांत नमूद करण्याचें योजिलें आहे.

शिवाजी महाराजांच्या ध्येयाचा पुरावा खालीं दर्शविलेल्या तीन प्रकारचा उपलब्ध होण्यासारखा आहेः—

१ खुद्द शिवाजी महाराजांचे त्यांच्या ध्येयासंबंधाचे उद्गार.

२ शिवाजी महाराजांच्या ध्येयासंबंधीं त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजाच्या इतर पुढाऱ्यांनीं व्यक्त केलेले विचार. त्याचप्रमाणें त्या काळच्या महाराष्ट्रीय व महाराष्ट्रेतर सामान्य जनांनीं शिवाजी महाराजांच्या ध्येयासंबंधीं व्यक्त केलेले अभिप्राय.

३ शिवाजी महाराजांच्या पश्चात् त्यांच्या ध्येयासंबंधीं महाराष्ट्रीय व महाराष्ट्रेतर सामान्य व्यक्तींचे अभिप्राय.

वर दर्शविलेल्या तिन्ही प्रकारचा पुरावा उपलब्ध झाला असून त्यांपैकीं बराच अस्सल व विश्वसनीय आहे. या पुराव्याचे वरील क्रमाप्रमाणें दिग्दर्शन करून नंतर त्यावरून शिवाजी महाराजांच्या ध्येयाचे स्वरुपासंबंधीं कोणते सिद्धांत निष्पन्न होतात त्याचें दिग्दर्शन करूं.

स्वराज्यस्थापना करण्यास शिवाजी महाराज कोणत्या ध्येयानें उद्युक्त झाले होते या संबंधाची इंग्रज व इंग्रजेतर युरोपियन इतिहासकार यांचीं मतें पहिल्या प्रकरणांत आम्हीं दिलीं आहेत. लूट करण्यापलीकडे शिवाजी महाराजांचा कोणत्या हि प्रकारचा स्वराज्यस्थापना करण्यांत उच्च हेतु नव्हता, अशा प्रकारचें युरोपियन इतिहासकारांचें एकजात मत आहे. आधुनिक काळीं इतिहासकार म्हणून ज्यांची युरोपियन ग्रंथकार प्रशंसा करितात व स्तुतिस्तोत्रें गातात असे बंगाली गृहस्थ यदुनाथ सरकार यांचें शिवाजी महाराजांच्या ध्येयाच्या स्वरूपा बद्दल काय मत आहे याचें दिग्दर्शन मागील प्रकरणांत केलें आहे. आपल्या राजसत्तेचा प्रसार हिंदुस्तानांतील मुसलमान बादशाह कुराणाच्या आज्ञेस अनुसरून करीत असत, परंतु शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या व त्याच्या विस्ताराच्या कार्यास अशा स्वरूपाची ही सबब नव्हती असा शेरा यदुनाथांनीं मारला असून शिवाजी महाराजांच्या बखरकारांचे शब्द वापरावयाचे झाल्यास मुलुखगिरी पलीकडे शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थापनेचें व विस्ताराचें कांहीं एक उच्च प्रकारचें ध्येय नव्हतें असा प्रो. सरकारनें आपला स्पष्ट अभिप्राय व्यक्त केला आहे. बड्या बड्या इतिहासकारांचे अशा प्रकारचे आरोप शिवाजी महाराजांचे ध्येयाविषयीं असल्याकारणानें या आरोपांचें निराकरण करण्यास शिवाजी महाराजांचे तर्फेचा पुरावा हि तितकाच भक्कम पाहिजे हें उघड आहे.

स्वराज्यस्थापनेच्या कार्यांत शिवाजी महाराजांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें या बद्दलची माहिती त्यांचे निकट संबंधीं व सहाय्यकारी यांना पूर्णपणें असावयाची हें उघड आहे. तरी अशा प्रकारच्या निकट संबंधीं व सहाय्यकारी व्यक्तींचें शिवाजी महाराजांच्या ध्येयासंबंधाचे विचार आपणास उपलब्ध झाले तर ते विचार शिवाजी महाराजांच्या ध्येयाचे स्वरूपनिश्चितीचे दृष्टीनें महत्वाचा पुरावा समजला पाहिजे. खुद्द शिवाजी महाराजांचे पिते शहाजी राजे हे शिवाजी महाराजांचे ध्येयाविषयीं काय म्हणतात तें या ठिकाणीं नमूद करणें जरूर आहे. बाजी घोरपडे हा मुस्तफाखानास सामील होऊन त्या उभयतांनीं शहाजी राजांचा विश्वासघात केला व विजापूरच्या बादशहांचे हुकुमानें शहाजी राजे यास कैद केलें ही गोष्ट इतिहास प्रसिद्ध आहे. शहाजी राजांची सुटका झाल्यानंतर बाजी घोरपडे यांनीं केलेल्या या विश्वासघाताबद्दल त्यास चांगलें प्रायःश्चित देण्याविषयीं शहाजीराजे यांनीं शिवाजी महाराजास लिहिलेलें पत्र

उपलब्ध झालें आहे ( महाराष्ट्र इतिहास मंजिरी पा. ७७ पहा ) त्या पत्रांतील खालील मजकूर फार महत्वाचा आहे:—

" बाजी घोरपडे याणी स्वधर्म साधणता सोडून यवन दुष्ट तुरुक याचे कृत्यास अनुकूल होऊन दगाबाजीचे हुजूरे करून विजापुरास येणें घडले. तेथें गुजरला प्रकार निर्वाणीचा तो तुम्ही समजलाच आहां. तो ही प्रसंग श्री तुमचा **मनोरथ सिद्धीस नेणें व स्वधर्म राज्यवृद्धी करणें म्हणोन पार पडला.** सांप्रत पुन्हां दुर्बुद्धी धरून खवासखान विजापुराहून फौजेसुद्धा रवाना झाले. यांची हारोळी बाजी यांनीं व लखम सावंत व खेम सावंत यांनी प्रतिज्ञापूर्वक जत करून सेना समवेत निघाले, ते तिकडे येत आहेत. तुह्मास श्री सांब व अंबा येष देणार पूर्ण आहेत. ते समयी त्यांचे वेढ घ्यावे. आण आमचे मनोदय सेवटास नेणार तुम्ही सुपुत्र निर्माण आहांत. "

वरील उद्गार शहाजी राजे यांनीं शिवाजी राजे यांचे विषयीं काढलेले आहेत. स्वधर्म राज्यवृद्धी करणें हा जो तुमचा मनोरथ तो सिद्धीस नेण्याकरितां आमच्या वर आलेल्या संकटांतून परमेश्वरानें आम्हास पार पाडलें असें शहाजी राजे लिहीत आहेत. बाजी घोरपड्या सारख्या सरदारानें केलेल्या विश्वासघाताबद्दल त्यास शासन करण्याचे बाबतींत लिहिलेल्या पत्रांतील वरील उद्गार फार महत्वाचे असून शिवाजी महाराजांचें ध्येय स्वधर्मस्थापनेस्तव राज्यवृद्धी करणें हें असल्याचें पूर्णपणें सिद्ध होत आहे. आतां त्या काळच्या दुसऱ्या एका राजकारणी प्रसिद्ध पुढाऱ्याचें मत या बाबतींत कोणत्या प्रकारचें होतें याचें दिग्दर्शन करूं.

कृष्णाजी अनंत सभासदकृत शिवाजी महाराजांच्या चरित्रांत त्यांचे अंतकाळ समयीं त्यांच्या पश्चात् राज्याची वाताहत कशी होईल व त्या वाताहतींतून त्यांच्या पदरच्या ब्राह्मण व मराठे सरदारां पैकीं कोणकोणते सरदार राज्य सुरक्षित ठेवतील या बद्दलचें भविष्यकथन शिवाजी महाराजांनीं केल्याचें वर्णन केलें आहे. या भविष्य कथनांत स्वराज्य सुरक्षित ठेवणाऱ्या व्यक्तींचीं जीं नांवें दिलीं आहेत त्यांत रामचंद्र निळकंठ आमात्य यांचें एक नांव आहे. शिवाजी महाराजांचे पश्चात् रामचंद्र निळकंठ यांनीं स्वराज्यरक्षणा प्रीत्यर्थ कोणत्या प्रकारची महत्वाची कामगिरी केली हें इतिहासज्ञांस सांगण्याची जरुरी नाहीं. अशा प्रकारच्या अधिकारी व्यक्तीचें मत शिवाजी महाराजांच्या ध्येयाच्या स्वरूपाचे अत्यंत विश्वसनीय समजलें पाहिजे हें उघड आहे. रामचंद्र निलकंठ यांचा आज्ञापत्र या नांवानें प्रसिद्ध असलेला एक राजनीतिपर प्रबंध अलिकडे प्रसिद्ध झाला आहे. या आज्ञापत्रांत ( प्रकरण १ लें पान ४ पहा ) शिवाजी

महाराजांनीं केलेल्या कामगिरीचें व त्यांच्या ध्येयाचें उत्कृष्ट व हुबेहूब चित्र रामचंद्र निलकंठ यांनीं काढिलें आहे. प्रस्तुत मुद्यासंबंधीं महत्वाचा राजनीतींतील खालील मजकूर आम्ही येथें देतों:—

" अहिवंतापासून चंदी कावेरी तीरापर्यंत निष्कंटक राज्य; शतावधि किल्ले; तसेंच जलदुर्ग, कित्येक विशाल स्थळें; चाळीस हजार पागा, व साठ सत्तर हजार शिलेदार, दोन लक्ष पदाती, कोट्यवधि खजिना, तसेंच उत्तम जवाहिर, सकळ वस्तुजात संपादिले. षाण्णव कुळीचे मराठे यांचा उद्धार केला. सिंहासनारूढ होऊन छत्र धरून छत्रपति म्हणविले धर्मोद्धार करून देव ब्राह्मण संस्थानी स्थापून यजनयाजनादि षट्कर्में वर्ण विभागें चालविलीं. तस्करादि अन्यायी यांचें नांव राज्यांत नाहींसें केलें. देशदुर्गादि सैन्यांनीं बंद नवेच निर्माण करून एकरूप अव्याहत शासन चालविलें. केवळ नूतन सृष्टीच निर्माण केली. औरंगजेबा सारिखा महान् शत्रु परितापसागरीं निमग्न करून दिगंत विख्यात कीर्ति संपादिली तें हें राज्य. "

शिवाजी महाराजांनीं स्थापन केलेल्या स्वराज्याचें रामचंद्र नीलकंठ यांनीं केलेलें वरील वर्णन लक्षांत ठेवण्यासारखें आहे. वरील वर्णनांत " धर्मोद्धार करून " हे सर्व साधारण शब्द प्रथम योजून नंतर धर्मोद्धार या संज्ञेची स्पष्ट फोड देव ब्राह्मण संस्थानी स्थापिले व यजनयाजनादि षट् कर्में वर्णविभागें चालविलीं या शब्दांनीं रामचंद्र नीलकंठांनीं केली आहे. स्मृति श्रुत्युक्त धर्माच्या महत्वाच्या बाबी म्हणजे देव ब्राह्मण यांची स्थापना व मनू याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतिग्रंथांतून कथन केलेलें यजन याजनादि वर्णाश्रम धर्म महाराष्ट्रीय समाजांत रूढ करणें या होत्या हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. वर दिलेल्या रामचंद्र नीलकंठ अमात्य यांच्या अभिप्रायावरून वर्णाश्रम धर्मस्थापना हे शिवाजी महाराजांच्या स्वराज्य स्थापनेचें एक महत्वाचें अंग होतें हें पूर्णपणें सिद्ध होत आहे. आतां शिवाजी महाराजांचे समकालीन महाराष्ट्रीय समाजाचे सुप्रसिद्ध असे दोन हरिकथा निरूपणी पुढारी होऊन गेले. स्वराज्य स्थापन करण्यांत शिवाजी महाराजांचें कोणतें ध्येय होतें या विषयीं या दोन हरिकथा निरूपणी पुढाऱ्यांचा अभिप्राय काय आहे तें आपण पाहूं.

शिवाजी महाराजांचें समकालीन महाराष्ट्रीय समाजाचे दोन हरिकथानिरूपणी पुढारी सर्व प्रसिद्ध आहेत. एक श्रीसमर्थ रामदास व दुसरे तुकाराम महाराज हे होत. तुकाराम महाराज व शिवाजी महाराज यांच्या भेटीच्या हकीकतीचे

तुकाराम महाराजांचे म्हणून समजले जाणारे अभंग हल्लीं उपलब्ध आहेत. या अभंगाच्या सत्यासत्यते विषयीं मतभेद आहे. या अभंगाखेरीज शिवाजी महाराजांचा प्रत्यक्ष अगर पर्यायानें ज्यांत उल्लेख आहे असा कोणता हि तुकाराम बोवांचा लेख त्यांनीं केलेल्या ग्रंथरचनेंत आढळत नाहीं. तुकाराम बोवांचे म्हणून समजल्या जाणाऱ्या भेटीच्या अभंगांत शिवाजी महाराजानीं तुकाराम बोवाकडे पाठविलेलें द्रव्य आम्ही विषतुल्य लेखितों सबब तें परत केलें आहे असे विचार तुकारामबोवांनीं प्रकट केलेल आहेत. शिवाजी महाराजांचे ध्येयाविषयीं ज्यांचे योगानें प्रकाश पडेल असे कोणते हि विचार त्या अंभगांत आढळत नाहींत. या दृष्टीनें विचार करितां या अभंगाचें महत्त्व प्रस्तुत मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें म्हणण्यासारखें नाहीं. आतां त्या काळचे दुसरे महाराष्ट्रीय समाजाचे पारमार्थिक पुढारी रामदास स्वामी हे होत. शिवाजी महाराजांचे ध्येयाचे स्वरूपावर ज्याचे योगानें प्रकाश पडेल असें खुद्द समर्थांचे बरेच उद्गार त्यांच्या ग्रंथांत आढळून येतात. अशा उद्गारांच्या परीक्षणांवरून शिवाजी महाराजांच्या ध्येयाच्या स्वरूपा विषयीं कोणते सिद्धांत निष्पन्न होतात याची चर्चा करण्याकडे आतां आम्ही वळतों. समर्थांच्या सुप्रसिद्ध दासबोध ग्रंथाच्या अठराव्या दशकाचा सहावा समास प्रस्तुत मुद्याच्या विवेचनाच्या दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे. ह्या समास लक्षपूर्वक वाचला असतां असें दिसून येईल कीं, या समासांत रामदासांनीं शिवाजी महाराजांचें चित्र हुबेहुब रेखाटलें आहे. अफजलखानाचे वधानंतर शिवाजी महाराज समर्थांचे भेटीस गेले असतां त्या प्रसंगीं समर्थांनीं शिवाजी महाराजांबद्दल काढलेले उद्गार या समासांत ग्रथित करण्यांत आले आहेत अशी या समासाच्या रचनेबद्दलची परंपरागत आख्यायिका आहे. या समासांतील खालील ओव्या फार महत्त्वाच्या असून स्वराज्यस्थापन करण्यांत शिवाजी महाराजांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें याची कल्पना उत्तम रितीनें होण्यासारखी आहेः—

म्लेंच्छ दुर्जन उदंड । बहुतां दिवसांचें माजलें बंड ।
या कारणें अखंड । सावधान असावें ॥
सकळ कर्ता तो ईश्वरु । तेणें केला अंगिकारु ।
तया पुरुषाचा विचारु । विरुळा जाणे ॥
न्याय नीति विवेक विचार । नाना प्रसंग प्रकार ।
परीक्षणें परांतर । देणें ईश्वराचें ॥
महा यत्न सावधपणें । समयीं धारिष्ट धरणें ।
अद्भुतची कार्य करणें । देणें ईश्वराचें ॥

येश कीर्ति प्रताप महिमा । उत्तम गुणासी नाहीं सीमा ।
नाहीं दुसरी उपमा । देणें ईश्वराचें ॥
देव ब्राह्मण आचार विचार । कितेक जनांसी आधार ।
सदा घडे परोपकार । देणें ईश्वराचें ॥
येहलोक परलोक पाहाणें । अखंड सावधपणें राहणें ।
बहुत जनाचें साहणें । देणें ईश्वराचें ॥
देवाचा कैपक्ष घेणें । ब्राह्मण चिंता वाहणें ।
बहुत जनांसी पाळणें । देणें ईश्वराचें ॥
धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार ।
उत्तम गुणाचा ग्राहिक । तर्क तिक्षप विवेक ।
धर्मवासना पुण्यश्लोक । देणें ईश्वराचें ॥

वरील ओंव्यावरून शिवाजी महाराजांनीं कोणत्या उच्च प्रकारच्या हेतूंनीं उद्युक्त होऊन स्वराज्यस्थापनेचा व्याप सुरुं केला होता हें उघड होत आहे. धर्मस्थापना करण्याकरितां ईश्वरानें निर्माण केलेला पुरुष असा शिवाजी महाराजांबद्दल समर्थांनीं आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. धर्मस्थापना या संज्ञेचा अर्थ व व्याप्ती स्पष्ट करण्याकरितां देवाचा कैपक्ष घेणें, ब्राह्मणाची चिंता वाहाणें, देव ब्राह्मण आचार विचार इत्यादिकांचें रक्षण करणें, बहुत जनांचें रक्षण करणें इत्यादि बाबींचा धर्मस्थापनेंत अंतर्भाव होतो, हेंहि वरील ओंव्यावरून स्पष्ट होत आहे. शिवाजी महाराजांची श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मास अनुसरून वागणाऱ्या ब्राह्मणांविषयीं व हिंदुदेवता व देवस्थानें यांचे विषयीं त्यांचे ठायीं किती निष्ठा वसत होती व त्यांनीं निर्माण केलेल्या अष्टप्रधान संस्थेपैकीं पंडितराव हे प्रधानपद कोणत्या विशिष्ट हेतूनें त्यांनीं निर्माण केलें होतें या मुद्याबद्दलचा पुढील प्रकरणांतील पुराव्यावरून शिवाजी महाराजांच्या ध्येयाचे स्वरूपावर अधिक प्रकाश पडणार आहे, इतकेंच तूर्त सांगून याच मुद्यासंबंधाचें इतरत्र आढळणारे समर्थांचे कांहीं उद्गार आम्ही खालीं नमूद करितों. रामदासांनीं शिवाजी महाराजांस लिहिलेलें एक ओंवीबद्ध पत्र उपलब्ध झालें आहे. त्या पत्रांतील उद्गारहि प्रस्तुत मुद्याच्या विवेचनाच्या दृष्टीनें फार महत्त्वाचे आहेत सबब ते आम्ही येथें नमूद करितों.

तीर्थें क्षेत्रें मोडिलीं । ब्राह्मणस्थानें भ्रष्ट झालीं ॥
सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥
देव धर्म गोब्राह्मण । करावया संरक्षण
हृदयस्थ जाला नारायण । प्रेरणा केली

उदंड पंडित पुराणिक । कवीश्वर याज्ञीक वैदिक ॥
धूर्त तार्किक सभानायक । तुमच्या ठायीं ॥
या भूमंडळाचे ठायीं । धर्म रक्षी ऐसा नाहीं ॥
माहाराष्ट्रधर्म राहिला कांहीं । तुह्मांकरितां ॥
सर्वत्र मंडळी धर्म मूर्ती । सांगणें काय तुह्मांप्रति ॥
धर्म स्थापनेची कीर्ति । संभाळली पाहिज ॥

वरील ओव्यांत शिवाजी महाराजांचे काळी महाराष्ट्रीय समाजाची स्थिति किती निकृष्ठावस्थेप्रत पोंचली होती व ती सुधारून महाराष्ट्रीय समाजाची घटना कोणत्या धर्तीवर करण्याची शिवाजी महाराजांची आकांक्षा होती याचें फार त्रोटक पण मार्मिक व अर्थपूर्ण असें समर्थांनीं वर्णन केलें आहे. प्रथम तीर्थ-क्षेत्रांची वाताहात कशी झाली होती त्याचप्रमाणें ब्राह्मणांचीं पूज्यस्थानें कशीं भ्रष्ट करण्यांत आलीं होतीं याचें समर्थांनीं दिग्दर्शन केलें आहे. महाराष्ट्रीय समाजाचा या निकृष्ट स्थितींतून उद्धार करण्याची प्रेरणा शिवाजी महाराजांस परमेश्वरानें केली. धर्माचें पुनरुज्जीवन करावयाचें ह्मटलें ह्मणजे धर्मज्ञान असणारे व धर्मास अनुसरून वर्तन करणारे लोक समाजांत प्रथम निर्माण होणें जरूर असतें. अशा प्रकारचे लोक समाजांत निर्माण झाले ह्मणजे धर्मास अनुसरून वागण्याची प्रवृत्ति समाजांतील सामान्य जनतेंत साहजिक रीतीनें उत्पन्न होऊन सामान्य जनता धर्मास अनुसरून वागूं लागते. ही बाब लक्षांत घेऊन शिवाजी महाराजांनीं पंडित, पुराणिक, कवीश्वर, याज्ञिक, वैदिक, तार्किक इत्यादि लोकांना आश्रय देऊन आपल्या पदरीं ठेविलें व अशा रीतीनें धर्मरक्षणाचे कार्यास प्रारंभ केला. या शिवाजी महाराजांच्या धोरणामुळें महाराष्ट्रधर्माचें रक्षण शिवाजी महाराजांनीं केलें असें वरील ओव्यांत समर्थांनीं वर्णन केलें आहे. दुसऱ्या एका महत्वाच्या मुद्याचें वरील ओव्यांत समर्थांनीं दिग्दर्शन केलें आहे त्याचें स्पष्टीकरण करणें जरूर आहे. शिवाजी महाराजांचे काळीं महाराष्ट्रीय समाजाचे जे दुसरे कित्येक राजकारणी पुढारी होऊन गेले त्यांच्या ध्येयाचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें याबद्दलचें स्वतंत्र विवेचन करण्याचें कारण नाहीं, कारण शिवाजी महाराजांचें जें ध्येय होतें तेंच ध्येय त्या पुढाऱ्यांचें असलें पाहिजे असें अनुमान करण्यास हरकत नाहीं असें आह्मी सुरवातीसच ह्मटलें आहे. परंतु वरील प्रमाणें आह्मी आपला अभिप्राय जरी व्यक्त केला आहे तथापि त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजाच्या इतर पुढाऱ्यांच्या ध्येयाचें स्वरूपाबद्दलचें स्पष्ट दिग्दर्शन समर्थांनीं

सर्वत्र मंडळी धर्म मूर्ती । सांगणें काय तुह्माप्रति
धर्मस्थापनेची कीर्ति । सांभाळली पाहिजे ॥

या ओव्यांत केली आहे. सर्वत्र मंडळी धर्ममूर्ती हा शब्दसमुच्चय समर्थांनीं स्वराज्य स्थापनेच्या कार्यांत शिवाजी महाराजांस जितके त्या काळचे महाराष्ट्रीय समाजाचे पुढारी सामील होते तितक्यांचें दिग्दर्शन करण्याकरितां वापरला आहे हें उघड आहे. या प्रमाणें समर्थांनीं वरील ओव्यांत तत्कालिन महाराष्ट्रीय समाजाच्या स्थितीचें दिग्दर्शन करून शिवाजी महाराज व त्यांचे कक्षेंतील इतर महाराष्ट्रीय समाजाचे पुढारी यांच्या ध्येयाचें स्वरूप स्पष्ट केलें असून शेवटीं शिवाजी महाराज व त्यांचे अनुयायी यांस धर्मस्थापनेची कीर्ति सांभाळली पाहिजे असा समर्थांनीं उपदेश केला आहे. हा मुद्दा स्थापित करण्याकरितां याच स्वरूपाचे समर्थांचें दुसरे कित्येक उद्गार देतां येण्यासारखे आहेत. परंतु पाल्हाळ टाळण्याकरितां आह्मी तसें करण्याच्या भानगडींत पडत नाहीं.

आतां पावेतों दिलेले उतारे समर्थ रामदास स्वामी यांनीं केलेल्या पद्यरुपी वाङ्मयापैकीं आहेत. कदाचित् अतिचिकित्सकबुद्धीच्या व्यक्तीस हा पुरावा महत्वाचा नाहीं असें वाटण्याचा संभव आहे. यास्तव खुद शिवाजी महाराजांनीं समर्थ रामदास स्वामीस चाफळ येथील देवस्थानास पूजामहोत्साह इत्यादि कार्याप्रीत्यर्थ इनाम दिलेल्या जमिनीच्या सनदेंतील खालील महत्वाचे उद्गार आम्ही येथें नमूद करितों ( रामदास आणि रामदासी भाग २ पान ४० पहा )
" चरणरज शिवाजी राजे यांणी चरणावर मस्तक ठेवून विज्ञापना जे मजवर कृपा करून सनाथ केले. आज्ञा केली कीं, तुमचा मुख्य धर्म राजसाधन करून धर्म स्थापना, देव ब्राह्मणांची सेवा, प्रजेची पीडा दूर करून पालनरक्षण करावें; हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा. तुम्ही जें मनीं धराल तें श्री सिद्धीस पावील त्यावरून जो जो उद्योग केला व दुष्ट तुरुक लोकांचा नाश करावा, विपुल द्रव्यें करून राज्यपरंपरा अक्षय चालेल ऐशीं स्थळें दुर्घट करावी ऐसे जें जें मनीं धरलें तें तें स्वामींनीं अशिर्वादा प्रमाणें मनोरथ पूर्ण केले. या उपरी राज्य सर्व संपादिलें. तें चरणीं अर्पण करून सर्वकाळ सेवा घडावी. ऐसा विचार मनीं आणिला. तेव्हां आज्ञा झाली कीं, तुम्हास पूर्वी धर्म सांगितलें तेंच करावें तीच सेवा होय. ऐसे आज्ञापिलें. "

हें पत्र शके १६०० आश्विन शुद्ध १० चें आहे. दसऱ्याचे सुमुहूर्तावर गुरु ऋणांतून अंशतः मुक्त होण्याचे हेतूनें वरील सनद शिवाजी महाराजांनीं समर्थ चरणीं अर्पण केली. या सनदेंतील व्यक्त केलेला अभिप्राय किती महत्वाचा आहे हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. वरील उताऱ्यांतील पहि-

त्याच वाक्यांत शिवाजी महाराजांनीं स्थापिलेल्या स्वराज्याचें ध्येय कोणत्या प्रकारचें होतें याचा स्पष्ट उल्लेख आलेला आहे. राज्यसाधन करून स्वराज्य-स्थापना करावयाची हें ध्येय शिवाजी महाराजापुढें समर्थांनीं ठेविलें व तें शिवाजी महाराजांनीं सिद्धीस नेलें. वरील उद्गारांचे योगानें अतिचिकित्सक आक्षेपकांचें पूर्ण समाधान प्रस्तुत मुद्याच्या बाबतींत होईल अशी आमची खात्री आहे.

शिवाजी महाराजांस राज्याभिषेक करण्याचे कामीं पुढाकार घेणारे व राज्याभिषेक करणारे वेदशास्त्रसंपन्न गागा भट्ट यांनीं शिवराज प्रशस्तीमध्यें शिवाजी महाराजांविषयी जो अभिप्राय व्यक्त केला आहे तो फार महत्वाचा असल्या कारणानें या ठिकाणीं नमूद करणें जरूर आहे. भारतइतिहास संशोधक मंडळाच्या चतुर्थ संमेलनवृत्ताच्या २९ वें पानावरील खालील श्लोक आह्मी देतों.

पीताः शास्त्रमहार्णवाः भसिततां प्राप्ताः समुल्लासिताः
विश्वं भानुमते व दीर्घितमिदं कात्स्न्र्येन लब्धा श्रुतिः ।
नव्या सृष्टिरकारि सृष्टिविरहे त्राता द्विजौघाः क्षमा
वासिष्ठी त्वयि जामदग्न्यसदृशत्वय्येव संभाव्यते ॥ १६ ॥
अवरंगजेबयवनाधिपभीतविप्र—
त्राणाय यः परिगृहीतनवावतारः ।
अन्योस्ति वा मलयभूवलयात् समुद्रात् ।
सुत्रामभीतागिरिरक्षणदीपितः कः ॥ २२ ॥
अज्ञानसिंधौपतिताःस्मृतीश्च समुद्धाराज्जुनया स्वकृत्या ।
वेदान्निमग्नानुदधौ युगादौ यथैव विष्णुः कमठस्वरूपः ॥ २४ ॥

वरिल संस्कृत श्लोकांचे अर्थ खालीं दिले आहेतः—

" शास्त्र महासागरांचें प्राशन करून ( म्हणजे त्यांचा अगदीं कसून अभ्यास करून ) त्यांना ज्या शिवाजी राजानें लोकप्रसिद्धीला आणलें, सूर्य प्रकाशाप्रमाणें ज्यानें या जगाचा विस्तार केला, ज्यानें सर्व वेदांचें ज्ञान मिळविलें, ज्यानें सृष्टीची रचना च नवी केली व ब्राह्मण समूहाचें रक्षण केलें अशा जामदग्न्यासारख्या हे शिवाजी राजा तुझे ठिकाणींच ही पृथ्वी ( पृथ्वीचें राज्य ) असणें संभवनीय आहे. "

" अवरंगजेब बादशहाच्या दराऱ्यानें घाबरलेल्या ब्राह्मणांच्या रक्षणाकरितां ज्या शिवराजानें नवीन अवतार धारण केला आहे. इंद्रापासून भ्यालेल्या पर्वताचें रक्षण करण्यास दक्षिण दिशेला वेढून टाकणाऱ्या समुद्रावांचून

दुसरा कोण समर्थ असणार ( समुद्राखेरीज दुसरा कोणी हि जसा पर्वताचें रक्षण करण्यास समर्थ नाही त्या प्रमाणें यवनभीत ब्राह्मणांचें रक्षण करण्यास शिवरायाखेरीज दुसरा कोणी हि समर्थ नाहीं हा भाव ). ''

" युगारंभीं कच्छरूपधारी भगवान विष्णूनें ज्या प्रमाणें समुद्रांत बुडालेल्या वेदाचा उद्धार केला त्या प्रमाणें ज्या शिवरायानें स्वतःच्या निर्मळ कृतीनें अज्ञान समुद्रांत बुडालेल्या स्मृतिग्रंथाचा उद्धार केला. "

शिवराज प्रशस्तींतील वरील श्लोकांत शिवाजीमहाराजांनीं स्मृतिग्रंथाचा उद्धार केला असें विधान आहे. स्मृतिग्रंथाचा उद्धार म्हणजे अर्थात स्मृतींत सांगितलेल्या धर्माचा उद्धार शिवाजीनें केला असे उघड होत आहे. औरंगजेब बादशहाचे जुलमापासून ब्राह्मणांचें रक्षण केल्याचा हि वरील श्लोकांत उल्लेख आहे. समर्थ रामदास स्वामींनीं शिवाजी महाराजांच्या स्वराज्य-स्थापनेच्या ध्येयाचे स्वरूपा विषयीं जो आभिप्राय व्यक्त केला आहे त्याच स्वरूपाचा वेदमूर्ती गागाभट्टांचा आभिप्राय असल्याचें वरील श्लोकांवरून सिद्ध होत आहे. समर्थ रामदास स्वामी व गागाभट्ट हे महाराष्ट्रीय समाजापैकीं त्या काळच्या प्रमुख व्यक्तीं पैकीं असल्या कारणाने व समर्थांचा आणि शिवाजी महाराजांचा गुरुशिष्य संबंध असल्या कारणानें. त्यांनीं शिवाजी महाराजांच्या ध्येयाच्या स्वरूपा विषयीं व्यक्त केलेल्या वरील अभिप्राया पेक्षां त्या काळच्या महाराष्ट्रेतर प्रांतांतील व्यक्तीच्या आभिप्रायाचे कित्येकास जास्त महत्व वाटण्याचा सभव आहे. ही बाब लक्षांत घेऊन तत्कालिन महाराष्ट्रेतर व्यक्तींचे शिवाजी महाराजांच्या ध्येयाचे स्वरूपाविषयींचे अभिप्राय या ठिकाणीं नमूद करणें अप्रस्तुत होणार नाहीं. किंबहुना मराठ्यांविषयीं पूर्वग्रहानें ज्यांचीं मनें दूषित झालेलीं आहेत त्यांना पुराव्याच्या दृष्टीनें असल्या अभिप्रायांची किंमत अधिक वाटण्याचा संभव आहे. यास्तव महाराष्ट्रेतर प्रांतांतील त्या काळच्या एका नामांकित व्यक्तीचे शिवाजी महाराजांच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयींचें मत आम्ही एथें नमूद करितों. शिवाजी महाराजांचे काळीं भूषण या नांवाचा एक सुप्रसिद्ध कवि उत्तर हिंदुस्थानांत होऊन गेला. शिवाजी महाराजांचें उज्वल चरित्र त्याचें डोळ्यांदेखत घडत होतें व त्यांची कीर्ति सर्व भरत खंडांत दुमदुमून राहिली होती. शिवाजी महाराजांची कीर्ति भूषणकवीचे कानांवर आल्यामुळे शिवाजी महाराजांचें दर्शन घेण्याची उत्सुकता त्यास होऊन त्यानें शिवाजीमहाराजांचें दर्शन घेतलं व महाराष्ट्रदेशाची स्थिति त्यानें स्वतः

अवलोकन केली. या नंतर भूषण कवीनें शिवाजी महाराजांचे चरित्र-वर्णन-पर असा शिवभूषणकाव्य त्यां नांवाचा एक ग्रंथ लिहिला. त्या ग्रंथांतील खालील शिवाजी महाराजांसंबंधाचें उद्गार महत्वाचे असल्या कारणानें ते आम्ही एथें नमूद करितों.

**राखी हिन्दुवानी हिन्दुवानको तिलक राख्यो ।**
**अस्मृति पुरान राखे बेंद बिधी सुनी मैं**
**वेद राखे विदित पुरान राखे, सार युत रामनाम राख्यो**
**अति रसना सुधरम ।**
**हिन्दुनकी चोटी रोटी राखी है, सिपाहिन की**
**कांधे मै जनेऊ राख्यो, माला राखी गर मे**
**हिन्दुवान द्रुपदी की इज्जति बचै बे ।**

वरील कवितेत भूषण कवीने शिवाजी महाराजांच्या ठळक ठळक कृत्यांचें तपशीलवार वर्णन दिलें आहे. या वर्णनावरून शिवाजी महाराजांनीं स्वराज्यस्थापनेचा उपक्रम कोणत्या ध्येयानें ऊद्युक्त होऊन केला होता या विषयीं महाराष्ट्रेतर प्रांतांतील लोकमत स्पष्ट होत आहे.

पहिल्या प्रकरणांत शिवाजी महाराजांचे ध्येयाविषयीं इंग्रज इतिहासकारांचे नमूद केलेले अभिप्राय किती असत्य व चुकीचे आहेत हें भूषण कवीच्या वरील उद्गारावरून सिद्ध होत आहे[1].

शिवाजी महाराजांच्या ध्येयाच्या स्वरूपासंबंधी सुरवातीस दर्शविलेल्या तीन प्रकारच्या पुराव्या पैकीं तिसऱ्या सदरांत पडणाऱ्या पुराव्याच्या चर्चेकडे आतां आम्ही वळतों. या पुराव्याच्या सदरांत मुख्यत्वें करून शिवाजी महाराजांच्या ध्येयाचे स्वरूपाविषयीं मराठी बखरकारांनीं दर्शविलेल्या अभिप्रायांचा समावेश होतो. शिवाजी महाराजांच्या चरित्राची हकीकत देणाऱ्या बखरीं पैकीं दोन बखरी फार महत्वाच्या आहेत. एक कृष्णाजी अनंत सभासद कृत शिवचरित्र व दुसरी मल्हार रामराव चिटणीसकृत सप्तप्रकरणात्मकचरित्र. कृष्णाजी अनंत सभासद यांनी शिवाजी महाराजांचें चरित्र स्वतः डोळ्यांनीं पाहिलेलें होतें. त्यांनी लिहिलेल्या चरित्राचे सुरवातीसच, शिवाजी महाराजांच्या चरित्रासंबंधीं खालीं नमूद केलेला त्रोटक उल्लेख केला आहे.

---

१ टीपः सन १९२२ सालच्या माडर्न रिव्ह्यूच्या एप्रील महिन्याचे अंकांतील एका लेखांत मराठ्यांचे स्वराज्यस्थापना व स्वराज्यविस्तार करण्यांत कोणतें ध्येय होतें या विषयीची चर्चा करण्यांत आली आहे. ही चर्चा प्रस्तुत मुद्याच्या दृष्टीनें फार महत्वाची असल्याकारणानें त्या पैकीं कांहीं महत्वाचा भाग आम्ही एथें देतों:—

" रात्रौ श्री शंभू महादेव स्वप्नास येऊन प्रसन्न होऊन बोलिला जे तुझ्या वंशांत आपण अवतार घेऊं देवब्राह्मणांचें संरक्षण करून म्लेंच्छांचा क्षय करितों दक्षण देशाचें राज्य देतों " म्हणोन त्रिवार वचन करून वर दिला.

---

टीप चालू :- लेखाचा मथळा " A lesson for today " असा आहे. पान ४५६ वर खालील मजकूर आहे.

To the Rajputs and Bundelas who had so long been the staunchest supports of the Moghul cuase, the Maratha Chief appeared as their heaven sent deliverer orin the words of their poet as a Bhima slaying Kichaka, as a Rama slaying Ravana. This feeling breathes in every line of the poet Bhushan's eulogy of Shivaji. He worships Shivaji as an incarnation . ..................Now we cannot explain away this mental attitude by saying that Bhushan was a Maratha patriot who would naturally magnify the deeds of the Hero that had led his race on to wealth, independence and attempted suzerainty over India. We know that Bhushan was a Kanoja Brahaman of Sheorangpur in Upper India ( Cawnpore District ) who made a long and perilous journey to the Maratha capital in order to see the hero whose deeds had stirred his imagination in his ditsant home. Bhushan really voices in smooth and vigorous numbers, what oft was thought but never so well expressed by the millions of Hindus all over India.

याच लेखांतील खाली दिलेला दुसरा उतारा हि फार महत्वाचा आहे.

On the 26th October 1731 after the Maratha invaders had slain Daya Bahadur, the imperial viceroy of Malva, with the treasonable help of Nandlal, Sawaji Jayasingh Raja of Jaipur writes thus to Nandlal.

" हजार शाबास है के फकत् हमारे कौलके उपर आप सब मालवे सरदार रहकर, अपना धर्मका कलयान होना और मालवेमे धरमकी वृद्धी होना, ए वात विचारकर मालवे भेसे मुसलमानोंकु नोपद किये, और धर्म कायम रखा हमारा मनोरथ अपने पुरा किया, "

या त्रोटक उल्लेखांत शिवाजी महाराजांच्या चरित्राचें रहस्य कृष्णाजी अनंत यानें दर्शविलें आहे. मल्हार रामराव कृत सप्तप्रकरणात्मक चरित्रांत शिवाजी महाराजांच्या ध्येयाचें स्वरूप स्पष्ट करणारे असे बरेच व विस्तृत असे उल्लेख आहेत. परंतु ही बखर पेशवाईच्या अखेरच्या काळांतील असल्यामुळें या बखरींतील उल्लेखांचे सत्यतेविषयीं कित्या चिकित्सकाकडून शंका उपस्थित केली जाण्याचा संभव आहे. यास्तव या बखरीच्या रचनेच्या पूर्वी महाराष्ट्रांतील राजकारणांशीं परिचित असलेल्या व्यक्तींची शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयीं कोणत्या प्रकारची कल्पना होती या बद्दलचा पुरावा उपलब्ध झाल्यास तो फार महत्वाचा ठरणार असून त्याचे योगाने सप्तप्रकरणात्मक चरित्रांतील उल्लेखाच्या सत्यतेविषयीं खात्री पटणार आहे. आम्ही म्हणतो या प्रकारचा पुरावा उपलब्ध झाला असून तो आम्ही खालीं नमूद करितों. पानिपतचे युद्धाचे सुमारास अयोध्येचा नबाब सुजा उद्धवला याचे दरबारीं मराठ्यांचे वतीनें गणेश वेदांती या नांवाचा गृहस्थ वकिलीच्या कामावर होता. याच गणेश वेदांती यांचा माधवराव अनंत वेदांती या नांवाचा भाऊ होता. वेदांतपारंगत व आत्मविद्या जाणणारा अशी माधवराव वेदांत्यांची ख्याति होती. माधवराव अनंत यानें शके १७०४ माघ वद्य ५ रोजीं सवाई माधवराव पेशवे यांस लिहिलेलें एक पत्र मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांच्या सहाव्या खंडांत प्रसिद्ध झालें आहे. ( लेखांक ४३६ ). हें सर्व पत्र चर्चाविषयक मुद्याचे दृष्टिनें अत्यंत महत्वाचें असल्या कारणानें तें आम्ही खालीं दिलें आहे.

---

म. इ. सा. खं. ६ ]
लेखांक ४३६ श्री

शके १७०४ माघ वद्य ५.

" श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य माधवराव अनंत वेदांती कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील वर्तमान ता. माघ वद्य ५ पर्यंत यथास्थित जाणोन स्वानंद वैभवपत्रीं लेखनाज्ञा करीत असलें पाहिजे. विशेषः— प्राचीन हिंदुधर्माचा लोप होऊन अपसव्याचें प्राबल्य जाहलें. त्यांणीं सर्व धर्म भ्रष्ट करून स्वधर्माचरणीं जनास लाऊन, वेदवेदांगप्रवृत्तीपासून परावृत्त होण्यामुळें ब्राह्मण्याचा लोप स्वधर्माचार राहिला. यास्तव भगवंतजीस संकट पडून, तदाश्रयीं हिंदुराजे कित्येक होते जाले; त्यांसही हितोपदेशकर्ते लोक निर्माण जाले. त्यांनीं नाना प्रकारें

सांगून धर्मवांछा धरविली. परंतु जनाची प्रवृत्ती लावणें जालें नाहीं. जैपुरवाले यांनीं अश्वमेध केला. कोण्ही कांहीं, अशा प्रकारें चाललें. तें श्रीचें मनास न आलें. त्या वरून स्वतः अवतीर्ण जाल्याखेरीज दुर्मताचा नाश होणार नाहीं, जाणून बाबाजी भोंसले यांचे वंशीं मालोजी विठोजी राजे जाले. त्यांचे वंशीं साक्षात् भगवान विश्वेश्वर स्वयमेव आपण शिवशिवाजी राजे अवतीर्ण होऊन तुरुकाचा निःपात करून, हिंदुपति सिंहासनस्थ गागाभट प्रतापें जाहले. त्यांनीं एक ग्रंथ ब्राह्मणांनीं ह्मटला म्हणजे मणभर धान्य व पांच रुपये रोख द्यावे. या प्रमाणें उत्तरोत्तर विशेषात्कारें दक्षिणा व धान्य देऊन विप्रकुलीचें संरक्षण केलें, धर्मवृद्धि पावविली. त्या अन्वयें दाभाडे सेनापति यांणीं पुण्यक्षेत्राचें ठायीं श्रावणमासीं धर्म दक्षणा देऊन दिवसेंदिवस लौकिक संपादिला. त्यांचा पराभव करून श्रीमंतीं वास्तव्य केल्यापासून सर्व गुणाचे ग्राहीक होऊन, दिगंत कीर्ति मिळवून, आसमुद्रान्त ध्वजारोपण केलें. धर्म कलाकुशलता, वीर्यशौर्य, गीत-नृत्यादि नानाप्रकारचे तर्क साधून, स्वामिसेवा करून, कुलोद्धारकता आपलाले वंशीं सर्वजनांनी अवर्णनीय स्तुतिप्रद केल्यांनीं राज्याभ्यंतरीं सर्वांस मान्य असेंच पुरुष होऊन प्रपंचीं इहपर उत्कृष्ट जालें. त्यास वडिलोपार्जित वागण्याच्या चाली कशा, त्यांणीं राज्य संपादलें कसें ह्मणाल तरी:—कोणत्याहि कर्मास प्रवृत्त होऊं नये. जाले असतां, त्यांत हानि होवो किंवा कांहीं घडो, परंतु ती मसलत शेवटास जाई तों पर्यंत पिच्छा सोडूं नये. अशीं कर्मे कोणतीं ह्मणाल तरी पै।। वसई घेण्याविशीं श्रीमंत थोरले चिमणाजी बल्लाळ आपासाहेब यांणीं साहास केला, तो काय लिहूं ? तत्रापि ऐशीं हजार माणसें लहान थोर सरकार कामीं आलीं. ऐसी जघन्य कीर्ति वागती. ती वसई घेऊन फिरंगी यांस गोवें एक ठाणे ठेवून, संपूर्ण राज्यांतून काढून दिलें. तसेंच, सदाशिव चिमणाजी भाऊसाहेब पेशवे यांणी दिल्लीपतीस स्पर्धा करून दिल्ली घेऊन, आपण सिंहा-सनस्थ होऊन, पुढें गिलच्यांवरी जाऊन मोठे जवामर्दीनें लढाई दिली. त्या युद्धांत लक्षावधि मनुष्यें गारत जालीं. वरकड जीवजंतूची संख्या कोणीं धरली ! परंतु पराभव झाल्यामुळें हिंदुधर्माचा लोप व्हावा, असा प्रसंग प्राप्त झाला असतां बाळाजी बल्लाळ नानासाहेब पेशवे यांणीं अभिमान धरून सरकार कामीं आलें. त्यांचें घरीं लघुलघु लेकरें राहिलीं ! तीं गौरवसत्कार युक्त जाणोन, त्यांची मर्यादा ठेवून, अपरतारतम्य चित्तवित्तानिशीं अंतःकरण पुरवून वाढविलीं ! हिंदुस्थानांत राणोजी शिंदे व महादजी शिंदे यांस पाठवोन

विदुरापासून सुयोधनाचा मानभंग जाला, तद्वत् उभयता शिंदे यांणी दिल्ली-पती सहित पादाक्रांत सर्व राजे लहान थोर करून पुण्यास राजधानी इंद्रभुवनवत् केली ! ऐसे अभिमानी पुरुष ! त्यांचें वंशीं आपण कीर्तिमान् आहांत. त्यास मागील इतिहासाचें कारण नसतां किंचित् लिहिणे बालबोधार्थ लागलें. आतां केलें तेंचि करावें; त्या करितां मरोनी उरावें. उरलें त्यांणीं मोडलें तेंच घडावें; हा धर्म मुख्यत्वें राजाचा. त्या राजांनीं स्वहित साधून पर-लोकीं योग्य व्हावें. त्या योजनेस श्री हरिस्मरण अहर्निशीं असावें. तो साक्षेप कोणता म्हणाल तरीः— नाना युक्ति प्रयुक्ति बोलणें; वादवेवाद जिंतणें; समयीं समर्पक उत्तर देणें; कलाकुशलता, हावभाव; नटनाट्य; कौतुकगीत नृत्य, वीर्य, शौर्य, विवेक, शुचिष्मतता, लिहिणें, बेरीज, तेरीज, शब्दशब्दांग, देशपरत्वें भाषा, विनोद, साहित्य जाणावें, बोलोन करून दाखवावें. ऐसे प्रकारें साक्षेपीं राहावें, व सेवक जना पासून लहानथोर अपराध जाला, तरी स्वामीं-नींच क्षमा केली पाहिजे. कारण, पदरचीं सर्व मनुष्यें जाणतीं असलीं तरी मूर्खत्व नाहींसे होईल. त्यास मुळीच तो अज्ञान; त्यास नानाप्रकारें श्रम करून सज्ञानता आणली; तो कामाचें धोरण न जाणून चुकला; तेव्हां ज्या मनुष्यास या योग्यतेस सहस्त्रावधि द्रव्य खर्च केलें, तेव्हां तें मनुष्यसें जालें. तें मनुष्य तोडून आपले करितां प्राण देणारे. त्याजला अपराध सोडला नाही, तरी लक्षा-वधि मनुष्यांत सूज्ञ उत्पन्न होणार, तें मनुष्य दैववश प्राप्त जालें, तरी इतबारी वागणार क्वचित् ! तेव्हां पृथ्वीपती जो त्यांनीं सर्वांचा संग्रह केला पाहिजे. त्यांणीं त्याग केला तरी त्या मनुष्याचा निर्वाह कसा होईल आणि चाकरीचे सूज्ञ मनुष्यें कोठून मिळणार ? याकरितां परंपरेचे कुलशीलाचे मनुष्य अज्ञान असलें तरी स्वामिसेवा जीवादारभ्य करील. सज्ञानी मनुष्य नानाप्रकारें आपला मतलब साधून सर्वस्वाचा पराचा नाश जाला तरी करील. त्याची प्रचीति हल्लीं सर्व राज्यांत तरी वागती. तिचा विस्तार कशास ? सारांश, राजांनीं आधीं अंतःकरण जाणावें. ही कला त्यास असली पाहिजे. जो परांचें अंतःकरण जाणील तोच राजा. राज्याधिकारास योग्य असा जो राजा त्यांणीं न्याय-नीतीनें वर्तावें. आपपर तेथें मनांत न आणावें वास्तविक असेल तेंच करावें. अन्यथा मार्गी लोकवार्तेवरी न जावें. समक्ष पाहिल्यावाचून न रहावें. अथवा निश्चयात्मकें शोधून पहावें. मग जें सांगणें तें सांगावें. ज्या राज्यांत नीति बुडाली तें राज्य भ्रष्ट झालें ऐसें जाणावें. परंतु काळवेळ पहावा. समय ओळखून चालावें. अधीरपणें नसावें. दुर्मदासीं दूर ठेवावें. अपरिचितासी ओळ-

खावें. दुरूनच बोलावें. उपाधीपासून दूर असावें. उपाधींत न सांपडावें. लीनत्व पहिलेंच घ्यावें. मूर्खत्व सोडून द्यावें. दोष अवगुणातें झांकावें. दुर्जन दंडून सोडावें. दरिद्रियावरी उपकार करावें अमित भाषण बोलावें. कोणतेही तऱ्हेतऱ्हेसी न जावें. कार्य करणें तेंचि करावें. अकार्यी मन न घालायें. होईल तेंचि करावें. न होण्याचें तें करण्याचा अभिमान धरूं नये. धरल्या होय ऐसें साधन पहावें. साधनीं फार न झटावें. दीर्घ प्रयत्न झाल्यास करावें. केलें कर्म न सोडावें दुसरे याचें अभिष्ट जाणावें. बहुत यत्नें करावें. न होय तरी नम्र असावें. दुःख कोणासही न द्यावें. अपार पाठांतर करावें. सदासर्वदा तत्पर ईश्वरचरणारविंदवत् स्वामीसेवेंत रहावें. शांति मनीं ठेवून वर्तावें. सत्क्रियेनीं चालावें. राजदंड उगाच न करावा. अपराधीयासी दंडोन सोडावें. लोक पारखोन सोडावें. पुनः मेळवूनी घ्यावें. ऐशा नाना प्रकारच्या युक्ती बैसोन कोण्ही बोलती, परंतु प्रसंगीं नानामाधार घेतीं ऐसें पुरुषी न चालावें. सदासर्वदा स्वामिसेवा एकनिष्ठेनें करून कार्याकरितां श्रम करावें. श्रम करून कार्य करून घ्याव. श्रम कारितात त्यांस श्री अभयपूर्वक यश देतों, हा निश्चय मनीं सदृढ धरूनी चालावें. इहलोकीं भलेपणा मेळवून घेतला तर परलोकीं मुक्तीस गेला हे निश्चयत्वे मनीं धरून वर्तत जावें. यांत श्रेयस्कर सर्वोपरी जाणावें. बहुत काय लिहिणें. लोभ करीत जावा हे विनंति."

वरीलपत्र मराठ्यांच्या सत्तेस उतरती कळा लागण्यापूर्वीचें आहे. लोप पावलेल्या ब्राह्मण्याचें व स्वधर्माचाराचें पुनुरुज्जीवन करण्याकरितां शिवाजी महाराजांचा अवतार झाला असें या पत्रांत स्पष्ट म्हटलें आहे. त्याच प्रमाणें शिवाजी महाराजानीं व त्यांचें पश्चात् सेनापती दाभाडे व पेशवे यांनीं ब्राह्मणद्वारा वेदांचें रक्षण कोणत्या रितीनें केलें याचा हि स्पष्ट उल्लेख वरील पत्रांत केला आहे. हा पुरावा लक्षांत घेतला असतां मल्हार रामरावकृत सप्तप्रकरणात्मक चरित्रांतील शिवाजी महाराजांच्या स्वराज्य स्थापनेच्या ध्येयाचें स्वरूपाविषयीं जे उल्लेख आले आहेत ते दंतकथात्मक भाडकथांच्या स्वरूपाचे नसून पूर्णपणें विश्वसनीय असे ऐतिहासिक सत्यकथनाचे स्वरूपाचे आहेत असें पूर्णपणें शाबीत होत आहे. आतां मल्हार रामरावचिटणीसकृत सप्तप्रकरणात्मक चरित्रांतील शिवाजी महाराजांच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयींचे कांहीं महत्वाचे उतारे आम्ही खालीं देतों. शिवाजी महाराजांचें सप्तप्रकरणात्मक चरित्र इ. स. १८११ सालांत मल्हार रामराव चिटणीस यांनीं रचिलें. पुरातन अस्सल

कागदपत्रांची सर बखरीस येणार नाहीं या विधानांत जरी कांहीं ग्राह्यांश असला तथापि आमच्या समजुती प्रमाणें बखरींची किंमत ऐतिहासिक सत्य कथनाच्या दृष्टीनें अगदीं अल्प आहे अशांतला भाग नाहीं. स्वराज्यस्थापना व स्वराज्य प्रसार करण्यांत शिवाजी महाराजांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें याचें यथायोग्य दिग्दर्शन सप्तप्रकरणात्मक चरित्रांत केलें गेलें आहे अशी मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनग्रंथातून या मुद्यासंबंधीं जो पुरावा आह्मास आढळला आहे त्या वरून पूर्ण खात्री झाली आहे. प्रस्तुत ज्या मुद्याची चर्चा आह्मी करीत आहों त्या मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें सप्तप्रकरणात्मक चरित्रांतील व शिवदिग्विजयांतील कांहीं उतारे या ठिकाणीं देणें अपरिहार्य झालें आहे. त्यास आमचा नाइलाज आहे.

## शिव छत्रपती माहाराजाचे सप्तप्रकरणात्मक चरित्र

पान १

मल्हार रामराव चिटणीस यांस शाहू नृपति यांनीं (१७३४) आज्ञा केली ऐसीजे, तुम्ही पुरातन सेवक लेखनाधिकारी, याजकरितां पूर्वीपासून माहाराजांचे कुळाचे ठायीं परम प्रतापी पूर्वज होत आले, त्यांनीं पराक्रम केले, सार्वभौम राज्यें केलीं, तदनंतर काळें करून म्लेंछराजे होऊन संपूर्ण पृथ्वींतील धर्मच्छेद केला, श्री देव ब्राह्मण तीर्थें व क्षेत्रें गायी व प्रजा यास पीडा नानाप्रकारें करून बहुत केली असतां पुन्हा श्री शिवछत्रपति अवतार होऊन धर्म स्थापना केली व राज्य आक्रमण केलें, त्याजपासून आजपर्यंत राज्योपभोग वंशपरंपराग. दक्षणचे ठायीं कसे केले, पराक्रम काय केले, हें चरित्र पूर्वील दाखले व.. लिहून ठेविलें असतां सकल विद्या व गुण संपन्नता व शौर्य औदार्य ·ांभीर्य दयानीति हें सहज उत्पन्न होत असावें." म्हणून आज्ञा झाली.

पान ७

दक्षणेंतील धर्म उच्छेद झाला. ब्राह्मणास पीडा बहुत; गोवध अपरिमित; देवस्थानें क्षेत्रें यज्ञयागादि यांचा उच्छेद झाला. दिल्लीपती यानें हिंदुराजाचे तहामुळें, बहुत धर्मोच्छेद केला नाहीं, परंतु सहा यवनांनीं फार अमर्यादा केली, तें ईश्वरास न साहे.

पान २९–३०

त्या समयीं माहाराजांनीं विचार केला जे, आपण वडीलांनीं मेळविलेले

खाऊन राहाणें योग्य नाहीं.आपण हिंदु सर्व दक्षण देश म्लेछांनीं ग्रासिला देव ब्राह्मण गायींस क्षेत्रांस पीडा केली. धर्म बुडविला. हा रक्षणार्थ प्राण हीं वेंचून धर्म रक्षू व आपळें पराक्रमानें नवीन दौलत संपादूं तें अन्न भक्षूं"

पान ३३

मावळें सारीं सोडाविलीं. जवळ जवळ पुंड देशमुख पाळेगार होते ते ममतेंत घेऊन आपेल केले. राज्य साधून म्लेंछांचें पारिपत्य करून माहाराष्ट्र धर्म रक्षणें तेव्हां ज्यास जसे आपल होतील तसें करावें. विपरीत दिसल्यास पारिपत्य करावें.

पान ३६

राजे (शाहाजी) यांनीं शिवाजी राजे यांस पत्र लिहिलें; "तुमचे वर्तणुकीनें आह्मांवर इतराजी झाली या करितां हें नीट नव्हे. या उपरि पादशहास जाऊन भेटावें, आणि त्याचे आज्ञेप्रमाणें किल्ले कोट मुलुख सोडून द्यावा" असें बहुत प्रकारें लिहिलें. ते समयीं माहाराजांनीं विचार केला जे, वडील देवाप्रमाणें. त्यांची आज्ञा ती शिरसावंद्य; परंतु सर्व धर्म बुडाला, सर्व म्लेंछमय झालें, यांचा उच्छेद करून धर्म रक्षण्यास जीवादारभ्य श्रम करावा हें आम्हांस करणें, तेव्हां वडिलीं लिहिलें तसें कसें चालावें ! हें मनांत आणि त्याहून हें श्रेयस्कर हा मार्ग अवलंबिला. आह्मांकरितां वडिलांवर पातशाहाची गैरमर्जी, यास्तव वडिलांस श्रम वाटत असतील त्याचा विचार कसा करावा ? शिवाजी महाराजांची स्त्रि सईबाई इनें माहाराजास या बाबतींत खालील सल्ला दिला (पान ३७) राज्य साधावें, देव ब्राह्मणाची स्थापना करावी, धर्म रक्षावा ही इच्छा धरली हें योग्य. देवावर भार घालून चालावें. यश देणार तो समर्थ आहे.

पान ४२

पूर्वी धर्माची ग्लानी झाली. देवब्राह्मण गायींस पीडा झाली असतां पूर्व युगांतरी देवानें मनुष्यवेशें अवतार धरून, महानऋषि हे भूदेव होऊन धर्म स्थापना करावी, तसेंच कलयुगाचे ठायीं धर्म उच्छेद झाला असतां ईश्वरी अंशरूप राजे हाऊन कर्म ज्ञान उपासना कांडत्रयात्मक वेदमार्ग दाहा हजार वर्षे पर्यंत स्थापावा असें विष्णुपुराणाचे ठायीं आहे, त्या अन्वयें म्लेंछमय पृथ्वी झाली धर्म उच्छेद झाला, गायी

ब्राह्मणांस पीडाही झाली, या करितां शिवाजी राजे हे पूर्वी श्रीचें वरदानें निर्माण झाले. त्यास बुद्धि म्लेंछांचा उच्छेद करावा आणि धर्म स्थापवा ही झाली. त्या आधारेंच त्यांस साह्यभूत ऋषि अवतार सत्पुरुष, पूर्व कालाचे ठायींप्रमाणें, बहुत निर्माण झाले. कलयुगाचे ठायीं मुख्य धर्म उपासना नामस्मरण कीर्तन हे सुलभ उपाय यांची स्थापनाही ते स्थापिते झाले."

यापुढें बखरीमध्यें चिंचवडचे मोरया देव, रंगनाथ स्वामी निगडीकर, विठ्ठलराव, रंगनाथ स्वामीचें बंधु, जोश वामन शिगाटाचें, निंबाजी बावा दहिठणकर, बोधलबोआ, जयराम स्वामी, केशवस्वामी भागानगरकर, परमानंदबोआ पोलादपूरकर, त्र्यंबक नारायणाश्रम बोआ, मोनी बोआ पाटगांवकर, अचलपुरी गोसावी, तुकाराम बोआ, समर्थ रामदास स्वामी इत्यादिकांचीं नांवें किर्तन भाक्ति उपासना स्थापन करणारापैकीं प्रमुख ह्मणून बखरकारानें नमूद केलीं आहेत.

पान ५३

स्वामीनीं आज्ञा केली. त्या अन्वयें परमार्थ व प्रपंच राज्य प्रजापालन धर्मस्थापना करिते झाले. ...... आणि म्लेंछ याचा पराभव करून गोब्राह्मणास पीडा होत होती ती दूर करून धर्म स्थापिला, आणि राज्य संपादिलें. तें राज्य धर्मांप्रमाणें चालाविण्यासारखीं मनुष्यें योजून त्यांजवर आपण पाहात; आणि कांहीं परत्र साधन करावें याकरितां साधूचा सहवास वरचेवर जाणें येणें तेही करीत.

पान ७४

नतर माहाराजानीं विचार केला जे, आपण किल्ले कोट प्रांत घेतला, फौज व पागा आपल्याजवळ झाली, जागा जागांचे माणूस उत्तम तितके आपण जमा केले, हषमी लोक जाग आगांचे नामी ठेविले, तसेंच सर कारकून ही मोठे शाहाणे कर्ते मेळविले, आपण धर्मस्थापनेची इच्छा धरिली, हिंदु धर्म स्थापना हेच मानस होते, तसेंच देवीनें कृपा करून आजपर्यंत आपणाकरवीं घडाविलें पुढें ही शेवटास देवच नेणार, म्हणून आक्रम केला, राज साधिलें, याचा पाया रीत घालून धर्में करून प्रजा पालन करणें हें सिद्धिस न्यावें, म्हणून चित्तास आणून 'पूर्वी जे जे राजे धर्में करून वृद्धिस पावले ते कोणते रीतीनें

चालले, शास्त्राचे ठायीं पुराणांतरीं महान राजे आचरण करीत आले त्या अन्वयें आपण ही करावें असें केलें.

पान १५८

ते समयीं बाळाजी आवजी चिटणीस यांणीं उठोन विनंती केली जे, सर्व जे जे मनोरथ स्वामीनीं केले ते दुर्घट असता ही घडले त्यांतच काय अशक्य आहे ! चार वेद साहा शास्त्रें असें ज्याचें अध्ययन असें श्री काशींत मुख्य भटांचे घर आहे. त्यांतील धर्म प्रवृत्ति ग्रंथ त्यांज पासून उत्पन्न होतात, तेच धुरीण पंडित गागाभट्ट आनायासें पैठण येथें माहाराजांची कीर्ती श्रवण करून आले आहेत. त्यांस व पैठणचे पंडितास आणून त्यांचे विचारे सिद्धता करावी.

पान १६७

याप्रकारें माहाराजांनीं राज्याभिषेक समारंभ व तरतूद अत्यद्भुत केली. धर्मस्थापना करून, राज्य करण्याचे धर्म, यवनाक्रांत पृथ्वी होऊन लोपले होते ते पुन्हा जिर्णोद्धार करून स्थापिले. शिसोद्यां कुळांत उत्पन्न होऊन कुळभूषण कुळधर्म स्थापना केली. तसेंच जमाखर्ची लिहिणें मडती हिशेब लिहिण्यास यवनी नांवें मोडून गजशाळा, अश्वशाळा, भंडारगृह, वरुनागार, पाकशाळा ऐसीं नामें ठेवून लिहिणें करावें तसें केलें. अष्टप्रधानांचे व्यापार पूर्वीची शास्त्रपद्धती काढून चाली पाहून केले.

मुख्य प्रधान, सेनापति, अमात्य, सचिव, मंत्री, सुमंत, पंडितराव यांणीं धर्माधिकार, सर्व पंडित जन यांचे व विद्वान् ब्राह्मण यांचे सन्मान करावे, व धर्माधर्मविविक्षा यज्ञ करणें व शांतिक, पौष्टिक, नित्य, नैमित्तिक काळाचे काळीं सुचवून करवावें. दंड कोणास कसा करावा हा धर्म पाहाणें प्रायश्चिताचे निर्णय व त्यांची पत्रें होतील, त्यांजवरी समंत असे चिन्ह करावें चिटणीस फडणीस

शिव दिग्विजय

पान १८९

माहाराजांनीं वस्त्रें अलंकार आणवोन ते स्त्रियेस दिल्हे, पालखी घेऊन माघारी पाठविली. सुभेदारांस आज्ञा केली कीं, तिजला भ्रतार करून देणें, आणि तिचा निर्वाह चालविणें बोभाटा येऊं न देणें. या उपरी अशी करणी

कोण्ही केल्यास, कार्यास येणार नाहीं. असा संबंध करावा, धर्माचा लोप व्हावा, तेव्हां जनास शिक्षा कशी लागेल ? आपले धर्मानीं संपूर्ण जातीनें वर्तावें " अशी निविष्ट ताकीद होतांच सर्वांस दहशत पडली.

पान २०१

या देहामुळें वडिलांच्या शरीरास यातना अनेक प्रकारच्या जाल्या. पुत्रधर्मास विरुद्ध आलें, त्या अर्थी हें शस्त्र घेऊन शिरच्छेद करावा; ह्मणजे कृतकृत्य परिपूर्ण जालें. असें भाषण ऐकून परम सद्गदित होऊन, नेत्रीं विमलांबुधारा येऊन शिवाजी माहाराजास पोटाशीं धरून, अभिषेकिलें आणि माहाराजांची स्तुति करिते जाले. जशीं भगीरथें पूर्वी साहास करून, भागीरथी आणिली किंवा परशुरामानें पृथ्वी निःक्षेत्री केली तैसेच बारे, तूंही धर्मस्थापनार्थ उदित होऊन वर्णाश्रम धर्मं प्रजेस वर्तवूं लागलास. हें ऐकून पाहून बहुत संतोषी जालों, केवळ शिवच वशीं साक्षात अवतार घेऊन दुष्टांचा नाश करून धर्म वृद्धिंगत चालविला ह्मणोन आमचे वाडिलांस श्री आदिमाया जगदंबेनी वर दिल्हा तो तूं प्रत्ययास येऊन प्रजा संरक्षण करिता जालास.

पान १८२

हल्लीं कलियुग धर्म. धर्मप्रवृत्तीचा लोप होऊन, तेव्हां प्रथम विचारें शत्रु उच्छेद करणें. त्या प्रसंगांत हत ह्मणजे नष्ट झाला तरी वृक युद्ध किंवा त्या चित्ताचें युद्ध महाराष्ट्र धर्मी युक्त योजना केली.

२१४

बायकोचे हातून हे काम करवीन, त्याप्रमाणें तीही सरकार काम नेकीनें बजावून राहिली, तरी माहाराष्ट्र धर्म तुमचा नाहीं तर ठीक नाहीं ' ते समयीं उत्तर केलें कीं, " स्त्रिशीं युद्ध निंध्य " त्याचें उत्तर बापलेक युद्ध वध आहे. त्यापेक्षां स्त्रि शस्त्र विरहित न मारावी. शस्त्र धारण केलें असतां निंद्य नाहीं. "

पान २१२

दौलताबादची पादशाहात अवरंगजेबानी मोडली. ऐशियास तेथील वजीरी मनबदारी वडिलार्जित आमची. त्या जागेचे मालक आह्मी असोन, दिल्लीपती संबंध काय आहे ? सेवक जन दुसरे देशांतरास गेले. मालक गेल्यामुळें दिल्लीपतीशी विभांडून घेण्याचें नाहीं. उन्मत्त धण्यास देशधडी लाविलें. सर्वस्व घेतलें. जन अन्नान्न करावयास लाविलें. स्वामित्व करण्याचे धर्म, अभि-

कारी, इनामदार जमीदार, रयत जेथें असेल तेथून त्यास आणोन, ज्याची वृत्ति जी असेल ती त्यांजला सोंपून आपण स्वामित्व ठेवून वर्तवावें. तें कांहींच न करितां मदांध बुध्यां सर्वांचा उपमर्द केला. त्याचें शासन इश्वर करील. तरी मालकाचा सूड मी घेईन. असें माहाराज बोलून, दिल्लीपतीशीं स्पर्धा करावी, असें सर्वांचे ठरल्यावरून इत्यादि.

पुढील एका प्रकरणांत मल्हार रामराव कृत राजनीतींल कांहीं महत्वाचे उतारे आम्ही दिले आहेत त्या उताऱ्याचे योगानें सप्तप्रकरणात्मक चरित्रांतील वर दिलेल्या उताऱ्यावर चांगला प्रकाश पडणार आहे. प्रस्तुत प्रकरणांतील विषयाच्या चर्चेच्या दृष्टीनें वरील उताऱ्यांतील चर्चाविषयक मुद्याच्या दृष्टीनें महत्वाचा भाग मुद्दाम जाड टाईपांत दर्शविण्यांत आला आहे.

वर दिलेले उतारे हे बहुमोल असून त्यावरून धर्म या संज्ञेचा अर्थ व व्याप्ति याचा खुलासा उत्तम प्रकारें होत आहे. आतां शेवटीं वर नमूद केलेल्या तिसऱ्या सदरांत पडणारा आणिक एक पुरावा नमूद करून स्वराज्य स्थापना करण्यास शिवाजी महाराज कोणत्या ध्येयानें प्रवृत्त झाले होते. व त्या ध्येयाचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें या विषयीची चर्चा पुरी करूं. या पुढें आम्ही जो पुरावा देणार आहोंत तो पुरावा म्हणजे नुकतेच प्रसिद्ध झालेले फारशी भाषेंतील शिवाजी महाराजांनीं मिर्झा राजा जयसिंग यांस लिहिलेलें पत्र हा होय ( इतिहास मंजरी पान १४९ ). मिर्झा राजा जयसिंग यांस शिवाजी महाराजांनीं हें पत्र खरोखरच लिहिलें होतें कीं काय याबद्दलचा कांहीं खात्रीलायक पुरावा पुढे आलेला नाहीं अशा प्रकारचा पुरावा पुढें आला असतां तर या पत्राचें महत्व श्रेष्ठ दर्जाचें ठरलें असतें परंतु अशा प्रकारचे पुराव्याच्या अभावी खुद्द शिवाजी महाराजांनींच हे पत्र जयसिंगास लिहिलें असें म्हणतां येणार नाहीं असे स्थितींत पुराव्याचे दृष्टीने या पत्राची किंमत किती करावयाची हा प्रश्न आहे. हें पत्र खुद्द शिवाजी महाराजांनें नसून कोणी तरी शिवाजी महाराजांचे म्हणून बनावट लिलिलेले असलें किंवा काव्यसृष्टींत भराऱ्या घेणाऱ्या एकाद्या कवीचे डोक्यांतून तें निर्माण झालें असलें तरी त्याची किंमत काहीं कमी आहे असें समजणें बरोबर होणार नाहीं. ज्या काळांत हें पत्र लिहिलें गेलें त्या काळीं शिवाजी महाराजांच्या ध्येयाचें स्वरूप कोणत्या प्रकारचे होते या विषयीच्या पत्र लिहिणारांच्या समजुती उत्तम प्रकारे या पत्रांत प्रतिबिंबित झाल्या आहेत. या दृष्टीनें विचार केला असतां हें पत्र शिवाजी

महाराजांचे असलें काय किंवा त्यांचें नांवचें म्हणून दुसरे कोणी बनविलें असलें काय ? त्याची किंमत कमी प्रतीची आहे असें ह्मणतां येणार नाहीं. सप्तप्रकरणात्मक चरित्रांत शिवाजी महाराजाच्या स्वराज्य स्थापनेच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयींचें दिलेले उतारे लक्षांत घेतलें असताह्या पत्रांतील विचार शिवाजीमहाराजांच्या विचारांशी तंतोतंत जुळतात. असें स्पष्ट दिसून येत आहे. अशा स्थितींत पुराव्याच्या दृष्टीनें हें पत्र निवळ त्याज्य नसून कांहीं किमतीचे आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. या पत्राचे बाबतीत एवढी प्रस्तावना करून हें पत्र आह्मी वाचकास सादर करितों.

" हे राजाधिराज जयसिंहा ! तुझ्यामुळें रजपुतांची मान वर राहिली आहे. बाबरवंशाची राज्यलक्ष्मी तुझ्यामुळें प्रबल झाली आहे. जगज्जनक परमेश्वरानें तुला धर्म व न्याय याचा मार्ग दाखवावा. मी असे ऐकिले आहे कीं, तूं मजवर हल्ला करून दक्षिणप्रांत जिंकण्यासाठीं येत आहेस. हिंदूंच्या हृदयाच्या रक्ताने जगात तूं ताम्रमुखी मोगलांना यश मिळवून देण्याची इच्छा करीत आहेस, पण तुला हे समजले नाहीं कीं, या कृत्याने तुझ्या तोंडास काळोखी फासली असून देश व धर्म यावर आपत्ति ओढवली आहे. जर तूं आपल्याच बळावर दक्षीण दिग्विजय करण्यासाठीं येत असशील तर मी माझें शीर तुझ्या रस्त्यावर बिछान्यासारखें खालीं घालण्यास तयार आहे. व मी मोठे सैन्य घेऊन सर्व देश जिंकण्यास तुला मदत करीन. पण सज्जनांना धोका देणाऱ्या औरंगजेबाच्या थापेस भुलून तू त्यांच्याकडून आला आहेस. आतां तुझ्याशीं कोणता डाव खेळावा हे मला समजत नाहीं. तुझ्याशीं मिळून जावें तर त्यात मर्दपणा नाहीं; कारण पुरुषानें समयाची सेवा करूं नये. बरें, तरवार घेऊन लढण्यास यावें तर दोन्हही बाजूनें हिंदूंचाच नाश होणार. मोठ्या दुःखाची गोष्ट आहे की मुसलमानाचें रक्त पिण्याखेरीज इतर कोणत्याहि कामानिमित्त माझी तरवार म्यानांतून बाहेर आली नाहीं. जर या लढाईसाठीं तुर्क आला असता तर आम्हा शूर पुरुषांना घरबसल्या शिकार साधली असती. अफजलखां व शाइस्तेखां यांच्या हातून काम निभेना म्हणून तुला मजवर स्वारी करण्यासाठीं पाठविलें आहे; कारण स्वतः औरंगजेब आमचा हल्ला सहन करूं शकणार नाहीं. त्याची अशी इच्छा आहे कीं जगांत हिंदूंच्या सैन्यांत बलशाली असा कोणी राहूं नये; सिंहांनीं आपसांत लढून घायाळ व्हावें. आम्हां लोकांशीं मिळून हिंदूना धुळीस मिळवावें अशी

जगांत हिंदूंच्या सैन्यांत बलशाली असा कोणी राहूं नये; सिंहांनीं अपसांत लढून घायाळ व्हावें. आम्हां लोकांशीं मिळून हिंदूना धुळीस मिळवावें अशी तुझी इच्छा नसावी. जर तुझ्या तरवारींत पाणी असेल व घोड्यांत दम असेल तर **हिंदुधर्माच्या शत्रूवर हल्ला करून इस्लामाची पाळेंमुळें खणून काढ.** मोठे श्रम करून एखादी सुंदर स्त्री हस्तगत करावी आणि ती शत्रूच्या स्वाधीन करावी अशांतला क्षुद्रपणाचा प्रकार तूं करी आहेस. औरंगजेबानें आपल्या भावाचें व बापाचें रक्त सांडण्यास कमी केलें नाहीं. तेव्हां तुला जर परमेश्वरानें बुद्धि दिली आहे व पुरुषत्वाची चाड असेल तर तूं आपल्या जन्मभूमीच्या संतापानें आपली तरवार तापीव व अत्याचारानें दुःखित झालेल्यांच्या आसवांचें तिला पाणी दे. ही वेळ हिंदूंनी आपसांत लढण्याची नव्हे. कारण त्यांच्यावर मोठा कठीण प्रसंग ओढवला आहे. **आमची पोरेंबाळें देश, धन व देवालयें यांच्यावर आपत्ति कोसळली असून असाच प्रकार चालू राहिल्यास आमचें कोणतेंच चिन्ह पृथ्वीवर शिल्लक राहणार नाहीं.** एक मुठभर मुसलमानांनीं या देशावर प्रभुत्व गाजवावें ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. हें प्रभुत्व त्यांच्या पुरुषार्थाचें मुळ नव्हे. कारण आमचे पाय आमच्यांत अडकवून आमची तरवार आमच्यांत डोक्यांत तो घालीत आहे. **आम्ही लोकांनीं यावेळीं हिंदु हिंदुस्तान व हिंदुधर्म यांच्या संरक्षणासाठीं** फार प्रयत्न केला पाहिजे. आपल्या देशासाठीं खूप हातपाय हालवावें अशी आमची इच्छा आहे. तरवार गाजवून तुर्कांचा जबाब तुर्कांतच द्यावा. जर तूं मेवाडच्या राजासिंहाशीं एकी करशील व कपट सोडशील तर मोठें काम होईल अशी आशा आहे. चोहोंकडून हल्ला करून या सापाचें डोके दगडांनीं ठेचून टाका, म्हणजे दक्षिण प्रांताकडे तो आपले जाळें पसरणार नाहीं. तेवढ्यांत मी भाला चालविणाऱ्या वीरांना घेऊन ( विजापूर व गोवळकोंडा येथील ) दोन्ही बादशहांना काढून लावतो; आणि दक्षिण देशांत या टोकापासून त्या टोकापर्यंत इस्लामाचें नांव किंवा खूण राहू देत नाहीं. यानंतर कार्यदक्ष शूर स्वारांच्या लाटांनीं गजबजलेली सैन्यनदी दक्षिण देशातील पहाडांतून मैदानांत आणून तुमच्या सेवेस हजर होईन व तुम्हास हिशेब मागेन. चार ही बाजूंनीं घनघोर युद्ध उठवून आम्ही आपलें सैन्य दिल्लींत पोचवूं. आम्ही शुद्ध रक्ताची नदी वाहवून पितृतर्पण करूं. परमेश्वरी साहाय्यानें आम्ही त्यांना खालीं पाहू. हें काम फार कठीण

आहे. हृदय, डोळे व हात यांची आवश्यकता आहे. दोन हृदयांचें ऐक्य झाल्यास डोंगर फोडतां येतो व मोठ्या जमावाच्या ठिकऱ्या उडवितां येतात. या संबंधीं मला तुमच्याशीं कांहीं बोलावयाचें आहे; तें पत्रांत लिहिणें अप्रशस्त. तुझी इच्छा असेल तर मी तुझ्या भेटीस येईन व तुझें ह्मणणें ऐकेन. आपल्या कार्यसिद्धीचा रस्ता काढून इहपरलोकीं तुझी कीर्ति मिळवा. तरवार, घोडा, देश व धर्म यांची शपथ घेऊन सांगतों कीं असें केल्यानें तुझ्यावर केव्हांहि आपत्ति ओढवणार नाहीं. अफजलखानाच्या परिणामानें तूं शंकित होऊं नकोस. कारण त्याच्या ठिकाणीं खरेंपणा नव्हता. बाराशें हब्शी स्वार मला मारण्यासाठीं त्यानें आणले होते. तेव्हां मी त्याच्यावर हात चालविला नसता तर हें पत्र तुला कोणीं लिहिलें असतें ! मला तुझ्याशीं असलें काम करावयाचें नाहीं कारण तुझ्यामाझ्यांत शत्रुभाव नाहीं. जर मला तुझें उत्तर आलें तर मी रात्रीं एकटा भेटीस येईन. तेथें शाइस्तेखानाच्या खिशांतून काढून घेतलेलें गुप्त पत्र मी तुला दाखविन. जर हें पत्र तुह्मास पसंत न पडले तर मी व माझी तिखट तलवार आहे आणि तुझी सेना आहे. उद्यां सूर्यास्तापासून माझी तलवार म्यानांतून बाहेर पडेल."

वरील पत्रांत ठिकठिकाणीं देश व धर्म यांचा उल्लेख आलेला असून त्यांचे वर कोणतें संकट आलें आहे याचें दिग्दर्शन करण्यांत आलें आहे. " आम्ही लोकांनीं या वेळीं हिंदु हिंदुस्थान देश हिंदु धर्म यांच्या संरक्षणासाठीं जबर प्रयत्न केला पाहिजे " या वरील पत्रांतील लहानशा वाक्यांत शिवाजी महाराजांनीं आपल्या ध्येयाचें पूर्ण दिग्दर्शन केले आहे. हिंदु लोक, हिंदुस्थान देश व हिंदु धर्म यांच्या रक्षणाकरितां शिवाजी महाराजांनीं स्वराज्य स्थापना व स्वराज्य विस्तार केला ही गोष्ट मागें नमूद केलेल्या पुराव्यावरून सिद्ध झालेली आहे व त्याच बाबीचा उल्लेख वरील पत्रांत करण्यांत आलेला आहे. प्रस्तुत विवेचनाचे सुरवातीस दर्शविल्या प्रमाणें शिवाजी महाराजांचे काळीं महाराष्ट्रीय समाजाचे जे दुसरे राजकारणी पुढारी होते ते सर्व त्यांचे अनुयायी व सहाय्यकारी असल्या कारणाने त्यांचें ध्येय शिवाजी महाराजांच्या ध्येयाप्रमाणेंच असलें पाहिजे असें आम्हीं पूर्वीच ह्मटले आहे, व हे मागें नमूद केलेल्या पुराव्यावरून सिद्ध होत आहे. शिवाजी महाराज व त्यांच्या समकालीन महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांच्या ध्येयाचे स्वरूपाबद्दलचें विवेचन पुरें करून शिवप्रश्चातकालिन महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांच्या ध्येयाच्या चर्चेकडे आतां आह्मी वळतों.

**शिवाजी महाराजांचे अवतार समाप्तीपासून मराठी साम्राज्य लयास जाई पावेतों झालेल्या महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांच्या ध्येयाचें स्वरूपः—**

आतां पावेतों शिवकालीन महाराष्ट्र समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांच्या ध्येयाच्या स्वरूपाबद्दलची चर्चा केली. यापुढें शिवाजी महाराजांचे पश्चात् महाराष्ट्र समाजाचे जे राजकारणी पुढारी होऊन गेले त्यांचे मराठ्यांच्या राज्याचा विस्तार करण्यांत कोणत्या प्रकारचें ध्येय होते हें निश्चित करण्याकरितां कोणत्या स्वरूपाचा पुरावा आपणास उपलब्ध झाला आहे व त्यावरून कोणत्या बाबी निष्पन्न होतात इत्यादि विषयांची चर्चा करण्याचें आम्हीं ठरविलें आहे. शिवाजी महाराजांचे पश्चात् त्यांचे ज्येष्ठ पुत्र संभाजी महाराज हे मराठी राज्याचे गादीवर अधिष्ठित झाले. व्यसनाच्या तावडींत संभाजी राजे हे पूर्णपणें सांपडले असल्या कारणानें त्यांची छोटीशी कारकीर्द शोकपर्यवासी झाली. संभाजी राजे हे जरी व्यसनाधीन होते तथापि धर्म रक्षणार्थ स्वराज्य स्थापना करण्यात आली आहे ही जाणीव त्यांचे कारकीर्दींत पूर्णपणें अस्तित्वांत होती.संभाजी महाराजांचे कारकीर्दीतील एका बाटलेल्या ब्राह्मणांस प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून घेतल्या बद्दलचें एक आज्ञापत्र म. इ. सा. खंड ८ मध्यें प्रसिद्ध झालें आहे.(लेखांक४०).त्या पत्रांतील खालील उल्लेखावरून वर्णाश्रम धर्मव्यवस्थेचें परिपालन संभाजी महाराजांचें कारकीर्दीत केलें जात असे असें दिसून येत आहे :—

" राजश्री छत्रपति स्वामीपासी रायगडास येऊन एक वर्ष गंगाधर रंगनाथ " दरबारी आपणास प्रायश्चित्त द्या ह्मणऊन सर कारकून व न्यायाधीश व उपाध्ये व दानाध्यक्ष व भले भले व ब्राह्मण व समस्त आपले ज्ञातीस शरण येऊन प्रायश्चित्त मागत होता. या उपरी समस्त राजकार्य धुरंधर वर्णाश्रम धर्म प्रतिपालक छंदोगामात्य स्वामी यास सर्व वर्तमान विदित झालें. त्या नंतर त्याहि ब्राह्मणाचे कष्ट व अनुताप बहुत देखोनी राजश्री छत्रपति स्वामीस त्याचा वृत्तांत विदित केला. छत्रपति कृपाळू होऊन प्रायश्चित्त द्यावयासी आज्ञा दिल्ही. यो उंपरी आह्मी राजश्री छंदोगामात्य यांचे सभेसी समस्त विद्वद्वैदिक ब्राह्मणांचे संमतीनें मिताक्षरादि निबंध पाहून प्रायश्चित्त निर्वाह करोन गंगाधर रंगनाथ यासि प्रायश्चित्त संकल्प सांगोन श्री यात्रेस पाठविला. "

वरील उताऱ्यावरून वर्णाश्रम धर्म व्यवस्थेनुरूप वर्तन करण्याची

भावना संभाजी राजे यांचे ठायीं जागृत असल्याचें दिसून येतें. संभाजी महाराजांचे हातीं राज्यसूत्रें येतांच शिवाजी महाराजांचे तालमींत तयार झालेल्या प्रमुख मुत्सद्यां पैकीं कांहीं संभाजी महाराजांचे क्रोधाग्नीस बळी पडले. शिल्लक राहिलेल्या मुत्सद्यांवर विश्वास नसल्या कारणानें राज्याचीं सर्व सूत्रें कलुशा सारख्या सामान्य प्रतीच्या माणसाचे हातीं गेलीं. अश्या स्थितींत वर दिलेल्या उताऱ्याखेरीज संभाजी महाराजांचे ठायीं कांहीं उच्च प्रकारचें ध्येय वसत असावें असें मानण्यास थोडा बहुत हि पुरावा उपलब्ध होऊ नये यांत आश्चर्य नाहीं. अवरंगजेबासारखा प्रबळ शत्रु प्रत्यक्ष घरांत शिरला असतां शिवाजी महाराजांसारखा धर्म संस्थापनेच्या उच्च ध्येयानें प्रेरित झालेला असा महाराष्ट्रीय समाजाचा पुढारी त्या काळीं अस्तित्वांत असता तर महाराष्ट्राच्या त्या काळच्या इतिहासास एक अद्भुत व अपूर्व असा रंग चढला असता. परंतु ईश्वरी सूत्र कांहीं निराळेंच असल्यानें महाराष्ट्राच्या इतिहासास तशा प्रकारचा रंग चढण्याचा योग आला नाहीं. अखेर संभाजी महाराजांची कारकीर्द कोणत्याहि अपूर्व गोष्टीनें न गाजतां त्यांच्या क्रूरपणानें केल्या गेलेल्या वधाचे योगानें शेवटास आली.[8] संभाजी महाराज हातीं येतांच सर्व दक्षिण हिंदुस्तान काबीज झालें असा औरंगजेबाचा समज होऊन त्यास अत्यंत समाधान वाटलें. त्या वेळच्या औरंगजेबच्या मनःस्थितीचें संभाजी महाराजांच्या चरित्रकारानें काढलेलें हुबेहुब चित्र फार महत्वाचें असून त्या वरून पुढील पंचवीस वर्षांत मराठ्यांनीं औरंगजेबा बरोबर चालविलेल्या गनीमी काव्याच्या युद्धाच्या बुडाशीं मराठ्यांचें कोणतें ध्येय होतें या बाबीवर उत्तम प्रकारचा प्रकाश पडणार आहे. यास्तव बखरकारांनीं काढलेलें शब्दचित्र असेंच्या तसेंच आम्ही खालीं देतोंः—

"दरोबस्त दक्षण साध्य होऊन फत्ते जाली. ते चित्तांत येऊन बक्षीला फौज कलमी किती आहे विचारिले. या उपरी एक वर्ण करावा; हिंदु ठेवूंच नये, म्हणून ओले अन्न विकावें ऐसा हुकूम केला. तेव्हां सर्व वजीर याणी व सरदार याणीं विचार केला जे "पादशहा या उपरी निरंकूश जाले ( म्हणून ) हे बुद्धि जाली. पुढें परिणाम ठीक नाहीं जाणून आसतखान वजीर वगैरे उमराव यास विचार पडला. फौज कलमी विचारली. तेव्हां मसलत राहिली नाहीं, हें जाणून लोक दूर, बडतर्फ करावे म्हणतील व ओले अन्न विकणे याणी हिंदु कसें ऐकतील. परवरदिगार

यांनी जात निर्माण केली ती मोडती हे घडत नाहीं. हे दोन्ही बुद्धि पादशाहास चांगल्या जाल्या नाहींत विनाशकाळ जवळच दिसतो. "

वर दिलेल्या उताऱ्यावरून औरंगजेबाच्या महाराष्ट्रांतील संचाराचें मुख्य धोरण हिंदु धर्माचा उच्छेद करणें हें होतें हें उघड दिसून येत आहे. राजाराम महाराजांच्या आधिपत्यत्वाखालीं मराठ्यांनीं सतत पंचवीस वर्षें जें गनीमी काव्याचें निकराचें युद्ध औरंगजेबाबरोबर चालविलें होतें तें स्वधर्म रक्षणार्थ चालविलें होतें असें वरील गोष्टी वरून सिद्ध होत आहे. औरंगजेबाच्या वर वर्णन केलेल्या ध्येयाचे योगानें महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांत अत्यंत तीव्र अशा प्रकारचा क्षोभ अवरंगजेबा विषयीं उत्पन्न झाला व त्या क्रोधरूपी अग्नींत त्यास अखेर बळी पडावें लागलें. महाराष्ट्रीय जनतेंत व त्या काळच्या महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांत राजारामाविषयीं अत्यंत आदर व प्रेम वसत असे. धर्मस्थापना हें जें शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थापनेचें ध्येय ठरलें गेलें होतें त्या ध्येयाच्या रक्षणाची जबाबदारी शिवाजी महाराजापेक्षां राजाराम महाराजावर औरंगजेबास दक्षिणेचे स्वारींत प्राप्त झालेल्या यशाचें योगानें अधिक पडली होती. या जबाबदारीची जाणीव राजाराम महाराजांस पूर्णपणें होती असें आम्ही यापुढें जें थोडेंबहुत विवेचन करणार आहोंत त्यावरून वाचकांचे निदर्शनास येईल. राजाराम महाराजा विषयीं त्या काळच्या महाराष्ट्रीय जनतेचें जें मत असल्याचें दिसून येतें त्या वरून हि त्यांच्या ध्येयाचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें याचा निर्णय करणें कठीण नाहीं. शिवाजी महाराज अवतीर्ण होण्यापूर्वी महाराष्ट्र देशांत रामराज्य अवतीर्ण होणार अशी सर्वसाधारण भावना महाराष्ट्रीय जनतेंत समर्थ रामदासस्वामींनीं निर्माण करून ठेविली होती. त्याचप्रमाणें शिवाजी महाराजांचा प्रतिस्पर्धी व हिंदुधर्माचा द्वेष्टा औरंगजेब हा रावणाचा अवतार आहे अशी त्या काळच्या महाराष्ट्र जनतेची समजूत होती. जेधे यांचे शकावलींत ( पान १७६ ) —

हनुमंत अंगद रघुनाथाला ।
जेधे बांदल शिवाजीला ॥

अशा प्रकारचा उल्लेख त्या काळच्या एका पोवाड्यांत केला असल्याचें नमूद आहे. महाराष्ट्रीय जनतेच्या त्या काळच्या मनोरचनेचा हा उत्कृष्ट पुरावा आहे. राजाराम महाराज हे दाशरथी रामाचे अवतार आहेत अशा प्रकारचा उल्लेख त्यांच्या बखरकारानें लिहिलेल्या चरित्रांत आहे. हा उल्लेख बखरकाराची

नुसती कल्पना नसून त्या काळच्या महाराष्ट्रीय जनतेचा मूर्तिमंत समज होता असें म. इ० साधनें खं. १५ ले. ४१ वरून सिद्ध होत आहे. या लेखांतील खालील उल्लेख महत्त्वाचा आहे:—

" स्वामीं अवतारी त्या अवतारे बिभीषणाची स्थापना जाहाली तो चिरंजीव जाला तोच हा अवतार दुष्टाचा संहार धर्माची स्थापना होत आहे."

हा उल्लेख मोरो रायाजी पारपत्यगार या नांवाच्या राजाराम महाराजांच्या अधिकाऱ्यानें त्यास लिहिलेल्या एका पत्रांत केलेला आहे. एका वतनाचे व्यवहाराचे बाबतींत लिहिलेल्या पत्रांत राजारामाचे अधिकाऱ्यानें वरील उल्लेख केला आहे ही बाब लक्षांत घेतां राजाराम महाराज हे दाशरथी रामाचे अवतार होते अशी त्या काळच्या महाराष्ट्रीय जनतेची खरोखरची भावना होती हें सिद्ध होत आहे.

बखरींतील दुसरे एक दोन उतारे या मुद्याविषयीं आम्ही खालीं देत आहोंत त्यावरून हि राजाराम महाराजांचे बाबतींत आम्हीं केलेलें विधान खरें असल्याचें दिसून येणार आहे. कृष्णाजी अनंत सभासद यांच्या शिवछत्रपतींचे चरित्राचे २६ व्या पानावर औरंगजेबा विषयीं खालील उल्लेख आहे.

" स्वारी म्हणजे कलीयुगींचा रावण जैसी रावणाच्या संपत्तीची गणना न करवे तैसा बरोबरी खजिना बे मोहीन हत्ती, उंटें, खेंचरें, गाडियावर भरून नक्त व सोने रूपे मोहोरा होन रुपये असें बत्तीस कोटी द्रव्य घेऊन दिल्लीहून निघाला. "

वरील वर्णन करणारा कृष्णाजी अनंत सभासद हा शिवाजी महाराजांचे हाताखालील नोकर होता ही बाब लक्षांत घेतली असतां औरंगजेब व त्याच्या पदरीं असलेल्या मुसलमान सरदाराविषयींची महाराष्ट्रीय जनतेचे ठायीं असलेली भावना जी वरील वर्णनांत त्यानें व्यक्त केली आहे ती बरोबर असली पाहिजे हें उघड आहे.

वरील उताऱ्या प्रमाणेंच राजाराम महाराजांच्या चरित्रांतील पान ४२ वरील खालील उतारा लक्षांत घेण्यासारखा असून त्यावरून मराठी सैन्यांतील लोकांची औरंगजेबाचे सैन्याबरोबर लढण्यांत कोणत्या प्रकारची मनोभावना होती हें सिद्ध होत आहे:—

"पादशहाची फौज प्रांतांत फिरत असतां खातरेंत न आणतां, रामसैन्या प्रमाणें महाराजांचे लोकांही काम करीत असावे."

राजाराम महाराज हे दाशरथी रामाचे अवतार अशा होत प्रकारची त्या काळच्या महाराष्ट्रीय जनतेची सत्य भावना असल्यामुळे दाशरथी रामाप्रमाणेच राजाराम महाराजांचें ध्येय असावयाचें अशा अर्थातच महाराष्ट्रीय जनतेचा समज असला पाहिजे हें उघड आहे. दाशरथी रामाची धर्मास अनुसरून राज्य करणारा अशी सर्वत्र ख्याति होती. या ख्यातीस अनुलक्षून राजारामाविषयींच्या तत्कालीन भावनेचा वर नमूद केलेल्या पत्रांत मोरो रायाजीनें उल्लेख केला आहे. वरील पुराव्या शिवाय राजाराम महाराजांच्या ध्येयाचें स्वरूप निश्चित करण्यास दुसरा कांहीं बळकट पुरावा उपलब्ध झाला आहे कीं काय याचा आतां आपण शोध घेऊं. राजाराम महाराजांचे कारकीर्दीतील दोन मुद्रा प्रस्तुत मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें फार महत्वाच्या अशा उपलब्ध झाल्या आहेत. या दोन मुद्रा म्हटल्या म्हणजे एक राजाराम छत्रपति यांची व दुसरी त्यांचे कारकीर्दीत पंडितराव हे प्रधानपद धारण करणोरे श्रीकराचार्य पंडित यांची या होत. या दोन्ही मुद्रा खालील प्रमाणें आहेतः—

"श्री धर्मप्रद्योतिता शेषवर्णा दाशरथेरिव
राजारामस्य मुद्रेयं विश्ववंद्या विराजते."
"लक्ष्मीकांतपदांभोजभजनाप्तसमुन्नतेः
धर्मसंवर्धिनी मुद्रा श्रीकरस्य विराजते."

या दोन्ही मुद्रांचा अर्थ खालीं लिहिल्या प्रमाणें आहे—

"धर्माला प्रकाशित करणारे आहेत सर्व वर्ण जिच्यांतील अशा रामासारख्या राजारामाची विश्ववंदनीय मुद्रा शोभते."

"लक्ष्मीपतीच्या चरणकमल सेवनानें ज्याचा उत्कर्ष झाला आहे अशा श्रीकराची धर्मवृद्धी करणारी मुद्रा विराजत आहे."

राजाराम महाराजांचे काळीं महाराष्ट्रांतिल लोकांचे धर्मावर औरंगजेबरूपी रावणाचें जें संकट आलें होतें व त्या संकटाचें योगानें जी परिस्थिति निर्माण झाली होती त्या दृष्टीनें वरील मुद्रांच्या अर्थाचा जरा बारकाईनें विचार करणें जरूर आहे. शिवाजी महाराजांनीं जी अष्टप्रधानसंस्था निर्माण केली त्या संस्थेपैकीं पंडितराव या संज्ञेनें दर्शविलें जाणारें एक प्रधानपद होतें. पंडितराव प्रधानानें करावयाच्या कामाचें दिग्दर्शन खालीं लिहिल्याप्रमाणें तत्कालिन कागद पत्रांत करण्यांत आलें आहेः—

"पंडितराव याणी सर्व धर्माधिकार धर्म अधर्म पाहून विवेक्षा करावी. सिष्टेचे सत्कार करावे. आचार व्यवहार प्रायश्चित्त पत्रें होतील त्यावर संमत

चिन्ह करावें. दाण, प्रसंगी शांती अनुष्ठान तत्काळ करावें."
या प्रमाणें पंडितराव प्रधानानें करावयाच्या कामाचें स्वरूप वरील लेखांत दर्शविण्यांत आलें आहे. वर वर्णन केल्या प्रमाणें ज्या प्रधानाच्या कामाचें स्वरूप आहे त्या प्रधानाच्या मुद्रेंत "धर्मसंवर्धन करणारी मुद्रा" हा शब्दप्रयोग कोणंत्या विशिष्ट हेतूनें केला गेला असला पाहिजे या मुद्याची चर्चा राजाराम महाराजांच्या ध्येयाच्या स्वरूप निश्चितीच्या दृष्टीनें करणें अत्यंत महत्वाचे आहे. शके ११०० चे सुमारास महाराष्ट्रावर मुसलमानांनीं आपली राजकीय सत्ता स्थापित केल्या पासून तो शिवाजी महाराज अवतीर्ण होईतों पर्यंत महाराष्ट्रीय समाजांत धर्माचा (श्रुतीस्मृतिप्रणीत, आचार, व्यवहार, प्रायश्चित्त, राजधर्म इत्यादींचा) मुसलमानांचे संसर्गानें अत्यंत ऱ्हास होऊन वर्णाश्रम धर्मव्यवस्था जवळजवळ नष्ट झाल्यासारखी झाली होती. या संकटांतून महाराष्ट्रीय समाजास वाचविण्याकरितां म्हणजेच महाराष्ट्रीय समाजांत धर्माची स्थापना करण्या करितां शिवाजी महाराजांनीं स्वराज्यस्थापना केली असें आम्ही या पूर्वी केलेल्या विवेचनावरून सिद्ध केलें आहे. शिवाजी महाराजांचे स्वराज्यस्थापनेच्या कार्यासमवेत श्रुतिस्मृतिप्रणित आचार व्यवहार प्रायश्चित्तादि लोप पावलेल्या धर्मांचे पुनरुज्जिवन करण्याचें कार्यहि चालू करण्यात होतें. या बाबीस अनुलक्षून च समर्थांनीं शिवाजी महाराजांविषयीं

'या भूमंडळाचे ठायीं धर्मरक्षी ऐसा नाहीं। महाराष्ट्रधर्म राहिला कांहीं तुह्माकारितां'॥

असे उद्गार काढले आहेत. शिवाजी महाराजांनीं ज्या धर्मस्थापनेच्या ध्येयाकरितां स्वराज्यस्थापना केली त्या धर्म स्थापनेस उपकारक अशी नूतन स्थापित केलेल्या राज्य यंत्रांत कांहीं तरी कायमची योजना करण्याची आवश्यकता त्यास भासली असावी हें उघड आहे. शिवाजी महाराजांनीं स्थापित केलल्या अष्टप्रधान संस्थापैकीं पंडितराव हें प्रधानपद वर दर्शविलेल्या हेतूचे सिद्धीस्तव त्यांनीं निर्माण केलें होतें हें त्या प्रधानाकडे सोपविण्यांत आलेल्या कार्याचें स्वरूपावरून सिद्ध होत आहे.

शिवाजी महाराजांचे वेळीं पंडितराव प्रधानपद रघुनानाथ पंडित यांचे कडे सोपविण्यांत आलें होतें. रघुनाथ पंडितांची मुद्रा अद्याप पावेतों उपलब्ध झालेली नाहीं असे स्थितींत त्यांचे मुद्रेचे अभावी या बाबी संबंधीं कोणत्याहि प्रकारचे अनुमान काढतां येणें शक्य नाहीं. परंतु श्रीकरांच्या वरील मुद्रेंत धर्म

संवर्धनी हे शब्द त्या प्रधानपदाच्या कार्याचें स्वरूप व्यक्त करण्याकरितां मुद्दाम योजलेले आहे हें वरील विवेचनावरून उघड होत आहे. या मुद्रे संबंधीं आतांपावेतों केलेल्या विवेचनावरून धर्मस्थापना हें जें शिवाजी महाराजांचें ध्येय होतें तेंच ध्येय राजाराम महाराजांचे कारकिर्दीतहि कायम असल्याचें वरील मुद्रेंतील शब्द योजनेवरून स्पष्ट होत आहे. आतां राजाराम महाराजांचे मुद्रेंतील मजकुराचे विवेचनाकडे वळूं.

राजाराम महाराज हा दाशरथी रामचंद्राचा अवतार आहे असी त्या काळच्या महाराष्ट्रीय जनतेची भावना होती असें या पूर्वी नमूद केलेल्या पुराव्या वरून आम्ही सिद्ध केलेंच आहे. प्रस्तुत मुद्रेंतहि “ रामा सारख्या राजारामाची ” या शब्द योजनेवरून ही हि भावना स्पष्टपणें दिसून येत आहे. राजारामाची दाशरथी रामाशीं जी तुलना या मुद्रेंत केली आहे तिचें महत्व या ठिकाणीं दर्शविणें जरूर आहे. श्रुतीस्मृति धर्मास अनुसरून राज्य करणारा असें दाशरथी रामाचें वर्णन रामायणांत केलें आहे. या बाबीस अनुलक्षून राजारामाचें व दाशरथी रामाचें साम्य दर्शविलें आहे. दाशरथी रामाचे काळ प्रमाणें राजारामाचे काळीं हि ब्राह्मण, क्षत्रीय वैश्य व शूद्र इत्यादि निरनिराळ्या वर्णाचे लोक श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मास अनुसरून वागत असत असा जो अभिप्राय वरील मुद्रेंत व्यक्त केला आहे त्या वरून राजाराम महाराजांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें हें स्पष्ट होत आहे. श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मास अनुसरून आचरण करणारा ब्राह्मण, क्षत्रीय, वैश्य व शूद्र इत्यादि वर्णांचा लोकसमाज आपल्या राजवटींत अस्तित्वांत असल्याबद्दलची एकप्रकारची राजाराम महाराजांनीं आपली प्रौढी मिरविल्याचें या मुद्रेंतील मजकुरावरून दिसतें. या मुद्रेवरून धर्मस्थापनेचें जें जें कार्य शिवाजी महाराजांनीं आरंभिलें होतें तें राजाराम महाराजांचे कारकीर्दीत बरेंच पूर्णतेस गेलें असलें पाहिजे असें दिसतें. अशा प्रकारची प्रगति धर्मस्थापनच्या कार्यांत राजाराम महाराजांचे कारकीर्दीत झाली नसती तर वरील मुद्रेंत ज्या प्रकारची भावना व्यक्त केली गेली आहे अशा प्रकारची भावना व्यक्त केलेली आढळण्यांत आली नसती. असो. एथपावेतों केलेल्या चर्चेवरून राजाराम महाराजांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें हें स्पष्ट झालें आहे.

राजाराम महाराजांचे कारकीर्दीतील महाराष्ट्रीय समाजाचे दुसरे नामांकित राजकारणी पुढारी म्हटले म्हणजे रामचंद्र निळकंठ अमात्य, धनाजी जाधव, संताजी घोरपडे इत्यादि होत. रामचंद्र पंडित अमात्य यांच्या राजनितीतील

चर्चाविषयक मुद्यासंबंधाचा उतारा पूर्वी दिला आहे त्या वरून रामचंद्र निळकंठ यांच्या ध्येयाचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें हे स्पष्ट झालें आहे. धनाजी जाधवराव व सताजी घोरपडे यांच्या ताब्यांतील औरंगजेबाच्या सैन्याशीं लढणाऱ्या मराठी सेनेचे वर्णन राजाराम महाराजांच्या बखरीत बखरकारांनीं खालीं लिहिल्या प्रमाणें केलें आहेः—

" सारांश राजारामाची फौज रामसैन्या प्रमाणें अकस्मात भलतेकडून पांच दहाशें, दोनशें असे गठ्यांनीं शिरून शत्रूस दुभग करावे, हाणावे, मारावे, पळून जावे. सारांश महाराजांचे लोकांनीं प्राण तिळप्राय करून महाराजांचें राज्य व्हावें हें सर्वांचे मनोरथ, तेव्हां हिंदुज्ञाती प्राणाची गरज न धरतां राज्याविषयीं झटावें. "

या प्रमाणें मराठी सैन्यांतील सामान्य शिपायांची मनोभावना ज्या काळीं असल्याचें बखरकारांनी वर्णन केलें आहे, त्या काळी रामासारख्या राजारामाच्या आधिपत्याखालीं मोंगला बरोबर सतत पंचवीस वर्षे जिवावर उदार होऊन लढणारे धनाजी जाधव व संताजी घोरपडे यांचे सारखे सेनापति कोणत्या ध्येयानें उद्युक्त होऊन मोंगलांशीं झगडत होते याची कल्पना करणें फारसें कठीण नाहीं. आतां दुसऱ्या एका गौण मुद्याचा उल्लेख करून ही चर्चा पुरी करूं —

राजाराम महाराजांनीं अनेक सत्पात्र ब्राह्मणांस व देवस्थानास जमिनी इनाम व अग्रहार दिल्याचें बखरकाराने वर्णन केलें आहे. त्या काळच्या उपलब्ध झालेल्या अनेक कागदपत्रांवरून बखरकारांनीं केलेल्या वर्णनांत यत्किंचित हि अतिशयोक्ति नसून तें वर्णन वस्तुस्थितीस धरून असल्याचें दिसून येत आहे. औरंगजेब सारख्या प्रबळ शत्रूबरोबर महाराष्ट्राचे राजे व पुढारी या नात्यानें राजाराम महाराजांनीं जो पंचवीस वर्षे सतत झगडा चालविला होता तो धर्मस्थापनेच्या ध्येयानें उद्युक्त होऊन चालविला होता असें वरील प्रकारच्या देणग्यावरून हि सिद्ध होत आहे. आतां पावेतों राजाराम महाराजांच्या ध्येयाच्या स्वरूपा विषयीं जे विवेचन आम्ही केलें तें पूर्णपणें बरोबर आहे असें त्या काळच्या खालीं नमूद केलेल्या अस्सल पत्रावरून सिद्ध होत असल्या कारणानें ते पत्र आम्हीं खालीं दिलें आहे ( ऐतिहासिक टिपणें भा० १ पारसनिस यांनीं प्रसिद्ध केलेलीं पान २९ ).

रा. शक १७ प्रजापति संवत्सर चैत्र बहुलनवमी राजाराम छत्रपति यांचे नागोजी बिन रताजि माने यास अभय पत्रः—

" तुम्ही पूर्वी तांब्राकडे होतेत. येसियास स्वामींचें राज्य म्हणजे देवता भूमि, या राज्यास तांब्राचा उपद्रव न व्हावा महाराष्ट्र धर्म रहावा, राज्याची अभिवृद्धि व्हावी, या उद्देशें स्वामींच्या पायांपाशीं एकनिष्ठता धरून कर्नाटकांत चंदीचे मुक्कामी स्वामीपासी आले ती. येऊन विनंति केली कीं, आपणास देशांत सरदेशमुखीचें वतन करून दिलें पाहिजे. ता॥:-

कसबे म्हसवड येथील बारा वाडिया

× × × × येसियास तुम्ही स्वामी सेवेवर येक चित्ते वर्तत अहां तुम्हावरी स्वामी कृपाळू होऊन नूतन सरदेशमुखीचें वतन सदरहू बारा महालाचे करून दिल्हे असे इत्यादि. "

राजाराम महाराजांचा अवतार शके १६२१ सालांत समाप्त झाल्यानंतर त्यांचे पश्चात रामचंद्र निळकंठ, धनाजी जाधवराव, संताजी घोरपडे, परशराम त्र्यंबक, शंकराजी नारायण, परसोजी भोसले, खंडेराव दाभाडे, सिदोजी निंबाळकर, अटोळे, पांढरे इत्यादि महाराष्ट्रीय समाजाचे राजकारणी व रणधुरंधर पुढाऱ्यांनीं अधिक जोमानें व वीरश्रीनें स्वराज्य व स्वधर्म रक्षणार्थ झगडा सुरू ठेविला. अखेर औरंगजेब पूर्ण हताश होऊन मराठ्यांनीं स्थापन केलेलें स्वराज्य नष्ट करण्याची त्याची आकांक्षा पार लयास गेली व शके १६२८ सालीं निराश स्थितींत त्यानें आपली इहलोकीची यात्रा पुरी केली. औरंगजेबाचे मरणानंतर शके १६२९ सालांत महंमद बहादर शहाजादा दिल्लीस जात असतां त्यानें नर्मदा तिरीं शाहूराजे यांची सुटका केली. त्यानंतर शाहू महाराज दक्षिणेंत आले व अनेक खटाटोपी व राजकारणे होऊन अखेर मराठ्यांच्या गादीवर त्यांची स्थापना झाली. आतां शाहू महाराज व त्यांच्या कारकीर्दीत झालेल्या महाराष्ट्रीय समाजाच्या इतर राजकारणी पुढाऱ्यांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें याची चर्चा करण्याकडे आपण वळूं:-

शाहू महाराजांचे ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें या विषयींच्या पुराव्याची चर्चा करण्यापूर्वी शाहू महाराजा विषयीं बखरकारांचे उल्लेख कोणत्या स्वरुपाचे आहेत त्याचें प्रथम दिग्दर्शन करूं:—

" महाराजांनीं देवब्राह्मणांचे ठायीं बहुत निष्ठा ठेवून महापुरुषांचीं स्थानें होतीं त्यांचे उत्साह, महोच्छाव चालावे, अतिथी विन्मुख जाऊं नये ऐसे करून गावजमिनी होते ते व नवीन देऊन चालावे ऐसे केलें. पूर्वी श्रावण मासाचा धर्म थोरले महाराज यांणी धान्य व नक्त पंडित वैदिक व दूरदेशींचे

ब्राह्मण यास चालविले होते त्या प्रमाणें चालावे म्हणून सेनापति दाभाडे यांचे तालुक्यांत नेमणूक दोन तीन लक्ष पर्यंत जावे अशी आज्ञा करून त्यांणी श्रावण मासी येतील ब्राह्मण त्याजपासून कोटीलिंगे करून रहावे नंतर समाप्तीस यथायोग्य पाहून संभावना दक्षणा दहा, वीस, पन्नास, शंभर, दोनशे या प्रमाणें देत जावे, ऐसे करविलें........गोरगरीब अथवा दादफिर्याद आहे म्हणून उभे राहिले असतां स्वारींत पालखी उभी करून अगर मजलसींत ऐकून घेऊन समक्ष आज्ञा सांगावयाची असेल ती लागलीच सांगावी. न्याय प्रकरणाकडे सांगावयाचे असेल ते त्याकडे सांगून पुन्हां ऐकून घ्यावे......मोंगलाई झाली त्यांत मुलूख खराब जाहला त्यास कौल इस्तावे तगाई देऊन लावणी अबादानी करविली यामुळे पृथ्वींत पर्जन्यवृष्टी यथाकाळीं होऊं लागली व पृथ्वीस पीक बहुत व्हावें फळें, पुष्पें वृद्धि होऊं लागली. मनुष्य मात्र सर्व सुखी. आपापले व्यापारास सर्वांस बरकत यावी सर्वांनीं सुखी रहावे असें जाहले."

वर दर्शविल्याप्रमाणे शाहु छत्रपती यांचे कारकीर्दीचे सुरवातीस त्यांचे वागण्याचें धोरण कोणत्या प्रकारचें होतें याचें वर्णन बखरकारांनीं केलें आहे. शाहू छत्रपति गादीवर बसल्यापासून मराठी राज्याचा विस्तार दिवसेंदिवस सारखा वृद्धिंगत होऊं लागला. हें पाहून कोल्हापूरकर संभाजीराजे यांचे मनांत वैशम्य उत्पन्न झालें. राज्यांत निम्मा भाग मिळावा अशी त्यास आकांक्षा उत्पन्न झाली व ती सिद्धीस नेण्याकरितां त्यांनी निजामास सामील झालेले जाधवराव सेनापति यास आपले बाजूस सामील करून घेऊन निजामाची मदत मिळविण्याची खटपट सुरू केली. संभाजी राजे यांनीं सुरू केलेल्या या राजकारणासंबंधाचे शाहू छत्रपतींचे विचार अत्यंत महत्वाचे असून त्यांच्या ध्येयाचें स्वरूप निश्चित करण्यास अत्यंत उपयोगी असे आहेत. बखरकारानें शाहू छत्रपतींचे विचार खालीं दर्शविल्याप्रमाणें वर्णिले आहेतः—

"संभाजीराजे विपरीत बुद्धि करून हें राज्य देवाब्राह्मणांचे यांत श्री सांब श्री भवानीची कृपा यवन लोकाचा नाश करून राज्य वडिलांनीं स्थापिले व आम्ही ही तसेंच करितों त्यांत आपण यवनांचे आश्रयास जाऊन राज्यास अपाय करूं इच्छितो हें शेवटास कसें जाईल हा विचार करीत नाहींत. त्या पक्षीं आपणास ही मसलत करणें प्राप्त झाली. म्हणोन वर्तमान समजल्यावरून विचार करून सर्व प्रधान व फौज यांस तयारी करून येण्याविषयीं पत्रें पाठवून तयारी करविली."

याच प्रसंगास अनुलक्षून संभाजीराजे यास शाहू छत्रपतींनीं खालील निरोप पाठविल्याचें बखरींत वर्णन केलें आहे.

" या उपरी तरी यवनांचा आश्रय करावा हे विहित नव्हे येसे मनांत आणोन हरप्रकारें निघावे तुम्हास दौलत पाहिजे ती आम्ही नवीन सिद्ध करून देऊं अगर त्यांत खर्चास नेमणूक मागावी. राज्याचा वाटा म्हणणें हे पुराणांतरी ही जाहलें नाहीं. हे बुद्धि धरूं नये सेनापति सेवक लोक असोन लढाई करून हरामखोरी करून महाराष्ट्रराज्य व धर्म सोडून यवनास शरण गेले ते ही मोठे कुळीचे रामदेवराव जाधव यांचा वंश. परंतु त्यांनीं धर्म सोडिला त्यांची अनुकूलता करून सेवक लोकास व यवनास शरण जाणे वाईट. "

संभाजीराजे यास पाठविलेल्या वरील निरोपावरून शाहू छत्रपतीचें ध्येय कोणत्या प्रकारचें होते हे उघड होत आहे. आतां शाहू छत्रपतींच्या ध्येयाचे स्वरुपासबंधी बखरकारांनीं केलेलें वर्णन अगदीं यथायोग्य असल्याचे त्या काळच्या ज्या अस्सल कागदपत्रांतील उल्लेखावरून पूर्णपणें सिद्ध होत आहे अशा स्वरुपाचें काही उल्लेख आम्ही खाली देतों.

म. ई. सा. खं. ६

पा १० श्रावण शुा ३ शके १६१४

संभाजी राजे याचे शाहू छत्रपती यांस पत्र

" दिलेंद्राचा पुत्र अलिगोहर यागी होवून आषाढ वद्य द्वादशीस आपणासमीप आला ++ ++ +++ +++++++ या उपरी ये विषीं जशी आज्ञा तशी वर्तणूक करण्यांत येईल, म्हणोन विस्तारें लिहीलें, तें कळलें. ऐशास, दिल्ह्रास अत्युन्माद होऊन दक्षिणेस येऊन फार अनर्थांदाचरण केलें. त्यास काळे करुन शिक्षा करणे हे ईश्वरासच अगत्य; तदनुसारच होणाचे पर्याय अलिगोहर याचे येण्यांत दिसून आले. याचे येणे स्वामीच्या महदानंदास कारण जालें. याउपरी अलिगोहरयास, भिष्म पराभवार्थ शाखडोच्या ठाई आदर त्यप्रमाणें त्यास हितावह, परंतु सर्व प्रकारें स्वामीच्या धर्म राज्याची अभिवृद्धि होय, अशी युक्ती योजोन रामचंद्र पंडित अमात्य या समागमें विस्तारें सांगोन रवाना केले. "

संभाजी राजे यानीं वरील पत्रांत शाहू छत्रपति यांचे राज्यास धर्मराज्य अशी संज्ञा दिलेली आहे. श्रुतिस्मृतिप्रणित धर्मास अनुसरून ज्या राज्याचा

कारभार चालविण्यांत येतो ते धर्म राज्य अशा या संज्ञेचा उघड अर्थ आहे. बखरकारानें शाहू छत्रपतीच्या ध्येयाबद्दलचें केलेलें वर्णन वस्तुस्थितीस अनुसरून असल्याचें वरील संज्ञेवरून सिद्ध होत आहे. आतां यापुढें आह्मी दुसरे दोन उतारे देत आहोंत त्या पैकीं एका उताऱ्यांत महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा उल्लेख आलेला आहे. तो हि शाहूमहाराजांच्या ध्येयाच्या स्वरूप निश्चितीच्या दृष्टीनें लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

वाड यांची रोजनिशी

भाग १ पान १०४ शके १६५६–५७

फांड सांवत यास पत्र

" तुह्माकडील रायाजी साटक याणे गावावरी स्वारी करून त्रिंबक भास्कर हुजूर राहातो म्हणून त्याची भावजय अटकावून ठेविली आहे म्हणून विदित झाले. तरी प्रतिनिधी कडिल कारकून, त्याही मध्यें नव दश वर्षांची ब्राह्मणाची मूल एकटिच अटकेंत ठेवावी, हा कोण विचार आहे. यवनादिकही असे कर्म करणार नाहींत या उपर साटकास हरवजेनें नसीयत करून ब्राह्मणाची मूली सोडून देवणे." वाड यांची रोजनिशी

भाग १ पान २१७

रा. फोंड सांवत सरदेसाई प्रांत कुडाळ यास पत्र

शक१६५७–५८

"राजश्री गोपाळ शामराव याचा कबिला तुह्मी अटकावून ठेविला आहे. त्यासी निरोप देऊन पाठविणे म्हणून तुह्मास पूर्वी लिहिलें होतें. परंतु ते गोष्ट न केली. **ब्राह्मणाचा कबिला अटकेंत ठेवावा हा महाराष्ट्र धर्म नव्हे.** प्रस्तुत ते स्वामी सन्निध आहेत. तरी त्याचा कबीला मुक्त करून पाठऊन देणे. "

वरील उताऱ्या पैकीं दुसऱ्या उताऱ्यांत " ब्राह्मणाचा कबिला अटकेंत ठेवणें हा महाराष्ट्र धर्म नव्हे " असें शाहू महाराजांनी फोंड सावंत यांस लिहिलें आहे.

मन्वादि स्मृतींत ब्राह्मणांची जी महति वर्णन केली आहे व स्त्री जाती-विषयीं जो आदर व्यक्त केला आहे त्या दृष्टीनें फोंड सावंत यांचें हें कृत्य धर्म वचना विरुद्ध व अत्यंत निंद्य असें होतें. यास्तव शाहू महाराजांनीं फोंड सावंत यांच्या या कृत्या संबंधीं निषेध करण्या करितां वरील वाक्य योजिलें आहे हें उघड आहे. आतां या पुढें आह्मी जे दोन उतारे देणार आहोंत

त्या संबंधी दोन प्रास्ताविक शब्द लिहिणें जरूर आहे. शाहू महाराज गादी-वर अधिष्ठित झाल्यानंतर कोंकण प्रांताकडे त्यांना लक्ष देणें भाग पडलें. कोंकणांत त्या काळीं दोन सत्ताधारी व्यक्ती होत्या. एक अंग्रे व दुसरे जंजि-ऱ्याचे हबशी या होत. या उभयतांवर शाहू महाराजांनीं ज्या स्वाऱ्या कर-विल्या त्याची साद्यंत हकीगत इतिहास ग्रंथांत आली आहे. परंतु या स्वाऱ्या कोंकण प्रांतावर करणें शाहूमहाराजास कोणत्या कारणामुळें प्राप्त झालें याचा खुलासा इतिहासग्रंथांतून करण्यांत आलेला नाही. स्वराज्य विस्तार करणें हें सर्व साधारण कारण कोंकण प्रांतावर करण्यांत आलेल्या स्वाऱ्यांस पुरेसें होतें. परंतु या हि पलिकडे या स्वाऱ्या कोणत्या हेतूस्तव करण्यांत आल्या याचा खुलासा खालील उताऱ्यावरून होणार असून त्यावरून शाहू महाराजांच्या ध्येयाचें स्वरूप कोणत्या स्वरुपाचें होतें हें हि दिसून येणार आहे. या दृष्टीनें हे उतारे अत्यंत महत्वाचे आहेत. ब्राह्मणप्रजेचें रक्षण, शांतता व सुराज्य या बाबींचा अंग्रे व हबशी यांच्या सत्तेखालील प्रदेशांत पूर्ण अभाव होता. धर्म-राज्याचे संस्थापक या नात्यानें ज्या ज्या प्रदेशांत वरील बाबींचा अभाव होता त्या त्या प्रदेशांत या बाबी अस्तित्वांत आणण हें शाहू महाराजांचें ध्येय होतें. व याच दृष्टीनें अंग्रे व हबशी यांचेवर स्वाऱ्या करण्यांत आल्या होत्या असें खालील उताऱ्यावरून उत्तम प्रकारें सिद्ध होत आहे.

वाड यांची रोजनिशी

भाग १ पान २१ शके १६५५-५६

उमाबाई व दमाजी गायकवाड यास पत्रें ( शाहु माहाराज यांची )

**राजपुरीकर हबशी अमर्यादेनें वर्तो लागला कोंकण प्रांते उत्पात आरंभिला. त्यास शासन केल्याविना देव ब्राम्हण स्वस्थळीं राहत नाहीं ऐसे जाणोन स्वामीनीं** चिरंजीव राजश्री फत्तेसिंग भोसले व राजश्री श्रीनिवास पंडित व बाजिराव पंडित प्रधान यास आज्ञा करून हबशा-वरी मोहिम करविली. रायगड आदिकरून कोकणांतील गड कोंठ हबशीया खाले होते ते हस्तगत केले.........तरी हबशी दुष्ट त्याचें निर्मूल करावें हें स्वामीस परम आवश्यक.

वाड यांची रोजनिशी

भाग १ पान १११ शके १६७४-७५

राजश्री जगजीवन पंडीत यास पत्र

**कोकणांत ब्राह्मण रयतेस उपद्रव होत आहे वतनदार परागंदा-**

झाले आहेत. त्या गोष्टी तहात आणून यथास्थित नांदणूक होऊन कोकण सुख पावेतो अर्थ करणे.

वाड यांची रोजनिशी

भाग १ पान ११६ शक १६७४।१६७५

"राजश्री तुळाजी आंग्रे सरखेल यासी आज्ञा जे, राजापुर सुभ्याचा अंमल राजश्रीपंत प्रतिनिधि याजकडे आहे त्यास तुम्ही प्रांत मजकुराचा नाना प्रकारचे काजिये अमलाशी खलेल होते. ब्राम्हण प्रजेस नाना प्रकारें उपसर्ग लगोन ब्राम्हण स्थळें सोडून देशावरी गेले म्हणोन हुजूर विदीत झाले. मशारनिल्हेच्या अमलास अतःपर तिळतुल्या कजिया न करणे."

शाहू महाराजांचे ध्येयाचे स्वरूपा संबंधीं वर दिलेल्या पुराव्या पेक्षां अधिक बळकट अशया पुराव्याची कांहीं जरूरी आहे असें दिसत नाहीं. त्यांच्या ध्येयाच्या स्वरूपासंबंधीं बखरकारांनीं केलेलें वर्णन पूर्णपणें बरोबर असून वस्तुस्थितीस अनुसरून आहे असें वरील उतार्‍यावरून सिद्ध होत आहे. मराठी राज्याचे सर्वाधिकारी असे जे छत्रपति शाहू महाराज त्यांच्या राज्य विस्ताराच्या ध्येयाच्या स्वरूपा विषयींचें विवेचन एथें पुरें करून त्यांच्या कारकीर्दीत जे दुसरे महाराष्ट्रीय समाजाचे राजकारणी पुढारी झाले त्यांच्या राज्य विस्ताराच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयींच्या चर्चेकडे वळूं.

शाहू महाराजांचे हयातींत ज्यांच्या पराक्रमानें मराठी राज्याचा विस्तार थेट उत्तरेकडील मोंगलांची राजधानी जे दिल्ली शहर व त्याचे पलिकडे हि अटके पावेतों झाला, असे तीन पेशवे होऊन गेले. ते पेशवे म्हणजे बाळाजी विश्वनाथ; बाजिराव बल्लाळ; बाळाजी बाजिराव उर्फ नानासाहेब हे होत. या तिन्ही पेशव्यांचे कारकीर्दीत मराठी राज्यसत्तेच्या विस्तारची कमान सारखी वाढत चालली होती, व या कमानीचा कळस नानासाहेब पेशवे यांचे कारकीर्दीत पूर्णपणें झाला. या तिन्ही पेशव्यांचे कारकीर्दीत छत्रपति शाहूमहाराज यांचे आधिपत्यखालीं मराठ्यांच्या राज्यसत्तेच्या विस्ताराचें धोरण ठरले जात असे, ही बाब लक्षांत घेतली असतां मराठ्यांच्या राज्यसत्तेचा विस्तार करण्यांत या तिन्ही पेशव्यांचें ध्येय शाहू महाराजांचे ध्येयाहून कांहीं निराळ्या प्रकारचें असणें शक्य नाहीं. मुसलमानी राज्यसत्तेचें ध्येय सुरवातीपासून श्रुतिस्मृत्युक्त धर्माचा उच्छेद व मुसलमानी धर्माचा प्रसार हे होते. पहिल्या तिन्ही पेशव्यांचे काळांत मुसलमानी धर्माचें केंद्र दिल्ली एथील मोगल राजघराणें हें होतें. या घराण्यांतील

राजसत्तेचा विध्वंस ज्या प्रमाणांत करण्यांत येईल त्या प्रमा
सत्तेचा व तिच्या अंतर्भूत असलेल्या धर्मस्थापनेच्या ध्येयाचा प्रसार भरत खंडांत व्हावयाचा होता. श्रुतिस्मृत्युक्त धर्माचे पहिले पेशवे बाळाजी विश्वनाथ हे कट्टे अभिमानी होते असें अलिकडे उपलब्ध झालेल्या पुराव्यावरून सिद्ध होत आहे. माहुली संगमी कोटी होम करून मोठा दानधर्म बाळाजी विश्वनाथ यानें केल्याचा उल्लेख तत्कालीन कागदपत्रांत सांपडतो (पेशवे दप्त-रांतील सनदा पत्रांतील माहिती पान १५१ ). पुरातन काळीं जे जे वेळीं परकीय सत्तेचे सनातन धर्मावर आलेलें संकट नाहींसें करण्यांत येऊन धर्मस्थापना करण्यांत येत असे, ते ते वेळीं विजयी झालेल्या धर्मसंस्थापक राजांनीं यज्ञ केल्याचें दाखले पुरातन इतिहासांत आढळून येतात. ह्या प्रघातास अनुसरून वरील कोटी होम् व दान धर्म बाळाजी विश्वनाथ यांनीं केला असावा असा तर्क आहे. दिल्लीचे बादशहाकडून चौथाई आणि सरदेश-मुखीच्या सनदा शाहु महाराजांचे नांवाच्या मिळविण्याचें जें राजकारण पहिले पेशवे बाळाजी विश्वनाथ यांनींकेलें त्या राजकारणाचें ध्येय मराठी राजसत्तेचा विस्तार करून तद्वारा धर्माचा प्रसार करणें हें असलें पाहिजे हें वरील पुराव्या वरून उघड होत आहे. बाळाजी विश्वनाथांचे पश्चात त्यांचा मुलगा बाजिराव यास पेशवेपद प्राप्त झालें. या सुमारास दिल्ली एथील मोंगल घराण्याची राजसत्ता बरीच कमकुवत झाली होती. तेव्हां शाहू महाराजांचे दरबारांत मराठ्यांच्या राज्यसत्तेच्या विस्ताराचे बाबतींत कोणतें धोरण स्वीकारण्यांत यावें याबद्दलचा प्रश्न उपस्थित झाला. या बाबतींत दोन निरनिराळ्या प्रकारच्या धोरणांचा पुरस्कार करणारे राजकारणी पुढारी शाहू-महाराजांचे दरबारांत त्या काळीं होते. एक श्रीपतराव प्रतिनिधी व दुसरे बाजिराव पेशवे हे होत. कर्नाटक प्रांतांत मराठ्यांची सत्ता प्रथम कायम करून नंतर उत्तरेकडे मराठी राज्यसत्तेचा विस्तार करावा या मताचा श्रीपतराव प्रति निधी यानें पुरस्कार केला. उत्तरेकडील मोंगली राज्यसत्ता डबघाईस आली आहे या संधीचा फायदा घेऊन तिचा प्रथम विध्वंस करावा व मराठी-राज्यसत्तेचा विस्तार त्या प्रांतांत करावा या मताचा बाजिराव पेशवे यांनीं पुरस्कार केला. बाजिराव पेशवे यांच्या ध्येयाचे स्वरुपाचे दृष्टीनें या प्रसंगाचें वर्णन शाहूमहाराजांचे चरित्रांत बखरकारांनं केलेले फार महत्वाचे असल्या कारणानें तें आम्ही एथें देतों.

" या वरी ते समयीं बाजिराव यांनीं उत्तर केलें कीं, प्रतिनिधी अशी

मसलत काय देतात ? पादशाही कमजोर जाहली आहे, कांहीं जीव राहिला नाहीं, बखेडे बहुत जाले आहेत. पादशहा आमचे कुमकेनें पादशाही रक्षावी असें इच्छून आहेत. त्यांतच त्यांचेहि बखेडे माडावे. आपला स्वराज्य अंमल पूर्वी बसला नाहीं तो बसवावा. किलीजखान नजिक, त्याचा तह बिघडून खटला करतील त्याचा हिसाबा काय धरावा ? ( असें म्हटलें तर ) राज्य कसें करावें ? आणि थोरले महाराज यांनीं जातीनें औरगजेब शहजादेपणांत येऊन दौलताबादची पादशाही घेऊन औरंगाबाद बसवून सुभा करून राहिले, त्याचा हिसाब न धरितां विजापूर, भागानगर, पादशाहींतील अंमल बसविला. व त्यांचे सुभ्यांतील अंमल घेतला. या नंतर हि संभाजी महाराज यांणी सर्व दौलत, फौज बुडविली, महाराज वारले, ऐसे प्रसगीं आरंगजेब जातीनें येऊन दोन्ही पातशाही घेऊन संभाजी महाराजास धरून विज्वर प्रसंग केला. महाराज त्यांचे नजरबंदींत गेले. राज्य व स्थळें सर्व घेतली. दोन लक्ष फौजेनिशी बंदोबस्तास आपण हिंदुस्तान दिल्लीचें राज्य सोडून या प्रांतीं राहिले. त्याचा हिसाब न धरतां राजाराम साहेब चदीस जाऊन चार सुभे पंचवीस पंचवीस हजारांचे करून तेथून रात्रंदिवस मसलत करून लढया मारून अंमल उठवून नेला. पुढें पादशाहानी चदीस अडचण केली तेव्हां पादशहा या प्रांतीं असतां देशी येऊन हिसाब न धरितां आरंगाबाद मारिलें, अंमल बसविले, राज्य, किल्ले व स्थळे साध्य केलीं. हे राज्य गेले ते श्री कृपेनें पुन्हां साध्य जालें. स्वामी पादशाहीतून आनायासें करून राज्यावर येऊन दैववान मोठीं माणसें पदरी होऊन पादशहाची कुमक करावा, पादशहा स्थापावें ऐसें होऊं लागलें. पूर्वी मोठी मोठी कार्ये वडिली केली तशी न करावीं तरी मोठीं पदें कशास करावी. आह्मास सनदा मात्र द्याव्या. फौज खजिना सर्व स्वामींचे चरणाचे प्रतापें करून सिद्ध करितो. राज्य साध्य करितों किलिजखान याचा हि शह राखून हिंदुस्थानची मसलत करितों. दोन्ही आम्ही आटोपतों. कर्नाटकची मसलत करणें त्यास पादशाही बुडविली आहे. पूर्वीचीं राज्यें विजापूर, भागानगर, याजखालील मुलूख साध्य जालेच आहेत. हे घरांतील मसलत आहे. हुजुरात व मोठे सरदार यातील कोणी तरी वान। होऊन मसलत जाली म्हणजे सहज साध्य होईल. हे प्रतिनिधीनी मसलत साभाळावी थोरले महाराजाचा संकल्प हिंदुस्तान काबीज करावे ऐसा राहिला. त्या साठीच स्वामींचा अवतार उदय जाला आहे. पुण्यप्रताप हि तसाच आहे यास्तव आधीं हें साध्य करावें आणि संकल्प शेवटास न्यावा. पादशाहानीं आपण होऊन

बळावून नेऊन तह करावा ऐसे दिवस श्रीनें प्राप्त केले. त्यांत बाळाजीपंत नाना जाऊन सर्व राजकारणें हिंदुस्तानचे राजेरजवाडे यांची करून सिद्धता जाली आहे. महाराजांचा प्रताप. जें कार्य मनीं धरलें तें घडोन यावें ऐसा आहे. यास्तव या समयीं हा उद्योग करावा. हें उत्तम आहे. ”

थोरले बाजिराव पेशवे यांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें हें बखरकारानें दिलेल्या त्यांच्या वरील उद्गारावरून स्पष्ट होत आहे. छत्रपति शिवाजी महाराजांचें अपूर्ण राहिलेले ध्येय पूर्णत्वास नेण्याची प्राप्त झालेली सुसंधि फुकट न दवडतां तें ध्येय सिद्धीस नेणें अत्यंत जरूरीचें आहे असा पक्ष बाजिरावानें शाहूमहाराजांपुढें मांडिला, व त्यास शाहूमहाराजांनीं आपली अनुमति दिली. वर दिलेल्या थोरल्या बाजिरावांचे भाषणावरून शिवाजी महाराजांचें जें ध्येय तेंच त्यांचें ध्येय असल्याचें दिसून येत आहे. थोरले बाजिरावांचे कारकीर्दींत जीं अनेक राजकारणें झालीं त्यां पैकीं वसईचें राजकारण हें एक महत्वाचें होतें. हें राजकारण हातीं घेण्यास बाजिराव पेशवे व त्यांचे बंधु चिमाजी आप्पा हे कोणत्या कारणानें उद्युक्त झाले या बद्दलचा जो ऐतिहासिक पुरावा उपलब्ध झाला आहे त्या पुराव्यावरून हि मराठ्यांच्या सत्तेचा विस्तार करण्यांत त्यांचा कोणत्या प्रकारचा हेतु होता हें उत्तम प्रकारें सिद्ध होत आहे. हिंदुस्तानच्या पश्चिम किनाऱ्यावर पाश्चात्य लोकांपैकीं ज्यांनीं प्रथम पाय ठेविला ते लोक म्हटले म्हणजे पोर्तुगीज हे होत. मुंबई, साष्टी, वसई वगैरे मुलूख पोर्तुगीज लोकांनीं काबीज करून तेथें आपली सत्ता स्थापित केली. हे लोक मुसलमान लोकांपेक्षांहि अधिक धर्मवेडे होते. पश्चिम हिंदुस्तानच्या किनाऱ्यावर यांनीं आपली सत्ता स्थापित केल्यावर त्यांच्या ताब्यांतलि महाराष्ट्रीय लोकांवर धार्मिक बाबतींत त्यांनीं अनन्वित जुलूम करण्यास सुरवात केली. या जुलमास हिंदु लोक अगदीं कंटाळले होते, व पोर्तुगीज लोकांचे जाचांतून आपली सोडवणूक कशा रीतीनें होईल याची वाट ते चातकांप्रमाणें पहात होते. पहिले बाजिरावाचे कारकीर्दीत वसई साष्टी वगैरे प्रांतांतील महाराष्ट्रीय लोकांनीं त्यांचेकडे पोर्तुगीज लोकांविरुद्ध तक्रारी करण्यास सुरवात केली व या तक्रारींचें पर्यवसान अखेर वसईच्या मोहिमेंत झालें. ह्या बाबीं संबंधाचा खालील लेख फार महत्वाचा आहे.

शाक १६६३ मार्गशिर्ष व॥ १० वाड भाग ३ पा ५

( ५ ) बेशमी गंगाजी नाईक व बुबाजी नाईक व जनार्दन नाईक बिन मुरारजी नाईक व शिवाजी नाईक व नारायणजी नाईक बिन निंबाजी

नाईक महिमानराव कुळी साळोंखी ज्ञात पाठारे पुरातन वास्तव्य कसबे वानेरे तर्फ मराळे परगणे साष्टि वतनदार मोकादम मौजे अणजूर तर्फ अटगाव परगणे सायवान प्रांत वसई हे, प्रांत मजकुरींहून तीर्थरूप रा. बाजीराव व तीर्थरूप रा. चिमणाजीपंत आपा यांचे दर्शनास सातारीयाचे मुक्कामीं सन सलास अशरीन मया व अलफामध्यें येऊन आपली हकीकत विदित केली कीं आपण प्रांत मजकुरचे पुरातन वतनदार आहों. त्यास वसई प्रांत फिरंगी याकडे आहे. त्याणें देवस्थानें व तीर्थे यांचा व महाराष्ट्र धर्म याचा लोप केला. हिंदु लोक भ्रष्टऊन क्षार केले. आपण पुरातन वतनदार देश-नाइ गौड पणाचें वतन होतें त्यास फिरंगी याकडे प्रांत जाहलियापासून वतन चालो देत नाहीं. त्याजमुळें आपण कुटुंब सह वर्तमान या प्रांतांतून येऊन कल्याण प्रांतीं प्रस्तुत राहिलों. वसई प्रांतीची हकिकत व आपलें वृत्त निवेदन करून प्रांत मजकूर सर करून देव स्थापना करून स्वधर्म स्थापना होय ते गोष्ट करावी व आपलें वतन आपणास करून घ्यावें + + + + + + + + ती. कैलासवासी रा. आपा खासा फौजे सुद्धां पाठीवर जाऊन प्रांत मजकुरचे गड कोट, किल्ले हस्तगत करून प्रांत मजकूर सोडवून स्वराज्य केलें; त्याजमुळें धर्मस्थापना होऊन देव धर्मादिक चालते जाले. + + + + + +

वरील पत्रावरून वसईची मोहीम सुरूं करण्यांत बाजिराव व चिमणाजी आप्पा यांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें हें स्पष्ट होत आहे. वसईवर स्वारी करण्यापूर्वी कांहीं वर्षे अगोदरच वसईच्या मोहिमेचें राजकारण शिजत होतें असे थोरले बाजिराव यांचे शिंदे भंडारी यास लिहिलेल्या खालील पत्रावरून दिसून येत आहे. या पत्रांत हि वसईची मोहीम कोणत्या कारणास्तव सुरूं करण्यांत आली याचा उलगडा होत आहे.

म० इ० सा० खंड ६ ले० १०१ शके १६५६ फाल्गुन व॥ १४

० श्री ०

राजा शाहू नरपती

हर्ष निधान बाजीराव

बल्लाळ मुख्य प्रधान

म॥ तुंगचोरघा पा खोचीवडे व पापडी शिंदे भंडारी यांसः—

बाजीराव बल्लाळ प्रधान सु॥ खमस सलासीन मया अलफ तुमचें वर्तमान

रा. अंताजी रघुनाथ सरदेसाई यांणी कुलवृत्त विदित केलें त्यावरून कळलें. ऐशास तुमची बोली मशारनिलेशी जाली. धर्म रक्षणास तुम्ही सिद्ध आहां. तदनुरूप इश्वर मनोभिष्ट सिद्धीस पावील. चिंता न करणें. तुमचे उर्जित मशारनिले सागतील त्या प्रो केले जाईल छ २१ सवाल. लेखन सीमा.

याच मजकुराचे धागराऊत गणराऊत शिंदे भंडारी पा का बाहादरपूर यांस लिहिलेले हें १२० चें पत्र आहे.

सिदे भंडारी धर्म रक्षणास सिद्ध होऊन बाजिरावांचे कडे पोर्तुगीज लोकांचे जाचांतून आपली सोडवणूक करून घ्यावी अशी आकांक्षा बाळगून आले होते व बाजिरावांनीं त्याची मनोभावना सिद्धीस जाईल असें आश्वासन त्यास दिले असें वरील पत्रावरून दिसून येत आहे. वसई व त्याच्या आसपासचा प्रात पोर्तुगीज लोकाचे ताब्यांतून घेऊन त्या प्रांतावर मराठ्यांनीं आपली सत्ता स्थापित केल्यानंतर त्या प्रांतांत राहणाऱ्या महाराष्ट्रीय लोकांत धर्मदृष्ट्या निषिद्ध असे आचार आस्तित्वांत असल्याचे निदर्शनास येऊं लागले. अशा प्रकारचे रिवाज बंद करण्याची जबाबदारी मराठी राज्यसत्ता चालविणाऱ्या अधिकाऱ्याकडे स्वाभाविक रितीने आली. या संबंधाचा एक तत्कालिन लेख उपलब्ध झाला आहे तो आम्हीं एथे नमूद करितों.

शक १६६६–१६६७ वाड भाग २ पान १९८

शंकराजी केशव नामजाद यासः– पूर्वी फिरंगाण प्रांती युजुर्वेदी ब्राम्हण होते. त्यांत कित्येकांनी संमत देऊन, मामाची कन्या भाच्यास द्यावी ऐसे करून एका दोघाशी शरीर संबंध केले. त्यास आतां धर्मराज्य झाले, या कारितां जो ऐसे कर्म करिल त्याजपासून दंड रुपये ५० घेऊन याती वेगळा करावा म्हणून विनंती केली.

वरील लेखांत मामाच्या मुलीचें लग्न भाच्याबरोबर लावण्याचा प्रघात त्या काळीं वसईकडील शुक्ल यजुर्वेदी ब्राह्मणांत अस्तित्वांत होता. पोर्तुगीज लोकांची सत्ता या प्रांतावर अस्तित्वांत असतां वरील श्रुतिस्मृत्युक्त धर्माविरुद्ध असलेला आचार राजसत्ताधारी अशा विधर्मी पोर्तुगीज लोकांच्या हातून बंद होणें शक्य नव्हतें हें उघड आहे. परंतु पोर्तुगीज लोकापासून तो प्रांत काबीज करून तेथें मराठ्यांनीं आपली सत्ता स्थापित केल्यानंतर तो सर्व प्रदेश व त्यांतील लोक धर्मराज्याचे सत्तेखालीं आले व त्यामुळें धर्मास अनुसरून वर्तन करणें त्यास प्राप्त झालें. मराठ्यांच्या धर्मराज्यांतील प्रत्येक व्यक्ति श्रुति-स्मृत्युक्त धर्मास अनुसरून वर्तन करीत आहे कीं नाहीं हें पाहण्याची जबाब

हारी सरकारी अधिकाऱ्यावर असे. श्रुतिस्मृत्युक्त धर्माच्या निषीनिषेधरूपी आज्ञांचे विरुद्ध एकादी व्यक्ति वर्तन करीत आहे असें आढळल्यास धर्मशास्त्रांत सांगितलेला दंड त्या व्यक्तीस करण्याची अगर त्या व्यक्तीस प्रायश्चित्त घेण्यास भाग पाडण्याची सत्ता सरकारी अधिकाऱ्याचे हातीं होती याज्ञवल्क्य स्मृतीवरील विज्ञानेश्वरानें केलेल्या मिताक्षरा टिकेंत मामाची कन्या भाच्यास देणें निषिद्ध असल्याचें स्पष्टपणें नमूद केलें आहे. मिताक्षरा टीकेंतील विवाह प्रकरणाच्या ५३ व्या श्लोकावरील संस्कृत टीकेचा मराठी सारांश आम्ही खालीं देतों.

" मातेच्या गोत्रांतील कन्येशीं हि विवाह करूं नये असें कित्येक म्हणतात. "पिता व माता यांची असपिंड कन्या" असें मनुस्मृतींत म्हटलें आहे. त्या वरून आते, मामा, मावशी याच्या कन्येशीं विवाह करितां येत नाहीं. पण देशस्थ ब्राह्मण आपल्या भाचीशीं व मामा, मावशी इत्यादिकांच्या कन्येशीं विवाह करितात. पराशर माधवग्रंथांत माधवाचार्यांनीं श्रुति प्रमाण देऊन मातुल कन्येशीं विवाह करण्यास श्रुति प्रमाण आहे असें हि म्हटलें आहे. पण आपरार्कादि इतर शास्त्रकार त्याचा निषेध करीत असल्यामुळें माधवाचार्यांचें म्हणणें सर्व विद्वानांस मान्य होईल च असें वाटत नाहीं. भाचीशीं वगैरे विवाह करण्यास तर प्रमाण कोठेंच मिळत नाहीं."

( याज्ञवल्क्य स्मृति बापटकृत मराठी भाषांतर पान १३, १४ )

या प्रमाणें मितक्षिरा ग्रंथांत विवेचन केलेलें आहे. याज्ञवल्क्य स्मृतीवर विज्ञानेश्वरांनीं केलेली मिताक्षरा टीका हा ग्रंथ धर्माचे बाबतींत फार पुरातन काळापासून महाराष्ट्रांत प्रमाणभूत समजला जात असे. ही गोष्ट लक्षांत घेतली असता वसई साष्टी वगैरे प्रांतांत मराठ्यांचें धर्मराज्य स्थापित झाल्यावर वरील प्रघाताचे बाबतींत वरिष्ठ अधिकाऱ्यापावेतों तकरार जाऊन वरील हुकूम सोडण्यांत आला हें योग्यच झालें असें म्हटलें पाहिजे. मराठी राजसत्तेचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें या विषयीं मराठी राज्यांतील सामान्य अधिकाऱ्यांची देखील काय कल्पना होती हें वरील उद्गारावरून चांगलें सिद्ध होत आहे. थोरले बाजिरावांचे कारकीर्दींत मराठी राजसत्तेचा उत्तर हिंदुस्तानांत कोणत्या हेतूनें प्रसार करण्यांत आला या संबंधाच्या त्या काळच्या एका पत्रांतील उतारा आम्ही खालीं देतों. जयपूर एथें लक्ष्मण संभाजी या नांवाचे पेशव्यांचे वकील होते. जयपूरचे महाराजास मराठ्यांचे विरुद्ध

सामिल करून घेण्याचा त्या काळीं मोंगलाचा प्रयत्न चालला होता. या बाबतींत लक्ष्मण संभाजी व जयपूरचे महाराज यांचेमध्यें झालेल्या संभाषणाचा सारांश पत्रद्वारें लक्ष्मण संभाजी यानें गोपाळराव नाना यांस कळविला. थोरले बाजिराव पेशवे यांचा उत्तर हिंदुस्तानांत मराठ्यांचे सत्तेचा प्रसार करण्यांत कोणता हेतु होता हें या संभाषणावरून दिसून येत असल्याकारणानें हें पत्र फार महत्वाचें आहे. या पत्रांतील प्रस्तुत मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें लागू असलेला उतारा आम्ही खालीं दिला आहेः—

ऐतिहासीक टिपणें भाग ३ पान ४३

जयपुराकडील राजकारणें

लेखांक २

* शक १७०९।१० श्रावण शु॥ १३

( पारसनिस )

गोपाळराव नाना यास लक्ष्मण संभाजी ( जैपुर येथील मराठ्यांचा वकील ) यांचें पत्र "तुमचे आजे महाराज जैसिंगजी यांनीं भगिरथ प्रयत्न करून, श्रीमंत कैलासवासी बाजीराव साहेब यांसी आणोन, म्लेंछाचें उत्थापन केलें, आणि हिंदुस्थान पुन्हा स्थापून देवयात्रा इत्यादिक यथास्थित घडू लागल्या. हिंदु मात्रास सौख्य होऊन आपआपले स्थळीं स्वस्थ कालक्षेप करीत असतां, प्रस्तुत क्षुल्लक आग्रहास प्रवर्तोन अविवेक विचारितां, हें एकरुप कल्याणकारी नाहीं. इहलोकीं परलोकीं ह्या गोष्टी निंदक आहेत. येणें प्रकारें बहुतापरी समजावितां, सर्व गोष्टी ध्यानास आल्या. म्लेंच्छाविशीं, तो त्रासच घेऊन वकिलास सामदानी उत्तर देऊन दुसऱ्या सोबत्यांस सांगितलें कीं "म्लेंच्छास तो साफ आणावयाचा नाहीं. त्यानीं आग्रह विशेष केला, परंतु येथून निखालस त्याजविसीं ज्वाबच होत गेले कीं, ज्या गोष्टी वडीलांनीं बहुत विचारून केल्या आहेत, त्या आम्ही मोडून नव्या कराव्या हें उत्तम नाहीं. यास्तव म्लेंच्छाविरहित आपण आपली शाबुती बांधून आपआपले स्थळीं स्वस्थ असावें. दक्षणी चालून आल्यास पाहून घेऊं. जमिदार आहों. कांहीं चिंता नाहीं " वगैरे उत्तर दिलें.

---

* पहिल्या लेखांकाचें साल इ. स. १७८७।८८ असें रा. पारसनिस यांनीं दिलें आहे. पहिल्या लेखांकांत फक्त महिना व मिती दिली आहे. दुसऱ्या लेखांकाचा महिना व मिती तीच आहे.

वरील उताऱ्यावरून थोरले बाजिराव पेशव्यांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें या विषयीं शंका घेण्याचें कोणत्याहि प्रकारचें कारण रहात नाहीं. आतां थोरले बाजिरावांचे चिरंजीव नानासाहेब पेशवे यांचें मराठ्यांच्या राजसत्तेचा प्रसार करण्यांत कोणतें ध्येय होतें या प्रश्नाच्या चर्चेकडे वळूं. मराठी राज्याचा विस्तार करण्यांत नानासाहेब पेशव्यांचें ध्येय शाहू महाराजांच्या ध्येयाहून कांहीं निराळ्या प्रकारचें होतें असें मानणें शक्य नाहीं. शाहू महाराजांनीं मरते समयीं सर्व प्रधानांस बोलावून " राज्यास धनी पुत्र करून सर्वांनीं आज्ञेंत चालून राज्य देवाब्राह्मणांचें हें एक विचारें रक्षावें अशी आज्ञा केली. " ( थोरले शाहू महाराजांचें चरित्र पान ९७ ) व नानासाहेब पेशवे यांचे मस्तकीं हात ठेविला व त्यास तुम्ही माझे पश्चात् स्वधर्मन्यायें समुद्रवलयांकित पृथ्वि आक्रमून प्रतापें राज्य चालवावें असें नानासाहेबास सांगितलें ( पानिपतची बखर पान १. ). या उद्गारावरून नानासाहेब पेशव्याकडे मराठी राज्याचा पुढाकार शाहू महाराजांनीं सोंपविला तो यांनीं स्वधर्मन्यायें करून राज्य चालविण्याच्या ध्येयाच्या सिद्धीस्तव सोंपविला हें उघड आहे. महाराष्ट्र धर्म स्थापनेच्या दृष्टीनें मराठी राज्याच्या धोरणाच्या व राजव्यवस्थेच्या कित्येक बाबींचें दिग्दर्शन आम्ही या पुढें जे करणार आहोंत त्या मध्यें नानासाहेब पेशवे यांनीं महाराष्ट्र धर्म रक्षणार्थ केलेल्या कांहीं बाबींचा उल्लेख येणार आहे. त्या वरून नानासाहेब पेशवे यांचें ध्येय मराठ्यांच्या राजसत्तेचा विस्तार करण्यांत महाराष्ट्र धर्मस्थापना हेंच असल्याचें दिसून येणार आहे. नानासाहेब पेशव्यांच्या ध्येयाची कल्पना करण्यास दुसरें एक साधन आहे त्याचा या ठिकाणीं उल्लेख करणें जरूर आहे. शिवाजी महाराजांचा स्वराज्यस्थापनेचा इतिहास त्या काळच्या महाराष्ट्रांतील राजकारणी पुढाऱ्यास पूर्णपणें अवगत होता ही गोष्ट माधवराव अनंत वेदांती यांनीं सवाई माधवराव पेशवे यास लिहिलेलें जें पत्र मागें आम्हीं दिलें आहे त्या वरून दिसून येणार आहे. ही बाब ध्यानांत घेऊन मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड ६ पान ३५६ वर नानासाहेब पेशवे यांच्या पत्रांतील खालील उद्गारांचा विचार केला असतां त्यांच्या ध्येयाच्या स्वरूपाबद्दल कल्पना करणें कठीण नाहीं. या पत्रांत नानासाहेब पेशवे यांचे " आम्ही गनीम लोक शिवाजी महाराजांचे शिष्य आहों " असे उद्गार आहेत. या उद्गारावरून नानासाहेब पेशवे यांना शिवाजी महाराजांच्या चरित्राची व ध्येयाची पूर्ण माहिती होती व शिवाजी महाराजांचे शिष्य म्हणवून घेण्यांत

त्यांना भूषण व अभिमान वाटत होता हें सिद्ध होत आहे. शिष्य आपल्या गुरूच्या चरित्राचें व ध्येयाचें नेहेमीं अनुकरण करीत असतो हें लक्षांत घेतलें असतां शिवाजी महाराजांचें जें ध्येय तेंच ध्येय मराठी राज्याचा विस्तार करण्यांत नानासाहेब पेशवे यांनीं आपले पुढें ठेविलें होतें असे अनुमान वरील उद्गारावरून काढणें गैरवाजवी होणार नाहीं. पहिल्या तिन्ही पेशव्यांचा व कायगांवटोकयाच्या दिक्षित घराण्यांतील पुरुषांचा फार घरोबा असे. कायगांवटोकेकर दिक्षित घराण्यांतील पुरुष मोठे तपोनिष्ट व निःस्सिम स्वधर्माचरणी होते. पेशवे घराण्यांतील पुरुष त्यांना गुरुस्थानीं मानीत असत व त्यांच्या उपदेशाची आणि आशिर्वादाची नेहेमीं अपेक्षा बाळगीत होते. थोरले बाजिराव पेशवे निजधामास गेल्या-नंतर थोडेच दिवसांचे आंत चिमणाजी बल्लाळ व बाळाजी बाजिराव यांनीं दिक्षितास लिहिलेल्या पत्रांतील कांहीं मजकूर खालीं दिला आहे त्या वरून स्वधर्मास अनुसरून वागण्याचें ध्येय बाळाजी बाजिराव उर्फ नाना साहेब पेशवे यास मान्य असल्याचें दिसून येतें. " कोणी मंत्र शास्त्री भेटतील आणि कांहीं अनुष्टान करा म्हणतील तर ते गोष्ट न करणें, कोणाचा मंत्र न घेणें, शिवपूजन व विष्णुपूजन व गायत्रीचा जप व वेदोक्त अनुष्टानें करीत जावे, म्हणून लिहिलें; तर असे प्रमाणेंच करीत जाऊं. स्वधर्मे करून आचरण करणें कोणी दुराचरणी अस-तील त्यास शासन करावें म्हणून लिहिलें; त्यास अवश्यमेव लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करूं " अशा प्रकारचें उद्गार नानासाहेब पेशेव यांचे आहेत.

नानासाहेब पेशवे यांचे कारकीर्दींत भगवंतराव यादव मुनशी या नांवाच्या कवीनें पेशव्यांचें स्तुतीपर काव्य रचून तें त्यांस अर्पण केलें आहे. त्या काव्यांतील खालील श्लोकावरून पेशव्यांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें या विषयींची कल्पना होणार आहे. कवि ह्मणतोः—

( इतिहासमंजरी पान २२१ )

पाहा आह्मज देवदुर्ग दुसरे विख्यात जे दक्षणीं
येथें शीघ्र शिवध्वजा उभविल्या घेवोनी एके क्षणीं
होते दुष्ट उपप्लवासि करिते ते सर्व निर्दाळिले
विष्णूनें अवतार हा धरुनिया धर्मासि संस्थापिले ॥ १० ॥

वरील श्लोकांत श्रीविष्णूप्रमाणें पेशव्यानीं धर्मसंस्थापना केल्याचा

उल्लेख करण्यांत आला आहे. महाराष्ट्रीय समाजांतील पेशव्यांच्या काळच्या सामान्य जनतेची पेशव्यांच्या ध्येयाविषयींची कल्पना वरील वर्णनांत व्यक्त झालेली आहे. पेशवे घराण्यांतील पुरुषाचें ध्येय त्यांच्या लहान वयापासून कोणत्या विशिष्ट स्वरूपाचें बनविण्याची खबरदारी घेण्यांत येत असे या संबंधीं एक महत्वाचा लेख उपलब्ध झाला आहे त्याचें दिग्दर्शन या ठिकाणीं करणें जरूर आहे. अगदीं अल्पवयापासून पेशवे घरण्यांतील पुरुषास कोणत्या प्रकारचें शिक्षण दिलें जात असे या विषयींची नक्की कल्पना या लेखावरून होत असल्या कारणानें त्याचें आधारे पेशवेपदावर अधिष्ठित होणाऱ्या पुरुषांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें बनविण्याची अपेक्षा करण्यांत येत असे याविषयीं अनुमान करणें कठीण नाहीं. या दृष्टीनें या लेखाचें महत्व फार मोठें आहे. मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांच्या चौथ्या खंडांत नारायण-व्यवहार शिक्षा या नांवाचा एक छोटासा प्रबंध छापण्यांत आला आहे. नारायणराव पेशव्यांच्या बालवयांत त्यांना धर्माचें शिक्षण देण्याचे उद्देशानें हा * प्रबंध तयार करण्यांत आला. चर्चा विषयक मुद्यासंबंधीं या लेखांतील महत्वाचे भाग आम्ही खालीं देत आहों.

श्रीगणेशायनमः । श्रीगोपालकृष्णायनमः । श्रीगुरुभ्योनमः ।

वर्णाश्रम धर्माच्या आश्रयानें आपापले व्यवहार करावे. राज्याधिकारी व राजकारणी आश्रित आहेत. त्यांनीं अधिकार संबंधें धर्माची स्थापना करावी. त्याचे गुण. आज्ञा श्री गोपाळकृष्ण कुलकृत शके १७११ सौम्य नाम संवत्सरे, माघ शुद्ध पंचमी.

( १ ) स्वधर्माच्या ठायीं विश्वास ठेवावा.

१ खरें बोलावें, २ नेमानें चालावें, ३ लोक वाईट म्हणतील तें टाकावें, ४ वडिलांचे आज्ञेंत रहावे.

( २ ) वृद्धपरंपरेची मर्यादा रक्षावी.

१ कुलाचार पहावा. २ देशाचार पहावा. ३ श्लाघ्य संबंध करावा. ४ स्त्रीच्या बुद्धी करून अमर्यादा न घडे ते करावें.

१ न्यायासंबंधीं निष्ठुरता असावी.

( ३ ) ज्ञान असावें.

१ पुढें दोष न येई असा पंचामतें निश्चय करावा.

---

* ह्या प्रकर्णांत एकंदर ३५ बाबी नमूद केल्या असून त्यांचें स्पष्टीकरण केलेलें आहे. त्यां पैकीं प्रस्तुत विषया संबधीं लागू बाबी तेवढ्या दिल्या आहेत.

१ जाहाल्या पात्रास व वचनास दोष आला तरी त्यास शिक्षे निमित्त प्रायश्चित्त घ्यावें व द्यावें. पुत्रांस व परकीयांस समान मोजावें.

( ४ ) धनीपणाचे गुण.

कुलीनाचें महत्व रक्षावें, २ समयोचित नेमलें द्रव्य सेवकांस द्यावें. ३ मंत्री, उपदेशी विश्वास ठेवावा. ४ शत्रू जिंकोन खजिना बाळगावा. ५ प्रजा पुत्रवत् पाळावी. ६ सेना क्षीण करूं नये. ७ पुत्रापासून व शिष्यापासून पराजय इच्छावा. ८ ब्राह्मण भोजनादि अन्नशांती होत असावी. ९ भूतमात्राचे ठायीं दया असावी. १० पापक्षयार्थ श्रौत, स्मार्त, कर्मे आचरावीं. ११ हृदयीं सच्चिदानंद नामस्मरण करून आनंदित असावें.

( ५ ) सत्पुरुषाचा सन्मान करावा.

१ जो कांहीं परमार्थ आचरला, हा सत्पुरुष, २ जो प्रपंच सात्विक बुद्धीनें करितो हा हि सत्पुरुष, ३ एकनिष्ठ सेवक हा हि सत्पुरुष जाणावा, ४ परोपकारी हा हि सत्पुरुष. ( तळीं बांधावीं, अन्नसत्रें घालावीं इत्यादि. )

( ६ ) शिक्षा प्रतिबंध सोसलेला असावा.

१ वडिलाचे शिक्षेचा प्रतिबंध, २ गुरुशिक्षेचा प्रतिबंध, ३ धन्याचे शिक्षेचा प्रतिबंध, ४ ईश्वर प्राप्तीनिमित्त सत्कर्माचा प्रतिबंधच आहे. इतकी आंच मनास लागली पाहिजे.

( ७ ) सारासार विचार स्वहितास अनुकूल पडे ऐसा. त्यांत धर्म सांभाळावा, त्यांत आचरण इतकें केलें पाहिजे.

१ आपण सर्व कामांत शहाणा आहे तर दुसऱ्याचें शहाणपण समजतें. हें ज्याचें त्यानें समजावें. २ आपण मूर्ख आहे तरी दुसऱ्याचें शहाणपण मातींत जातें, हें ज्याचें त्यानें समजावें. ३ गरज नसतां वस्तुमात्राची किंमत हलकी पडते हें ज्याचें त्यानें समजावें. ४ गरजवंताची अक्कल जाते, हें ज्याचें त्यानें समजावें. ५ आतुरास स्वहित अनहित समजत नाहीं, हें ज्याचें त्यानें समजावें. ६ लोभानें बुद्धि शाश्वत रहात नाहीं, लोभ सर्व गुणांचा नाश करितो हें ज्याचें त्यानें समजावें. ७ मित्र कोण, शत्रु कोण, याचा परिणाम कसा तो पूर्वीं समजावा, आधींच इरेस पडूं नये. ८ संपादिली कीर्ति संरक्षण करावी. ९ आमात्य पदवी रक्षावी. १० व्यायाम घेत असावा. हसगे– (घोड्यावर बसणें ), तालीमखाना, इत्यादि. ११ दुर्व्यसनाचे अभ्यासाचें आर्जन करील तो शत्रु समजावा. १२ बंधुवर्ग आज्ञेंत ठेवावें. योग्यता पाहून कामास ठेवावें. १३ प्रतिज्ञा सत्य

करावी. १४ औदार्य व शूरत्व असावें. १५ दुष्टाचें पारिपत्य करून शिष्टाचें पालन करावें. १६ सेवकजनांचे सुबुद्धपुत्र पाहून अश्वशिक्षे प्रमाणें लहानपणा-पासून ज्यास ज्या व्यवहाराचे कारण आहे त्या व्यवहारी एक शिक्षेनें तयार करावें. १७ काम सांगोन कसोटी पहावी. १८ इमानशाबुती कशी आहे ती दृष्टींत ठेवावी. १९ इमानी मनुष्य कृतकर्मा दिसेल त्यास वाढवीत जाणें. २० सर्व कारखाने चालवावयाची माणसें असतात व स्वराज्यांतील परराज्यातील उपयोगी वगैरे त्यांचे माहितगारीचा शिलाशिला जागा परंपरेनें अनुभवयुक्त चालवावा. शिलशिला उडूं देऊं नये. २१ धन्यापासून अमर्यादा व दंड व अधर्म घडल्यास तो धनी प्रजेस मान्य होत नाही. हें समजोन एक मर्यादा हीच खरी संपदा अशा निश्चयानें धर्म सोडूं नये.

( ८ ) समाधान वृत्ति असावी.

१ लाभ होईल तो ईश्वरास निवेदन करावा. अभिमान करूं नये. २ अभिमानी पांडवांचा वनवास स्मरावा. तेथें हि धर्म सोडिला नाहीं हें समजावें. गमविल्या शोक करूं नये. करावयाचें तें आधीं बोलूं नये. स्नान संध्या षट्कर्माचे ठायीं लक्ष असावें, होईल तें जपोन नेमाने करावे.

१ आराध्य देवतेचें पूजन करावें, २ स्नानसंध्या इत्यादि कर्म आन्हिक आश्रयाने करावे, ३ यथासामर्थ्ये सत्पात्रीं दान करावे, ४ प्रतिगृहीं निर्लेप असावे, ५ विद्येची वृद्धि सदरहु गुण लाभाचे लिहिले आहेत. त्यांत मुख्यत्व जो ज्याचा रोजगार असेल त्यांत त्यानें आपसा स्वधर्म सांभाळोन रोजगार करावा. अधर्माचे व्यवहारी बहुत लाभ होत असला तत्रापि तो व्यवहार टाकून स्पर्श न करावा. इतके धैर्य करील तोच श्रेष्ठ, तोच पुण्यवान्, तोच सर्वांचा गुरु होय. असा जो व्यवहार करील त्यास स्वधर्म कोणता व परधर्म कोणता तो हि समजू लागेल, मार्गास हि लागेल, यश हि निश्चयें करून त्यास आहे.

सर्व कर्मास शास्त्रे आहेत परंतु शास्त्रमते एक आणि दुसरे प्रकारची वहिवाट पडते त्यास प्रत्यवाय पडतो. तो दृष्टींत येत नाहीं. यास्तव पस्तीस गुणांचें कामास अधिकारी पस्तीस भिन्न भिन्न धर्म जाणते बुद्धिमान योजून ठेविले पाहिजेत. त्यांनीं आपापल्या गुणा प्रमाणें आचरण करून खावंदास अधिक उणें समजावून शिक्षा चालवावी. म्हणजे सर्वास मार्ग लागतील.

( ९ ) पालनाचे गुण.

१ आपला वर्णाश्रमधर्म असेल तोच आचरावा २ उदरपूर्ती निमित्त कांहीं एक रोजगार करावा. ३ सारे मलाच पाहिजे, मीच करीन अशी दुराशा वाढवूं नये. ४ दिवसास असे कर्म आचारावे कीं,रात्रीस सुखरूपनिद्रा यावी. ५ रात्रौ कर्म असें आचारावे कीं, दिवसास पुण्यशीलामध्ये जाऊन बसावें. ६ जें कर्म करणें तें योग्यायोग्य पाहून विवेक करून गुरुशिक्षे प्रमाणें करीत जावे. दृष्टीनें, अवलोकनें करून, अथवा श्रवणे करून, अथवा मननें करून सद्गुणाचा संग्रह करीत जावा. ८ विद्या शिकोन आचरण नाही तर तो व्यर्थ. मुखवालोकन करूं नये. ९ रोजगारासाठीं महाराची हांडी उतरावी आपली चढवावी असें म्हणोन ज्या समयी ज्यास जशी बुद्धि होईल तशी मनस्वी वर्तणूक करितात हेच नाशाचें कारण. हा लोभ विवेक चित्ताचे ठायीं करून अधर्म सोडावा, तो आपण दुसऱ्यास समजवावा. ११ हानि, मृत्यु, यश कर्मानुसार ईश्वर जन्मास घालून भोगवितो. ईश्वरास निवेदन केले पाहिजे. भोग सरतो त्यास दुसरा उपाय नाही. हळहळ करू नये. १२यतो धर्म स्ततो जयः या वचनावर विश्वास ठेवावा. शास्त्राची आज्ञा स्वार्थकासाठीं आहे. मान्य करावी. हें सार्थक आहे. धर्माची दुसरी परिक्षा पाहूं नये.

( १० ) नाश संरक्षणाचे गुण.

नाश संरक्षणाचे गुण एकंदर १३ तेरा नमूद केले आहेत. त्यां पैकीं लक्षांत ठेवण्या सारखे खालीं नमूद करितों.

**मन वश करावें, धर्माकडे योजावें.**

शेवटील श्लोकः—

शिक्षा त्रय मिदं जानन् लाभ पालन नाशनं ॥
शासनं वर्तनं येन कुरुते स जगद्वशी ॥

वरील लेखाचा मथळा अत्यंत महत्वाचा आहे.मराठी राज्यांतील सर्व अधिकारी व राजकारणी आश्रित यांनीं धर्म स्थापनेच्या दृष्टीने वर्णाश्रमधर्मास अनुसरून कोणते नियम पाळावयाचे याचें स्थूल दिग्दर्शन वरील लेखांत केले आहे व तें फार मार्मिक आहे. या लेखांतील उपदेश ज्या बालपेशव्याचे मनावर ठसविला जात असे त्याचे हातीं अधिकार सूत्रें आल्यावर त्याचें ध्येय कोणत्या स्वरूपाचे बनले पाहिजे हे सागावयास पाहिजे

असें नाहीं. या लेखासंबंधीं जितकी चर्चा करावी तितकी थोडीच होणार आहे.

आतां वरील लेखाखेरीज त्या काळच्या दुसऱ्या कांहीं लेखांचें या ठिकाणीं दिग्दर्शन करणें जरूर आहे. नारायणराव पेशव्यांचा वध झाल्यानंतर सातारकर छत्रपति यांनी राघोबादादा यांस पेशवाई पदावरून दूर करण्याचे बाबतींत अडतीस गृहस्थांच्या सह्याची एक यादी तयार केली होती. मराठी राज्यसत्तेचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें हें समजण्यास या यादींत एक महत्वाची बाब नमूद केली गेली असल्यामुळ ती यादी आम्ही एथें देतों.

का० प० या० पा ४४३

शक १६९५ फाल्गुन वा २

सातारकर छत्रपती यांनीं लिहिलेली यादी

\+ + + + +

एकूण अडतीस असामी यांस आज्ञा केली कीं, राजश्री रघुनाथ बाजीराव यांणीं पुण्यांत नारायणराव पंडित प्रधान याजवर कसाला केला तो तुह्मी पाहिलाच आहे. हें धर्मराज्य ( त्यांत ) अयोग्य गोष्ट जहाली.

पुढे मशारनिलनी पेशवाईची वस्त्रे मागितलीं. संकट जाणोन पाटविलीं परंतु पेशवाईची जी मर्यादा ती अगदींच राहिली नाहीं. शिक्का मनस्वी केला. यास्तव याजकडील पेशवाई दूर केली असे. तरी तुह्मी राज्यांतील चहूं पिढ्यांचे सेवक, राज्यास अपाय होऊ लागल्यास कल्याणदायक तें करावें, हेच सेवकपणाची रीत.

वरील यादींत " हें धर्मराज्य यांत अयोग्य गोष्ट जाली" असें नमूद केलें आहे. या वाक्यावरून त्या काळीं मराठी राज्य आणि धर्मराज्य या दोन संज्ञा समान राजकीय परिस्थितीच्या द्योतक समजल्या जात असत हें उघड होत आहे. अर्थातच त्या काळीं मराठी राज्य सत्तेचें धर्म हेंच ध्येय आहे अशी सर्वत्रांची भावना होती असें वरील यादीवरून दिसून येत आहे. वरील लेखाच्या नंतरचा एक महत्वाचा लेख मराठी साम्राज्याच्या अस्तास प्रारंभ होण्याच्या पूर्वीच्या काळचा व मराठी राज्यसत्तेचे ध्येय कोणत्या प्रकारचें होतें या बाबीचा उत्तम प्रकारचा उलगडा करणारा उपलब्ध झाला आहे. हा लेख पेशवाईच्या उत्तरार्धात राजकारण पटु म्हणून प्रसिद्धीस आलेले हैदराबादच्या निजामच्या दरबारांतील मराठ्यांचे वकील गोविंदराव काळे याचा आहे. चर्चा विषयक

मुद्याच्या दृष्टीनें हा लेख फार मार्मिक व महत्वाचा आहे. मराठी राज्याची स्थापना करणारे छत्रपति शिवाजी महाराज यांचे काळापासून तो शके १७१४ पर्यंत म्हणजे ज्या शकांत हें पत्र लिहिलें गेलें तों पर्यंत मराठी सत्तेची स्थापना व विस्तार करण्यांत मराठ्यांचें ध्येय कोणत्या प्रकारचें होतें याचें उत्तम प्रकारचें दिग्दर्शन या लेखांत गोविंदराव काळे यांनीं केलें आहे. दिल्लीच्या बादशाही दरबारांत आग्रस्थान प्राप्त करून घेऊन माहादजी शिंदे त्यांच्या आयुष्याच्या शेवटच्या वर्षात दक्षिणेत आले. दक्षिणेंत आल्या नंतर त्यांनीं दौलतराव शिंदे यांचा लग्नसमारंभ जामगांवी मोठ्या थाटानें केला. लग्न समारंभास नाना फडणीस गेले होते. तेव्हां उभयतांच्या भेटी झाल्या व निखालसपणें स्नेह भावाचीं बोलणीं झालीं. हें वर्तमान नानांनीं आपले प्रिय मित्र गोविदराव काळे यांस पत्रद्वारें कळविलें. त्यांना हें आनंदवृत्त समजोन फार समाधान झालें व त्यांनीं मराठ्यांच्या राजवैभवाचें गुणानुवादपर पत्र नाना फडणीस यास लिहिलें. त्या पत्राचा महत्वाचा भाग खालील प्रमाणें आहे.

( ऐतिहासिक टिपणें भाग १ पान १७ )

" ऐशियास पत्र ( नानांचें पत्र महादजींचे भेटीबद्दल ) पाहातांच रोमांच उभे राहून अति संतोष जाला त्या वरून ग्रंथांचे ग्रथ मनात आले ते लिहिल्यानें दृष्टीप्रचारांत बोचकपणा बहुचकपणा दिसतो दिसो. परतु जे मनांत आले त्यांतून किंचित् अमर्याद करून लिहितों. एक एक रकम मनांत आणून दीर्घ दृष्टीनें तोलून पाहिल्यास खरें आहे असेच निघेल ते काय ! तपशील-अटक नदीचे अलीकडे दक्षिण समुद्र पावेतों हिंदूचें स्थान-मुसलमानांचा देश-तुरक-स्थान नव्हे !–हे आपली हद्द पांडवांपासोन विक्रमाजित पांवेतों त्यांनीं राखून उपभोग केला. त्यामागें राजकर्ते नादान निघाले. यवनांचे प्राबल्य जालें चकत्यांनीं हस्तनापूरचें पद घेतलें. शेवटीं अलमगिराचे कारकीर्दीत यज्ञोपवितास साडेतीन रुपये जेजया बसून, ओलें अन्न विकावें, सर्वांनीं द्यावें हे नौबत गुजरली. त्या दिवसांत कैलासवासी शिवाजी महाराज शककर्ते व धर्मराखते निघाले. त्यांनीं किंचित् कोन्यांत धर्मसंरक्षण केलें. पुढें कैलासवासी नानासाहेब, भाऊसाहेब प्रचंड प्रताप सूर्य असें झाले कीं, असें कधीं जाले नाहींत. अमुक ब्राह्मणांनीं राज्य केलें असें शास्त्री पुराणी बर्णन नाहीं. परशुराम अवतारीं काय असेल तें

असो. त्या गोष्टी यास शिंदे होळकर दोन बाजू होऊन प्राप्त आल्या. हल्लीं श्रीमंताचे पुण्य प्रतापें करून व राजश्री पाटील बोवांचे बुद्धि व तरवारेच्या पराक्रमें करून सर्व घरास आले. परंतु जालें कसें ? प्राप्त झालें तेणें करून सुलभता वाटली. अगर मुसलमान कोणी असे तरी मोठे मोठे तवारिख नामें जाले असते. यवनाच्या जातींत तिळा इतकी चांगली गोष्ट झाल्यास गगना बराबर करून शोभवावी. आमचे हिंदूंत गगना इतकी जाल्यास उच्चार न करावा हे चाल आहे············न लाभाव्या त्या गोष्टी लाभल्या. त्यांचा बंदोबस्त शककर्त्याप्रमाणें होऊन उपभोग घ्यावें हें पुढेंच आहे············ जाल्या गोष्टी यांत केवळ मुलूख, राज्यप्राप्त, इतकेंच नाहीं तरी वेद-शास्त्र रक्षण, धर्मसंस्थापन, गोब्राह्मणप्रतिपालक सार्वभौमत्व, हातीं लागणें, कीर्ति, यश यांचे नगारे वाजणें इतक्या गोष्टी आहेत. '

वरील पत्रांत अथपासून इतिपर्यंत मराठ्यांच्या राज्य स्थापनेच्या व विस्ताराच्या ध्येयाचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें हें स्पष्टपणें पेशवाईतलि एका नामांकित राजकारणी पुढाऱ्यानें दर्शविलें आहे. मराठ्यांच्या ध्येयाच्या स्वरूपाबद्दलचा अधिक बळकट असा पुरावा तो काय पाहिजे ? वरील पत्रांतील शेवटचें वाक्य फार महत्वाचें आहे. वेदशास्त्र संरक्षण, धर्मसंस्थापन, व गोब्राह्मण प्रतिपाल इत्यादि बाबी मुलुख व राज्य प्राप्ति होऊन ही सिद्ध झाल्या नसत्या तर मुलुख व राज्य संपादनाची गोविंदराव काळे यास विशेष प्रकारची महती वाटत नव्हती असा गोविंदराव काळे यांनीं आपला अभि-प्राय स्पष्टपणें दर्शविला आहे. मुलुखहव्यासानें ज्याप्रमाणें पुरातन व आधुनिक काळची कित्येक राष्ट्रें स्वसत्तेचा विस्तार करण्यास प्रवृत्त होतात तशा प्रकारची मनोवृत्ति मराठ्यांनीं स्वराज्याचा विस्तार करण्यांत कधीं हि बाळगली नव्हती; ही बाब गोविंदराव काळे यांनीं वरील पत्रांत स्पष्टपणें नमूद केली आहे. मराठ्यांच्या दृष्टीनें राज्यप्राप्ति हें त्यांचें ध्येय नसून स्वधर्म स्थापनेच्या त्यांच्या ध्येयाचें तें एक साधन होतें. स्वधर्मस्थापने करितां स्वराज्याचा विस्तार अशी मराठ्यांची समष्टीदृष्टया राजकीय मनोरचना होती. वरील पत्र ज्या थोर मुत्सद्दी पुरुषास गोविंदराव काळे यांनीं लिहिलें आहे त्यांच्या धेयाचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें या प्रश्नाचा हि प्रस्तुत स्थळीं विचार करणें अवश्य आहे. नारायणराव पेशवे यांचा खून झाल्यानतर मराठी साम्राज्याच्या रक्षणाची जबाबदारी ज्या महाराष्ट्रीय राजकरणी पुरुषांवर पडली त्या पुरुषां

पैकीं नाना फडणिस हे प्रमुख होते. त्या काळच्या पोवाड्यांतील " खूप शर्तीनें राज्य राखिलें फडणीस नाना " ही उक्ति सर्वश्रुत आहे. तरी अशा प्रकारच्या थोर मुत्सद्याच्या ध्येयाचे स्वरूपाबद्दलचा पुरावा मिळाल्यास तो अत्यंत महत्वाचा समजला पाहिजे. असल्या प्रकारचा उपलब्ध झालेला पुरावा आम्ही खालीं नमूद करितों. जोधपूर दरबारीं असलेले पेशव्यांचे वकील कृष्णाजी जगन्नाथ यांचेकडेस नाना फडणीस यांनीं जोधपूरच्या राज्यास पाठविलेल्या एका पत्राची हिंदवी नक्कल उपलब्ध झाली आहे. ऐतिहासिक टिपणें भाग ६ पान २५ वर हें पत्र छापलें आहे त्यांतील महत्त्वाचा मजकूर आम्ही येथें देतों.

"आपण दाना व दूर अंदेश. ही गोष्ट आपणास जाहीर असले कीं, हिंदुस्थानांतील तमाम हिंदु सरदार चित्तापासून श्रीमंतांचा दाब इच्छितात. त्याजकडोन जो कोणी इकडील बंदोबस्तास येतो, सर्व प्रकारें सर्वकाल त्याचे रजामंदींत सादर राहतात. कारण कीं **श्रीमंतांचा दाब या प्रांतीं असल्यानें हिंदु धर्माचा चिराग रोषण राहील............ श्रीमंतांसीं व आह्मांसी दोस्ती करीमपासून. श्रीमंत व आपण हिंदु धर्माचे संरक्षक**........ बाद, अखबारे वरून दर्याफ्त जालें कीं, अजमेरच्या रुखे आपणाकडोनच जादती व पेशकदमी जाली. याजवरून बहुत अपूर्व वाटलें. पुरातन स्नेहाचे व हमम शरबी भाव दाखवून फिसाद दूर करण्याविशीं इकडे लिहावें, आणि आपणच फिसाद उभा करावा यांत काय सलाह पाहिली असेल तें न कळे. ज्या आजिमुबान पर्वतावर अफजाल इलाहीच्या मेघाची वृष्टि सर्व काळ सदोदीत अशी कीं, ज्या उदकापासून कित्येक दर्या होऊन आलमांत मुहीत जाले, त्या उमद्या पर्वतास फितने अंगेजीच्या चिनगारीयानें काय व्हावयाचें आहे हें आपणांस हि समजत आहे. व हमेशा दक्षणेकडोन प्रताप समुद्राचे लोट व तरंगच चहुंकडे, अकसर हिंदुस्थानांत असे पोहचत गेले कीं शायद फितन व फिसादाची आग कोठे राहिली नाहीं."

वरील उद्गारावरून मराठी राज्याचा प्रसार म्हणजे हिंदु धर्माचा दीप सतत जळत राहणें अशी नाना फडणीस यांची भावना असल्याचें स्पष्ट दिसून येत आहे. वरील पत्रांत त्या काळचे हिंदुस्थानांतील सर्व राजे रजवाडे पेशव्यांच्या दोस्तीची अपेक्षा बाळगीत असत असा उल्लेख आला आहे. त्यावरून मराठी राजसत्तेची इभ्रत किती श्रेष्ठ दर्जाची होती हें दिसून येत आहे. हिंदु धर्माचें रक्षण करण्याचें ज्या राजसत्तेचें ध्येय व ज्या राजसत्तेची

इंग्रजांशीं श्रेष्ठ प्रकारची त्या राजसत्तेची दोस्ती संपादन करण्याची हाव हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांनी त्या काळीं बाळगावी हें अगदी स्वाभाविक होतें. गोविंदराव काळ्यांच्या वरील पत्रानंतर थोडक्याच वर्षांत त्यांच्या स्वप्नांतहि झाला नसेल अशा रितीने मराठी साम्राज्याचा ऱ्हास होण्यास प्रारंभ झाला. या ऱ्हासाचे काळांत महाराष्ट्रीय समाजांतील राजकारणी पुढाऱ्यास मराठ्यांच्या स्वराज्य स्थापनेच्या व विस्ताराच्या ध्येयाविषयीं पूर्ण विसर पडला होता किंवा काय हा एक महत्वाचा प्रश्न आहे. त्याचप्रमाणें मराठी राज्याच्या ऱ्हासाच्या काळांत मराठ्यांच्या ध्येयाविषयीं महाराष्ट्रेतर प्रांतांतील लोकांची काय कल्पना होती ह्या प्रश्नाचीहि चर्चा करणें जरूर आहे. मराठी साम्राज्याच्या पडत्या काळात इंग्रजांशीं टक्कर देण्यांत ज्या यशवतराव होळकरासारख्या योध्याचा अंत झाला त्याचीं कांहीं पत्रें अलिकडे प्रसिद्ध झालीं आहेत. सन १२१५ मोहरम छ १० चें पत्र राजश्री व्यंकोजी भोसले सेना धुरंधर यांस यशवंतराव होळकर यांनीं लिहिलेलें आलिकडे उपलब्ध झालें आहे ( मराठे शाही बुडाल्याची मीमांसा पान ५ ). या पत्रांतील पुढील मजकूर फार महत्वाचा आहे. स्वराज्यांत जलचरांचा प्रसार विशेष झाला तो होऊं नये म्हणून खटपट करण्यांत क्रोडो रुपये खर्च केले हें नमूद करून यशवंराव होळकर म्हणतातः—

" हल्लींच्या आपसांतील बदचालीं पाहून सर्वांस आपापलें घर संरक्षण करून जमीदारीनीं असावें हेंच प्राप्त झालें...... हिंदु धर्मास मुख्य आपले इरादे नमूद असावे ते कांहीं एक दिसण्यांत येईना. स्वधर्मच एक आमुचा नफा वरकडास नुकसानी असाही अर्थ नाहीं. "

वरील पत्रापेक्षांहि अधिक स्पष्ट व खुलासेवार उद्गार यशवंतराव होळकर यांनीं पंत प्रतिनिधी यास पाठविलेल्या पत्रात काढले आहेत ते या ठिकाणीं नमूद करणें जरूर आहे.

मराठे व इंग्रज पान ९

" आजपर्यंत हिंदू राज्य सर्वांनीं एकादिल राहून चालविले. अलिकडे ज्याचे त्याचे दौलतींत गृहकलह होऊन राज्यास विपर्यास पडून हिंदुधर्म नाहींसा होण्यास मूळ झालें त्याचें छेदन करण्याम सर्वत्र एकदिल झालें पाहिजे तरच मुळाचें छेदन होऊन स्वधर्माचार पूर्ववत

प्रमाणें चालून हिंदूंची कायमी राहील. इकडील क्रम आरंभिला आहे हाच यावतदेह चालवावा असें मनांत आहे. परमेश्वर अनुकूल होऊन जें घडवील तें खरें. परंतु एकानेच असा प्रकार करून सर्वत्रांनीं तमाशे पाहून आपआपली दौलत संभाळून असावे यांतील परिणाम कसा हे मनीं विचारून ज्यांत हिंदू धर्माची कायमी व परिणाम नीट तें करावे. याचा विचार तुमच्या सारख्यांनीं न केला तर दुसरे कोण करील ?"

वरील उद्गारावरून यशवंतराव होळकर यांनीं इंग्रजाबरोबर जो सतत झगडा चालविला होता तो चालविण्यांत त्यांचें ध्येय स्वधर्माचाराचें रक्षण व हिंदूधर्माची कायमी संपादन करणें हें असल्याचें सिद्ध होत आहे. यशवंतराव होळकराचे समकालीन शिंदे घराण्याचे पुढारी दौलतराव शिंदे यांचें ध्येय हि वरील स्वरूपाचेच होतें असें नागपूरकर भोसले यांचे हस्तक आत्माराम शिवराम व बाळाजी यशवंत यांस दौलतराव शिंदे यांनीं लिहिलेल्या पत्रावरून दिसून येतें.

( मराठेशाही बुडाल्याची मीमांसा पान ९ )

"राजश्री सेनासाहेबसुभा यांचें लक्ष स्वधर्मसंरक्षणाविषयीं पूर्ण आहे. प्रसंग पाहून जलचराशीं तूर्त समेट घातला परंतु त्याजवर कायम नाहींत. प्रस्तुत कटकबंगाला इकडे दोन्हीकडील फौजा जाऊन जलचराशीं शह बसवावया भावी फौजेची तयारी हजेरीचे निमित्त होत आहे. आपल्याकडून सुभा या प्रांतीं रवाना व्हावा ह्मणजे त्यांची फौज जाऊन त्यास सामील होईल वगैरे लिहिलें तें विदित जाहले. अशास स्वधर्मावर खंबीर होऊन उद्योग होत असावा हें त्यास विदित होय. तदनुसार त्यांनीं विचारणा केली हें युक्तच होय."

या प्रमाणें दौलतराव शिंदे यांचे उद्गार आहेत व त्या वरून त्यांच्या ध्येयाच्या स्वरुपाविषयींची कल्पना कारिता येते. आतां मराठी साम्राज्याच्या पहल्या काळांत भरतखंडांच्या इतर प्रांतांतील लोकांची पेशव्यांच्या ध्येयाविषयींची कल्पना काय होती हें रामेश्वरचा राजा मुत्तुरामलिंग यानें दुसऱ्या बाजिरावास पाठविलेल्या खालील पत्रावरून दिसून येणार आहे. इंग्रजांनी मुत्तुरामलिंग यास कैद करून त्यास त्रिचनापल्लीचे किल्यांत ठेविले व त्याचा सर्व मुलूख जप्त केला त्या प्रसंगीं हें पत्र मुतुरामलिंग यानें दुसरे बाजिराव पेशवे यास लिहिलें आहे.

शक १७२१ चैत्र वा। ६ का. प. या. पान ४६१

बाजिराव पंडित प्रधान यास पत्र मुत्तुरामलिंग विजय सेतुपति ( श्री रामेश्वर क्षेत्राचे राजे ).

" तरी धर्म संस्थान देव ब्राह्मण भूयिष्ठ आहे. उत्तरेस काशी दक्षिणेस रामेश्वर, हे दोन्ही पुण्य क्षेत्रें नीचांनीं अक्रमिलीं आहेत. आपण धर्मस्थापना करणार देव ब्राह्मण प्रतिपालक दुष्ट निग्रह शिष्टप्रतिपालक हिमःसेतुपर्यंत आपला पराक्रम चालतो .....पूर्व- वत् प्रकारें मुलूख सुद्धा आमची स्थापना करून राज्य आमचे स्वाधीन करून इत्यादि. "

मराठी साम्राज्य लयास जाऊन इंग्रजी सत्ता महाराष्ट्रांत स्थापन होई पर्यंत महाराष्ट्रीय समाजाचे जे राजकारणी पुढारी होऊन गेले त्यांच्या ध्येयाचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें हें आतां पावेतों नमूद केलेल्या पुराव्यावरून व त्या पुराव्या विषयीं केलेल्या चर्चेवरून उघड झालें आहे. गोब्राह्मण प्रतिपाल, वेदविद्यारक्षण, श्रुतिस्मृतिप्रणितधर्माचेप्रतिपालन, न्यायनीतिनुसारप्रजारक्षण हें ध्येय शिवाजी महाराजापासून तों थेट दौलतराव शिंदे व यशवंतराव होळकर यांच्या काळापावेतों झालेल्या महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांचे मराठी राज्याची स्थापना व विस्तार करण्यांत होतें हें निःसंशयपणें सिद्ध झालें आहे. आतां महाराष्ट्रीय समाजाच्या पारमार्थिक अथवा हरिकथा निरुपणी पुढाऱ्यांचें ध्येय कोणतें होतें व त्या ध्येयाचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें या विषयाच्या चर्चेकडे वळूं.

### शिवपूर्वकालिन् महाराष्ट्रीय समाजाच्या पारमार्थिक अथवा हरिकथानिरुपणी पुढाऱ्यांच्या ध्येयाचें स्वरूपः—

देवगिरीच्या यादव घराण्याची राजसत्ता महाराष्ट्रांत नष्ट होऊन त्या ठिकाणीं मुसलमानांची सत्ता स्थापित झाल्यापासून तों शिवाजी महाराजांचा उदय होईपर्यंत महाराष्ट्रीय समाजाचे जे हरिकथा निरुपणी पुढारी होऊन गेले त्यांचें ध्येय कोणत्या प्रकारचें होतें या बाबीची चर्चा करण्याकडे आतां आम्ही वळतों. महाराष्ट्रांतील हरिकथा निरुपणी पुढाऱ्यांचें ध्येय निश्चित करण्यास उपयुक्त अशीं जीं साधनें आपणास उपलब्ध झालीं आहेत त्यांचें प्रथम थोडक्यांत दिग्दर्शन करणें जरूर आहे.

महाराष्ट्रांत जितके हरिकथा निरूपणी पुढारी होऊन गेले त्यांनीं निर्माण केलेलें विस्तृत पद्यरूपी वाङ्मय उपलब्ध झालें असून त्यापैकीं बरेंच

छापून प्रसिद्ध झालें आहे. हें सर्व वाङ्मय भक्तिप्राधान्य असून अनुषंगिक रितीनें दुसऱ्या कांहीं विषयांची चर्चा या वाङ्मयांत आढळण्यांत येतें. हें वाङ्मय कोणत्या हेतूनें निर्माण केलें गेलें या विषयींच्या चर्चेशीं तूर्त आपणांस कांहीं कर्तव्य नाहीं. प्रस्तूत या वाङ्मयाचें ज्या दृष्टीनें आपणांस निरीक्षण करावयाचें आहे त्या दृष्टीनें या वाङ्मयांतील कोणत्या भागाचे निरीक्षण करणें आपणांस जरूर आहे त्याचें आम्ही दिग्दर्शन करितों. कलियुगमहिमा, जनास उपदेश, नामस्मरणमहिमा या तीन मथळ्याखाली येणाऱ्या पद्यरूपी वाङ्मयाचा वरील काळांतील महाराष्ट्रीय हरिकथा निरुपणी पुढाऱ्यांच्या ध्येयाचें— स्वरूप निश्चित करण्याकडे आपणांस उपयोग होणार आहे. वरील मथळ्याखालीं येणाऱ्या पद्यांत संतकवींनीं त्यांच्या काळच्या महाराष्ट्रीय समाजाच्या स्थितीचे वर्णन केलें असून, हें वर्णन करीत असतां महाराष्ट्रीय समाजांतील लोकांची अवनति कोणत्या बाबतींत झाली आहे व कोणत्या उपायानें त्यांची उन्नति होईल असे विषयीं त्यांनी आपले अभिप्राय व्यक्त केले आहेत. वरील प्रकारच्या पद्यावरून पद्यरचणाऱ्या विवक्षित संत कवींचें ध्येय व त्याचें स्वरूप सहज दिसून येते. ही बाब लक्षात घेतली असतां या विषयाची चर्चा मुख्यत्व करून वर दर्शविलेल्या महाराष्ट्रीय संतकवींच्या पद्यवाङ्मयापकीं वरील स्वरूपाच्या उल्लेखाचे आधारे आह्मी करणार आहोंत हे उघड आहे. वरील काळांत महाराष्ट्रीय समाजाचे हरिकथानिरूपणी पुढारी अनेक होऊन गेले. या हरिकथानिरुपणी पुढाऱ्यांचे दोन वर्ग दिसतात. एक प्रवृत्तीचा उपदेश करणारा व दुसरा निवृत्तीचा उपदेश करणारा वर्ग. या दोन्ही वर्गांपैकीं ज्या कांहीं ठळक व्यक्तींच्या ध्येयाचे स्वरुपाविषयींची चर्चा करण्याचें आह्मी ठरविलें आहे त्यांची नांवें येणे प्रमाणेः— ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, सरस्वतीगंगाधर, त्र्यंबकस्वामी, आणि रामीरामदास उर्फ श्रेष्ठ. या ठळक व्यक्तीं खेरीज त्या काळीं होऊन गेलेल्या ब्राह्मणेतर संत कवींच्या ध्येयाविषयींहि आह्मी थोडीबहुत चर्चा करण्याचें ठरविलें आहे. वरील पुढाऱ्यांच्या ध्येयाचें स्वरूप निश्चित करावयाचें असल्या कारणानें त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजाच्या स्थितीचेंहि दिग्दर्शन करणे जरूर आहे. ज्या महाराष्ट्रीय समाजाच्या हरिकरूपणी पुढाऱ्यांचीं नांवें आतांच दर्शविण्यात आलीं आहेत त्यां पैकीं ज्ञानेश्वरांच्या काळच्या महाराष्ट्रीय समाजाच्या स्थितीचें थोडेबहुत दिग्दर्शन करूं. ज्ञानेश्वराचा जन्म शके ११९७ मध्ये होऊन शके १२१८ सालांत त्यांनीं

समाधी घेतली. त्यांच्या एकंदर २१ वर्षांच्या हयाती पैकीं १९ वर्षे पावेतों महाराष्ट्रास मुसलमानी सत्तेचा स्पर्श झालेला नव्हता. ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरी ग्रंथ समाप्त केला ते वेळी देवगिरीच्या जाधव घराण्याची राजसत्ता महाराष्ट्रांत नांदत होती. ज्ञानेश्वरीच्या समाप्तीचेउद्गार ज्ञानेश्वरकालीन महाराष्ट्रीय समाजाच्या स्थितीची कल्पना करण्यास अत्यंत उपयुक्त आहेत. ज्ञानेश्वर म्हणतातः—

ऐसें युगींपरी कळीं आणि महाराष्ट्रीयमंडळीं ।
श्रीगोदावरीच्या कुळीं । दक्षिण लिंगीं ॥
त्रिभुवनैकपवित्र अनादि पंचक्रोशक्षेत्र । जेथे जगाचें जीवनसूत्र ।
श्रीमहालया असे । तेथ यदुवंशविलासु ।
जो सकलकलानिवासु । न्यायातें पोषी क्षितीषु । श्री रामचंद्र ॥

सकळ कलांचा आश्रयदाता श्रीरामचंद्र न्यायानें व नीतीने महाराष्ट्रीय समाजाचें रक्षण करीत होता असें ज्ञानेश्वरांनीं ज्या अर्थी वरील ओव्यांत वर्णन केलें आहे त्या अर्थी मुसलमानी राजसत्तेच्या दुष्परिणामाचे वारे हि त्या काळ-पर्यंत महाराष्ट्रीय समाजास लागलें नव्हते हे उघड आहे. ही बाब लक्षांत घेतां मुसलमानी सत्तेच्या कचाटींत सापडलेल्या श्रुतिस्मृत्युक्त धर्माचे पालन करण्याचा प्रश्न ज्ञानेश्वर ज्या काळी महाराष्ट्रात होऊन गेले त्या काळीं महाराष्ट्रीय समाजापुढें अगर त्या समाजाच्या पुढाऱ्यापुढे आलेला नव्हता हें उघड आहे. असे स्थितीत ज्ञानेश्वराच्या कामगिरीची महती काय कारणास्तव समजली जाते व कोणत्या परिस्थितीच्या योगाने ज्ञानेश्वरांनीं केलेल्या कार्याची महति प्रस्थापित झाली याचा शोध घेणे जरूर आहे. महाराष्ट्रात ज्ञानेश्वरांची महति मुख्यत्वें करून त्यांची रचलेल्या दोन ग्रंथामुळे प्रस्थापित झाली आहे. हे दोन ग्रंथ म्हटले म्हणजे ज्ञानेश्वरी व अमृतानुभव हे होत. मराठी वाङ्मयांत ज्ञानेश्वरी इतका पुरातन व उत्कृष्ट असा ग्रंथ झालेला नाही. आज मितीसहि ज्ञानेश्वरीनिरुपण श्रवणार्थ महाराष्ट्रीय जनांच्या झुंडींच्या झुंडी जितक्या लोटतात तितक्या दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथाच्या श्रवणार्थ लोटत असल्याचें क्वचितच आढळतें. ही बाब लक्षांत घेतां ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरी ग्रंथ ज्या काळीं रचला त्या काळची महाराष्ट्रीय समाजाची परिस्थिती कोणत्या प्रकारची होती याचें परीक्षण करणें जरूर आहे. अशा प्रकारचें परीक्षण केल्यानें ज्ञानेश्वरी ग्रंथ रचण्याचा ज्ञानेश्वरांचा हेतु व त्या बरोबरच त्यांचें ध्येय

कोणत्या स्वरूपाचें होतें या बाबींचा उलगडा होणार आहे. शक ७०० अगर ८०० चे सुमारास श्रीमत् आद्यशंकराचार्यांनीं घडवून आणिलेल्या धर्मस्थापनेच्या योगानें महाराष्ट्रांत श्रुतिस्मृत्युक्त धर्माची स्थापना होऊन वेद, उपनिषदें इत्यादि ग्रंथांच्या पठणाचीं व वर्णाश्रम धर्मास अनुसरून आचारपरिपालन करण्याची प्रवृत्ति महाराष्ट्रीय जनतेंत सुरू झाली. या धर्मस्थापनेच्या योगानें महाराष्ट्रीय जनतेंत कालांतरानें अस्सल कर्मठ व आकुंचित वृत्तीचे वेदशास्त्रविद्यापारंगत असे अनेक ब्राह्मण निर्माण झाले. या प्रमाणें वैदिक धर्माची घडी पूर्ववत बसून समाजांत सर्वत्र स्थीरस्थावर झाल्यानंतर महाराष्ट्रीय समाजांत जैन, लिंगायत, मानभाव, इत्यादि वैदिक धर्मावर हल्ले चढविणारे नूतनपंथ अस्तित्वांत आले. वरील तीन पंथांपैका जैनपंथ हा शंकराचार्यांच्या पूर्वीचाच होता. शंकराचार्यांच्या धर्मस्थापनेच्या योगानें या पंथास आलेलें मांद्य कांहीं काळानें नष्ट होऊन वैदिक धर्माशीं या पथानें स्पर्धा करण्यास फिरून सुरुवात केली. याच सुमारास वर दर्शविलेल्या पंथांपैकीं लिंगायत व मानभाव या दोन पंथांची दोन ब्राह्मणांनीं प्राणप्रतिष्ठा करून त्या पंथांच्या तत्वाचा उपदेश व प्रसार महाराष्ट्रीय जनतेंत करण्यास सुरवात केली. अशा प्रकारच्या परिस्थितींत ज्ञानेश्वरानीं ज्ञानेश्वरीची रचना केली. महाराष्ट्रधर्म व वारकरी सांप्रदाय एकच कां भिन्न या प्रश्नाची चर्चा पुढील एका प्रकरणांत आह्मीं करण्याचें योजिलें असून त्या चर्चेंत ज्ञानेश्वरांच्या ध्येयाच्या स्वरुपाचें साग्र व खुलासेवार स्पष्टीकरण आह्मीं करण्याचें ठरविल्या कारणानें तूर्त आह्मी या ठिकाणीं इतकेंच नमूद करून ठेवितों कीं, मुसलमानी धर्मापासून महाराष्ट्रधर्माचें रक्षण करणें हा ज्ञानेश्वरांपुढें केव्हांहि प्रश्न नव्हता व हें त्यांचें ध्येयहि नव्हते. महाराष्ट्र धर्माच्या अनेक बाबींपैकीं मोक्षधर्म या एका बाबीच्या सिद्धीस अवश्यक असे जें ज्ञान त्या ज्ञानाची महती वर्णन करून त्याचा प्रसार व परिचय महाराष्ट्रीय समाजांतील सर्व जातींच्या आबाल वृद्धास करून देऊन त्यांचा उद्धार करावयाचा हें ज्ञानेश्वरांचें ध्येय होतें. ज्ञानेश्वरांचें हें ध्येय कोणत्या कारणास्तव त्यांना आपल्यापुढें ठेवावे लागलें व त्या साठीं त्यांनीं कोणता मार्ग स्वीकारला या विषयींची विस्तृत चर्चा वर दर्शविल्या प्रमाणें आह्मी पुढें करण्याचें अभिवचन देऊन ज्ञानेश्वरांचे समकालीन असे जे दुसरे नामांकित महाराष्ट्रीय संत नामदेव त्यांच्या ध्येयाचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें याचें दिग्दर्शन करण्याकडे आतां आम्ही वळतों.

नामदेव हे ज्ञातीचे शिंपी होते हें सर्वत्रास विदितच आहे. हे ज्ञानदेवांचे समकालीन होते व त्यांनीं आणि ज्ञानदेवांनीं शके १२१३ चे सुमारास समवेत तीर्थ यात्रा केल्याचें वर्णन त्या काळच्या म्हणून समजल्या जाणाऱ्या अभंगांतून आलें आहे. ज्ञानेश्वरांचे पश्चात बरेंच उतार वय होई तों पर्यंत नामदेव हयात होते असें त्यांच्या चरित्रावरून दिसून येतें. ज्ञानेश्वरांचे पश्चात नामदेवांच्या हयातींत मुसलमानांच्या दोन स्वाऱ्या महाराष्ट्रावर झाल्या. एक स्वारी शके १२२८ मधील व दुसरी आणि शेवटची शके १२३४ मधील. शके १२२८ चे स्वारींत रामदेवराव जाधव यांचा पराभव होऊन त्यास मलिककाफूरनें कैद करून दिल्लीस नेलें. तेथें सहा महिने अटकेंत राहिल्यानंतर दिल्लीच्या बादशहानें त्यांची सुटका करून दक्षिणेंत रामदेवरावाची परत रवानगी केली. त्या नंतर शके १२३१ सालांत रामदेवराव वारला व त्याचा मुलगा शंकरदेव गादीवर बसला. शंकरदेवाचे कारकीर्दीत शके १२३४ मध्यें मलिककाफूरनें देवगिरीवर फिरून स्वारी करून शंकरदेव यास साफ बुडविलें. यानंतर शके १२४० पावेतों रामदेवरावाचा जावई हरपाळदेव यानें कांहीं सैन्य जमवून मुसलमानी सत्तेशीं झगडण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांत त्यास कांहीं यश न येतां तो मुसलमानांचे हातीं सांपडून त्याचे अत्यंत हाल होवून तो ठार मारला गेला. मलिककाफूरच्या शके १२२८ सालांतील महाराष्ट्रावरील दुसऱ्या स्वारीपासून महाराष्ट्रास मुसलमानी राजकीय वर्चस्वाचा निकट संबध घडावयास लागला. शके १२४० सालांत मुसलमानी सत्तेचा प्रतिकार करण्याची महराष्ट्राची शक्ति नष्ट झाली. नामदेवांची हयात लक्षांत घेतली असतां मुसलमानी राजकीय वर्चस्वाचें दुष्परिणाम महाराष्ट्रिय समाजावर कोणत्या प्रकारचे झाले याचें ज्ञान होण्यास जितका अवसर मिळावयास पाहिजे होता तितका त्यास मिळाला होता असें दिसतें. त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजाच्या स्थितीचें द्योतक असे नामदेवांचे कांहीं उद्गार आम्ही खालीं दिले आहेत त्यावरून त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजाच्या स्थितीची यथायोग्य कल्पना झाल्यावाचून रहाणार नाहीं.:—

राजेभ्रष्ट यवन झाले । ठायीं ठायीं दोष घडले ।
मग यीहीं अवतार घेतले । कलिदोष हरावया ॥

नामा म्हणे पुढे हे जन । यवनसंसर्गे कठीण ।
होतां गातीं हरीचे गुण । ते उद्धरती सर्वथा ।

पाखांडे बहुत कलीमाजि । वर्णाश्रम सकळीं बुडविले तरी ।
पापाचिया राशी जळता नामीं । निश्चय हरिनामीं नामा म्हणे ।

कलीचोये अंती होणार कलंकी । मारील म्लेंछ कीं घोड्यावरी ।
फिरून धर्माची उभारिल गुडी । कृतयुग प्रौढी करी तोचि ॥
तोवरी साधन हरिनाम कीर्ति । सताची संगती नामा म्हणे ॥

ऐसा कलियुगीचा आचार । अधर्मपर झाले नर ।
ये कली माझारी । पुत्रपित्याचे वैरी............
आणि एक वर्तेल अपवित्र । ब्राह्मण सांडतील वेद मंत्र ।
आचार सांडोनी होती शुद्र । ऐसे अपवित्र कलियुगीं ॥
थोर वर्तमान पडेल काळू । चहूवर्णांचा होईल एकचि मेळू ।
कोणी कोणांचा न धरील विटाळू ।.........

देवा पापछळें कापते मेदिनी । षट्कर्मे ब्राह्मणें सांडियली ।
दैत्यांच्या भारे दाटली अवनी ।............
पाखांडे वेदातें न मानिती बळी । अधर्म प्रवर्तला मही तळी ।
ऐसी पापें कली थोर झाली ।.........
म्हणोनिया जिवें त्रासू घेतला । सत्य लोपले धर्म बुडाला ।
अजूनि काय पहातोस उगला । धावे विठ्ठला म्हणे नामा ॥

---

१ शिवाजी माहाराज व त्यांचे पश्चात् धनाजी जाधव, संताजी घोरपडे, थोरले बाजीराव, राघोबा भरारी यांनीं मुसलमानी सैन्याचा पराभव मराठी तट्टावर एका दिवसांत पन्नास शंभर मैलांची दौड मारणाऱ्या मराठा घोडेस्वारांच्या जोरावर केला ही बाब सुप्रसिद्ध आहे. महाराष्ट्रीय समाजाच्या वरील राजकारणी पुढाऱ्यांचें ध्येय श्रुतीस्मृत्युक्त धर्माची अथवा महाराष्ट्र धर्माची स्थापना करणें हें असल्याचें मागें नमूद केलेल्या पुराव्यावरून सिद्ध झालें आहे. ह्या बाबींचा विचार केला असतां नामदेवाची ही उक्ति शिवाजी महाराज व इतर महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनीं महाराष्ट्रधर्मस्थापनेच्या ध्येयास्तव केलेल्या स्वराज्य स्थापनेस पूर्णपणें लागू पडते. नामदेवांचे पश्चात् तीनशें वर्षांनीं जी बाब सिद्ध जाहली तिची स्थूल कल्पना त्यांनीं आपल्या हयातींत वरील प्रमाणें नमूद करून ठेऊन एक प्रकारचें भविष्य कथन केलें आहे. ईश्वरी साक्षात्कार झालेल्या सत्पुरुषास त्रिकाल ज्ञान प्राप्त होतें असा समज आपल्यांत प्रचलित आहे. या समजास अनुसरून ईश्वरी साक्षात्कार झालेल्या नामदेवा सारख्या भगवद्भक्तास तीनशें वर्षांनंतर अस्तित्वांत येणाऱ्या बाबींचें ज्ञान अगाऊ प्राप्त झालें असण्याचा संभव आहे.

वेदावेगळे कर्मकरी । मनींपाखंड धरी तो पचिजे अघोरी । चिरकाळवरी ।... ... ... ... ... ...

सांडोनि ब्राह्मणपण । शूद्ररीति आचरण ।
तो दृष्टी पडिलिया जाण । महादोष घडेल ॥

वर नामदेवांचे जे उद्गार दिले आहेत त्यावरून मुसलमानांच्या सत्तेचे व संसर्गाचे योगानें महाराष्ट्रीय समाजांत कोणत्या प्रकारचें भयंकर स्थित्यंतर घडून आलें होतें हें उघड दिसत आहे. वेदाबद्दल उत्पन्न झालेला अनादर, वर्णाश्रम धर्माची अनास्था व त्यामुळें उत्पन्न झालेली आचारभ्रष्टता, याबद्दल नामदेव यद्यपि ज्ञातीचे शिंपि होते तथापि त्यांनीं अत्यंत तिटकारा व्यक्त केला आहे व ही स्थिति नाहींशीं करून ती सुधारण्याकरितां श्रीविठ्ठलाची करुणा भाकून त्यास धाव घेण्याबद्दल त्यांनीं अळविलें आहे. वर्णाश्रमधर्माविरुद्ध आचार करणारे लोक महाराष्ट्रीय समाजांत फार निर्माण झाल्याबद्दल व विशेषें करून ब्राह्मणांनीं आपला आचार सोडल्याबद्दल नामदेवांची मोठी तक्रार आहे. ही स्थिति नाहींशीं होऊन महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भुत होणाऱ्या सर्व ज्ञातीच्या लोकांनीं श्रुतिस्मृत्युक्त वर्णाश्रमधर्मास अनुसरून आचरण करावें अशी नामदेवांची जबरदस्त इच्छा होती असें त्यांच्या वरील उद्गारावरून देसून येत आहे. वरील उताऱ्यांतील दुसरी एक महत्वाची बाब लक्षांत ठेवण्यासारखी आहे तिचा एथें उल्लेख करणें जरूर आहे. वर्णाश्रमधर्माची गुढी उभारली जाइतोंपर्यंत हरिनामस्मरण आणि संताचा सहवास यांचा स्वोद्धारार्थ सर्व लोकांनीं आश्रय करावा असा नामदेवानीं उपदेश केला आहे. वर्णाश्रम धर्मास अनुसरून आचरण करण्याची ऐपत कोणांत असली तरी हि त्यानें भगवन्नमस्मरण करावें असें नमादेवांचें म्हणणे नाहीं. युगपरत्वें उत्पन्न झालेल्या परिस्थतीमुळें भगवन्नामस्मरण हा नामदेवांनीं आपद्धर्म म्हणून सांगितला आहे हें वरील उताऱ्यावरून सिद्ध होत आहे.

आतां महाराष्ट्रीय समाजाच्या पारमार्थिक पुढाऱ्यांपैकीं जे तिसरे साधुपुरुष एकनाथ त्यांच्या ध्येयाबद्दलचा आपण शोध घेऊं. एकनाथ शके १४७० सालांत जन्मास येऊन शके १५२१ मध्यें समाधिस्त झाले. म्हणजे महाराष्ट्रांत मुसलमानी सत्ता ज्या काळीं शिखरास पोहोंचली होती त्या काळीं ते हयात होते हें उघड आहे. नाथांच्या काळच्या महाराष्ट्रीय समाजाच्या स्थितीबद्दल त्यांचें कोणत्या स्वरूपाचे उद्गार आढळतात तें आपण पाहूं:—

कली वाढलासे अधम । ब्राम्हण सांडती आपलें कर्म ।
शुद्धजाती असोनिचित्त । सदा नीचाश्रय करिती ॥
देवपूजा नेणें कर्म । न घडे स्नान संध्या धर्म ॥
ऐसा कलीचा महिमा । कोणी न करी कर्मा कर्मा ॥
एका जनार्दनी शरण । घडो संतसेवा जाण ॥

कलियुगीं अज्ञान । अभाविक पैं होती ।
नकळे श्रुति वेदशास्त्र । पुराण न कळे पवित्र
ज्ञान ध्यान गाइत्री मंत्र । जप तप राहिले ।
यज्ञयागादि गान । कोणा न कळे महिमान ।
अवघे झाले अज्ञान । न कळे कांहीं ॥

एकनाथांचे काळीं वेदशास्त्राविषयीं ब्राह्मणांचें ठिकाणीं पूर्ण अज्ञान उत्पन्न झालें होतें. त्याच प्रमाणे जपतपादि व यज्ञयागादि कर्मांचें महत्व कोणास हि कळेनासें झाले होते असे वरील उद्गारावरून दिसून येत आहे. महाराष्ट्रीय समाजाच्या गुरुस्थानीं असणाऱ्या ब्राह्मणांची दशा एकनाथांचे काळी कशा प्रकारची झाली होती हें वरील उद्गारावरून सिद्ध होत आहे. मुसलमानी सत्तेचा महाराष्ट्रांत शिरकाव झाल्यापासून पंढरपूरच्या विठ्ठलाच्या भक्तिमार्गाचा प्रसार महाराष्ट्रांत सर्वत्र होऊन तो एक निराळा सांप्रदाय बनला होता. एकनाथ हि याच सांप्रदाया पैकीं च होते. या सांप्रदायांतील लोकांची स्थिती हि मोठी स्पृहणीय अशी नव्हती. आळशी पोटभरू व सोंगाडे वारकरी या सांप्रदायांत बरे च निर्माण झाले होते. एकनाथ ह्मणतातः—

कलियुगामाजि थोर झालें पाषांड। पोटासाठीं संत झाले उदंड ॥ नाहीं विश्वास संत-दया मानसी । बोलतीवांयाविण सौरस अवघाउपहासी। वेदपठणशास्त्रसंभाषणेंपुराणमत । अवघे बोधानि ठेविती बोलती वाचाळमत्त । देवभजनसंतपूजन तीर्थमहिमा न कळे मूढा । ऐसे कलियुगीं जाले जाणत जाणत दगडा । एकाजनार्दनी कायावाचा रामजपा । सोपे हें साधन तेणें नोहे पुण्यपापा ।

एकनाथाच्या काळीं महाराष्ट्र समाजांत अज्ञानी ब्राह्मणा प्रमाणें पोट भरू टाळकुटे संत हि बरेच निर्माण झाले होते असें वरील अभंगावरून सिद्ध होत आहे. अशा प्रकारची महाराष्ट्रीय समाजाची स्थिति झाली असतां एकनाथांनीं आपले पुढें कोणते ध्येय ठेविलें होते हें आपण पाहिलें पाहिजे.

श्रीमत् भागवताचे दशमस्कंधावर एकनाथांनीं केलेली टीका नाथभागवत या नांवानें प्रसिद्ध आहे.

स्वे स्वेऽधिकारे या निष्ठा सगुणाः परिकीर्त्तितः

इत्यादि श्लोकावर टीका करताना एकनाथांनीं काढलेले खालील उद्गार फार महत्वाचे आहेत.

न प्रेरितां शास्त्रे श्रुति । विषयीं स्वाभाविक प्रवृत्ती ।
तिची कराया निवृत्ती । माझी वेदोक्ती प्रवर्तली ।
एकाएकीं विषयत्यजन । करावया अशक्त जाण ।
त्यासीं वेद दावी दोषगुण । त्यागावया जाण विषयासी ।
हे माता हे सहोदर । येथ करू नये अभिचार ।
हे वेद न बोलतां अधिकार । तैं यथेष्टाचार विषयांचा ॥
जेथवरी स्त्रीपुरुष व्यक्ती । तेथवरी कामसक्ती ।
मी नेमितो ना वेदोक्ती । तैं व्यभिचार प्राप्ती अनिवार ।
सकळ स्त्रिया सांडवून । त्यजूनिया इतर वर्ण ।
सवर्ण स्त्री वरावी आपण ।
अष्टवर्षा जाण नेमस्त । तिचें वेदोक्तपाणिग्रहण ।
तेथसाक्षी अग्नि आणि ब्राह्मण। इतरा स्त्रियांची वाहुनी आण ।
स्वदारागमन देख केलें । एकमुखीं वेदोक्ते ।
याचि परि स्यां अन्नसंपर्के । वेदवादें नेमिले लोक ।
येरवी संकर देख होता अवश्यक वेदेंवीण ।
तो चुकावया वर्णसंकर । वर्णाश्रमांचा प्रकार ।
वेद बोलिला साचार । विषय संचार त्यागावया ।
विषयांची जे प्रवृत्ती । तेचि अविद्याबाधा निश्चिती ।
जे विषयांची अति निवृत्ति । ती नाव मुक्ति उद्धवा ।
करावया विषय निवृत्ति । वेदें द्योतिली कर्म प्रवृत्ति ।
वर्णाश्रमाचार स्थिति । विषयासक्ति छेदकू ।
या जागी ज्यासी जो अधिकार । तेणे तो नुलंघावा अणुमात्र ।
हा वेदें केला निर्धार । स्वकर्में नर तरावया ।
तरी म्हणशी कर्मची पावन । हे ही सर्वथा नघडे जाण ।
स्वाधीकारें वीण कर्माचरण । ते अतिदारुण बाधक ॥

श्रुतिस्मृत्युक्त वर्णाश्रम धर्म व्यवस्थेचें रहस्य एकनाथांना किती पूर्ण पटलें होते याची कल्पना वरील उद्गारावरून सहज होण्यासारखी आहे. तथापि महाराष्ट्रीय समाजाची स्थिति ज्या प्रकारची झाल्याचें नाथांनीं वर वर्णन केलें

आहे ती परिस्थिति लक्षांत घेऊन जनांत लोकोद्धाराचा दुसरा कांहीं तरुणोपाय न दिसल्यामुळें निदान भगवन्नामस्मरण महाराष्ट्रीय जनतेकडून घडलें तरी त्यांचा उद्धार होईल असा एकनाथांचा समज होता व त्या समजास अनुसरून त्यांनीं त्या काळच्या महाराष्ट्रीय जनतेस भगवन्नामस्मरण करण्याचा उपदेश केला आहे. आतां महाराष्ट्रीय समाजाच्या तीन वरील ठळक व पारमार्थिक पुढाऱ्यांखेरीज दुसऱ्या कांहीं पारमार्थिक पुढाऱ्यांच्या ध्येयाच्या स्वरूपा विषयीं चर्चा करूं:—

वारकरी संत परंपरे पैकीं सेना न्हावी यांचें नांव सर्वत्रांस श्रुत आहे च. प्रस्तुत ज्या मुद्या विषयीं चर्चा करीत आहोंत त्या मुद्याच्या दृष्टीनें सेना न्हावी याचे खालील अभंग फार महत्वाचे आहेत.

कोणतें कार्य करण्या करितां आपण जन्मास आलों. याचा उलगडा सेना न्हावी याने केला आहे:—

अस्ता वैकुंठासी । काय सांगे हृषीकेषी ।
जाऊनि मृत्यु लोकांसी । जन भक्तीसी लावी कां ।
आज्ञा वंदूनिया शिरीं । जन्मलों न्हावीयाचे उदरीं ।
वाचे नाम निरंतरी । रामकृष्णगोविंद ॥
कलियुगा माजि जाण । सोपें हें चि साधन ।

आतां सेना न्हाव्यानें त्याच्या ज्ञाती बांधवांच्या आचाराविषयीं व्यक्त केलेले खालील उद्गार महत्वाचे व लक्षांत ठेवण्यासारखे आहेत.

जे म्हणती न्हावीयाचे वंशीं । तेणें पाळावें स्वधर्मासी ।
येर अवघे बटकीचे । नव्हे न्हावीयाचे वंशीचे ।
शास्त्रें नेम नेमियला । सांडोनि अनाचार केला ॥
जन्मलों ज्या वंशांत । धंदा दोन प्रहर नेमस्त ॥
सत्य जाणरे स्वधर्मासी
न्हावीयाचे वंशी । जन्म दिला हृषीकेशी ।
प्रतिपाळावे धर्मासी । व्यवहारासी न सांडी ।
ऐका स्वधर्म विचार अविचार । धंदा करी दोन प्रहर ।
सांगितले साचार । पुराणांतरी ऐसे हे ।
करूनिया स्नान । मुखी जपे नारायण ।
मागुती न जाण । शिवूं नये धोकटी ।
ऐसें जे कां न मानिती । ते जातील नर्काप्रती ।

**सकळ पूर्वज बुडती । शास्त्रसंमती ऐसी हे ।**

सेना न्हावी हा ब्राह्मणेतर संतांपैकीं एक प्रमुख संत होता ही बाब लक्षांत घेतां त्याचे वरील उद्गार फार महत्वाचे व विचार करण्यासारखे आहेत. शास्त्र दृष्टीनें तो ज्या ज्ञातींतील होता त्या ज्ञातीचें विहिताचार कोणते हें सेनान्हाव्यानें स्पष्ट दर्शवून त्या विहित आचारास अनुसरून जे त्याचे ज्ञातीबांधव वर्तन करणार नाहींत ते नर्काप्रत जातील असा स्पष्ट अभिप्राय वरील अभंगांत व्यक्त केला आहे.

आतांपर्यंत वारकरी सांप्रदायांतील प्रमुख पारमार्थिक पुढाऱ्यांच्या उद्गारांचा व त्या वरून निघणाऱ्या अनुमानांची चर्चा केली. आतां वरील काळांतील महाराष्ट्रीय समाजाच्या पारमार्थिक पुढाऱ्यांपैकीं दुसऱ्या वर्गांतील कांहीं प्रमुख पुढाऱ्यांच्या ध्येयाचा शोध घेऊं. महाराष्ट्रीय समाजाच्या पारमार्थिक पुढाऱ्यांच्या या दुसऱ्या वर्गांतील व्यक्तींनीं याज्ञवल्क्यादि स्मृतींतील आचारधर्मांचे परिपालन करण्याविषयीं महाराष्ट्रीय जनतेस उपदेश चालविला होता. स्मृत्यादि ग्रंथांतील आचार धर्मांची ओळख महाराष्ट्रीय जनतेस व्हावी एतदर्थ त्या ग्रंथांतील आचार धर्मांचे प्रतिपादन करणाऱ्या भागांची मराठी रुपांतरें करून त्यांचा प्रसार महाराष्ट्रीय जनतेंत करण्याचा त्यांनीं प्रघात सुरू ठेविला होता. अशा प्रकारचा प्रयत्न करणाऱ्या पुढाऱ्यांपैकीं गुरुचरित्र ग्रंथाचे कर्ते सरस्वती गंगाधर व बालबोधाचे कर्ते त्र्यंबक स्वामी यांच्या ध्येया संबंधीं चर्चा करण्याकडे वळूं. सरस्वती गंगाधर हे शक चौदाशेच्या सुमारास होऊन गेले असा अंदाज आहे. गुरुचरित्र या नांवाचा ग्रंथ त्यांनीं रचिला असून आज मित्तीसहि तो ग्रथ महाराष्ट्रांत सर्व मान्य समजला जातो. त्या ग्रंथाच्या पन्नासाव्या अध्यायांतील खालील ओव्या फार महत्वाच्या आहेत. या ओव्यांत महाराष्ट्र धर्म ही सज्ञा आली असून त्या संज्ञेचा अर्थ एकंदर ग्रंथाच्या रचनेवरून ठरवावा लागणार आहे. या ग्रथांतील इतर प्रकरणावरून हि सरस्वती-गंगाधर यांच्या ध्येयाच्या स्वरूपा विषयीं कल्पना होणार आहे. तरी प्रथम वरील अध्यायांतील ओव्या नमूद करून नंतर त्या संबंधाची चर्चा करविण्याचें आम्हीं ठरविलें आहे.

**श्रीगुरु म्हणती तयासी । आम्ही तापसी सन्यासी ।**
**येऊं नये तुझे नगरासी । महापातकें होतीं तेथें ॥ १९२ ॥**
**नगरी नित्य धेनुहत्या । यवनजाती करिती अकृत्या ।**

जीव हिंसा मद्यपी कृत्या । वर्जावें आतां निर्धारें ॥ १९३ ॥
सर्व अंगिकार करोनी । राजे लागे दोन्ही चरणी ।
म्हणे मी दास पुरातनी । पूर्वापार दृष्टी देणें ॥ २३१ ॥
लोक म्हणती म्लेंछ जाती । पाहा हो विप्र पूजा करिती ।
राजा अनाचारी म्हणती । जातिधर्म सांडिला आजी ॥२३२॥
ज्याचें पाहूं नये मुख । त्याची सेवा करी देख ॥
राजा नष्ट म्हणोनी सकळिक । म्लेंछ जाति बोलती ॥ २३३ ॥
विप्रकुळ समस्त देख । संतोषें करिती अति कौतुक ।
राजा झाला विप्रसेवक । आतां बरवे राज्यासी ॥ २३४ ॥
ऐसा हा राव असतां । महाराष्ट्रधर्मी वर्तता ।
आपला द्वेष तत्वतां । न करील की जाणपां ॥ २३५ ॥

वरील ओव्यांत महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा उल्लेख आला आहे. आतां या शब्दाची योजना गुरुचरित्रकाराने कोणता अर्थ व्यक्त करण्याकरितां केली आहे हें निश्चित करण्याकरितां या ओव्या ज्या अध्यायात आल्या आहेत त्या अध्यायांतील पूर्वनुसंधान व एकंदर गुरुचरित्रातील विषयांचे अनुसंधान लक्षांत घेणे जरूर आहे. या मुद्याचे विवेचन करण्यापूर्वी लक्षात ठेवावयाची गोष्ट अशी आहे कीं, महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा उल्लेख मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्र धर्म वाढवावा ॥ या समर्थोक्तिंतच प्रथम आला अशी जी कित्येकांची समजूत होती ती या वरील उल्लेखावरून निराधार ठरत आहे. महाराष्ट्र धर्म ही संज्ञा प्रथम समर्थांनींच निर्माण केली या समजुतीमुळें समर्थांनी आचरलेल्या चरित्राचा व महाराष्ट्र धर्म या संज्ञेचा कांहीं विशेष प्रकारचा निकट संबंध असला पाहिजे अशी कित्येकांची समजूत होऊन या समजुतीस अनुसरून या संज्ञेचा अर्थ करण्याकडे कित्येकांची प्रवृत्ति झाल्याचे आढळतें व या योगानें या संज्ञेचा खरा अर्थ ठरविण्यास वरील पूर्वग्रहाची अडकाठी येते. आतां गुरुचरित्रांतील विषयांच्या अनुसंधानाचे दृष्टीनें या संज्ञेचा अर्थ ठरविण्याचा आपण प्रयत्न करूं.

गुरुचरित्रांत सरस्वतीगंगाधरानें श्री दत्तात्रयांचे जे अनेक अवतार झाले व निरनिराळ्या अवतारांत श्रीगुरूंनीं जे अनेक चमत्कार केले त्यांचें वर्णन केलें असून गुरुभक्तीकडे लोकांचीं मने वेधण्याचा ग्रंथकर्त्यांचा ग्रंथ करण्यात मुख्य हेतु आहे. या शिवाय एकंदर सर्व अध्यायाचा विचार केला असतां सर्व महाराष्ट्रियांचें मनांत वर्णाश्रम धर्माचें महत्व बिंबवून महाराष्ट्रीय समा-

जांतील व्यक्तींनीं वर्णाश्रम धर्म विहीत आचरण करावें असा उपदेश कर-ण्याचा ग्रंथकर्त्याचा कटाक्ष दिसतो. ग्रंथकाराचे काळीं लोकप्रिय असलेल्या कांहीं व्रतांचा महिमा हि या ग्रंथांत ग्रंथकर्त्यानें वर्णन केलेला आहे. अध्याय २६ वेदविवरणभेदनिरूपण, २८ कर्मविपाक; ३६ व ३७ आन्हिककर्मनिरूपण हे अध्याय फार महत्वाचे असून त्यांतील विषयांचें विवेचन बरेंच विस्तृत केलेलें आहे. ३६ व ३७ या अध्यायांत ब्राह्मण वर्णाच्या आचाराचें ग्रंथ-कर्त्यानें विस्तृत विवरण केललें आहे. ३६ व्या अध्यायांतील प्रस्तुत विषयाचें विवेचनाचे दृष्टीनें ओव्या १०४-१०७ या फार महत्वाच्या असल्या कारणानें आम्ही त्या येथें नमूद करितों—

ब्राह्मणपणाचा आचार । कवण राहाटे द्विजवर ।
तैसे जरी करिती नर । त्यासी कैचे दैन्य असे ॥ १०४ ॥
समस्त देव त्यांचे हातीं । अष्टसिद्धी साध्यंति ।
ब्राह्मण कर्मं जे आचरती । कामधेनू तयाघरीं ॥ १०५ ॥
विप्र मदें बहु व्यापिले । आचार कर्म सांडिले ।
याची कारण दरिद्री झाले । स्वधर्म नष्ट होऊनिया ॥ १०६ ॥
विप्र विनवी स्वामीसी । आमुची विनंति परियेसीं ।
सकळ आचार धर्मासी । निरोपावे दातारा ॥ १०७ ॥

वरील ओव्यांत आचारापासून ब्राह्मण भ्रष्ट झाल्याचे परिणाम ग्रंथ-कर्त्यानें नमूद केले असून आचारधर्म सविस्तर कथन करण्याबद्दल गुरूस वि-नंति करण्यांत आली आहे. महाराष्ट्रधर्माचा वरील उताऱ्यांत जो उल्लेख आला आहे त्याचा अर्थ वरील अनुसंधानास अनुसरून च केला पाहिजे.

आतां खुद्द ज्या ५० व्या अध्यायांत महाराष्ट्र धर्म या संज्ञेचा उल्लेख आला आहे त्या अध्यायांतील विषयाच्या अनुसंधानावरून काय निष्पन्न होतें तें पाहूं. तत्कालिन बेदरच्या बादशहाचा कल हिंदु धर्माकडे होता सबब मुसल-मान धर्मगुरु बादशहाच्या या कला बद्दल आपली नापसंती व्यक्त करीत. ओव्या ८ पासून २५ पावेतों हिदु धर्मा संबंधीं मुसलमानी धर्मगुरूंचे आक्षेप व त्या आक्षेपांचें बादशहानें केलेले निरसन याचें थोडक्यांत वर्णन केलें आहे. या वर्णनांत मुसलमानांचा हिंदुधर्मावर मुख्य आक्षेप पाषाणपूजेबद्दलचा आहे. त्याचप्रमाणें काष्ट, वृक्ष, पाषण, पृथ्वी, अग्नी, सोम, सूर्य इ० स देव समजून हिंदु लोक त्यांची पूजा करितात अशी मुसलमान धर्मगुरूंनीं हिंदू विरुद्ध तक्रार

केली आहे. या सर्व शंकांचें समाधान बादशहानें खालील ओव्यांत केलें आहे—तें प्रस्तुत विषयाच्या दृष्टीनें महत्वाचें असल्या कारणानें आम्ही जसेंच्या तसेंच देतों.

आणिक तुम्ही म्हणाल ऐसे । पूजिती पाषाण देव कैसे ।
सर्वांठायीं पूर्ण वसे । जो विश्वात्मा आहे ची ॥ २२ ॥
प्रतिमा पूजा स्वल्पबुद्धि । म्हणोनि सांगति प्रसिद्धि ।
आत्माराम पूजिती विधी । त्याचे मती ऐसे असे ॥ २३ ॥
स्थिर नव्हे अंतःकरण । म्हणोनि सांगति प्रतिमाखूण ॥
नांव ठेवोनि नारायण । तया नामें पूजितातीं ॥ २४ ॥
तया ते तुह्मी निंदा करितां । तरी सर्वांठायीं पूर्ण कां ह्मणतां ॥
प्रतिष्ठावया आपुले मता । द्वेष आह्मी न करावा ॥
या कारणें ज्ञानवंतीं । करूं नये निंदास्तुती ।
असती नानापरी जाती । आपुले रहाटी रहाटती ॥ ॥

ऐशापरी पुरोहितासी । सांगे राजा विस्तारेसी ।
करी पुण्य बहु वसी । विश्वास देव द्विजांवरी ॥

या प्रमाणें मुसलमान धर्मगुरूंच्या आक्षेपाचें निरसन बादशहानें केलें आहे. या नंतर या च अध्यायांत महाराष्ट्र धर्म ही संज्ञा नमूद असलेल्या वरील ओव्या आलेल्या आहेत. वर नमूद केलेल्या ग्रंथांतील विषयांचा व ५० व्या अध्यायांतील विषयाचा विचार केला असतां महाराष्ट्रधर्म ही संज्ञा कोणत्या बाबी व्यक्त करण्या करितां ग्रंथकारानें योजिली आहे या बद्दल कोणत्या हि प्रकारच्या शंकेस जागा रहात नाहीं. वेदाविषईं प्रामाण्यबुद्धि, श्रुतिस्मृतीप्रणितवर्णाश्रमधर्मपारिपालन, गोहत्या, जीवहत्या, मद्यमांस, इत्यादिकांचा त्याग प्रतिमापूजन इत्यादि बाबींचा प्रामुख्यानें महाराष्ट्रधर्म या संज्ञेंत अंतर्भाव होत असल्याची गुरुचरित्र ग्रंथाचा कर्ता सरस्वती गंगाधर याचा समज दिसतो. तत्कालिन बेदर एथील मुसलमान बादशहाचे ठिकाणीं वरील बाबीं विषईं आदर असून वरील बाबींस अनुसरून आचरण करण्याची पूर्ण मुभा त्याचे कारकीर्दीत हिंदु लोकांस प्राप्त झाली होती. यास्तव मुसलमान लोक जातीधर्म सोडला ह्मणून बादशहाचा द्वेष करूं लागले व महाराष्ट्रधर्मास अनुसरून वर्तण्याची हिंदु लोकांस मुभा देऊन त्याचा द्वेष करण्याचें त्यानें सोडल्याकरणानें महाराष्ट्रांतील हिंदु लोक बादशहाचे गुण गाऊं लागले हे वरील सर्व उतारे लक्षांत घेतां दिसून येण्या सारखे आहे. ग्रंथ-

कर्त्यानें महाराष्ट्रधर्म ही संज्ञा कोणत्या हि प्रकारची मनोभावना दर्शविण्या करितां योजिलेली आहे असें वरील उल्लेखावरून कोणास हि म्हणतां येणें शक्य नाहीं. वरील ओव्या वरून सुचणाऱ्या एका मुद्यांचें दिग्दर्शन या ठिकाणीं करणें जरूर आहे. महाराष्ट्र धर्म या संज्ञेंत कोणत्या बाबींचा समावेश होतो हें वर नमूद केलेलें आहे. महाराष्ट्रीय समाजांत नुसत्या वरील बाबी अस्तित्वांत असून भागत नाहीं. महाराष्ट्रीय समाजांत महाराष्ट्रधर्म अस्तित्वांत आहे असें विधान करण्यास वरील बाबीं खेरीज आणिक एक महत्त्वाची बाब अस्तित्वांत असणें जरूर आहे. ती बाब कोणती हें वर नमूद केलेल्या ओव्यांपैकीं खालील ओव्यांवरून स्पष्ट होणार आहे.

राजा झाला विप्र सेवक । आतां बरवे राज्याशीं ॥
ऐसा हा राव असता । महाराष्ट्रधर्मी वर्तता ॥
आपला देश तत्वता । न करील कीं जाण पा ॥

वेदप्रामाण्य, श्रुतीस्मृतीधर्मप्रणितवर्णाश्रमधर्माचेंपरिपालन, जीवहत्या; मद्यमांस; इत्यादिकांचा त्याग, प्रतिमापूजन इत्यादि महाराष्ट्रधर्मांत अंतर्भूत होणाऱ्या महत्वाच्या बाबीस तत्कालीन राजाचा आश्रय व पाठिंबा असावा लागतो. राजा विप्रसेवक असावा लागतो. चातुर्वर्ण्य व्यवस्थेस अनुसरून क्षत्रीय वर्णाच्या व्यक्तीचे हातांत राजसूत्रें असावीं लागतात. या वरील सर्व बाबींस राजसत्तेचा पाठिंबा असावा लागतो. या शिवाय वर नमूद केलेल्या महाराष्ट्रधर्मांत अतर्भूत होणाऱ्या प्रमुख बाबींच्या धोरणास अनुरूप अशा प्रकारचें आचरण चातुर्वर्णि व्यक्तीपैकीं कोणी न केल्यास त्यास या बद्दल दंड अगर शिक्षा करण्याचा अधिकार राजसत्ताधिष्ठित व्यक्तींचे हातांत असावा लागतो. क्षत्रीयवर्णी राजाचे हातीं राजसूत्रें असल्याखेरीज ही गोष्ट होणें शक्य नसतें. महाराष्ट्र देशांत मुसलमानांची सत्ता प्रस्थापित झाल्यानंतर वरील बाबींचा महाराष्ट्रीय समाजात सर्वस्वी लोप झाला होता अशांतला भाग नाहीं. कमी अधिक प्रमाणानें वरील सर्व बाबी महाराष्ट्रीय समाजांत थोड्या-बहुत प्रमाणानें अस्तित्वांत होत्या. महाराष्ट्रीय समाजातील कांहीं थोड्या व्यक्ति वरील बाबींस अनुसरून त्या काळीं थोडे फार आचरण हि करीत. ही गोष्ट जरी खरी असली तथापि वरील बाबींच बाबतींत श्रुतिस्मृत्युक्तधर्माविरुद्ध कोणी आचरण केल्यास त्यास त्याबद्दल दंड करणारी सत्ता त्या काळीं अस्तित्वांत नव्हती. वरील ओव्यांत वर्णन केल्याप्रमाणे तत्कालीन राजा जरी

मुसलमानधर्मी होता तथापि तो विप्रसेवक झाल्याकारणानें यवनीयकर्मी राजाचे हातीं राजसूत्रें असतां प्रजेत ज्या महाराष्ट्रीय धर्माच्या परिपालनाची प्रवृत्ति त्यानें केली असती तशा प्रकारची प्रवृत्ति निर्माण झाल्याचें गुरु चरित्रकारानें नमूद करून ब्राह्मणांचा द्वेष होण्याचें बंद होईल अशी परिस्थिती निर्माण झाल्या बद्दल समाधान व्यक्त केलें आहे.

आतां ह्या काळांतील वर्णाश्रम धर्माभिमानी व त्या धर्माचे पुरस्कर्ते महाराष्ट्रीय समाजाचे दुसरे पारमार्थिक पुढारी बाळबोध ग्रंथाचे कर्ते त्र्यंबक स्वामी यांच्या ध्येयाचे स्वरूपाविषयीं थोडीफार चर्चा करूं:—

बाळबोध ग्रंथाचे कर्ते त्र्यंबकस्वामी यांनीं हा ग्रंथ शके १४९४ मध्यें रचिला असें त्या ग्रंथांतील उल्लेखा वरून दिसून येतें. श्रीशंकराच्या कृपाप्रसादानें हा ग्रंथ त्याचे हातून निर्माण झाला असें त्र्यंबक स्वामींनीं या ग्रंथांत ठिकठिकाणीं उद्गार काढिले आहेत. त्या काळीं या ग्रंथाचें महत्व महाराष्ट्रीय समाजांत कोणत्या प्रकारचें होतें हें समजण्यासहि साधन या ग्रंथांत आहे व तें या ठिकाणीं नमूद करणें जरूर आहे. या ग्रंथाच्या मध्यखंडातील नमनाच्या पहिल्या समासांतील खालील ओंव्या फार महत्वाच्या आहेत. (पान १० ):—

अकर्म बोलतां हीं पाहीं। ब्रह्मनिर्धार समूळ नाहीं।
तें काबाड या नरदेहीं। उदर्थी नळ यात ॥ ४४ ॥

वास्तव पंचाननें। जें बोलिलें स्वमुखें
तेणें सरीजे गहनें पद वंदें ॥ ४५ ॥

अनेक वर्षे उपाय। चालेल हा संप्रदाय।
अहांचां मतां मतां देईल घाय। हा तुझा ग्रंथु ॥ ४६ ॥

उत्तम मध्यम सेल सर्वत्रीं स्पावे हे बाल।
भवपंचकाचो खोलील बोल। तो ग्रंथादित्यु हा ॥ ४७ ॥

कृष्णोत्तर रेवा दक्षिण। मध्य देशाचें प्रमाण।
या मध्यें वाढेल महिमान। या बालवबोधाचे ॥ ४८ ॥

ऐसे वर देऊनी पार्ठी। समावली गगनी।
तोचि भरली लोचनी। सर्वत्र देखे ॥ ४९ ॥

वरील ओव्यांत या ग्रंथाचें महत्व वर्णन केलें असून कृष्णेचा उत्तरतीर व रेवेचा दक्षिणतीर यांच्या दरम्यानच्या प्रदेशांत या ग्रंथाचा महिमा वाढेल असा वर ग्रंथकर्त्यास देवीनें दिल्याचें नमूद केलें आहे. ज्या ग्रंथा-

संबंधीं वरील प्रकारचा उल्लेख करण्यांत आला आहे त्या ग्रंथाची छाप तत्कालीन महाराष्ट्रीय समाजावर बरीच पडून तो महाराष्ट्र जनतेस प्रिय व मार्गदर्शक झाला असला पाहिजे असें अनुमान करणें चुकीचें होणार नाहीं. अशा प्रकारच्या या ग्रंथाच्या स्थूल स्वरूपाचें थोडक्यांत दिग्दर्शन करून नंतर चर्चाविषयक मुद्यांच्या दृष्टीनें या ग्रंथावरून कोणत्या प्रकारचीं अनुमानें निघतात तें पाहूं. दृश्य जगताची मीमांसा, मनुष्य प्राण्याचें इतिकर्तव्य, ब्रह्मस्वरूप, मायानिरूपण, ब्रह्मप्राप्तीचा मार्ग इत्यादि विषयाची चर्चा बालबोधग्रंथांत त्र्यंबकस्वामींनीं प्रामुख्यानें केली आहे. या शिवाय वेदप्रामाण्य चातुर्वर्ण्यव्यवस्था वर्णाश्रमधर्म इत्यादि विषयासंबंधींहि ग्रंथकर्त्यानें बरीच चर्चा केली आहे यांहि विषयांचें महत्व ग्रंथकर्त्यास कोणत्या प्रकारचें वाटत होतें हें या ग्रंथांतील ठिकठिकाणीं करण्यांत आलेल्या विवेचनावरून दिसून येणार आहे. वेदा संबंधीं खालील अभिप्राय त्र्यंबकस्वामींनीं दर्शविलेला लक्षांत ठेवण्यासारखा आहे. ( पान २३४ ).

परमेश्वराचा निश्वासु । तो वेद हा विश्वासु ।
भुवनत्रयींचा वासु । वेद पुरुषाचा ॥ ८० ॥
भेद धर्ता प्रजापती । त्याचां चतुर्मुखीं वसती ।
वेदा निजदेवा गभस्ती । वोळखावा ॥ ८१ ॥
नाना अवतार घेउनु । वेद थापी नारायणु ।
चहुं वेदासी प्रमाणु । वेदु होय ॥ ८२ ॥
वेदु अनाचारातें निरसीतु । पातकातें उच्छापीतु ।
चाले सत्यु मांडीतु । अकर्माचा ॥ ८३ ॥
वेदु कर्मातें चालि । सत्कर्माचा दीपु उजलि ।
हव्य कव्यादिकें पालि । निरंतर........ ॥ ८४ ॥
वेदू सर्वांसी उत्तम । परि जे आचारवर्ण धर्म ।
तयाची निर्धारे सीम । वेद आज्ञेचा ॥

वेदाची महति त्र्यंबक स्वामींनीं वरीलप्रमाणें गायल्या नंतर चातुर्वर्ण्यांच्या उत्पत्ती विषयीं त्र्यंबकस्वामींचे खालील उद्गार महत्वाचे आहेत:-

जालें धरेचें उत्पन्न । तें नव्हते वर्णावर्ण ।
हे करावया कारण । देव त्रय ॥ ५६ ॥
जो भगवान सर्वेश्वरू । जो सर्वांतर सर्वज्ञातारू ।
तेणें केला साचारू । वर्ण धर्मु ॥ ५७ ॥

उंचवर्ण ब्राह्मण । ते देवाचे मुखापासुन ।
म्हणौन देवाचें वदन । द्विजचि होति ॥ ५८ ॥
बाहू पासुनि क्षत्रि । तें हें पराक्रमि सर्वत्रीं ।
करस्थान पवित्रि जाणावे हे ॥ ५९ ॥
हें जाले उरुपासुनी ते वैश भर्वसेनी ।
शुद्रांचा जन्मु चरणि नीच वर्णु ते ॥ ६० ॥
याचें कर्म धर्माचार । यथाविध साविस्तर ।
ते पुढां तेरावा कथनि मनोहर सांगावें असे ॥ ६१ ॥
अैसें देवापासुन । रुपाआले च्यारीवर्ण ।
यासी केलें प्रमाण । उदक येक ॥ ६२ ॥
या वर्णाचारा होती । आणिक आचार आहाति दोनि ।
हे तिनि निर्वाणि । अनाचारु चौथा ॥ ६३ ॥
एवं वर्णाचारु शिवाचारु । यवनाचारू अनाचारु ।
चतुर्विध आवरु श्रष्टासी केला ॥ ६४ ॥
म्हणे शंभु माझी आज्ञा । केली ये जबुद्वीपीस्वज्ञा ।
ते न करावी अवज्ञा त्याचि तेहि ॥ ६५ ॥
वर्णाचारी नेम । उदकेची चालति धर्म ।
यासी शुद्धकरी ते उत्तम उदकचि हें ॥ ६६ ॥
पवित्र अपवित्र तें उदकेंचि सर्वत्र ।
देवोधर्मु तीर्थ क्षेत्र । पूजाकर्म ॥ ६७ ॥
नित्यें नैमित्यें सकळें । चालति येकें जळें ।
एवं यासी उदका वेगळें प्रमाण नाहि ॥ ६८ ॥
शिवाचारि विभूतिं । धर्मा धर्मातें वाढविति ।
दोशांतेंहि नाशीति । भस्मना तया ॥ ६९ ॥
नेम प्रायश्चित देवभक्ति । तया प्रमाण विभूति ।
लिंगाचारिं प्रवृत्ति । येणेंची चाले ॥ ७० ॥
येवनाचारी नाम उचारु । हाचि धर्माधर्मु वेवहारू ।
त्यासी येणेंचि पवित्रता एरु । विचारु नाहिं ॥ ७१ ॥
अनाचारिं नेम मद्यामासादिकें धर्म ।
येणेंचि होयं उत्तम । याचि ज्ञाति ॥ ७२ ॥
हे चतुर्भाव भिन्न भिन्न । आपुलाले आचरण ।
शोभा आणि पावन । तें चि त्यासी ॥ ७३ ॥

जो पारखियाचा धर्मु । तो येरा अधर्मु ।
जो ज्यासी केला नमु । तोचि भला ॥ ७५ ॥

या प्रमाणें चतुर्वर्ण व चतुर्विध आचार यांचें वर्णन केल्यानंतर त्र्यंबक स्वामी म्हणतातः—

हे चतुर्विध आचार । सृष्टिमध्यें निरंतर ।
तुज निरुपिले साचार । आहे तैसें ॥ ७६ ॥
म्हणौन जें आपलां धर्मी । असति तेचि गा सुवर्मी
कां जे असतां सृष्टीकर्मी । हेंचि भलें ॥ ७७ ॥
या आचाराहि कलसु । ब्रह्मबोधु सुरसु ।
जैसा सूर्याचा प्रकाशु । सर्वांवरि ॥ ७८ ॥

ब्रह्मबोध अथवा ब्रह्मज्ञान हा वर्णाश्रमधर्माचा कळस असल्याचें सांगून भावबंधनाचा नाश करण्यास हा च एक उपाय असल्याचें त्र्यंबक स्वामींनीं पुढें वर्णन केलें आहे. त्र्यंबक स्वामींच्या काळांत एकंदर पंथ किती होते व त्या पंथांचें स्वरूप कशा प्रकारचें होतें याचें हि बालबोध ग्रंथांत त्र्यंबक स्वामींनीं दिग्दर्शन केलें आहे. या पंथवर्णनावरून त्र्यंबक स्वामींना वर्णाश्रम धर्माची महति केवढी मोठी वाटत होती हें दिसून येणार आहे. सबब तें वर्णन आम्ही खालीं देतों. ( पान २३५,८९–१०८ )

ये सृष्टी च्यारी पंथ । ते सांगो यथास्थित ।
आदि शंकराचें मत । आहे जे ते ॥ ८९ ॥
वर्णपंथु भेदपंथु । अभेदपंथु निर्वाणपंथु ।
या चौपंथाचा अर्थु । सांगो आतां ॥ ९० ॥
कर्मपंथु वर्णाचारु । जांबुद्वीपी साचारु ।
यासी प्रमाण विचारु । असो ऐसे ॥ ९१ ॥
कास्मिरा पासुन कावरु । मध्य पाहाडु ही मांधरु ।
तेथुनु गंगा सागरु । जगंनाथु ॥ ९२ ॥
त्यापासुनु श्वेतबंधु । तेथुनु हरिग्रामु प्रसिधु ।
द्वारकेपासुनु सींधु । संगमवरी ॥ ९३ ॥
सिंधु संगमापासुन । पुन्हः कास्मिरभुवन ।
हे कर्म भूमि कारण । सृष्टिमध्यें ॥ ९४ ॥
योजनें सार्ध सोळाशतें । याचें प्रमाण निरुतें ।
साडेंपांचसें गावें तेथें । मध्य रेखा ॥ ९५ ॥
यामध्यें चौ वर्णाचें आचरण । हा वर्ण पंथु कर्म भुवन ।
वेदशास्त्र पुराण । याचि मध्यें ॥ ९६ ॥

आणि कृष्णमृग जेथवरी । कर्मभूमि तेथवरी ।
हे मर्यादा कर्माचारि । नेमली असे ॥ ९७ ॥
पश्चिमांध्र घाघट्टदेशी । वेदकर्म निरंतर यासी ।
हा भेदु पंथु भेदासी । आधार भक्ता ॥ ९८ ॥
ये पंथी सर्वा अंगीकारु । ध्याति येकु चि ईश्वरु ।
ऐसा वर्ण रहितु साचारु । भेदपंथु हा ॥ ९९ ॥
तेथ भक्त नेमले सहस्रागी । पण राहाणे भेदाचि माझारी ।
दुषा दुषु यांचा घरि । वितोंड असे ॥ १०० ॥
आतां अभेद पंथी । येकचि च येक चि भक्ति ।
त्या सकळांचि मति । भेदु नाहिं ॥ १०१ ॥
ते येकविधवर्त्र । येक धर्मु येकपात्र ।
आचारा अनाचाराचें नांव । ते जाणति चि ना ॥ २ ॥
जेथें कोन्हें हि प्रकारें नसे ज्ञान । उगाची पशुचा परी आचरण ।
तो निर्वाणपंथु अप्रमाण । सूत्री मध्यें ॥ ३ ॥
वर्णाचारा परीस । यत्नाचारु बहुवस ।
या हि अधीक निरस । तो अनाचारु ॥ ४ ॥
अनाचारा हीन । पश्वाचारु गहन ।
या चौपंथा आन । समर्थु पंथु असे ॥ ५ ॥
सर्वांमध्यें सत्यर्थु । तोचि पंथु समर्थु ।
पुससी तरी इत्यर्थु । सांगो आतां ॥ ६ ॥
हिमाद्रि पासुनि मेरु । हा देवपंथु साचारु ।
उत्तम मेरुपाडारु । हा चि असे ॥ ७ ॥
हा पंथु सर्वा आगला । परि न कळे याचि लीळा ।
मिं बोलिलों हा जीवाळा । वेदशास्त्रांचा ॥ ८ ॥

वर वर्णन केल्याप्रमाणें निरनिराळे पंथ त्र्यंबक स्वामींचे काळीं अस्तित्वांत होते. हे सर्व पंथ व यांचे आचार यांचें वर्णन करून त्र्यंबक स्वामींनीं वर्णाश्रमधर्म विहित आचारांचें श्रेष्ठत्व सिद्ध केलें आहे. अहिंसा धर्माचें विवेचन करताना निरनिराळ्या वर्णांच्या व आश्रमांच्या लोकांचे हातून त्या त्या वर्णास व आश्रमास विहित असलेले आचारपरिपालन होत असतां थोडी बहुत हिंसा घडणें ज्या अर्थी अपरिहार्य आहे त्या अर्थी अहिंसा धर्माचें परिपालन कोणत्या रीतीनें करावयाचें अशी शंका शिष्यानें विचारिली असतां त्यानें त्यानें स्वधर्मानें वागावें व तशा प्रकारचें वर्तन करीत असतां होणाऱ्या

हिंसेचा दोष त्यास लागत नाहीं असें मत त्र्यंबक स्वामींनीं व्यक्त केलें आहे. या संबधाच्या विवेचनांतील त्र्यंबक स्वामींचे खालील उद्गार फार महत्वाचे आहेत.

जें वेदशास्त्र वचन । तें मानावें प्रमाण ।
न मानितां पतन । थोर असे ।

नित्य धर्मी धर्मुना दोषु । परि नैमित्यि आहे विशेषु
किंचित स्वधर्मु चुके । तो पुरुष पतन पावे ।

आलस्यें अशक्त पणें । कां विस्मृति का विटाळें मन ।
कर्म सांडि तो प्राणी पतनें । चुके कैसा ।
स्वधर्मीचीं कर्मे । जें जें बोलिलीं उत्तमें ।
तें आचारावीं नेमें । आवडींचे ।

आतां पावेतों दर्शविल्याप्रमाणें ठिकठिकाणीं वर्णाश्रमधर्माची महति त्र्यंबक स्वामींनीं वर्णन केल्याचें दिसून आलें आहे. बाळबोधग्रंथाच्या शेवटीं वर्णाश्रमधर्माच्या महतीचें त्र्यंबक स्वामींनीं सर्वोत्कृष्ट वर्णन केलें आहे. त्र्यंबक-स्वामींचें सर्व विवेचन ऐकून झाल्यावर भेदाभेद ही सर्व माया आहे हें जर खरें आहे तर मग सर्व एकंकारच आहे व एकंकाराबरोबर च वर्णसंकर हि ओघानें च प्राप्त होतो अशी शिष्यानें शंका प्रदर्शित केली. ही शिष्याची शंका कानावर येतांच स्वामी विस्मय पावले व शिष्यास ह्मणाले ज्या जिव्हेनें तूं हे शब्द उच्चारलेस ती तुझी वाणी नसून स्वधर्मावर उगारलेली तलवार आहे. या प्रमाणें उद्गार काढून स्वामींनीं शिष्याच्या शंकेचें समाधान खालील ओव्यांत केलें आहे. त्या फार महत्वाच्या आहेत ह्मणून खालीं देतों. पान २८८; ३२-९६

मग ह्मणे गा शिष्या । तुज आणिलें ब्रह्मपक्षा ।
परि आम्हि हें समक्षा । दाविली नाहि ॥ ३३ ॥
जे या कर्मातें टाळावे । वर्णाश्रम बाळावें ।
नाहि बोलिलों गाळावें । स्वधर्मातें ॥ ३४ ॥
सर्वात्मा सच्चिदानंदु । सर्वथा दाविला अभेदु ।
परी या धर्माचा सन्मंधु । तोडिला नाहीं ॥ ३५ ॥
तुं अकस्मात येकसरिसें । घेऊनि उठलासि कैसें ।
पशु विचरति तैसें । विचरावें ह्मणानि ॥ ३६ ॥
तरि गा श्रुष्टि करिता प्रजापति । प्रजा रचुनि क्षिति ।
विश्वा घातली स्थिति । वर्ण धर्मांचि ॥ ३७ ॥

कर्म रचिले आधि । पाठीं प्रजाची वृधि ।
हे पूर्वींचि केली अवघी । विश्वजनकें ॥ ३८ ॥
श्रौत स्मार्त नित्य नैमित्तें । कर्मै प्रसीधें विहितें ।
विधि निषेध अनंतें । तेंचि नेमिलें ॥ ३९ ॥
हे प्रभुचि आज्ञा । पूर्विंची केलि संज्ञा ।
ते करीतासी अविज्ञा । तो तुची भला ॥ ४० ॥
तुझे बोले साचारु । त्रैलोकीं वर्ण संकरु ।
होये तैं हा सुर्खे विचारु । गांठीं बांध ॥ ४१ ॥
या बाहिरमुद्रां उतरिं । तुचि पडसी बाहिरीं ।
परि हें विश्व स्वाचारी । चळे ना ढळे ॥ ४२ ॥
जो स्वज्ञाति वाळि । अन्य ज्ञाति कवाळि ।
तो प्राणीं कोण्हे काळीं । पवित्र नव्हे ॥ ४३ ॥
ऐसा प्राणि अघोरवटु । त्याचा होय घटस्फोटु ।
त्या पतिताचा विटु । उभये लोकीं ॥ ४४ ॥
आचार वेव्हार प्रायश्चीत । याची कारणें चालत ।
यास्तव स्वधर्म रहीत । होऊं नये ॥ ४५ ॥
जे निर्धारें ब्रह्मीष्ट । तेहि हाति कर्म भ्रष्ट ।
तै ते लोकाचारा सुष्ट । पण ह्मणे ॥ ४६ ॥
तरि तुजहोनि समर्थ । पूर्वि बोलिले परमार्थ ।
त्याचें त्यासी काये हितार्थ । कवळे नव्हते ॥ ४७ ॥
ब्रह्म हरिजात सनिलु । यासी न लगे संसारमळु ।
तरिंहि वर्ण धर्माचा सलु । रक्षिला तेहीं ॥ ४८ ॥
हे मुख्य करुनि देव । शुक वामादि ऋषि सर्व ।
उरग नृप गंधर्व । यक्ष साध ॥ ४९ ॥
इत्यादि ब्रह्मीष्ट तेवढे । संशयो चि घालिति पुढें ।
कां जैं वर्णु धर्मु वाढे । तो तो महिमा ॥ ५० ॥
जो या भेदाचि पाळि । जो धर्माधर्मु दुआळी ।
तो ये सृष्टींचि नवाळी । गौळ न दिसे ॥ ५१ ॥
मनु भानु जनकादिक । देवर्षि ब्रह्म चि सकळैक ।
केधवांहीं कर्मनिंदक । नव्हती चि ते ॥ ५२ ॥
ते ब्रह्म स्थित वर्त्तती । दाटोनि कर्म अनुष्टीति ।
कां जे हें लोकप्रवृत्ति । राखता भलि ॥ ५३ ॥

ऐसें पूर्ण ब्रह्मिष्ठ । झांडोनि अकर्माचे सरोटे ।
लाविल स्वधर्माचे वाटे । सर्व जन ॥ ५४ ॥
सर्व वर्णी मन्द्रावें । ब्रह्म सर्वी अनुष्ठावें ।
आपुला धर्मि चालावें । नेम जाले ॥ ५५ ॥
जो अतिशयें ब्रह्मदृष्टा । त्यासी विशेष कर्म प्रतिष्ठा ।
कां जे बोलिजा श्रेष्ठा । तें चुकों नये ॥ ५६ ॥
जे ज्याचे आचार । ते त्या गौरवाकार ।
हे अगडेंसीं उत्तर । आदि प्रभूचें ॥ ५७ ॥
यास्तव द्वीजवर्ण । ते शट्कर्मि प्रविण ।
पाहिं न संडावें आसन । स्वधर्माचें ॥ ५८ ॥
शुचिवस्त्र संध्यास्नान । यज्ञोपवीत पौंड्र धारण ।
[illegible] तया ॥ ५९ ॥
ज्ञान दमन दया । अति अळंकारु तया ।
परा वानि जैसया । कोंदनि मनि ॥ ६० ॥
कंठा भरणें वेद श्रुती । दाटल्या येति स्मृति ।
पदें व्याख्यान वित्पती । कळसुक्षीया ॥ ६१ ॥
जरि वेदांतें वेदमुखें । जगीं ब्रह्म दाटलें देखे ।
तरी कळसावरी सुखें । हा चि मनी ॥ ६२ ॥
जो वंद्यु त्यासी प्रमाण । तें चि त्यासी आचरण ।
जे ज्याचें दरुशन । तें चि त्यासी भलें ॥ ६३ ॥
आता क्षत्रियाची कर्मे । तें चाळावीं रजोधर्मे ।
तेहि दुसरीयाचें नेमें । विटाळु मानावा ॥ ६४ ॥
ते ब्राह्मणाहुनि अध । यासी बोलिले व्रतबंध ।
ते वर्णि त्रीविध । कर्म नेमलें ॥ ६५ ॥
त्यासी वेदादिक पठन । निश्चय बोलिले यजन ।
मुमुक्ष महादान । करावें तेहीं ॥ ६६ ॥
तेहि प्रतिग्रहो नेघावा । आणि मंत्रु न संघावा ।
वैश करुनि देवा । नेंदावे कोन्हा ॥ ६७ ॥
तेही प्रजातें पालावें । दुष्ट नष्ट पीडावें ।
मित्रासी असावें । अंगसंगे ॥ ६८ ॥
तेही कामभाव रक्षावी । प्रतिज्ञा प्रयत्नें पाळावी ।
तेही काळाहि नेदावी । शरणागतें ॥ ६९ ॥
तेहि न संडावे रिपुन्हशा । रणि रिंगावें सहसा ।
तेथ या देहाचि आशा । धरूं नये ॥ ७० ॥

थोडें बहु आपें परु । हा सांडोनि विचारु ।
सन्मुख रणि जुझारु । रणशौरा तो ॥ ७१ ॥
पश्चिमे उगवे तरणि । क्षिति सांडि सहस्रमणि ।
कां भरला उलंडी पाणि । वारानिधि ॥ ७२ ॥
जऱ्हि नभि उडे मेरु । जऱ्हीं विष दे हीमकरु ।
तऱ्हि न पाहे रणशुरु । मागील वास ॥ ७३ ॥
गजदंति शस्त्रघातें । सन्मुख विडारति आंते ।
खंडे खंडे असंख्यातें । अंगें सुटती ॥ ७४ ॥
ते स्वशतें स्वर्गु घेती । इंद्रु हातें लोटीति ।
वरी ब्रह्मज्ञानें संसृती । चुके त्याची ॥ ७५ ॥
वैश धर्म प्रमाण । सामान्य पक्ष यजन ।
दया देहदमन । बोलिलें स्वामी --
कृशी वाणिज्यें दोन्हि । वैश्य भाग भवसेनी ।
तेही अन्य धर्माचि भराणि । भरुं नये ॥ ७७ ॥
शुद्र धर्मकारण । स्वभावतां द्यावे दान ।
मह्मकर्माचें अनुष्ठान । तयां नसे ॥ ७८ ॥
महाकर्म वैश्यां नाहि । ते कैंची बोलिजे शुद्रेंही ।
शुद्रांचा स्वधर्मु तोहि । ऐसा असे ॥ ७९ ॥
तिं वर्णासी सेवा । त्यां हा धर्मु बरवा ।
अन्य धर्माचा हेवा । न कीजे तेंही ॥ ८० ॥
हे चि देवहदुहितें । हें चि बोलिलें भगवद्गीते ।
जे स्वधर्मा परुतें । चांग नाहिं ॥ ८१ ॥
परधर्मु अलोकिकु । तो नव्हे मोक्षदायकु ।
आपुलें धर्में परलोकु । प्राप्तु होये ॥ ८२ ॥
असो येरां उपन्याती । जे जे धर्म आहेति ।
तेणेंचि त्याची गती । नेमस्त असे ॥ ८३ ॥
तीर्थ व्रत दया दान भक्ति । हे ग्राह्य सर्व ज्ञाती ।
वरी असीजे ब्रह्मस्थीति । हा विशेष गुण ॥ ८४ ॥
जे ब्रह्मीष्ठ निर्मळ । ते स्वभावता भजनशीळ ।
कां जे व्रताचारु सकळ । पाळणे तेंही ॥ ८५ ॥
ब्रह्मीष्ट कर्में सांडीति । मा तें अघोर रीघती ।
हे ना तऱ्हि चाळिती । स्वधर्मा तें ॥ ८६ ॥
आपुली सांडिता याति । होंचि लोकीं अपकीर्ति ।

आणि आपुले सुहृद वंचिति । आपणातें ॥ ८७ ॥
असें आपलें अपमान । देखती आपले लोचन ।
या जीवितवापरीस मरण । तेंचि भलें ॥ ८८ ॥
आपुली अपकीर्ति येसणि । रुढ होये ये मेदिनी ।
तें आपणे आपुला श्रवणि । आइके जेव्हां ॥ ८९ ॥
तेव्हां कृष्णमुख करावें । कां भलतें प्रयत्नें मरावें ।
बांधुनि तोंड दावावें । हे तों न घडे ॥ ९० ॥
कदाचि हें सर्व जन । बोलेल तोंड राखुन ।
परि अपरोक्ष उमति गुणागुण । राहाति तैसे ॥ ९१ ॥
यास्तव गुह्यरुपें सुजाणि । भ्रमण करावें पटनि ।
जन बोलति दोसणि । वुधि घेणें ॥ ९२ ॥
आइकुनि कीर्त्तिचि मातु । मिसीये घालावा हातु ।
अपकीर्त्ति तें पायांतु । मुख घालिजे ॥ ९३ ॥
यास्तव ज्ञाति राखावि । स्वधर्मि वस्ती घ्यावी ।
हाचि निर्धारु जीवि । असो देणें ॥ ९४ ॥
हा धर्मु आचरतां देहिं । होईल दुःख साहावें तेहीं ।
या धर्माचें भय कांहिं । धरुं नये ॥ ९५ ॥
येथ तुम्हा कोण विचारु । करुं पाहासी वर्णसंकरु ।
हा अंत्यजाचा आचारु । घेऊं नये ॥ ९६ ॥

ह्याप्रमाणें वर्णाश्रम धर्मानुसार प्रत्येकानें वर्तन करण्याच्या आवश्यकतेचें दिग्दर्शन करून ब्रह्मिष्ठ पुरुषाविषयी त्र्यंबक स्वामींनीं खालील प्रमाणें उद्गार काढले आहेत.

यास्तव ब्रह्मिष्ठ पुरुष । स्वाचार मानि शेष ।
निशेषें आचरति निर्दोश । गौरवें जेतें ॥ ३९ ॥
आणि आत्मभ्रष्ट मूढजन । ते हें न मनिति प्रमाण ।
त्याचें विरुप आंगलक्षण । सर्वत्रीं दिसे ॥ ४० ॥
ब्रह्मिष्ठ देखति समान । भेद नेघति वर्णावर्ण ।
परि तैसें आगें आचरण । तया नाहिं ॥ ४१ ॥
जैसी मर्यादेचि अगड । समुद्र राखे अवघड ।
नान रखे तैं काये आड । मर्यादा राहे ॥ ४२ ॥
कां दीवसाचि अगड राखोनि । पूर्वे उगवे तरणी ।
नां नुगवे तरी काये बांधोनि । आणिल पूर्वे ॥ ४३ ॥

नेमु राखोनि काळकूटी । देवें धरीलें आपुलां कंठीं ।
टाकी तरी काये कवंटी । दवाग्नी ते ॥ ४४ ॥
कां शेषें वोडउणि फणि । अगडा रक्षिली धरणी ।
ते टाकीतां काये परतूनि । माथा बैसे ॥ ४५ ॥
तेवी यां ब्रह्मीष्टां । राखणें हें चि काष्टां ।
कां जें वर्त्तावें शुष्टां । कर्मामध्यें ॥ ४६ ॥
ते हे निःकर्म देखती । तर्‍हि कर्ममर्यादा रक्षिती ।
आचार लावणार्थ आचरति । अशक्त फळें ॥ ४७ ॥

..............................................

ब्रह्मज्ञाणें मुख्य करूनि । जें वर्त्तति वर्ण टाकोनि ।
ते प्रति धरीतां कोण्हें वर्णि । केव्हांहि न योत ॥ ५२ ॥
अधर्मु अंगिकारितां जाण । ब्रह्मीष्टां लागे लंछन ।
कर्मिष्टां तरि पतन । भवंखोनि ॥ ५४ ॥
कर्मी कर्माचें कळकटें । या जनाचे आगि आपटे ।
परि हें सर्वथा न घटे । आत्मनिष्ठां ॥ ५५ ॥
येथ संसारु दिसे वात्रो । तेथें या सर्वां कैंचा ठावो ।
तर्‍हि स्वधर्माचा पावो । मोडो नये ॥ ५६ ॥
जी जी संतहो तुह्मी साक्ष । हे विश्व ब्रह्म अपरोक्ष ।
तरि पतन कां मोक्ष । कोण देखे ॥ ५७ ॥
तथही निःकाम बुधि । कर्में करावीं आधीं ।
ऐसे जे तुह्मामधी । शोभा पावे ॥ ५८ ॥
कदाचि माझें वचन । हा मानिल अप्रमाण ।
तुमचें बोलें निक्षेपण । दृढ होईल ॥ ५९ ॥

या प्रमाणें विवेचन करून नंतर त्र्यंबकस्वामी शिष्यास उपदेश करितात

रेरे शीष्या बुधीमंता । हें चि मनि धरि आतां ।
हा स्वधर्मु चालितां । भलें असे ॥ ६० ॥

येथ पावेतों त्र्यंबक स्वामींच्या मतांचे व त्या मतावरून दिसून येणाऱ्या त्यांच्या ध्येयाचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें याचें दिग्दर्शन आम्ही त्यांचेच शब्दांत केलें आहे. एकनाथांच्या ध्येयासंबंधीं मागे चर्चा करिताना त्यांचे जे अभंगरूपी उद्गार दिले आहेत त्या उद्गाराची व त्र्यंबक स्वामीच्या वरील ओव्यांत व्यक्त झालेल्या मतांची तुलना केली असतां दोघांच्या उपदेशांत स्पष्टपणें फरक असल्याचें दिसून येतें. वर्णाश्रम धर्माचे अभिमानी त्र्यंबक स्वामी

प्रमाणें एकनाथ हि होते ह्याबद्दल शंका घेण्यास जागा नाहीं. तत्रापि तत्कालिन् परिस्थिति पाहून वर्णाश्रम धर्माप्रमाणें महाराष्ट्रीय समाजापैकीं बहुसंख्याक सामान्य जनतेकडून आचरण होणें दुरापास्त आहे, असें नाथास वाटून त्यांनीं निराशेनें स्वोधारार्थ सर्व मार्ग सोडून देऊन भगवन्नाम स्मरणरूपी एकाच उपायाचा आश्रय करण्याबद्दल उपदेश महाराष्ट्रिय जनतेस केला आहे. ज्या काळच्या परिस्थितींत नाथांनीं वरील प्रकारचा उपदेश केला आहे त्याच परिस्थितीत त्र्यंबक स्वामीनीं नाथाप्रमाणें निराश न होता वर्णाश्रमधर्मा प्रमाणें प्रत्येक महाराष्ट्रीय व्यक्तीने वागलेंच पाहिजे असा सक्त उपदेश केला आहे. वर्णाश्रम विहीत धर्माप्रमाणें आचरण प्रत्येक व्यक्तीनें करून शिवाय भगवन्नामस्मरणादि उपायांचा आश्रय स्वोधरार्थ प्रत्येक व्यक्तीनें करण्यास हरकत नाहीं हें त्र्यंबक स्वामींच्या उपदेशाचें सार आहे. वारकरी सांप्रदायाविषयीं ह्यापुढें आम्ही जी चर्चा करणार आहों त्या चर्चेवरून आतां दर्शविलेल्या त्र्यंबकस्वामी व एकनाथ यांच्या मतांतील फरकाचे केवढें महत्व आहे हें वाचकांचे निदर्शनास येणार आहे. तूर्त ह्या मुद्याचें नुसतें दिग्दर्शन आम्ही एथें केलें आहे.

आतां याच काळांताल दुसऱ्या एका व्यक्तीच्या मताबद्दलची व ध्येयाबद्दलची चर्चा करूं. ही व्यक्ति ह्मटली म्हणजे महालिंगदास ही होय. खानदेशांतील चाळिसगांव तालुक्यांत गिरणा नदीचे काठी असलेल्या बाहाळ गावानजिकच्या वाडे गावचे हे राहणोरे. पंचोपाख्यानांत त्यांनीं स्वतःविषयीं जी माहिती दिली आहे तींत त्यांनीं ते स्वतः सूर्यवंशीं विप्र असल्याचें लिहिलें आहे. हे शके १४५० ते १५०० चे दरम्यानचे काळांत होऊन गेले असें पंचोपाख्यान, शालिहोत्र, सिंहासनबत्तीशी इत्यादि त्यांनी केलेल्या ग्रंथाच्या शेवटीं दिलेल्या रचना कालावरून अनुमान करण्यास हरकत नाहीं. यांचा साप्रदाय कोणता होता व महाराष्ट्रीय समाजांत त्याची मानमान्यता कोणत्या प्रकारची होती हें समजण्यास मार्ग नाहीं. असे स्थितींत महाराष्ट्रीय समाजाचे पारमार्थिक पुढारी या नात्यानें त्यांच्या मतांची किंमत करणें प्रशस्त होणार नाहीं. तथापि महाराष्ट्र समाजांतील त्या काळचे ग्रंथकार या नात्यानें त्यांच्या मताची किंमत कांहीं थोडी नाहीं व याच दृष्टीनें त्यांच्या मताविषयीं चर्चा करून त्यांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें याचा विचार करणें जरूर आहे. महालिंगदासाचे काळीं ब्राह्मणवर्णापैकीं कित्येक लोक किती नीचावस्थेप्रत पोहोंचले होते हें खालील ओव्यांवरून दिसून येणार आहे.

आणि म्लेंछ तो ऐसा । यौवनाचि सेवा करी ।
अहिर्निसा । तेणें पडे फासा । खोटेपणाचा ॥
इच्छा इद्दा महिमा । विसरला षट्कर्मा ।
बा बेटा बाप म्हणोनि । साऊमा विनंति करी ॥
म्हणे मी किंकर तुमचा । काम सांगावे असे वाचा ।
लोभ दावि सरकयांचा । म्हणे मी पैदास करीन ॥
मज रुक्ता द्यावी खून खारी । मी करी पैदागिरी ॥
स्वामी स्वार्थी मी भारी । मग इद्दा दिधला ।
येक न्याय करी पापमूर्ति । परद्रव्यावरि आर्ति ।
खोटेपणा बहुचित्ती । थोर गजा अर्जवितो देखा ॥
जना पीडा कारभारी । पापपुण्य न विचारी ।
अवस्था अंतर विचारी । भरोवरी थोर भरला ॥
सत्पात्री कदा न भजणें । तरी पापकरी चौगुणे ॥
येसा पापिष्ट तेणें जन पीडिले ।
तया षट्कर्माचा विसर । कारकोनी पडिभर ।
गायत्रि मंत्राचा अधिकार । थोडा तयासी ।
जेथें नागवण करी तेथें आपण करी चोरी ॥
नमन नाहीं कोणासीं करी । पाचे मेखा आदळिल्या ।
दुग्धचि बोलणें तेणें । सखा सोईरा मैत्र नेणे ॥
लाचावरी तेणे ठेविलें चित्त ॥
उरि फुटोनि पुरण निघाले । ते स्वामीसी ठाऊक झाले ।
मग धरोनि बंदीखान घातले । चाबुकां मुखें आक्रंदे ॥
स्वामी मारू नको भारी । तेव्हां तोबा तोबा । इत्यादी ॥
बेटा बेटा ऐसे वैखरी । दूत बोलत असे ।
म्या केली हरामखोरी । आतां न मारावे सोटवेरी ।
ऐसे बोलता धोत्रावरी । विष्टाचि केली ।
ऐसा नष्ट खंड आला । तो घेऊनि देशत्याग केला ।
मागे नमूं लागला । भलत्यासी ॥
ऐसा तो ब्राह्मण म्लेंच्छ होय चौगुण ।
इहपरत्रा चुकला हा अवगुण थोर तयाचा ॥

वर्णाश्रमधर्मविशिष्ट जी महाराष्ट्रीय समाजाची रचना ती महालिंगदास यांना प्रशंसनीय व इष्ट वाटल्याखेरीज वरील प्रकारची कडक टीका त्या कालच्या ब्राह्मणवर्गापैकीं म्लेंच्छांची सेवा करणाऱ्यावर त्यांनीं कधींहि केली नसती हे

उघड आहे. वेदांती आणि कर्मिष्ट यांचे विषयीं महालिंगदासांनीं काढलेले खालील उद्गार फार महत्वाचे आहेत.

साही शास्त्रींचे वक्ते । भट पिंगळे जे जाणते ।
तर्क वेदांतिचे वक्ते । बोलती तेथें ।
आधीं वेदांती बोलती । ते येकमेवाद्वितीये नास्ति ह्मणती ।
तर्क ह्मणे भेद मती । प्रपंच असे ।
मग ह्मणितले चौघीजणी । बुद्धिच ब्रह्मनिर्वाणी ।
मी ह्मणतसे कर्मा वाचोनि । ब्रह्म न पविजे ।
गौ ब्राम्हण अवघडी । जो देखिता करी सांडी ।
तो अधर्म मनुष्य जन्मासी ... ... ...रून यत आहे.

वरील उद्गारावरून वर्णा... ...पूर्वकाळिचा एक विद्वान ग्रंथकार या नात्यानें वरील मतावरून महालिंगदास यांचें व्यक्त होणारें ध्येय लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्या काळीं महाराष्ट्रीय समाजाच्या पुढाऱ्यामध्यें असा एक वर्ग होता कीं, ज्या वर्गास वर्णाश्रमधर्माचें पुनरुज्जिवन करून विस्कळित झालेल्या समाजाची घडी पूर्ववत् प्रमाणें बसविणें यातच महाराष्ट्रीय समाजाचा तरुणोपाय आहे असें वाटू लागलें होतें व याच हेतूचे सिध्यर्थ वर्णाश्रम धर्माची महति महाराष्ट्रीय समाजांतील लोकांचे मनावर ठसविण्याचा त्यांनीं प्रयत्न चालविला होता असें आतां पावेतों केलेल्या विवेचनावरून उघड होत आहे.

## शिवाजी महाराजांच्या सम कालीन महाराष्ट्रीय समाजाच्या हरी कथा निरुपणी पुढाऱ्यांच्या ध्येयाचें स्वरूपः—

शिव पूर्वकालीन महाराष्ट्रीय समाजाच्या हरी कथा निरुपणी पुढाऱ्यांच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयीं विवेचन केल्यानतर खुद्द शिवाजी महाराजांच्या समकालीन महाराष्ट्रीय समाजाच्या हरी कथा निरुपणी पुढाऱ्यांच्या ध्येयाच्या स्वरूपा विषयींच्या चर्चेकडे आतां आम्ही वळतों. या काळांत समर्थ रामदास स्वामींचे श्रेष्ठ बंधु रामीरामदास हे महाराष्ट्रीय समाजाचे हरी कथा निरूपणी पुढारी म्हणून गोदा तटाकीं प्रसिद्धीस आले. या शिवाय समर्थ रामदास स्वामी, तुकारामबुआ देहूकर, चिंचवडचे मोरयादेव, ब्रह्मनाळचे आनंदमूर्ती, वडगांवचे जयराम स्वामी, निगडीचे रंगनाथ स्वामी व भागानगरचे केशव स्वामी हेहि त्या काळीं महाराष्ट्रीय समाजाचे हरीकथा निरूपणी पुढारी म्हणून

प्रसिद्धीस आले होते. या काळच्या राजकारणी पुढाऱ्यांत शिवाजी छत्रपती महाराजांना जसे अग्रस्थान प्राप्त झालें होतें तसेंच स्थान वरील हरीकथा निरूपणी पुढाऱ्यांत समर्थ रामदास स्वामी यांस प्राप्त झालें होतें. हे पुढारी ज्या काळांत महाराष्ट्रांत उदयास आले त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजाच्या स्थितीचें थोडक्यात दिग्दर्शन करणें जरूर आहे. कारण वरील हरीकथा निरूपणी पुढाऱ्यांच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयींची यथायोग्य कल्पना त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजाची खरी स्थिती लक्षांत आल्याखेरीज येणें शक्य नाहीं. या काळांत होऊन गेलेले हरीकथा निरूपणी पुढारी उदयात येण्यापूर्वी मुसलमानांची राजकीय सत्ता महाराष्ट्रांत प्रस्थापित झाल्यास जवळ जवळ [illegible] होऊन गेलीं होतीं. श्रुतिस्मृत्युक्त धर्मास महारा-
वरील पुढारी उदयास [illegible] जवळ जवळ [illegible] हरीकथा निरूपणी पुढारी होऊन गेले त्यांच्या उपदेशामुळें व शिकवणीमुळे महा[illegible] समाजांतील बहुसंख्याक लोक कसेबसे हिंदुधर्मास चिकटून राहून मुसलमानी धर्माच्या गोटांत शिरले नव्हते. त्या काळचे महाराष्ट्रीय जन आचारधर्मापासून च्युत झाल्यानें तें नांवाचे मात्र हिंदु राहील होते. मुसलमानी धर्माचे गोटांत महाराष्ट्रीय जनतेनें जाऊ नये यास्तव वारकरी सांप्रदायाच्या हरीकथा निरूपणी पुढाऱ्यांनीं विठ्ठल भक्ति आणि विठ्ठल नामस्मरण या दोन अत्यंत स्वल्प बाबींचा उपदेश महाराष्ट्रीय जनतेस केल्यामुळें त्यांचा स्वीकार महाराष्ट्रीय समाजांतील बहुसंख्याक लोकांनीं केला होता. महाराष्ट्रीय समाजाच्या स्वधर्माच्या बचावा करितां वारकरी सांप्रदायाच्या हरीकथा निरूपणी पुढाऱ्यांनीं जी वरील तोड काढिली होती ती तात्पूर्ती म्हणून योजिलेली होती. त्या काळच्या सर्व पंथांच्या हरीकथा निरूपणी पुढाऱ्यांनीं निर्माण केलेल्या वाङ्मयाचें परिक्षण केल्यास वर्णाश्रम धर्माची स्थापना महाराष्ट्रीय जनतेंत झाल्या खेरीज महाराष्ट्रीय समाजाचा खरा उद्धार व्हावयाचा नाहीं अशाच प्रकारची त्यांची भावना असल्याचें दिसून येतें. कोणत्याहि समाजांत त्या समाजाच्या उन्नती प्रित्यर्थ अमूक एक प्रकारचें विशिष्ठ ध्येय स्विकारणें जरूर आहे अशा प्रकारची भावना त्या समाजाच्या पुढारी वर्गात निर्माण झाली म्हणजे ती कालें करून दृढावत जाऊन तिचें अंतर्भूत असणारे ध्येय सिद्ध करणारे पुढारी त्या समाजांत उदयास येतात व त्या ध्येयाच्या सिध्यर्थ ते प्रयत्न करूं लागतात. ज्या काळच्या महाराष्ट्रीय समा-

जाच्या स्थिती बद्दल आपण विचार करीत आहों त्याकाळा पूर्वी हि महाराष्ट्रीय समाजांत वर्णाश्रम धर्माचा उपदेश करून, त्या धर्माच्या परिपालनाची व आचरणाची प्रवृत्ती महाराष्ट्रीय समाजात व्हावी एतदर्थ प्रयत्न करणारे हरी कथा निरूपणी पुढारी वेळोवेळीं उदयास आले होते हे आम्हीं मागें दर्शविलेंच आहे. शिवाजी महाराजांचे अवतार समयीं ही भावना तीव्र स्वरूपाने महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी व हरीकथा निरूपणी पुढाऱ्यांस भासू लागल्यामुळे पूर्व परंपरेस अनुसरून वर नमूद केलेले हरीकथा निरूपणी पुढारी महाराष्ट्रीय समाजांत उदयास आले. वर दर्शविलेली सर्व साधारण महाराष्ट्रीय समाजाची परिस्थिति ध्यानांत घेऊन या पुढें ज्या हरीकथा निरूपणी पुढाऱ्यांच्या ध्येयाविषयीं आम्ही चर्चा करणार आहों त्यांच्या ध्येयाचे स्वरूप ठरविणे योग्य होणार आहे. वर दर्शविलेल्या हरीकथा निरूपणी पुढाऱ्यापैकीं रामीरामदासांच्या ध्येयाचे स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें हे त्यांनीं केलेल्या ग्रंथांच्या आधारें ठरविण्याचा आपण प्रथम प्रयत्न करू. रामीरामदासांच्या चरित्राविषयीं म्हणण्यासारखी माहिती उपलब्ध नाहीं. ते गोदातटाकी जांब गांवीं राहत असत. ते संसारी असून वर्णाश्रमधर्माप्रमाणे गृहस्थाश्रमधर्मास अनुरूप आचरण करीत असी त्यांच्या चरित्रा विषयींची माहिती समर्थ रामदास स्वामींच्या बखरींत ठिकठीकाणी जे त्रोटक उल्लेख आले आहेत त्यावरून दिसून येतें. रामीरामदासांनी आपला स्वतंत्र सांप्रदाय निर्माण करून त्यांच्या तत्वांचा उपदेश व प्रसार करिण्याकरतां शिष्य सांप्रदाय व मठ स्थापना निर्माण केल्याबद्दलचा पुरावा अद्याप पावेतों उपलब्ध झालेला नाहीं. त्यांच्या चरित्रा विषयींच्या वरील माहिती खेरीज त्यांच्या ध्येयाच्या स्वरूप निश्चितीच्या दृष्टीनें उपयुक्त असा दुसरा पुरावा म्हटला म्हणजे त्यांनीं रचलेले दोन ग्रंथ भक्तिरहस्य व सुगमोपाय हे होत. या ग्रंथांच्या आधारें मुख्यत्वें-करून आपणास त्यांच्या ध्येयाचें स्वरूप निश्चित करण्या वाचून गत्यंतर नाहीं हे उघड आहे. मुसलमानी राजसत्तेचे दुष्परिणाम महाराष्ट्रीय समाजावर कोणत्या प्रकारचे झाले होते याची यथार्थ कल्पना रामीरामदास यास झाली होती, असें त्यांच्या खालीं दिलेल्या उद्गारावरून दिसून येते.

कलीयुग महाघोर । सर्व दोषाचा आगर ।
वर्ण चतुष्टय नारीनर । सर्व धर्मपराङ्मुख ॥
पराम्न परद्रव्य परास्त्रीलोलुप । द्विज होती कुत्सित पापा...

कैंचें तीर्थ व्रतदान जप । उपहास करीती त्याचें ॥
मच्छमांसाशनें जीविका । होईल सर्वांब्राह्मणादिका ॥
असो सर्व धर्म लोपे लोकां । अल्पायुत्व अपमृत्यु ॥
म्लेंच्छराज्य होईल प्रबळ । पीडा पावेली द्विजकूळ ॥
ब्राह्मणकरकर्षणभेणें विकळ । गिरी कंदरी भ्रमतां सकुटूंब ॥
अत्र तीव्रशासन यावनी । अब्रह्मण्य जाली कित्येक अवनी ॥
आतांच झाला वर्णसंकर । अवशेष उद्भवला पापाचार ॥
कैचीं भक्ति कैंचा हरिहर । बाह्यातकार किंचित ॥

वरील महाराष्ट्रीय समाजाच्या स्थिति दर्शक ओव्या प्रमाणें खालील ओव्याहि फार महत्वाच्या आहेतः—

कन्या विक्रय करिती ब्राह्मण । वेदशास्त्र विकीती पुराण ॥
विकीती हरीकथा नामस्मरण । नाना द्रव्यें आणि रस ॥
दुष्ट सेवा दुष्ट [illegible] । दुराचारी दुराग्रह ।
गोब्राह्मणा आते निग्रह । तेथें कैचा प्रतिपाळ ।
क्षत्रिय वैश्य स्वधर्म भ्रष्ट । शूद्र झाले सेवा नष्ट ।
किती हेचा बोलाव स्पष्ट । [illegible] ॥

महाराष्ट्रीय जनतेंत रामी रामदासाना कोणते अवगुण दिसत होते तें वरील वर्णनावरून स्पष्ट दिसत आहे.

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चारी वर्णाच्या लोकांनी श्रुतीस्मृत्युक्तधर्माचार सोडून देऊन त्या धर्माच्या विरुद्ध वर्तन चालविले होतें. ही गोष्ट रामीरामदासांच्या निदर्शनास आली ती त्यांनी वरील ओव्यात स्पष्टपणें नमूद करून ठेवली आहे. महाराष्ट्रीय समाजाच्या असल्या प्रकारच्या अवनत स्थितींतून महाराष्ट्रीय जनतेने आपला उद्धार कोणत्या मार्गानें करावा असे विषयीं रामी रामदासांनीं कोणते उपाय सुचविले आहेत याचे आतां दिग्दर्शन करूं.

नारद तुंबर सनकादिक । वाल्मिक व्यास आणि शुक ।
भगवत प्रिय रुषी अनेक । जगदुधारी तत्पर ॥
इहीं करुनि तप साधनें । कलियुगीं तरावया दिनें ।
अवगणूनी नानासाधनें । नाम महिमा प्रेरीला ॥
यागादिकीं कर्मी पाही । आणि वर्ण अश्रम धर्महीं ।
करित असतांच अधिकार नाहीं । रामनामें तराति तें ॥
तथापि ज्याची जितकी शक्ति । तैसी करावी हरी भक्ति ।

हरी वाचूनी बंध मुक्ति । कदा नव्हे कलियुगिं ॥
ऐसें नाना ग्रंथाचें तात्पर्य । ऐसेंची बोलत आले आर्य ।
भगवत् भक्तया कृतकार्य । होइजे भगवत् प्रसादें ॥
मानवी भजती देव । कामना रुपें कल्पुनि भव ।
वैराग्य संपन्न शुद्ध जीव । संसारी सुटों इच्छिती ॥
त्याचा तरणोपाय कैसा । स्वधर्में तरावें हा भर्वसा ।
तरी तो सांग न घडे ऐसा । काळ आला विपरीत ॥
कळिचेनी प्रताप नळें । साधनें तितुकीं जाली विव्हळें ।
स्वकर्मादिकें सकळें । करिजेत असताच न टके ती ॥
सहवासी जन संपर्कें । कुविद्या कुबुद्धि कुतर्कें ।
दुर्जनसंगे तरि नरक । अकल्पित बोलीलें ॥
महापातकें अवघीं चारी । संसर्गि पाचवा बरोबरी ।
आर्द्धपाप जो न वारी । शक्तहोउनि तयातें ॥
भगवत भक्ति [illegible] भक्त थोर । [illegible] किंकर ।
भक्ति प्रतापें मोडली थोर । इंद्र आला द्वारा [illegible] ॥
प्राय श्चित्त न को[illegible] पुसे । हठयोगाची ठाय [illegible] ।
तीर्थादिकें अनायसें । भक्तिच्या ठायीं वोळंगती ॥
कृतादी युगींचे तापस प्राणि । करिती कलियुगाची सिराणी ।
तेथें किर्तन मात्रें चक्रपाणी । मोक्षदाता सुभक्ता ।
कळी हा दोशाचा समुद्र । परि एक असे महाभद्र ।
कीर्तनमात्रें चंद्रमौळी रामचंद्र । महापापें हरूनी मोक्ष दे ॥

---

शुष्क पंडित भक्तिहीन । म्हणतील भगवतद्गुण कर्म नाम वर्णन ।
याचें नाम कीर्तन तें पुस्तकवाचन । गांव नाचो नये ब्राह्मणा ॥
प्रसिद्ध वचन कारिकेसी । जे गांव नये ब्राह्मणासी ।
तें जणें करणें उदरभरणासी । तोचि निषिद्ध नटतुल्य ॥
परंतु भगवत भक्तिरूप । नृत्य गीत करितां पाप ।
म्हणेली तोचि पापस्वरूप । महानिरयी पचिजे तो ॥
स्वधर्म संरक्षण करावे । स्वकर्मेंचि करूनि तरावें ।
परंतु ब्राह्मण्य बुडों लागलें तें धरावें । भक्तिवाचुनिया कवणें ॥
यालागीं हरिभक्ति करावी आदरें । न्यून कर्म संपूर्ण कीजे ईश्वरें ।
केवळ कर्माग्रह निराधारें । सिद्धि न पवे कलीयुगी ॥
षट्कर्मयुक्त भक्ति विहिन । तो विप्र श्वपचाहूनि हीन ।
चतुर्वेदी वासूदेव नेणोन । बहिर्मुख मूर्ख पतित ॥

वाचोनि पढोनि करी पापप्रमाद। तया अंती उबपेक्षिती वेद।
दंभाचारवंतासि गोविंद। अन्तरे महदंन्तरें॥
म्हणौनि अग्निहोत्र अगत्य ब्राम्हणा। अगत्य वेदाध्येयन जाणा।
तसी हरिकथा अगत्य नारायणा। प्रीतीतें पावावयातें॥
येसं समर्थ आणि सुगम। परमेश्वराचें रम्य नाम।
उच्चारितां लाभे पूर्ण काम। हें निधान कलियुगीं॥
तया भगवंता कारणें। तपदान व्रतें बोलिलि आहे तीं बहुतें।
ते यथामति बोलिजेतील। ते परिस्वामी सज्जनीं।
आतां ही देशकाळ वर्तमाना सारिखें।
ठाकेली ते स्वधर्मकर्म सुखें दान पुण्य करावे॥
परतु केवळ हरिशंकर नामस्मरणेंवीण दुखें।
कोण निरसु शकेली।



श्रुती प्रणित तोचि धर्म। विपरीत तोच अधर्म॥
विष्णुस्मरणाचा हा अर्थ। नाम म्हणौनि समर्थ।
केवळ उच्चारें कृतार्थ। सर्व धर्म बाह्यही॥
अच्युत नामे नाहीं च्युति। नलगे साधन वित्पत्ति।
नलगे साहित्य संपत्ति। रामकृष्ण म्हणताहो॥
आतां एकादशीसी मातृपितृ श्राद्ध ते द्वादशीसी करावे प्रसिद्ध।
हरिदिनीसी अन्नदाता भोक्ता शुद्ध नव्हे नाना प्रायश्चित्ती॥
एकादशी नित्य व्रत। श्राद्ध नैमित्तिक व्रत।
नित्यानंतरें नैमित्य सुव्रत। आचरति स्वधर्मे॥
एकादशी हे पुराणोक्त। श्राद्ध म्हणावे शास्त्रोक्त।
तरी जीविका कोणती यथोक्त। जे येथेच लागला दुराग्रहो॥
भक्ति आश्रयें करावें कर्म। हे कळीमाजी मुख्य धर्म।
तरी एकादश्या भगवत् प्रेम। द्वादशी श्राद्ध हि साधले॥
करितां पार्थिव लिंग पूजन। कोटी यज्ञ फळ पावे सज्जन।
शिव प्रसादे होय सद्गुरु ज्ञान ज्ञानें कृतकृत्यता॥

रामी रामदासांच्या ग्रंथांतील जे निवडक वेचे वर दिले आहेत, ते अत्यंत महत्वाचे असून त्यांवरून त्यांच्या ध्येयाच्या स्वरूपाची कल्पना उत्तम प्रकारें आपणांस करतां येते. श्रुति स्मृत्युक्त धर्माचाराचें महत्त्व रामीरामदासास अत्यंत वाटत असून हि भगवद्भक्ति वाचून उद्धार होणें शक्य नाहीं असे त्यांचें मत बनले होतें. बाराव्या शतकापासून वारकरी सांप्रदायांतील

हरिकथा निरुपणी पुढाऱ्यांनीं दोन तीनशें वर्षे पावेतों भगवत् भक्तीचा महिमा सतत वर्णन करून तिचें महत्त्व महाराष्ट्रीय जनतेच्या मनावर ठसविण्याचे जे प्रयत्न चालविले होते त्याचे योगानें रामीरामदासांच्या काळीं वारकरी संप्रदायाच्या हरिकथा निरूपणीं पुढाऱ्यांनीं उपदेशिलेल्या भगवत्भक्तीस वर्णाश्रम धर्माचारा इतकेंच महत्व प्राप्त झालें होतें. रामीरामदासांचे मनावर भगवत् भक्तीचें महत्त्व वर दर्शविलेल्या कारणामुळे ठसलें जाऊन तिचा अंगिकार स्वोन्नति प्रीत्यर्थ करण्याचा उपदेश महाराष्ट्रीय जनतेस त्यांनीं केला आहे. भगवद्भक्ति सांप्रदायाचा विशेष पुरस्कार बाराव्या शतकानंतर महाराष्ट्रांत सुरु झाल्यानंतर शिव आणि विष्णु यांची भक्ती करणारे लोक महाराष्ट्रांत उत्पन्न झाले. उपास्य दैवताच्या अभिमानानें भक्तिमार्गी जनतेंत शैव आणि वैष्णव असे दोन पंथ उदयास येऊन त्यांचेमध्यें स्पर्धा आणि परस्पर द्वेष उत्पन्न झाला. या द्वेषाचें निर्मुलन करण्याकरितां रामीरामदासांनीं शिव आणि विष्णु या दैवतांचें एकरूप खालील ओव्यांत प्रतिपादिलें आहे.

**रमापती आणि उमापती । दोघेही आत्मत्वें स्त्वन्नीति श्रुती ॥**
**तरी आत्मे काय वेगळे आहेति । एकचि अद्वितीय ॥**
**केशवाचे हृदयीं शिव । शिवाचे हृदयीं केशव ।**
**सर्वथा नाहीं भिन्नभाव । हें वेदवाक्य विश्वारूढ ॥**
**शिव केशवासी भेद भावी । तो आकल्प पचे रौरवी ।**
**येवढ्या अनृता परिस पदवी । थोर कैची पापाची ॥**

याप्रमाणें शिव विष्णु हीं दैवतें एकरूप असल्याचें दर्शवून रामीरामदासांनीं भक्तिरहस्यांत शिव व विष्णु भक्तीचा महिमा वर्णन केला आहे. या दैवतांच्या भक्तीची महतीवर्णनपर कित्येक आख्याने या ग्रंथांत त्यांनी दिलीं आहेत. त्याच प्रमाणें ह्या दैवतासंबधीं निरनिराळ्या व्रतांचें वर्णन या ग्रंथांत त्यांनीं केलें आहे. कलीयुगांत वर्णाश्रम धर्माची झालेली वाताहात पाहून मोक्ष कोणत्या मार्गानें प्राप्त करावयाचा अशी पृच्छा रामीरामदासांनीं भक्ति रहस्य ग्रंथांत एके ठिकाणीं केली आहे. भगवन्नामस्मरण हें एकच मोक्ष प्राप्तीचें साधन कलीयुगांत शक्य आहे, असें या पृच्छेचें उत्तर रामीरामदासांनीं दिलें आहे. मात्र निरनिराळ्या वर्णाच्या लोकांची श्रुतीस्मृत्युक्तधर्मास अनुसरून जी विहित कर्मे आहेत तीं त्या त्या वर्णाच्या लोकांनीं केलींच पाहिजेत असा कटाक्ष रामी रामदासांनीं दर्शविला आहे. त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजांत श्रुती-

स्मृत्युक्त धर्मांचें ज्ञान असणारे लोक फार दुर्मिळ झाले होते ही बाब लक्षांत घेऊन त्या धर्मांचें ज्ञान महाराष्ट्रांतील सामान्य जनतेसहि सहजरित्या व्हावें, एतदर्थ भक्ति रहस्य ग्रंथाच्या शेवटच्या कांहीं प्रकरणांत वर्णाश्रम धर्मांचें कथन मनुयाज्ञवल्क्य इत्यादि स्मृतीस अनुसरून रामी रामदासांनीं केलें आहे. येथ पावेतों रामी रामदासांच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयीं जी चर्चा केली, त्या चर्चेंतील मुद्यांचें त्रोटकपणें आम्ही खालीं दिग्दर्शन करतों.

(१) रामी रामदास उदयास येण्यापूर्वी महाराष्ट्रीय जनतेंत सर्वत्र आळस व उदासीनता यांचा फैलाव झालेला होता.

आजि ज्ञान गाथा घरोघरीं । क्रीया मांडली असुरीं ।
हेचि ह्या काळींची थोरी । कौतुक पाहिले पाहिजे ।

असें या कालच्या महाराष्ट्रीय जनतेचें रामी रामदासांनीं वर्णन केलें आहे. ही तमोगुणी वृत्ती महाराष्ट्रीय समाजास अत्यंत घातुक होती. सबब ती नाहींशी करण्याकरितां भक्तियुक्त कर्मांची प्रवृत्ति महाराष्ट्रीय जनतेंत जोमास लागावी, या उद्देशानें भक्तिरहस्य ग्रंथाची रामी रामदासांनीं रचना केल्याचें दिसते. रामी रामदास हे नाममहिम्याचे कट्टे अभिमानी व उपदेशक होते. नाम महिम्याचें वर्णन खालील ओव्यांत त्यांनीं केलें आहे तें फार महत्त्वाचें आहे.

केवळ रामनाम स्मरण । ज्याचे अक्षरोद्वये उच्चारण ।
तेणें ब्राम्हणादि सर्व साधारण । मुक्ति पावती तत्वता ॥

दुसरे एके ठिकाणीं परमेश्वरनामस्मरणाची स्वल्पता त्यांनी खालील ओव्यांत दर्शविली आहे.

कलौ करितांहि न करवे स्वकर्म । धरितांहि न धरवे स्वधर्म ।
मनींहि न स्मरे योग याग वर्म । तसे तरी कांहीं हें नव्हे ।

रामी रामदासांच्या पूर्वी होऊन गेलेल्या वारकरी सांप्रदायाच्या हरिकथा निरूपणी पुढाऱ्यांच्या मतांप्रमाणेंच रामी रामदासांचीं मतें होतीं, हें वरील उद्गारावरून स्पष्ट होत आहे. असे स्थितींत रामीरामदासांच्या उपदेशाचा विशिष्टपणा कोणता असा प्रश्न स्वाभाविकपणें उपस्थित होतो. शिव व विष्णु या दैवतांचा महिमा वर्णन करून त्यांच्या भक्तिप्रधान व्रतांचा प्रचार महाराष्ट्रीय जनतेंत करून त्यामार्गानें महाराष्ट्रीय जनतेंत आलेला आळस व उदासीनता नाहींसा करणें हा रामीरामदासांच्या उपदेशाचा विशिष्टपणा होता, हे त्यांनीं केलेल्या ग्रंथ रचनेवरून दिसून येतें.

(२) रामीरामदासांचे काळीं या दोन दैवतांचे अभिमानी महाराष्ट्रांत अस्तित्वांत होते. या दोन दैवताभिमानी पथांतील विरोध नाहींसा करण्याकरितां शिव व विष्णु या दैवता भिन्न नसून एकच आहेत, हे तत्व रामीरामदासांनी प्रतिपादिलें व महाराष्ट्रीय जनतेच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न केला. या मुद्याच्या दृष्टीनें रामीरामदासांचे खालील उद्गार फार महत्वाचे आहेत:—

वैष्णवें शांभवें दर्शनोच्छवीं। महादेव महाविष्णू वंदावे सद्भावीं
घाचा नयन झाकावे मात्सर्य जीवीं। हें नव्हे भारत लक्षण।
भक्तीरहस्यें हरि शंकर। एकात्मा हा नित्य निर्धार।
तसेच शांभव वैष्णव सहोदर। भक्ती जननी दोघांची।
देवा देवासि एकात्मता। अतिप्रीति चालविति समतां।
तैसीच भक्तां भक्तांसीं अखंडता। प्रीति असावी परस्परें॥

वरील ओव्यांत दर्शविल्याप्रमाणें शिव व विष्णु या देवतांची एकात्मता दाखवून ह्या दोन पथांतील विरोध नाहींसा करण्याचा प्रयत्न रामीरामदासांनी केला.

( ३ ) रामीरामदासांचे काळीं महाराष्ट्रीय समाजांत वर्णाश्रम धर्मास अनुसरून तंतोतंत आचरण करणारे थोडे फार लोक अभिमानी होते. हे लोक वर्णाश्रम धर्माचे पूर्ण अभिमानी असून मोक्ष प्राप्तीस्तव वर्णाश्रम धर्माशिवाय आपलीकडे कोणत्याहि गोष्टीची अवश्यकता नाही, असें या लोकांचें मत होतें. मोक्ष प्राप्तीस्तव भगवत् भक्तीची अथवा भगवन्नामस्मरणाची अवश्यकता आहे, असें या लोकांना वाटत नसे. इतकेंच नव्हे तर भगवद्भक्ति व भगवन्नामस्मरण हें एक प्रकारचें नवीन खूळ समाजांत उत्पन्न करण्यांत आले आहे, अशी या लोकांची समजूत होती. अशा प्रकारच्या लोकांस खालील उपदेश रामीरामदासांनी केला आहे:—

स्वधर्म संरक्षण करावे। स्वकर्मेंचि करूनि तरावे।
परंतु ब्राह्मण्य बुडो लागलें तें धरावें। भक्तिवांचूनिया कवणें॥
यालागीं हरिभक्ति करावी आदरें। न्यूनकर्म संपूर्ण कीजे ईश्वरें।
केवळ कर्माग्रह निराधारें। सिद्धी नपवे कलियुगा॥
षट्कर्म युक्त भक्तिविहिन। तो विप्र श्वपचाहूनि हीन।
चतुर्वेदी वासुदेव नेणोन। बहिर्मुख मूर्ख पतित॥
वाचोनि पढोनि करी पाप प्रमाद। तया अन्तीं उपेक्षिती वेद।
दंभाचारवंतासि गोविंद। अंतरे महदंतरें॥
म्हणोनि अग्निहोत्र अगत्य ब्राह्मणा। अगत्य वेदाध्येन जाणा।
तैसी हरिकथा अगत्य नारायणा। प्रीतीतें पावावयातें॥

( ४ ) मुसलमानी राजसत्तेच्या संसर्गामुळें वर्णाश्रम धर्माचा लोप महाराष्ट्रीय जनतेंत होऊन विठ्ठलभक्ति विठ्ठलनाम स्मरण व विठ्ठलनाम संकीर्तन एवढाच उपाय कलीयुगांत मोक्षप्राप्तीचा शिल्लक राहिला आहे, असा उपदेश रामीरामदास उदयास येण्यापूर्वी वारकरी सांप्रदायी महाराष्ट्रिय समाजाचे हरिकथा निरूपणी पुढारी करीत आले होते. या उपदेशाचे योगानें वर्णाश्रमधर्मविहित आचार परिपालनाची अवश्यकता राहिली नाहीं, अशा प्रकारचा विपरीत समज महाराष्ट्रीय जनतेचा झालेला होता. रामीरामदास यांना भगवत् भक्तीचें महत्व जितकें वाटत होते तितकेंच महत्व त्यांना वर्णाश्रम विहित आचार परिपालनाचेंहि वाटत असे. यास्तव वरील विपरीत ग्रह नाहींसा करण्याकरिता महाराष्ट्रीय समाजांतील प्रत्येक व्यक्तीनें श्रुतीस्मृत्युक्त धर्माचारास अनुसरून वर्तन करणे अवश्य आहे, अशा प्रकारचा उपदेश रामीरामदासांनीं आपल्या ग्रंथात ठिकठिकाणीं केला आहे.

(५) मुसलमानी सत्ता महाराष्ट्रांत स्थापित झाल्यापासून संस्कृत भाषा व विद्या याचा बहुतेक लोप झाल्यासारखे झाले होते. यामुळें ब्राह्मणांपैकीं कित्येकांस वर्णाश्रम धर्माचे व आध्यात्माचे ज्ञान संस्कृत ग्रंथावरून करून घेणे दुर्घट झालें होतें. ब्राम्हणांखेरीज महाराष्ट्रांत इतर वर्णाच्या लोकांचा संस्कृत भाषा व संस्कृत वाङ्मय यांच्याशीं म्हणण्यासारखा परिचय कधीच झालेला नव्हता. वर्णाश्रम धर्म व अध्यात्म विषयक ज्ञानाचा प्रसार वरील लोकांमध्ये करण्याची अवश्यकता रामी रामदासांचे कालापूर्वी ३ दोनशे शतका पासून भासूं लागली होती. अशा प्रकारची वस्तुस्थिति असूनहि महाराष्ट्रीय समाजात अस्तित्वांत असलेले थोडेफार संस्कृतज्ञ पंडित प्राकृत भाषेंत ग्रंथरचना करणें गांवढळपणाचे व शिष्टाचाराविरुद्ध समजत असत. थेट ज्ञानेश्वरापासून जे जे महाराष्ट्रीय समाजाचे हरिकथा निरूपणी पुढारी होऊन गेले, त्यांनी प्राकृत भाषेंत ग्रंथरचना करण्याच्या प्रघाताचें समर्थन वरील कारणांमुळें केले आहे. रामी रामदासांनींहि ठिकांठिकाणी वरील कारणामुळें प्राकृत भाषेंत ग्रंथरचना करण्याचे बाबतींत समर्थन केलेले आहे. नमुन्या दाखल असल्या उद्गारापैकीं एक लहानसा उतारा आम्ही खालीं देतों.

पूर्वी विष्णुव्रतें वर्णिलीं । आतां शिवव्रतें आरंभलीं ।
तें परिवासी महाराष्ट्र बोलीं । प्रेम लक्षणीं विचक्षणीं ॥
येरव्हीं तरी प्रवीण । न सरे देश भाषेविण ।
श्रोते जे कां सर्व साधारण । ते सकळ सुखी व्हावे कीं ॥

वाचूनी मूळ अर्थ सांगावा । तरी देशभाषा आली गौरवा ।
केवळ मूळश्रवणें च मानवा । अर्थावबोध नव्हे कीं ॥
मूळश्रवणें पुण्य असे । हें ही देशभाषेस्तव भासे ।
जे देशभाषा प्रकाशक तेथें नसे । पुण्य हें काय घडो शके ॥
पुण्यदायक भगवत् कथा । तद्विषयीक जी पुण्य गाथा ।
भगवत् कथे वीण सर्वथा । संस्कृत काय पुण्यद ॥

रामीरामदासांच्या काळीं महाराष्ट्रीय समाजाची जी विशिष्ट परिस्थिति होती, तींत रामीरामदासांच्या ध्येयाचें स्वरूप कशा प्रकारचे होतें, याचें दिग्दर्शन वरीलप्रमाणें आम्हीं केलें आहे. आतां रामीरामदासांचे मतांप्रमाणें महाराष्ट्रातील आदर्शभूत व्यक्तीचें स्वरूप वर्णन त्यांनीं एके ठिकाणीं केलें आहे तें आम्ही खाली देतों. ( भ. र. पा. १४९ ):—

ऐसा देखोनि परमादर । सन्मार्ग उपदेशी करुणाकर ।
बैसऊनि सन्मुख योगेश्वर । बोलता झाला ॥ १२ ॥
श्रुतिस्मृति पुराणीं । वर्णाश्रम धर्म वर्णिले वाणी ।
ते आचरावे अंतःकरणीं । दृढभाव धरुनियां ॥ १३ ॥
सर्वदा चाल सन्मार्गीं । प्राणांतीं नको कुमार्गीं ।
देवाची आज्ञा वाहे जगीं । देवहेळन करूं नये ॥ १४ ॥
गो विप्र गुरु देवाचा । सेवक होई साचा ।
चांडाळा हि अतिथीचा । अव्हेर न करी सर्वथा ॥ १५ ॥
सत्याचें करावें संरक्षण । वाचूनि वाचवणें गो ब्राह्मण ।
देवस्व ब्रम्हस्व परस्व परस्त्रीरमण । याची तृष्णा तजी दूरी ॥१६॥
सत्कथा सदाचारी । सद्धर्मी सदा तृष्णा धरी ।
सदा सर्व संग्रहो करी । धर्मादिकाचा स्वयें ॥ १७ ॥
स्नान संध्या स्वाध्याय जप होम । गो देव अतिथि पूजितां सप्रेम ।
पितृतर्पणादिकीं सुकर्मीं धृतनेम । आलस्य कदा न करावा ॥१८॥
क्रोध द्वेष भय षठवृत्ति । पैशून्य कौटिल्य असत्संगति ।
दंभ उद्वेगादि कुस्थिति । वर्जावीया प्रयत्नें ॥ १९ ॥
क्षात्रधर्मीं हि अयुद्धें अहिंसा । युद्धीं हि शरणागत रक्षावा सहसा ।
शुष्क वर मिथ्याचार अपयशा । तजा स्वस्तुति परनिंदा ॥ २० ॥
मैत्री करावी सुजनया । दुःखितासीं करावी दया ।
प्रेम पुण्यवंत संग तया । उदासीनता कुबुद्धीसी ॥ २१ ॥
अत्याहार अतिक्रोध अतिनिद्रा ।

अतिश्रम अत्यालाप अतिक्रीडा महींद्रा ॥
मृगया द्यूत पान स्त्री स्त्रीजित दुर्विषय सुभद्रा ।
अत्यासक्ति यांची तजावी ॥ २२ ॥
अतिविद्या श्रद्धा अति । अतिपुण्य अतिख्याति ।
अत्युत्साह अतिस्मृति । अतिधैर्य धरावें ॥ २३ ॥
सकाम स्वस्त्रियेसी । सक्रोध स्वशत्रूसी ।
सलोभ पुण्यनिचयासि । अधर्मीसी औदास्य ॥ २४ ॥
सज्जनासि अतिप्रीति । पाषांडासी अप्रीति ।
दुर्बोध दुर्मंत्राप्रति । बधिरपर पैशून्यां ॥ २५ ॥
धूर्तलंड शठ क्रूर कितव खळ। पतित् नास्तिक अधम अमंगळ ।
यांचा संग त्यजावा तत्काळ । दूरतः परिवर्जावे ॥ २६ ॥
कुटुंब पुत्रवित्तात्यासक्ति । नसावी असावी सदां शिवभक्ति ।
पत्नि पतिव्रता माता गुरु श्वशुरोक्ति। यांचाविश्वास धरावा ॥२७॥
अनाथ कृपण वृद्ध स्त्री बाळ । यांचा करावा प्रतिपाळ ।
याचकासि द्यावें यथोक्त सकळ । कीर्ति यानें करावी ॥ २८ ॥
लक्ष्मी सत्कीर्त्ति संभव । पुण्य सत्कीर्तिस्तव ।
सत्कीर्ति शोभे गौरव । चंद्र जैसा किरणीं ॥ २९ ॥
मातापितागुरुकोप सहावे । पुत्रविप्रापराध न पाहावे ।
देशकाळशक्तियुक्तीनें करावें । सर्व कार्य सर्वदां ॥ ३० ॥
स्नान संध्यादि सुकर्मीं अत्वर । निद्रा स्वभोजनीं सत्वर ।
अनंतार्थगर्भ अल्पाक्षर । ऐसें वाक्य बोलावें ॥ ३१ ॥
गुरुअवज्ञा ब्राह्मणा पापासी । भीत असावें अहर्निसी ।
कुटुंबब्राह्मणपंक्ति भोजनासी । अवंचक असावे ॥ ३२ ॥
संत आणि सत्कथा । सद्धर्म आणि सत्पथा ।
विमुख न व्हावें सर्वथा । सन्मुख न व्हावें अधर्मा ॥ ३३ ॥
पुण्यदेशीं ब्रह्मकुळीं । वसावें शिवान्विती सुप्रेमळीं ।
गणिकाकामिककुटिळकुकर्मस्थळीं । न वसावें सर्वथा ॥ ३४ ॥
विप्र यति नियमी पुण्य तरुवर। पुण्य नदी पुण्य तीर्थमहत्सर।
धेनु वृष रत्न पतिव्रता सुरगृह सुर । सदा अभिवंदावे ॥ ३५ ॥
प्रातःकाळीं होता जागृत । नमस्काराया स्वगुरु उमाकांत ।
लक्ष्मीनारायण ब्रह्मी एकदंत । स्कंद कात्यायनी सरस्वति ॥३६॥
दिग्पाळ लोकपाळ । पुण्यश्लोक ऋषि निर्मळ ।
स्मरावे उदयभानुमंडळ । अवलोकुनि वंदावे ॥ ३७ ॥

फळ पुष्प गंध तांबूल । भक्षभोज्यादि भोगसकळ ।
शिवार्पण करूनि विमळ । मग आपण सेवावे ॥ ३८ ॥
दानधर्मादि सुकृत । शिवार्पण करावें समस्त ।
काळोचित जें जें स्वकृत । शिवस्मरणें शिवार्पणें ॥ ३९ ॥
रुद्राक्षाभरणालंकृताकृति । भाळफलकीं त्रिपुंड्र विभूति ।
सदां सदाशिव नामस्मृति । त्याचे चरण शिवाचे ॥ ४० ॥
असो ऋषभे सांगितलें सर्व धर्म । वर्जिले सर्व अधर्म ।
ते कवण वर्णिती आतां शिवमर्म । शिवकवच सांगतु ॥ ४१ ॥

शिवाजी महाराजांचा उदय होऊन स्वराज्यस्थापनेचा विशेष प्रकारचा उपक्रम सुरू होण्यापूर्वी रामीरामदासांची प्रौढावस्था पूर्ण झाली होती. महाराष्ट्रीय समाजाच्या परिस्थितिचें त्यांनीं जें निरीक्षण केलें, व त्यावरून त्यांनां त्या समाजाच्या अवनत स्थितांतून उन्नतावस्थेप्रत जाण्याचा जो मार्ग भासला, त्याचें दिग्दर्शन त्यांनीं आपले ग्रंथांत केलें आहे. महाराष्ट्रीय समाजाची संक्रमणावस्था सुरू होण्यापूर्वी रामीरामदासाखेरीज दुसऱ्या कोणत्याहि महाराष्ट्रीय समाजाच्या हरिकथा निरूपणी पुढाऱ्याचे विचार आपणास अद्यापपावेतों उपलब्ध झाले नाहींत. यास्तव रामीरामदासाच्या वर दर्शविलेल्या विचारांचें विशेष महत्व आहे व या कारणामुळेच आह्मी त्याच्या ध्येयासंबधीं जरा विस्तृत विवेचन केलें आहे. रामीरामदासानीं प्रदर्शित केलेल्या वरील विचारासंबंधी एक लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे की त्यांना महाराष्ट्रीय समाजाची जी अवनतावस्था दिसली, ती कलीयुगाच्या प्रभावाचा परिणाम असें त्यांनां वाटत असल्याचें दिसतें. मुसलमानधर्मीयांची राजसत्ता महाराष्ट्रांत प्रस्थापित झाल्याकारणाने महाराष्ट्रीय समाजास अवनत दशा प्राप्त झाली व यांची सत्ता नष्ट होऊन स्वराज्यस्थापना झाल्याखेरीज महाराष्ट्रीय समाजाची उन्नति व्हावयाची नाहीं, अशा प्रकारची मीमांसा रामीरामदासास भासल्याचें त्यांचें ग्रंथावरून अढळून येत नाहीं. आतां त्या काळच्या दुसऱ्या हरिकथा निरूपणी पुढाऱ्यांच्या ध्येयाच्या चर्चेकडे वळू. रामीरामदासाचे समकालीन महाराष्ट्रीय समाजाचें दुसरे नामांकित हरिकथा निरूपणी पुढारी ह्मटले ह्मणजे समर्थ रामदास स्वामी व तुकारामबोवा देहूकर हे होत. या दोन्ही पुढाऱ्यांच्या ध्येयाचे स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें याचें परीक्षण करण्याकडे आतां आह्मी वळतों. या दोन्ही हरिकथा निरूपणी पुढाऱ्यांच्या चरित्रासंबधीं बरीच विश्वसनीय माहिती आपणास उपलब्ध झाली असून त्यांनीं

रचलेलें पद्यरूपी वाङ्मय विस्तृत प्रमाणावर आपणास उपलब्ध झालें आहे. ही बाब लक्षांत घेतली असतां या दोन्ही महाराष्ट्रीय समाजाच्या हरिकथा निरूपणी पुढाऱ्यांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचे होतें हें निश्चित करणें फारसें कठीण नाहीं. श्रीसमर्थ रामदास स्वामी यांच्या चरित्राची ठोकळ रूपरेषा खालील प्रमाणें आहे. समर्थांचा जन्म गोदावरीचे कांठीं जांब गांवीं झाला. अगदीं अल्पवयांत लग्नसमारंभांतून ते पळून नाशिकनजीक पंचवटींत जाऊन राहिले. तेथे त्यानी बारा वर्षे खडतर तपश्चर्या केली. व त्यानंतर भरतखंडांतील निरनिराळ्या तीर्थांचे व क्षेत्रांचे दर्शन घेण्यांत घालविलीं. तीर्थाटन करून बारा वर्षांनंतर त्यांच्या वयाच्या छत्तिसाव्या वर्षी ते नाशिकास परत आले. तेथे कृष्णातीरीं जाण्याविषयीं श्रीरामचंद्रांचा त्यांना दृष्टांत झाल्यावरून ते कऱ्हाडनजीक मसूर गांवीं जाऊन राहिले. यापुढें चाफळ येथें श्रीरामचंद्राची स्थापना करून त्यांनी आपलें सर्व आयुष्य आपल्या सांप्रदायाचा प्रसार व वाढ सर्व भारतखंडभर करण्यांत घालविलें. शिवाजी महाराजाच्या स्वराज्यस्थापनेस प्रारंभ होऊन स्वराज्याचा विस्तार महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेर जसजसा होत गेला तसतसा समर्थ सांप्रदायाचा विस्तारहि होऊं लागला. उपलब्ध झालेल्या पुराव्यांवरून असें आढळण्यांत येतें कीं, मुसलमानी अमलाखालील प्रदेशांत स्वराज्य स्थापना होण्यापूर्वी त्या ठिकाणीं रामदासी सांप्रदायाचा प्रवेश व रामदासी मठाची स्थापना होत असे. ( श्री सांप्रदायिक विविध विषय भा. १५ वा पां. २००). रामदास स्वामींचे निरनिराळ्या ज्ञातींचे जवळ जवळ दोन चारशें शिष्य भरतखंडांतील निरनिराळ्या प्रदेशांत मठस्थापना करून राहिले होते असे उपलब्ध झालेल्या पुराव्यांवरून सिद्ध झालें आहे ( समर्थ प्रताप ग्रंथ पहा ). रामदास स्वामींच्या चरित्राचें व त्यांनीं केलेल्या कार्याचें स्थूल स्वरूप वर दर्शविलेल्याप्रमाणें आहे. या त्यांच्या चरित्राचा व कार्याचा त्यांनीं रचिलेल्या वाङ्मयांतील त्यांच्या उद्गारांसमवेत विचार करून त्यांच्या ध्येयाचें स्वरूप कशा प्रकारचें होतं हें आपणांस ठरविले पाहिजे. श्रीछत्रपती शिवाजी महाराजांच्या स्वराज्य स्थापना व विस्तार विषयक ध्येयाविषयीं चर्चा करित असतां त्यांचे समकालीन व गुरु समर्थ रामदास स्वामी यांनी त्यांच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयीं व्यक्त केलेला अभिप्राय आम्ही पूर्वी नमूद केलाच आहे. त्यावरून रामदास स्वामींच्या ध्येयाचें स्वरूप काय होतें हें दिसून येण्यासारखें आहे. छत्रपती शिवाजी महाराज व समर्थ रामदासस्वामी यांचा गुरु शिष्यसंबंध होता येवढी

एकच गोष्ट लक्षांत घेतली असता समर्थांचें ध्येय शिवाजी महाराजांच्या ध्येयाहून भिन्न स्वरूपाचें असणें संभवनीय नाहीं असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. परंतु नुसतें अनुमान करण्यापेक्षां प्रत्यक्ष पुराव्यांवरून हि हीच गोष्ट सिद्ध होण्यासारखी असल्याकारणानें आम्ही त्या पुराव्याचें या ठिकाणीं थोडक्यांत दिग्दर्शन करण्याचें ठरविले आहे. समर्थांचे काळापूर्वी सर्व महाराष्ट्रभर मुसलमानांचा अंमल अडीचशें तीनशें वर्षें अस्तित्वांत होता. उत्तरेकडील मुसलमान राजकर्त्यांवर हिंदु प्रजेस जाच देण्याचे बाबतींत दक्षिणेकडील मुसलमानी राजकर्त्यांनी ताण केला होती. “ दिल्लीपती यानें हिंदु राजाचे महामुळे बहुत धर्मोच्छेद केला नाहीं, परंतु सहा यवनांनीं फार अमर्यादा केली, ते ईश्वरास न साहे ” या प्रकार मल्हार रामराव चिटणीस यानें त्या काळच्या मुसलमानी राजकर्त्यांच्या जुलमाचें चित्र रेखाटलें आहे. समर्थांच्या खालील सुप्रसिद्ध उक्तींत हाच अभिप्राय व्यक्त केला आहे:—

तीर्थे क्षेत्रें मोडिलीं । ब्राह्मणस्थानें भ्रष्ट झालीं ।
सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥
देवधर्म गोब्राह्मण । करावया संरक्षण ।
हृदयस्थ झाला नारायण । प्रेरणा केली ॥

मुसलमानी राजकर्त्यांच्या अमलाखालीं महाराष्ट्रीय जनतेची स्थिति कशा प्रकारची झाली होती याचें उत्तम चित्र समर्थांच्या खालील ओंव्यांत काढिलें आहे.

( श्रीसांप्रदायिक विविध विषय भा. १५ पा. १३९ )

पदार्थमात्र तितुका गेला । नुस्ता देशची उरला ।
येणें करितां बहुतांला । संकट जालें ॥
लोकें स्थान भ्रष्ट जालीं । कितेक तेथेंची मेलीं ।
माणसा खावया नाहीं धान्य । आंथरुण पांघरुण तेंही नाहीं ।
घर करावया सामग्री नाहीं । काय करिती ।
कितेक अनाचारीं पडलीं । कितेक यातिभ्रष्ट जालीं ॥
कितेक तें आक्रंदलीं । मुलें बाळें ॥
ऐसें झालें वर्तमान । पुढेंही अवघा अनमान ।
सदा दुश्चित अवघे जन । उद्वेगरुपी ॥
अद्यापी दुश्चिन्हें दिसती । दुष्ट ग्रह आडळती ।
पुढेंही वाईट सांगती । कितीएक ॥

**कांहींच पाहतां घड नाहीं । विचार सुचेना कांहीं ।**
**अखंड चिंतच्या प्रवाहीं । पडिले लोक ॥**

या प्रकारची महाराष्ट्रीय जनतेची स्थिति समर्थ उदयास येण्यापूर्वी झाली होती. अशा प्रकारच्या परिस्थितींत समर्थांना कोणत्या प्रकारचा ध्यास लागला होता या संबंधाचे उद्गार आपणांस आढळल्यास ते फार महत्त्वाचे असून त्यांवरून समर्थांचे ध्येयाचे स्वरुपाबद्दल आपणांस यथायोग्य कल्पना करितां येणार आहे. समर्थ रामदास स्वामींना अहर्निशीं खालीं दर्शविलेला ध्यास लागल्याचें वर्णन एके ठिकाणीं केलेलें आढळतें ( श्रीसांप्रदायिक विविध विषय भा. १५ पा. १८२ )

**श्रीगुरु समर्थ एकांतीं बैसती । प्रांतींचे लोक दर्शनास येती ।**
**सकळ प्रांतींचा स्वामी परामर्ष घेती । चिंता करिती विश्वाची ॥**
**देशकाळ वर्तमानें । आपण चिंताग्रस्त होतीं मनें ।**
**ह्मणतीं केसीं वांचतील जनें । कैसीं ब्राह्मणें राहतील ॥**
**कैसीं क्षेम राहील जगतीं । कैसीं देव देवालयें तगतीं ।**
**कैसें कुटुंब वत्सल लोक जगती । कोणीकडे जातील हे ।**

अशा प्रकारची मनःस्थिति रामदास स्वामींची झाली होती. अशा स्थितींत महाराष्ट्रीय जनतेने कोणत्या मार्गानें आपली उन्नती करून घ्यावी या बद्दल समर्थांनीं अनेक ठिकाणीं उपदेश केला आहे. त्यावरून समर्थांच्या ध्येयाचें स्वरूप आपल्या सहज लक्षांत येण्यासारखें आहे. एतद्विषयीं समर्थांचे काहीं ठळक व महत्त्वाचे उद्गार आम्ही खालीं देतो:—

**परंतु हो प्रपंची अथवा निस्पृह । तेणें वैराग्ययुक्त असावें निःसंदेह ॥**
**वर्णाश्रमधर्मकर्म समूह । प्राणांतीही न सोडिजे ॥**
**अहर्निशीं करावी रामभक्ति । वर्णाश्रमधर्माच्याचिया युक्तीं ॥**
**श्रीराम उपासनेची अभिव्यक्तीं । केलीच करावी नीशंक ॥**
**जितुकी गोष्ट मुखें बोलावीं । तितुकी क्रिया करूनी दाखवावी ॥**
**सक्रिया उत्तरोत्तर चालवावीं । धर्म शास्त्र विचारेंसीं ॥**
**करावें वेदपारायण । शास्त्रचर्चा अध्यात्म निरुपण ॥**
**कां तें श्रीरामगुणानुवादकीर्तन । यथासांग करावें ॥**

( श्रीसांप्रदायिक विविध विषय भा. १५ पा. ८६ )

वरील ओव्या अत्यंत महत्त्वाच्या असून समर्थांचें ध्येय त्यांत उत्तम प्रकारें दिग्दर्शित झालें आहे असें कोणास हि कबूल करणें प्राप्त आहे. दुसरें

एक ठिकाणीं समर्थानी संसारी जनांना उपदेश केला आहे त्यावरूनहि त्यांचें ध्येय कोणत्या प्रकारचें होतें हें स्पष्ट होत आहे:—

स्नान संध्या टिळेमाळा । अंतर्निष्ठ उपासना ।
नित्यानित्य विवेकानें । धन्य संसार होतसे ॥
मर्यादा न्याय नीतिची । अन्याय न घडे कदा ।
सन्मार्ग योग देवाचा । धन्य संसार होतसे ॥
देवालयें सोस्वरें रम्यें । धर्मशाळा परोपरीं ।
परत्र साधका लोकीं । धन्य संसार होतसे ॥
अन्नोदकें वस्त्रदानें । धन्य धन्य ब्रह्मणीं भजे ॥
उदास वृत्तीनें लोकीं । धन्य संसार होतसे ॥
बावीं सरोवरें टाकीं । मठ वृक्ष परोपरी ।
उपकार समस्ते लोकां । धन्य संसार होतसे ॥
पराचें जीवींचें जाणें । अस्ति नास्ति विचारणा ।
अत्यंत सर्व भूतांसि । धन्य संसार होतसे ॥
कदापि सत्य सोडीना । नित्य नेमस्त बोलणें ।
वोढतो बहुतां लोकीं । धन्य संसार होतसे ॥
होम याग पुरश्चरणे । निरुपणें हरिकथा ॥
ब्रह्मसंतर्पणें यात्रा । धन्य संसार होतसे ॥
वेद पारायणें चर्चा । पुराणें महात्मे शुभे ॥
नित्य उत्छाव देवाचा । धन्य संसार होतसे ॥
नवविधा भक्ति देवाची । मुख्य कोण विचारणें ।
अध्यात्म शोधितां सर्वे । धन्य संसार होतसे ॥
पंचीकरण महावाक्यें । श्रवणें, मननें सदा ।
सत्संगें निसंग होतां । धन्य संसार होतसे ॥

महाराष्ट्रीय समाजांतील संसारी माणसांनीं व्यक्तिदृष्ट्या कोणतें ध्येय आपल्यापुढें ठेवून तें आचरणांत आणावें असे विषयींचा समर्थांचा अभिप्राय वरील ओंव्या वरून स्पष्ट दिसून येत आहे. श्रुतिस्मृत्युक्त धर्मास अनुसरून आचरण, नवविधा भक्ति, पंचीकरण महावाक्यांचें श्रवण मनन, सत्संग, विवेक, विचार, परोपकार, होमयाग, पुरश्चरणें इत्यादि संसारी व्यक्तीच्या वर्तनाची महत्त्वाचीं अंगे समर्थांच्या समजुतीप्रमाणें होतीं. कोणत्याहि मानवी समाजांत संसारी जनता हीच केव्हांहि झालें तरी बहुसंख्याक असावयाची हें उघड आहे. समर्थांच्या काळच्या महाराष्ट्रीय समाजांतील बहुसंख्याक जनतेस वरील प्रमाणें

आचरण करण्याचा ज्याअर्थी समर्थांनीं उपदेश केला आहे त्याअर्थी वरील बाबींचा महाराष्ट्रीय समाजांत पुरस्कार होऊन त्यांचा प्रसार व्हावा हें समर्थांचें ध्येय असलें पाहिजे हें उघड आहे. महाराष्ट्रीय समाज ब्राह्मणादि चातुर्वर्ण्य विशिष्ट पद्धतीस अनुसरून बनला असल्या कारणाने या समाजांतील विशिष्ट वर्णांच्या लोकांचें ध्येय समर्थांच्या मताप्रमाणें कोणत्या स्वरूपाचें असणें अवश्य आहे या संबंधीं हि प्रस्तुत स्थलीं चर्चा करणें जरूर आहे. शिवाजी महाराजांना समर्थांनीं पाठविलेल्या पत्रांतील ज्या ओव्यांचा मागें उल्लेख करण्यांत आला आहे त्या ओव्यांत ' धर्मस्थापनेची कीर्ति सांभाळली पाहिजे ' असा इशारा समर्थांनी छत्रपती शिवाजी महाराजांस दिलेला अत्यंत महत्त्वाचा असून लक्षांत ठेवण्यासारखा आहे. राजधर्म प्रकरणांपैकीं खालील ओव्यांवरून महाराष्ट्रीय समाजांतील निरनिराळ्या वर्णांच्या लोकांचें वर्ण विशिष्ट ध्येय कोणत्या स्वरुपाचें असावें हें स्पष्ट होत आहे:—

रायांनीं करावे राजधर्म । क्षत्रीं करावें क्षात्रकर्म ।
ब्रम्हणीं करावें स्वधर्म । नाना प्रकारें ॥
देवमात्र उच्छेदिला । जित्यापरीस मृत्युभला ।
आपुला स्वधर्म बुडविला । ऐसें समजावें ॥
मराठा तितका मेळवावा । आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा ।
ये विषयीं न करितां तकवा । पूर्वज हांसती ॥
देवद्रोही तितुके कुत्ते । मारूनी घालावे परते ।
देवदास पावती फत्ते । यदर्थीं संशय नाहीं ॥
देव मस्तकीं धरावा । अवघा हलकल्होळ करावा ।
मुलूख बडवा कां बुडवावा । धर्म संस्थापनेसाठीं ॥
विवेक विचार सावधपणें । दीर्घ प्रयत्न केलाची करणें ।
तुळजावराचेनि गुणें । रामें रावण मारिला ॥
अहो हे तुळजाभवानी । प्रसिद्ध राम वरदायिनी ।
रामदास ध्यातो मनीं । यन्निमित्त ॥

वरील उद्गारांवरून हि समर्थांच्या ध्येयाचें स्वरूप स्पष्ट होत आहे. धर्म संस्थापनेसाठीं महाराष्ट्रीय समाजांतील कोण कोणत्या वर्णांच्या लोकांनीं कोण कोणतीं कर्मे करावीं व धर्मसंस्थापनेचें कार्य कोणत्या पद्धतीनें पार पाडावें याचा खुलासा वरील ओव्यांत समर्थांनीं स्पष्टपणें केला आहे. समर्थकृत आनंदवन भुवन या नांवाचें एक प्रकरण

।सिद्ध आहे. ( श्रीरामदासांची कविता प्र. खंड पा. ४२१ ). या प्रकर्णात शेवाजी महाराज निजधामास गेल्यानंतर कोणकोणत्या गोष्टी घडून येतील ।।विषयींचें समर्थांनीं केलेलें भविष्य वर्णन केलें आहे. हें वर्णन फार मार्मिक भसून समर्थाच्या ध्येयाच्या स्वरूप निश्चितीचे दृष्टीनें फार महत्त्वाचें अस- याप्रकारणाने त्यांतील थोडा महत्त्वाचा भाग आम्ही खालीं देतों:—

हिंडतां फिरतां गेलों । आनंदवनभुवना ।
हे सा देखिली दृष्टी । किती कल्लोळ ऊठीले ॥ ८ ॥
विघ्नः प्रार्थिलें गेलों । आनंदवनभुवना ।
स्वध आड जें विघ्न । तें तें सर्वत्र ऊठीलीं ।
लाटिलीं कूटीलीं देवें । दापिलीं कापिलीं बहु ॥ ९ ॥
विघ्नाच्या ऊठिल्या फौजा । भीम त्यावरी लोटला ।
घर्डिली चिर्डिली रागें । रडविलीं बडविलीं बळें ॥ १० ॥

... ... ... ... ...

कल्पांत मांडला मोठा । म्लेंच्छ दैत्य बुडावया ।
कैपक्ष घेतला देवीं । आनंदवनभूवनीं ॥ २७ ॥
बुडाले सर्वही पापी । हिंदुस्तान बळावलें ।
अभक्तांचा क्षयो झाला । आनंदवनभूवनीं ॥ २८ ॥
पूर्वी जे मारिले होते । तेंची आतां बळावलें ।
कोपला देव देवांचा । आनंदवनभूवनीं ॥ २९ ॥
त्रैलोक्य गांजिलें मागें । ठाऊकें विवेकी जना ।
कैपक्ष घेतला रामें । आनंदवनभूवनीं ॥ २० ॥
भीमचि धाडिला देवें । वैभवें धाव घेतली ।
लांगूळ चालिलें पुढें । आनंदवनभूवनीं ॥ २१ ॥
येथूनी वाढला धर्मु । रमाधर्म समागमें ।
संतोष मांडला मोठा । आनंदवनभूवनीं ॥ २२ ॥
बुडाला औरंग्या पापी । म्लेंच्छ संहार जाहाला ।
मोडलीं मांडली छेत्रें । आनंदवनभूवनीं ॥ २३ ॥
बुडाले भेदवाही हे । नष्ट चांडाळ पातकी ।
ताडिले पाडिले देवें । आनंदवनभूवनीं ॥ २४ ॥
गळाले पळाले मेले । जाले देशधडी पुढें ।
निर्मळ जहाली पृथ्वी । आनंदवनभूवनीं ॥ २५ ॥

उदंड जाहले पाणी । स्नानसंध्या करावया ।
जप तप अनुष्ठानें । आनंदवनभूवनीं ॥ २६ ॥

... ... ... ... ...

नाना तपें पुरश्चरणें । नानाधर्म परोपरीं ।
गाजली भक्ति हे मोठी । आनंदवनभूवनीं ॥ ३७ ॥
लिहिला प्रत्ययो आला । मोठा आनंद जाहला ।
चढता वाढता प्रेमा । आनंदवन भूवनीं ॥ ३८ ॥
बंड पाषांड उडाले । शुद्ध अध्यात्म वाढले ।
रामकर्ता रामभोक्ता । आनंदवनभूवनीं ॥ ३९ ॥
देवालयें दीपमाळा । रंगमाळा बहू विधा ।
पूजिला देवदेवांचा । आनंदवन भूवनीं ॥ ४० ॥
राम वरदायिनी माता । गर्द घेऊनी ऊठिली ।
मर्दिले पूर्विचे पापी । आनंदवनभूवनीं ॥ ४१ ॥
प्रतेक्ष चालिली राया । मूळमाया समागमें ।
नष्ट चांडाळ ते खाया । आनंदवनभूवनीं ॥ ४२ ॥
भक्तांसि रक्षिलें मागें । आतांही रक्षितं पहा ।
भक्तांसि दीधलें सर्वै । आनंदघनभूवनीं ॥ ४३ ॥
आरोग्य जाहाली काया । वैभवें सांडिली सीमा ।
सारसर्वस्व देवाचें । आनंदवनभूवनीं ॥ ४४ ॥
देव सर्वस्व भक्तांचा । देव भक्त दुजे नसे ।
संदेह तुटला मोठा । आनंदवनभूवनीं ॥ ४५ ॥
देव भक्त एक जाले । मिळाले जीव सर्वही ।
संतोष पावले तेथें । आनंदवनभूवनीं ॥ ४६ ॥
सामर्थ्य येश कीर्तिची । प्रतापें सांडिली सीमा ।
ब्रीदेंचि दीधली सर्वै । आनंदवनभूवनीं ॥ ४७ ॥
रामकर्ता रामभोक्ता । रामराज्यभूमंडळीं ।
सर्वस्व मीच देवाचा । माझा देव कसा म्हणों ॥ ४८ ॥
वेदशास्त्र धर्मचर्चा । पुराणें महात्में किती ।
कवित्वें नूतनें जीर्णें । आनंदवनभूवनीं ॥ इत्यादि ॥ ४९ ॥

ज्या मुसलमानांच्या सत्तेखाली महाराष्ट्रीय जनता गांजून जाऊन अत्यंत दीन व दुबळी झाली होती त्या जनतारूपी समाजात स्वराज्यस्थापना झाल्यानंतर कोणकोणत्या गोष्टी प्रामुख्यानें उदयास येऊन वृद्धिंगत पावल्या, याचें बहारीचें वर्णन वरील ओव्यांत समर्थांनीं केलें आहे. वरील ओंव्या वाचल्या

असतां कोणत्याही वाचकाचें मनावर जी एक गोष्ट प्रामुख्यानें ठसल्यावांचून राहणार नाहीं ती ही कीं, श्री दाशरथि रामचंद्राचे काळीं ज्या दैत्यांचा त्यांनीं संहार केला होता तेच दैत्य समर्थांचे काळीं हिंदुस्थानांत बळावून पूर्वीच्या दैत्यांप्रमाणेच अघोर कर्में त्यांनी करण्यास सुरवात केली व त्यांचा संहार करण्याकरिता दाशरथि रामाने अवतार घेऊन त्यांचें निर्दळण करण्याचें एक मोठें कार्य केलें अशी समर्थांची भावना होती. या मूलभूत कल्पनेच्या दृष्टीनें शिवाजी महाराजांनीं महाराष्ट्रांत स्थापित केलेलें स्वराज्य हेंच रामराज्य असें समर्थांना वाटे. हें स्वराज्य अथवा रामराज्य महाराष्ट्रांत स्थापित झाल्यानंतर स्वधर्मा आड जीं जीं विघ्नें उठलीं होतीं तीं सर्व विलयास जाऊन स्वधर्मांत म्हणजे अर्थात्च श्रुतिस्मृत्युक्तधर्मांत अंतर्भूत होणाऱ्या खालील बाबी अस्तित्वात आल्या. मोडलेल्या क्षत्राचा जीर्णोद्धार झाला, स्नानसंध्यादि कर्में, जपतप अनुष्ठानें, तपें, पुरश्चरणें, देवालयें, दीपमाळा, वेदशास्त्र, धर्मचर्चा, पुराणें, महात्मे नूतन कवित्वें इत्यादि बाबी महाराष्ट्रांत अस्तित्वात येऊन जोमास लागल्या, व अशा रीतीने सर्व महाराष्ट्रीय समाजात सुख, आनंद, संतोष, आरोग्य सामर्थ्य, यश व कीर्ति यांची सीमेच्या पलीकडे वाढ झाली. समर्थांच्या ध्येयाचें स्वरूपाविषयीं आता पर्यंतो नमूद केलेला पुरावा व त्यासंबंधीं केलेली चर्चा लक्षांत घेतली असतां यासंबंधीं अधिक चर्चा करण्याचें प्रयोजन काहीं राहिले आहे असे आम्हास वाटत नाहीं. तथापि एक दोन महत्त्वाच्या मुद्यासंबंधीं समर्थांचीं मतें कोणत्या प्रकारचीं होतीं याचें दिग्दर्शन करणे जरूर आहे असे आम्हांस वाटतें. समर्थांनीं सद्गुरूचीं लक्षणें एके ठिकाणीं खालीं लिहिल्याप्रमाणें सांगितलीं आहेत.

( श्रीसांप्रदायिक विविध विषय भा. १५ पा. ९८ )

**म्हणोनी ज्ञान वैराग्य आणि भजन । स्वधर्म कर्म आणि साधन ।**
**कथा निरूपण श्रवण मनन । नीति न्याये मर्यादा ॥**

श्रुतिस्मृतिप्रणीतवर्णाश्रमधर्माप्रमाणें स्ववर्णाचें जे आचरण असेल त्याप्रमाणें सद्गुरूने अवश्य वागलें पाहिजे असा समर्थांनीं आपला अभिप्राय स्पष्टपणें नमूद केला आहे.

आतां समर्थ शिष्यांपैकीं एक दोन प्रमुख शिष्यांचें समर्थांच्या ध्येयाचें स्वरूपाविषयींचे अभिप्राय आम्ही खालीं देतों समर्थ शिष्य हरिहर यांनी समर्थांचे काळची महाराष्ट्रीय समाजाची स्थिति खालीं लिहिल्याप्रमाणें वर्णन केली आहे:-

**कलिचेनि योगें धर्म तो राहिला । अधर्म चालीला बहुसाल ।**
**शैव आणि शाक्त आगमादि जाण । आचरती जन बहुधा ते ।**
**शाब्दें ब्रह्मज्ञान बोलती सुंदर । होतीं शिश्नोदर परायण ।**
**आंगीं नाहीं पाहतां वैराग्याचा लेश । वरीवरी वेष मिरविताती ॥**
**कर्माचा तो लोप जनीं करऊन । यथेष्टाचरण करताती ॥**

अशा प्रकारची स्थिति महाराष्ट्रीय समाजाची झाली असतां समर्थांनीं महाराष्ट्रीय जनतेची उन्नति करण्याकरितां:—

**दासबोध ग्रंथ केला पैं सुगम । वारिला तो भ्रम अज्ञानाचा ।**
**निस्पृहार्चा चिंता समर्थें वारली । कामधेनु दिल्ही सीधी हातीं ॥**
**ठायीं ठायीं ठाणीं देवें बसविलीं । भाविकें लाविलीं भक्तिमार्गा ।**

असें हरिहरानें वर्णन केलें आहे. प्रत्येक वर्णाच्या व्यक्तीनें श्रुतिस्मृति प्रणीत वर्णाश्रमधर्मास अनुसरून स्वकर्म करावें व ज्ञान वैराग्य आणि भक्ति संपादन करावी अशा प्रकारचें ध्येय आपल्यापुढें ठेवावें अशी समर्थांची अपेक्षा होती. ज्या मुसलमानी सत्तेच्या योगानें महाराष्ट्रीय समाजांतील वर्णाश्रमधर्म व्यवस्था लुप्त होऊन नष्ट होण्याचे मार्गास लागली होती तिचें पुनरुज्जीवन करून त्या व्यवस्थेनुरुप स्वधर्माचरणी लोक महाराष्ट्रांत निर्माण व्हावे हे समर्थांचें ध्येय होते ही गोष्ट वरील पुराव्यांवरून व चर्चेवरून स्थापित होत आहे. आतां समर्थांचे समकालीन महाराष्ट्रीय समाजाचे दुसरे हरिकथा निरुपणी पुढारी जे तुकारामबोवा देहूकर त्यांच्या ध्येयाच्या स्वरुपाविषयीच्या चर्चेकडे आतां आपण वळू. तुकाराम बोवांचीं एक दोन चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत व त्यांवरून त्यांनीं आपलें आयुष्य कोणत्या कार्याकडे खर्च केलें याची कल्पना येण्यासारखी आहे. याशिवाय तुकारामबोवांचे जें विस्तृत अभंगरूपी वाङ्मय प्रसिद्ध झाले आहे त्यावरूनही त्यांच्या ध्येयाचे स्वरूप निश्चित करतां येण्यासारखें आहे. प्रथम तुकाराम बोवांच्या चरित्राचा विचार करूं. ज्ञानेश्वर कालापासून महाराष्ट्रांत उदयास आलेल्या वारकरी अथवा पंढरपूर येथील श्रीविठ्ठलाच्या भक्तिसांप्रदायांपैकीं हे एक प्रमुख संत होते. या सांप्रदायरूपी मंदिराचा कळस तुकाराम बुवांनीं चढविला असें एके ठिकाणीं त्यांनीं वर्णन केलें आहे. यावरून तुकाराम बोवांचें जें ध्येय तेंच समष्टीदृष्ट्या वारकरी सांप्रदायाचें ध्येय होतें असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. तुकारामबोवा यानीं आपले सर्व आयुष्य श्रीपांडुरंगाचें उत्कटत्वानें भजनपूजन करण्यांत घालविलें. त्यांची नीतिमत्ता अत्यंत श्रेष्ठ प्रकारची होती. श्रीपांडुरंगाचीं

समरस होण्यासाठीं त्यांनीं आपल्या संसाराची राख रांगोळी करण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं. स्वतःच्या आत्मिक उन्नतिकरितां याप्रकारचें आचरण करित असतां त्यांनीं महाराष्ट्रीय जनतेच्या कल्याणाची अवहेलना केली असें घडलें नाहीं. भजन कीर्तन द्वारा महाराष्ट्रीय जनतेस अध्यात्माचा व नीतिचा उपदेश करण्यांत त्यांनीं आपलें सर्व आयुष्य वेचलें. तथापि समर्थ रामदास स्वामी-प्रमाणें त्यांनीं शेंकडो शिष्य तयार करून त्यांच्या करवीं महाराष्ट्रांत व भरत खंडांतील इतर प्रांतांत मठस्थापना करण्याचा व आपल्या सांप्रदायाच्या तत्त्वांचा प्रसार करण्याचा खटाटोप केला नाहीं. आतां तुकाराम बोवानीं निर्माण केलेल्या अफाट अभंगरूपी वाङमयाचें स्थूल दृष्ट्या अवलोकन करूं. तुकाराम बोवांनीं स्वतः रचलेल्या एका अभंगांत त्यांचें लक्ष अध्यात्म मार्गा-कडे कसें लागलें याचें वर्णन केलें आहे. महाराष्ट्रीय समाजांतील त्या काळच्या लाखो व्यक्तींपैकीं तुकाराम बोवा ही एक सामान्य व्यक्ति होती. परंतु अध्या-त्माकडे त्यांचें लक्ष लागल्यानंतर लाखो व्यक्तींत न आढळणारें असें अध्या-त्मिक श्रेष्ठत्त्व त्यांनीं संपादन केलें. अध्यात्मउन्नतीचा मार्ग आक्रमित असतां ज्या निरनिराळ्या अवस्थेतून ते गेले त्या निरनिराळ्या अवस्थेतील त्यांच्या मानसिक स्थितीचें प्रतिबिंब त्यांनीं केलेल्या अभंगरूपी वाङमयांत पडलेलें आहे. तुकाराम बोवांच्या अभंगरूपी वाङ्मयाचा बराचसा भाग या स्वरूपाचा आहे. याशिवाय नाम व भक्तिमाहिमा वर्णनपर त्यांचें अभंगरूपी वाङ्मयही बरेंच आहे. महाराष्ट्रीय जनतेंत वावरणाऱ्या निरनिराळ्या प्रकारच्या दंभाचा स्फोट करून सणसणीत भाषेंत त्यांचा निषेध ज्या अभंगांत केला आहे, व ज्यांत शुद्ध नीतिचा मार्ग लोकांस दर्शविला आहे अशा प्रकारचे शेंकडों अभंग तुकाराम बोवांनी रचिले आहेत. असल्या अभंगावरून तुकाराम बोवांच्या ध्येयाचें स्वरूप कशा प्रकारचें होतें याची कल्पना सहज करितां येण्यासारखी आहे परंतु यापेक्षाही त्यांच्या ध्येयाच्या स्वरूपाच्या दृष्टीनें मह-त्त्वाचे अभंग म्हटलें म्हणजे कलियुगमहिमा, जनास उपदेश इत्यादि विषया-संबंधाचे होत. प्रस्तुतकाळीं महाराष्ट्रीय समाजात समाज सुधारकांचा जो पंथ अस्तित्वांत आला आहे त्यांपैकीं कित्येक प्रमुख लेखकांनीं तुकारामबोवांची शिकवण समाजसुधारणा पुरस्कर्त्यांच्या शिकवणीसारखी होती म्हणजे त्यांना वर्णाश्रमधर्मव्यवस्था पसंत नव्हती त्याचप्रमाणें या धर्माचें परिपालन महा-राष्ट्रीय समाजातील चारी वर्णांच्या व अठरा पगड जातीच्या लोकांनीं करणें

हें त्यांचें कर्तव्य आहे असें त्यांस वाटत नसे एक फक्त विठ्ठलभक्ति व विठ्ठलनामस्मरण केले की पुरे झाले असें त्यांचें मत असल्याचें प्रतिपादन केलें आहे. असल्या प्रकारच्या प्रतिपादनाच्या योगानें तुकारामबोवांच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयीं बराच गैरसमज उत्पन्न झालेला आहे. अशा स्थितींत त्यांच्या ध्येयाच्या स्वरूप निश्चितीचें दृष्टीनें त्याचे अभंगांपैकीं कांहीं निवडक वेंचे आम्ही खालीं देत आहोंत. वरील प्रस्तावनस्वरूपां जे विचार आम्ही प्रदर्शित केले आहेत ते विचार व खालील वेंचे यांचा समवेत विचार करून तुकारामबोवांच्या ध्येयाचें स्वरुप कशा प्रकारचें होतें हें ठरविणें योग्य होईल. मुसलमानी सत्तेच्या संसर्गानें वर्णाश्रमधर्माचा बिघाड कसा झाला होता व ब्राह्मण वर्णाच्या लोकांची स्थिति कशाप्रकारची झाली होती याचें चित्र तुकारामबोवांनीं खालील अभंगांत काढिलें आहे:—

झालीं होन शाची बना । करिती लेंकींच्या धारणा ।
ऐसे धर्म झाले कळीं । पुण्य रंक पाप बळी ॥ २ ॥
सांडिले आचार । द्विज चाहाड जाले चोर ॥ ३ ॥
टिळे लपविती पातडीं । लेती विजारा कातडीं ॥ ४ ॥
बैसोनिया तक्तां । अन्नाविण पीडिती लोकां ॥ ५ ॥
मुदबख लिहिणें । तेल तुपावरि जिणें ॥ ६ ॥
नीचाचे चाकर । चुकलियां खाती मार ॥ ७ ॥
राजा प्रजा पीडी । क्षेत्री दुश्चित्तासी ताडी ॥ ८ ॥
वैश्य शूद्रादिक । हे तों सहज नीच लोक ॥ ९ ॥
अवघे बाह्यरंग । आत हिरवे वरी सोंग ॥ १० ॥
तुका ह्मणे देवा । काय निद्रा केला धावा ॥ ११ ॥

( आवटे गाथा पा. ३३४ )

——— xxx —— —

मागें संतीं होतें जें जें सांगितलें । तें येऊं लागलें अनुभवा ॥
आचार भ्रष्ट होती लोक कळीं । पुण्य क्षीण बळी झालें पाप ॥
वर्ण धर्म कोणी न धरी विटाळ । घालिती गोंधळ एके ठायीं ॥
वेदाचे पाठक सेविती मद्य । न देखती भेद विपर्यी भांड ॥
तुका ह्मणे किती करावे फजित । नेणों छंद नित्य बहु होती ॥

वर्णाश्रमधर्माची महती तुकाराम बोवांना किती वाटत होती हें वरील अभंगावरून स्पष्ट होत आहे. देवा, तूं निजला आहेस तो जागा हो आणि महाराष्ट्रांतील चातुर्वर्णीय समाजाची अवनत झालेली स्थिति सुधारण्याकरितां धांव ठोक अशा रीतीनें

तुकाराम बोवांनीं देवास आळविलें आहे. वर्णाश्रमधर्माविरुद्ध आचरण करणाऱ्या व्यक्तींची फटफजिती करण्यास तुकारामबोवा कधींही मागें घेत नसत असें वरील अभंगावरून स्पष्ट दिसून येत आहे. अशा प्रकारचे उद्गार आपल्यापुढें असतां वर्णाश्रमधर्माची महती त्यांना वाटत नसे व तो धर्म बुडविण्याचा त्यांनीं उपदेश केलेला आहे असें विधान करणें शुद्ध वेडगळपणाचे होईल.

वरील दोन अंभगांपेक्षांही सरस असा तुकारामबोवांचा दुसरा एक कलिप्रभावर्णनपर अभंग आहे. त्या अभगांत वर्णाश्रमधर्माच्या दृष्टीनें कित्येक बारीक बारीक बाबींचा उल्लेख करण्यांत आला असल्याकारणानें तो आम्ही जशाचा तसाच खालीं देतों.

पहा हो कलीचें महिमान। असत्यासीं रिझले जन ॥
पापा देतां अनुमोदन। करिती हेळण संतांचें ॥
ऐसें अधर्माचें बळ। लोक झकविले सकळ ॥
केलें धर्माचें निर्मूळ। प्रळयकाळ आरंभला ॥
थोर या युगाचें आश्चर्य। ब्रह्मकर्म उत्तम सार ॥
सांडुनिया द्विजवर। दावलपीर स्मरताती ॥
ऐसे यथार्थाचे अनर्थ। झाला बुडाला परमार्थ ॥
नाहीं झाली ऐसी नीत। अहा भूत पातले ॥
शांति क्षमा दया। भाव भक्ति सत्क्रिया ॥
ठाव नाहीं सांगावया। सत्व धैर्य भंगिलें ॥
राहिले वर्णाश्रमधर्म। अन्योन्य विचरती कर्म ॥
म्हणवितां रामराम। श्रम महा मानिती ॥
येरे भांरपाचे विषीं। धांवती भूतें आमिषा तैसीं ॥
कथा पुराण म्हणतां सिसी। तिडीक उठी न कऱ्याचे ॥
विषयलोभासाठीं। सर्वांथैसीं प्राण सोडीं।
परमार्थी पीठ मुठीं मागतां उठती सुनीसी ॥
धनाढ्य देखोनी अनामिका। तयास मानिती अवश्यक ॥
अपमानेले वेदपाठक। सात्विक शास्त्रज्ञसंपन्न ॥
पुत्र ते पितयापाशीं। सेवा घेती सेवका ऐसी ॥
सुनांचिया दासी। सासा झाल्या आंदण्या ॥
खोटे झाले आले विवसी। केली मर्यादा नाहींशी ॥
भार्या भ्रतारासी। रंक तैसी मानिती ॥
नमस्कारावया हरिदासा। लाजती धरिती कांहीं गर्वसा ॥

पोटासाठीं खौसा । वंदिती मलिंछाच्या ॥
बहुत पाप आलें उचंबळ । उत्तम न म्हणती चांडाळ ॥
अभक्ष भक्षिती विटाळ । कोणी न धरी कोणाचा ॥
कैसें आलें नष्ट वर्तमान । एकादशीस खाती अन्न ॥
विडे घेऊनी ब्राह्मण । अविंद वाणी वदताती ॥
कामिनी विटंबिल्या कुळवंती । वदनें दासींचीं चुंबिती ॥
सोंवळ्याच्या स्फिति । जगीं मिरविति पवित्रता ॥
मद्यपानाची सुराणी । नवनीता न पुसे कोणी ॥
केळवती व्यभिचारिणी । दैन्यवाणी पतिव्रता ॥
केवढी दोषाची सबळता । झाली पाहा हो भगवंता ॥
पुण्य धुडावोनी संता । तीर्था हरी आणिली ॥
भेणें मंद झाली मेघ वृष्टि । आकांतली कांपे सृष्टि ॥
देव रिगाले कपाटीं । आटाटी प्रवर्तली ॥
अपीक धान्यें दिवसें दिवस । गायी म्हसी चेवल्या गोरसें ॥
नगरें दिसतीं उध्वंसें । पिकलीं बहुवसें ॥
होम हारपलीं हवनें । यज्ञ याग अनुष्ठानें ॥
जप तपादि साधनें । आचरणें भ्रष्टलीं ॥
अठरा वार्तांचा व्यापार । करिती तस्कराई विप्र ॥
सांडोनिया शुद्ध शुभ्र । वस्त्रें निळीं पांघरतीं ॥
गीता लोपली गायत्री । भरले चमत्कार मंत्री ॥
अश्वाचिये परी । कुमारी विकती वेदवेत्ते ॥
वेदाध्ययन संहिता रुचि । भकांद्या करिती तयांची ॥
आवडी पंडितांची । मुसाफावरी बैसली ।
मुख्य सर्वोत्तम साधनें । तीं छेदोनि केलीं दीनें
कुडी कापट्यें महामान्यें । मिरविताती दुर्जनें ॥
कळा कुशळता चतुराई । तर्कवादी भेद निंदेठाई ॥
विधी निषेधाच्या वाही । एक ही ऐसीं नाडलीं ॥
संन्यासी तापसी ब्रह्मचारी । होतां दिगांबर निस्पृही ॥
कामक्रोधें व्यापिलें भारी । इच्छेंकरी न सुटती ॥
कैसें विनाश काळाचें कौतुक । राजे झाले प्रजांचे अंतक ॥
पित पुत्र सहोदर एका एक । शत्रुत्वातें वर्तती ॥
केवढी ये रांडचि आंगवण । भ्रमविले अवघे जन॥
याती अठराचारी वर्ण । कर्दम करून विटाळले ॥

पूर्वी होतें भविष्य केलें। संतीं तें यथार्थ झालें ॥
ऐकत होतों तें देखिलें। प्रत्यक्ष लोचनीं ॥
आतां असो हें आघवें। मती नव्हे कळीमध्यें वावरावें ॥
देवासी भाकोनि करुणारवें। वेगें स्मरावें अंतरीं ॥
अगा ये वैकुंठनायका। काय पाहतोसी या कौतुका ॥
धांव कळीनें गांजिलें लोकां। देतो हांका सेवक तुकयाचा ॥

( आवटे गाथा पा. ३३१ )

वरील अभंगावरून तुकारामबोवांचे काळीं वर्णाश्रम धर्मव्यवस्था महाराष्ट्रीय समाजांत किती हीन दशेप्रत पोहोंचली होती व श्रुतिस्मृत्युक्त धर्माच्या विधिनिषेध रूपी आज्ञांचे विरुद्ध सर्व वर्णांचे लोक कशा प्रकारचें आचरण करीत असत हें स्पष्टपणें दिसून येत आहे. तुकारामबोवांचे मनात हा प्रकार पाहून अत्यत खेद व संताप उत्पन्न होत असे. सबब त्यांनी वैकुंठनायकास मोठ्या काकुळतीनें आळवून हें कौतुक देवा तूं काय पाहतोस ! कलीनें गांजलेल्या या मानवी समाजास त्याच्या कचाटींतून सोडीव व वेदाविषयीं आदर, यज्ञयाग व जपतप इत्यादि साधनें करण्याची प्रवृत्ति, धर्माच्या विधिनिषेधरूपी आज्ञास अनुसरून आचार व न्याय नीति इत्यादि बाबींचा उदय महाराष्ट्रीय समाजांतील लोकांचे ठिकाणीं लौकर होऊं दे अशा प्रकारची विनवणी केली आहे. समष्टीदृष्टया महाराष्ट्रीय समाजाचें ध्येय तुकारामबोवांचे मताप्रमाणें कोणत्या स्वरूपाचें होतें हें वरील अभंगावरून स्पष्ट होत आहे. महाराष्ट्रीय समाजांतील चारी वर्ण, व अठरा जातीच्या लोकांपैकीं प्रत्येक व्यक्तीनें कोणत्या प्रकारचें ध्येय साध्य करावें या विषयीं तुकारामबोवांचे कांहीं निवडक अभंग आम्ही खालीं देतों:.

वेदविहित तुम्हीं ऐका हो कर्में। बोलतों तीं वर्में सतांपुढें।
चारी वर्ण झाले एकाचिये आंगीं। पापपुण्यभागीं विभागिलें।
प्रथम पाऊलीं पावविला पंथ। आदि, मध्य, अंत भेद नाहीं।
आंबे, बोरी, वड, बाभूळा, चंदन। गुणा गुणीं भिन्न अन्नो एक।
तुका म्हणे मन उन्मन जों होय। तोंवरी हे सोय विधी पाळी।

( आवटे गाथा पान ३६० )

जों पावेतों मन उन्मन झालें नाहीं तों पावेतों प्रत्येक व्यक्तीनें वेदविहित कर्मास अनुसरून आचरण केलें पाहिजे असा स्पष्ट अभिप्राय तुकारामबोवांनी वरील अभंगांत नमूद करून ठेविला आहे:—

ऐक रे जना तुझ्या स्वहिताच्या खुणा ।
पंढरीचा राणा मनामाजीं स्मरावा ।
मग कैंचे रे बंधन । वाचे गाता नारायण ।
भवसिंधू तो जाण । येची तीरीं सरेल ।
दास्य करील कळीकाळ । बंद तुटेल माया जाळ ।
होतील सकळ रिद्धिसिद्धि । म्हणीयारी ।
सकळ शास्त्रांचें सार हें वेदांचें गव्हर ।
पहातां विचार । हाचि करिती पुराणें ।
ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र । चांडाळाहि अधिकार ।
बाळें नारी नर । आदि करोनी वेश्यांही ।
तुका म्हणे अनुभवें । आम्ही पाडियलें ठावें ।
आणिकही दैवें । सुख घेती भाविकें ।

मोक्षप्राप्तीचा सुलभ मार्ग सर्व वर्णाच्या व जातींच्या लोकांस तुकाराम बोवांनीं वरील अभंगांत दर्शविला आहे. वरील तीन शिवकालीन नामांकित हरिकथा निरुपणी पुढाऱ्यांखेरीज महाराष्ट्रांत चिंचवडचे मोरया देव, रंगनाथ-स्वामी निगडीकर, जयरामस्वामी वडगांवकर, केशवस्वामी भागानगरकर व आनंदमूर्ति ब्रम्हनाळकर असे महाराष्ट्रीय समाजाचे नामांकित हरिकथा निरु-पणी पुढारी त्या काळीं अस्तित्वांत होते. चिंचवडचे मोरया देव खेरीज करून बाकीच्या हरिकथा निरुपणी पुढाऱ्यांस त्या काळीं समर्थपंचक असे लोक म्हणत. समर्थांनीं चालविलेलें कार्य ज्या ध्येयाच्या सिध्यर्थ त्यांनीं सुरुं केलें होते, तेंच ध्येय वरील हरिकथा निरूपणी पुढाऱ्यांची समर्थपंचकांत गणना होत असल्या कारणानें त्यांचेंहि असलें पाहिजे असें अनुमान करण्यास हर-कत नाहीं. शिवाजीमहाराजांचे पश्चात् महाराष्ट्रीय समाजाचे अनेक हरिकथा निरूपणी पुढारी होऊन गेले. स्वराज्यस्थापनेद्वारें स्वधर्म स्थापना शिवाजी महाराजांचे कारकीर्दीत झाल्यानंतर महाराष्ट्रधर्माचें परिपालन व त्या धर्मास अनुसरून आचरण महाराष्ट्रीय जनता करूं लागल्यानंतर हरिकथानिरूपणी पुढाऱ्यांस महाराष्ट्रधर्माचा उपदेश विशेष जोरानें करण्याचें कांहीं प्रयोजन उरलें नाहीं. मराठी साम्राज्य लयास जाई तोंपर्यंत महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांत कित्येक हरिकथा निरूपणी पुढारी उदयास आले, व त्यांनीं स्वतःच्या वर्तनानें श्रुतिस्मृत्युक्तधर्मास अनुसरून आचरण करण्याचें महत्त्व महा-राष्ट्रिय जनतेवर ठसविण्याचा प्रयत्न केला. अशा पुरुषांचा महाराष्ट्रीय समाजांतील

सर्व ज्ञातींचे राजकारणी पुढारी परामर्श घेत व त्यांचा योगक्षेम चालवीत असत. शिवकालीन महाराष्ट्रीय समाजाच्या प्रमुख हरिकथा निरुपणी पुढाऱ्यांच्या ध्येयाच्या स्वरुपाविषयींची चर्चा येथें पुरी करून आतां महाराष्ट्रीय समाजातील सामान्य प्रतीच्या लोकांच्या मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेच्या व विस्ताराच्या ध्येयाच्या स्वरुपाविषयींच्या कल्पना कोणत्या स्वरूपाच्या होत्या या विषयाच्या चर्चेकडे आम्ही आतां वळतों:—

## मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेच्या व विस्ताराच्या ध्येयाच्या स्वरुपाविषयींच्या महाराष्ट्रीय व महाराष्ट्रियेतर सामान्य जन यांच्या कल्पना

शिवाजी महाराजांनीं जें स्वराज्य स्थापन केलें व ज्याचा विस्तार त्यांच्या पश्चात् महाराष्ट्रांतील राजकारणी पुढाऱ्यांनीं केला तें स्वराज्य स्थापन करण्यांत त्यांचें ध्येय कोणतें होतें याविषयींच्या महाराष्ट्रांतील व महाराष्ट्रियेतर प्रांतांतील सामान्य लोकांच्या कल्पना कोणत्या स्वरुपाच्या होत्या याविषयींची चर्चा करण्यापूर्वी शिव पूर्वकालीं मुसलमानी सत्तेच्या संसर्गानें महाराष्ट्रीय समाजावर कोणत्या प्रकारचे परिणाम घडले होते याचें एक उत्तम चित्र तत्कालीन एका सामान्य प्रतीच्या महाराष्ट्रीयानें काढलेलें आपणांस उपलब्ध झालेलें आम्ही आमच्या वाचकास सादर करतो. महाराष्ट्रधर्मस्थापना हेंच ध्येय सर्व प्रकारच्या महाराष्ट्रीयांचे कां बनलें गेलें यांची उपपत्ति या चित्रावरून चांगली होण्यासारखी आहे. ज्या ग्रंथांतील चित्र आम्ही वाचकांस सादर करणार आहोंत त्याचे नांव "वंशपद्धति" असें आहे. सबंध ग्रंथ वाचला असतां ठाणें कोंकण प्रांतांतील महाराष्ट्रीय समाजाचें शिवपूर्वकालाचें हें चित्र आहे असें म्हटलें असतां वावगें होणार नाहीं. या लेखाचे शेवटीं खालील उल्लेख आहे. "हें सर्व केशवाचार्य हस्ताक्षर वंशपद्धति या संमति पूर्ण झाली संवत १५०५ व श्रीराजेंद्रचक्रचूडामणि शालिवाहन शके एकसहस्त्र व तीन वरुषे सत्तर माहे फाल्गुन वसंत ऋतौ. हा संप्रदाये महालजापूर्वी मिळोन महजर सर्वांसि दिधले." अगदीं लेखाचे शेवटीं खालील उल्लेख आहे:—

"शके १७४१ प्रमाथी नाम संवत्सरे माहे वैशाख शु. १ रविवासरे ते दिवशीं वंशावळी लेख समाप्त. हस्ताक्षर वालजी पाटील सिंधे शेषवंशी वस्ती वसई बहादरपुरा हे वंशावलीची पोथी राजश्री हिराजी रामजी राऊत सेंधे शेषवंशी वस्ती वसई बहादरपुरा यांची असे. पत्रें सुमारें ६९. वरील दोन्ही उल्लेखांवरून ही वंशपद्धति प्रथम शके १२७० सालांत केशवाचार्यानें

लिहिली, त्यानंतर शके १७४० सालांत- मूळ लेखावरून अगर मूळ लेखाच्या नकलेवरून प्रस्तुतचा लेख बालजी पाटील सिंधे शेषवंशी यानें स्वहस्तें लिहिला असें दिसतें. एकंदर वंशावली वाचली असतां हा लेख प्राचीन आहे याबद्दल संदेह राहत नाहीं. या वंशपद्धतींत ठाणे कोंकण प्रांतांतील राजकीय उलथा पालथीचे स्थूल परिणाम दिले असून श्रुति स्मृत्युक्त धर्माच्या दृष्टीनें त्या प्रांतांतील महाराष्ट्रीय जनतेवर मुसलमानी राजकीय सत्तेचे कोणत्या प्रकारचे परिणाम घडले होते याचें उत्तम चित्र एका सामान्य महाराष्ट्रीयानें रेखाटलें आहे. त्या काळच्या समाजस्थिती बद्दलच्या सामान्य प्रतीच्या महाराष्ट्रीयाच्या कल्पना कोणत्या स्वरूपाच्या होत्या व त्यावरून कोणतीं अनुमानें निघतात याची चर्चा करण्यापूर्वी वंशपद्धतींतील एक विस्तृत परंतु महत्त्वाचा उतारा आम्ही देतोः—

जुने झाले आज पावेतंवं । हिसाब पाहतां बिंब प्रारंभापासुन वरुषें तीनसें जालि या मध्य हें राज्य कुळखल्लक ॥ सैनिक ॥ ईनामक ॥ सर्व रईत ॥ अजम सेक आलावदिनाचि जालि ॥ या उपर देसामध्यें तेहि बहुत यवन जाले ॥ राज्य अभिमान सांडिला शस्त्रे सोडिलीं कृषि धरिली सोमवंशी ॥ कारकोणी गावखोती ॥ ताडमदिरेस उदिम धरिला सिंधि ॥ कांहिक असतां धरोन आपली वतने ॥ कांहीक सेवा करूं लागले ॥ कांहींक नष्टले ॥ बहुत आचारहिन जाले ॥ बहुत गोत्र प्रवर कुळस्वामिण कुळगुरु ठिकाणें सांगतां विसरू लागले ॥ जाणोन देवीने धर्म महाराष्ट्र रक्षाया कारणें राजश्री नायकोरायास स्वप्न दिल्हें जर हा जातिमेळवा करावा आम्हास ब्राह्मणांस भूदेव प्रसिद्ध ॥ जाणोन ही मेळवावे तर हा आशिर्वाद आमचा । श्रीदेवि आद्य शक्ति जगदंबिका ॥ माहाराष्ट्र धर्म रक्षिका ॥ तुम्हा सुप्रसन्न असो श्रीरस्तु ॥ हा आशिर्वाद आयिकोन केशवाचार्यांचे वचन ॥ स्वधर्म रक्षणार्थ श्रीदेवीचें स्वप्न.



जे जे जयांचे आद्य पुरुष आले तयाचे नामापासुन ज्या पेढ्या भरल्या या देशिं व जीं घरें जाली यकापासून येकक तयांचीं नांवें आद्यकरून व किती घरें वंशिक कोठें कोठें तयास ठिकाणवास काय उद्यम पोटभरि करिता घेतला तो । कैसा आचार करावा ॥ काये व्रत अचरावें ॥ कोण वृत्ति वर्तवें ॥ उदरपूर्तीस कोण वेव्हार करावा ॥ लग्न विवाह सोहिरिका कोण कोण गोतिं संपादा-

व्या ॥ कोणाचि कोण्ही आणावी । कोण्हास कोण्ही द्यावी जैसें हे देसामध्यें संपादते तैसे येथे यथानीतिन संपादावे ॥ अपेश उणें वंशास येऊं न द्यावे ॥ अकर्म जाले म्हणजे सत्वर कुळगुरुस सांगावे ॥ तो सर्वा स्वकुळ-मंडळिक त्यांस श्रुत करिल ॥ जर हें येथे अनृत्य यकापासून घडले तर यथाशास्त्र धर्ममार्ग कर्मकांड जो ज्या कर्मास प्रायेश्चित घटे तें तीर्थविध साधार्शी ॥ प्रायेश्चित या रीतीने घ्यावे ॥ येवढा देवदंड ॥ येवढा राज्यदंड ॥ येवढा जातिदंड ॥ देवदंड किदबा तीर्थविध कर्मयुक्त ब्रम्हभोज्य गोदान गुरुपुजा अलंकारभूषण ॥ राज्यदंडा कीदबा ॥ जे ग्रामि कर्म वर्तलें तेथें जे ब्राह्मण अतित अभ्यागत आगातुक त्यांस राजा आपले सत्तेंकरून त्याचा विभाग शास्त्र संमत प्रमाणें तो यांप्रति धर्म करावितो ॥ जाति दंड किदबा ॥ जातिस विभाग द्व्य येईल त्याप्रमाणें कोण्हि भुभुक्षित वृद्ध ॥ किंवा मृत्यु सुतक ॥ विध्वा अवळा अनाश्रय तयेस ॥ कीं उपवारि तयेस की ग्रहतटाक ॥ कुप व पंच ब्राह्मण भोजन या रिती जे द्रव्य येईल त्याचा व्यय अध्यान संपादावा व आध्यान जाति वर्गाचें तयाहि समागमीं भोजन सपादावें ॥ यास पाच ब्राह्मण भोजन वैश्वदेव साक्षसी ॥ हा अनुक्रम पुरुष वृद्ध ॥ त्या पासुन ज्या पेढ्या मरल्या त्या व तयाचे गोत्र ठीकाणी वतन तेथिचे राजदत्त प्रवर कुळस्वामिण कुळधर्म कुळगुरु येसि खते वर्णवार्णि गोत्र गोर्ति महझर लेहोन सर्व अनुक्रमे सपुर्ण पंडिती वाचून सर्वास आयेकउन नूतन कांहीं नाहीं पुरातन सत्य प्रमाणिक लेहोन सर्व सासष्ट महझर एकेक कुळाचे करून अवघ्यांहीं रुजु साक्षेसीके प्रमाणक ॥ वाचोन समस्ता मान्याधिकारी जे ज्या ज्या कुळाचे तयास दिधले ॥ त्याहि शिरी वंदून गणपतिपुजन करोन आपले पासी ठेविलें ॥ येसी खते महजर ॥ नायको रायाचें प्रसादें सर्वास जालीं ॥ ते समई हे वंशपध्यातिलेखा संमत देऊन वेदमूर्ति विप्रकुळिं ब्राह्मणसंख्या पांचसे एकवीस मुख्य मुख्य ॥ मुख्य धोंडि नायक तथा आंव नायेक ॥ याहि समस्त विप्र मेळा यांसि स्वमुखे म्हणितले जे तुम्ही सर्व वृत्तिवंत वृत्ति चालविता अद्याधिकार तुम्हांस आहेत ॥ तर नुतन राज्य समागमिचे विप्र ॥ व पुरातन या देशिचे स्थळगुरु यजुर्वेदी गोवर्धन ॥ व गंधर्विक तर याम सत्ता स्थळिं घटिका ॥ पाटाः अंत्रपटः गोदान मोक्षः पुजनमात्रः कर्म कर्मादिक याहि संपादावि यांस हे सत्ता स्थळगुरुत्वाची हे कोणाच्यान अमान्य करवत नाहीं, व जे अमान्य करतील व वृत्तिलोप

करितील तरि कर्ता व करविता उभये येमपुरीस जातील ॥ जे ज्या स्थळिंचे स्थळगुरु त्यास त्या स्थळिं लोक वसती त्यांहीं त्याचे हस्ति कर्मे संपादावीं ॥ निर्विकल्प तर तीं कर्मे उत्तम सांग होतिं ॥ नाहिं तर अकर्मदोष पदरीं पडे ॥

**कां जे समई शंकराचार्य उप्तन्न झाले श्री जगद्गुरु धर्म माराष्ट्राचे षोडश कर्माधिकारी ॥ महादेवाचे अवतार ॥ कलयुगांत प्रगटला कारण ॥**



दोघांचा आदळ जाला ॥ श्रीविक्रमादित्य शालिवाहन हस्ते मृत्य पावला ॥ कांहीं मध्यें काळ क्रमल्या उपर देविशापें शालिवाहन अश्वारुढ समुद्रिं प्रवेशले ॥ छत्रपतिपद वरुणावति राज्याधिकारी जैदेवराणा यास पद ॥ असे देशोदेशि राजे आपले राज्य धरोन आहेत ॥ यैसे असतां मध्यें लोहोकें ॥ श्रावक जती ॥ नानक पंथ ॥ माबरीपंथ ॥ रुमिपंथ ॥ तुरकी ॥ महमदी ॥ ब्रह्मी ॥ इसाई ॥ सिस्नछेदक ॥ कर्णछेदक ॥ सर्वभक्ष ॥ तात्रिक-पद्धत ॥ ऐसि मेदिनी यांहीं वरुष शता १२ मध्यें व्याप केला ॥ फार अनाचार प्रवर्तला ॥ विप्रांस । देवांस । विरोधी । बहुत जन भष्टविले ॥ ऐसें असतां श्रीमाहादेव धर्मरक्षीण करंडाकोल्हापुरी । अवतार घेतला ॥ वादि लोहोकें । श्रावके । जती । जिनले । अकामें त्यास जितले ॥ पण केला होता जर जो हारेल तयास तेलाचे कढयेत टाकावें ॥ सोम आपा ॥ राजयाचे मद-सित घटांत सर्प कोण्हा न कळतां घालुन आछादिला होता ॥ राजा लोहोक्या याहि वस्य केला होता ॥ येक राणि द्विजाकडे व कांहीं प्रजा ॥ सेवट वृत्ति द्विजांचि बुडावी ॥ ऐसा पण झाला । राज्यान म्हणितले जर जो तुम्हां उभ यतां मधुन या घटामध्यें जे वस्तु आहे तें प्रसिद्ध नांवें सांगेल व काढुन या प्रजेस दाखविल तो वृत्तिचा अधिकारी ॥ व त्याचें रुप ईश्वरि ॥ तो आह्मांस मान्य ॥ हें राजवचन सर्वांस मानले ॥ वेत्रकरि विप्रांसि । व लोहिकियांसि सांगितलें । तर लोहिकीं विप्रांस ह्मणितले जर तुह्मी भूदेव । वृत्तिवंत । पुरातन । विद्येची सत्ता अभिमान वेदशास्त्रपारायण तर हे वृंद आजपावे तंव सांगतां त्याचि प्रचित आज खरि करा ॥ हें वचन आइकोन जोतिषि विध्र लग्न पाहतां ॥ अंधयोग जाणून फार चिंता वर्तलि । आपले मंडळिकी विचार करुन दाहा दिवसाचे आवधिन सागुं ॥ हा जाब दिधला ॥ तो रायास व सर्वांस मानला ॥ विप्रांस आज्ञा केली ॥ येर समस्त येकनेमें देविद्वारि येऊन उपोषणिं बैसले ॥ तेथें सदा उपोषणें होतां शंकराचार्य अवतार उप्तन्न

जाला ।। त्याणे सर्व विप्रवर्गास अस्वासन दिधलें ।। दाहावे दिवसी आपण समागमें सर्व ब्राह्मणसमुदायि वेदध्वनि करित राजसभा प्रवेशले ।। राजे आज्ञें करुनि समस्ती प्रणाम्य करोन बैसकार विप्रांस दिधला ।। विप्रीं वेदघोष श्रुक्तआशिर्वचनिं संपादिला ।। घट शंकराचार्ये नेत्रि अवलोकिला ।। वेत्रधारि पुन्हा मजकूर केला ।। ते समइं शंकराचार्ये म्हणितले जर लोकि प्रथम ह्या सभेंत जे घटांत आहे त्याचे प्रगट उच्चार करावा + + + + +

ऐसें दंडस्थानि केले बहुत राजे शंकराचार्ये श्रुद्ध केले ।। स्वधर्मि रक्षिले ।। ब्राह्मणवृत्ति स्थापिल्या !। वर्णावर्ण भेदभेद निराळे ' अनुमत्ते वैदिक कर्म विप्रांसि ।। पौराणिक मंत्र व्याशोक्त क्षेत्रियासी ।। तांत्रिक पद्धत श्रुद्रादि करोन इतर ज्ञाति अष्टादशपर ।। लोमक ।। प्रलोमक ।। क्षतार ।। यास ब्राह्मण वचनि कर्म तें मान्य ।। ते शब्दि देविरुप तयास मानावें ।। ब्राह्मणहस्ते पूजा पार्थिव ।। विष्णुः शिवः सूर्यः गणपतिः अंबा घटः यत्रः ब्राह्मणहस्ते पूजाविधः करावीः पूजा आराध्य दैवतांचि संपूर्ण मंत्रपुष्पांजुलि संपादुन ब्राह्मणपुजन करावें ।। आमान्य दक्षणादान सकप्र सोडून ।। विप्रचरण अगुष्टोदक तीर्थ घेऊन प्रहस्ते अभिवंदन करावें ।। सर्वग्रहि संप्रदात्रित्रीआच्मनि सर्व शुद्ध होती ।। येक मासाचे प्रायश्चित टळे विप्रोदकि ।। सामासाचे प्रायश्चित जाये स्थळगुरुचरणोदकें ।। संवत्सराचें प्रायश्चित जाये कुळगुरुचरणोदकें तीर्थगुरुची तीर्थमहिमा ।। स्थळगुरुची स्थाळे महिमा ।। कुळगुरुची सर्वत्र महिमा ।। जाणुन कूळगुरुस न विसरावें ।। तयास बहुत मान्य असे...........

तर सत्यमेव आयिकाल तर शैय्याद्रिखंडिचे संमते शास्त्राचे आधारें श्री शंकराचार्य जगद्गुरुहि जे कर्म स्थापिलें असे यावत् श्वेतबंद रामेश्वरा पासुन यावत् काशि व द्वारका श्री तुळजापुर परियंत मध्यें देश पुण्यक्षेत्र देवांचि दशाव तारिक जागा माहाराष्ट्रधर्माचें स्थान ।। केटी तीर्थांचे महिमान ।। येथें हा धर्म कलकी नारायण अवतार धरिल ।। तेथ पर्यंत राहिल ।। दुसरे देश केवळ म्लेंच्छमयें होती ।। ब्राह्मण पंचायतनाचें नांव विसरती ।। येऊन याहि देशि मिसळती ।। व या धर्माचा द्वेष करितील ।। कित्येक आपले त्याचप्रमाणें होतिल ।। यास्तव धर्म सुगम शास्त्रधरिकांस स्थापिला तो सर्व आयिका चित्त देऊन ।। पश्चम देशिं गुजराथ प्रांति खबैत परियंत उत्तर हिंदुस्थान राठवड देश घेतला ।। या रीतिन ते राजे सूर्यसोमवंशि ब्रह्मक्षेत्रिं परब्रह्म उत्पन्न तयाचे वांशि जाणुन ब्रह्मक्षेत्रि म्हणिजे ।। तयांचा नेम कुकुट शब्दापासोन उठावें ।।

शौच्य स्नान संपादावें। देवपुजन नित्यकर्म आचार्यसंयुक्त पंचब्राह्मणसंयुक्त भोजन नैवेद्य ब्राह्मण उचिष्ट धर्मनितिशास्त्रअनुमत्तें पंडितमुखीं न्याय संपादावा ॥ हा खटोटोप करायास पुराण प्रत्यहि आयकावें ॥ अैशा प्रसंगि यवन आपुले समुदायिं युद्ध करावयास संनिध होउन काविर्त्रे करून हेर काढुन ॥ या अैशा प्रसंगि राज्यास मारावे व राज्य हिरोन घ्यावे ॥ यैसें करून बहुत देश नेला व आपला केला ॥ हें पाहुन दुसऱ्या राज्याहि आपले पुरोहितीं मजकुर केला जर आचार्य आपुले हस्तीं पुजाविध संपादुन श्रेय राजयांस घ्यावें ॥ साहस हस्त मुस्तेद होउन आपुले मंडळिकी मिळोन भोजन संपादावें ॥ येक मात्र स्नान ॥ खुणेस यज्ञोपवित ॥ राणे ॥ ठकरः सिंगः इत्यादिकीं शस्त्र कमर बांधुन भोजनास बैसावें ॥ येसा नेम केला ॥ ते समइं म्लेंछाचे तयांसि चालत नाहिं ॥ मागें बहुत युद्धें संपादिलीं ॥ म्लेछ तहास आणिलें ॥ परंतु दिलिपतितख्त तयांचे हस्तिं पडले ॥ तेधवां तह जाला जर रजपुत्रांचि कन्या यनवास द्यावि ॥ वामअंगुष्ट कुंकुमतीळा सवा फत्तेसिंगि राज महाराज नाम तया कुळिं त्याहि करावा ॥ ते समई तो छत्रधर सार्वभौमनाम तयास॥ या रिती उभय राज्य येक मात्त वर्तु लागलि ॥ ऐसा संकळित मात्र स्वज्ञां ॥ कां जर बहुत देशदेशिंच्या कथा लीहितां फार विस्तार होईल ॥ यामध्यें बहुत पेढ्या तुर्कांच्या गुजरल्या ॥ यैसे प्रसंगि धर्म शंकराचार्यें रक्षिला ॥ श्रींगेरीस मठ बांधिला ॥ दुसरा मा संप्रदाय मठ स्थापना श्रीपाद कनोजि ब्राह्मण मठाधिकारी व धर्मरक्षणार्थ शंकर अवतारि दक्षण प्रांति राहिले॥ कानडा रामराजा॥ कुदुबशा तयाचा पाळेकर॥ असतां दैवि इच्छा पंच वरुणामध्ये वैर उत्पन्न होतां,नवा लक्षाचे सैनिक समागमें असतां, तया हस्ते मृत्यु जाहला ॥ सेवट ठिकाणे ठिकाणीं जे जेथें होते ते राज्य अधिकारि जाले ॥ यैक्षा बहुत कथा वर्तल्या ॥ सर्व देश बहुत राजे जाले ॥ ते शाहाणव कुळिंचे ॥ तुव्हेरि भोसले ॥ चव्हाणः जाधवः घोरपडेः दाहाबाडेः काबरेः बुधलेः कवाडः इत्यादिक जागोजागि पाटलिकाः देसमुख्याः वतनदार जमीदारः ठीकाणदारः ते तयाचे मंडलिक राजेच जाले ॥ या आपले देशिं देसायेः पाटेलः चौधरिः वतनदारः इजारदार, महालदारः कुळाविः कुळुबिः म्हतारेः. च्रवघलेः साहाणेः ऐसें रीतिन उध्यर्मी ॥ ताडः माडः सरा काढायास राउत सिंधे पौकें आचार धरिला ॥ कितिक कडुः म्हातारेः पाटेलः चौधरिः चोरघेः ठाकुरः परभुः ऐशा नव कुळ्या हा उदिम धरिला ॥ नीमित्यां यां शस्त्रधारियांस कबिले वाढले ॥ उपार्जित थोडि ॥

समुदायखर्चिस वतनें न पुरत । याकरितां हा उद्योम धरिला ॥ कौळी: सवे: सावे: चूरि: चौधरि: राउत: वर्तक: म्हातारे देसमुक: नायक: भोईर: माळी: या बारा कुळ्या ॥ याहि वाडि । मळेकेचा उदिम धरिला ॥ कोळाय: सिला-यचे कुळिचे यांहि सिद्धिक उदिमि आणिक दुसरे मध्ये प्रवेशले ॥ पुरो: राणे: दरणे: प्रभु यांहि कारकोनमत्त धरिलें ॥ शेषवंशि बहुत कुळें सोमवंशि ॥ देशले: म्हतारे: नायका: रुत: राउत: चौधरि: पाटिल: वर्तक: पुरो: ठाकुर: साण्हे: कौळि: माळी: सुतार: दरणे: पुरो: यांतहि असत ॥ यैस्या या कुळया ॥ या संमति कृपि धरिली ॥ हा संप्रदाय निराळा जाला ॥ सेति संप्रदायें निराळा: ॥ कांसार संप्रदाय निराळा ॥तांबट॥ पोगार: निराळे: ॥ लोहार: गाडघडे: निराळे ॥ बाहारे निराळे: ॥ मांस निराळे: ॥ वैति निराळे: ॥ कोळि सोन कोळि निराळे ॥ ढोरकोळि निराळे ॥ आगरि खुम निराळे ॥ खारु निराळे ॥ डोखळे निराळे ॥ सर्वा वर्णा वर्ण नट: भाट: बुरुड: चर्मक: अत्यज जाति या सर्वे माराष्ठ ॥ सर्वास ब्राह्मण श्रेष्ठ ॥ वर्णभेद ॥ गोताचि कर्म भिन्न ॥ वर्तणुक आचार भिन्न ॥ पहिरात्र: भुषणें भिन्न ॥ भाषा भिन्न ॥ भीन्न भीन्न देशिचे देशाचार आहेत ॥ वशाचार आहेत ॥ वेद शास्त्राचार आहे ॥ ता श्रेष्ट व कुळाचार देशाचार श्रेष्ठ ॥ श्लोक ॥ स्वधर्मे परमं श्रेष्ठ परधर्मो भयावहः ॥ ऐसें हें भगवद्गीतेचे वचन ॥ ते असे जर आपाआपले धर्मि असावे ॥ गुरुवाक्यें गुरुसे मानावे ॥ देव गुरुरुपें सर्वा संरक्षिता । सुखदेता । दुष्कर्म दुरकरिता । अंति सायुज्यतामुक्तीदेता । तरि हा धर्म सर्व धर्माचा जोव ॥ मुळ धर्म माराष्ट ॥ स्नान गुरु उपदेश मंत्र जप प्रत्याहि करावा ॥ जे गुरु पुरुष्या सांगेल त्याप्रमाणें सूर्यास नमस्कार सूर्यव्रत आचरावे ॥ विशेषे करून सूर्यवंशीं व सोमवंशीं गणेशचतुर्थी संकाष्ट यथा नेमें कराव्या ॥ शेषवंशि सोमवारव्रत माहादेवाचे करावें ॥ कुळस्वामिणी तिथी यथा नेमें उपोषण ब्राह्मण हस्तें पुजन तयांस अमान्य दक्षणा द्यावो ॥ कामिक व्रतें आचरावीं ॥ वार्षिकी नवचंडिका उपोषणें करावीं ॥ घटस्थापना ब्राह्मणभोजनें घालावीं ॥ जातिभोजनें घालावीं ॥ सोहाळे: गर्भा धान: पुंसवन: चौळ: चुडाकर्ण: मंत्रउपदेश: व्रतबंध: विवाहमहो छाव कीलाल कर्म: गृहशांतिक: गृहप्रवेश: विद्यारंभ: वाणिज्य:

कृषि सर्वहि कर्मे प्रारंभ ॥ श्रीगुरु कुळाचा व स्छळगुरु स्थळाचा ॥ तीर्थगुरु तीर्थीचा ॥ त्रिगुणात्मकः गुरुमुर्तिः ॥ ब्रह्मा बिष्णु महेश्वः इति त्रिगुणात्मक रूप परब्रह्म ॥ परमेश्वर आनादिरूप परमेश्वर या खिला विरंचिश्रृष्टि हा धर्म सर्व ब्राह्मण अनुमत्ते नायकोरावास व सर्व समुदाया संनिध हे सर्व माहाजन हे वाग्वोत्तरि धोंडि नायक पौतमक्ष गोत्री त्रिपवर यजुश्याकि देशस्त शामक्षेत्रकर कुळस्वामिणी यकविरा सेनादिपति कुळगुरु शेषवंशाचे वतनदार पसपवलि वसईचे स्छळगुरु ॥ सांडोर पाखाडी वतन इनाम बाहादरस्या पातशा याचा बेंबराज बादशा याचे ॥ राम नायका पासोन ३ तीसरे पेढि ॥ व तथा आवे नायक कावळे यजुशाकि देशस्त पैठणकर गोत्र भारद्वाज पंचप्रवर कुळस्वामिण येकविरा सरदेसाय चवदा प्रगाण्याचे वतनदार पहाड ग्रामाचे ईनाम श्री बिबाचे वृत्ति स्छळ मालाडखापर्णे कुळगुरु सोमसूर्य वशाचे रघुनाथपंता पासोन चवथि पेढि ॥ केशव रामाचार्य देवधर प्रधान यजुशाकि पैठणकर गोत्र सारंग पंचप्रवर कुळस्वामिण येकविरा राजप्रधानः ॥ व विठोबा नायक छत्रे यजुशाकि देशस्त सौनक गोत्र त्रिप्रवर कुळस्वामिण योगेश्वरी वृत्तिवंत मुबैचे वामन पंडित चामरेः भार्गवगोत्री पंचप्रवर यजुशाकि देशस्त पैठणकर पुरोहित राजवंशिकाचे वृत्तिवंत कांबेगणेचे आणिक वृत्तिवंत ठाइंठाईचे देशस्त व गोवर्धन व गांधर्वीक या समस्त विप्राचे संमते हा धर्म सांगितला ॥ ते समई नायकोराव मालाडचा देसाय ॥ व शिवाजी देसला मरोळचा ॥ दाद सावे आगासिचे ॥ पोस ठाकूर बेलवडिचे ॥ दादचुरि केळवेचे ॥ रतन सावे मुळगांवचे ॥ केशव पाटेल दादरुत माहिमेचे ॥ राम पाटेल ॥ नाम राउत ॥ देव चोरघे पापडिचे ॥ सोमजी ठाणेकर ॥ विठोजी सुतार बडकर ॥ बाबुराणा ॥ रघुपुरी ॥ मकुंद प्रभुचे ॥ मुख्य नामांकित द्रव्यवत व समस्त आध्य पेढिजाद यांस सर्वांस धर्म सांगितला ॥ मानला ॥ फार सतोषि जाले ॥ कुळ गुरुस अर्ध्य पाध्य पुजा केली ॥ वस्त्रे अळंकार दीधले ॥ सर्व ब्राह्मणांस यथा पात्र दक्षणा वाटिल्या ॥ क्षम आलिंगनें जालीं ॥ पाहिरावण्या एकमेकांस संपादिल्या ॥ त्या सांकल सांगतां लेख फार होईल ॥ हे सर्व केशवाचार्य हस्ताक्षर वंशपद्धति या संमति पूर्ण जालीं ॥ संवत पंधरासें पांच व श्री राजेंद्रचक्रचुडामणि शालिवाहन शके येकसहस्र व तीन वरुषे सचर ॥ माहे फालगुन वसंत रुतौ हा संप्रदाये माहालजापुरि मिळोन महजर सर्वांसि दिधले ॥

वरील ब-याच लांब लचक उताऱ्यांतील कांहीं महत्वाच्या मुद्यासंबंधीं थोडें फार विवेचन करून शिव पूर्वकाळीं महाराष्ट्रीय समाजाच्या उत्तम अवस्थे विषयींच्या सामान्य प्रतीच्या महाराष्ट्रीय व्यक्तीच्या कोणत्या स्वरूपाच्या कल्पना असत याचें आम्ही थोडक्यांत दिग्दर्शन करितों. या लेखांत मुसलमानी राजकीय सत्ता ठाणें कोंकण प्रांतांत स्थापना झाल्या कारणाने महाराष्ट्रीय समाजावर कोणते दुष्परिणाम घडले हे लेखकानें उत्तम रीतीनें दर्शविले आहे. या शिवाय लेखकाचे मताप्रमाणें महाराष्ट्र धर्मा विरुद्ध कोणकोणत्या बाबी समाजांत निर्माण झाल्या याचा निर्देश लेखकाने या लेखांत केला आहे. ठाणे कोंकण प्रांतांतील महाराष्ट्रीय जनतेनें स्वकीय राजांचा अभिमान सोडला ही गोष्ट नमूद करून लेखकानें महाराष्ट्रधर्मा विरुद्ध खालील बाबी अस्तित्वांत आल्याचें लिहिलें आहे:—

१ क्षत्रियानें शस्त्रें सोडून कृषि स्वीकारणें.

२ शिंदे यांनीं कारकोणी, गांवखोती, सेवा करणें त्याचप्रमाणें ताडी मदिरा यांचा विक्रय करणें.

३ आचार धर्माचा त्याग करणें.

४ गोत्र, प्रवर, कुळगुरु, कुलस्वामी यांचा विसर पडणें.

ज्याअर्थी वरील बाबींचा लोप होणें हें महाराष्ट्रधर्माविरुद्ध असल्याचें वंश पद्धतीच्या लेखकानें लिहिले आहे त्याअर्थी वरील बाबींचें परिपालन म्हणजे महाराष्ट्रधर्मानुसार आचरण असें लेखकाचें मत असल्याचें उघड दिसत आहे. वंशपद्धतीच्या लेखकानें वरीलप्रमाणें अभिप्राय व्यक्त केल्यानंतर त्याकाळीं महाराष्ट्रांत महाराष्ट्रधर्मास विघातक अशा कोणकोणत्या पंथांचा सुळसुळाट माजला होता याचें वर्णन केलें आहे. श्रावक, जति, नानकपंथी, रुमीपंथी, तुर्की, महंमदी, इभ्रमी, इसाही, शिश्नछेदक, केशछेदक, सर्वभक्षक इत्यादि नानाप्रकारचे पंथ महाराष्ट्रीय समाजांत घुसून अनाचार वाढला व जिकडे तिकडे विप्रांस व देवांस विरोध सुरु झाला. वरील परिस्थितींत पुष्कळ लोक भ्रष्ट झाले. यानंतर श्रीमहादेवानें शंकराचार्यांच्या रूपानें धर्मरक्षणाकरितां अवतार धारण केला. वंशपद्धतिकारानें शंकराचार्यांच्या कामगिरीचें वर्णन खालीं लिहिल्याप्रमाणें केलें आहे:—

" शंकराचार्यांनीं पुष्कळ राजे शुद्ध करून स्वधर्मांत घेतले. ब्राह्मणांच्या वृत्तीचें स्थापन केले. वैदिकधर्म ब्राह्मणाकरितां, व्यासोक्त पौराणीक मंत्र क्षत्रियास, तांत्रिक पद्धत शूद्रांकरितां लावून दिली. " येणेंप्रमाणें शंकरा-

चार्यांच्या कामगिरीचें वर्णन करून ठाणें कोंकण प्रांतांतील निरनिराळ्या जाती व त्यांचे उपजीविकेचे व्यवसाय वंशपद्धति कारानें वर्णिले आहेत. हें वर्णन केल्यानंतर वंशपद्धतिकार ह्मणतो:—

" या जाती सर्व महाराष्ट्र । सर्वांस ब्राह्मण श्रेष्ठ वर्ण । भेद गोताचीं कर्मे भिन्न वर्तणूक, आचार भिन्न पहिराव, भूषणे भिन्न, भाषा भिन्न, । भिन्न भिन्न देशीचे देशाचार आहेत । कुळाचार आहेत । वंशाचार आहेत वेद-शास्त्राचार तो श्रेष्ठ व कुळाचार देशाचार श्रेष्ठ श्लोक स्वधर्मे परमं श्रेष्ठ पर-धर्मो भयावहः । ऐसें हे भगवद्गीतेचें वचन । तें असे जर । आपआपले धर्मी असावे ॥ गुरुवाक्यें गुरुसीं मानावे । देव गुरुरूपें सर्वां संर-क्षिता । सुख देता दुष्कर्मे दूर करिता, अंतीं सायुज्यता मुक्ति देता. " इत्यादि. वरील उताऱ्यावरून महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या निरनिराळ्या जातींचे जे जे व्यवसाय, जीं जीं कर्मे. जे जे कुळाचार, जे जे देशाचार व वेदशास्त्रचार या सर्वांचा समावेश महाराष्ट्रधर्म या संज्ञेत होतो, असें वंशपद्धतिकाराचे मत दिसून येतें. सर्व आचारांत वेदशास्त्रचार सर्वांत श्रेष्ठ ही वंशपद्धतिकारानें नमूद केलेली बाब लक्षात ठेवण्यासारखी आहे. वरील बाबी खेरीज महाराष्ट्रधर्मात खालील बाबी अंतर्भूत होत अस-ल्याचें बखरकारानें नमूद केलें आहे. त्या बाबी येणप्रमाणें:—

१ स्नान, २ गुरुनें उपदेशिलेल्या मंत्राचा जप गुरुनें सांगितला असेल तितका प्रत्यहीं करणें, ३ सूर्यास नमस्कार, ४ सूर्यव्रत, ५ गणेशचतुर्थी संकष्टि, ६ कुळस्वामिणीचे तिथीचे दिवशी उपोषण व ब्राह्मणहस्तें पूजन, ७ कामिक व्रतांचे आचरण, ८ नवचंडिका उपोषण, ९ घटस्थापना व तन्निमित्त ब्राह्मण भोजन, १० गर्भाधान, पुंसवन, चौल, चूडाकर्म, मंत्रउपदेश व्रतबंध, विवाह, किलालकर्म, ग्रहशांति, ग्रहप्रवेश विद्यारंभ, वरील सर्व बाबींचा समावेश वंश-पद्धतिकार महाराष्ट्रधर्म या संज्ञेत करितो. गर्भाधान, पुंसवन इत्यादि विधींस वंशपद्धतिकारानें संस्कार शब्दा ऐवजीं सोहळे हा शब्द वापरला आहे. महा-राष्ट्रधर्म या संज्ञेच्या अर्थाच्या व व्याप्तीच्या निश्चितीचे दृष्टीनें हा लेख अत्यंत महत्त्वाचा आहे, वरील लेखासारखेच कोंकण प्रांतांतील दुसरे महत्त्वाचे लेख अलीकडे उपलब्ध झाले आहेत त्यांचाहि या ठिकाणी विचार करणें जरूर आहे. कोंकण प्रांतांतील नांदगांव मुरुड येथील जोशी व उपाध्ये यांचे मध्यें भिक्षुकी वृत्तीच्या उत्पन्नाविषयींच्या वादाच्या निवाड्यांत

महाराष्ट्रधर्म ही संज्ञा आलेली आहे. या लेखात ही संज्ञा कोणता अर्थ व्यक्त करण्यांकरिता वापरली आहे याविषयींची चर्चा करण्यापूर्वी अस्सल लेख जसाच्या तसाच आह्मी सादर करितो.

बज्यानेव अमीलान हाल व इस्तिकबाल देशमुखान व अधिकारियान व देशपांडेयान व जमे अजमेदारान तर्फ मुरूड बागायेत व जिरायत प्रगणे नांद गाव मरूड मामुले किल्ले माहारुसे कोट जंजिरे दंडाराजपुरी सरकार तल कोकण निजामन मुल्कि मन मुजाफ सुभे खजिस्ते बुनयाद बिदानद सुरुसन इहिदे इशरीन मिया तैनव अलफ आंक नारायण जोसी बाजी जोसी व आबा जोसी एस जोसी व विश्वनाथ जोसी बाजी जोसी व दादू जोसी कृष्ण जोसी व गोपाल जोसी राम जोसी बाबु जोसी व कृष्ण जोसी रुद्र जोसी व विनायक जोसी बाल जोसी व भाईबिरादर साकिन आगर मरुड याही हुजूर जंजिरा येऊन अर्ज केला की, ब्राह्मण व प्रभु व कासार व सोनार व मालि व गौलि ऐसा साहा खुमाकडे आमचे जोतीष व ब्रह्मत्व आमचे व साहा खुमा सिवाय अन्य याती हिंदु खुम राहिले. त्याजकडील भिक्षुकीचा अधिकार जोतीष व उपाधिक व ब्रम्हत्व व धर्माधिकारी वगैरा हे आमचे यात दुसरा कोणी नाहीं असे असता भोगेश्वर याचे देवळात बैरागी यानी रामनवमीची पुज्या केली ती पुज्या आम्ही साल दरसाल बैरागी आल्यापासोन आम्ही सांगत आलो ते मोजीब सन सबा अशरीन पुज्या सागत होतो तेथें उपाधे म्हणो लागले कीं, देवळांत पुज्या सागणे ती सर्व वर्षास आम्ही सांगु तुह्मास सागावयासी दरकार नाही याजकरिता याची छान करून देणार साहेब धनी मायबाप आहेत ह्मणौन अर्ज केला त्याजवरून सरकारचा हुकूम जाहाला कीं, बैरागी आल्यापासोन रामनवमीची पूज्या ज्यणे सांगितली असेल त्याणे सांगोन तुह्मी व उपाधे ऐसे निघोन हुजुर यणे त्यास बैरागी याजकडील पुज्या आजपावेतो जोसी करीत आले त्या प्रमाणे जोसी याही पुज्या सांगोन जोसी व उपाधे हुजुर आले हरदु जोसी उपाधे हुजुर आल्यावर हरदुजणाची वहिवाट भिक्षुकीचे वृत्तीची पुरसिस केली तेव्हा दुसरी ही कलमे जोसी याची त्याचा तटा उपाधे करितात त्याची ही खबर सरकारी दिल्ही त्याजवरून सरकारी दफतरी फर्माविले कीं, जोसी याचे वृत्तीची कलमे उपाधे याजकडे काय गेली याची वाजीब छान करून सड साक्ष व भोगवटा कदीम पाहून यादी निवडून हुजूर समजावणे त्याजवरून पंचाईत मतें भोगवटा सड पाहाता जोसी याचे कलमे वृत्तीची येणे प्रमाणे ठरली.

सिलान्यास व स्तंभप्रीतिष्ठा मुहुर्त आह्मी सांगावा व तेथील दक्षणा जी प्राप्ती असेल ती आमची असतां हल्ली उपाधे मुजाइम होतात म्हणौन जोसी याही लेहून दिल्हे त्यास मुहुर्त सांगणे तो व घटका घालणे ती तुह्मी घालावी आणि त्याचे उत्पन्न जे येईल ते तुह्मी घ्यावेत व येजमान उभयता बसून पुज्या केल्यास तुह्मी व उपाधे दोघाही करावी येज्यमान हरदु जणास काय देतील ते ज्याचे त्याणे घ्यावे

१ कलमे.

लग्नाची वगैरा याची पाठवणी येज्य-मान याजकडून येईल ती आह्मी व उपाधे याही बराबर वाटून यावी या प्रमाणे घेतली असता हाली उपाधे देत नाही ह्मणौन जोसी याही लेहून दिल्हे त्यास येज्यमान ज्यास जे देईल ते त्याणे घ्यावे

१ कलम.

श्राधी तीळोदक केल्यास उपाधे याचे व यवोदक केल्यास आमचे ऐसे असता कोण्ही एकानी दान केल्यास आम्हास देत नाही त्यास तिळोदक उपाधे यानी घ्यावे व यवोदक जोसी यानी घ्यावे.

१ कलम.

सावधान तुलसीचे लग्नाचे व दुसरी सावधानें हिंदू महजवत सुभ अशुभात होतील ती जोसी याही कदीम शष्टी पुज्यनात विषय विघ्नेष आमचा म्ह-णौन जोसी म्हणतात त्यास मनास आ-णता गणपती वेगळा ब्राह्मणाकडे मात्र करून जोसी यासी गणपतीचे उत्पन्न भट देतात आणि विघ्नेशाचे उत्पन्न भट घेतात व अभिषकाचा कलप नवा भटाही करून त्याचे उत्पन्न भट घेतात त्याजकरितां जोसी याज-कडे येणे प्रमाणें ठरले. ६

१ कदीम विघ्नेशाचे उत्पन्न च्यार देवताचे वाटणी प्रमाणें घ्यावे.

१ नवा गणपती केल्यास त्याचे उत्पन्न जोसी यांनी घ्यावे.

७

मदरहू प्रमाणें चालावे.

२ कलमें

७

वागदानी गणपतीची व वरुणाची दक्षणा जी येईल ती आम्ही व उपाधे बराबर घेत होतो हाली उपाधे मुजा-ईम हातात म्हणौन जोसी याही लेहून दिल्हे त्यांत गणपतीची दक्षणा जोसी याणी घ्यावी व वरुणाची दक्षणा भटाही घ्यावी.

१ कलम

८

श्राधी देवस्थान साहाखुमा कबील आमचे त्या पैकीं पाचा खुमा कबील

पाहोम जोसी याजकडे चालत आली ते प्रमाणे चालविणे

१

साहाखुमा खेरीज माहाराष्ट्र धर्म आहे. त्या कडील शुभअशुभ जे चालवणे ते आम्ही चालवितो. यात उपाधे नाहीं देवळांत व पिंपळाखालीं व घरीं पुज्या जे सांगणें ते आम्ही सांगतों. जंगमक्रिया व कुंभारक्रिया व कांचळे यांची क्रीया ज्याची आहे त्याची अशुभाचे क्रियेस आम्ही जात नाहीं सदरहु जवळोन क्रिया तेच करितात. बाकी वहिवाट आम्हाकडे यात उपाधे नाहीं म्हणौन जोसी याही लेहून दिल्हे त्यास साहाखुमा ब्राह्मण व प्रभू व कासार व सोनार व गौळी व माली या खेरीज बाकी खुम हिंदू राहिले त्याजकडे कदीम भोगवटा पाहता जोतीष व उपाधेपणा व धर्माधिकारी व ब्राह्मणत्व वगैरा भिक्षुकीची कलमें सारी जोसी याजकडे चालत आहे त्यास कदीम चालत आले त्या प्रमाणे चालविणे

१ कलम

---

१० कलमें.

आम्ही घेतों आणि उपाधे देतात व ब्राह्मणाकडे देत नाही म्हणोन जोसी याही लेहून दिल्हे त्यास चट श्राध करणे तरी जोसी उपाधे यासी बोलाऊन करावे अगर एकादे उपाधे यासी बोलाऊन केल्यास देवस्थान जोशी यासी घ्यावे पितृस्थान उपाधे यासी घ्यावे

१ कलम.

तीर्थी प्रयोग सांगणे तो उपाधे याही व आम्ही उभयताही सांगावा तो आम्हास सांगू देत नाही म्हणौन जोसी म्हणतात त्यास ब्राह्मण, प्रभु व कासार व सोनार व माली व गौळी या साहा खुमांस तीर्थी प्रयोग सांगणें तो उपाधे याही सांगावा व दानधर्म ही उपाधे याही घ्यावा व साहा खुमा सिवाय बाकी हिंदु खुम राहिले त्यास तीर्थी प्रयोग सांगणें तो व दानधर्म शुभ अशुभास घेणें तो जोसी यानी घ्यावे

१ कलम

साहा खुमाकडे आम्ही व उपाधे चालवितो.

| | |
|---|---|
| १ ब्राह्मण | १ सोनार शुभकार्यास |
| १ प्रभु | १ माली |
| १ कासार | १ गौळी |

सदरहु साहा खुमाकडे आम्ही व उपाधे चालवितो म्हणोन जोसी या ही लेहून दिल्हे त्यास साहा खुमाकडे

कदीम पासौन जोतीष व ब्रह्मत्व वगैरे
चालवीत आले आहेत ते मोजीब
चालवणे

कलम.

एकुण दाहा कलमें ठरलों याच्या यादी हुजूर समजाविल्या तेव्हां जोशी उपाधेयासी रुबरुब विच्यारिले कीं ह्या प्रमाणे दाहा कलमें ठरलीं तेव्हां उपाधे म्हणो लागले की देवळांतील पुज्या साहा खुमा सिवाय व तीर्थी प्रयोग साहा खुमा सिवाय व सावधान तुलसीचे लग्नाचे एकुण तीन कलमांस आम्ही उपाधे राजी नाहीं. हीं आमची ओढ म्हणतात आणि जोसी म्हणतात की हीं आमची त्यास उपाधे म्हणो लागले कीं, तीन कलमांची जोसी याही सौगन करावी ही तीन कलमें आमची ऐस बोलोन सौगन करावी त्याजवरून सरकारचा हुकूम जाहला कीं, जोसी याही या तीन कलमांची सौगन करावी ऐसे ठरले तेव्हां जोसी याही सदरहु सावधानाची व साहा खुमा खेरीज करून बाकी खुम यांजकडील देऊळच्या पुज्या व तीर्थांचे प्रयोग व दानधर्म वगैरा आमचे याची सौगन करावी. त्यास सदरहु तीन कलमें ही व सात कलमे पचाईत मते रुबरुब कबुल आले ती ऐसी दाहा कलमे जोसी याचे वृत्तीतील कदीम असता त्याचा तंटा उपाधे करीत होते त्यास उपाधे याजकडेस सदरहु कलमें ठरत नाहीं जोसी याचीं ठरली सबब दाहा कलमाचा उपभोग जोसी करतील त्यास अवलाद अफलाद करूं देणें. या सिवाय ज्या कलमाचा तटा पडला नाहीं आणि भोगवटा चालत आहे ते प्रमाणे जासो चालवितील ते प्रमाणे चालवणें नकल घेऊन असल जोशी मा। निल्हे या नजिक भोगवटेयासी देणे.

वरील वृत्तिविषयक वादाच्या पंचांनीं केलेल्या निवाड्यांत आलेल्या महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ काय करावयाचा या चर्चेकडे आतां आम्ही वळतों. वंशपद्धतींतील जो उतारा आम्हीं मागे दिला आहे त्यांत महाराष्ट्रांतील निरनिराळ्या जातींच्या लोकांचे वेदशास्त्राचाराखेरीज असलेले देशाचार, कुळाचार व वंशाचार यांचा समावेश धर्म या संज्ञेत होत असल्याचे वंश पद्धतिकारानें नमूद केले आहे. चर्चाविषयक लेखांत " सहा खुमाखेरीज महाराष्ट्रधर्म आहे त्याकडील शुभाशुभ जे चालविणें " इत्यादि मजकूर ज्या कलमांत आहे त्यांत जंगम, कुमार व कांबळे या तीन ज्ञातींचा उल्लेख करण्यांत आला असून या तीन ज्ञातींच्या लोकांकडे करण्यांत येणाऱ्या शुभ अशुभ कर्मास अनुलक्षून

लेखकानें महाराष्ट्र धर्म ही संज्ञा वापरली आहे, असें या कलमाच्या वाक्यरचनेवरून स्पष्ट होत आहे. या लेखांत उल्लेखिलेल्या तीन ज्ञातींपैकीं जंगम ज्ञातीचे लोक वेदशास्त्रधर्मानुयायी नाहींत हें उघड आहे. महाराष्ट्रांत लिंगायतधर्म स्थापन झाल्यानंतर त्याचा प्रसार देशांत होऊन महाराष्ट्रीय समाजांतील कित्येक लोक त्या पंथाचे अनुयायी बनले. अर्थात् अशा लोकांचा वेदशास्त्रधर्मानुसार आचार सुटून जाऊन त्यांनीं स्वीकारलेल्या नव्या पंथाचे आचार ते पाळू लागले, तथापि अशा लोकांचे वंशाचार व कुळाचार नवीन पंथाचा स्वीकार केला असतां हि कायम च रहात, व अशा प्रकारच्या आचारासंबंधीं जीं कर्में त्यांना करावी लागत तीं कर्में ते लोक पूर्वापार पद्धतीस अनुसरून ब्राह्मण उपाध्यायाकडून च करवीत. अशा प्रकारच्या महाराष्ट्र प्रांतांतलि जातीविशिष्ट आचारांचा निर्देश नुसत्या धर्म या संज्ञेने करणें उचित नसल्या कारणानें त्यांचा उल्लेख महाराष्ट्रधर्म या संज्ञेन चर्चा विषयक लेख लिहिणारानें केला आहे. वंशाचार, कुळाचार, देशाचार इत्यादिकांचे महत्त्व वेदशास्त्राचारा इतकेंच स्मृतिकार समजत असत, व राजानें अशा प्रकारच्या आचारांस मान द्यावा असें स्मृति ग्रंथांत सांगितलेलें आहे. मनुस्मृतीच्या आठव्या अध्यायाच्या ४१ व्या श्लोकांत वरील आचारांच महत्त्व दर्शविलें आहे. तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे:—

**जातिजानपदान्धर्माञ्छ्रेणीधर्मांश्च धर्मवित् ।**
**समीक्ष्य कुलधर्मांश्च स्वधर्मं प्रतिपादयेत् ॥ ४१ ॥**

अर्थः—"आपल्या विरुद्ध नसलेले ब्राह्मणादिकांचे याजनादि जातिधर्म, देशांतील लोकांचे देशधर्म, व वाणी, कारागिर इत्यादिकांचे कुलपरंपरागत धर्म जाणून त्यांच्याशी विरोध न येईल अशा रीतीचे धर्म राजानें व्यवहारामध्यें नियत करावेत."

वरील श्लोकांत ग्रथित केलेले तत्त्व लक्षात घेतलें असतां जंगम, कुंभार, कांबळे इत्यादि लोकांच्या ज्ञाती विशिष्ट आचारांचा धर्म या संज्ञेत अंतर्भाव होणें हें योग्यच आहे. या जाती महाराष्ट्र प्रांतांतील असल्या कारणानें त्यांच्या जातीविशिष्ट आचारांचा नुसत्या धर्म या संज्ञेनें उल्लेख न करितां महाराष्ट्रधर्म या संज्ञेनें उल्लेख करण्यात आला आहे.

कोंकण प्रांतांतील महाराष्ट्रधर्म ही संज्ञा ज्या लेखांत आली आहे अशा एका तिसऱ्या लेखाची अ.तां आम्ही चर्चा करितों. हा लेख कोंकण प्रांतांतील एका ब्राह्मण घराण्याचे दप्तरांत उपलब्ध झाला, व तो लेख भारत इतिहास

संशोधक मंडळाच्या शके १८३५ सालच्या १६४ पानांवर छापण्यांत आला आहे. एका सामान्य प्रतीच्या महाराष्ट्रीयानें हा लेख लिहिला आहे व याच कारणामुळें या लेखाचे महत्त्व आम्हांस विशेष वाटतें. राष्ट्राच्या अग्रस्थानी असणाऱ्या पुढाऱ्यांच्या विचारांची केवढी हि प्रगति झाली असली तथापि सामान्य जनतेंत त्या विचारांचा प्रसार होऊन ते तीस मान्य झाल्याखेरीज त्यांची दृश्य फळें दृष्टीस पडणे कठिण असतें. या दृष्टीनें विचार केला असतां मराठ्यांच्या स्वराज्य स्थापनेच्या व विस्ताराच्या बाबतींत महाराष्ट्रीय राजकरणी पुढाऱ्यांचें जे ध्येय होतें तेंच ध्येय सामान्य जनतेस अवगत होऊन तीस ते मान्य झालें होतें अशा प्रकारचा जो पुरावा मिळेल तो आमच्या मतें बहुमोल होय. हा लेख चौल येथील रा. गोविंद मनोहर यांचे दप्तरांतील आहे.

" मामले मूर्तजाबाद ऊर्फ चौल सरकार तळकोंकण

हकीकत

सु ॥ समान तिसैन व अल्फ

शके १६२६ ईश्वर नाम संवत्सरं

श्रीमंत राजेश्री कान्होजी आंगरे सरखेल जंजिरा कुलाबा यांहीं तळ कोंकणांत पुंडावे होऊन प्रांत वैराण पडला. महाराष्ट्रधर्म राहावा ऐसें नव्हतें त्या वेळेस फिरंगी व हबशी यांहीं प्रांतांत धर्म उच्छेद करावयास प्राप्त झाले होते. तेव्हा सरखेल साहेबाचे पुण्यप्रतापें व स्वरक्षणार्थ थोर मातबर सरदार जमा होऊन शामलाची क्षिति केली. सक्रोजी मोहिते व राणोजी गोळे व खंडोजी नाळकर व रुमाजीराव खराडे व कृष्णाजी मोड व हसनखान जमादार यांहीं सरखेल साहेबाचे समागमे युद्ध प्रसंग करून शामलाची क्षिति केली आणि श्रम पावून कोंकणांत धर्म राहिला, हे सरखेल साहेब यांहीं दिलांत आणून श्रीमंत महाराज छेत्रपति व बाळाजीराव पंत प्रधान यांजकडे सर्फराजी फार जाहाली. सरदार यांहीं राजकारणामुळें फार उपयोगी पडले. हे सरखेल यांहीं सरदार यास श्रमहार होये असें करून दिल्याचा प्रकारः—

१ सक्रोजी मोहिते सरदार यांस पालखी व एक गांव.

१ राणोजी गोळे सरदार यांस एक गांव व पालखी दिली.

१ कृष्णाजी मोड सरदार यांस तीन गांव व पालखी एक.

१ हसनराव जमादार यांस एक गांव व पालखी दिली.

येणें प्रमाणें मातबर सरदार यांहीं राज्यरक्षण केलें ह्मणोन आपल्या बराबर वेतनें देऊन राज्यांत राखिले. सरखेल साहेब यांहीं धर्मस्थापना केली. ही कीर्त या लोकीं परलोकीं भरून उरली आहे. ”

वरील लेख राजाराम महाराजांचे निधनापूर्वी दोन वर्षे अगोदरचा आहे. राजाराम महाराज तंजावर प्रांताकडे गेल्यानंतर औरंगजेबाचे सैन्यानें महाराष्ट्रांत धुमाकूळ घालण्यास सुरवात केली. पोर्तुगीज व जंजिऱ्याचे हबशी हे प्रथमपासून च मराठ्यांचे शत्रु होते. औरंगजेबाची स्वारी महाराष्ट्रावर होऊन स्वराज्याची घडी विस्कळित झाल्याकारणानें या मराठ्यांच्या शत्रूना अनायासेंच फावलें, व त्यांनीं महाराष्ट्रधर्मावर हल्ला चढवून महाराष्ट्रीय प्रजेचा धार्मिक बाबतींत पराकाष्ठेचा छळ करण्यास सुरवात केली. वसईची मोहीम मराठ्यांनीं कोणत्या कारणामुळें हातीं घेतली या संबंधाचे जे लेख पूर्वी आह्मी नमूद केले आहेत त्यापैकीं एका लेखांत “ त्याणें (फिरंग्यानें) देवस्थानें व तीर्थे व महाराष्ट्रधर्म याचा लोप केला. हिंदु लोक भ्रष्टवून क्षार केलें ” अशा प्रकारचा उल्लेख आला आहे.या उल्लेखावरून ‘महाराष्ट्रधर्म रहावा असें नव्हते” या वरील लेखांतील शब्दांचा अर्थ काय करावयाचा याची विशेष फोड करण्याची आवश्यकता आहे असें नाहीं. श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मास अनुलक्षून महाराष्ट्रधर्म ही संज्ञा वरील लेखांत योजण्यांत आली आहे, हें उघड दिसत आहे. आतां ज्या लेखाविषयीं आम्ही चर्चा केली तो लेख ज्या कोंकण प्रांतांतील आहे त्याच प्रांतांतील दुसऱ्या एका लेखाच्या चर्चेकडे आम्ही आतां वळतों. हा लेख शके १८३७ ( इ. स. १८१५।१६ ) सालचा मानाजी आंग्रे यांनीं पोस पाटील विन लाये पाटील यांच्या चेऊल प्रांतांतील कोळ्याच्या सर पाटिलकी वतनाचे बाबतींत लिहिलेलें आज्ञापत्र आहे. या आज्ञापत्रांत महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा उल्लेख आला आहे तो येणें प्रमाणें:—

“ अर्ज केला कीं, माझें सर पाटिलकीचें वतन पूर्वापार पिढी दर पिढी वडिलोपार्जित मजकडे चालत असतां सर पाटिलकीचें वतन सन समान तिसैनांत हरिपंत दिवाणजी यांहीं वरात केली ते समयीं आमचा चुलत चुलता येस पाटील व राम पाटील यांस सांगितलें कीं, सरकारची वरात जाहाली आहे. त्याचे तडजोडिस तुम्ही हजीर व्हावें. तेव्हां वतन मजला नको म्हणौन

महाराष्ट्रधर्मांत पराकष्टेची शेपथ स्वसाक्ष वाहिली तेव्हां सरकारचे वरातेचे रुपये पांचशें कर्जवाम काढून भरणा केला, त्यापासोन सर पाटिलकीचा अनुभव माझा मी निर्वेध घेत आलों. " इत्यादि

( भा. इ. सं. मं. त्रैमासिक स. १९२२ जून अंक )

वरील उताऱ्यांत महाराष्ट्रधर्मांतील पराकाष्ठेची शपथ येस पाटील यानें वाहिल्याचा उल्लेख आला आहे. मनु, याज्ञवल्क्य इत्यादिक धर्म प्रतिपादन करणाऱ्या ग्रंथांत कोणत्या हि व्यवहाराबद्दल लेखी अगर तोंडी पुरावा नसेल तेव्हां त्या वादाचा निकाल वादी प्रतिवादी पैकीं कोणास तरी विशिष्ट प्रकारच्या शपथा देऊन करावा अशीं वचनें आहेत. ( याज्ञवल्क्य स्मृति दिव्य प्रकरण पहा )

त्याचप्रमाणें याज्ञवल्क्य स्मृतीच्या साक्षी प्रकरणांत साक्षीदाराची साक्ष घेण्यापूर्वी त्यास कोणत्या शपथा द्याव्या याचा उल्लेख खालील प्रमाणें करण्यांत आलेला आहे :—

" ब्राह्मणांस सत्याची शपथ घालावी; क्षत्रियांस वाहने व आयुधें यांची शपथ घ्यावयास सांगावें, गुरें, व्रीहि, यवादि बीजें यांची शपथ वैश्यास व सर्व पातकांची शपथ शूद्रांस घ्यावयास सांगावी. "

( मिताक्षरा टीका बापटकृत मराठी भाषांतर पान १४८, १७५ पहा )

वर दर्शविलेल्या शपथांस अनुलक्षून महाराष्ट्र धर्माचा उल्लेख करण्यांत आला आहे. आतां पावेतों ज्या लेखाविषयीं आम्ही चर्चा केली ते लेख कोंकण प्रांताकडील आहेत त्यावरून इंग्रजी सत्ता महाराष्ट्रांत स्थापन होण्यापूर्वी महाराष्ट्रधर्म ही संज्ञा कोंकण प्रांतांतील लोकांस पूर्ण परिचित होती हें उघड होत आहे. आतां कोंकण प्रांतांतीलच आणिक एक लेखाविषयीं आम्ही चर्चा करून त्यानंतर महाराष्ट्रेतर प्रांतांतील लोकांच्या मराठ्यांच्या ध्येयाविषयीं कोणत्या स्वरूपाच्या कल्पना होत्या त्याची चर्चा करण्याचे आम्हीं ठरविलें आहे. चर्चा विषयक लेख खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

म. ई. सा. ख ६ ले ५३

शक १६५२ श्रावण शुा ५

राजश्री हरि दिक्षित मनोहर कारणे वेद शास्त्र संपन्न राजेश्री यांसी राजीनामा लेहून दिल्हा ऐसाजे:— स्वामीनीं महास्थळीं सोम याग केला. तो

आपण दृष्टिनें अवलोकून परम संतोष पावोन हेत पूर्वक निश्चय केला कीं, ऐसा स्वधर्म आपल्या मुलकांत व्हावा. आणि ऐसे सुपात्र ब्राम्हण स्नान संध्याही षट्कर्मे आचरोन, महायज्ञ करितात त्यास आणव गावगन्ना वर्षासन करून देऊन धर्मवृद्धि करावी तेणे करून पातक नाशातें पावोन, सुखोत्पत्तीनें पावन होऊन, म्हणोन काया वाङमनसा निश्चय केला होता. तदनुसार होऊन आले. त्यावरून स्वामीस आत्म संतोषे दर गावास १ रुपया प्रमाणें धर्मादायाची वृत्ती पुत्र पौत्रादी वंशपरंपरे करून दिघली असे.

सरदेसाई व सरदेशमुख व देशपांडिये, मोकदम शेटे महाजन व म्हात्रे व खोत पाटिल व रयत परगणा फिरंगण वसई बाहादरपूर

वरील लेखांत महाराष्ट्रधर्म ही संज्ञा नमूद करण्यांत आलेली नसून स्वधर्म ही संज्ञा वापरण्यांत आलेली आहे. स्वधर्म या संज्ञेत कोणकोणत्या बाबींचा अंतर्भाव होतो याचें दिग्दर्शन लेखकानें स्नानसंध्यादि षट्कर्मे, महायज्ञ, सोमयाग इत्यादि बाबी नमूद करून केलें आहे. हा लेख वसईच्या मोहिमेच्या पूर्वीचा आहे. वसई काबीज करून स्वराज्यांत सामील होईपर्यंत वसईच्या आसपासच्या जनतेची स्वधर्मावर श्रद्धा कोणत्या प्रकारची होती हें दिसून येत आहे. याच धर्मश्रद्धेचे योगानें त्या प्रांतातील लोक पोर्तुगीज लोकांची राजकीय सत्ता नाहींशी करून स्वधर्म स्थापनेस्तव स्वराज्य स्थापना करण्याविषयीं उद्युक्त झाले व तत्कालीन मराठा राजकारणी पुढाऱ्यांचीं मनें वसईची मोहीम हाती घेण्याचे बाबतीत त्यांनीं वळविलीं. आतां महाराष्ट्र देशाच्या दुसऱ्या एका प्रदेशांतील लेख आम्ही खालीं देतों. नानासाहेब पेशवे यांचे कारकीर्दीत भगवंतराव यादव मुनशी या नांवाच्या औरंगाबाद येथील राहणाऱ्या गृहस्थानें पेशव्यावर एक काव्य करून ते त्यास अर्पण केलें आहे. या काव्यांत पेशव्याच्या कामगिरीबद्दल खालील उल्लेख आला आहे

> पाहा आहमज देव दुर्ग दुसरे विख्यात जे दक्षणीं ।
> तेथें शीघ्र शिवध्वजा उभविल्या घेऊनी एके क्षणीं ॥
> होते दुष्ट उपप्लवासि करिते ते सर्व निर्दाळिले ।
> विष्णुने अवतार हा धरुनिया धर्मास संस्थापिलें ॥

( इतिहासमंजरी पान २२१ )

वरील श्लोकांत विष्णूनें अवतार धारण करून जशी धर्मसंस्थापना केली तशीच पेशव्यांनीं केली असे कवीनें वर्णन केलें आहे. पेशवे

घराण्यांतील निरनिराळ्या पुरुषांच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयीं पूर्वी जो आम्ही पुरावा नमूद केला आहे व त्यासंबंधीं जी चर्चा केली आहे ती लक्षांत घेतली असतां वरील वर्णनांत यत्किंचित हि अतिशयोक्ति असल्याचें कोणी हि विधान करूं शकणार नाहीं. आतां महाराष्ट्रेतर प्रांतांतील सामान्य प्रतीच्या लोकांच्या मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेच्या व विस्ताराच्या ध्येयाविषयीं कोणत्या प्रकारच्या कल्पना होत्या याचे चर्चेकडे आतां आम्ही वळतों. कर्नाटक प्रांतांतील व्यंकटाध्वरी या नांवाच्या पंडिताने विश्वगुणादर्श चंपू या नांवाचा एक ग्रंथ सुमारे २५० वर्षांपूर्वी रचला, त्या ग्रंथांत महाराष्ट्रीय समाज्याचें चें चित्र त्याने काढलें आहे तें लक्षांत ठेवण्यासारखें आहेः—

कृशानुः—अस्त्वेवमथाप्यत्रत्यानां आद्येतरवर्णानां
पुनरतिदुःसहं चेष्टितं पश्य ।
देशेदेशे लंपटाः पर्यटन्तो भंजंभंजं ब्राह्मणादीनशेषान् हारं
हारं हन्त सर्वस्वमेषां पापा एते स्वोदरं पूरयान्ति ॥

विश्वावसुः-सत्यमेवं तथापि एतेषां चेष्टितं सहनीयम् । तथाहि ।

मायांचुचुतया भयावहगतिः प्रत्यर्थिपृथ्वीभुजाम ।
महाराष्ट्रभटच्छटा रणपटुर्नोपर्यटत्येव चेत् ।
देवब्राह्मणवर्गनिग्रहकृतो देशांस्तुरुष्का इमे ।
निष्प्रात्यूह मनोरथा वितनुयुर्निर्देवभूमीसुरान् ।
देवक्षोणिसुरहितकृते दारितम्लेच्छरङ्क्तेः ।
मह्यां सह्यं कथमपि महाराष्ट्रयूथस्य चेष्टा ।
व्याधिव्यूहप्रतिहतिकृतां व्यक्तमुग्रऔषधानाम् ।
कायारोग्य प्रणयिहृदयैः काटवं मर्षणीयम् ।

अर्थः कृशानुः— या प्रमाणें तूं वर सांगितलेलें हें असो. पण येथील ( महाराष्ट्रांतील ) ब्राह्मणेतर जे क्षत्रियादि त्यांचें अत्यंत असह्य असें जें वर्तन होत आहे तिकडे तरी तू लक्ष्य दे. हे एतद्देशीय क्षत्रिय ( मराठे ) सर्व देशभर भटकतात, सर्व ब्राह्मणांना छळून मारून त्यांचें सर्वस्व हरण करितात असे हे पापी व पर द्रव्यापहारी आहेत.

विश्वावसुः- तूं म्हणतोस ही गोष्ट खरी आहे तथापि हें हि यांचें दुष्ट वर्तन क्षम्यच आहे. कारण असें पहा की, शत्रुपक्षीय राजांना गनिमी काव्यानें भय उत्पन्न करीत युद्ध कुशल असे हे महाराष्ट्रीय वीरांचे समूह देशामध्यें सर्वत्र संचार न करतील तर हे तुर्क लोक देवब्राह्मणांचा नाश करण्यास टपलेले

निर्विघ्नपणें देवब्राह्मणांचा विनाश करतील. देवब्राह्मणांचें हित व्हावें या साठींच ज्यांनीं म्लेंच्छांचा निःपात केला आहे. अशा या महाराष्ट्रीय वीर समूहांच्या देशामध्यें सर्वत्र चाललेल्या बालिश चेष्टा लोकांनीं सहन केल्या पाहिजेत. रोगांचा समूळ नाश करणाऱ्या जालीम औषधाचा कडुपणा शरीरारोग्याची अपेक्षा बाळगणाऱ्या लोकांनीं सोसावयास नको काय ?

( इतिहास मंजरी पा. ११० )

वर जे श्लोक दिले आहेत त्याच्या पूर्वींच्या श्लोकांत महाराष्ट्रीय ब्राह्मण वैदिकधर्म, वेदाध्यायन या विषयीं उदासीन असून फारशी, उर्दू वगैरे यावनी भाषा शिकतात, यवनांची सेवा करितात, खोटे जमाखर्च लिहितात, थोड्या विद्येवर पांडित्याचा आव दाखवितात, त्याच प्रमाणें मराठे निरनिराळया प्रांतावर स्वाऱ्या करून लूट करितात अशा प्रकारचे दोष महाराष्ट्रीयांचे ठिकाणीं असल्याचें वरील काव्यांत नमूद करण्यांत आले आहे. तथापि मराठ्यांनीं पराक्रम गाजविला नसता तर ब्राह्मण व हिंदुधर्म यांचा भरतखंडांत उच्छेद झाला असता या कारितां त्यांच्या दोषांकडे दुर्लक्ष करावें असें मत ग्रंथकर्त्यानें दिलें आहे. मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेच्या व विस्ताराच्या ध्येयाचे बाबतींत इंग्रज व महाराष्ट्रियेतर इतिहासकार मराठ्यांवर लुटीचा जो आरोप करितात तोच आरोप वरील लेखकानें केला आहे. परंतु देवब्राह्मणांचा नाश करण्यास टपलेल्या तुर्कांचा उच्छेद करून त्यांचें हित व्हावें या हेतूस्तव मराठे वरील गोष्टी करीत असल्याकारणानें वरील दोषांकडे दुर्लक्ष करणें योग्य आहे असा व्यंकटाध्वरीनें आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. कर्नाटक प्रांतांतील तत्कालीन सामान्य प्रतीच्या माणसाची मराठ्यांच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयींची कल्पना वरील उताऱ्यावरून स्पष्ट होत आहे. आतां भरत खंडाच्या उत्तरेकडील प्रांतांतील जनतेचें मत मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेच्या व विस्ताराच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयीं कोणत्या प्रकारचें होतें याची कल्पना येण्याकरितां जयपूरचे राजे व तेथील मराठ्यांचे वकील यांचे मध्यें झालेल्या संभाषणाचा सारांश ज्यांत दिला आहे अशा एका पत्रांतलि महत्त्वाचा भाग आम्ही येथें देतो.

" तुमचे आजे महाराज जयसिंगजी यांनीं भगीरथ प्रयत्न करून श्रीमंत कै. बाजीरावसाहेब यांसी आणोन म्लेछांचें उत्थापन केलें आणि हिंदुस्थान पुन्हा स्थापून देवयात्रा इत्यादिक यथास्थित घडूं लागल्या, हिंदुमात्रास

सौख्य होऊन आपआपले स्थळीं स्वस्थ कालक्षेप करित असतां प्रस्तुत मुलुक आग्रहास प्रवर्तोन अविवेक विचारिता हे एकरूप कल्याणकारी नाहीं. इहलोकीं परलोकीं या गोष्टी निंदक आहेत. येणें प्रमाणें बहुतापरि समजावितां सर्व गोष्टी ध्यानास आल्या. म्लेंच्छाविसीं तो त्रासच घेऊन वकिलांस सामदानीं उत्तर देऊन दुसरे सोबत्यास सांगितलें कीं, म्लेंच्छांस तो साफ आणावयाचा नाहीं त्यांनीं आग्रह विशेष केला, परंतु येथून निरवालस त्याअविसीं ज्वाबच होत गेले कीं, ज्या गोष्टी वडिलांनी बहुत विचारून केल्या आहेत त्या आम्ही मोडून नव्या कराव्या हें उत्तम नाहीं. यास्तव म्लेंच्छाविरहित आपण आपली शाबूती बाधून आपलाले स्थळीं स्वस्थ असावें. दक्षिणी चालून आल्यास पाहून घेऊं. जमीदार आहों काही चिता नाहीं वगैरे उत्तर दिल्हें."

थोरल्या बाजीराव पेशव्यांचे कारकीर्दीत मराठयांचे सत्तेचा उत्तरेकडील प्रांतांत प्रसार कोणत्या हेतूस्तव करण्यांत आला या विषयीं त्या प्रांतांतील जनतेच्या कल्पना कोणत्या स्वरूपाच्या होत्या हें वरील उताऱ्यावरून दिसून येत आहे.

शिवाजी महाराज अवतीर्ण होण्यापूर्वी पासून तों थेट मराठी साम्राज्य लयास जाई तों पर्यंत महाराष्ट्रीय समाजांत उदयास आलेल्या हरिकथा निरूपणी व राजकारणी पुढाऱ्यांचें ध्येय कोणत्या स्वरुपाचें होतें हें व्यक्त करणारें त्या पुढाऱ्यांचें उद्गार मराठयांच्या इतिहासाच्या साधन ग्रंथात व मराठी पद्यरूपी वाङ्मयांत ठिकठिकाणीं आढळलेलें आम्ही नमूद करून त्या विषयी थोडी बहुत चर्चा केली आहे व त्यावरून आमच्या मता प्रमाणें जो सिद्धांत निघतो त्याचे हि दिग्दर्शन केलें आहे. वरील काळांत महाराष्ट्रीय व महाराष्ट्रीयेतर सामान्य प्रतीच्या लोकांच्या मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेच्या व विस्ताराच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयींच्या कल्पना कोणत्या प्रकारच्या होत्या हें दर्शविणारा पुरावा आम्ही नमूद केला असून त्यावरून निघणाऱ्या सिद्धांताचे दिग्दर्शन केलें आहे. या सर्व पुराव्यांवरून व चर्चे वरून महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ वरील काळांत कोणता करीत व या संज्ञेत कोण कोणत्या बाबींचा समावेश होत असल्याचें महाराष्ट्रीय लोक समजत याविषयी कोणत्याहि प्रकारची शंका राहात नाहीं. मराठी व संस्कृत भाषेंत धर्म ही संज्ञा निरनिराळे अर्थ व्यक्त करण्याकरितां योजण्यांत येते व यामुळें या संज्ञेच्या अर्थाची ओढाताण अर्थ करणाऱ्या व्यक्तीच्या मनः प्रवृत्तीस अनुसरून करण्यांत येत

असे, असें या ग्रंथाचें आरंभीं आम्हीं महाराष्ट्रीय विद्वानांचीं जीं मतें नमूद केलीं आहेत ती व या संज्ञेचा अर्थ व व्याप्ती संबधीं आम्हीं नमूद केलेला पुरावा समवेत वाचल्यानें वाचकांचे निदर्शनास आल्याखेरीज राहणार नाहा. धर्म हा शब्द खाली दर्शविलेले निरनिराळे अर्थ व्यक्त करण्याकरितां मराठी व संस्कृत भाषेत योजण्यात येतो: —

धर्म= १ उपजतगुण, स्वाभाविकगुण, स्वभावधर्म

२ सृष्टिक्रम

३ पापपुण्य, कर्म

४ धर्माधिष्ठित देवता

५ दानधर्म

६ मोक्षप्राप्तीचा मार्ग

७ नियम, कायदे

८ पूर्वापार चालत आलेले कायदे, चालीरीति.

( स्वाध्याय मासिक वर्ष पहिलें अंक ७।८ मध्यें रा० दाते यांचा " ऋग्वेदांत धर्म " हा लेख पहा )

वर दर्शविलेले निरनिराळे अर्थ व्यक्त करण्याकरितां धर्म या संज्ञेची योजना मराठी भाषेत करण्यांत येते. विशिष्ट स्थलीं धर्म या शब्दाचा अर्थ काय करावयाचा हें तो शब्द ज्या विषयाचे चर्चेत आला असेल त्याचे स्वरूप व पूर्वानुसंधान यावरून ठरवावयाचें असते पूर्वी नमूद केलेल्या पुराव्याचे बारकाईने निरीक्षण केल असतां महाराष्ट्रधर्म हा संज्ञा वर दिलेल्या अर्थांपैकीं नियम, कायदे, पूर्वापार चालत आलेले कायदे अथवा चालीरीति हा अर्थ व्यक्त करण्याकरितां योजण्यांत आली आहे असे सामान्यपणें विधान करण्यास हरकत नाहीं. तथापि या सामान्य अर्थापलीकडील अर्थ व्यक्त करण्याकरितां या शब्दाची योजना करण्यांत आली आहे असें त्याच पुराव्यावरून सिद्ध होत आहे. वेद म्हणजे श्रुति आणि मनु याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतिग्रंथ यांत कथन केलेल्या विधीनिषेधरूपी आज्ञा व महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या निरनिराळ्या वर्णांच्या व जातींच्या लोकांचे परंपरागत चालत आलेले देशाचार, वंशाचार व कुलाचार या विशिष्ट बाबींचा अर्थ व्यक्त करण्याकरितां महाराष्ट्रधर्म ही संज्ञा योजण्यांत आली आहे, असे मागील पुराव्याचा विचार केला असतां कोणाचेहि मत झाल्याखेरीज राहणार नाहीं. अशा

प्रकारच्या महाराष्ट्रधर्माची स्थापना करणें हें महाराष्ट्रीय समजाच्या राजकारणी पुढाऱ्यांचें स्वराज्य स्थापना करण्यांत ध्येय असल्याचें आम्हीं मागें नमूद केलेल्या पुराव्यांवरून प्रतिपादिलेलें आहे. स्वराज्यस्थापना झाल्यानंतर महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांनी त्यांना प्रिय असलेल्या वरील ध्येयांत अंतर्भूत होणाऱ्या कोणकोणत्या बाबी मूर्तरूपांत अस्तित्त्वांत आणण्याचे प्रयत्न केले हा महत्त्वाचा प्रश्न आहे. महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांनी स्वराज्यस्थापना झाल्यानंतर त्याना प्रिय असलेल्या ध्येयांत अंतर्भूत होणाऱ्या बाबीस मूर्तरूप देण्याचा प्रयत्न केला अशा विषयींचा पुरावा उपलब्ध झाल्यास या पुढाऱ्यांच्या नुसत्या उद्गारांवरून त्यांच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयीं आम्ही जी अनुमानें काढली आहेत तीं बरोबर असल्याचें सिद्ध होणार आहे. या स्वरूपाचा अत्यंत महत्त्वाचा व आम्ही काढिलेल्या अनुमानास बळकटी आणणारा पुरावा बराच उपलब्ध झाला आहे, त्याच्या चर्चेकडे आतां आम्ही वळतों.

## महाराष्ट्रधर्म स्थापना हेंच मराठयांच्या स्वराज्यस्थापनेचें व विस्ताराचे ध्येय होतें हें सिद्ध करणाऱ्या मराठ्यांच्या राजकीय धोरणांतील व राज्यपद्धतींतील कित्येक बाबीः—

मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेचें व त्याच्या प्रसाराचें ध्येय महाराष्ट्रधर्मस्थापना हेंच होतें, हें सिद्ध करणारा प्रत्यक्ष व अनुमानिक पुरावा मागील भागांत आम्हीं नमूद केला आहे. या पुराव्यावरून महाराष्ट्रधर्म स्थापना हेंच मराठ्यांच्या स्वराज्य स्थापनेचे व प्रसाराचें ध्येय होतें याबद्दल तिळमात्र शंका घेण्यास कांहीं वाव शिल्लक राहिली आहे असें कोणत्याहि विचारी माणसास वाटणें शक्य नाहीं तथापि हा पुरावा पुढे येऊनहि कित्येकांकडून अशी एक शंका येण्याचा संभव आहे कीं, मागील भागांत दाखल केलेल्या पुराव्यावरून वरील बाब सिद्ध झाल्याचे दिसलें तरी मराठी राज्यांत श्रुतिस्मृतिप्रणीत वर्णाश्रम धर्माच्या विधिनिषेधरूपी आज्ञांस अनुसरून महाराष्ट्रीय समाजांतील राजापासून रंकापावेतो यच्चयावत् सर्व लोकांना आचरण करणें भाग पडे असे सिद्ध करणारा पुरावा पुढें आल्याखेरीज वरील सिद्धांत स्थापित झाला आहे असें मानणें योग्य होणार नाहीं असल्या प्रकारच्या शंकेचें निराकरण पुराव्यानेच करणें जरूर असून हा पुरावा या भागांत सादर करून त्या विषयींची चर्चा करण्याचें आम्हीं ठरविले आहे. शिवाजी महाराजाच्या खुद्द हयातींत व

त्यांचे पश्चात् मराठी साम्राज्य लयास जाई तोपर्यंत मराठ्यांच्या राजकीय धोरणांत व त्यांच्या राज्यपद्धतींत अंतर्भूत होणाऱ्या, अशा कित्येक बाबी आहेत कीं, ज्या बाबीवरून श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माची स्थापना हेंच मराठ्यांच्या राजकीय सत्तेच्या स्थापनेचें व तिच्या प्रसाराचें ध्येय होत असे सिद्ध होणार आहे. अशा प्रकारच्या बाबींचे स्थूलदृष्ट्या दोन भाग पडतात. एका भागांत मराठ्यांच्या राजसत्तेच्या व राज्यव्यवस्थेच्या सर्व साधारण धोरणासंबंधींच्या कांहीं बाबींचा समावेश होतो; दुसऱ्या भागात मराठ्यांची राज्यसत्ता अस्तित्वात असतां त्या सत्तेखालीं नांदणाऱ्या प्रजामध्यें श्रुतिस्मृतिप्रणीत आचार, व्यवहार, प्रायश्चित्त इत्यादि धर्मास अनुसरून प्रत्येक व्यक्तीस आचरण करणे भाग पडे हें दर्शविणाऱ्या बाबींचा समावेश होतो. आतां पहिल्या भागांत पडणाऱ्या कित्येक बाबींसंबंधीं पुरावा मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनग्रंथांतील सादर करून त्यासंबंधीं आम्ही चर्चा करितो.

प्रथमतः श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माने ज्या चातुर्वर्ण्य समाजाचें नियमन केलें जातें त्या समाजांतील मानवी प्राण्यांचे रक्षण करण्याचा धर्म क्षत्रियवर्णी राजाचा आहे ही महत्त्वाची बाब लक्षांत ठेविली पाहिजे. या बाबीस अनुलक्षून स्वराज्यस्थापक छत्रपति शिवाजी महाराज याचे ठायीं श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मान्वये राजाचे ठिकाणीं जे गुण अस्तित्वांत असणे आवश्य आहेत, ते त्यांचे अंगी कितपत वसत होते, याविषयींची चर्चा करणे जरूर आहे. याज्ञवल्क्यस्मृतीवरील मिताक्षरा टिकेत राजधर्म प्रकरणात राजाचीं लक्षणें खालील श्लोकांत दर्शविलेलीं आहेत.

॥ महोत्साहकः स्थूललक्षः कृतज्ञो वृद्धसेवकः ॥
॥ विनीतः सत्वसंपन्नः कुलीनः सत्यवाक्शुचिः ॥ ३०९ ॥
॥ अदीर्घसूत्रः स्मृतिमानक्षुद्रोऽपरुषस्तथा ॥
॥ धार्मिकोऽव्यसनोश्चैव प्राज्ञः शूरोरहस्यवित ॥ ३१० ॥
॥ स्वरन्ध्रगोतान्वीक्षिक्यां दंडनीत्यां तथैव च ॥
॥ विनितस्त्वथवार्तायां त्रय्यां चैव नराधिपाः ॥ ३११ ॥

अर्थ— उत्साह ह्मणजे धर्मादि पुरुषार्थास सिद्धि करणाऱ्या कर्माचा आरंभ करण्याचा निश्चय. ज्यास मोठा निश्चय आहे त्यास महोत्साह म्हणतात. राजाने महोत्साह असावें. पुष्कळ द्रव्य देण्याकडे त्याचें लक्ष्य असावें. दुसऱ्यानें केलेला उपकार व अपकार विसरूं नये. तप, ज्ञान इत्यादिकांच्या योगाने जे वृद्ध असतील, त्यांची त्याने सेवा करावी, आणि विनय-

संपन्न व सत्त्वसंपन्न असावें. संपन्न स्थितींत हर्ष, व विपन्न स्थितींत विषाद न मानणारा पुरुष सत्त्व संपन्न असतो. त्याच प्रमाणें माता व पिता या दोन्ही पक्षी कुलीन, सत्य भाषण करणारा, बाह्य व अभ्यंतर शौचयुक्त, अवश्य कर्तव्य कर्मांच्या आरंभास व आरंभलेल्या कर्मांच्या समाप्तीस जो उशीर लावीत नाही, समजलेल्या गोष्टीस न विसरणारा, असद्गुणाचा द्वेष करणारा, परदोषाचे कीर्तन न करणारा म्हणजे दुसऱ्याचे दोष कोणास न सागणारा; वर्णाश्रम धर्मयुक्त, व्यसनरहीत, गंभीर अर्थ जाणण्यास समर्थ, शूर ( निर्भय ), गुप्त अर्थ गुप्त कसा ठेवावा, हे जाणणारा; आपल्या प्रभु—अमात्यादि सात अंगात काहीं न्यूनता असल्यास ती प्रकट न होऊं देणारा आणि आत्मविद्या, अर्थशास्त्र, कृषि, वाणिज्य, पशुपालन, इत्यादि वार्ता व व्याकरणादि अंगे, स्मृत्या पुराणें, मीमासा इत्यादिकासह वेदविद्या यांत प्रवीण, असा राजा असावा महोत्सहादि गुण ज्याच्यामध्ये असतील त्या क्षत्रियासच राज्याभिषेक करणे युक्त होय.

वरील लक्षणांच्या दृष्टीने शिवाजी महाराजाच्या चरित्राचा जर विचार केला तर एक दोन बाबी खेरीज वरील गुणापैकी पुष्कळच गुण त्याचे आंगीं उत्कटत्वानी वसत होते, असे कोणासहि पटल्यावाचून राहणार नाही. शिवाजी महाराजानीं वेद, वेदांगे, स्मृत्या, पुराणे इत्यादिकाचा विद्यार्थि या नात्यानें अभ्यास केलेला नव्हता ही गोष्ट कबूल करणें भाग आहे. परंतु वरील विषयाचें महत्त्व लक्षात येण्यास त्या विषयाची जरूर ती माहिती श्रवणभक्तीच्या द्वारे त्यास झालेली होती, यांत बरीक तिळमात्र सशय नाही. या एका बाबी खेरीज दुसरा कोणताहि गुण घ्या तो त्याच्या आंगीं उत्कटत्वाने वसत असल्याचे त्याच्या चरित्रावरून सिद्ध करून देतां येईल. राजाच्या ठिकाणीं महोत्साह असावा असें जें वरील श्लोकांत म्हटले आहे त्या महोत्सहाचा शिवाजी महाराज म्हणजे मूर्तिमत पुतळाच होता. आपल्या वयाच्या अकराव्या वर्षापासून तो थेट या इहलोकीची यात्रा पुरी होईपर्यंत स्वराज्यस्थापनेसारख्या महत्कार्याप्रीत्यर्थ ज्या असख्य उलाढाली कराव्या लागल्या त्या करण्यांत शिवाजी महाराज रात्रंदिवस गर्क असत. विश्रांति हा पदार्थ त्यांच्या सर्व आयुष्यांत त्यास कधीं माहितिच पडला नाहीं असें म्हटले तरी अतिशयोक्ति होणार नाहीं. बाजी घोरपड्याशीं व बादशाही कैदेंतून सुटून स्वदेशीं परत येते समयीं ज्या मथुरेच्या ब्राह्मणाचे हवाली संभाजी महाराजास त्यांनीं केलें होते त्या ब्राह्मणाशीं त्यानी जें वर्तन केलें होतें त्यावरून अपकार व उपकाराची

विस्मृति शिवाजी महाराजांस कधीं पडत नसे असें दिसून येतें. समर्थ रामदासस्वामी, तुकारामबोवा, चिंचवडचे मोरयादेव इत्यादि महाराष्ट्रीय समाजाच्या हरिकथानिरूपणी पुढाऱ्यांची द्रव्यद्वारें त्यानीं केलेली सेवा व शहाजी महाराजांनीं त्यांची रवानगी पुण्याचे शाहागिरीकडे केली ते वेळीं त्यांचे बरोबर पाठविलेल्या दादोजी कोंडदेवादि वृद्ध मुत्सद्दी यांचे विषयी त्यांचे ठिकाणीं असलेली आदरबुद्धि यावरून वृद्धाची सेवा करण्याचा गुण त्यांचे ठायीं वसत असल्याचे सिद्ध होत आहे. अफजलखान, पाहिस्तेखान, मिर्झा राजा जयसिंग इत्यादि सरदारानीं शिवाजी महाराजावर केलेल्या, स्वाऱ्यांचें प्रसंगीं त्यांचेवर आलेल्या महत्संकटांतन स्वतःची मुटका करून घेण्याचे बाबतींत त्यानीं ज्या योजना केल्या, व त्या करण्यात जी मनोवृत्ति दाखविली त्यावरून संपन्न स्थितींत हर्ष व विपन्न स्थितींत विषाद न मानणे हा गुण शिवाजी महाराजांच्या ठायीं होता याबद्दल कोणासहि शंका घेण्याचें कारण नाहीं. कल्याणच्या सुभेदाराच्या मुलीसंबंधी शिवाजी महाराजांनी केलेल्या वर्तनावरून त्यांची सत्त्वसपन्नता उत्तम प्रकारें निदर्शनास येते. या व असल्याच प्रकारच्या शिवाजी महाराजांच्या चरित्रातील दुसऱ्या कित्येक बाबींवरून स्मृत्यादि ग्रथांत क्षत्रियवर्णी राजाचे ठायीं जे गुण अवश्य असावयास पाहिजेत असें सांगितले आहे त त्याच्या ठिकाणीं असल्याचें दिसून येते. या सर्व गुणाहून वर्णाश्रमधर्मास अनुसरून आचरण करण्याची वृत्ति हा जो क्षत्रियधर्मी राजाच्या ठिकाणीं अवश्य मानिलेला गुण तोहि त्यांच्या अंगीं पूर्ण असल्याचें त्यांच्या चरित्रावरून सिद्ध होणार आहे.

शिवाजी महाराजांनीं ज्या पद्धतीनें व ज्या साधनांनीं स्वराज्यस्थापना केली व त्यांचे पश्चात् त्यांनी स्थापन केलेल्या मराठी राज्याचा प्रसार महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांनीं ज्या पद्धतीने व साधनांनीं केला ती पद्धत व साधनें महाराष्ट्रधर्मास अनुसरून कितपत आहेत, याची चर्चाविषयक मुद्याच्या दृष्टीनें शहानिशा करणें महत्त्वाचें आहे यापूर्वंधाचे सुरवातीस मराठ्याच्या स्वराज्यस्थापनेच्या व प्रसाराच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयीच्या स्वदेशी व परदेशी इतिहासकारांच्या कल्पना आम्ही नमूद केल्या आहेत. त्यांपैकीं व्हिन्सेंटस्मिथची मराठ्यांच्या स्वराज्य स्थापनेच्या व विस्ताराच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयींची कल्पना शिकस्तीची प्रतिकूल स्वरूपाची आहे. प्रथमपासून शेवटपर्यंत मराठ्यांनीं लूट केली व मराठ्यांचें राज्य म्हणजे धंदेवाईक चोरांचें राज्य असा अभिप्राय मराठ्याविषयीं स्मिथने व्यक्त केला आहे. स्वराज्यस्थापनेच्या सुरवातीस मोगली अगर

मुसलमानी सत्तेखालील शहरे व मुलूख शिवाजी महाराज लुटीत असत, व त्यांचे पश्चात् शत्रुप्रदेशावर मराठे सालोसाल स्वाऱ्या करून जी लूट करीत त्यास अनुलक्षून व्हिन्सेंटस्मिथनें वरील टीका केली आहे. मराठ्यांच्या स्वराज्याची निर्मिति कोणत्या परिस्थितींत झाली व त्या राज्याचा विस्तार त्यांना कोणत्या परिस्थितींत करावा लागला, या बाबी यत्किंचितहि विचारांत न घेतां शत्रुप्रदेशावर स्वाऱ्याच्या प्रसंगीं मराठे लूट करीत एवढीच फक्त एक गोष्ट लक्ष्यांत घेऊन निःपक्षपाती व सत्यनिष्ठ इतिहासकारास न शोभणारा वरील अभिप्राय व्हिन्सेंटस्मिथनें दिलेला आहे. मन्वादि स्मृतिकार आणि शुक्रादि नितिग्रथकार यांचीं या विषयासंबंधाचीं वचनें लक्षांत घेतां मराठ्यांनीं केलेली लूट योग्य प्रकारची आहे असे आम्हीं यापुढें जें विवेचन करणार आहों त्यावरून वाचकांच्या लक्ष्यांत आल्याखेरीज राहणार नाहीं. महाराष्ट्रांत मुसलमानी सत्ता स्थापन होण्यापूर्वी या देशातील राजकीय सत्ता देवगिरीच्या यादव राजघराण्याकडे होती. परकीय मुसलमानांनीं स्वबळावर ती सत्ता यादवांच्या हातांतून हिसकावून घेऊन महाराष्ट्रीय समाजाच्या पायांत पारतंत्र्याच्या शृंखळा अडकविल्या. महाराष्ट्र देशाचे पूर्वीचें मालक जें क्षत्रियवर्णी यादव राजघराणे त्या घराण्याचें शिवाजी महाराज हे प्रत्यक्ष वंशज नव्हते ही गोष्ट खरी आहे. तथापि त्या घराण्याचे ते अप्रत्यक्ष रीतीने वंशज होते ही गोष्ट निर्विवाद आहे. शिवाजी महाराजांच्या मातुश्री जिजाबाईसाहेब ह्या देवगिरीच्या यादव राजघराण्याच्या प्रत्यक्ष वंशजांपैकी जे लखुजी जाधवराव त्यांची कन्या होत्या. या शिवाय महाराष्ट्र देशांतील चातुर्वर्णिय समाजाचें स्मृत्यादि ग्रंथांतील वचनान्वये रक्षण व पालन करण्याचा धर्म ज्या क्षत्रियवर्णातील लोकांचा आहे त्या वर्णापैकीं शिवाजी महाराज हे एक होते. क्षत्रिय या नात्याने स्मृतिप्रणीत धर्मान्वये महाराष्ट्रांतील लोकावर राज्य करून त्यांचे रक्षण करण्याचा धर्म शिवाजी महाराजांचा होता. मुसलमानांनीं महाराष्ट्रांत आपली राजसत्ता स्थापन करून महाराष्ट्रीय क्षत्रियवर्णी लोकांचा प्रजापालनाचा धर्म त्यांचेपासून हिरावून घेतला होता. हा मुसलमानांच्या हातांत गेलेला धर्म परत आपल्या हातांत घेऊन त्या धर्मान्वयें आचरण करण्याची महत्त्वाकांक्षा शिवाजी महाराजांचे ठायीं उद्भूत होऊन तिजला मूर्तस्वरूप देण्याचा प्रयत्न त्यांनीं केला. स्वराज्यस्थापनेस शिवाजीमहाराजांनीं ज्या वेळीं प्रारंभ केला त्यावेळीं एवढे प्रचंड कार्य कोणत्या साधनांनीं व मार्गांनीं साध्य करावयाचें हा प्रश्न त्यांचेपुढे येऊन

उभा राहिला. स्वराज्यस्थापनेचें कार्य अवाढव्य खर्चाचें आहे, हें सांगावयास पाहिजे असें नाही. शस्त्रास्त्रें, घोडे व लढाईच्या उपयोगी लागणारें इतर सामान खरेदी करण्यास अपरंपार संपत्ति लागते, त्याचप्रमाणें डोंगरी किल्ले बांधणें व शूर आणि लढवय्ये लोक सैन्यांत चाकरीस ठेवावयाचे ह्मणजे अपरंपार पैसा लागतो; हा पैसा कोठून आणावयाचा हा त्या काळीं शिवाजी महाराजापुढें मोठा प्रश्न होता. हा प्रश्न त्यांनी कशा रीतीनें सोडविला हें तत्कालीन लेखावरून दिसून येतें. आदिलशाही राज्याचे अमलाखालीं जमिनीवरील राजभाग वसूल करणाऱ्या नौकर लोकांस फितवून गावचा वसूल विजापुरीं न पाठवितां तो आपण घ्यावयाचा हा पैसे उत्पन्न करण्याचा एक मार्ग शिवाजी महाराजांनीं त्या कालीं योजिला होता. आदिलशाही अधिकारी वरीलप्रमाणें फितूर होऊन शिवाजीमहाराजांस सामील न झाल्यास खजीना विजापुरीं रवाना होत असतां वाटेंत छापा घालून तो लुटावयाचा हा दुसरा मार्ग शिवाजी महाराजांनीं पैसा उभारण्याकरितां अवलंबिला होता. स्वराज्य स्थापने साठी लागणारा पैसा उभारण्याचा शिवाजीमहाराजांचा तिसरा मार्ग म्हटला म्हणजे आदिलशाही राज्यांत मोठमोठ्या व्यापारी पेठा ज्या ज्या शहरीं होत्या त्या लुटून त्या पेठांत संचित करण्यांत आलेली संपत्ति मिळवावयाची हा होय. या तीन मार्गांनीं शिवाजीमहाराजांनीं द्रव्य संपादन करून स्वराज्यस्थापनेच्या महत्कार्यास प्रारंभ केला. शिवाजी महाराज ज्या काळीं जन्मास आले त्या काळच्या परिस्थितींत त्यांनीं ज्या मार्गानें व पद्धतीनें स्वराज्य स्थापनेसाठी संपत्ति मिळविली त्या मार्गाखेरीज व पद्धतीखेरीज दुसरा कोणताहि मार्ग स्वीकारणें शिवाजी महाराजास शक्य नव्हतें. व्हिन्सेंटस्मिथ सारख्या पूर्वग्रहानें दूषित झालेल्या इतिहासकाराच्या लक्ष्यांत शिवकालीन परिस्थिति येऊं नये ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. ज्या गोष्टी सामान्य बुद्धीच्या माणसास पटतात व योग्य वाटतात त्या गोष्टीस एखाद्या शास्त्राचा पाठिंबा असल्याशिवाय सर्व मान्यतेचा शिक्का तिजला प्राप्त होत नाहीं असें आपल्या नेहमीं निदर्शनास येते. या दृष्टीनें स्वराज्यस्थापनेच्या कार्यासाठीं शिवाजी महाराजांनीं ज्या वरील तीन मार्गांचें अवलंबन केलें ते मार्ग आपल्याकडील स्मृति व नीतिशास्त्रादि ग्रंथ यांस कितपत मान्य आहेत याची चर्चा करणें जरूर आहे. मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतिग्रंथात त्याच प्रमाणें महाभारतादि इतिहासग्रंथ व कौटिल्यशुक्रादि राजनीतिग्रंथांत

स्वराज्य स्थापनेच्छू व्यक्तीस त्यानें त्याच्या कार्यांच्या सिद्धीस्तव कोणते मार्ग अवलंबिणें विहित आहे हें दर्शविलें आहे. शुक्रनीतीतील पहिल्या अध्यायाच्या ३८३ ते ३८५ या श्लोकात " कठीण काळीं राजानें डोंगरी किल्याचा आश्रय करून चोऱ्या मारामाऱ्या करून आपलें राज्य परत मिळवावें. त्याचप्रमाणें, राजाने चोराप्रमाणें शत्रुप्रदेशांतील सर्व संपत्ति लुटावी " असें नमूद केलें आहे. द्रव्य मिळविण्याचा वरील श्लोकांत वर्णन केलेला मार्ग राजनीतिदृष्ट्या फार पुरातनकाळापासून योग्य समजला असून स्मृति व नीतिवचनास अनुसरून शिवाजीमहाराजांनीं स्वराज्यस्थापनेस्तव द्रव्य संपादन केलें हें स्पष्टपणें सिद्ध होत आहे. महाभारताच्या शांतिपर्वाच्या १३२ व्या अध्यायांत आपत्काळीं राजानें कोणत्या प्रकारचें वर्तन करावें याविषयीं पुढील उल्लेख आला आहे. " ज्यावेळी आपद्धर्माचाच अवलंब करणे अवश्य असेल त्यावेळीं स्वराष्ट्र व परराष्ट्र यामधून द्रव्य संपादन करून राजानें चरितार्थ चालवावा. या सामान्य शास्त्राचे त्याने अवलंबन करावे. त्यांतूनहि जो बुद्धिमान् असेल त्या राजानें राष्ट्रामध्यें जे श्रीमान असूनहि कृपण व दंड करण्यास योग्य असतील त्यांजकडून द्रव्य ग्रहण करावे या शास्त्राचेच अवलंब करावे. "

महाभारताच्या शांतिपर्वाच्या १४० अध्यायांत कणिकोपदेश ह्मणून जें प्रकरण आहे त्यांतील खालील वचनें फार महत्त्वाची आहेत.

" सौम्य असो वा भयंकर असो, हवे तें कर्म करून आपला दीन दशेतून उद्धार करावा व सामर्थ्य आल्यानंतर धर्म करावा. शत्रूचे जे शत्रु असतील त्या सर्वांशीं सहवास ठेवावा आणि शत्रूंनी आपल्यावर ज्या गुप्त हेरांची योजना केली असेल त्यांजविषयीं माहिती मिळवावी; आपले हेर मात्र आपल्या शत्रूच्या पक्षास ओळखू येणार नाहीत असे करावे. "

शिवाजीमहाराजांनीं स्वराज्यस्थापनेच्या कार्यास सुरवात केल्यापासून तो त्यांचा राज्याभिषेक होई तो पर्यंत सुरत, बारशिलार, कारंजें, सुलतानपूर वगैरे अनेक शहरें व पेठा एकेकदा दोनदोनदा लुटून त्या ठिकाणाहून अपार संपत्ति त्यांनीं नेली. या लुटीबद्दल विदेशी इतिहासकार शिवाजी महाराजांना जो दोष देतात तो वरील वचनाच्या दृष्टीनें किती अस्थानी व चुकीचा आहे हें सहज दिसून येण्यासारखें आहे. शिवाजी महाराजांनीं लूट करून मिळविलेल्या अपार संपत्तीचा विनियोग त्यांनीं कोणत्या तऱ्हेनें केला या बाबीचाहि

त्यांना केलेली लूट नीति व धर्मशास्त्राच्या दृष्टीनें कितपत योग्य आहे हें ठरवितांना विचार करणें जरूर आहे. मन्वादि स्मृतींत राजानें राहाण्याकरितां कोणता देश पसत करावा या संबंधाची खालील वचनें प्रस्तुत मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें महत्त्वाचीं आहेत. ( मनुस्मृति अध्याय ७ श्लोक ६९।७१ )

**जाङ्गलं सस्य संपन्नमार्यप्राय मनाविलम् ॥**
**रम्यमानतसामन्तं स्वाजीव्यं देशमावसेत् ॥ ६९ ॥**
**धनदुर्गं महीदुर्गमब्दुर्गं वार्क्षमेव वा ॥**
**नृदुर्गं गिरिदुर्गंवा समाश्रित्य वसेत्पुरम् ॥ ७० ॥**
**सर्वेणतु प्रयत्नेन गिरिदुर्गं समाश्रयेत् ॥**
**एषां हि बाहुगुण्येन गिरिदुर्गं विशिष्यते ॥ ७१ ॥**

अर्थ— जांगलधान्यानें संपन्न; अनेक धार्मिक जनांनीयुक्त, रोग, उपसर्ग इत्यादिकांनीं अव्याकुळ, रम्य, ज्याच्या आसपास अरण्यांतील लोक नम्र आहेत, व जेथ कृषि, वाणिज्य इत्यादि जीवनोपाय सुलभ आहेत अशा देशांत रहावें. धनदुर्ग, महीदुर्ग, अब्दुर्ग, वार्क्षदुर्ग, नृदुर्ग व गिरिदुर्ग या दुर्गांतील कोणत्या तरी एका दुर्गाचा आश्रय करून नगर रचावें. या सर्व दुर्गांत अनेक गुणांनी युक्त असलेला गिरिदुर्ग प्रशस्त आहे.

या प्रमाणें मनुस्मृतीमध्यें राजानें राहाण्या करितां बांधावयाच्या नगरास योग्य अशा स्थळांचें वर्णन केले असून ७४ व्या श्लोकांत गिरिदुर्गाची महति कशांत आहे हें सांगितले आहे.

**एकः शतं योधयति प्राकारस्थो धनुर्धरः ॥**
**शतं दशसहस्राणि तस्माद्दुर्गं विधीयते ॥ ७४ ॥**

अर्थ— किल्यामध्ये राहणारा एक धनुर्धर १०० शत्रूंशीं लढतो व शंभर धनुर्धर दश सहस्र वीराशीं लढतात.

वरील प्रमाणें दुर्ग करण्याविषयीं मन्वादि मुनीनीं राजास उपदेश केला आहे. मन्वादि स्मृतिकारांचे काळी डोंगरी किल्यास जे महत्त्व होतें तेंच महत्त्व शिवाजी महाराजांनी स्वराज्य स्थापनेचा उपक्रम ज्या काळांत केला त्या काळांत हि कायम होते. किंबहुना शिवाजी महाराजांचे काळीं डोंगरी किल्यास विशेष महत्त्व प्राप्त झाले होतें असें त्या काळाच्या परिस्थतीचा बारकाईने विचार केला तर दिसून येणार आहे. महाराष्ट्रांत सर्वत्र मुसलमानी सत्ता प्रस्थापित झाली होती, मुसलमानांनीं ज्या सैन्याच्या जोरावर आपली सत्ता महाराष्ट्रांत स्थापित केली तें सैन्य डोंगरी किल्याचा आश्रय करून राहिलेल्या थोड्याशा

मराठी सैन्या पुढे हतवीर्य व निरुपयोगी ठरत असे ही गोष्ट शिवाजी महाराजांनीं स्वराज्यस्थापनेचा उपक्रम केल्यानंतर आदीलशाही व मोगली सैन्याबरोबर त्यांच्या ज्या झटापटी झाल्या त्या झटापटींत त्यास प्राप्त झालेल्या यशावरून दिसून येतें. शिवाजी महाराजांचे पश्चात् राजाराम महाराजांच कारकीर्दीत स्वराज्यरक्षणाप्रीत्यर्थ संताजी घोरपडे, धनाजी जाधवराव इत्यादि मराठा योध्याच्या हाताखालील मराठी सैन्यानें सतत पंचवीस तीस वर्षे औरंगजेबच्या प्रचंड सैन्याबरोबर जो यशस्वी झगडा चालू ठेविला त्यावरून हि डोंगरी किल्ल्यांचे महत्त्व त्या काळीं किती होतें हें सिद्ध होत आहे. स्वराज्यस्थापनेचा उपक्रम करण्यापूर्वी डोंगरी किल्यांचें महत्त्व शिवाजी महाराजांचे पूर्णपणे लक्ष्यांत आल्यामुळें आदिलशाही राज्यांतील डोंगरी किल्ले हस्तगत करणे अगर जरूर तेथे नवीन बांधणे हा शिवाजी महाराजाच्या स्वराज्यस्थापनेच्या कामगिरींपैकी एक महत्त्वाचा भाग होऊन बसला. शिवाजी महाराजांनीं लूट करून मिळविलेल्या अपरपार सपत्तीचा विनियोग जुन्या डोंगरी किल्ल्यांची डागडुजी व नवीन किल्ले बांधण्याकडे त्यानी केला. शिवाजी महाराजांनीं स्थापना केलेल्या स्वराज्यांत अंतर्भूत होणाऱ्या प्रदेशाचा भौगोलिक दृष्ट्या विचार केला तर हें राज्य सह्याद्रि पर्वताच्या शिखरावरील डोंगरी किल्ले व त्या डोंगरी किल्ल्यांच्या आसपास असलेला रक्षणीय प्रदेश याचे बनलेलें होतें असें दिसून येते. शिवाजी महाराजाच्या स्वराज्यांतर्गत प्रदेशाची भौगोलिक रचना या स्वरूपाची असल्या कारणाने आदीलशाही व मोगली राजकीय सत्तांचे त्यांनीं स्थापिलेल्या स्वराज्याचा नायनाट करण्याचे सर्व प्रयत्न निष्फळ ठरले. येथपावेतो केलेल्या विवेचनावरून स्मृत्यादि ग्रंथांतील त्याचप्रमाणें नीतिग्रंथांतील राजधर्म प्रकरणी जे धर्म सांगितले आहेत त्या धर्मास अनुसरून शिवाजी महाराजांनी लुटीनें मिळविलेल्या द्रव्याचा विनियोग स्वराज्य स्थापनेसारखा सर्वोत्कृष्ट महत्कार्याकडे केला असें कोणास हि कबूल करणें भाग आहे. शिवाजी महाराजांचे पश्चात् मराठ्यांनी शत्रुप्रदेशांत केलेल्या लुटीसंबधीं त्यास दोष देणें हें वरील विवेचनाचे दृष्टीने न्याय्य नाही. शत्रुप्रदेशांत लूट करणे ही गोष्ट कोणत्या हि राजनीतिशास्त्राच्या दृष्टीनें गर्हणीय समजण्यात येत नाहीं. मोगलांच्या सत्ते खालील कोणता हि प्रदेश मराठ्यांनीं सोडवून तो आपल्या राज्यांत सामील केल्यानंतर त्या प्रदेशांतील प्रजेस मराठे लुटीत असत असे विधान करण्यास कोणत्या हि प्रकारचा पुरावा पुढें आलेला

नाहीं. सन १८५७ सालच्या बंडांत झाशी शहर कर्नल ह्यूरोज यानें काबीज केल्यानंतर सतत तीन दिवस ह्यूरोजच्या सैन्यानें झाशी शहरांतील लोकांची तांब्यासारख्या हलक्या नाण्यापासून तों हिऱ्या माणका सारख्या मौल्यवान् पदार्थांपावेतो लूट केल्याची गोष्ट इतिहास प्रसिद्ध आहे. एकोणीसाव्या शतकांत सुधारलेल्या म्हणून समजल्या जाणाऱ्या इंग्रज लोकांनीं केलेली वरील प्रकारची लूट राजनीति दृष्ट्या गर्हणीय समजली जात नाहीं; तर वरील परिस्थितीपेक्षा हि भिन्न परिस्थितीत मराठ्यांनीं केलेल्या लुटीबद्दल त्यांस कां नांवें ठेवण्यात यावींत हें समजणें कठीण आहे. उत्तर हिंदुस्तानांतील जो जो प्रांत मराठ्यांनी मोगलापासून काबीज करून स्वराज्यांत सामील केला त्या प्रांतांतील मराठ्यांच्या राज्यव्यवस्थेबद्दल त्या प्रांतांतील लोकमत मराठ्यास कोणत्या हि प्रकारें प्रतिकूल असल्याचें तत्कालीन कागद पत्रांवरून दिसून येत नाहीं.

सारांश इतकाच कीं शिवाजी महाराजांनीं स्वराज्यस्थापना करण्यास्तव ज्या मार्गानें द्रव्य मिळविलें तो मार्ग धर्मास व नीतीस समत होता अशी कोणत्या हि मराठ्यांविषयीं पर्वग्रहानें कल्पित न झालेल्या माणसाची खात्री झाल्यावाचून राहणार नाहीं. आतां शिवाजी महाराजांनीं स्वराज्यस्थापना केल्या नतर राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें ज्या योजना अमलांत आणिल्या त्या श्रुतस्मृत्युक्त धर्मास अनुसरून कितपत होत्या याच्या चर्चेकडे वळूं. स्वराज्यस्थापनेस सुरवात केल्यानंतर जसजसा नवीन मुलूख शिवाजी महाराजांनीं संपादन केला व त्यांच्या राज्याचा विस्तार जसजसा होऊं लागला तसतशी त्यांची जबाबदारी व व्याप वृद्धिंगत होत चालला. मुसलमानी अमलाखालील प्रदेशावर स्वाऱ्या करून तो प्रदेश स्वराज्यांत सामील करावयाचा; युद्धामध्यें जातीनें हजर राहून लढवयाचें; स्वराज्यांतील प्रजेत उत्पन्न होणाऱ्या वादाचे निर्णय करावयाचे; जमिनीची पहाणी करून जमीन लागण करणाऱ्या कुळाकडून राजभाग किती घ्यावयाचा हे ठरवावयाचें; नवीन गड, कोट, किल्ले, इमारती बांधावयाच्या इत्यादि नूतन स्वराज्यसिद्धिसमवेत उत्पन्न होणारे व वृद्धिंगत पावणारे अनेक बिकट व्याप एकट्या व्यक्तीच्या हातून समाधानकारक रीतीनें पार पडणें शक्य नव्हतें. अशा स्थितींत एका व्यक्तीवर वरील सर्व व्यापांचा बोजा न पडतां श्रमविभागाचे तत्त्वास अनुसरून हे सर्व व्याप व्यवस्थित-रीतीनें पार पाडण्याची कांहीं तरी योजना अस्तित्वांत आणण्याची आवश्यकता शिवाजी महाराजास भासणें अगदीं स्वाभाविक होतें. ही योजना

कोणत्या स्वरूपाची करावी हा शिवाजी महाराजांपुढे स्वराज्यस्थापनेनंतर महत्वाचा प्रश्न होता. निव्वळ कार्यसौकर्याच्या दृष्टीनेच या प्रश्नाची सोडवणूक करावयाची असती तर शिवाजी महाराजांना खाली दर्शविलेल्या पद्धतीने हा प्रश्न सहज सोडविता आला असता. शिवाजी महाराजांनी स्वराज्यस्थापनेचा उपक्रम ज्या काळीं महाराष्ट्रांत सुरू केला त्या काळीं उत्तर हिंदुस्थानात मोंगल बादशाही राजघराण्याची सत्ता जोमदार स्थितींत नांदत होती. त्या सत्तेचा विस्तार भरतखंडाच्या बहुतेक सर्व प्रदेशावर झाला असून त्या सत्तेचा सूत्रे औरंगजेबसारख्या अत्यंत हुषार, निरलस व कार्यदक्ष अशा बादशाहाचे हाती होती. औरंगजेबच्या सत्ते खालील अफाट प्रदेशाचा राज्य कारभार चालविण्याकरिता एक विशिष्ट प्रकारची मोंगल राज्यपद्धति अस्तित्वात होती. त्याचप्रमाणें त्या काळीं दक्षिण हिंदुस्तानांत आदिलशाही राजसत्ता अस्तित्वांत असून त्या राज्यसत्तेचा विस्तार भरतखंडाच्या दक्षिणेकडील बऱ्याच मोठ्या प्रदेशावर झालेला होता. विजापूरच्या आदिलशाही राजसत्तेची हि विशिष्ट प्रकारची राज्यपद्धति त्या काळीं अस्तित्वांत होती. वरील दोन्ही राज्यसत्ता दीडदोनशे वर्षे अस्तित्वांत असून त्याच्या राज्याची घडी नीट रीतीने बसली होती व त्याचा राज्यकारभार सुरळीतपणे चाललेला होता. या दोन्ही सत्तांच्या राज्यपद्धति शिवाजी महाराजापुढे मूर्तिमत अस्तित्वात असल्यामुळे निव्वळ राज्य व्यवस्थेचे कार्य सुकर रीतीने पार पाडण्याच्या दृष्टीनेच हा प्रश्न शिवाजी महाराजास सोडवावयाचा असता तर त्यांनी स्थापन केलेल्या नूतन स्वराज्याची राज्यपद्धती वरील मोंगली अगर आदीलशाही राज्यपद्धतीच्या नमुन्याची बनविणें त्यांना बिलकूल कठीण गेले नसते. परंतु शिवाजी महाराजाच्या स्वराज्यस्थापनेच्या बुडाशी श्रुतिस्मृत्युक्त धर्म स्थापनेचे जे ध्येय होते त्या ध्येयाच्या दृष्टीने वरील रीतीनें हा प्रश्न सोडविणे त्यांना कधी हि मानवले नसते. महाराष्ट्रधर्मस्थापना हे शिवाजी महाराजांच्या स्वराज्य स्थापनेचे ध्येय असल्याकारणाने महाराष्ट्रधर्मास अनुसरून हा प्रश्न सोडविण्याची शिवाजी महाराजांची प्रवृत्ति व्हावी यात काही नवल नाही. हा प्रश्न शिवाजी महाराजांनी मनु याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतिग्रंथ व शुक्र चाणक्यादि नीतिग्रंथ यांतील राजधर्मप्रकरणीं कथन केलेल्या धर्मास अनुसरून सोडविला, असे यापुढे जे विवेचन आम्ही करणार आहोंत त्यावरून दिसून येईल. मन्वादि स्मृतिग्रंथ व शुक्रादि नीतिग्रंथांतर्गत राजधर्मप्रकरणांत राजाचे प्रजेसंबंधीं धर्म, राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें राजानें कोण

कोणते अधिकारी नेमावे व त्यांचेकडे कोणकोणतीं कार्य सोपवावीं इत्यादि बाबीं संबंधी साग्र विवेचन केलेले आहे. स्मृत्यादि ग्रंथांप्रमाणें च महाभारतादि इतिहासग्रथांत हि या विषयासंबंधीं विस्तृत विवेचन केलेलें आहे. धर्मस्थापनेकरितां स्वराज्य स्थापनेस प्रवृत्त झालेल्या शिवाजी महाराजासारख्या श्रुतिस्मृत्युक्त धर्माभिमानी क्षत्रिय राजानें उत्तरेकडील मोंगली व दक्षिणेकडील आदिलशाही राजयंत्राचे नमुने झुगारून देऊन स्मृति व नीतिग्रंथांत कथन केलेल्या राजधर्म प्रकरणांतील पद्धतीस अनुसरून आपल्या नूतन स्थापिलेल्या स्वराज्याचे राज्ययंत्र बनवावें ही गोष्ट उचित होती. येथपावेतों केलेली चर्चा निवळ अनुमानिक स्वरूपाची आहे. प्रत्यक्ष पुराव्याच्या दृष्टीनें विचार केला असतां वरील अनुमान बरोबर आहे असें दिसून येईल. आपले पुरातन महाभारतादि इतिहासग्रंथ त्याचप्रमाणें मनु याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतिग्रंथ याचेमध्यें वर्णिलेल्या पूर्वकालीन राज्यपद्धतीत व शिवाजी महाराजांनीं स्थापिलेल्या अष्टप्रधानयुक्त राज्यपद्धतींत कोणत्या बाबतींत सादृश्य व कोणत्या बाबतींत भिन्नता आहे इत्यादि बाबीसबंधीं थोडी फार स्थलचर्चा या ठिकाणीं करून तीवरून वर दर्शविलेलें अनुमान कितपत सत्य ठरतें याची शहानिशा करण्याकडे आह्मी आतां वळतों. प्रथम महाभारतांत या विषयासंबंधीं कोणत्या प्रकारचे उल्लेख आहेत, ते आपण पाहू. महाभारताच्या शांतिपर्वाच्या ८३ व्या अध्यायांत मंत्र्याचे ठिकाणीं कोणते गुण व लक्षणें असावीं यांचें प्रथम वर्णन करून नंतर खालील प्रकारचा उल्लेख केलेला आहे.

" सारांश या पूर्वोक्त सर्व गुणांनीं युक्त असणारे प्रजेच्या मताचें ज्ञान असणारे, व ज्यांना मोठें कृत्य करण्याची इच्छा असेल असे निदान तीन तरी पुरुष राजाचे मत्री असावे. "

याच पर्वाच्या ८५ साव्या अध्यायांत युधिष्ठिराच्या प्रश्नास भीष्मांनीं खालील उत्तर दिल्याचा उल्लेख आहे.

" विद्यानिष्ठ, प्रौढ, अध्ययन पूर्ण झालेले आणि शुचिर्भूत असे चार ब्राह्मण, बलाढ्य व हातीं शस्त्र बाळगिणारे आठ क्षत्रिय, द्रव्यसंपन्न एकवीस वैश्य, आणि नित्य कर्माचरण करून शुचिर्भूत झालेले व विनय-संपन्न असे तीन शूद्र तूं अमात्य कर. "

याच अध्यायांत खालील प्रकारचा उल्लेख आढळून येतो.

" आठ मंत्र्यांमध्ये बसून राजाने ज्याविषयीं मसलत करावयाची

आहे ती गोष्ट ऐकून घ्यावी. आणि तिचा निर्णय झाल्यावर ती राष्ट्रामध्यें प्रसिद्ध करावी व राष्ट्रावरील अधिकाऱ्यास हि दाखवावी. " मनुस्मृति ग्रंथाची रचना महाभारताच्या रचनेनंतर झालेली आहे या विषया संबंधीं मनुस्मृतीतील वचनें महाभारतांतील वचनांहून हि अधिक स्पष्ट असून महत्त्वाची आहेत.

मौलाञ्छास्त्रविदः शूराँल्लब्धलक्षान्कुलोद्गतान् ॥
सचिवान्सप्त चाष्टौवा प्रकुर्वीत परिक्षितान् ॥ ५४ ॥
अपि यत्सुकरं कर्म तदप्येकेन दुष्करम् ॥
विशेष तोऽसहायेन किंतु राज्यं महोदयम् ॥ ५५ ॥

अर्थ- ' पितामहादि क्रमानें सेवा करणारे, दृष्टादृष्टार्थ शास्त्रास जाणणारे, पराक्रमी, आयुधविद्येंत निपुण असणारे, शुद्ध कुलांत उत्पन्न झालेले,व ज्यांची उत्तम प्रकारें परीक्षा घेतली आहे असे राजानें सात किंवा आठ मंत्री करावे कारण अगदीं सहज होणारे असें जे कर्म असतें, तेंहि एकास दुष्कर होतें.मग विशेषे करून ज्याचें महाफल आहे असें राज्य एकट्याच्यानें कसे करवेल. "

वरील उताऱ्यांत राजानें सात अगर आठ मंत्री नेमावे असा उल्लेख करण्यांत आलेला आहे. परंतु या सात अगर आठ मंत्र्यांच्या संज्ञांचा उल्लेख, त्याचप्रमाणें निरनिराळ्या मंत्र्यानें कोणकोणती कामे करावी, याचा साग्र व तपशीलवार उल्लेख मनुस्मृतींत एके ठिकाणीं आलेला नाहीं. मनुस्मृतीच्या सातव्या अध्यायाच्या तिसाव्या श्लोकांत मंत्री, सेनापति, पुरोहित या तिघा मंत्र्यांच्या संज्ञांचा उल्लेख आहे. छत्तिसाव्या श्लोकांत आमात्याचा; व ५५ व्या श्लोकात सचिवाचा उल्लेख आलेला आहे. सचिवासमवेत संधि-विग्रहाचें राजाने चिंतन करावें असें ५५ व्या श्लोकांत वर्णन आहे. ५६ व्या श्लोकांत प्राप्त झालेल्या धनाचा सत्पात्रीं व्यय करण्याविषयीं अमात्यासह राजानें विचार करावा असा उल्लेख करण्यांत आलेला आहे. ६३ व्या श्लोकांत दूत या अधिकाऱ्याचें वर्णन केलेलें असून त्याने करावयाच्या कार्याचें स्वरूप दर्शविले आहे. अशा प्रकारचे त्रोटक उल्लेख अष्टप्रधान संस्थेसंबंधीं मनुस्मृतीत आढळतात. मनुस्मृतिइतकाच पुरातन ग्रंथ म्हटला म्हणजे साम्राट चंद्रगुप्ताचा मंत्री जो कौटिल्य अथवा चाणाक्य यानें केलेला अर्थशास्त्र हा ग्रंथ होय. या ग्रंथांत अष्टप्रधान संस्थेसंबधीं मनुस्मृतींत ज्या स्वरूपाचे उल्लेख आहेत तशा स्वरूपाचे उल्लेख आढळण्यांत येत नाहींत. राज्यकारभाराचे सोयी करितां निरनिराळीं खातीं निर्माण करून त्या खात्यांवर कोणकोणत्या गुणानें युक्त असे अधिकारी राजानें नेमावे व त्या अधिकाऱ्यांनीं कोणकोणतीं कामे करावीं याचे

विस्तृत वर्णन कौटिल्याच्या ग्रंथांत केलेलें आढळते. परंतु शिवाजी महाराजांनीं स्थापन केलेल्या अष्टप्रधान संस्थेतील निरनिराळ्या मंत्र्यांच्या संज्ञा व त्यांनीं करावयाचीं कामें या विषयींचे ज्या स्वरूपाचे उल्लेख मनुस्मृतीत आढळतात तशा स्वरूपाचे उल्लेख कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत आढळत नाहींत ही गोष्ट निर्विवाद आहे. कौटिल्याच्या अर्थशास्त्रानंतर बऱ्याच काळाने रचला गेलेला विस्तृत असा नीतिग्रंथ म्हटला म्हणजे शुक्रनीति हा होय. शुक्रनीतीचे दुसरे अध्यायात अष्टप्रधान संस्थे संबंधीं साग्र व तपशीलवार माहिती दिली आहे. राजाने राज्य-कारभाराचे सोयीसाठीं किती मंत्री नेमावे; व त्यांचेकडे कोणकोणतीं कामें संपवावीं; त्यांचे ठायीं गुण कोणते असावे; इत्यादि बाबींचे तपशीलवार वर्णन शुक्रांनी आपले ग्रंथांत केलें आहे त्याचे आम्ही थोडक्यांत दिग्दर्शन करितों. शुक्रानीं खालील दहा मंत्र्यांचा आपल्या ग्रंथांत उल्लेख केला आहे. ( १ ) पुरोधा ( २ ) प्रतिनिधि ( ३ ) प्रधान ( ४ ) सचिव ( ५ ) मंत्री ( ६ ) प्राडविवाक ( ७ ) पंडित ( ८ ) सुमंत्र ( ९ ) अमात्य ( १० ) दूत.

वरील दहा मंत्र्यांचा उल्लेख करून कोणतीं कार्यें वरील मंत्र्यांच्या अधिकारांतलीं समजलीं जात असत याचे शुक्रानें आपले ग्रंथांत दिग्दर्शन केलं आहे. कांहीं मंत्र्यांच्या ठिकाणीं कोणत्या प्रकारचे गुण असावे याचाहि निर्देश शुक्राने केलेला आहे.

**विपरीतगुणैरेभिर्भृतको निन्द्य उच्यते ॥**
**ये भृत्या हीनभृतिका ये दण्डेण प्रकर्षिता ॥ ६५ ॥**
**शठाश्च कातरा लुब्धाः समक्षं प्रियवादिनः ॥**
**मत्ता व्यसनिनश्चार्त्ता उत्कोचेग्राश्च देविनः ॥ ६६ ॥**
**नास्तिका दाम्भिकाश्चैवासत्यवाचोऽप्यसूयका ॥**
**ये चाप मानिता येऽसद्वाक्यैर्मर्मणि भेदिताः ॥ ६७ ॥**
**रिपोर्मित्राः सेवकाश्च पूर्वं वैरानुबन्धिनः ॥**
**चण्डाः साहसिका धर्महीना नैते सुसेवकाः ॥**
**संक्षेपस्तु कथितं सदसद् भृत्यलक्षणम् ॥ ६८ ॥**

मागे सांगितलेल्या गुणांच्या विरुद्ध गुणांनीं युक्त असलेला सेवक निंद्य समजावा, ज्या सेवकाचें वेतन अल्प असून ज्यास कांहीं दोषांमुळें शिक्षा घडून फिरून कामावर रुजू करून घेण्यांत आले आहे, तसेंच जो धूर्त, लोभी तोंडपूजा, मद्यसेवनरत, व्यसनाधीन, रोगी, लांचखाऊ, द्यूतासक्त, पुनर्जन्मावर विश्वास न ठेवणारा, ढोंगी, असत्यवादी, दोषरूपानें दुसऱ्याचे गुण

प्रकट करणारा, कांहीं निमित्तानें ज्याचा अपमान झालेला आहे असा पूर्ववैरी, अतितामसी, साहसी, धर्महीन असा मनुष्य चांगला सेवक नव्हे. सक्षेपानें चांगल्या व वाईट सेवकांचीं लक्षणे ही समजावी.

**समासतः पुरोधादिलक्षणं यत् तदुच्यते ॥**
**पुरोधाश्च प्रतिनिधिः प्रधानः सचिवस्तथा ॥ ६९ ॥**
**मन्त्रीच प्राडविवाकश्च पण्डितश्च सुमन्त्रकः ॥**
**अमात्यो दूत इत्येता राज्ञः प्रकृतयो दश ॥ ७० ॥**
**दशमांशाधिकाः पूर्वं दूतान्ताः क्रमशः स्मृताः ॥**
**अष्टप्रकृतिभिर्युक्तो नृपः कैश्चित् स्मृतः सदा ॥ ७१ ॥**

अर्थ—" पुरोधा इत्यादिकांचीं लक्षणें संक्षेपानें सांगतो–पुरोधा, प्रतिनिधि, प्रधान, सचीव, मंत्री, प्राडविवाक, पंडीत, सुमत्रक, अमात्य, दूत हे दहा राजाच्या प्रकृति आहेत. यांचें वेतन प्रत्येक पुढच्याच्या दशमांशानें अधिक असावें. "

**सुमन्त्र पण्डितो मन्त्री प्रधानः सचिवस्तथा ॥**
**अमात्यः प्राडविवाकश्च तथा प्रतिनिधिः स्मृतः ॥ ७२ ॥**
**एता भृतिसमास्त्वष्टौ राज्ञः प्रकृतयः सदा ॥**
**इङ्गिताकारतत्त्वज्ञो दूतस्तदनुगः स्मृतः ॥ ७३ ॥**

अर्थ —" सुमंत्र, पंडित, मत्री, प्रधान, सचीव अमात्य, प्राडविवाक व प्रतिनिधि हे आठ सेवक राजाच्या अष्टप्रकृति असून या सर्वांचें वेतन सारखेच असावें असें म्हणणारा एक दुसरा पक्ष आहे. या सर्वांच्या लक्षणावरून त्यांचें हृद्गत जाणणारा दूत या नांवाचा राजाचा सेवक असतो व त्याचें वेतन वरील सेवकांच्या इतकेच असतें.

**पुरोधा प्रथमं श्रेष्ठः सर्वेभ्यो राजराष्ट्रभृत् ॥**
**तदनुस्यात प्रतिनिधिः प्रधानस्तदनन्तरम् ॥ ७४ ॥**
**सचिवस्तु ततः प्रोक्तो मन्त्री तदनु चोच्यते ॥**
**प्राडविवाकस्ततः प्रोक्तः पण्डितस्तदनन्तरम् ॥ ७५ ॥**
**सुमन्त्रस्तु ततःख्यातो ह्यमात्यास्तुततः परं ॥**
**दूतस्ततः क्रमादेते पूर्वं श्रेष्ठा यथागुणाः ॥ ७६ ॥**

अर्थ—" धार्मिक विधीने राष्ट्राची विघ्ने नष्ट करणारा असा पुरोधा सर्वांत श्रेष्ठ समजावा, त्याच्या खालोखाल प्रतिनिधी, प्रधान, सचीव, मत्री, प्राडविवाक, पंडित, सुमंत, आमात्य, व दूत हे क्रमान्वयें श्रेष्ठ दर्जाचे समजावे."

मन्त्रानुष्ठानसम्पन्नस्त्रैविद्यः कर्मतत्परः ॥
जितेन्द्रियो जितक्रोधो लोभमोहविवर्जितः ॥ ७८ ॥
षड्ङ्गवित साङ्गधनुर्वेदविच्चार्थ धर्म्मवित् ॥
यत् कोपभीत्या राजापि धर्मनीतिरतो भवेत् ॥ ७९ ॥
नीतिशस्त्रास्त्रव्यूहादिकुशलस्तु पुरोहितः ॥
सैवाचार्य्यः पुरोधा यः शापनुग्रहयोः क्षमः ॥ ८० ॥

अर्थ—मन्त्रानुष्ठान संपन्न, त्रिविद्यासंपन्न ( ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद यांना जाणणारा ) कार्य त्वेरेनें करणारा, जितेंद्रिय, क्रोध लोभ मोहरहित, व्याकरणादि षडांगें जाणणारा, सांग धनुर्वेद जाणणारा, धर्म व नीतिशास्त्राचें तारतम्य जाणणारा, ज्याच्या क्रोधाच्या भीतीनें राजा हि धर्म व नीतितत्पर राहील, नीतिशास्त्रज्ञ, शास्त्रविद्या व व्यूहरचना इत्यादिकांत प्रवीण असा जो पुरोहित, शापानु ग्रह समर्थ असलेला त्यास च आचार्य समजावें.

विनाप्रकृतिमन्त्राद्राज्यनाशो भवेद् ध्रुवम् ॥
रोधनं न भवेत् तस्मात् राज्ञस्तस्युः समान्त्रिणः ॥ ८१ ॥

अर्थ " पूर्वी सांगितलेल्या आठ किंवा दहा प्रकृतीशीं राजानें विचार विनिमय न केला तर त्यामुळें राज्याचा नाश खात्रीनें होईल. म्हणून राजानें ह्या सर्वां समवेत सर्व कार्यांचा विचार करावा. "

न बिभेति नृपो येभ्यस्तैःस्यात् किं राज्यवर्धनम् ॥
यथालङ्कारवस्त्राद्यैः स्त्रियो भूष्या स्तथा हिते ॥ ८२ ॥

अर्थ—"ज्यांची भीति राजाला वाटत नाहीं त्यांचेकडून राज्य वृद्धिंगत पावणें शक्य नाहीं. वस्त्रालंकारादि भूषणांनीं स्त्रियांस सजवून संभाळावयाच्या तद्वतच अशा प्रकारचे मंत्री ठेवणें समजावें. "

राज्यं प्रजा बलं कोशः सुनृपत्वं न वर्द्धितम् ॥
यन्मन्त्रोऽरिनाशस्तैर्मन्त्रिभिः किं प्रयोजनम् ॥ ८३ ॥

अर्थ—" ज्या मंत्र्यांच्या हातून राज्य, प्रजा, बल, कोश सुराज्य वृद्धिंगत होत नाहीं किंवा शत्रूचा नाश होत नाहीं त्या मंत्र्याचें प्रयोजन काय आहे ? " ( असे मंत्री असून नसून सारखे च समजावे )

कार्य्याकार्य्य प्रविज्ञाता स्मृतः प्रतिनिधिस्तुसः ॥
सर्वदर्शी प्रधानस्तु सेनावित् सचिवस्तथा ॥ ८४ ॥

अर्थ—" कार्य अकार्य यांचा विचार करण्यांत कुशल असा जो मंत्री त्यास प्रतिनिधि समजावा; सर्व कार्यावर देखरेख करणारा तो प्रधान, सैन्यावर देखरेख करणारा सचीव. "

मन्त्रीतु नीतिकुशलः पण्डितो धर्मतत्त्ववित् ॥
लोकशास्त्रनयज्ञस्तु प्राडविवाकः स्मृतः सदा ॥ ८५ ॥

अर्थ—" नीतिशास्त्रानुसार अमलबजावणी करण्यांत कुशल असलेला मंत्री, धर्मशास्त्रविशारद तो पंडित व लोकाचार व शास्त्रनियम जाणणारा तो प्राडविवाक समजावा. "

देशकाल प्रविज्ञाता ह्यमात्य इति कथ्यते ॥
आयव्यय प्रविज्ञाता सुमन्त्रः स च कीर्तितः ॥ ८६ ॥

अर्थ—" देशकालानुरूप कार्य करण्यांत कुशल तो अमात्य, आवक व खर्च यांची माहिती असणारा तो सुमंत्रक समजावा. "

इङ्गिताकार चेष्टज्ञ स्मृतिमान देशकालवित् ॥
षाडगुण्यमन्त्रविद्ग्मीवीतभीर्दूत इष्यते ॥ ८७ ॥

अर्थ-" इंगित आकार, चेष्टा जाणणारा; धड आठवणीचा; देशकालानुरूप कार्य जाणणारा; संधिविग्रहादिक सहा गुण जाणणारा; वाक्पटु व निर्भय असा दूत समजावा. "

अहितश्चापि यतकार्य्यं सद्यःकर्त्तुं यदोचितम् ॥
अकर्तुं येद्धितमपि राज्ञः प्रातिनिधिः सदा ॥ ८८ ॥
बोधयेत् कारयेत् कुर्य्यान्न कुर्यान्न प्रबोधयेत् ॥
सत्यं वा यदि वा सत्यं कार्य्यजातञ्च यत् किल ॥ ८९ ॥
सर्वेषां राजकृत्येषु प्रधानस्तद्विचिन्तयेत् ॥
गजानाञ्च तथाश्वानां रथानां पद्गामिनाम् ॥ ९० ॥
सुदृढानां तथोष्ट्राणां सद्य एवहि ॥
वाद्यभाषासु कुतव्यूहाभ्यसनशालिनाम् ॥ ९१ ॥
प्राक् प्रत्यग गामिनां राज्यचिन्हशस्त्रास्त्रधारिणाम् ॥
परिचारगणानां हीनमध्योत्तम कर्म्मणाम् ॥ ९२ ॥
अस्त्राणामस्त्रजातीनां सङ्ख्तुरगीगणः ॥
कार्य्यक्षमश्च प्राचीनः साध्यस्कः कतिविद्यते ॥ ९३ ॥
कार्य्यासमर्थः कत्यस्ति शस्त्रगोलाग्निचूर्णयुक् ॥
सांग्रामिकश्च कत्यस्ति सम्भारस्तान् विचिन्त्य च ॥ ९४ ॥
सचिवश्चापि तत् कार्य्यं राज्ञेसम्यक् निवेदयेत् ॥
सामदानञ्च भेदश्च दण्डः केषु कदा कथम् ॥ ९५ ॥
कर्तव्यः किं फलं तेभ्यो बहु मध्यं यथाल्पकम् ॥
एतत् सञ्चिन्त्य निश्चित्य मन्त्री सर्वं निवेदयेत् ॥ ९६ ॥

अर्थ—"एकादी गोष्ट हितप्रद नसतांना सुद्धा तात्पूर्ती अमलांत आणणें, अवश्य असले तर ती करावयास सांगणें, किंवा हितप्रद असलेली गोष्ट विशिष्ट काळीं करणे योग्य नसेल तर तिचा निषेध करणें, हें प्रतिनिधीचें कर्तव्य आहे. राजकारणामध्यें खरें किंवा खोटें जें ज्या वेळेस जसें करावयास पाहिजे असेल, तशा प्रकारचा राजास सल्ला देणें, हें प्रधानाचें कर्तव्य आहे. गज, घोडे, रथ, पायदळ, भक्कम ऊंट व बैल, नानाप्रकारच्या वाद्यभाषा जाणणारे, निरनिराळ्या खुणा करण्यांत कुशल असलेले, सैन्याची विशिष्टरचना करणारे, सैन्याच्या अघाडीस जाणारे; व मागे राहणारे राजचिन्हें व शस्त्रास्त्रें धारण करणारे; त्याचप्रमाणे उत्तम मध्यम व अधम कामें करणारे सेवक; निरनिराळ्या प्रकारचीं अस्त्रें व उपास्त्रें जाणणारे; घोडेस्वारांचे समूह — ( त्यांत जुने कसलेले व नूतन किती, वेळीं उपयोगी पडणारे व न पडणारे किती. ) यांची माहिती असणारे; शस्त्रे, गोळे, दाहकपदार्थ इत्यादि युद्धोपयोगीपदार्थ, या सर्वांसबंधीं पूर्ण माहिती मिळवून ती राजास निवेदन करणे हे सचिवाचें कर्तव्य आहे. साम, दाम, दंड, भेद यां पैकीं कोणत्या ठिकाणीं कशाचा अवलंब केला असतां उत्तम, मध्यम अगर अल्पफळ प्राप्त होईल याचा विचार करून तो राजास निवेदन करणें हे मंत्र्याचे काम आहे."

साक्षिभिर्लिखितैर्भोगैश्छलैर्भूतैश्चमानुषान् ॥
स्वेनोत्पादितसम्प्राप्य व्यवहारान् विचिन्त्य च ॥ ९६ ॥
दिव्यसंसाधनाद्वापि केषु किं साधनं परं ॥
युक्तिप्रत्यक्षानुमानोपमानैर्लोकशास्त्रतः ॥ ९७ ॥
बहुसम्मतसंसिद्धान् विनिश्चित्य सभास्थित ॥
ससभ्यः प्राडविवाकास्तु नृपं संबोधयेत् सदा ॥ ९८ ॥

अर्थ— " प्राडविवाकानें सभ्यासह सभेत बसून साक्षी, लेख, भोगवटा, खऱ्या खोट्या गोष्टीमुळें निर्माण झालेले अगर प्रजेपैकीं दोन व्यक्तींत उत्पन्न झालेले वाद अथवा व्यवहार यांचा बहुमतानें युक्ति, प्रत्यक्ष अनुमान, उपमान, लोकव्यवहार व शास्त्र यांच्या साह्यानें अथवा दिव्यादिकांच्या आश्रयानें निर्णय ठरेल तो राजास निवेदन करावा."

वर्तमानाश्च प्राचीना धर्माः के लोकसंश्रिताः ॥
शास्त्रेषु के समुद्दिष्टा विरुध्यन्ते च केऽधूना ॥ ९८ ॥

**लोकशास्त्रविरुद्धाः के पंडितस्तान विचिन्त्यच ॥**
**नृपं संबोधयेत् तैश्च परत्रेह सुखप्रदैः ॥ ९९ ॥**

अर्थ– " चालू व पुरातन काळचे लोकांत रूढ असलेल्या धर्मापैकीं शास्त्रास अनुसरून किती आहेत; व लौकिक व शास्त्र यांचे विरुद्ध किती आहेत; यांचा शोध करून त्यांपैकीं इहलोकीं व परलोकीं सुखप्रद कोणते आहेत याचा शोध करून त्या संबंधीं राजास माहिती देणें हें पंडिताचें काम आहे. "

**इयच्च संञ्चितं द्रव्यं वत्सरेऽस्मिन् तृणादिकम् ॥**
**व्ययीभूतमियच्चैव शेषं स्थावरजंगमम् ॥**
**इयदस्तीति वै राज्ञे सुमन्त्रो विनिवेदयेत् ॥ १०० ॥**

अर्थ— " स्थावर जंगम सर्व प्रकारच्या पदार्थांचा संचय चालू वर्षांत किती झाला, त्याच प्रमाणे व्यय किती झाला व शिल्लक काय आहे हे सुमंत्र यानें राजास निवेदन करावें "

अष्टप्रधान सस्थेसबंधीं प्राचीन ग्रंथांतील उल्लेखांचें दिग्दर्शन येथ पावेतों आम्हीं केलें आहे. या उल्लेखावरून अष्टप्रधानसंस्था निर्माण करून तद्वारा राज्यकारभार चालविणें हें स्मृत्यादि ग्रंथांत व नीतिग्रंथांत सांगितलेल्या क्षत्रिय राजाच्या अनेक कर्तव्यांपैकीं एक कर्तव्य समजलें जात असें हें सिद्ध होत आहे. खुद्द शिवाजी महाराजांचे काळीं व त्यांचे पश्चात् प्राचीन नीतिग्रथांच्या धर्तीवर मराठी भाषेंत रचले गेलेले नीतिग्रंथ अलीकडे प्रसिद्ध झाले आहेत. रामचंद्र निळकंठ अमात्य व मल्हार रामराव चिटणीस कृत राजनीति, नारायण व्यवहार शिक्षा हे राजनीतीचे ग्रंथ मराठी राज्याचे अमदानींत रचिले गेल्याचें प्रसिद्ध आहे. या नीतिग्रंथांत अष्टप्रधान संस्थेबद्दल कोणत्या प्रकारचे उल्लेख आढळतात याचें दिग्दर्शन या ठिकाणीं करणें जरूर आहे. पुराव्यांच्या दृष्टीने हे लेख अत्यंत महत्त्वाचे आहेत. खुद्द शिवाजी महाराजांचे हयातीत रामचंद्र नीलकंठ अमात्य हे राजकारण पटु म्हणून प्रसिद्धीस पावले होते. शिवाजी महाराजांनी मरते समयीं त्यांच्या पश्चात् मराठी राज्याची कशी वाताहात होईल व त्या वाताहातींतून त्या राज्याचा बचाव कोण करील या बद्दलचें भविष्य केल्याचा सभासदकृत शिवचरित्रांत उल्लेख आहे. तिघे ब्राह्मण व तिघे मराठे मोडलेलें राज्य सावरतील असें शिवाजीमहाराजांनीं भाकित केलें होतें. या तिघा ब्राह्मणां पैकीं रामचंद्र नीलकंठ हे एक होते. या एका गोष्टीवरून रामचंद्र नीलकंठ यांचा

राजकारणी पुरुष या दृष्टीनें केवढा मोठा अधिकार होता हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. अशा प्रकारच्या अधिकारी पुरुषानें रचिलेल्या राजनीति ग्रंथांतील अष्टप्रधान संस्थेसंबंधीं माहिती अत्यत महत्त्वाची असली पाहिजे हें उघड आहे. या ग्रंथांतील ( मराठीशाहीतील राजनीति अथवा आज्ञापत्र प्रकरण ४ पान १८ ) अष्टप्रधान संस्थेसंबंधीं उतारा आम्ही खाली देतों:—

" राज्यामध्यें हुजुरात गड, किल्ले, लष्कर. हशम, यांचा नियम करणें; प्रजार्ति निवारण करणें; प्रजा संरक्षणे; धर्माधर्म विचारून पाहणें; यथाकालीं दान देणें, सेवक लोकांचीं केलीं वेतनें पावविणें; समयाचे समयीं प्रजेपासून करभार घेणें; संपादिलेले पदार्थांचा संग्रह करणें; नित्यानित्य राज्याचा अयव्यय पाहणें; स्थूल, सूक्ष्म, अतीत, अनागत, कार्य सुचोन त्या त्या कार्यानुरूप अगोदर त्याचा विवेक योजणें; देशोदेशीं वार्तिक प्रेरून वर्तमान आणविणें; समय विशेषें शत्रूशीं संधि, विग्रह, उपेक्षा जें कर्तव्य त्याचा यथोचित विवेक करून तदनुरूप प्रवर्तन करणें; आहे राज्य त्याचें संरक्षण करून नूतन संपादणें; व अधर्मप्रवृत्ति मोडून धर्माभिवृद्धि करून शाश्वत लोक अर्जिणें; इत्यादिहि सकळ नृपकार्यच आहेत. परंतु केवळ नृपानें स्वनांच इतकाहि धंदा करीन म्हणतां होतो असें नाहीं. या करितां हा सकळ राज्यभार चालवावया कारणे आपले प्रतिनिधि प्रधान करावे लागतात. प्रधानाविरहित राज्यकारभार चाळणेंच नाहीं. मागे जे जे राजे झाले त्यांणीं स्वहित चित्तांत आणून राज्यभारार्थ प्रधान निर्माण केले. त्यांचें आपणातुल्य बहुमान वाढवून राज्यभार चालविले. प्रधान म्हणजे राज्यलक्षणप्रहाचे स्तंभ आहेत; राज्य ते यथोचित संरक्षून नूतन निर्माण करणें याचे मुख्य कारण; प्रधान म्हणजे नृपसत्ताप्रसारक; प्रधान म्हणजे प्रजापाळन धर्मसंरक्षणाचे अध्यक्ष; प्रधान म्हणजे राजमद जनित अन्याय सागराची मर्यादा; प्रधान म्हणजे हस्तीचें अंकुश; किंबहुना प्रधान म्हणजे इहलोकी राज्यकृत्य संपादनामुळें नृपाची विश्रांति; धर्मप्रतिपालनामुळें परलोकपंथाची दीपिका. प्रधानापेक्षां राजे लोकांस इतर आप्त अधिकोत्तर किमपि नाहीं. सकळ सेवकापेक्षां प्रधानाचा बहुमान विशेष आहे; प्रधान हेच राजे लोकांची बाजू; प्रधानच राजबंधू असे राजेलोकीं पूर्ण चित्तास आणून लक्षणिक प्रधान पाहून करावें त्यावर संपूर्ण राज्यभार ठेवावा. प्रधान म्हणजे सरकारकून..............सरकारकून म्हणजे कुलीन, कृतकर्मे, कार्याकार्यविचक्षण, शास्त्रज्ञ, राजधर्मविशारद, पापभीरु, स्वामिसेवकभाव म्हणून वर्तेत, दैवतैकनिष्ट, दर्शनीय, सदयशूर, सधैर्य, समंजस,

स्फुटवक्ता, निरालस्य, निरग्रही, निर्व्यसनी, निष्पाप, पुण्यशील, उद्योगशील, अतीत, अनागत, कार्यसूचक, आलालुब्धि, अहिंसक, साम, दाम, भेद, दंड संधिविग्रह, मित्रभेद, मित्रसंधानादि अनेक उपायें शत्रुसधानी चतुर इत्यादि गुणसंपन्न असे पाहून त्यास सरकारकुनी ( म्हणजेच प्रधानकी ) सांगावी. "

वरील उताऱ्यांत रामचंद्र नीळकंठ यांनीं प्रधान नेमण्याची आवश्यकता; त्यांच्याकडे सोपवावयाचीं कामे. व त्यांचे ठिकाणीं लागणारे आवश्यक गुण; यांचें त्रोटक व मार्मिक विवेचन केले आहे. शिवाजी महाराजांनीं जी अष्टप्रधानसंस्था निर्माण केली व प्रत्येक प्रधानाकडे जी कामे सोंपविलीं त्या बद्दलचा जो लेख आम्ही पुढें नमूद करणार आहोंत त्या लेखांतील अष्टप्रधानापैकीं प्रत्येक प्रधानाकडे सोपविलेल्या कामाची तुलना वरील उताऱ्यांतील निरनिराळया प्रधानांनीं करावयाच्या कार्याशीं केली असतां रामचंद्र नीळकंठानीं लिहिलेल्या राजनीति ग्रथांत त्यांचे काळीं निर्माण केलेल्या अष्टप्रधानसंस्थेचेंच वर्णन त्यांनीं केलें आहे कीं काय असा भास होतो. रामचंद्र नीळकंठ यांनीं निरनिराळ्या प्रधानपदाच्या सज्ञा आपल्या ग्रथांत नमूद केल्या नाहींत हा या ग्रथात एक उणेपणा आहे. परतु त्यामुळें वरील उताऱ्याचे व त्यावरून निघणाऱ्या अनुमानाचें महत्त्व कमी होतें अशांतला भाग नाहीं.

रामचंद्र नीळकंठ यांचे राजनीतींतील अष्टप्रधान संस्थे संबंधीं केलेल्या उल्लेखाचें दिग्दर्शन केल्यानतर मल्हाररामरावकृत राजनीतीकडे आता आपण वळूं. मल्हार रामराव यांची राजनीति वाचून पाहिली असतां पुरातन नीतिग्रंथापैकी शुक्रनीति ग्रथाचे आधारं ती रचली गेली असावी असे कोणाचेंहि अनुमान झाल्यावांचून राहणार नाहीं. या ग्रंथाच्या २५ व्या पानातील खालील उल्लेख फार महत्त्वाचे आहेत:—

" राजा, पट्टराणी, राजपुत्र, युवराज ऐसे तीन, अष्टप्रधान व लेखकद्वय ऐसे त्रयोदश यास राजमडल असें ह्मणावें. " राजमंडलची याप्रमाणे व्याख्या करून २९ वे पानांत ग्रथकारानें अष्टप्रधानांच्या संज्ञा खालीलप्रमाणें दिल्या आहेत:- मुख्यप्रधान, सेनापति, अमात्य ( ' सपूर्ण राज्यांतील कोश व द्रव्य यांचा ' अय व्यय होईल त्याचें लेखन गणक कारितील ते राजास समजाविणें ) सचिव ( राजपत्रे होतील त्यांवर देखरेख करणें त्याचे ठायीं कुशळ आमंत्रण निमंत्रण करणें ), सुमंत ( संपूर्ण राज्यांतील राजकारणें संरक्षून

राजास समयाचे समयास निवेदन करणें ) छंदोगामात्य, पंडितराय-वेदशास्त्र संपन्न यांचे ठायीं कुशल असावे, थोरथोर ब्राह्मण, शास्त्रज्ञ, वेदज्ञ, स्वराज्यांतील परराज्यातील याचकवृत्तिसाठीं येतील त्यांचीं स्वरूपें यथायोग्य जाणून त्यांचे सत्कार करून राजास विदित करून राजापासून सत्कार करवावे, विद्वान् यांच्या सभा राजासन्निध करणे; देवतार्चन समयीं करून धर्माधर्मविविक्षा करावी; देशकालांच्या ठायीं यज्ञयागादि जें करणें तें सुचवून करीत असावें; एखादियास प्रायश्चित देणे व न्यायरूप दंडास जो जसा योग्य असेल त्याची विविक्षा शास्त्रसम्मत करून राजास सांगून करवणें; सकल दानें करविणें; हे कृत्य पंडितरावप्रधान याचे. प्रायश्चित्त पत्रावरील सम्मत. न्यायाधीशसपूर्णन्याय, राष्ट्र, देश व नगरांतील वृत्ति आदिकरून मनास आणावें निवाडे पत्रे करावीं; निवाड्याचीं राजपत्रें होतील त्यावर सम्मत चिन्ह त्यांचें असावें. '

मल्हाररामरावकृत राजनीतींत अष्टप्रधानांच्या संज्ञांचा व ते पद धारण करणाऱ्या प्रधानांनी करावयाच्या कार्याच्या स्वरूपाचा वरील प्रमाणे उल्लेख आहे.

आता शिवाजी महाराजांनीं जी अष्टप्रधान संस्था स्थापित केली त्या संस्थेचे स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें त्याचें निरिक्षण करूं.

इतिहास आणि ऐतिहासिक मासिकाच्या विविध विषयाच्या एकविसावे पानावर एक चिटणिशी जाबता छापिला आहे. त्या जाबत्यांत निरनिराळ्या प्रधानपदावर अधिष्ठित असणाऱ्या व्यक्तीकडे सोंपीवण्यांत आलेल्या कार्याचें स्वरूप खालीं दर्शविल्याप्रमाणे दिले आहे.

१ मुख्य प्रधान—यानी सर्व राज्यकार्य करावें; राजपत्रावरी शिका करावा; सेना घेऊन युद्धप्रसंगी स्वारी करावी; तालुका स्वाधीन होईल त्याचें रक्षून बंदोबस्त करून आज्ञेने वर्तावें; सर्व सेनासरदार याजबरोबर जावें; सर्व समते चालावे.

२ अमात्य—यार्णी सर्व राज्यांतील जमाखर्च चौकशी करून दप्तरदार फडणीस याचे स्वाधीन असावें. लिहिणें चौकशीने अकारावे. फडणिशी चिटणिशी पत्रावर निशाण करावे; युद्धप्रसंग करावें; तालुका जतन करून आज्ञेत चालावें;

३ सेनापति—यार्णी सर्व शैन्य रक्षण करून युद्धप्रसंग स्वारी करावी; तालुका स्वाधीन होईल तो रक्षून हिशोब रुजू करून आज्ञेनें वर्तावें. फौजेचें लोकाचें बोलाणें बोलावें; सर्व फौजेचें सरदार यार्णी त्याजबरोबर चालावें.

४ * पंडितराव—यांणीं सर्व धर्माधिकार धर्मअधर्म पाहून विविक्षा करावी; शिष्टेचे सत्कार करावे; आचार, व्यवहार प्रायश्चित्त पत्र होतील त्यांजा वर समत चिन्ह करावें; दान प्रसग शांति अनुष्ठान तत्काळ करावे;

५ न्यायाधीश—यांणीं सर्व राज्यांतील न्याय अन्याय मनास आणून बहुत धर्मेकरून न्याय करावे;

६ सचिव—याणी राजपत्रे शोध करून उणें अक्षर मजकूर शुद्ध करावी, युद्धप्रसंग करून तालुका स्वाधीन होईल तो रक्षून आज्ञेत वर्तावें. राजपत्रावर चिन्ह समत करावे.

७ मत्री—याणी सर्व मंत्र विचार राजकारणें यांतील सावधनेतेन विचार करावे; आमत्रण निमंत्रण, वाकीनिशी याचे स्वाधीन. तालुका जतन करून युद्धादि प्रसंग करावे; राजपत्रावर समत चिन्ह करावे.

८ सुमंत—याणी परराज्यांतील विचार करावा; त्याचे वकील येतील त्याचे सत्कार करावे; युद्धादि प्रसंग करावे; राजपत्रावर समत चिन्ह करावें.

शिवाजी महाराजांनीं स्थापन केलेल्या अष्टप्रधान संस्थेतील पदें धारण करणाऱ्या व्यक्तींनीं करावयाच्या कार्यांचे स्वरूप वरील जाबत्यांत दर्शविलें आहे. मल्हारामराव कृत राजनीतींत व जाबत्यांत प्रत्येक प्रधानानें करावयाच्या कार्यांचे वर्णिलेले स्वरूप यांत कोणत्याहि प्रकारची

---

* टिपः—"इतिहास संग्रह मासिकांत भोसल्याचे कुलाच्यार" प्रसिद्ध झाले आहेत. त्यांत पंडितराव या प्रधानानें करावयाच्या कार्यांचे स्वरूपाविषयींचा खालील उल्लेख महत्वाचा असल्या कारणानें तो आम्ही येथ देतों.

### जाबता पंडितराव

१ पंडितराव यांनी प्रातःकाळीं स्नानसंध्या आटपून एक घटका दिवसाच्या आंत सरकारचे देवघरात येऊन नित्यदानाचे व अनुष्ठानाचे ब्राह्मण व नैमित्य ज्या दिवशीं करणे त्याची देखरेख सावधगिरीनें ठेऊन, ब्राह्मण अनुष्ठान कसे करित याचें मनन करून सरकार आज्ञेप्रमाणे आपले काम करीत जाणे. दस्तुराप्रमाणें चालवयाचे कायदे. बितपशील.—

१ शास्त्रार्थ पडेल तो यथायुक्त सांगावा.

१ आचार व्यवहार, प्रायश्चित देववणें त्याची सरकार आज्ञा होत जाईल त्याप्रमाणें शास्त्रार्थाअन्वये करीत जावें.

१ अनुष्ठान करविणें व नित्यदान व नैमित्तिक देणें त्याचे काम तुमचे हातें घेतलें जाईल.

भिन्नता आढळून येत नाहीं. आतां चिटणीसकृत राजनीतींतील व जाबत्यांतील प्रधानानीं करावयाच्या कार्याचें स्वरूप शुक्रनीतितील प्रधानानीं करावयाच्या कार्याच्या स्वरूपाशी कितपत जुळतें याची या ठिकाणीं थोडक्यांत चर्चा करणें जरूर आहे. शुक्रनीतींत पुरोधा या नावाच्या प्रधानानें करावयाच्या कार्याचें जें वर्णन दिलें आहे त्या वर्णनाशीं शिवाजी महाराजांनी स्थापिलेल्या अष्टप्रधान संस्थेपैकीं कोणत्या हि प्रधानानें करावयाच्या कार्याशीं जुळते असल्याचें आढळून येत नाहीं. मुख्यप्रधान, पडीत, न्यायाधीश, आणि अमात्य या प्रधानांनीं करावयाच्या कार्याचे स्वरूप शुक्रनीतीत जे वर्णिलें आहे तें स्वरूप चिटणीसकृत राजनीतींतील व जाबत्यांतील याच प्रधानांनीं करावयाच्या कार्याशीं पूर्णपणें जुळतें आहे. बाकी राहिलेल्या प्रधानापैकीं सचीव या प्रधा-

---

टीप चालु-१ कुंड मंडप व शांतिक पुष्टिक पुस्तक धरून सदस्य आचार्यत्व करणे ते पंडितराव यांनीं करावे. गुमास्त्याचे हातून चालणार नाहीं प्रसंगीं पंडितराव नसल्यास त्यांचे भाऊबंद असतील त्यांनीं करावे.

१ दानप्रसंगाच्या यादी लिहून ब्राह्मण सांगावें व ब्राह्मण भोजन हव्यकव्य उत्साहा संबंध होईल, त्यास वाकनीस याचे गुजारतीनें करावें.

१ सणाचे व समारंभाचे दिवशीं सरकारचा सत्कार करावयाचा तो आम्ही अगोदर करावा व सरकारानीं आमचा करावा म्हणोन कलम लिहिले आहे. त्याप्रमाणें सरकारातून चालविलें जाईल.

१ कार्यप्रस्थ व नित्यनैमित्तिक व तीथ पर्वणीस दानधर्म जो विधी येईल, तो पूर्वे दिवशीं सरकारास विनंती करून आज्ञा होईल त्याप्रमाणे कारभारी यास कळवून त्यांचे साहित्यार्ची याद लिहून सिध्दता राखावी. आज्ञेप्रमाणे करीत जावें.

१ दूरस्थ व क्षेत्रस्थ ब्राह्मण हद्दीतील येतील त्यास राजदर्शन करवून यथा योग्य सत्कार करावयाविसी विनंती करावी आज्ञा होईल त्याप्रमाणे करावें

१ सरकारचे राशीस ग्रह इष्ट अनिष्ट यांची चालना नित्यानित्य ठेऊन ग्रहांची दानें द्यावयाचा विधी करणें तो पूर्व दिवशीं सरकारास श्रुत करून, आज्ञा होईल त्याप्रमाणें कारभारी व देवघराकडील कारकून यास कळवून, साहित्यार्ची तयारी कामगार याजकडून करवून, दानें व विधी करणें तो करवीत जाणें

१ कचेरीस शिष्ट आलियास त्याची पूजा सत्कार करून निरोप द्यावा.

---

१०
० लंग

---

१

नानें करावयाच्या कार्याचें स्वरूप जाबत्यांत व चिटणीसकृत राजनीतींत जे वर्णिलें आहे त्याहून शुक्रनीतींत वर्णिलेल्या याच प्रधानानें करावयाच्या कार्याचे स्वरूपाहून भिन्न आहे. शुक्रनीतींत सेनापतीची गणना प्रधानामध्ये केलेली नाहीं. सेनापतीने करावयाच्या कार्याचें स्वरूप शुक्रनीतींतील सचिव या प्रधानानें करावयाच्या कार्याचे स्वरूपाशी बरेंच जुळतें आहे. शिवाजी महाराजांनीं स्थापन केलेल्या अष्टप्रधान संस्थेसंबंधी जी एक एक महत्वाची बाब लक्षांत ठेवावयाची ती ही की पंडित व न्यायाधीश या दोन प्रधानाखेरीज बाकीच्या सर्व प्रधानाकडे सोपविण्यात आलेल्या विशिष्ट कार्याखेरीज " युद्धादि प्रसंग करणे " असे एक सर्वसाधारण कार्य या प्रधानांचे अमल्यांत जाबत्यात नमूद केलें आहे. शुक्रनीतींत " युद्धादि प्रसंग करणे " हें वरील प्रधानाचे कार्य असल्याचे नमूद नाहीं. शिवाजी महाराजांनी स्थापन केलेल्या स्वराज्याचा प्रसार सर्व भरतखंडभर अल्प काळात व्हावा अशी त्याची महत्वाकांक्षा असल्याकारणानें तत्कालीन परिस्थिति लक्षात घेऊन पुरातन नीति ग्रंथांत न आढळणारे असे " युद्धादि प्रसंग करणे " हे एक कार्य वरील प्रधानांनीं करवयाच्या कार्यात समाविष्ट केलें असावें असे सहजच अनुमान निघते. जाबत्यांत नमूद असलेल्या सेनापतीची गणना अष्टप्रधानासंस्थेमध्ये केव्हापासून होऊं लागली हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. शुक्रनीति ग्रथानतर रचिल्या गेलेल्या भोजराजाच्या युक्तिकल्पतरु या नांवाच्या राजनीतिशास्त्रावरील अलीकडे प्रसिद्ध झालेल्या ग्रंथात राज्यकारभाराचे कामी राजास मदत करण्याऱ्या अधिकाऱ्याचा उल्लेख खालील श्लोकात केला आहेः—

> गुरुः पुरोहितोऽमात्यः मंत्री दूतश्च लेखकः ॥
> ज्योतिर्विच्छुद्धान्तः पुराध्यक्षः बलाध्यक्षादिकः क्रमात ॥

अर्थ— " गुरु, पुरोहित, अमात्य, मंत्री, दूत, लेखक, ज्योतिषी, जनानखान्यावरील अधिकारी आणि सेनापति हे राजाचे मदतनीस होत. वरील उल्लेखावरून भोजराजाचे कालापासून सेनापतीचा समावेश अष्टप्रधान—संस्थेत करण्याचा प्रघात सुरु झाला असावा असे अनुमान करणें गैरवाजवी होणार नाहीं. या प्रघातास अनुसरून शिवाजीमहाराजानी स्थापन केलेल्या अष्टप्रधान संस्थेत सेनापतीचा समावेश केला असण्याचा संभव आहे.

आता पावेतो केलेल्या चर्चेवरून शिवाजीमहाराजांनी महाभारत, स्मृति व नीतिग्रंथ इत्यादिकांचे आधार परिस्थित्यनुरूप योग्य ते फेरफार करून अष्टप्रधान हा संस्था स्थापन केली असली पाहिजे हे सिद्ध होत आहे. रावबहादुर कीर्तने यांनी प्रसिद्ध केलेल्या शिवाजीमहाराजांच्या सभासद बखरणात्मक चरि-

त्रांतील अष्टप्रधान संस्थेच्या स्थापनेविषयींचा उल्लेख पुराव्याच्या दृष्टीने फार महत्त्वाचा आहे. शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेचें ध्येय महाराष्ट्रधर्मस्थापना हेंच होतें हा सिद्धांत स्वराज्यांतील मराठ्यांच्या राज्यव्यवस्थेच्या सर्व साधारण धोरणापैकीं कांहीं बाबींवरून स्थापित होतो असें या भागाच्या सुरवातीस आम्ही जे विधान केलें व जे विधान सिद्ध करण्याकरितां आतांपर्यंतची चर्चा केली त्याच विधानाचा स्पष्ट उल्लेख वरील चरित्राचे १६६।१६७ पानावर आहेः----

'याप्रकारें महाराजांनीं राज्याभिषेक समारंभ व तरतूद अत्यद्भुत केली. धर्मस्थापना करून राज्य करण्याचे धर्म यवनाक्रांत पृथ्वी होऊन लोपले होते ते पुन्हा जीर्णोद्धार करून स्थापिले+++ अष्टप्रधान यांचे व्यापार पूर्वीची शास्त्रपद्धति काढून चालों पाहून केले'

या उल्लेखाचे योगानें आह्मी वर दर्शविलेला सिद्धांत बराबर असल्याचें ठरत आहे. या मुद्यासंबंधी आह्मी जी चर्चा केली आहे त्या चर्चेवरून सप्त प्रकरणात्मक चरित्रांतील वरील उल्लेख बखरकाराचे कल्पनासृष्टींतील नसून तो ऐतिहासिक सत्यकथनाचे स्वरूपाचा आहे असें निर्विवादपणें सिद्ध होत आहे.

आतां क्षत्रियवर्णी राजा या नात्यानें शिवाजी महाराजांच्या वर्तनाच्या धोरणासंबंधीं उल्लेख करून त्या विषयीं थोडी फार चर्चा आम्ही करितों. शिवाजी महाराजाचे पूर्वी भरतखंडांत क्षत्रिय अगर अन्यवर्णाचे जे राजे होऊन गेले त्यांचें प्रमुख ध्येय मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतिग्रंथांत सांगितलेल्या धर्मास अनुसरून स्वतः आचरण करावयाचें व प्रजेकडून करवावयाचें हें होतें. स्वराज्यस्थापना करण्यात शिवाजी महाराजाचें ध्येय स्वधर्म स्थापना हें होतें या विषयींची सामान्य चर्चा आम्हीं पूर्वी केलीच आहे. या भागांत शिवाजी महाराजांच्या राजकीय धोरणापैकीं स्वधर्म स्थापना हेंच स्वराज्य स्थापनेचें ध्येय होतें हें ज्या बाबीवरून व्यक्त होत आहे त्या बाबींचे दिग्दर्शन करण्याचें ठरविलें असल्या कारणानें राज्याचे संस्थापक व रक्षक या नात्यानें खुद्द शिवाजी महाराजांच्या वर्तनाचें धोरण कोणत्या स्वरूपाचें होतें याचें आह्मी दिग्दर्शन करितों.

या मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें चिटणीसकृत राजनीतींतील खालील उल्लेख फार महत्त्वाचा आहेः---

" दंडनीति म्हणजे न्याय अन्याय विचारयुक्त याचें नांव दंडविद्या होय. याचें फळ न्याय अन्याय पाहून शासन केलें असतां अधोगतीप्रती न जातां उत्तम गतीतें राजा पावतो. आणखीही तर्क, शास्त्रें वेदांत, मीमांसा, मनुस्मृति या सर्व अभ्यासांत असाव्या. ब्राह्मण क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे चार वर्ण यांचे धर्म; व ब्रम्हचारी गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यासी हे चारी आश्रम; यांचे धर्म यांचे सांगितल्या विद्या यांत आहेत ते जाणोन वर्णाश्रमधर्म ज्याचे त्याजपासून करवून धर्म सरक्षण करावा. संपूर्ण विद्या व आश्रमधर्म यांची प्रवृत्ति करणारा भूपति याणे या विद्यांचा अनादर केल्यास सर्वही धर्माचा लोप होतो यास्तव आपण करवून सर्वप्रजा यांजपासून करवाव्या. विद्यांचा लोप झाला असतां धर्माचा लोप होतो. धर्मनाश पावला असतां वर्णसंकर होऊन सर्वही अधःपात पावतात. या करितां वर्णाश्रमधर्म जाणून रक्षण करणारा राजा याणें सांगितलें प्रकारें करून वर्णाश्रम धर्म रक्षण केले असतां इच्छिलें फळ पावतो " ( चिटणीस कृत राजनीति पान १८ )

चिटणीसकृत राजनीतींतील वरील तत्त्वे शुक्र नीतीच्या चौथ्या अध्यायांतील चौथ्या पोटभागाच्या ४० व्या श्लोकात ग्रथित केली आहेत.

**स्वस्वजात्युक्त धर्मोयः पूर्वैराचरितःसदा ॥**
**समाचरच्च सा जातिर्दण्ड्या स्यादन्यथा नृपैः ॥ ४० ॥**

अर्थ " ज्या त्या जातीच्या लोकांनीं त्या त्या जातीस विहित असे जे धर्म सांगितले आहेत त्यास अनुसरून आचरण करावे. याप्रमाणें त्यांनीं आचरण न ठेविल्यास राजानें त्यास दंड करावा. " वर दिलेल्या तत्त्वास अनुसरून शिवाजीमहाराजानीं आपलें धोरण ठेविल होते ही बाब त्यांचे गुरु समर्थ रामदासस्वामी यांनीं " महाराष्ट्रधर्म राहिला कांहीं तुम्हाकरितां " असे जे त्यांचे विषयीं उद्गार काढिले आहेत त्यांवरून सिद्ध होत आहे.

आतां शिवाजीमहाराजांचे पश्चात् अष्टप्रधानसंस्थेची स्थिति काय झाली या विषयीं थोडी बहुत चर्चा करणे जरूर आहे. मराठी साम्राज्य लयास जाई तों पर्यंत ही संस्था पूर्णपणे नष्ट झाली असें नाही. प्रत्येक प्रधानाकडे जीं जीं कार्यें सोपाविण्यात आलीं होतीं तदनुसार थोडा बहुत अधिकार त्या त्या प्रधानाकडे असे.मराठी राज्य ज्या परिस्थितींत निर्माण झालें व त्याची त्वरित वाढ ज्या परिस्थितींत झाली ती लक्ष्यांत घेतली असतां या संस्थेच्या शिरोभागीं असणारा राजा शिवाजीमहाराजांच्या ऐपतीचा व कर्तृत्वाचा असता तर ही संस्था दृढमूळ होऊन मराठी राज्याचा एक सजीव घटक या नात्यानें अस्तित्वांत राहिली

असती. परंतु शिवाजी महाराजांचे पश्चात् मराठी राज्याचीं सूत्रें धारण करणारा त्यांच्या सारख्या ऐपतीचा व कर्तबगारीचा छत्रपति निर्माण झाला नाहीं. शिवाय अष्टप्रधान संस्थेतील मुख्य प्रधानाचें घराण्याखेरीज इतर प्रधानांची जी घराणीं होतीं त्या घराण्यांत मुख्य प्रधान भट पेशवे यांच्या घराण्यांतील कर्तबगार पुरुषासारखे पुरुष कोणी निर्माण झाले नाहींत. यामुळे शिवाजीमहाराजांचे पश्चात् ही संस्था नामधारी स्वरूपांत अस्तित्वात राहिली व त्यानंतर तिच्यांत सजीवता अशी कधींच आली नाहीं. शाहू छत्रपतींचे कारकिर्दींत नानासाहेब पेशवे मुख्य प्रधानपदावर असतांना प्रधानपदावरील व्यक्तीस कमी करण्याचा अधिकार चालविण्यास शाहूमहाराजांनी कमी केलें नाहीं. परतु त्या काळची एकंदर परिस्थिति लक्ष्यांत घेऊन त्यांच्या धोरणी व चाणाक्ष स्वभावास अनुसरून सर्व भरतखंडभर पसरेल्या मराठी राज्याचा भार पेलण्याच्या ऐपतीची व्यक्ती त्या काळच्या महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांत नानासाहेब पेशव्याखेरीज दुसरी कोणीहि शाहूमहाराजास न आढळल्या कारणानें त्यांनी त्यास मुख्य प्रधानपदावरून दूर करण्याचा विचार सोडून दिला. कोणती हि विशिष्ट संस्था विशिष्ट हेतूनें निर्माण करणें व ती संस्था निर्माण केल्यानंतर मूळ स्वरूपांत कायम राहणें या दोन बाबी अगदी स्वतंत्र आहेत. विशिष्ट परिस्थितीमुळे निर्माण केलेली संस्था कांहीं कारणामुळें विकृत झाली तर ती संस्था मूळ ज्या हेतूने निर्माण करण्यांत आली त्या हेतूंचे महत्त्व व त्यावरून निघणारे अनुमान यास कोणत्या हि प्रकारें कमीपणा येत नाहीं. या दृष्टीने विचार केला असतां अष्टप्रधानसंस्था शिवाजीमहाराजांच्या पश्चात् विकृत झाल्यामुळे ती संस्था निर्माण करण्यांत त्यांच्या मूळ हेतूस कमीपणा येत नाहीं हे उघड आहे. अष्टप्रधानसंस्थेपैकीं पंडितराव प्रधान याचेकडे सोपविण्यांत आलेल्या कार्यासंबधीं प्रस्तुत स्थळी विशेष चर्चा करणे अवश्य आहे. मुसलमानांची राजकीय सत्ता महाराष्ट्रांत प्रस्थापित होण्यापूर्वी हे प्रधानपद धारण करणाराचें महत्त्व विशेष होतें असें नाहीं. कारण मुसलमानांचा प्रवेश भरतखंडांत होण्यापूर्वी या देशांतील मानवी समाज व त्या समाजाचे नियत्रण करणारे राजे श्रुतिस्मृत्युक्त धर्मास अनुसरून वर्तन करणारे असेच होते. परंतु मुसलमानांची राजकीय सत्ता महाराष्ट्रांत प्रस्थापित झाल्यानंतर महाराष्ट्रीय समाजांत फार मोठें स्थित्यंतर घडून आलें श्रुतिस्मृत्युक्त धर्म आणि मुसलमानी धर्म यांचा आचारविषयक त्याच प्रमाणें परमार्थसाधनविषयक बाबतींत तीव्र

अशा प्रकारचा विरोध आहे. शिवाजीमहाराज अवतीर्ण होसतोंपर्यंत मुसलमानी धर्मास राजकीय सत्तेचा पाठिंबा असल्या कारणाने त्या धर्मास फार महत्त्व आलें होतें. मुसलमानी धर्माचा प्रसार हे एक च प्रमुख ध्येय मुसलमानी राज्यसत्तेचें होतें. या कारणामुळे मुसलमानांच्या राजसत्तेचा धर्मदृष्ट्या महाराष्ट्रीय समाजावर फार अनिष्ट परिणाम घडन आला. श्रुतिस्मृत्युक्त धर्माचा मुख्य पाया वर्ण व जाती याचेवर उभारिलेला. तर मुसलमानी धर्म जातीभेद न मानणारा. होमहवन, यज्ञयाग, मूर्तिपूजा इत्यादि बाबी स्मृत्युक्त धर्मास मान्य; तर मुसलमानी धर्मास या गोष्टी अत्यंत अप्रीय. गोब्राह्मण यांचे रक्षण करणे हे स्मृत्युक्त धर्माचें मुख्य ध्येय; तर मुसलमानी धर्मानुयायी लोकांची त्यांचेवर अत्यंत करडी नजर. वरील दोन्ही धर्मात अशा प्रकारचा विरोध अस्तित्वांत होता. मुसलमानी राजकीय सत्ता अस्तित्वात येण्यापूर्वी महाराष्ट्राची राजकीय सूत्रे क्षत्रिय वर्णी राजाचे हातीं असल्या कारणाने वरील बाबींचें उत्तम प्रकारें पाळन व रक्षण होत असे. महाराष्ट्रीय समाजापैकीं कोणत्याहि व्यक्तीने वरील बाबतींत स्मृत्युक्त धर्माविरुद्ध आचरण केल्यास त्यास क्षत्रियवर्णी राजा कडून शासन करण्यांत येत असे. यामुळे श्रुतिस्मृत्युक्त धर्मास अनुसरून आचरण करणारा मानवी समाज महाराष्ट्रांत अस्तित्वांत होता. मुसल्मानी राज्यसत्तेच्या योगानें वरील प्रकारच्या महाराष्ट्रीय समाजाचे स्वरूप पार पालटून जाऊन त्या समाजांत अत्यत महत्त्वाचे फेरफार घडून आले. राजकीय सत्ता मुसलमानधर्मीय लोकांचे हातात गेल्या कारणानें महाराष्ट्रीय समाजांतील कोणत्या हि व्यक्तीने श्रुतिस्मृत्युक्त धर्माविरुद्ध आचरण केल्यास त्यास त्याबद्दल दंड अगर प्रायश्चित होण्याची भीति नष्ट झाली. मनुष्यप्राणी स्वभावतः बंधन-तिरस्कारी व स्वेच्छाचारप्रिय आहे. श्रुतिस्मृत्युक्त धर्माचा मुख्य कटाक्ष या मानवी प्राण्याच्या स्वाभाविक वृत्तीस आळा घालण्याचा आहे. महाराष्ट्राची राजकीय सूत्रें श्रुतिस्मृत्युक्त धर्माशी विरोध करून त्याचे उच्चाटण करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या मुसलमानधर्मी लोकाचे हातांत गेल्या कारणाने व वर्णाश्रमधर्माचें परिपालन करणारी राजकीय सत्ता महाराष्ट्रांत राहिली नाहीं असें त्या समाजांतील लोकाचे निदर्शनास आल्यामुळे वर्णाश्रमधर्माची कडक बंधनें झुगारून देण्याची प्रवृत्ति महाराष्ट्रीय समाजाच्या निरनिराळ्या वर्णातील व जातींतील लोकांत उत्पन्न झाली व थोड्या च काळांत वर्णाश्रमधर्मविहितआचार महाराष्ट्रीय समाजात अस्तंगत होण्याचे मार्गास लागला [illegible] लोप महाराष्ट्रीय समाजांत होण्याः

दुसरें हि एक बलवत्तर कारण झालें. मुसलमानधर्मी लोकांचे हातांत राजकीय सत्ता गेल्या कारणानें ते लोक समाजाच्या अग्रस्थानी जाऊन बसले. अर्थातच श्रेष्ठ पदावर अधिष्ठित झालेल्या लोकांच्या आचारविचारांचें अनुकरण करण्याची लालसा महाराष्ट्रीय समाजांतील निरनिराळ्या वर्णाच्या व जातीच्या लोकांमध्ये उत्पन्न झाली. आहार, पोषाख, राहणी, भाषा, इत्यादि बाबतीत महाराष्ट्रीय समाजातील लोक मुसलमानांचें अनुकरण करूं लागल्यामुळें श्रुतिस्मृत्युक्त आचार महाराष्ट्रीय समाजांत ओहोटीस लागला. हिंदुधर्मीय लोकांपैकीं कनिष्ट वर्गातील कित्येक लोकांनी मुसलमानी धर्म स्वीकारिला. वरिष्ठ वर्णांपैकीं कित्येक आपखुषीनें व कित्येक वतनें, इनाम, जहागिरी याचें रक्षण करण्याच्या हेतूनें मुसलमान झाले. अशा रीतीनें श्रुतिस्मृत्युक्त धर्माची पिछेहाट चोहो बाजूंनीं महाराष्ट्रीय समाजांत झाली. शिवाजी महाराज अवतीर्ण होण्यापूर्वी श्रुतिस्मृतिप्रणीत धर्म कशाशीं खातात याची कल्पना हि महाराष्ट्रातील सामान्य जनतेस राहिली नाहीं. नामदेव, एकनाथ इत्यादि तत्कालीन साधुसंतांनीं महाराष्ट्रीय समाजाचीं जीं वर्णनें केलीं आहेत त्यावरून श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माचा लोप महाराष्ट्रीय समाजांत कशा प्रकारचा झाला होता याची कल्पना होण्यासारखी आहे. अशा प्रकारच्या परिस्थितींत शिवाजी महाराजांनीं श्रुतिस्मृत्युक्त धर्माचें पुनरुज्जिवन करण्यास्तव स्वराज्यस्थापनेचा खटाटोप केला. तो त्यांचा खटाटोप सिद्धीस गेल्यानंतर त्यांच्या सत्तेखालीं नांदत असलेल्या चातुर्वर्णीय महाराष्ट्रीय समाजातील निरनिराळ्या वर्णांच्या व जातींच्या लोकांकडून त्यांच्या वर्णास व जातीस विहित अशा प्रकारचें आचरण त्यांचेकडून करविण्याची जबाबदारी क्षत्रियवर्णी राजा या नात्यानें शिवाजी महाराज यांचेवर पडली. ही जबाबदारी उत्तम रीतीनें पार पाडण्याकरितां अष्टप्रधानसंस्थेपैकीं पंडितराव या नांवानें प्रसिद्ध असलेल्या प्रधानाची शिवाजीमहाराजांनीं योजना केली. शुक्रनीतीमध्यें पंडितराव प्रधानानें धर्माधर्माचा विचार करून त्या बाबतींत राजास सल्ला द्यावा, इतकेंच त्याच्या कार्याचें स्वरूप दर्शविलें आहे. आचार व्यवहार, प्रायश्चित्त इत्यादि बाबींवर देखरेख करून त्याप्रमाणें अम्मल करावा अशा प्रकारचा स्पष्ट उल्लेख शुक्रनीतीमध्यें आढळत नाहीं. परंतु चिटणीस कृत राजनीति व जाबता यांच्यामध्यें पंडितराव प्रधानानें करावयाच्या कार्याचें जें स्वरूप वर्णन केलें आहे त्यामध्यें धर्माधर्माची विविक्षा करणें; आचार, व्यवहार, प्रायश्चित्त इत्यादि बाबी संबंधीं पत्रें होतील त्यांवर सम्मत चिन्ह

करावें असा उल्लेख करण्यांत आला आहे. मागें राजाराम छत्रपतींच्या ध्येयाच्या स्वरूपाविषयींची चर्चा करीत असतां त्या काळीं पंडितराव प्रधानपद धारण करणारे श्रीकराचार्य पंडितराव यांच्या मुद्रेविषयीं आह्मी जे विवेचन केलें आहे त्या विवेचनावरून पंडितराव प्रधानाचें महत्त्व कोणत्या कारणामुळें समजले जात असें हें उघड होत आहे. त्या चर्चेची पुनरावृत्ति आह्मी ह्या ठिकाणीं करूं इच्छीत नाहीं परंतु ते विवेचन चर्चाविषयक मुद्याच्या दृष्टीनें महत्त्वाचे आहे. अष्टप्रधान संस्थेसंबधीं येथपावेतो चर्चा केल्यानंतर आतां इतर कांहीं बाबींच्या चर्चेकडे वळूं. कोणत्या हि समाजाचें वैशिष्ट्य ज्या बाबीवरून समजण्यांत येतें त्या बाबींमध्यें धर्म, भाषा, पेहराव या प्रमुख होत. शिवाजीमहाराज अवतीर्ण होण्यापूर्वी धर्म व भाषा या दोन विशिष्ट बाबीं पैकीं महाराष्ट्रीय धर्माप्रमाणें च मराठी भाषेवर मुसलमानी राजकीय वर्चस्वाचे दुष्परिणाम घडले होते. या बाबतींत स्वराज्यस्थापना केल्यानतर शिवाजी महाराजांनी फार मोठी महत्त्वाची कामगिरी केली. त्या कामगिरीच्या स्वरूपाचे थोडक्यात दिग्दर्शन आह्मी करितो.

**मराठी भाषा उद्धार**:-मुसलमानाची सत्ता महाराष्ट्रांत स्थापन झाल्यानंतर फारशी भाषेस महत्त्व प्राप्त होऊन दरबारी भाषा ती झाली व तिनें मराठी भाषेचे उच्चाटन केलें. मुसलमानांच्या सहवासानें मराठी भाषेत शेंकडो फारशी शब्द घुसले. हा प्रकार बेसुमार घडून आला; असें त्या काळच्या उपलब्ध झालेल्या शेंकडो मराठी लेखांत शेंकडा पन्नास ते पंच्याहत्तर फारशी शब्द वापरलेले आढळतात त्यावरून दिसून येते. अशा प्रकारची मलीनता मराठी भाषेस मुसलमानांच्या संसर्गानें आली.

॥ नवदेद् यावनीं भाषां प्राणे कंठ गतैऽरपि ॥

असे सुप्रसिद्ध वचन आपल्यामध्यें फार पुरातन काळापासून रूढ आहे. मुसलमानी राजसत्ता महाराष्ट्रात स्थापित झाल्या कारणानें या वचनास अनुसरून वागणें महाराष्ट्रीय समाजातील लोकांस दुरापास्त झालें. सरकारदरबारांत राजमान्यतेमुळें फारशी भाषेस अग्रस्थान प्राप्त झाल्या कारणानें कारकुनी पेशा पाटे भरणाऱ्या शेंकडों ब्राह्मणास फारशी भाषा शिकून तींत प्राविण्य संपादन करणें भाग पडत असे. व्यंकटाध्वरि या नांवाच्या कानडी कवीनें मराठ्यांचे जे अनेक दोष दर्शविले आहेत त्यात महाराष्ट्रीय ब्राह्मण यावनी भाषा शिकतात व बोलतात हा त्यांचा एक प्रमुख दोष त्यानें नमूद केला आहे. २५०।३०

पेय, सैन्य, हत्यारें, जमीनधारावसुली इत्यादि अनेक प्रकारच्या व्यवहारासंबंधीं नूतन फारशी शब्द मराठी भाषेंत शिरले व महाराष्ट्रीय समाजातील लोकांच्या ते शब्द नेहमीच्या सरावाने आगवळणी पडून गेले. स्वराज्यस्थापना झाल्यानंतर श्रुतिस्मृतिप्रणीतधर्माभिमानी राजा या नात्याने मराठी भाषेंत मुसलमानाच्या संसर्गाच्या यागानें निर्माण झालेला हा शोचनिय प्रकार नाहींसा करण्याची जबाबदारी शिवाजी महाराजावर येऊन पडली. मराठी भाषेंत प्रविष्ट झालेल्या अनेक नूतन फारशी शब्दांचा आशय व्यक्त करणारे मराठी अगर संस्कृत शब्द तयार करून वर दर्शविलेल्या वचनास अनुसरून आचरण करण्याची महाराष्ट्रिय समाजांतील लोकांची सोय शिवाजी महाराजांनीं **राजव्यवहार कोश** हा ग्रंथ रघुनाथ पंडित यांचे कडून तयार करवून उत्तम प्रकारें करून दिली. शिवाजी महाराजानीं नेमिलेल्या अष्टप्रधानादि अधिकाऱ्यांच्या व त्यांच्या खालच्या दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या संज्ञा प्रधान, अमात्य, देशाधिकारी, देशलेखक, पारपत्यागार, मुद्राधारी या प्रकारच्या संस्कृत भाषेतील ठेवून महाराष्ट्रीय जनतेस स्वभाषाभिमान व्यक्त करण्याची उत्तम प्रकारची सोय करून दिली. मराठी भाषेच्या बाबीशीं किंचित् संलग्न असलेल्या दुसऱ्या एका बाबीचा या ठिकाणीं उल्लेख करणे अवश्य आहे. फार पुरातन काळापासून मुद्रा बनविण्याचा प्रघात आपलेमध्यें आहे. या मुद्रांतील मजकुराची भाषा व लिपी देवनागरी असे मुसलमानी राजसत्ता महाराष्ट्रांत प्रस्थापित झाल्या नंतर हा प्रघात बंद पडून देशमूख, देशपांडे, मुसलमानी बादशहाचे महाराष्ट्रीय नोकर, इत्यादि प्रतिष्ठित व वजनदार लोक आपल्या मुद्रा फारशी भाषा व लिपीमध्यें मुसलमानाचे अनुकरण करून तयार करू लागले. मराठ्यांच्या इतिहास साधनांच्या पधराव्या खंडांत शिवाजी महाराजांचे पूर्वज शाहाजी, मालोजी इत्यादि पुरुषांचा साताऱ्या राजोपाध्ये घराण्याबरोबर झालेला पत्रव्यवहार छापण्यांत आला आहे. या पत्रावरील सर्व मुद्रा फारशी भाषेंत व लिपीत आहेत. एक हि मुद्रा संस्कृत अगर मराठी भाषेत व देवनागरी लिपींत असल्याचें आढळून येत नाहींत. स्वराज्य स्थापना होण्यापूर्वी च शिवाजी महाराजानीं या बाबतींत नवीन उपक्रम सुरु केला होता. " प्रतिपद्चंद्रलेखेव वर्धिष्णुर्विश्व वंदित शाहाःसूनोः मुद्रा भद्राय राजते '' अशा स्वरूपाची मुद्रा शिवाजी महाराजांनीं प्रथम सुरूं केली. ही मुद्रा म. इ. साधनांच्या पधराव्या खंडांत चाकण ब्रह्मांचे जे लेख छापिले आहेत त्यातील शके १५६१ आश्विन शु॥ अष्टमीच्या

लेखांक ४३७ वर (शिवाजी महाराजांचें वय या लेखांकाचे सालीं बारा वर्षांचें होतें) आढळते. या नतर स्वराज्यस्थापना होऊन त्याचा विस्तार जसजसा होत चालला तसतसा फारशी भाषा व लिपींत मुद्रा बनविण्याचा प्रघात महाराष्ट्रीय समाजांत अजीबात बंद होऊन संस्कृत अगर मराठी भाषा व देवनागरी लिपींत महाराष्ट्रीय समाजातील व्यक्ति आपल्या मुद्रा बनवूं लागल्या. श्रुतिस्मृत्युक्तधर्मास अनुसरून प्रत्येक बाबीची व्यवस्था सुरू करण्याचे बाबतींत शिवाजी महाराज किती दक्षता ठेवीत असत हें वरील विवेचनावरून उघड होत आहे.

**गोप्रतिपालः**—मुसलमानी सत्ता महाराष्ट्रांत स्थापन झाल्यापासून गोब्राह्मणांची विटंबना महाराष्ट्रांत बेसुमार रीतीने होऊं लागली. श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मांचे गोब्राह्मण प्रतिपाळ हे एक महत्त्वाचें कलम आहे. मुसलमानी राजसत्तेचें ध्येय महाराष्ट्रीय प्रजेस श्रुतिस्मृतिप्रणीतधर्मांचे कक्षेतून काढून मुसलमानी धर्माचे गोटांत आणण्याचे असल्या कारणाने ज्या गोब्राह्मणाचें महत्त्व महाराष्ट्रीय जनतेस वाटत असे व ज्यांचे विषयीं त्यांचे ठिकाणीं अत्यंत पूज्य भाव वसत असे त्यांचेवर मुसलमानी राजसत्तेची करडी नजर फिरूं लागली व त्यांची विटंबना व छळ शक्य तितका मुसलमानी अमलांत करण्यांत येऊं लागला. मनुस्मृत्यादि ग्रथांत गाईचे व ब्राह्मणाचें महत्त्व अनेक ठिकाणीं वर्णन केले असून त्याचे विषयी कोणत्या प्रकारचा आदर असावा याचें दिग्दर्शन करण्यांत आलें आहे. मनुस्मृतीच्या चौथ्या अध्यायाच्या ३८, ४५, ४८, ५२, ५८, ५९, ७२, १४२ व १६२ श्लोकांमध्यें स्नातकाच्या आचारांचे वर्णन केले आहे. या वर्णनांत ब्राह्मण, सूर्य, चंद्र इत्यादिकांविषयीं जो पूज्य भाव स्नातकानें बाळगावयाचा तोच गाईबद्दल बाळगिला पाहिजे असें मनूनें सांगितलें आहे. मनुस्मृतीच्या ४ थ्या अध्यायाच्या १६२ व्या श्लोकांत खालील उल्लेख आहे.

**आचार्यं च प्रवक्तारं इतरं मातरं गुरूम् ॥**
**न हिंस्याद्ब्राह्मणान्गांश्च सर्वांश्चैव तपस्विनः ॥**

अर्थ—" उपनयनपूर्वक वेद शिकविणारा आचार्य वेदाध्ययन सांगणारा प्रवक्ता, पिता, माता, थोडें बहुत कांहीं शिकविणारा गुरु, ब्राह्मण, गाई व सर्व तपस्वी यांचा जेणें करून क्षोभ होईल असें स्नातकानें आचरण करूं नये. " या श्लोकावरून श्रुतिस्मृतिप्रणीतधर्मानुयायी व्यक्तीनें गाई व ब्राह्मणा संबंधीं कोणत्या प्रकारचा पूज्य भाव बाळगिला पाहिजे हें उघड होत आहे.

गाईची हत्या हें मनुस्मृतीप्रमाणें एक उपपातक समजले आहे.

**गोवधोऽयाज्य संयाज्य पारदार्यात्मविक्रयाः ॥**
**गुरुमातृपितृत्यागः स्वाध्यायाग्नयोः सुतस्यंच ॥**

( मनु. अध्याय ११ श्लोक ५९ )

अर्थ—" गोहत्या, यज्ञ करण्यास अपात्र अशा माणसा करितां यज्ञ करणें, जारकर्म, गुरु, बाप, आई आणि मुलगा, वेदाध्ययन व गृह्याग्नीचा त्याग करणे हीं उपपातकें आहेत. " वर दर्शविलेल्या स्वरूपाच्या स्मृतिवचनाच्या योगानें अनेक शतके गोमाते बद्दल पूज्यभाव ज्या महाराष्ट्रीय समाजांतील लोकाचे ठायीं वसत होता त्या लोकांचे मनास गाईचे बाबतींत मुसलमान-धर्मीय लोकांकडून जें अमानुष वर्तन होत असे त्यामुळे किती भयंकर धक्का बसत असला पाहिजे याची कल्पना करणें कठीण नाहीं. शिवाजी महाराजांचे बालवयांत आदिलशाहीची राजधानी जे विजापूर शहर तेथें ते आपल्या पित्यापाशीं राहत असतां त्या ठिकाणीं होणारा गोवध पाहून त्यांचा संताप कशा प्रकारचा होत असे याची कल्पना बखरकरांनी केलेल्या वर्णनावरून होण्यासारखी आहे. अशा स्थितींत स्वराज्य स्थापनेच्या ध्येयाचें गोप्रतिपाल हें एक महत्त्वाचें कलम होऊन बसले यांत कांहीं आश्चर्य नाही. शिवाजी महाराजांचे हयातीत गोब्राह्मण प्रतिपालक या संज्ञेने त्यास संबोधण्यात येत असे यावरून त्यांच्या राजसत्तेखालीं असणाऱ्या मुलखात त्यानी गोवध अजिबात बंद करून स्मृतिप्रणीत गोप्रतिपालनाचा धर्म आचरणात आणिला असला पाहिजे हें सिद्ध होत आहे. चिटणीसकृत राजनीतींत "गाईचें संरक्षण करणें हा मुख्य धर्म च आहे यास्तव फार जपून करीत असावा " ( पान ३४ ) अशा प्रकारचा गोरक्षणासंबंधीं स्पष्ट उल्लेख आहे गोप्रतिपालनाचे बाबतींत शिवाजी महाराजांनी वर दर्शविलेलें जें कार्य केले त्या वरून स्वधर्म स्थापना हेच त्यांच्या स्वराज्य स्थापनेचें ध्येय होतें हें सिद्ध होत आहे. चिटणीसकृत राजनीती शिवाय सभासद कृत शिवछत्रपतींच्या चरित्रांतील खालील उल्लेखावरून हि गोरक्षणाचे बाबतींत कोणत्या प्रकारची खबरदारी घेण्यांत येत असे हें दिसून येते. " लष्करास बायको व बटीक व कलावतीण नसावी, जो बाळगील त्याची गर्दन मारावी, परमुखांत **बायको न धरावी**; मर्दाना सापडला तरी धरावा, **गाई न धरावी**, बैल ओझ्यास मात्र धरावा, **ब्राह्मणास उपद्रव न द्यावा**, कोणी बद अम्मल न करावा. " शिवाजी महाराजांचे पश्चात् मराठी

राज्याच्या अखेरीपर्यंत गोप्रतिपालनाचें कार्य उत्तम प्रकारें चालविण्यांत येत असे, हे सिद्ध करणारा त्या काळचा उपलब्ध झालेला पुरावा या ठिकाणीं नमूद करणें जरूर आहे. मराठ्याच्या इतिहासाचीं साधने खंड ६ लेखांक ६२२ चें पत्र खालील स्वरूपाचे आहे:—

शके १६८० मार्गशीर्ष शु० ५

" मा। अनाम चौधरी व कानगो प्रांत हिंदुस्तान यासी-बाळाजी बाजीराव प्रधान सु०॥ तिसा खमसैन मया व अलफ. त्या प्राती गाईवर गोणी, चारण, लमाण घालितात म्हणोन गणेशीदास उदासी याणें हुजूर विदित केले त्याजवरून हे आज्ञापत्र सादर केले असे. तरी तुम्ही चारणास ताकीद करून गाईवर गोणी घालूं न देणे जाणिजे छ. ३ रविलाखर आज्ञाप्रमाण, लेखनसीमा. "

वरील आज्ञापत्रावरून ज्या ज्या प्रांतांत मराठ्यांची सत्ता स्थापित होत असे त्या त्या प्रातांत वरील प्रकारची खबरदारी घेण्यात येत असे हे दिसून येत आहे. मराठ्यांचा अम्मल ज्या प्रांतात सुरू होत असे त्या प्रांतात मराठ्याच्या सत्तेच्या अंतर्गत असणाऱ्या ध्येयाची कल्पना त्यांतील लोकास विदित करण्यात येत असावी असा वरील पत्रावरून आमचा तर्क होतो. वरील पत्रांचा लेखक-गणेशीदास उदासी याने बाळाजी बाजीराव मराठी राज्याचे मुख्य प्रधान यांचेकडे वरील तक्रार मराठी राज्याचें ध्येय त्यास विदित असल्या विना त्याने करणें संभनवनीय दिसत नाही. वरील पत्राखेरीज याच मुद्यासबंधीं दुसरा एक महत्त्वाचा पुरावा आम्ही खाली नमूद करितो. इतिहाससंग्रह मासिकात " पेशवे दप्तरातील निवडक कागदपत्र फौजसरंजाम संबधीं माहिती " या नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. या ग्रंथाचे पान ९३ वर दुसरे बाजीराव पेशवे यांनीं सन १८१२।१३ सालांत इंग्रजांची दोन पलटणे आपल्या चाकरीस ठेविलीं त्या बद्दलचा जॉनफोर्ड बरोबर केलेला करार छापिला आहे. या करारांतील अनेक कलमापैकीं चर्चाविषयक मुद्याच्या दृष्टीने खालील कलम फार महत्त्वाचे आहे. " पलटणांत गुरांचा दरोबस्त वध करूं नये. " दुसरे बाजीराव पेशव्यांच्या कारकीर्दीतील इ० स० १७९८। ९९ सालचा दुसरा एक गाईचे बाबतींत महत्त्वाचा लेख उपलब्ध झाला आहे तो खालीलप्रमाणें आहे. " साष्टी व मुंबईकर कसाब देशातून गाई हरदू ठिकाणी विकावयास न्यावयाची मनाई सरकारातून असतां रात बीरात चोरून नेतात त्याची चौकशी सरकारातून अनंत नाईक अणजूरकर यास सांगोन हें पत्र

तुम्हास सादर केले असे तरी महालनिहाय प्रांत कोकण एथील नाकेबंदीची चौकशी नाईक मजकूर करील त्यास करूं देणे व गाई जातील त्या त्यांच्या इतल्याशिवाय जाऊं न देणे याप्रमाणें पत्रें मामलेदार वसई व कल्याण कामाविसदार अटगांव." ( वाड यांचे पेशवे दप्तरांतील निवडक उतारे भाग ५ दुसरे बाजीराव पान २५९ ).

जॉनफोर्ड बरोबर केलेल्या करारांत फक्त गाईच्या वधाबद्दल च तरतूद करण्यांत आली असे नसून दरोबस्त गुराचे वधाबद्दल तरतूद करण्यांत आली आहे. यावरून गोप्रतिपालनाचा अर्थ त्या काळीं अकुंचित समजला जात नसे असें दिसून येते. गाईप्रमाणे च म्हशी, रेडे, बैल इत्यादि जनावरांचें हि रक्षण करण्याची खबरदारी मराठी साम्राज्यांत घेण्यात येत असे हें वरील उल्लेखावरून सिद्ध होत आहे.

**ब्राह्मण प्रतिपालः**—आता महाराष्ट्रधर्मस्थापनेत अंतर्भूत होणाऱ्या सर्व साधारण प्रमुख बाबींपैकी ब्राह्मण प्रतिपालनाचे बाबतींत छत्रपति शिवाजी महाराजापासून तो थेट मराठी राज्याच्या अखेरी पावेतो कोणत्या स्वरूपाचें धोरण पाळण्यांत येत असे या संबधाच्या चर्चेकडे वळू. मराठी राज्याचे अमदानींत ब्राह्मण वर्णातील व्यक्तीविषयीं इतर वर्णाच्या लोकाचे ठायीं आदर व पूज्यभाव वसत असे. महाराष्ट्रीय जनतेत असलेला हा पूज्यभाव व आदर कायम राखण्याचे राजकर्त्याचे धोरण असे हें ह्या पुढें जो पुरावा आम्ही नमूद करणार आहोंत त्यावरून दिसून येईल. परंतु एवढी गोष्ट बरीक लक्ष्यांत ठेवणें जरूर आहे कीं ब्राह्मणवर्णीय व्यक्ती सबधी श्रुतिस्मृत्युक्तधर्मास अनुसरून जे विशिष्ट धर्म राजानें पाळावयाचे ते धर्म श्रुतिस्मृत्युक्त धर्मास अनुसरून आचरण करणाऱ्या ब्राह्मणाचे बाबतीत च फक्त पाळण्यात येत. ही गोष्ट लक्ष्यांत घेतां श्रुतिस्मृत्युक्त धर्माप्रमाणें ब्राह्मणाचे महत्व कोणत्या प्रकारचे आहे व खरा ब्राह्मण कोणास समजावयाचें ह्याचे प्रथम दिग्दर्शन करणें जरूर आहे. मनुस्मृतीच्या पहिल्या अध्यायाच्या ९३ ते १०१ श्लोकामध्यें ब्राह्मणाचे महत्व वर्णन केलें आहे त्यांपैकीं खालील श्लोक महत्वाचे आहेत.

**उत्तमाङ्गोद्भवाज्ज्यैष्ठ्याद्ब्रह्मणश्चैव धारणात् ॥**
**सर्वस्यैवास्य सर्गस्य धर्मतो ब्राह्मणः प्रभु ॥ ९३ ॥**

अर्थ—"ब्रह्मदेवाच्या मुखापासून ब्राह्मण उत्पन्न झाल्या कारणानें व प्रथम निर्माण झाल्या कारणानें आणि त्याचेपाशीं वेद असल्या कारणाने तो जन्मतः च या सृष्टीचा मालक आहे."

**भूतानां प्राणिनः श्रेष्ठाः प्राणिनां बुद्धिजीवीनां ॥**
**बुद्धिमत्सु नराः श्रेष्ठा नरेषु ब्राह्मणाः स्मृताः ॥ ९६ ॥**
**ब्राह्मणेषु च विद्वांसो विद्वत्सु कृतबुद्धयः ॥**
**कृतबुद्धिषु कर्तारः कर्तृषु ब्रह्मवेदिनः ॥ ९७ ॥**

अर्थ—" ईश्वराने निर्माण केलेल्या सर्व सृष्टीमध्यें सजीव प्राणी सर्वांत श्रेष्ठ आहेत ; सजीव प्राण्यामध्यें बुद्धिमान् प्राणी श्रेष्ठ आहे ; बुद्धिमान् प्राण्यांत मानवी प्राणी श्रेष्ठ आहेत व मानवी प्राण्यांत ब्राह्मण श्रेष्ठ आहेत व ब्राह्मणांमध्ये वेदाध्ययन केलेले श्रेष्ठ ; वेदाध्ययन केलेल्या पैकीं ब्राह्मण वर्णाच्या धर्माप्रमाणें आचरण करण्याची आवश्यकता जाणणारे श्रेष्ठ; धर्मा प्रमाणें आचरण करण्याची आवश्यकता जाणाऱ्यापैकीं या धर्मास अनुसरून आचरण करणारे श्रेष्ठ आणि ब्राह्मणधर्माप्रमाणे आचरण करणारामध्ये ज्याला ब्रह्मसाक्षात्कार झाला आहे ते श्रेष्ठ समजावे.

**ब्राम्हणो जायमानो ही पृथिव्यामधि जायते ॥**
**ईश्वरः सर्व भूतानां धर्म कोशस्य गुप्तये ॥ ९९ ॥**

अर्थ—" ब्राह्मण धर्मरूपी निधीचें रक्षण करण्याकरितां या जगात सर्वाहून श्रेष्ठ व जगांतील सर्व वस्तूचा मालक असा जन्मास येतो." वरील श्लोकावरून ब्राम्हणांची महति कोणत्या कारणाकरितां समजली जात असे व कोणत्या ब्राह्मणाची महति किती समजावयाची हें स्पष्ट होत आहे. आतां ब्राह्मणासंबंधीं पूज्यभाव कोणत्या प्रकारचा बाळगावयाचा या संबधी मनुस्मृतींतील कांहीं वचनें खालीं नमूद करितो.

**क्षत्रियं चैव सर्पंच ब्राम्हणंच बहुश्रुतम् ।**
**नावमन्येत वै भूष्णुः कृशानपि कदाचन ॥**

(मनु अ. ४ श्लोक. ३५)

अर्थ " ज्याला आपली उन्नति करून घेण्याची इच्छा असेल त्यानें क्षत्रिय, सर्प व अत्यंत दुर्बल अशा ब्राम्हणाचा देखील तिरस्कार करूं नये कारण या तिघांचा तिरस्कार केला असता त्याचा नाश होईल. या कारणाकरितां सुज्ञ माणसानें त्याचा तिरस्कार करू नये. आतां राजानें ब्राम्हणांचा सत्कार व त्यास दान करण्याच्या बाबतींत मनुस्मृतींतील कांहीं वचनें या ठिकाणीं देणे जरूर आहे.

**ब्राह्मणान्पर्युपासीत् प्रातरुत्थाय पार्थिवः ॥**
**त्रैविद्यवृद्धान्विदुषस्तिष्टेत्तेषांच शासने ॥**

(मनु अध्याय ७ श्लोक ३७)

अर्थ—" राजानें प्रातःकाळी लौकर उठून शास्त्रांत व राजनीतींत पारंगत असलेल्या ब्राह्मणाची पूजा करावी आणि त्याच्या उपदेशाप्रमाणें वागावेत."

**वृद्धांश्च नित्यं सेवेत विप्रान्वेदविदः शुचीन् ॥**
**वृद्धसेवी ही सततं रक्षोभिरपि पूज्यते ॥ ३८ ॥**

(म. अ. ७ श्लो. ३८)

अर्थ—" वेद जाणणाऱ्या व शुचीर्भूत वृद्ध ब्राह्मणाची राजानें पूजा करावी. कारण जो वृद्धाची पूजा करितो त्यास राक्षस हि मान देतात.

**यजेत राजा क्रतुभिर्विविधैराप्तदक्षिणैः ।**
**धर्मार्थं चैव विप्रेभ्यो दद्याद्भोगान्धनानि च ॥**

(म अ. ७ श्लो. ७९)

अर्थ-" राजानें नानाप्रकारचे श्रौतयज्ञ करावे आणि पुण्यसंपादन करण्याकरितां ब्राम्हणास विपुल दक्षिणा, सपत्ति आणि भोग्य वस्तु अर्पण कराव्या.

**न स्कन्दते न व्यथते न विनश्यति कर्हिचित ।**
**वरिष्ठमग्निहोत्रेभ्यो ब्राम्हणस्य मुखे हुतम् ॥**

(म. अ. ७ श्लो. ८४)

अर्थ-" अग्निहोत्रापेक्षां हि अधिक पुण्य ब्राह्मणास अन्नदान करण्यांत येतें. ब्राह्मणास अन्नदान करण्यांत जे पुण्य आहे ते कधी नष्ट होत नाहीं."

**आवृत्तानां गुरुकुलाद्विप्राणां पूजको भवेत् ।**
**नृपाणामक्षयो ह्येष निधिर्ब्राह्मोऽभिधीयते ॥**

म. अ. ७ श्लो. ८२

अर्थ—" वेदाध्ययन करून गुरु कुळांतून परत आलेल्या व गृहस्थाश्रमाची इच्छा करणाऱ्या ब्राह्मणांची, राजानें नियमाने धनधान्यादिकांच्या योगानें पूजा करावी कारण, ब्राह्मणाचे ठायी स्थापन केलेला जो हा धनधान्यादिकांचा सांठा तो राजाचा अक्षय निधि होय असें शास्त्रानें सांगितलें आहे.

**सममब्राम्हणे दानं द्विगुणं ब्राम्हणब्रुवे ।**
**प्राधीते शतसहस्त्रमनन्तं वेदपारगे ॥**

म. अ. ७ श्लो. ८५

अर्थ—" जो ब्राह्मण नाहीं त्यास दान दिले असतां त्यांत सामान्य पुण्य आहे. जो ब्राह्मण म्हणवितो त्यास दान दिलें असतां दुप्पट पुण्य, चांगलें अध्ययन केलेल्या ब्राह्मणास दान दिले असतां दशसहस्रपट पुण्य आहे. आणि

जो ब्राह्मण वेद वेदांगे जाणणारा आहे त्यास दान दिलें असतां त्या पासून ज्या पुण्यास सीमा नाहीं असें पुण्य प्राप्त होतें."

मनुस्मृतीच्या नवव्या अध्यायाच्या ३१३ ते ३२३ व्या श्लोकांत ब्राह्मणांची कर्तुमन्यथाकर्तुं शक्ति त्याच्या क्रोधाचा परिणाम व ते टाळण्याकरितां ब्राह्मणांस न दुखविण्याचे बाबतीत घ्यावयाची खबरदारी याचे वर्णन केले आहे त्यांपैकीं कांहीं महत्त्वाचीं वचनें आम्ही खालीं देतो.

अविद्वांश्चैव विद्वांश्च ब्राह्मणो दैवतं महत् ।
प्रणीतश्चाप्रणीतश्च यथाग्निर्दैवतं महत् ॥

म. अ. ९ श्लो. ३१७

अर्थ—" अग्नीप्रमाणे ब्राह्मण हा विद्वान असो अथवा विद्यारहित असो तो एक मोठें दैवत आहे."

श्मशानेष्वपि तेजस्वी पावको नैव दुष्यति ।
हूयमानश्च यज्ञेषु भूय एवाभिवर्धते ॥

म. अ. ९ श्लो. ३१८

अर्थ -" जसा महातेजस्वी अग्नि स्मशानामध्ये शवास जाळतो पण स्वतः दुष्ट होत नाहीं. तर यज्ञामध्यें त्यास हवन करूं लागलें असतां तो अधिक च वाढतो याप्रमाणे ब्राह्मण जरी नीच व्यवसाय करीत असले तथापि ते वंदनीय आहेत. कारण ते एक दैवत आहे."

मनुस्मृतीच्या अकराव्या अध्यायाच्या २२ व २३ व्या श्लोकांत ब्राह्मणांच्या पोषणासंबंधीं राजाचे कर्तव्य खालीं दर्शविल्याप्रमाणें सांगितलें आहे.

तस्य भृत्यजनं ज्ञात्वा स्वकुटुम्बान्महीपतिः ।
श्रुतशीले च विज्ञाय वृत्तिं धर्म्यां प्रकल्पयेत ॥

म. अ. ११ श्लो. २२

कल्पयित्वास्य वृत्तिं च रक्षेदेनं समन्ततः ।
राजा हि धर्मषड्भागं तस्मात्प्राप्नोति रक्षितात् ॥

म. अ. ११ श्लो. २३

अर्थ--" यास्तव त्या ब्राह्मणाचा पुत्रादि अवश्य पोषणीय परिवार केवढा आहे याचा विचार करून त्याची विद्या व आचार यांच्या अनुरूप राजानें आपल्या कुटुंबातून त्यास धर्मरूप वृत्ती नियत करून द्यावी. या ब्राह्मणाची जीविका नियत करून राजानें शत्रु चोर इत्यादिकांपासून त्यांचें सर्व

प्रकारें रक्षण करावें; कारण रक्षण केलेल्या ब्राह्मणापासून राजास त्याच्या धर्माचा सहावा भाग मिळतो.

याप्रमाणें मनुस्मृतीमध्यें ब्राह्मणाविषयीं उल्लेख आहेत. शिवाजी महाराजांचे काळीं व त्यांचे पश्चात् मराठी राज्य लयास जाईपर्यंत वरील उल्लेखांत दर्शविलेल्या स्वरूपाची निष्ठा ब्राम्हणाविषयीं अस्तित्त्वांत असल्याचें पुढील पुराव्यावरून दिसून येईल. शिवाजी महाराजांनीं ब्राह्मण प्रतिपालनाचे बाबतीत केलेल्या योजनेचा उल्लेख सप्तप्रकरणात्मक चरित्राचे ८५ पानांत खालील प्रमाणें आहे:—

" वेदशास्त्र अगदीं उच्छिन्न झालें त्यास एक ग्रंथ अध्ययन केलें त्यास मणभर धान्य, दोन ग्रंथ अध्ययन केलें त्यास दोन मण, पंचग्रंथी, दशग्रंथी यांस पांच मण, दहा मण, परीक्षा करून द्यावे; तसेंच पंडित जसा जो विद्वान त्यास योग्यता पाहून स्वदेशी असल्यास त्यास भात, विदेशी असल्यास त्यास द्रव्याचीं वर्षासनें श्रावण मासीं सर्वास पंडितराव यांनीं परीक्षा करून अधिक विद्या होईल त्यास अधिक मोईन्न वाढवावी असें केलें. मोठमोठे पंडित, वैदिक, प्रतिष्ठित येतील त्यांच्या सभा करून सत्कार करून शंभर पन्नास रुपये अधिकही योग्यतेनुरूप द्यावें असें करून दिलें; याजमुळें दिवसेंदिवस अधिक विद्या वृद्धिप्रत पावती झाली. अग्निहोत्रें घेणार यांस तितके द्रव्य देऊन घेववावें. त्याची मोईन्न अधिक करावी. तसेंच यज्ञ करणार यास द्रव्य लागेल तसे मोईन्न बांधून देऊन यज्ञ करवावे. याप्रमाणें देव ब्राह्मणांची स्थापना करून नित्य दानें व नैमित्तिक प्राप्त झालें असतां करावयाचें त्याप्रमाणें करणें. जागजागां अन्नसत्रें व नित्य ब्राह्मण भोजन इच्छा भोजन यांचे निर्बंध बांधून दिले. ब्राह्मण आपले राज्यांतील दुसरे राज्यांत याञ्चा करावयास न जावेत असें केलें. "

सभासदकृत छत्रपतींचे चरित्रांत हि अशाच स्वरूपाचा खालील उल्लेख आहे:—

" वैदिक ब्राह्मण यांसी योगक्षेम, विद्यवंत, वेदशास्त्र संपन्न, ज्योतिषी, अनुष्ठानी, तपस्वी, गांवोगांवीं सत्पुरुष पाहून अन्नवस्त्र ज्यास जें लागेल त्याप्रमाणे धान्य, द्रव्य त्यास गांवचे गांवी, महालीं नेमून देऊन साल दरसाल त्यास कारकुनांनीं पाववावें. ब्राह्मणांनी तें अन्न भक्षन संध्या करून राजियासी कल्याण चिंतून सुखरूप असावे. " ( पान २५ )

प्रस्तुत मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें मल्हार रामराव कृत राजनीतींतील खालील उतारे महत्त्वाचे आहेत. राजा या नात्यानें शिवाजी महाराजांनीं जें आचरण केलें, त्याचें प्रतिबिंब चिटणीस कृत राजनीतींत पूर्णपणें उठल्याचें खालील उताऱ्यावरून व यापुढें शिवाजी महाराजांनीं दिलेल्या कित्येक देणग्यासंबंधीं जो पुरावा यापुढें आम्ही नमूद करणार आहोंत त्यावरून दिसून येणार आहे. राजनीतीचें चौदावे पानामध्यें राजानें व्यय कसा करावा यासंबंधीं खालील स्वरूपाचा उल्लेख आहे:—

" व्यय कसा करावा ? दान सत्पात्रीं पात्रापात्र विचार पाहून करावें, तसेंच देवालय जीर्णोद्धार करावें. नूतन देवालयें करावीं, वापी, कूप, तटाक, आराम म्हणजे बाग करावे, धर्मशाळा बांधाव्या, ब्राह्मणांस अन्नदान व अन्नछत्रें करावीं, सर्व ज्ञातींस अन्नदान प्राणीमात्रीं करावें, उत्साह, जयंत्यादि पर्वें व महान ब्रह्मनिष्ठ ऋषि यांस साहित्यें पुरवावीं, स्वास्थ्यें करून द्यावीं, अनुत्पन्न असतील त्यांचे कुटुंबांची संस्थापना करावी, द्रव्य द्यावें, इतरहि भिक्षार्थी यास, याचकांस विन्मुख न होतां द्रव्य द्यावें. त्याचे मनोरथ पुरवावे. यज्ञयाग राजा यानें आपण करून ब्राह्मणांपासून द्रव्य देऊन करवावें. अग्निहोत्रें चालवावीं. " वरील उताऱ्यापेक्षां हि अधिक महत्त्वाचा असा त्याच ग्रंथाच्या पान ८८ मध्यें खालील उल्लेख आहे:—

" धर्मराज यांणीं भीष्मास प्रश्न केला कीं, राज्य करण्यांत नाना प्रकारचीं पातकें घडतात, ऐसें असतां राज्य करण्यांत स्वर्ग, मोक्ष प्राप्ती व्हावी असें यांत कर्म कोणते आहे तें च कृपा करून सांगावें. भीष्म उत्तर करितात कीं, पापी आहेत त्यास शिक्षा करून राजा यास पुण्यवंत असे प्रकारचे साधुजन आहेत त्यांचें व गाईब्राह्मणांचें पालन घडतें; व आश्रम धर्मेंकरून धर्मसंस्थापन होऊन प्रजेचें पालन करून राजे जे शुचित्त्व पावतात. राजा यास जयसमयीं, युद्धादिकाचे ठायीं हिंसा व द्रोह घडतो. त्यास राजा जो तो प्रजापालन धर्म करून करतो येणें करून हें पातक राजा यासी नाहीं. राजा जो जो प्रजेस धनें करून व दानें करून ज्ञाती धर्म करून व दुसरा कोणी पीडा करित असेल त्याजपासोन चोरापासोन व अन्य क्लेशापासून रक्षितो व प्राणदान करितो हाच उत्कृष्ट धर्म घडतो. येणें करून या लोकीं संपूर्ण भोग भोगून परलोकाचे ठायीं इंद्र सलोकता पावतात व ब्राह्मणांचें व गाईचें संरक्षणार्थ आपले प्राणाची व गृहदारादिकांची ममता न धारतां युद्धास प्रवर्तून ब्राह्मणादिकांचें पालन करिता हाच राजा यास अनंत दक्षिणायुक्त यज्ञ केल्याचें फळ घडतें. "

राजनीतीतील वरील जे उल्लेख दिले आहेत त्या उल्लेखास अनुसरून शिवाजी महाराजांचें तंतोतंत आचरण होतें असें सिद्ध करणारा किती तरी पुरावा अलीकडे प्रसिद्ध झालेल्या इतिहास साधन ग्रंथांतून आढळून येतो. असल्या स्वरूपाच्या पुराव्याचें आम्ही या ठिकाणीं त्रोटक दिग्दर्शन करितों. सप्त प्रकरणात्मक चरित्रांतील वर दिलेल्या उताऱ्यांत नमूद केल्याप्रमाणें शिवाजी महाराजांनीं अनेक वेदविद्या संपादन करणाऱ्या ब्राह्मणांस धान्याच्या व नक्त रकमेच्या नेमणुका करून दिल्या होत्या. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड २१ पान ११५ त विद्यासंपन्न ब्राह्मणांस धर्मादायाच्या नेमणुका करून दिल्याचा उल्लेख आहे. कऱ्हाड येथील ब्राह्मणांकडे आदिलशाहीचे कारकीर्दीपासून इनाम जमिनी चालत होत्या, त्या जमिनी स्वराज्य स्थापन झाल्यानंतर शिवाजी महाराजांनीं अनामत केल्या, परंतु त्यांनीं त्याबद्दल ब्राह्मण पाहून त्यास धर्मादायाची मोईन करून दिल्याचा उल्लेख सदर लेखांत आहे. मराठ्यांचीं इतिहासाचीं साधनें खंड १५ व २० मध्यें पूर्वापार ज्या ब्राह्मण घराण्याकडे इनामें चालत आलीं होतीं, तीं स्वराज्यस्थापने नंतर शिवाजी महाराजांनीं सुरू ठेवल्याचीं बरींच उदाहरणें आहेत. त्याचप्रमाणें वाड यांचीं सनदापत्रें पान ११० ते ११३ मध्यें तपोनिष्ठ ब्राह्मणांस शिवाजी महाराजांनीं इनाम जमिनी दिल्याचा उल्लेख आहे. सिद्धेश्वरभट बिन मेघनाथभट ब्रह्मे यास इनाम दिलेल्या जमिनीच्या सनदेंत "स्वामींच्या अनुष्ठानबळें आपण राज्यास अधिकारी झालों व सकळ मनोरथ चिंतिले पावलों ऐसा अनुभव आला म्हणून व संकटकाळीं सहकारी जाणोन" अशा प्रकारचा उल्लेख आला आहे. वेदाध्ययन व शास्त्राध्ययन करणाऱ्या ब्राह्मणांचा योगक्षेम चालविण्याचा श्रुतिस्मृत्युक्तधर्मास अनुसरून शिवाजी महाराजांनीं स्वराज्य स्थापन झाल्यापासून जो परिपाठ सुरू केला त्याचा मराठ्यांची सत्ता ज्या ज्या प्रदेशांत दृढमूल झाली तेथील मराठा सत्ताधारी पुरूषांनीं अंगिकार केला. गायकवाड, शिंदे, होळकर, धार व देवासचे पवार इत्यादि सरदारांनीं ज्या ज्या प्रदेशावर आपला अंमल बसविला होता त्या त्या प्रदेशांत वरील परिपाठास अनुसरून वेदाध्ययन व शास्त्राध्ययन करणाऱ्या ब्राह्मणांचा योगक्षेम चालविण्याकरितां इनाम जमिनी दिल्या. हा परिपाठ मराठी राज्याबरोबरच वृद्धिंगत होत जाऊन मराठी साम्राज्य लयास जाई तों पर्यंत सुरू राहिला. या संबंधाचा कांहीं पुरावा या ठिकाणीं नमूद करणें अप्रस्तुत होणार नाहीं. "पेशवे दप्तरांतील

सनदा पत्रांतील माहिती " या नांवाचा ग्रंथ रावबहादूर पारसनीस यांनीं अलीकडे प्रसिद्ध केला आहे या ग्रंथाचें पान १३७ मध्यें थोरले माधवराव पेशवे यांचे मरण समयीं तयार करण्यांत आलेली एक यादी छापली आहे. या यादींतील कलमें थोरले माधवराव पेशव्यांचे पश्चात् अमलांत आणण्याची शपथ त्यांचे कारभाऱ्यांनीं घेतल्याचा तींत उल्लेख आहे. यादींतिल अनेक कलमांपैकीं एक कलम खालीं लिहिल्याप्रमाणें आहे:—

" श्रावण मासाचा धर्मादाय पूर्वीपासून चालत आला होता त्यास यावत्तर दौलत चालवावा पांच लक्षांची दौलत राही तावत्कालपर्यंत चालवावा. यांसी अनमान करूं नये. "

वरील उल्लेखांवरून वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मणांचे रक्षणाचे बाबतींत स्वराज्याचे अमदानींत कोणत्या प्रकारची खबरदारी घेतली जात असे हें दिसून येतें. शेवटचे बाजीराव पेशव्यांचे कारकीर्दीत श्रावणमासचे दक्षणेप्रित्यर्थ जो खर्च करण्यांत येत असे त्या संबंधाचा उल्लेख " पेशव्यांचे रोजनीशींतील उतारे बाजीराव दुसरे भाग ५ " या ग्रंथाचे २४० सावें पानावर आहे. दक्षणेकरितां एकंदर १७३१०५ ब्राह्मण व १९४२६ स्त्रिया आल्याचा उल्लेख या पानावर आहे. पान २४० सावर एकंदर रु. ६३९०० ब्राह्मणांस दक्षणा दिल्याचा उल्लेख असून रकम रु. १२२४६८८ चा खुर्दा ब्राह्मणास वाटण्यांत आला, असें नमूद केलें आहे. याखेरीज तांदूळ, डाळ व इतर शिधासामुग्री ब्राह्मणास देण्यांत आली ती निराळी च होती. श्रावणमासचे दक्षणेप्रित्यर्थ एकंदर खर्च ३५६०८ रुपये झाल्याचें वरील नोंदींत नमूद करण्यांत आलें आहे. याहीपेक्षां याच पुस्तकांतील २२७ सावे पानावरील नोंद फार महत्वाची आहे. ही नोंद दुसरे बाजीराव पेशवे यांचे हातीं अधिकार सूत्रें नुकतीच आल्या नंतरची म्हणजे इ. स. १७९६।९७ सालची आहे.सन १८०८।०९ सालचे नोदींपेक्षां या नोंदीचें महत्व विशेष प्रकारचें आहे. या नोंदीवरून त्या सालीं श्रावणमासची दक्षणा ज्या ब्राह्मणांस देण्यांत आली ते कोणत्या दर्जाचे होते हें दिसून येतें. पेशवे श्रावणमासचे दक्षणे प्रित्यर्थ जें द्रव्य खर्च करीत ते अपात्रीं दान होत असें अशी टीका ही नोंद वाचली असतां कोणास हि करितां येणें शक्य नाहीं. या सालीं एकंदर रकम रुपये ४४१०६६८६ दक्षिणा वाटण्यांत आली. त्या पैकीं रकम रुपये २९२२८५८८ एकोणपन्नास हजार नऊशें साहासष्ट रुपये सरासरी प्रत्येक ब्राह्मणास ५८१३८६ प्रमाणें वाटण्यांत आले. बाकी रकमेपैकीं

रकम रु. १३१५६६ वाड्यांतील व गांवोगांवच्या विद्वान् ब्राह्मणाकडे पाठविण्यांत आले. रमण्यांत दुखणेकरी ब्राह्मण जाऊं शकले नाहींत त्यास रु. ४००० चार हजार देण्यांत आले. या शिवाय खिचडी, फुटाणे आणि खुर्दा वाटण्यांत आला त्याचे किंमतीसुद्धां एकंदर रकम रुपये ४४१०६६८६ खर्च झाल्याचा ह्या नोंदींत उल्लेख आहे. गावगन्ना ज्या ब्राह्मणास दक्षणा वाटण्यांत आली त्यांची जी यादी दिली आहे तीवरून त्या काळीं सर्व महाराष्ट्रभर विद्वान, वैदिक व शास्त्रज्ञ ब्राह्मण पसरलेले होते असें दिसून येतें. महाराष्ट्रेतर प्रांतांतील विद्वान ब्राह्मणांचीं हि नांवें या यादींत आहेत. पंडित, वैदीक, पुराणिक, जोशी, वैद्य, तपस्वी, कवी, गोसावी, इत्यादि निरनिराळया प्रकारच्या विद्वान ब्राह्मणांचा या यादींत उल्लेख आहे. यावरून हें उघड होतें कीं त्या काळीं ज्या ज्या विद्या अस्तित्वांत होत्या व ज्या सर्वमान्य समजल्या जात त्या विद्या संपादन करणाऱ्या लहान थोर विद्वान ब्राह्मणांस दक्षणेचे रूपानें उत्तेजन देण्यांत येत असें. शिवाजी महाराजांनीं स्वराज्य स्थापने बरोबर वेदशास्त्रज्ञ ब्राह्मणास उत्तेजन देण्याचा सुरूं केलेला परिपाठ थेट मराठी राज्य लयास जाई तों पावेतों पाळला गेला होता असें वरील पुराव्यावरून सिद्ध होत आहे. प्रस्तुतकाळीं हि स्वतंत्र मराठी राज्याचे अवशेष असे जे गायकवाड, शिंदे, होळकर इत्यादि इंग्रज सरकारचे अंकित संस्थानिक राहिले आहेत त्या संस्थानांतूनहि वरील परिपाठ विकृत स्वरूपांत अस्तित्वांत आहे. आतां पेशव्यांनीं वेदशास्त्रपारंगत ब्राम्हण निर्माण करण्याची योजना कोणत्या स्वरूपाची केली होती यासंबंधाचा एक महत्वाचा लेख आम्ही खालीं नमूद करून ही चर्चा पुरी करितों. "पेशवे यांच्या दप्तरांतील सनदा पत्रांतील माहिती" या रा. वाड आणि पारसनीस यांनीं प्रसिद्ध केलेल्या ग्रंथाच्या २४५ सावे पानांत पेशव्यांच्या संस्थान गंगापुर व पंचवटी येथील धर्मसंस्थांच्या व्यवस्थे संबंधाचा एक लेख छापला आहे. हा लेख प्रस्तुत मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें फार महत्वाचा असल्या कारणानें तो आम्ही येथें देतों. या संस्थानासंबंधीं एकंदर खर्च रु. ९१००२८१२ दरसाल होत असे. या रकमेपैकीं रु. ६५६५०८८ खालील कार्याप्रित्यर्थ खर्च करण्यात येत असत.

## संस्थान गंगापूर व पंचवटी येथील धर्मसंस्थांची व्यवस्था.

"श्रीबाळकृष्णप्रभूचें आज्ञेप्रमाणें, संस्थान गंगापूर व पंचवटी येथील धर्मकृत्याची संस्था शके १७०५ शोभन नाम संवत्सरे, संस्थान मौजे गंगापूर, परगणे नाशिक, श्रीगोदादक्षिणतीर व श्रीक्षेत्र पंचवटी, कसबे नाशीक, श्रीगोदा

उत्तरतीर येथें श्री बाळकृष्णजींचें संस्थान, श्रीदेव व ब्राम्हणांचीं आलयें व सरकारचे वाडे, श्रीकृपेंकरून जाह्ले आहेत. तेथील धर्मकृत्यांची व्यवस्था होऊन, उभय संस्थानांचा महिमा अविच्छिन्न राहून धर्म चालावा म्हणोन श्रीची आज्ञा. त्याजवरून परगणे वण व परगणे दिंडोरी व फुटगांव परगणे नाशिक येथील विद्यमानकाळीं उभय संस्थानांकडे खर्चास सरंजाम, दुमाले बिगर जहागिरीचे गांव वजा होऊन चालत आहे. त्याचा तनखा. रुपये

| | |
|---|---|
| | बाकी निव्वळ जमा. संस्थानाकडे वसुली बेरीज रुपये |
| ९१००२॥। | यासी उभय संस्थानांची व्यवस्था रुपये |
| ३२१॥। | श्रीदेवांकडे धर्मादाय |
| ८५४ | वर्षासनें, ब्राम्हण असामी ६. |
| २५२ | कित्ता धर्मादाय ब्राम्हणांस रोजमरे असामी ७ एकूण |
| ४२॥ | वार्षिकीखर्च. |
| १५ | इनामखर्च |
| ५० | सणास विजयादशमी, शिमगा. |
| ५० | खैरात खर्च |
| ५०० | किरकोळ धर्मादाय, आगांतुक वगैरे |
| १२०० | सदावर्त आल्यागेल्यास अन्न |
| ४०० | बागाकडे |
| १२०० | कुरणांतील गवत कापून आणावयास वगैरे |
| १००० | खरेदी लांकडें जळाऊ |
| ३०० | शाकारणी खर्च खरेदी कौलें व छपरें |
| १५० | थटीकडे दाणा वगैरे |
| २५० | रोपनाई दिव्यास तेल |
| १५० | दप्तरखर्च कागदशाई |
| १२५ | तैवजखर्च खरिदी पानें विड्यांचीं |
| ६० | अनुष्ठान खर्च शतचंडी |
| १०२०० | बद्दलमुशाहिरा कारकून, प्यादे वगैरे |
| ७२० | खासे चाकरीच्या बायका असामी २ |
| ७५०० | ब्राह्मणसंतर्पण |
| १२ | देणगी गुरव |

६५६५०॥ ब्रह्मचारी ब्राह्मण, येणेंप्रमाणें श्रीव्यंकटेशजीच्या पलीकडील कावेरीतीर व ताम्रपर्णीतीर या प्रांतींचे द्रवीड, तेलंगचे असामी ७८ अठ्याहत्तर असावे व श्रीगोदावरी व कृष्णासमीपवासी तेलंगच असामी ३० असावे; असे प्रत अष्टाशतात् वय वीस, बेवीस वर्षांचे आंत असावे. विद्या संपूर्ण, संहिता, ब्राह्मण, आरण्य, उपनिषदें यामध्यें एक अक्षर उणें नसावें. अथवा शास्त्री असावे. ज्या शास्त्रीं पढले असतील, त्यामध्यें उत्तम निपुण असावे. श्लोकव्युत्पत्ति चांगली असावी. या लिहिल्याअन्वयें विद्या व वय उणें असल्यास सांगू नयेत. तेलंग, द्रवीडाखेरीज सांगू नयेत. जे कन्यादानाचे द्रव्य येथून प्राप्त होईल तितक्यांतच लग्न होई असें असावें. दुसऱ्याचें द्रव्य आंत मेळवूं नये. कन्यादानें होणें तीं आषाढ शुद्ध दशमीपासून मार्गशीर्ष पौर्णिमेअखेर नित्य कृष्णाष्टशत्नामें पूजापूर्वक व्हावीं, अथवा ब्राह्मणांच्या दाटीमुळें सोईस न पडल्यास, गोकुळ अष्टमीचे दिवशीं एकवेळच जितकीं होऊन येतील तितकीं व्हावीं. द्रवीड, तेलंगासच कन्यादानास श्रीइच्छेनें द्रव्य योजिलें असे. त्यांत कोणी भिडेमुळें दुसरा ब्राह्मण योजील, त्यास श्रीभागवतामध्यें नृग राज्याचें आख्यान आहे. तें वाचून मनन करून तें पाहून करणें तें करावें. दर ब्रम्हचारी यांस द्रव्य नेमणूक रुपये.

३०० दक्षणा
२५ अलंकारार्थ, कंठी, कुडक्या, टोपी, पवित्रक सोनें मिळोन

———

३२५

याप्रमाणें सव्वातीनशें रुपये दर ब्रम्हचारी यांस देत जावें.

———

९१००२॥।

एकुण एक लक्ष, दोनशें सव्वा अकरा रुपये. पैकीं वजा महाल मजकूर खर्च नऊ हजार, दोनशें, साडेआठ रुपये. बाकी निवळ जमा एक्याण्णव हजार, पावणे तीन रुपये याची उभय संस्थानांकडे खर्चाची व्यवस्था करून दिल्ही असे व धर्म करावयाची व्यवस्था विस्तारपत्रीं निराळी लिहिली आहे. त्याचे बंद सुमारी ३७ सदतीस. ते पाहून त्याप्रमाणें चालवावें. हा धर्मपुत्र होय. पुत्रवत् आचरण असावें. लिहिल्याप्रमाणें श्रीआज्ञेनुरूप करावें. येथें कोणी मुख्यांत राहील, त्याची देव ब्राह्मणांचे ठायीं निष्ठा असावी व

आचारसंपन्न योग्य असावा. या अन्वये योजून दिल्हाप्रमाणें, श्रीमंतांचें वंशीं विद्यमान काळीं प्रभू जाहला आहे. त्यांनीं व त्यांचे पुत्र पौत्रादि वंश परंपरें धर्मकार्यांस प्रत्याख्यान किमपि न करतां उभय संस्थानांकडे चालवावें. श्रीमूर्तीचें पूजन व ब्रम्हचारी, तेलंगी, द्रविड, यांची पूजापूर्वक कन्यादानें तत्सांगता ब्राम्हणास अन्नदानें व वार्षिक ब्राम्हणांची व सदावर्त व किरकोळ खर्च तदुपयोगी सेवक देशव्यवस्था अधिकारी योजल्याअन्वयें, नृगाख्यानाचें स्मरण, इत्यादि विस्तारपत्राचें स्मरण वर्तमान प्रभू अंशअन्वयें अनवरत प्रभूची आज्ञा वंद्य असावी, मार्गशीर्ष शुद्ध अष्टमी.

सदरहू लिहिल्याप्रमाणें मान्य माधवराव नारायण प्रधान, याप्रमाणें स्वहस्ताक्षर अस्सल पत्रीं असे.

छ ११ मोहरम, सुरसन खमस समानीन मया व अलफ ( इ. स. १७८४-८५ ) याप्रमाणें तारीख बाळाजी जनार्दन फडनीस यांचें हातची अस्सल पत्रावर आहे. ”

मनु स्मृतीचे पहिले अध्यायाचे श्लोक ९६ ते ९९ त ब्राम्हणांच्या महतीचे वर्णन खालील प्रमाणें केलें आहे:—

**भूतानां प्राणिनः श्रेष्ठाः प्राणिनां बुद्धिजीविनः ।**
**बुद्धिमत्सु नराः श्रेष्ठा नरेषु ब्राम्हणाः स्मृताः ॥ ९६ ॥**
**ब्राम्हणेषु च विद्वांसो विद्वत्सु कृतबुद्धयः ।**
**कृतबुद्धिषु कर्तारः कर्तृषु ब्रम्हवेदिनः ॥ ९७ ॥**
**उत्पत्तिरेव विप्रस्य मूर्तिर्धर्मस्य शाश्वती ।**
**स हि धर्मार्थमुत्पन्नो ब्रम्हभूयाय कल्पते ॥ ९८ ॥**
**ब्राम्हणो जायमानो हि पृथिव्यामधिजायते ।**
**ईश्वरः सर्वभूतानां धर्मकोशस्य गुप्तये ॥ ९९ ॥**

अर्थः—सर्व स्थावर जंगम रूप पदार्थांमध्यें प्राणी श्रेष्ठ आहेत. प्राण्यामध्यें बुद्धिमान पश्वादि श्रेष्ठ, त्यांत मनुष्य प्राणी श्रेष्ठ; मनुष्य प्राण्यामध्यें ब्राह्मण श्रेष्ठ, ब्राह्मणामध्यें विद्वान श्रेष्ठ; विद्वान ब्राह्मणामध्यें जे कृतबुद्धि असतात ते श्रेष्ठ; त्यांच्या पेक्षां हि अनुष्ठान करणारे श्रेष्ठ; व त्याहून हि ब्रह्मवेत्ते श्रेष्ठ आहेत. केवळ ब्राह्मणाच्या शरिराची उत्पत्ती हेंच धर्माचें अविनाशी शरीर होय. ब्राह्मण हा प्राणी धर्माकरितांच उत्पन्न झालेला आहे. यास्तव तो आत्मज्ञानाच्या द्वारा मोक्षास समर्थ होतो. कारण उत्पन्न होणारा ब्राह्मण बुद्धीमध्यें सर्वांत श्रेष्ठ च उत्पन्न होतो. सर्व भूतांच्या धर्मसमूहाच्या रक्षणार्थ तो प्रभु आहे. ”

वरील श्लोकावरून कोणत्या प्रकारच्या ब्राम्हणांची महति भगवान मनूस वाटत होती हें स्पष्ट दिसून येत आहे. श्रुतीस्मृतीप्रणीतधर्माची स्थापना करणें हें मराठ्यांच्या राजसत्तेचें ध्येय असल्या कारणानें वरील श्लोकांत वर्णन केलेल्या प्रकारचे ब्राह्मण समाजांत निर्माण करण्याची जबाबदारी मराठ्यांच्या धर्मराज्याच्या सत्तेचीं सूत्रें मुख्य प्रधान पदावर अधिष्ठित असलेल्या भट पेशवे घराण्यावर होती हें उघड आहे. ह्या जबाबदारीची जाणीव पेशव्यांना असल्या कारणानें वरील धर्मसंस्था निर्माण करून ती अव्याहत चालू ठेवण्याची व्यवस्था त्यांनीं केली असली पाहिजे हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. वरील प्रकारच्या शेंकडों देणग्या संबंधीं पुरातन कागद पत्र प्रसिद्ध झाले आहेत. ह्यापैकीं महत्वाचे कांहीं लेख येथें देऊन जागा अडविण्यांत मतलब नाहीं. ह्या असल्या प्रकारच्या देणग्या वरून जी एक बाब प्रामुख्यानें सिद्ध होते ती ही कीं मराठी राज्याचे आमदानीत ज्या विद्या संपादन करणें अवश्य समजले जात असे व ज्या विद्या संपादन करणारास महाराष्ट्रातील लोक मान देत त्या विद्या करणारास मराठी राजसत्ताधिकारी वर्गाकडून शक्य तितकी मदत देण्यांत येत असे. श्रावणमासच्या दक्षणे पैकीं कांहीं भाग नामधारी ब्राम्हणांचे हातांत पडत असण्याचा संभव आहे. परंतु यावरून श्रावणमासची दक्षणा वाटण्याची संस्था मूळ ज्या हेतूने सुरूं करण्यांत आली त्यास कोणत्या हि प्रकारचा गौणपणा येत नाहीं. आतां मन्वादि स्मृतींत सांगितलेल्या धर्मास अनुसरून ब्राम्हण वर्णाचे बाबतींत मराठी राजसत्तेचें धोरण कोणत्या प्रकारचे होतें हें दर्शविणारा एक महत्वाचा लेख आम्ही खालीं देतों:—

शक १६७५-७६ वाड भाग ३ पा. २०५

शंकराजी केशव यास पत्र प्रांत वसई तर्फ आगाशी

तर्फ मजकुरी सामवेदी ब्राम्हणांचीं घरे आहेत त्यास घरपट्टी व वेठ घेतात. स्वामीचें धर्मराज्य कोठें ब्राम्हणास घरपट्टी घेत नाहीत इत्यादि

हुकूम

सामवेदी ब्राम्हणांत जितके उपाध्यपण चालवित असतील आणि ब्राम्हणकर्म करून आचरण करीत असतील त्यास वेठ दरो·

---

१ टीपः—मनुस्मृती अध्याय ७ श्लोक १३३ खालील प्रमाणें आहे:— म्रियमाणोऽप्याददीत न राजा श्रोत्रियात्करम् । न च क्षुधास्य संसींदेच्छोत्रियो विषये वसन ॥ अर्थ " राजाचे धन नष्ट होऊन तो जरी मोठ्या आपत्तींत पडला असला तरी त्याने श्रोत्रिय ब्राम्हणापासून कर घेऊ नये त्याच प्रमाणें त्याच्या राज्यांत राहाणारा कोणता हि श्रोत्रिय क्षुधेनें व्याकूळ होत असणे श्रेयस्कर नाहीं."

**वस्त माफ केली असे. सामवेदी ब्राम्हणांनीं स्नान संध्या करून ब्राम्हण धर्माचे रीती प्रमाणें आचरण करावें न करील त्यास शासन करावें या प्रमाणें करार करून घरपटी माफ केली आहे.**

मन्वादी स्मृतींत सांगितलेल्या धर्माप्रमाणें आचरण करणाऱ्या ब्राम्हणास च फक्त स्मृती ग्रंथांत सांगितलेल्या सवलती देण्यांत येत असत असें वरील लेखावरून सिद्ध होत आहे. वाटेल तो धंदा करणाऱ्या व वाटेल तसें आचरण करणाऱ्या ब्राम्हणास स्मृती ग्रंथांत सांगितलेल्या सवलती मिळण्याची अपेक्षा मराठी राज्याचे आमदानींत सफल होणें शक्य नव्हतें ही बाब हि वरील लेखावरून दिसून येते. कोणताहि प्रांत जिंकून तो स्वराज्यांत सामिल केल्या नंतर त्यांतील ब्राम्हणांच्या योग क्षेमाचे बाबतींत शिवाजी महाराज कोणत्या प्रकारची तरतूद करीत असत या विषयींची उत्तम कल्पना येण्यास साधनीभूत असा एक महत्वाचा लेख आम्हास आढळलेला या ठिकाणीं देऊन आम्ही या मुद्याची चर्चा पुरी करितों:—

ले. ३२ १५९८ माघ वद्य १३

श्रीसकलगुणमंडित सौजन सिंधु सिरोमणी अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री देशाधिकारी वा देशलेखक वा देशमुख माहाला निहाये बिा

धर्माजी नागनाथ देशाधिकारी व देश लेखक वा देशमुख प्रा मामले फोंडा अंतरूज

गिरमाजी तुकदेउ देशाधिकारी वा देश लेख वा देशमुख प्रो डिचोली

वर्तमान व भावी देश प्रांत मर्दनगड व प्रांत भिवगड यांप्रती मोरेश्वर पंडितराउ नमस्कार शक ३ अनल सवंछर लिहिला अभिप्राव यैसेजे:—उभये देशामधें ब्राम्हण आहेत. देशस्त, कराडे व चितपावन व जोतीसी व पद्ये देशोपाद्ये आहेत. **या सकलांची परिक्षा घेउनु उत्तम ब्राम्हण दानायोग्य म्हणउनु राजश्री छत्रपति स्वामींचे आज्ञा प्रमाणें धर्मादाये दानपूर्वक करुनु देऊन प्रतिस्टा केलीजे.** पुरातन जैसें चालिलें आहे त्याच प्रमाणें त्याची वृत्ती त्यांनीं चालऊन सुखरूप असावें. यैसे निश्चय केला. यैशास तुमी वरुस प्रतिवरुशीं त्यास केला, धर्मादाये प्रविस्ट करविले पाहिजे व ते समस्तहि आपलाले ठांई सुखरूप राहिले तर बरवें, नाहीं तर तूर्त समाचार घउनु वेदमूर्ती आपलाले उरूती ( वृत्ती ) चालउनु सुखरूप राहे ते करविलें पाहिजे हे विज्ञप्ती.

पैवस्ता फलगुण बहुल अमावाश्या छ २८ माहे मोहरम.

( गोमांतकाच्या इतिहासाचीं साधनें )

वरील लेख गोमांतक प्रांतांतील कांहीं प्रदेशांतील ब्राम्हणांच्या योग क्षेमाच्या बाबतींत शिवाजी महाराजानीं कोणत्या प्रकारची तजविज केली या बद्दलचा आहे. याच ग्रथांत ले. ३०,३१,३३ व ३४ गोमातक प्रांतांतील दानायोग्य ब्राम्हणांस दरसाल तांदुळ देणगी दिल्या बद्दलची मोरेश्वर पंडितराव यांचीं आज्ञापत्रें आहेत. वेदाध्ययन करून श्रुतीस्मृत्युक्तधर्माप्रमाणें आचरण करणाऱ्या ब्राम्हणाचा योग क्षेम चालावण्याच बाबतींत शिवाजी महाराज किती दक्षता घेत असत हें वरील लेखांवरून उत्तम प्रकारें सिद्ध होत असून बखरकारांनीं या बाबतींत जे कांहीं लिहिलें आहे तें पूर्णपणें बरोबर असल्याचें दिसून येतें. स्वराज्यात ब्राम्हण प्रतिपालाचे बाबतींत कोणत्या प्रकारचें धोरण स्वीकारण्यांत आलें होतें व तें कोणत्या ध्येयास्तव स्वीकारण्यांत आलें होतें याचें दिग्दर्शन आम्हीं येथ पावेतों केलें आहे. या वरून त्या काळीं ब्राम्हणानें कशा हि प्रकारचें वर्तन केलें तरी त्याची उपेक्षा करण्यात येत असे असा वाचकांचा विपरीत ग्रह होण्याचा कदाचित् सभव आहे. परंतु अशा प्रकारचा ग्रह कोणी करून घेतल्यास तो चुकीचा होईल हें या ठिकाणीं नमूद करणें जरूर आहे. श्रुतीस्मृत्यक्तधर्माविरुद्ध कोणत्याहि ब्राह्मणानें वर्तन केल्यास धर्मात सांगितल्या प्रमाणें त्यास दंड करण्यांत कोणत्या हि प्रकारची कसूर त्या काळीं करण्यात येत नसे. वाड यांच्या सातारचे छत्रपती व पेशवे यांच्या रोजनीशींतील निवडक उतारे भाग ८ सवाई माधवराव पेशवे भाग तीन पान २५९ मध्यें या मुद्याच्या दृष्टीनें एक नमुनेदार उदाहरण आढळतें तें आम्ही खालीं देतों:—

( ५१६ ) सामान सबैन मया व अलफ सवाल ३०

रामा कानडा जातीचा ब्राम्हण म्हणवितो, परंतु पुण्यांत गाईचीं पुच्छे तोडलीं वगैरे उपद्रव केले, **प्रायश्चित योग्य नव्हे, सबब किल्ले कोहज अटकेस ठेवावयासी बेडी सुद्धां पाठविला** आहे, तरी पायांत बेडी घालून पोटास कोरडा शेर देऊन पक्या बंदोबस्तानें अटकेंत ठेवणें ह्मणोन, भिकाजी गोविंद यास छ १२ रमजान सनद रसानगी यादी.

वरील उल्लेखावरून श्रुतीस्मृत्युक्त धर्मा विरुद्ध आचरण करणारा ब्राम्हण असला तथापि त्यास कीती कडक शिक्षा देण्यास येत असें हें दिसून येतें. गोप्रतिपालाचे बाबतींत मराठी राज्याच्या धोरणाची चर्चा मागें नुकतीच

आम्हीं केलीच आहे. वरील उदाहरणा वरून हि पूर्वीं गोप्रतिपालाच्या बाबतींतील मराठी राज्याच्या धोरणाविषयीं आम्ही जें कांहीं लिहिलें आहे त्यास चांगलीच बळकटी येत आहे. आतां मराठी राजसत्तेच्या दुसऱ्या एका महत्वाच्या बाबी संबंधींच्या धोरणाच्या चर्चेकडे वळूं.

**स्त्रीप्रतिपालः**—मराठी राज्याच्या सर्व साधारण राजकिय धोरणाच्या अनेक बाबीं पैकीं वर्ण, जात, गोत, धर्म, असा कोणत्या हि प्रकारचा भेद लक्षांत न घेता स्त्रिय चें रक्षण करणें ही एक महत्वाची बाब समजली जात असे. श्रुतीस्मृती प्रणीत अनेक धर्मा पैकीं स्त्री रक्षण हा एक मोठा धर्म समजला आहे. मनुमृतींत स्त्रियांचे रक्षणाचे बाबतींत खालिल वचन आढळून येतें.

**ब्राम्हणार्थे गवार्थे वा देहत्यागो ऽ नुपस्कृताः।**
**स्त्रीबाभ्युपपत्तौ च बाह्यानां सिद्धि कारणम्॥**

(म. स्मृ. अ. १० श्लो. ६२)

**अथः**—" गाय, ब्राम्हण, स्त्री, व बालक यांतील कोणाचें हि रक्षण करण्या करितां धनादि फलाची इच्छा न करिता प्राणत्याग केल्यास तो या प्रतिलोमज लोकांच्या स्वर्ग प्राप्तीस कारण होतो. " या श्लोकांस प्रतिलोमज लोकांच्या स्वर्ग प्राप्तीस वरील गोष्ट कारणीभूत होत ही बाब जरी प्रामुख्यानें सांगितली आहे, तथापि गाय, ब्राह्मण, बालक, स्त्रिया इत्यादिकांचें रक्षण करणें हा सर्व वर्णांच्या लोकांचा सामान्य धर्म असल्याचें वरील वचना वरून सिद्ध होत आहे. आतां स्वराज्य संस्थापक शिवाजी महाराजांचे या बाबतींत कोणत्या प्रकारचें धोरण होतें हें त्यानीं त्यांच्या सैनिकांच्या वर्तना संबंधीं केलेल्या नियमा वरून दिसून येतें. मागील पान २५१ वर हे नियम दिले आहेत त्यांत " पर मुलखांत बायको न धरावी " असें स्पष्ट ह्मटलें आहे. यावरून श्रुतीस्मृती प्राणित धर्मास अनुसरून त्यांनीं आपले या बाबतींत धोरण ठरविलें होतें हें स्पष्टपणें सिद्ध होत आहे. या शिवाय त्यांच्या स्वतःच्या या बाबती संबंधाच्या आचरणाचा विचार केला असतां तें हि श्रुतीस्मृत्युक्त धर्मास अनुरूप अशा प्रकारचें होतें असें दिसून येतें. आबाजी सोनदेव यांनीं कल्याण प्रांतावर स्वारी केली तींत त्याचे हातीं तेथील मुसलमान सुभेदाराची सुस्वरूप मुलगी सापडली व तिजला शिवाजी महाराजास अर्पण करण्याकरितां त्यांनीं दरबारांत आणली. तेव्हां शिवाजी महाराजांनीं खालील उद्गार काढल्याचें सप्तप्रकरणात्मक चरित्रांत नमूद आहेः-" ज्यास यश पाहिजे त्यानें परस्त्री अभिलाष करूं नये.

राजानें उच्छिष्ट स्त्री अंगीकारूं नये. परस्त्री अभिलाष इच्छे करून रावणादि क्षयास गेले. राजास प्रजा सर्व आपत्याचे जागां. स्त्रिया करणें शतावधी कराव्या असा राजधर्म आहे असें आबाजी सोनदेव यास सांगून तिजला वस्त्रें अलंकार देऊन तिच्या सासरीं पोहचती केली " ( पान ४१ ). आबाजी सोनदेव यांनीं आणलेल्या स्त्रीचा अंगिकार करणें राजधर्मास उचित नाहीं असें कारण शिवाजी महाराजांनीं सांगून अशी करणी या उपरी कोण्ही केल्यास कार्यास येणार नाहीं अशी सर्वांस ताकीद दिली. मागे शभराव्या पानावर याच प्रसंगाचें शिवदिग्विजय बखरींत जें वर्णन दिलें आहे त्यांत " असा संबंध करावा, धर्माचा लोप व्हावा, तेव्हां जनास शिक्षा कशी लागेल " असे उद्गार शिवाजी महाराजांनीं काढल्याचे नमूद आहे. या उद्गारावरूनहि भगवद्गीतेंत सांगितलेल्या तत्वाप्रमाणें शिवाजी महाराज धर्मास अनुसरून आचरण करण्याचें बाबतींत केवढी खबरदारी घेत असत हें सिद्ध होत आहे. स्वराज्य स्थापना करण्यांत धर्म स्थापना व्हावी हें शिवाजी महाराजांचें मुख्य ध्येय असल्यामुळे शिवाजी महाराजानीं त्याचे सैनिकाकरितां वरील प्रकारचे नियम करून स्वतःच्या वर्तनानें त्यांनीं सर्वत्रास अत्यंत श्रेष्ठ व प्रशंसनिय असा धडा घालून दिला. शिवाजी महाराजांचे पश्चात महाराष्ट्रांतील राजकारणी पुढाऱ्यांनी हे ध्येय उत्तम प्रकारें पाळल्याची कांहीं उदाहारणें या ठिकाणीं नमूद करणें अवश्य आहे. मागे पान ११७ वर " ब्राम्हणाचा कबिला अटकेत ठेवावा हा महाराष्ट्रधर्म नव्हे " अशा प्रकारचे शाहू छत्रपतीचे उद्गार आम्हीं दिले आहेत त्यावरून त्यांच्या धोरणाची कल्पना सहज रितीनें होऊं शकते. वसईचे वेढ्याचे वेळीं चिमाजी आप्पांचे हातीं एका पोर्तुगिज सरदाराची बायको सापडली असतां तिला चोळी बांगडी देऊन तिचा बहुमान करून तिच्या पतीकडे सुरक्षितपणें पोहचवून दिल्याचें इतिहास प्रसिद्ध आहे. वर दिलेल्या उदाहरणा वरून स्त्री प्रतिपालनाचे बाबतींत मराठ्याचें सर्व साधारण धोरण श्रुतीस्मृत्युक्तधर्मास अनुसरून थोरपणाचें व प्रशंसनिय असें होतें ही बाब सिद्ध होत आहे. मराठ्यांच्या लुटीचे सवई बद्दल त्यांचेवर कडक टीका करणाऱ्या युरोपियन इतिहासकारांनीं देखील या बाबतींत मराठ्यांविषयीं यत्किंचित् हि प्रतीकूल अशा प्रकारची टीका केल्याचें कोणत्या हि इतिहास ग्रंथांत आढळून येत नाहीं. ही गोष्ट लक्षात घेतली असतां मराठ्यांचे धोरण या बाबतींत अत्यंत प्रशंसनीय असले पाहिजे या खेरीज दुसरें अनुमान काढणें शक्य नाहीं. स्त्री प्रतिपालनाचा

धर्म पुरातन काळापासून श्रुतीस्मृत्युक्त धर्मानुयायी लोक पाळीत आले असतां शिवाजी महाराजांचे काळीं या धर्माच्या पालनाचे बाबतींत त्यांना इतक्या प्रामुख्यानें पुकारा करण्याचें प्रयोजन का पडावें याची प्रस्तुत स्थळीं थोडी बहुत मीमांसा करणें जरूर आहे. मुसलमान लोकांचा भरत खंडांत प्रवेश झाल्यापासून तों शिवाजी महाराजांनीं त्यांचे राजकिय वर्चस्व पालथें पाडून स्वराज्य स्थापनेद्वारें धर्म स्थापना करी पावेतों मुसलमान धर्मानुयायी लोकांनीं स्त्रियांचे बाबतींत स्वीकारलेल्या धोरणाचा विचार केला असतां तें अत्यंत हिडीस स्वरूपाचें व कोणाचे हि मनांत त्वेष व उद्वेग उत्पन्न करणारे अशा प्रकारचे होतें अशी इतिहास साक्ष देत आहे. महंमद कासीम या मुसलमान सरदारानें शक ५०० चे सुमारास भरत खंडाच्या सिंध प्रांतावर प्रथम स्वारी केली. हजारों दीन व निराश्रित हिंदु स्त्रियांच्या मुसलमानधर्मियांकडून झालेल्या विटंबनेमुळें उगम पावलेल्या सिंधुनदरूपी आश्रूंच्या प्रवाहानें त्यानें त्या प्रांतावर केलेल्या स्वाऱ्यांची व लढायांची हकिकत ओथंबलेली आहे. प्रस्तुत स्थळीं रा. वैद्य यांच्या मध्ययुगीन भारत ग्रंथांतील या संबंधाचा एक महत्वाचा उतारा आम्ही खालीं देतों. त्यावरून आम्ही केलेल्या विधानाची सत्यता वाचकांस पटल्या वाचून राहणार नाहीं:—

" विरुद्ध असलेल्या हिंदु लोकांची कत्तल करणें व त्यांच्या स्त्रियांना दासी म्हणून पकडणें किंवा त्यांच्याशीं लग्न लावणें हा तर त्यांचा ( मुसलमानांचा ) उघड बाणाच होता " ( पु. २ प्र. १ पा. ३५ ). " दाहराची दुसरी राणी बाई ही १५००० लोकांनिशीं राऊरला च राहिली होती. तेथें कासिमानें येऊन आपल्या विजयी सैन्याचा किल्याला वेढा दिला. तेव्हां आतां 'या गोमांस भक्षक चांडाळांच्या हातून सुटण्याला कांहीं मार्ग नाहीं ' असें पाहून बाईनें जोहार करण्याचा निश्चय केला. तिच्या विचाराला दुसऱ्या अनेक रजपूत स्त्रियांचें अनुकुल्य मिळून त्या सर्व एका घरांत शिरल्या आणि त्याला आग लावून देऊन त्यांनीं आपल्या देहाचें भस्म करून घेतलें. भरत खंडाच्या इतिहासांत स्त्रियांनीं केलेल्या शरीर यज्ञाचें बहुधां हेंच पहिल उदाहरण असावें. हिंदु लोक पूर्वीहि एकमेकांशीं लढत व त्यांत विजय होणारे जित राजांच्या स्त्रिया हि प्रसंगोपात्त स्वतःच्या कबज्यांत घेत हें पूर्वी हर्षकालीन चालीरीतींचें वर्णन करतांना दाखविलें च आहे. पण तेव्हां असली गोष्ट त्या स्त्रियांच्या माताविरुद्ध जुलमानें मात्र होत नसे. विजयी राजांच्या जनानखा-

त्यांत त्यांच्या पत्न्या किंवा नाटकशाळा म्हणून राहण्यांची त्यांची खुषी नसल्यास त्यांना केवळ दासीच्या पेशानें राहण्यास किंवा वाटेल तर बौद्ध विहारांत भिक्षुणी होऊन राहण्यासहि हरकत होत नसे. शिवाय विजयी राजांकडे राहण्यांत जातिधर्मांचा हि त्याग त्यांना घडत नसे. पण मुसलमानांच्या बाबतीत हें शक्य नव्हतें, ते हिंदु स्त्रियांशीं जबरीनेंच लग्नें लावींत किंवा त्यांना नाटकशाळा करीत, व मुसलमानी धर्माची दीक्षा हि जुलमानें च देत. मुसलमानी धर्मांतील गोमांस भक्षण आणि गोहत्या या तर हिंदु लोकांना अत्यंत चीड आणणाऱ्या गोष्टी ! ! हिंदु स्त्रियांची कसोटी पूर्वापार चालत आलेल्या सतीच्या प्रकारांत दिसून येत होतीच. तेंच धैर्य पुढें चालवून मुसलमानी स्वाऱ्यांचें प्रसंगीं त्यांनीं अनेकशः असले भयंकर आत्म यज्ञ केले व त्यामुळें हिंदुस्थानच्या इतिहासांतील मुसलमानी स्वाऱ्यांचा भाग अत्यंत भयंकर व उद्वेग जनक झाला आहे."

सिंध प्रांतावर प्रथम स्वाऱ्या करणाऱ्या मुसलमानांची जी वरील मनोरचना ती त्यांच्या राजकिय सत्तेचा ऱ्हास होऊन लयास जाइ तोंपर्यंत कायम होती. देवगिरीच्या रामदेवराव जाधवावर अल्लाऊद्दीन खिलजीनें शेवटची स्वारी करून त्यास धुळीस मिळविलें तेव्हां त्याची बायको व मुलगी मुसलमान सैन्याचे हातीं सांपडली. एक वर्ष पावेतों त्यांना कारागृहांत ठेविल्यावर बादशाहानें व त्याच्या मुलानें त्यांचे बरोबर लग्नें लाविलीं असें त्या काळच्या इतिहासांत नमूद आहे. रजपूतावर मुसलमानांच्या ज्या स्वाऱ्या होत त्यांत घडणाऱ्या जोहाराचे वरील उताऱ्यांत वर्णन केलेलेंच आहे. रजपुतांच्या आणि मुसलमानांच्या झगड्याचा इतिहास जोहाराच्या लालभडक ज्वालांनीं भयानक असा कितीहि कठोर अंतःकरणाच्या माणसास भासल्या खेरीज राहणार नाहीं. लढाईत होणारे प्रकार बाजूस ठेविले तरी यवनी अमलदारांचें वर्तन हि या बाबतींत किळसवाणें व चीड येण्यासारखे असें. शिवदिग्विजय बखरींत स्वराज्य स्थापनेस प्रारंभ करण्याचे सुमारास लोकांत मिळून मिसळून त्यांच्या अंतःकरणाचा शिवाजी महाराज कोणत्या रितीनें ठाव घेत असत याचें एके ठिकाणीं वर्णन केलें आहे. तें वर्णन करित असता शिवाजी महाराजाशीं संवाद करणाऱ्या व्यक्तीचे तोंडांतील खालील उद्‌गार शिवदिग्विजयकारानें दिले आहेत ते लक्षांत ठेवण्या सारखे आहेतः-" त्यांत यवनी अधिकार परम नष्ट ! स्त्रियांशीं बलात्कार ! सामदामें नेऊन, द्रव्य देऊन, वश्य करून भोगितात ! स्त्रियांस उन्माद येऊन भ्रतार गोळांगुळवत् मानितात ! कदाचित्

भ्रतारें शिक्षा केली असतां, यवनांशीं स्त्री अनकूलता. त्यांणीं अनेक प्रकारें आदावत करावी. त्याचा वित्तविषय हरण करावा. त्यांसही आप्रमाद येऊन मारावे असें होतें. याचा कधीं परमेश्वर नाश करील " इत्यादि ( पा. ९९ व १०० ). या उद्‌गारावरून शांततेच्या काळांतहि मुसलमान अधिकारी त्या काळीं स्त्रियांचे बाबतींत कोणत्या प्रकारचें वर्तन करीत असत हें दिसून येत आहे. शिवाजी महाराज उदयास येई तों पावेतों मुसलमान लोकांच्या वरील मनोरचनेंत कांहीं एक फेरफार पडला नव्हता. समर्थ रामदास स्वामींनीं एका कवितेंत मुसलमानांच्या राजवटींत स्त्रियांची विटंबना कशा प्रकारच्या होत असे याचें वर्णन खालील प्रमाणें केलें आहे: —

**किती एक ते प्राणकर्णे चि घेती। किती उत्तमा त्या स्त्रिया भ्रष्टवीती।**
**किती मोट बांधोनि ते बूडवीती। पिछोडे चि बांधोनि हीरोनि नेती ॥**
**किती गुर्जिणी ब्राम्हणी भ्रष्टवील्या । किती शांमुखीं जाहाजीं फांकवील्या ।**
**किती येक देशांतरीं त्या विकील्या । किती सुंदरा हाल होऊनी मेल्या ॥ ९ ॥**

( श्री सांप्रदायिक विविध विषय भा. १५ पा. २६२ )

आतां पावेतों केलेल्या चर्चेवरून जी एक गोष्ट प्रमुखत्वानें दिसते ती ही कीं स्त्रियांचे बाबतींत मुसलमानांची सर्व साधारण मनोरचना अत्यंत चीड व द्वेष उत्पन्न करणारी अशा प्रकारची होती. अशा परिस्थितींत स्वधर्म स्थापना करण्याऱ्या शिवाजी महाराजांस स्त्रीप्रतिपालनाचे बाबतींत पूर्व कालीन स्मृती धर्माची जागृति लोकांत उत्पन्न करून त्या धर्माचें आचरण केलें जाईल अशी तरतूद करणें अवश्य वाटलें यांत कांहीं नवल नाहीं. रा. वैद्य यांच्या ग्रंथांतील वरील उताऱ्यांत पूर्वकालीन भारतीय राजांचे स्त्रियाचे बाबतींत जें धोरण नमूद केलें आहे त्याहि पेक्षां अत्यंत उच्च व प्रशंसनीय असें धोरण शिवाजी महाराजांनीं स्वीकारून सर्व महाराष्ट्रीय जनतेस उत्तम प्रकारचें वळण घालून दिलें हें वरील विवेचनावरून उघड दिसत आहे. आतां स्त्रियांचे बाबतींतील दुसऱ्या एका धर्माचें दिग्दर्शन करणें जरूर आहे. निराश्रित स्त्रीचें रक्षण करणें हा जसा श्रेष्ठ धर्म आहे तितका च श्रेष्ठ धर्म स्त्री सशस्त्र लढण्यास आली असतां तिचे बरोबर युद्ध करणें हा आहे. शिवाजी महाराजाचे आयुष्यांत त्यांचेवर अशा प्रकारचा प्रसंग एके काळीं आला होता व त्या काळीं सशस्त्र स्त्री बरोबर युद्ध

**करणें हा महाराष्ट्रधर्म असल्याचें त्यांनीं** आपल्या सरदारास बजाविलें व त्या स्त्रीशीं जातीने युद्ध करून तिचा पराभव केला. वऱ्हाडांतील माहूरचे देशमुख जगजीवनराव यांची बायको रायबागीण ही लढाई करण्यात पटाईत म्हणून प्रसिद्धीस आली होती व तिनें युद्धांत कित्येक नामांकित लढवय्याचा पराभव केला होता. ती औरंगजेबच्या पक्षाची होती. औरंगजेबनें फौजेसुद्धां तिजला शिवाजी महाराजावर स्वारी करण्या करितां पाठविलें, त्या प्रसंगाचें वर्णन शिवदिग्विजय बखरींत दिले आहे तें आम्ही खालीं देतों. " ती बातमी येतांच, बोराटीकर रामजी पाटील देशमुख, यशवंतराव रामाजी, विश्वासराव व दिनकरराव बागराव, पांच पांच हजारी मावळे लोकांनिशीं पाठविले. त्यांस जातसमयीं आज्ञा केली, ' कोकण प्रांताचा खजीना न्यावयास रायबागीण येते, इचा आदर केला पाहिजे. कारण स्त्रीसरदार किताब पादशाही पावून, लहान मोठे लोकांची अबू घेते. पादशाहा सर्वांस म्हणतात, कीं तुमचे हातून काम होत नाहीं. मर्द असोन नामर्द जाला. बायकोचे हातून हे काम करवीन, त्या प्रमाणें तीही सरकार काम नेकीने बजावून राहिली. **तिची सेवा कराल तर महाराष्ट्रधर्म तुमचा, नाहीं तर ठीक नाहीं.** ' ते समयीं **उत्तर केलें कीं " स्त्रीशीं युद्ध निंद्य " त्याचें उत्तर बापलेंक युद्धवध आहे. त्यापक्षीं स्त्री शस्त्राविरहित न मारावी. शस्त्र धारण केलें असतां निंद्य नाहीं.** " त्या आज्ञेस सर्वांनीं वंदून, फौज लोक घेऊन, खिंड धरून बसले व महाराजहि फौज सरंजामासह लागो लाग मुकाबल्यावरी दाखल जाले."

शिवदिग्विजय पा. २१४

वरील प्रमाणें शिवदिग्विजयकारानें केलेल्या वर्णनांत सशस्त्र स्त्रीशीं युद्ध करणें हा महाराष्ट्रधर्म आहे असें शिवाजी महाराजांनीं आपल्या सरदारास

---

१ टीपः—या घराण्याची माहिती भा. इ. सं. त्रैमासिक वर्ष २ अं. १ ते ४ पा. ४४ ते ५१ मध्यें प्रसिद्ध झाली असून त्याच अंकांत ह्या घराण्याच्या कांहीं अस्सल सनदा छापल्या आहेत. बखरींत उल्लेखिलेली रायबागीण कोण या बद्दल हा लेख प्रसिद्ध होई तों पावेतों बरीच शंका होती व नाना तर्क पुढें येत होते आतां जगजीवनराव यानांवच्या वाशीम येथील ऋग्वेदी देशस्थ ब्राम्हणाची बायको हीच रायबागीण ही गोष्ट सिद्ध झाली आहे असें मानण्यास कोणत्या हि प्रकारचा प्रत्यवाय राहिला नाही. " पंडिता " व " रायबागीण " असे दोन किताब तिजला औरंगजेबनें दिले होते व रायबागीण या नांवानें ती प्रसिद्धी पावली.

सांगितल्याचें नमूद केलें आहे. श्रुतीस्मृतीप्रणीत धर्माशीं शिवाजीमहाराजांची ही शिकवण कितपत सुसंगत आहे याची प्रस्तुत स्थळीं चर्चा करणें जरूर आहे. वरील उताऱ्यांत बापलेक युद्धवध आहे, सबब सशस्त्र स्त्री युद्धवध आहे अशी विचारसरणी शिवाजी महाराजानीं दर्शविली आहे. मनुस्मृतींत या मुद्यासंबंधीं खालील वचन आढळतें:—

गुरुं वा बालवृद्धौ वा ब्राह्मणं वा बहुश्रुतम् ।
आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन् ॥ ( म अ.८ श्लो.३५० )

अर्थः—" गुरु, बालक, वृद्ध, व बहुश्रुत ब्राम्हण यांतील कोणी हि जरी शस्त्र उचलून वध करण्याकरितां आपणांवर येऊं लागला व पळून जाऊन हि आपलें रक्षण करणें अशक्य झालें तर त्यास, हा गुरु आहे, विद्वान आहे, ब्राम्हण आहे इत्यादि विचार न करितां मारून टाकावें. " वरील वचनावरून स्मृती प्रणीतधर्मा प्रमाणें अवध्य समजली जाणारीं माणसें कोणत्या परिस्थितींत वध्य आहेत हें स्पष्ट होत आहे. मनुस्मृतींतील वरील वचनांत गुरु ही संज्ञा मुख्यत्वें करून पिता दर्शविण्या करितां योजली आहे. पढविणारा हा वरील वचनांतील गुरु शब्दाचा अर्थ गौण आहे. भारतीय युद्धाचे प्रसंगीं श्रीकृष्णानीं अर्जुनाचा रथ कौरवांचे सैन्या समोर नेऊन उभा केला ते वेळीं गुरुजन व आप्त यांचा वध कसा करावा असें अर्जुनाचे मनांत येऊन तो युद्धापासून पराङ्मुख झाला. तेव्हां तुझे बरोबर युद्ध करण्यास प्रवृत्त झालेले जरी तुझे गुरु आप्त असले तरी त्यांच्याशीं युद्ध करणें हा तूं क्षत्रिय असल्या कारणानें तुझा धर्म आहे असें अर्जुनाच्या शंकेचे श्रीकृष्णानीं निरसन करून त्यास युद्ध करण्यास प्रवृत्त केलें भारतीय युद्धाच्या वेळचा हा प्रसंग व वरील स्मृती वचन लक्षात घेतलें असतां शिवाजी महाराजांनीं रायबागीणीशीं युद्ध करण्या बद्दल त्याचें सरदारास केलेली आज्ञा स्मृतीप्रणीतधर्मास पूर्णपणे अनुसरून होती हें उघड होत आहे. रामायण महाभारत या ग्रथांचें उत्तम परिशिलन शिवाजी महाराजांनीं केलें होतें असें बखरींत वर्णन आहे. वरील आज्ञा शिवाजी महाराजांनीं त्यांच्या सरदारास केली ते वेळीं रामायणांतील ताटकेचा श्रीरामानें केलेल्या वधाचा प्रसंग हि त्यांचे मनांत आला असावा. ताटकेच्या वधासंबंधीं रामायणांतील खालील वर्णन या मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें महत्वाचें आहे.

एनां राघव दुर्वृत्तां यक्षीं परमदारुणां ।
गोब्राम्हणहितार्थाय जहि दुष्टपराक्रमाम् ॥
नहि एनां शापसंस्पृष्टां कश्चिदुत्सहते पुमान् ।
निहन्तुं त्रिषु लोकेषु त्वामृते रघुनंदन ॥

नहि ते स्त्रीवधे कृते घृणा कार्या नरोत्तम ।
चातुर्वर्ण्यहितार्थाय कर्तव्यं राजसूनुना ॥
नृशंसमनृशंसं वा प्रजारक्षणकारणात् ।
पातकं वा सदोषं वा कर्तव्यं रक्षता सताम् ॥
राज्यभारनियुक्तानामेष धर्मः सनातनः ।
अधर्म्यां जहि काकुत्स्थ धर्मो ह्यस्या न विद्यते ॥

अर्थः—हे रामा गोब्राम्हणांचे हितासाठीं या अत्यंत दुराचारी, दुष्ट, पराक्रमी, फार भयंकर अशा यक्ष स्त्रीला ( ताटकेला ) मारून टाक. तुझ्या वांचून या सर्व त्रैलोक्यामध्यें हे रघुपुत्रा! शाप दग्ध अशा हिला मारण्यास कोणी हि पुरुष धजावत नाहीं.

ही स्त्री आहे. हिचा वध कसा करावा अशी तुला हे पुरुषश्रेष्ठा दया येण्याचें कारण नाहीं. कारण चातुर्वर्ण्याच्या हितासाठीं राजपुत्रानें हें करावयालाच पाहिजे आहे.

प्रजारक्षण व्हावें म्हणून कोणतें हि सौम्य किंवा कठोर कृत्य अवश्य केलें पाहिजे मग तें किती हि सदोष असो.

राज्य कारभार चालविण्याकडे ज्यांची योजना झाली त्यांची ही सनातन शिकवण आहे.

या साठीं हे कुकुत्स्थकुलोत्पन्न रामा या पापी ताटकेला ठार मार, हिला मारण्यांत कांहीं पाप नाहीं.

वरील उताऱ्यांत जी विचारसरणी दिली आहे ती शिवाजी महाराजांवर स्वारी करण्याकरितां रायबागीण उद्युक्त झाली त्या प्रसंगास पूर्णपणें लागू पडते. चातुर्वर्ण्याचा कट्टा द्वेष्टा व त्यावर घाला घालणारा असा जो औरंगजेब त्यास मदत करण्याकरितां म्हणून चातुर्वर्ण्याचें संरक्षण हेंच ज्यांचें ध्येय अशा . शिवाजी महाराजावर रायबागीण हि सशस्त्र व ससैन्य स्वारी करावयास आली. अशा स्थितींत ताटकेप्रमाणें च तिचा वध करण्यांत धर्मदृष्ट्या कोणत्या हि प्रकारचा दोष नसल्याकारणानें शिवाजी महाराजांनीं त्यांच्या सरदारास तिचे बरोबर युद्ध करण्यास आज्ञा केली व स्वतः हि तिच्यावर त्यांनीं शस्त्र धरण्यास कमी केलें नाहीं. रायबागीणीचा या युद्धांत शिवाजी महाराजांनीं पूर्ण पराभव केला व ती त्यांस शरण येऊन त्यांच्या हातीं सांपडली. नंतर शिवाजी महाराजांनीं फिरून महाराष्ट्रधर्मास अनुसरून तीचा वध अगर इतर कोणत्या हि प्रकारची विटंबना न करितां तिचा सन्मान करून तिच्या घरी तिजला पोहचती करून

दिली. धर्मस्थापना हें शिवाजी महाराजांचें प्रमुख ध्येय असल्याकारणानें त्यांच्या चरित्रांत त्यांचेवर वरील प्रकारचे जे जे प्रसंग आले त्या प्रसंगांचा सूक्ष्म विचार केला असतां त्यांनीं धर्मवचनास अनुसरून वर्तन केल्याचें दिसून येईल. वरील उताऱ्यांत शिवाजी महाराजांचे तोंडीं माहाराष्ट्र धर्म हे जे शद्ब बखरकाराने घातले आहेत ते स्मृति प्रणीत धर्म दर्शविण्याकरितां योजिले आहेत हे मनुस्मृतींतील व रामायणातील वरील वचनावरून उघड होत आहे. स्त्रीप्रतिपालाच्या बाबतींतील मराठ्याच्या धोरणाची वरीलप्रमाणें चर्चा करून आतां आम्ही अशाच स्वरूपाच्या दुसऱ्या एका मुद्याच्या चर्चेकडे वळतों.

**साधुसंत व सत्पुरुष यांचा परामर्षः**-या बाबतींत थेट शिवाजी महाराजापासून तो मराठी साम्राज्य लयास जाई तोंपर्यंत मराठ्यांच्या राजकीय सत्तेचे धोरण एक च ठरलें होतें. देवस्थानांची पूजाअर्चा, जयंत्या, पर्वें, महोत्सव इत्यादि बाबीप्रीत्यर्थ द्रव्य दिलें असतां त्याच्या योगानें पुण्य संचय होऊन राज्यास बळकटी येते अशी महाराष्ट्रीय समाजाच्या सर्व राजकारणी पुढाऱ्यांची निःसीम भावना होती. चिटणीसकृत राजनीतींतील राजानें व्यय कसा करावा या संबंधाचा त्या ग्रंथाच्या १४ व्या पानावरचा जो उतारा मागें आम्हीं दिला आहे त्या उताऱ्यांत "राजानें उत्साह, जयंत्यादि पर्वे व महान् ब्रम्हनिष्ठ ऋषी यास साहित्यें पुरवावीं, स्वास्थें करून घ्यावी" हा राजाचा धर्म असल्याचें स्पष्ट सांगतले आहे. खुद्द शिवाजी महाराजांना लहानपणापासून शिक्षण च अशा प्रकारचें मिळालें होतें कीं, देवस्थानें, साधुसंत, सत्पुरुष यांचा परामर्ष घेण्याकडे त्यांच्या मनाचा कल बनून गेला होता. महाभारतादि ग्रंथांचा शिवाजी महाराजास अल्पवयापासून उत्तम परिचय करून देण्यांत आला हता. धर्मराजादि पांडव, ऋषी, मुनी, तपस्वी यांच्या विषयीं कोणत्या प्रकारचा आदर बाळगीत असत व त्यांच्या करितां सर्वस्वावर हि पाणी सोडण्यास ते नेहेमीं कसे तत्पर असत ही गोष्ट शिवाजी महाराजांच्या मनावर लहानपणापासून बिंबून गेली होती. अल्पवयांत त्यांच्या मनावर झालेल्या या संस्काराच्या योगानें पुरातन देवस्थानांच्या पूजा अर्चा, जयंत्या, पर्वें, महोत्सव, साधुसंत व सत्पुरुष इत्यादिकांप्रीत्यर्थ शिवाजी महाराजांनीं विपुल द्रव्य व देणग्या दिल्या. सभासदकृत शिवछत्रपतींच्या

चरित्रांतील या मुद्यासंबंधीं खालील उतारा फार महत्वाचा आहे. " मुलखांत देव देवस्थानें जागा जागा होतीं त्यांस दिवाबत्ती, नैवेद्य, अभिषेक, स्थान पाहून यथायोग्य चालविले " ( पा. २५ ). बालपणापासून शिवाजीमहाराजांना साधुसंतांच्या व सत्पुरुषांच्या समागमाची किती आवड होती हें त्यांच्या चरित्रांवरून सिद्ध होत आहे. या आवडीमुळें सभासदकृत चरित्रांत वर्णिल्याप्रमाणें त्यांनीं सढळ हातांनीं वरील प्रकारच्या संस्थास व व्यक्तीस विपुल देणग्या दिल्या. समर्थ रामदासस्वामी व शिवाजी महाराज यांचा गुरुशिष्य संबंध जडल्यानंतर समर्थांनीं स्थापन केलेल्या चाफळ येथील श्रीरामाच्या वार्षिक उत्सवाप्रीत्यर्थ शिवाजी महाराजांनीं कायमची नेमणूक करून दिली. रामदास आणि रामदासी मालेपैकीं " श्रीसांप्रदायाचीं कागदपत्रें " भाग नववा या ग्रंथामध्यें चाफळ येथील श्रीरामाच्या देवस्थानासंबंधीं अस्सल पत्रव्यवहार छापण्यांत आला आहे. त्या ग्रंथापैकीं लेखांक ८०, ८१, ८२, ८४, ८६, ८८ व ९४ हीं पत्रें प्रस्तुत मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें फार महत्वाचीं आहेत. शिवाजी महाराजांच्या पश्चातचीं हीं पत्रें आहेत. परंतु त्या पत्रांमध्यें चाफळ येथील श्रीरामाच्या देवाळयास शिवाजी महाराजांनीं दिलेल्या देणग्या कोणत्या ध्येयानें उद्युक्त होऊन दिल्या होत्या त्याचप्रमाणें समर्थ रामदास स्वामींची शिवाजी महाराजाना या बाबतींत कोणत्या प्रकारची शिकवण होती हें उत्कृष्टपणें दिसून येत आहे. यास्तव वरील लेखांतील महत्वाचे उतारे आम्ही खालीं दिले आहेत. लेखांक ८० मध्यें " ऐसियासी श्रीचे ( म्हणजे रामदास स्वामींचे ) कृपेकरून माहाराजाचे ( म्हणजे शिवाजी महाराजांचे ) राज्य वृद्धितें पावले. याउपरी श्रीचा समारंभ विशेष चालविला पाहिजे येविशि श्रीचे ( रामदास स्वामींचे ) वचन राजश्री कैलासवासी ( शिवाजी महाराज ) यासी आहे कीं, " श्री देवाचा चाडता वाडता महोत्सव चालवाल तैसेच चढते वाढते राज्य अधिवृद्धिते पावेल " असें वचन आहे. लेखांक ८१ मध्यें " हें माहाराष्ट्र राज्य म्हणजे देवा ब्राह्मणांचे आहे श्रीचा समारंभ विशेषात्कारें चालविणे स्वामीस अगत्य " अशा प्रकारचा उल्लेख आहे. लेखांक ८४, ८५ व ८६ मध्यें अनुक्रमें खालील स्वरूपाचे उल्लेख आहत. " हे राज्य देवा ब्राह्मणाचे आशिर्वादाचे आहे. " " श्री सत्पुरुषाचे देवस्थान बहुत थोर हे मऱ्हाठे राज्य म्हणजे देवा ब्राम्हणाचे आहे. उत्तरोत्तर चढता वाढता श्री देवाचा भक्ति महोत्सव चालवावा तैसेच चढते वाढते राज्य अभिवृद्धिते पावेल. " लेखांक ८८ मध्यें " हें राज्य म्हणजे देवा ब्राह्मणाचे आहे.

धर्मस्थापना विशेषात्कारें चालविणें स्वामीस [शिवाजी महाराजास] अगत्य " असा उल्लेख आहे. वरील सर्व उताऱ्यांचा समुच्चयदृष्ट्या विचार केला असतां त्यावरून असें स्पष्टपणें सिद्ध होत आहे कीं, देवस्थानादिकांच्या पूजा अर्चा, महोत्सव इत्यादि यांचीप्रीत्यर्थ द्रव्य देणें म्हणजे धर्मस्थापनेस मदत करणें होय व धर्मवृद्धीच्या योगानें राज्यवृद्धि होते अशी समर्थ रामदास स्वामी आणि शिवाजी महाराज या उभयता गुरुशिष्यांची निःसीम भावना होती व या भावनेच्या योगानें शिवाजी महाराजांनीं त्याकाळीं अस्तित्वात असलेल्या पुरातन देवस्थानास व समर्थ व त्यांच्या सारख्या साधुपुरुषांनीं स्थापन केलेल्या नूतन देवस्थानास द्रव्याच्या देणग्या दिल्या. शिवाजी महाराजांनीं स्थापन केलेल्या स्वराज्याच्या अंतर्भूत कोणतें ध्येय होतें याचा हि वरील उताऱ्यावरून उत्तम खुलासा होत आहे. " महाराष्ट्र राज्य " किंवा " मऱ्हाटे राज्य " म्हणजे "देवा ब्राह्मणांचें" व "तें देवा ब्राह्मणांच्या आशिर्वादाचें फळ" व "हें व धर्मराज्य " अशा प्रकारची विचारसरणी त्या काळच्या महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांची होती. प्रस्तुत मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें लेखांक ४३ मधील खालील वचनें फार महत्त्वाचीं आहेत. हा लेख म्हणजे शंभू छत्रपतीस समर्थांनीं शिवाजी महाराजाच्या निधनानंतर लिहिलेलें पत्र होय:--

" श्रीचे पेठेचे पत्र दृश्य करणे कार्यकर्ते नीती वंद्याचे। श्रीकार्यासी अति तत्पर ऐसा पुरुषांच्या योगें धर्मवृत्ती आहे. धर्मवृद्धीनें राज्यवृद्धी आहे ॥

इतुकें बोलिलों स्वभावें। यांत मानेल तितुकें घ्यावें।
श्रोतीं उदास न व्हावें। बहु बोलिलों म्हणोनी ॥ १ ॥
औदार्यें धर्ममूर्ति। काय लिहिणें तयाप्रति।
धर्मस्थापनेची कीर्ती। सांभाळली पाहिजे ॥ २ ॥

वरील उपदेश समर्थांनीं निजधामास जाण्यापूर्वी संभाजी महाराजास केला आहे. मराठी राज्याची स्थापना जे अनेक हेतु साध्य करण्याकरितां करण्यांत आली त्यापैकीं वरील हेतु प्रमुख समजला जात असे, ही बाब वरील उताऱ्यावरून उत्तम रीतीनें सिद्ध होत आहे. शिवाजी महाराजांच्या पश्चात् मराठी राज्य लयास जाई तों पावेतों जितके महाराष्ट्रीय राजकारणी पुरुष होऊन गेले त्या सर्वांची मनोभावना वरील स्वरूपाची असून देवस्थानांच्या पूजा अर्चा, जयंत्या, महोत्सव, यांच्या प्रीत्यर्थ त्याचप्रमाणें साधुसंत व सत्पुरुष यांच्या प्रीत्यर्थ द्रव्याच्या विपुल देणग्या त्यांनीं दिल्याचें साधन ग्रंथांत प्रसिद्ध झालेल्या

पुराव्यावरून सहज सिद्ध होण्यासारखें आहे. खुद्द शिवाजी महाराजांच्या हयातींत त्यांचे सर्व अष्ट[१] प्रधान, सेनापती, देशाधिकारी, इत्यादि समर्थांचें शिष्य असून श्रीरामाचे निःसीम उपासक होते. श्रीचाफळ क्षेत्रीं ज्याप्रमाणें समर्थ श्रीरामाचा वार्षिक उत्सव करीत तशाच थाटाचा वार्षिक उत्सव शिवाजी महाराजांचे अष्टप्रधान करीत असत व अद्यापपावेतों हि हा वार्षिक उत्सव मोठ्या प्रमाणावर करण्याची परंपरा शिवाजी महाराजांच्या काळापासून अस्तित्वांत असलेल्या अष्टप्रधान घराण्यांपैकीं कांहीं घराण्यांत अस्तित्वांत आहे. शिवाजी महाराज उदयास येण्यापूर्वी महाराष्ट्रांत कित्येक पुरातन देवस्थानें अस्तित्वांत होतीं. अशा संस्थानांपैकीं चिंचवड येथील श्रीमोरया देव यांचें श्रीगणपतीचें देवस्थान होय. शिवाजी महाराजांनीं या देवस्थानास देणग्या दिल्याबद्दलच्या सनदा अलीकडे उपलब्ध झाल्या आहेत. समर्थ रामदास स्वामीप्रमाणेंच त्या काळीं समर्थ पंचकात ज्यांची गणना होत असे, असे जयरामस्वामी वडगांवकर, रंगनाथस्वामी निगडीकर, आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर व केशवस्वामी भागानगरकर हे त्या काळीं महाराष्ट्रांत हरिकथानिरूपणीं पुढारी म्हणून प्रसिद्धीस आले होते. या सत्पुरुषांनीं हि नूतन देवस्थाने स्थापन करून त्यांच्या पूजा अर्चादि व जयंतामहोत्सवादिद्वारें धर्मस्थापनेच्या कार्याची अभिवृद्धि महाराष्ट्रांत करण्यास सुरुवात केली होती. या सत्पुरुषांचा हि शिवाजी महाराज परामर्ष घेत असत. शिवाजी महाराजांच्या चरित्रांतील एका लक्षांत ठेवण्यासारख्या प्रसंगाचा या ठिकाणीं उल्लेख करणें जरूर आहे. समर्थ एकेवेळीं शिवाजी महाराजांकडे भिक्षेस गेले असतां त्यांनीं मिळविलेलें सर्व राज्य समर्थास अर्पण केल्याबद्दलचें पत्र लिहून तें समर्थांच्या झोळींत टाकलें. हें पत्र झोळींतून काढून समर्थांनीं वाचून पाहिलें व त्यानंतर त्यांनीं तें राज्य

---

१ टीप:-रावबहादूर पारसनीस यांच्या इतिहास संग्रह मासिकांत जुन्या ऐतिहासीक गोष्टी भाग २ चे ७ व्या पानावर चाफळ येथील श्रीरामाच्या वार्षिक उत्सवाच्या प्रसंगीं खुद्द शिवाजी महाराजांनीं व त्यांच्या अष्टप्रधानांनीं कोणकोणतीं कामे करावयाचीं या संबंधाची शके १६०२ मधील एक यादी छापली आहे. या यादीवरून श्रीरामाच्या उत्सव प्रसंगीं शिवाजी महाराज नुसते द्रव्य देत असत इतकेंच नव्हे, परंतु ते व त्यांचे अष्टप्रधान सडा संमार्जन, पाने मांडणे, उष्टी काढणें, बैठक घालणें इत्यादी कामे स्वतः करीत असत असें दिसून येतें. यावरून त्यांची भावना कोणत्या स्वरूपाची होती हें समजणें कठीण नाहीं.

शिवाजी महाराजास परत दिले व राज्य माझें आहे याच्या निदर्शनार्थ तुझें निशाण भगव्या रंगाचे करावें असें शिवाजी महाराजास सांगितलें. तेव्हांपासून मराठ्यांचा भगवा झेंडा अस्तित्वांत आला. समर्थांच्या बखरींत या गोष्टीचा उल्लेख वरीलप्रमाणें करण्यात आलेला आहे. धर्मराज्यस्थापना हें शिवाजी महाराजांचें स्वराज्य स्थापन करण्यांत ध्येय असल्याकारणानें त्या ध्येयास अनुसरून वरील गोष्ट शिवाजी महाराजांनीं केली असावी असें महाभारत ग्रंथांतील शांतीपर्वाच्या ७२ व्या अध्यायांतील १६ व्या श्लोकावरून दिसून येणार आहे.

यदि स्वर्गे परं स्थानं धर्मतः परिमार्गसि ।
यत्किंचिज्जयसे भूमिं ब्राह्मणाय निवेदय ॥ १६ ॥

अर्थः—" हे राजा, जर तूं स्वर्गाचा, उत्कृष्ट अशा पदाचा अथवा स्वधर्माचा शोध करीत असशील तर कोणत्या हि प्रकारचा जय मिळवितां च शास्त्रज्ञानसंपन्न, सदाचारी, धर्मवेत्ता, तपस्वी, स्वधर्माच्याच आचरणानें तृप्त राहणारा, द्रव्य संपादन करण्यांत गढून न जाणारा व जो सर्वप्रकारें परिपूर्ण ज्ञान असलेल्या बुद्धीच्या योगानें राजाला साह्य करूं शकेल अशा ब्राह्मणाला भूमिदान कर."

वरील श्लोक राजानें कोणास पुरोहित करावें या मुद्याच्या भीष्मांनीं केलेल्या चर्चेंत आलेल्या इलापुत्र पुरुरवा आणि मातरिश्वा यांच्या संवादापैकीं आहे. महाभारतांतील वर्णन तंतोतंत लागू पडणारा असा त्याकाळीं समर्थ रामदास स्वामींसारखा दुसरा कोणी हि ब्राम्हण महाराष्ट्रात नव्हता. समर्थांसारख्या ब्राम्हणांस भूमिदान करणें हा क्षत्रियाचा श्रेष्ठ धर्म सांगितला आहे. शिवाजी महाराज हे श्रुतिस्मृतिप्रणीतधर्मस्थापनेचें उच्च ध्येय साध्य करण्यास उद्युक्त झाल्याकारणानें त्यांनीं आपलें राज्य समर्थांसारख्या ब्राम्हणास अर्पण करावें हें योग्यच होय. शिवाजी महाराजांच्या पश्चात्काळच्या प्रमुख महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांच्या चरित्राचा प्रस्तुत मुद्याच्या दृष्टीनें विचार केला असतां शिवाजी महाराजांच्या ठायीं जी वरील प्रवृत्ति आढळून येते तीच प्रवृत्ति त्यांच्या पश्चात् झालेल्या पुढाऱ्यांमध्यें हि दिसून येते. ब्रम्हेंद्रस्वामी हे शाहू

---

१ टीपः—भारत इतिहास संशोधक मंडळाचा अहवाल शके १८३२ च्या पान ७१ वर रा. वि. का. राजवाडे यांनी शिवाजी महाराजांच्या चरित्रांतील वर वर्णिलेल्या प्रसंगाची उपपत्ती वरील प्रमाणे लावली आहे. ज्या मुद्याची आम्ही चर्चा करीत आहोंत त्या मुद्याच्या दृष्टीने विचार केला असतां रा. राजवाडे यांची उपपत्ती योग्य आहे. असे आह्मास वाटतें.

महाराज व त्यांच्या राण्या व त्यांच्या दरबारांतील सर्व कर्ते पुरुष यांचे गुरु होते व त्यांच्याविषयीं तत्कालीन सर्व महाराष्ट्रीय सरदारांच्या ठिकाणीं अत्यंत आदर व प्रेमभाव वसत असल्याचें त्यांच्या चरित्रावरून व पत्रव्यवहारावरून दिसून येतें. थोरले बाजीराव पेशवे, त्यांचे बंधु चिमाजी आप्पा व ब्रम्हेंद्रस्वामी यांचा परस्परांशी झालेला जो पत्रव्यवहार प्रसिद्ध झाला आहे त्यावरून त्या काळच्या महाराष्ट्रीय राजकारणी पुरुषांच्या ठायीं सत्पुरुषां विषयीं कोणत्या प्रकारचा आदर वसत असे, त्यांच्या आशिर्वादांची महति स्वराज्य प्रसारार्थ त्यांनीं चालविलेले प्रयत्न यशस्वी होण्याच्या बाबतींत त्यांना किती वाटत असे व अशा सत्पुरुषांचा परामर्ष घेण्याच्या बाबतींत ते किती तत्पर असत या बाबी उत्तम प्रकारें दिसून येतात. ब्रम्हेंद्रस्वामीप्रमाणें च कायगांव टोकें येथील सुप्रसिद्ध दीक्षित घराण्यांतील पुरुषांस हि थोरले बाजीराव, चिमाजी आप्पा व नानासाहेब पेशवे हे गुरु स्थानीं मानीत व राज्याचे अभिवृध्द्यर्थ जीं दैवी साधने या घराण्यांतील पुरूष करीत तत्प्रीत्यर्थ त्यांना द्रव्य अर्पण करण्यास पेशवे घराण्यांतील पुरुष नेहेमीं तत्पर असत. मराठी साम्राज्याचा लय होईपर्यंत महाराष्ट्रांत जे कर्ते पुरुष होऊन गेले त्यांच्या व्यक्तिशः चरित्राचा या दृष्टीनें विचार केल्यास फारच विस्तार होईल. मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांचे जे खंड आज पावेतों प्रसिद्ध झाले आहेत त्यामध्यें प्रस्तुत मुद्याविषयी भरपुर पुरावा आढळून येतो.[१] या पुराव्यावरून मराठी राज्याच्या अमदानींत देवस्थानें, विद्वान् व तपोनिष्ठ ब्राम्हण, आणि साधुसंत इत्यादिकांस देणग्या व इनामें देण्याचा प्रघात अकारण बेसुमार वाढला होता अशा प्रकारचा ग्रह प्रस्तुत काळच्या वाचकांचा होण्याचा संभव आहे. परंतु या प्रकाराच्या बुडाशीं त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजाच्या पुढाऱ्यांच्या कोणत्या स्वरूपाच्या भावना वसत होत्या याचा शोध घेतला असतां वरील प्रकारच्या ग्रहांत तथ्य नाहीं असें कबूल करणें प्राप्त होईल. देवा ब्राह्मणांच्या आशिर्वादाच्या योगानें राज्यास बळकटी येते ही महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांची भावना इतक्या उत्कट प्रकारची होती कीं, परधर्मी राजाच्या हि या संबंधाच्या धोरणाची परीक्षा ते स्वतःच्या भावनेच्या द्वारें करीत असत. टिपू सुलतान हा कट्टा मुसलमानधर्मानुयायी असून हिंदुधर्माचा द्वेष करणारा होता.

---

१ टीप :— सनदापत्रे ( वाड ), म. इ. सा. खंड १५, २०, २१, पेशवे दप्तरांतील सनदापत्रांतील माहिती ( वाड व पारसनीस ) इत्यादि ग्रंथांत या मुद्यासंबंधीं पुष्कळ कागदपत्र प्रसिद्ध झाले आहेत.

नाना फडणीस यांनीं कृष्णाजी जगन्नाथ या नांवाच्या गृहस्थास टिपूच्या दरबारांत वकील या नात्यानें रवाना केले होते. कृष्णाजी जगन्नाथ व नाना फडणीस यांच्या मध्यें झालेले पत्रंव्यवहार म. इ. साधन खंड १९ मध्यें प्रसिद्ध झाला आहे. या खंडांतील लेख ७७ हा फार महत्त्वाचा आहे. नाना फडणीस यांना टिपू सुलतान हा देवा ब्राम्हणांचा मोठा मान ठेवितो असें टिपूचे राजधानीत त्यास आढळलेल्या वस्तुस्थिती वरून कृष्णाजी जगन्नाथ यानें कळविलें. या पत्राचें वरील लेखांक हें उत्तर असून त्यांत नाना फडणीस यांचे खालील उद्गार आढळून येतातः—

" ऐसियास देवा ब्राम्हणांची मर्यादा मोठी हें उगेच ऐकत होतों. हालीं तुम्ही सर्व लिहिल्यावरून परम संतोष झाला. देवा ब्राम्हणांची मर्यादा नबाब बाहादर फार करितात म्हणोनच दिवसेंदिवस दौलतीस जिलहे व खनक आहे. याच योगें करून इंग्रज सिकस्त करून नबाबास यश येते, यांत गुता नाहीं. देवा ब्राह्मणांचे आशिर्वादाचे फल असेंच आहे. " टिपू सारख्या मुसलमानधर्मीयांस देवा ब्राह्मणांच्या आशिर्वादाचें फल वरील प्रकारचें प्राप्त झालें अशी नानांची भावना होती, असे वरील उद्गारांवरून सिद्ध होते. अशा प्रकारच्या मनोरचनेच्या नानांनीं स्वतः देवा-ब्राह्मणांचा परामर्ष घेण्यांत पुष्कळ च द्रव्य खर्च केले हें त्यांच्या चरित्रा वरून दिसून येईल.

शिवाजी महाराज उदयास येण्या पूर्वीच्या दोन हजार वर्षांत होऊन गेलेल्या भरतखंडांतील क्षत्रिय व अन्य वर्णीय राजांचीं शेकडों ताम्रपत्रे व शिलालेख उपलब्ध झाले आहेत. त्यांचा समष्टिदृष्ट्या विचार केला असतां देवस्थानें, विद्वान् व तपस्वी ब्राह्मण आणि साधुसंत यांस देणग्या, इनामें देऊन त्यांचा योगक्षेम चालविणें हा श्रुतिस्मृतिप्रणीतधर्मान्वयें राजाचा धर्म समजला जात असे व या धर्मास अनुसरून वरील देणग्या भरतखंडांतील राजे देत असत अशी कोणाची हि खात्री झाल्यावांचून राहणार नाहीं. या च भावनेनें प्रेरित होऊन मराठ्यांच्या हातीं राजसत्ता आल्या वर त्यांनीं वरील प्रकारच्या देणग्या पूर्वकालीन भारतीय धार्मिक राजां प्रमाणें दिल्या असल्या पाहिजेत हें उघड आहे. शिवाजी महाराजांच्या सप्त प्रकरणात्मक चरित्रांत अलीकडे प्रसिद्ध झालेल्या इतिहास साधन ग्रंथांतील कागदपत्रा वरून जी गोष्ट निदर्शनास येते ती च ( पान ८५ वर) खालील प्रमाणें वर्णिली आहे:-

" प्रांत देश हस्तगत झाले तेथें थोर थोर देवस्थाने होती त्यास प्राचीन धर्मादाय चालत आले ते यथास्थित चालावे, व नवीन देवस्थानें पाहून त्यांच्या पूजा, अर्चा, नैवेद्य, उत्साह, अभिषेक, नंदादीप करून दिले व त्यास पारपत्यागार नेमून देऊन त्यांची स्वस्थता केल्या प्रमाणें चालवेसे केले व ग्रामदेव यास नंदादीप चालते केले. तसेच थोर लहान क्षेत्र येथें ब्राम्हणांची कुटुंबे पाहून त्यास वर्षासनें नेमणूका त्याच गावीं करून दिल्या. थोर थोर सत्पुरुष यांसी गांवभूमि चालेल असें करून दिले. "

आता मराठी राज्याच्या सर्व साधारण धोरणांपैकीं दुसऱ्या एका बाबीच्या चर्चे कडे वळूं.

**तीर्थं क्षेत्रें व देवालयें यांचा उद्धार:—**" तीर्थें क्षेत्रें मोडिलीं, ब्राह्मणस्थानें भ्रष्ट झालीं, सकळ पृथ्वी आंदोळली, धर्म गेला " अशा प्रकारचा आक्रोश समर्थ रामदास स्वामींनीं स्वराज्याच्या उदया पूर्वी केला होता. शिवाजी महाराजांनी स्वराज्याची स्थापना केल्यानंतर महाराष्ट्राच्या भावी स्थितीचें दर्शक अशा समर्थांनीं केलेल्या काव्याचा आम्ही मागें उल्लेख केला च आहे. त्या काव्यांत, मोडलीं मांडलीं छेत्रें। आनंदवनभूवनी। असें समर्थांनी वर्णन केलें आहे. शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थापनेचा हा प्रभाव होता हे सांगावयास पाहिजे असे नाही. धर्मस्थापना हे स्वराज्यस्थापनेचें ध्येय असल्या कारणानें जो जो प्रांत शिवाजी महाराजांनीं मुसलमानांच्या सत्ते खालून सोडवून स्वराज्यांत सामील केला त्या त्या प्रातांतील मुसलमानांनीं उध्वस्त केलेल्या तीर्थांचा, क्षेत्रांचा व ब्राम्हणस्थानांचा त्यांनी आतां नुकत्याच उल्लेखिलेल्या सप्तप्रकरणात्मक चरित्रांतील उताऱ्यांत वर्णन केल्याप्रमाणे उद्धार केला. शिवाजी महाराजांचे या बाबतींतील वरील धोरण मराठी राज्य लयास जास तों पर्यंत त्यांच्या पश्चातच्या महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांनीं सतत आपल्या डोळ्या पुढें ठेऊन ते अमलांत आणण्याच्या प्रयत्नांत कोणत्या हि प्रकारची कसूर केली नाहीं. प्रथम मुसलमानांनीं उध्वस्त केलेल्या देवालया बद्दल व तीर्थां बद्दल मराठ्यांनीं स्वराज्यस्थापना केल्या नंतर त्यांचे जीर्णोद्धार करण्याच्या बाबतींत काय प्रयत्न झाले या विषयीं थोडी-बहुत चर्चा करू.

मराठी साम्राज्याचे निरनिराळे घटकावयव ह्मणजे पेशवे, शिंदे, होळकर, पवार, रास्ते, पटवर्धन इत्यादि सरदाराची सत्ता ज्या निरनिराळ्या प्रांतावर चालू होती, त्या त्या प्रांतांतील मुसलमानांनीं उध्वस्त केलेलीं देवालयें व

तीर्थे यांचा उद्धार कोणी कोणी व कशा रीतीनें केला या विषयींचा पुरावा मराठ्यांच्या इतिहासाच्या साधन खंडांतून पुष्कळ प्रसिद्ध झाला आहे. या सर्व पुराव्याची बारकाईनें चर्चा करून जागा अडविण्यांत मतलब नाहीं. मुख्य गोष्ट मराठ्यांचें या संबंधाचें सर्वसाधारण धोरण कोणत्या प्रकारचें होतें हें दर्शविण्याची आहे व तें आम्ही वर दर्शविलें च आहे. तथापि मराठी साम्राज्याचें एक प्रमुख घटकावयव जें होळकरांचे घराणे त्या घराण्यांत होऊन गेलेल्या देवी अहिल्या बाईनें तिच्या कारकीर्दीत या बाबतींत केलेल्या कार्या-च्या स्वरूपाचें दिग्दर्शन प्रस्तुत स्थळीं केल्या वांचून गत्यतर नाहीं. देवी अहिल्याबाईनें केलेलें कार्य एवढें अवाढव्य आहे कीं, तशा स्वरूपाचें कार्य करणारी दुसरी व्यक्ति अलीकडील ७००।८०० वर्षाच्या भरतखंडाच्या इति-हासांत आढळेल कीं नाहीं याची जबरदस्त शंका आहे. यास्तव तिनें केलेल्या कार्याची किंचित् ओळख वाचकांस करून देण्याचें आम्हीं ठरविलें आहे. देवी अहिल्याबाईच्या चरित्राची थोडीबहुत ओळख ज्यास आहे त्यास ही गोष्ट अवगत असली पाहिजे कीं, बाईचें चरित्र पूर्णपणें धर्ममय असे. बाईची नित्य दिनचर्या व राजसत्ता धारण करणारी व्यक्ति या नात्याने तिचें वर्तन हें धर्मास अनुसरून होतें. ही गोष्ट लक्षांत घेतां तीर्थे, क्षेत्रे, देवस्थानें, इत्या-दिकांचा उद्धार करण्याच्या बाबतींत तिने केलेल्या कार्याच्या उगमाचा शोध श्रुतिस्मृतिप्रणीतधर्माच्या प्रदेशांत घेणें जरूर आहे. याज्ञवल्क्य स्मृतींतील दान प्रकरणाच्या २७१ व्या श्लोकावरील विज्ञानेश्वरांनी केलेल्या टीकेंतील खालील भाग या दृष्टीनें महत्वाचा व लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

" सारांश, या सर्व गोष्टींचा विचार करून दान दिले असतां ते कामधेनू प्रमाणें फल देतें. दानादिधर्म करून त्याची आपल्या च मुखानें प्रशंसा करूं नये. इष्ट व पूर्त असे दानाचे दोन विभाग आहेत. वेदीवर बसून दान देणें, अग्निहोत्र, आतिथ्य व वैश्वदेव हीं इष्ट दानें व मोठीं तळीं, विहीरी, मंदिरें, मठ, धर्मशाळा, अन्नछत्रें, बागा इत्यादि तयार करून त्यांचे लोकोपयोगार्थ उत्सरण करणें हीं पूर्त दानें होत. " ह्या दानाप्रमाणें च पुढील दानांचें हि महत्व फार मोठें आहे. " धान्यादि फळ देणारी भूमि, देवा-लयादिकांत दीप, अन्न, वस्त्र, तीळ, तूप, प्रवासी लोकांस रहाण्या कारितां धर्मशाळा, गृहस्थधर्मार्थ कन्या, सुवर्ण व धुरेस बांधण्यास योग्य झालेला बैल यांचें दान दिलें असतां दाता स्वर्गलोकीं पूज्य होतो. " ( याज्ञवल्क्य स्मृती

ारील मिताक्षरा टीकेचें भाषांतर बापटकृत पान ६२ व ६३ ). याज्ञवल्क्य मृतीप्रमाणें च चिटणीसकृत राजनीतींत खालीं दर्शविलेला राजधर्म सांगितला आहे. " व्यय कसा करावा ? दान सत्पात्रीं पात्रापात्र विचार करून करावें. तसेंच द्वालय जीर्णोद्धार करावें. नूतन देवालयें करावीं. वापी कूप, तटाक, आराम ह्मणजे ाग करावे. धर्मशाळा बांधाव्या, ब्राम्हणांस अन्नदान व अन्नछत्रें करावीं. सर्व ज्ञातीस अन्नदान प्राणीमात्रीं करावे. "(चिटणीसकृत राजनीति पान १४). श्रुतिस्मृत्युक्त र्मास अनुसरून राजसत्ताधिष्ठीत व्यक्तीनें आपल्या द्रव्याचा व्यय कोणत्या कार्याप्रीत्यर्थ करावा याचे दिग्दर्शन वरील उताऱ्यांत उत्तमप्रकारें केलें आहे. देवी अहिल्याबाईची श्रुतिस्मृत्युक्त धर्मावर पूर्ण निष्ठा असल्या कारणांन तिनें आपल्या द्रव्याचा व्यय वरील उताऱ्यात दर्शविलेल्या कार्या प्रीत्यर्थ केला हें तिनें तिच्या निष्ठेस अनुसरून च केले हें उघड आहे. अहल्याबाईचें एक चरित्र अलीकडे " पुरुषोत्तम " हें नांव धारण करणाऱ्या गृहस्थानें प्रसिद्ध केलें आहे. त्या चरित्रांतील बाईनें केलेल्या कार्याचे स्वरूप वाचकांच्या लक्षांत ण्या पुरता जरूर तेवढा उतारा आम्ही येथें देतों:—

" अहल्याबाईनें लोकांच्या सोईसाठीं जागोजाग अन्नछत्रें, धर्मशाळा तलाव, विहिरी, व रस्ते बांधले आहेत. त्या काळी दळणवळणाच्या सोयी मुळींच नसल्यानें वाटसरांस अशा सार्वजनिक कामांचा किती उपयोग होत असेल हें कांहीं सांगावयास च नको. हीं कार्ये तिनें आपल्या च प्रांतांत केलीं आहेत असे नव्हे, तर इतर प्रातां बद्दल आपपर भाव नष्ट करून त्या प्रातांत हि अशीं कामे केलीं आहेत. हरप्रसाद शास्त्री यानीं म्हटलें आहे. " तिनें काशी-विश्वेश्वराचे मंदिर व गया येथील विष्णुपदाचें मंदिर पुनः नवें बांधले आणि कलकत्यापासून तो काशीपर्यंत भला थोरला रस्ता बांधला. " या प्रमाणें आसेतु हेमाचल तिने असलीं पवित्र कार्ये करून आपले नांव अजरामर केलें. तिनें कोणचें काम कोठें करून ठेविलें आहे याची संपूर्ण माहिती तिच्या संस्थानांत सांपडत नाहीं, तर मग ती अन्य ठिकाणीं एके जागीं कशी सांपडणार ! कारण, तिनें कित्येक गुप्तदाने दिलीं आहेत तर कित्येक ठिकाणीं जीं लोको पयोगीं कामें केलीं आहेत त्यांचा दानधर्मांचा संबंध त्याच गांवीं लावून दिला.........त्या काळीं पुष्कळसे लोक नर्मदा प्रदक्षिणेसाठीं जात व अजून हि जातात. या लोकांच्या सोई साठीं तिनें नर्मदेकाठी पाणपोया व अन्न छत्रें घालून ठेविलीं आहेत. पूर्वी जीं मंदिरें अपूर्ण बांधली होतीं, त्यांपैकं तेनें बरीचशीं पूर्ण केलीं आहेत. गौतमाबाईनें गौरी सोमनाथाचें एक मंदि

बांधलें होतें, तें अहिल्याबाईनें च पूर्ण केलें. या प्रमाणें अनेक दाखले देतां येतील. काशी–विश्वेश्वर, सोरटी-सोमनाथ इत्यादि इतिहास प्रसिद्ध पवित्र देवा लयांतील मूर्ति प्रसिद्ध हिंदुद्वेष्टयांनीं फोडल्या. त्या मूर्तींच्या प्राणप्रतिष्ठा इतरांच्या हातून न होता याच बाईच्या हातून व्हाव्या हा दैवयोग अपूर्व च समजला पाहिजे. या पैकीं सोरटी–सोमनाथ व इतर देवालयासंबंधीं केसो भिकाजीच्या पत्रांत पुढें लिहिल्याप्रमाणें उल्लेख आहे:—

३१ आक्टोबर इ. स. १७८५

राजश्री गोविंद रघुनाथ गानू, निसबत बाई यांजकडील खानगी कारभारी, श्रीस जावयास निरोप घेऊन, आश्विन वद्य सप्तमीस स्वार होऊन गेले. कुटुंबसुद्धां व खर्चास दाहा हजार दिले. व विश्वनाथभट मालवी ब्राह्मण ते हि कुटुंबासुद्धां गेले. त्यास तीन हजार रुपये दिले. व मनकर्णिकेचा नूतन घाट बांधावयास बाईनी कारकून व पंचवीस हजारांच्या हुंड्या देऊन श्रीस पाठविला व **दशाश्वमेधींचा घाट व गयेस विष्णुपदाचे देवालय सिद्ध** जाले. त्याचा वास्तु गोविंद रघुनाथ जाउन करितील. त्यास सांगितलें. **सोरटी सोमनाथ येथील देवालय नूतन करविलें.** तेथें दाहा हजाराच्या हुंड्या देऊन कारकून नूतन पाठविला. दोन्ही कारकुनांची रवानगी आश्विन शुद्धांत केली. ( म. द. बा. पत्रें भाग २ पृष्ठ ८६–८७ )... ... .. ... ...अहल्याबाईने कित्येक किल्ले बाधवले. जाम किल्या पाशी विंध्याचा मोठा कडा तुटला आहे, तेथें तिनें घाट बांधला. तिने महेश्वरात व आपल्या सर्व संस्थानांत देवळे धर्मशाळा, व तळी बांधलीं आहेत. या कामीं तिनें मनस्वी पैसा खर्च केला आहे. अहल्याबाईच्या औदार्याचा मासला तिच्या संस्थानांत च पाहावयास मिळतो असें नाहीं, तर तो सर्व हिंदुस्थानांत, ह्मणजे पूर्वेस कटक प्रांतांत जगन्नाथ पर्यंत, उत्तरेस हिमालय पर्वतांत बद्रीकेदारनाथ पर्यंत, व दक्षिणेस कन्याकुमारी जवळ रामेश्वरा पर्यंत सर्व बाजूस पहावयास मिळतो. केदारनाथ सारख्या बिकट ठिकाणीं देखील बाईने एक दगडी धर्मशाळा व कुंड बांधलें आहे. ”

वरील उताऱ्यावरून राजधर्म प्रकरणीं सांगितलेल्या एका विशिष्ट धर्माचें पराकाष्टेचें आचरण अहिल्याबाईनें कशा रीतीनें केले हे दिसून येत आहे. संस्थानच्या द्रव्याची उधळपट्टी अहिल्याबाईने केली असा प्रस्तुत काळी तिच्यावर कित्येकां कडून आरोप करण्यांत येतो. परंतु हा आरोप कितपत यथार्थ आहे याचा विचार करितां तिनें हीं कृत्यें तिच्या प्रजेच्या सुखासमाधाना कडे

दुर्लक्ष करून केलीं कीं काय हें पहावें लागेल. तिच्या कारकीर्दीचा इतिहास मालकमसारख्या परस्थ ग्रंथकारानें जो लिहिला आहे त्यावरून तिची प्रजा अत्यंत सुखी होती असें दिसून येतें. अशा स्थितींत जें द्रव्य वरील कार्याप्रीत्यर्थ तिनें आपल्या संस्थानांत खर्च केलें त्याबद्दल यत्किंचित हि तिच्या वर टीका करण्यास जागा नाहीं. आतां तिनें तिच्या राज्याबाहेर भरतखंडाच्या इतर प्रांतांत वरील बाबी प्रीत्यर्थ जें द्रव्य खर्च केलें त्या बाबतींतहि " माहाराष्ट्र धर्म वाढवावा " ही समर्थांची उक्ती लक्षांत घेतां तिच्यावर टीका करण्यास जागा रहात नाहीं. भरतखंडाच्या कोणत्या हि प्रांतांतील देवालयें, तीर्थें वगैरे या देशाच्या इतर प्रांतांतील कोणत्या हि लोकांप्रमाणें च महाराष्ट्रीयांना पूज्य व वंद्य होतीं व त्यांचा उद्धार करणें श्रुतिस्मृत्युक्त धर्मास अनुसरून वागणाऱ्या अहिल्याबाईसारख्या महाराष्ट्र धर्माभिमानी बाईस आपलें पवित्र कर्तव्य आहे असें वाटावें हें योग्य च होतें. ही बाब लक्षांत घेतली असतां भरतखंडांतील ठिकठिकाणच्या उध्वस्त झालेल्या देवालयांचा जीर्णोद्धार करणें, त्याचप्रमाणे विहिरी, तळीं, घाट, धर्मशाळा बांधणें, रस्ते तयार करणे व गोरगरीबां करिता अन्नछत्रें ठेवणें इत्यादि कार्याप्रीत्यर्थ अहिल्याबाईनें जें द्रव्य खर्च केले त्याबद्दल तिजला दोष देणें योग्य होणार नाहीं. समर्थांनी केलेल्या भविष्य पुराणांत ' मांडिलीं मोडिलीं छेत्रें । आनंदवनभूवनीं ' ह्या यांनी काढलेल्या उद्गारास पुष्कळशी सार्थकता अहिल्याबाईनें आपल्या कृतीनें आणली ही गोष्ट निर्विवाद आहे. आतां क्षेत्रांचे बाबतींत मराठ्यांनीं काय प्रयत्न केले याच्या चर्चे कडे वळूं.

मराठी राज्याची स्थापना होऊन त्याचा लय होई तों पर्यंत हिंदूंचीं सर्व क्षेत्रें व तीर्थें मुसलमानी अमलांतून सोडवून स्वराज्यांत सामील करण्यांत आलीं नव्हती. मराठ्यांच्या राज्याचा जसा विस्तार होत चालला तसा तसा वरील ध्येय साधण्याचा त्यांनीं प्रयत्न केल्याचें प्रसिद्ध झालेल्या साधन ग्रंथांतील लेखावरून दिसून येते. " बाळाजी बाजीराव पेशवे यांच्या रोजनिशींतील उतारे " या रा. ब. वाडांनीं प्रसिद्ध केलेल्या ग्रंथाच्या १५३ पानावर इ. स. १७५४—५५ सालची खालील नोंद आहे: —

" श्री क्षेत्र गया व श्री कुरुक्षेत्र ही दोन हि क्षेत्रें पातशाहा पासून सरकारांत घेतली आहेत. त्याची कमार्वीस तुम्हास सांगितली आहे. तरी हरदु ठिकाणीं आपले तर्फेनें कमाविसदार पाठवून इमाने इतबारें अमल करणें. ऐवज सरकारांत पावता करून कबज करणे **दोन्ही क्षेत्रीं कर न घेणें;** तीर्थें मोकळी करणें ह्मणून दामोदर माहादेव याचे नावची

सनद " या नोंदीवरून वरील दोन्हीं क्षेत्रें मराठ्यांनीं आपल्या ताब्यांत घेऊन भरतखंडांतील अखिल हिंदुमात्रांस तेथें जाण्याची मोकळीक करून दिली होती इतकेंच नाहीं परंतु यात्रेकरी लोकांपासून कोणत्या हि प्रकारचा कर घेण्यांत येऊं नये अशा प्रकारची व्यवस्था मराठ्यांनीं तेथे अमलांत आणली होती असें सिद्ध होत आहे. मुसलमानी अमलाखालीं वरील क्षेत्रें असतां यात्रेकरी लोकांकडून कर घेण्याचा अस्तित्वांत असलेला प्रकार मराठ्यांनीं बंद केला हें त्यांच्या धर्मस्थापनेच्या ध्येयास अनुरूप च होते हें उघड आहे. थोरले माधवराव पेशवे यांच्या मरण समयीं त्यांनीं जी एक नऊ कलमांची यादी केली व ज्या यादींतील कलमें अमलांत आणण्याचें अभिवचन त्यांच्या कारभाऱ्यांनीं त्यांस दिलें होतें त्या यादींतोल एक महत्त्वाचें कलम खालील प्रमाणें आहे:—

" काशी प्रयाग ही दोन्ही स्थळें सरकारांत यावी असा तीर्थरूपांचा हेत होता. त्यास प्रस्तुत करावयाजोगे दिवस आहेत. दहावीस लक्षाची जहागीर मुबदला पडली तरी देऊन दोन्ही स्थळे हस्तगत करावी प्रयत्न करावा. "

गया व कुरुक्षेत्रें ज्या बाळाजी बाजीराव पेशव्यांनीं सोडविलीं त्याच पेशव्यांची काशी व प्रयाग क्षेत्रें मुसलमानांच्या अमलांतून सोडविण्याची आकांक्षा होती हे वरील कलमा वरून सिद्ध होत आहे. बाळाजी बाजीरावांचें जें वरील ध्येय होतें तेंच त्यांचा मुलगा थोरले माधवराव पेशवे यांचें असल्या-काराणानें व त्यांच्या हयातींत ते सिद्धीस न गेल्याकारणानें मरणसमयीं तें साध्य करण्याचें अभिवचन त्यांनीं आपल्या कारभाऱ्यांकडून घेतल्याचें वरील उताऱ्या वरून स्पष्ट दिसून येत आहे. काशी, मथुरा, वृंदावन या क्षेत्रांच्या बाबतींत कोणत्या प्रकारचे प्रयत्न मराठ्यांनीं चालविले होते हें दर्शविण्यास खालील लेख फार महत्त्वाचा असल्याकारणानें तो आम्ही येथें देतो रा. ब. पारसनिस यांनीं प्रसिद्ध केलेल्या ऐतिहासिक किरकोळ प्रकरणें भाग पहिला पान ६० वर खालील पत्र छापलें आहे. त्यावरून वरील क्षेत्रांच्या बाबतींत झालेल्या खटपटींची थोडी बहुत कल्पना येण्यासारखी आहे.

श्री तारीख २४ मार्च १७८९

" सेवेसी भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार पेशजी श्री काशीचे व मथुरावृंदावनाचे मजकुरा विसिची विनंति लिहिलीच आहे. मथुरा-वृंदावनाचे सनदेचे मसुदें करून दिल्लिस राजश्री पाटील बाबा पाठविणार आहेत......स्वामीनीं क्षेत्राची जागा जाणोन धर्म स्थापना यथास्थित घडावी.

यास्तव सरकार खालशांत असावयाचे केले आहे. त्यास येथील काजाची सेवकास आज्ञा जाली, तरी आज्ञेप्रमाणें करण्यांत येईल. ''

याच क्षेत्रासबंधी खालील दुसरे एक महत्त्वाचें पत्र रा. ब. पारसनिस यांच्या ऐतिहासिक टिपणें भाग ४ पान २९ वर नाना फडणवीस यांस हिंगण्यांनीं लिहिलेले छापले आहे.

'' पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी:- विनंति ऐसिजे. अनुपगीर गोसावी याजकडे सरंजाम परगणे होते. ते त्याजकडून काढून सरकारचे कमाविसदार पाठविले आहेत त्यास मथुरा वृंदावन हे दोन्ही तालोके सरकारांत आले. राजश्री बापूजी नाईक भावे या दोन्ही स्थळांची मामलत करणार. त्यास ज्या समयीं तीर्थस्वरूप पुरशोत्तम पंत नानांनी श्रीमंतास टीका पातशाहापासून घेतला त्या समई टिकयांत वृंदावन क्षेत्राची जागा, तेथें सरकारचें अन्नछत्र असावें ह्मणोन रावसाहेबांच टिक्यांत वृंदावन घेतलें आहे. नबाब नजबखानाची सनदही सेवकापाशीं आहे. त्यास आज पावेतों गोसाव्याची भीड होती, ह्मणून त्याजपाशीं वृंदावन मथूरा होती. आतां तो इतराजीत आहे. म्हणून सर्व सरंजामी प्रगणे सरकारात घेतले. त्यास मर्जीस आल्यास, त्यास लिहून पाठवावे कीं, वृंदावन तो नजीबखानानें सरकारांत दिल्हेच आहे. मथुरेची सनद पातशाहांनी करून घेऊन दोन्ही स्थळें सरकारचे कारकुनाचे स्वाधीन करून अमल करून देवणें. बहुत काय लिहिणे कृपा केली पाहिजे.''

हिंदूंचीं पवित्र क्षेत्रें आपल्या अमलांत आणण्याच्या बाबतींत वरील प्रकारचें धोरण मराठी साम्राज्य लयास जाई तों पर्यंत महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांनीं आपल्यापुढे ठेवले होतें असें वरील पुराव्यावरून सिद्ध होत आहे. काशी येथील श्रीकाशी विश्वेश्वराचे देवालय फार प्राचीन असून त्या क्षेत्राचें तें मुख्य दैवत आहे. औरंगजेबच्या कारकीर्दीत या देवालयाचा विध्वंस करण्यांत येऊन त्या ठिकाणीं मशीद बांधण्यांत आली. मराठ्यांचा राज्यविस्तार थेट अटकेपावेतों झाल्यानंतर या देवालयाची उपेक्षा करणें त्यांच्या ध्येयास शोभण्यासारखें नव्हतें. या संबंधाचें एक महत्त्वाचें पत्र उपलब्ध झालें आहे. या पत्रावरून ज्या स्वधर्मा करितां स्वराज्यस्थापना करण्यांत आली त्या स्वधर्माच्या रक्षणार्थ महाराष्ट्रीय पुढारी किती कळकळ व दक्षता बाळगीत हें दिसून येणार आहे. रा. ब. पारसनिस यांच्या '' ऐतिहासिक टिपणें '' भाग एकच्या आठव्या पानावर भिकाजी नारायणचें नाना फड-

णवीस यांस लिहिलेलें एक पत्र छापलें आहे. उत्तर हिंदुस्थानांत महादजी शिंदे यांचें वर्चस्व स्थापित होऊन दिल्लीचा बादशाहा त्यांच्या अंकित झाल्यानंतर उत्तर हिंदुस्थानांतील क्षेत्रें मुसलमानी अमलांतून सोडवून स्वराज्याच्या अमलाखालीं आणण्याबद्दल नानांचा शिंद्यामागे तगादा सुरू होता असें या पत्रावरून सिद्ध होत आहे:—

श्री

"सेवेसी भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता. छ २८ जमादिलाखर मु॥ श्री मथुरा वर्तमान यथास्थित असे विशेष. छ. २ जमादिलावलचे पत्र पाठविलें ते छ १ जमादिलाखरीं पावलें. ' श्री काशींत श्री विश्वेश्वराचें देवालय हजार वर्षांचे सर्वांस ठाऊक आहे. त्यास अलीकडे पातशाईंत कोणी काय समजावून मसीद केली त्यास विश्वेश्वराचें स्थळ मोकळें होऊन पूर्ववत् देवालय व देवस्थापना व्हावी हे हिंदुधर्मास योग्य आहे. त्यास ऐसी गोष्ट जाहली पाहिजे कीं, फिरोन दावा न राहे. पूर्वापार मजकूर पातशाहास समजावून कधी कोणाकडून उपद्रव न होयसें पत्र करून घ्यावे. या गोष्टीचा उद्योग जरूर करावा. साप्रत काळीं काशींत इंग्रजाचा अंमल आहे. ते कोणाचे धर्मास अडथळा करीत नाहींत. येविशीं त्यांसी बोलतां येईल. विश्वेश्वराचें स्थळांत वस्ती असल्यास त्याचे इमल्याचा पैका देविला जाईल. परंतु पातशाहाची परवानगी निर्वेधपणे जाहली पाहिजे. मथुरा वृंदावन हीं स्थळे सरकार खालशांत असावीं. त्याच्या सनदा सरकारचें नावे घेऊन पाठविणें म्हणून रा. पाटीलबावांस पत्र सरकारचे लिहून पाठविले आहे. त्यास तुह्मी व राजश्री आपाजीराव सदरहू अन्वये मजकूर बोलून सनदा करून घेऊन पाठविणें ह्मणोन आज्ञा आली. त्यास ये विसींचे पर्याय तपशीले पाटीलबावासी दोन चार वेळा बोलिलों. आपाजीराव होते. त्यास काशीचे मजकुराचा जाबस्वाल स्पष्ट काहीच सांगितला नाहीं लाबणीचे जाबस्वाल बोलतात कीं ही गोष्ट केल्यानें सर्वां यवनास वांकडे वाटेल. असफतदौले व इंग्रज एक आहेत. त्यापक्षीं त्याचीहि इंग्रजांस भीड पडेल. अशी पर्यायाचीं बोलणीं बोलतात. परंतु आम्ही हेंच उत्तर करीत आहों कीं, हें काम करावेंच लागेल. येणें करून आपला सर्व हिंदुत नक्ष होईल व सरकारसेवाहि थारलीच घडेल, कीर्तिस्पद होईल. अशा उत्तरं करीत आहों. पक्केपण त्याचें उत्तर होईल त्याप्रमाणें मागाहून लिहून पाठवूं. मथुरा वृंदावन येथील मजकूर पातशाई फरमाने

करून आणावयाचे मसुदे केले आहेत. दोहों चहूं राजांते दिल्लीस पाठवून सनदा करून आणवितों. याप्रमाणे बोलले आहेत. होऊन आलियावर सेवेसी रवाना करूं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. ''

हिंदूंचीं तीर्थें, क्षेत्रे व पवित्रस्थानें यांच्या बाबतींत मराठी राज्याचें धोरण प्रथम पासून शेवटपर्यंत कशा स्वरूपाचे होते याचे दिग्दर्शन यथपावेतो आम्हीं केलें आहे. हें धोरण महाराष्ट्र धर्मास अनुरूप अशा प्रकारच च होतें या विषयीं वरील पुराव्यांवरून कोणाची हि खात्री झाल्यावाचून राहणार नाहीं. आतां, महाराष्ट्रधर्मस्थापना हे च मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेचं ध्येय होते ही बाब ज्या मुद्यावरून सिद्ध होण्यासारखी आहे अशा दुसऱ्या एका महत्त्वाच्या मुद्याच्या चर्चेकडे वळू.

**व्यवहार निर्णय व न्यायदान व्यवस्था:**—कोणत्या हि राज्याची बळकटी प्रजे मध्यें उत्पन्न होणाऱ्या वादांना निकाल योग्यप्रकारे होण्यावर अवलंबून असते. फार पुरातन काळापासूनचा महाराष्ट्रीय समाजात न्यायनिर्णया संबधींचा असा प्रघात होता कीं, या समाजातील व्यक्तीव्यक्तींत उत्पन्न होणाऱ्या वादाचा निर्णय पंचाच्या सभा ( ज्या सभास गोत, देशक इत्यादि संज्ञा होत्या ) करीत असत. महाराष्ट्रात मुसलमानाचा राजसत्ता स्थापन झाल्या नंतर हि वरील संस्था पूर्वीप्रमाणे च न्यायनिर्णय करीत होत्या. प्रस्तुत राजसत्ताधारी इंग्रजानीं व्यवहार निर्णय करणाऱ्या या देशी संस्थाचे जसें निर्मूलन केले तसें मुसलमान राजकर्त्यांनी केले नव्हते. शिवाजी महाराजांनी स्वराज्य स्थापन केल्या नंतर मुसलमानी अमलाखालीं अस्तित्वांत नसलेला असा राजसत्तेचा पाठिंबा वरील संस्थाना मिळाला. या शिवाय न्यायनिर्णय करण्याकरितां त्यांनी स्मृतिग्रंथात सांगितल्या प्रमाणें चांगल्या न्यायाधीशाच्या न्यायदानार्थ नेमणूका केल्या. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १५, १६, १७, १८, व २० यांमध्ये शिवाजी महाराजांनी स्वराज्याची स्थापना केल्या नंतर गोत देशक इत्यादि संस्थानीं व खुद्द राजा, अष्टप्रधान व देशक मिळून बनलेल्या सभानीं कित्यक व्यवहारा संबंधी केलेले निवाडे प्रसिद्ध झाले आहेत. या निवाड्या वरून याज्ञवल्क्य स्मृतींत कुल, श्रेणी आणि पूग इत्यादि सभानी प्रजेत उत्पन्न होणाऱ्या व्यवहाराचा निर्णय करावा असें जें सांगितलें आहे त्यास अनुसरून त्या संस्था सदृश अशा गोत, देशक इत्यादि सभा मराठी राज्याची स्थापना झाल्या नंतर व्यवहाराचा निर्णय करीत असत असे सिद्ध होत आहे. धर्म-

स्थापना हें स्वराज्यस्थापनेचें ध्येय असल्या कारणानें महाराष्ट्रीय समाजांत सर्वमान्य झालेल्या याज्ञवल्क्य स्मृतिग्रंथांत सांगितलेल्या पद्धतीस अनुसरून व्यवहारनिर्णय करण्याच्या पद्धतीचा पुरस्कार केला जावा हें योग्य च होतें असें कोणास हि कबूल करणें भाग आहे. याज्ञवल्क्य स्मृतींत व्यवहारनिर्णय करण्या करितां राजानं न्यायाधीश नेमावा असें सांगितलें आहे. मागें अष्टप्रधान संस्थे संबंधीं आम्हीं जी माहिती दिली आहे ती वरून न्यायाधीश हा एक प्रधान समजला जात असे हे आपणास विदित झालें आहे. न्यायाधीशानें करावयाच्या कामाचा तपशील पूर्वी दिला च आहे. मराठी राज्याच्या अमदानींत व्यवहारनिर्णय करण्याकरितां उत्तम न्यायाधीश नेमण्यांत येत असत असें त्या काळच्या कागदपत्रा वरून दिसून येतें. शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीत निराजी रावजी, बाळाजी सोनदेव; शाहू छत्रपतींच्या कारकीर्दीत सखो विठल, होनाजी पंडीत; त्याच प्रमाणें पेशव्यांच्या कारकीर्दीत रामशास्त्री प्रभुणे इत्यादि न्यायाधीशांनीं स्मृतिधर्मास अनुसरून न्याय करणारे अशा प्रकारची ख्याति संपादन केली होती. या मुद्या संबंधीं शिवाजी महाराजाच्या सप्तप्रकरणात्मक चरित्रांतील उल्लेख फार महत्वाचा आहे. याज्ञवल्क्यादि स्मृतिग्रंथांत सांगितल्या प्रमाणें न्यायनिर्णय केला जावा अशा विषयीं मराठी राज्यांत किती खबरदारी घेण्यांत येत असे हें या उल्लेखा वरून दिसून येत असल्या कारणानें जरूरी पुरतां उतारा आम्ही खाली देतों:—

निराजी रावजी न्यायाधीश परम चतुर शाहाणे तर्कज्ञ त्यास न्याय करण्या विषयीं राज्यांतील अनेक प्रकारचे न्याय येतील ते नीतीनें करावें, दंड करणें त्यास न केला, व न करावा त्यास केला असतां राज्यास अकल्याण, व न्याय करणे त्यांस लोभ धरून वृत्ती उच्छेद झाली असता परम पाप या योगें राज्य क्षयास पावते, यास्तव नीतिशास्त्राप्रमाणें विद्वान् पडीत ब्राम्हण. सभासद चतुर व सभ्य धान (म्हणजे ज्यास आलें त्यास बोलावणें व आणणें करणार, यांस म्हणावे ) त्यास व तसेंच आणखी न्याय कर्ते दहा पाच घेऊन सर्वांचे समक्ष न्याय निवडून राजास निवेदन करून किमपी अन्याय होऊं नये असें करीत असावें" म्हणून सांगितलें व कोणाची दाद फिर्याद आली असतां लागलीच मनास आणली नाहीं असें न घडतां करावें. न्याय करणें ते बहुत

दिवस लावून त्यांची जीविका बुडाली असें न होतां तात्काळ गोर-गरीब व सर्वांचे न्याय होत असावे. कोणासही विपरीत शासन, द्रव्य हरण होऊं नये असें बहुत रीतीनें सांगून मुख्य धर्म राजाचा प्रजा-पालन करणें व न्याय अन्याय पाहाणें, धर्म कोणी आचरिला, अधर्म कोणी केला ते पाहून शिक्षा करणें, यास्तव सावधपणें जे करणें तें करावें. नाहीं तर राजास वाईट म्हणून लघूजन यांचे न्याय करणें त्या त्या ज्ञातींतील सभ्य असतील व त्याचे धर्म असतील त्या अन्वयें व देशधर्म व ज्ञातीधर्म विवक्षा करून करीत जावे, असें सांगून करविते झाले. ' ( पान १३० )

वरील उताऱ्या प्रमाणें च प्रस्तुत मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें चिटणिस कृत राजनीतींतील खालील उतारा फार महत्वाचा आहे. प्रथम ग्रंथकारानें दंडनीतीचा खुलासा केलेला आहे तो येणे प्रमाणेः—" दंडनीति म्हणजे न्याय अन्याय विचार युक्त याचे नांव दंड विद्या होय. याचे फल न्याय अन्याय पाहून शासन केलें असतां अधोगती प्रती न जातां उत्तम गतीत राजा पावतो, आणखी ही तर्कशास्त्रें, वेदात, मिमांसा, मनुस्मृति या सर्व अभ्यासांत असाव्या. ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे चार वर्ण यांचे धर्म व ब्रम्हचारी, गृहस्थ वानप्रस्थ, संन्यासी हे चारी आश्रम यांचे धर्म सांगितल्या विद्या यांत आहेत; ते जाणोन वर्णाश्रम धर्म ज्याचे त्याज पासून करून धर्म संरक्षण करावा. संपूर्ण विद्या व आश्रम धर्म याची प्रवृत्ती करणारा भूपपती याणे या विद्याचा अनादर केल्यास सर्वही धमलोप होतो. यास्तव आपण करून सर्व प्रजा याजपासून करवाव्या. विद्याचा लोप झाला असतां धर्माचा लोप होतो. धर्मनाश पावला असतां वर्ण संकर होऊन सर्वही अधःपात पावतात. या करितां वर्णाश्रम धर्म जाणून रक्षण करणारा राजा याणे सांगितलें प्रकारें करून वर्णाश्रम धर्म रक्षण केले असतां इच्छिले फल पावतो. "

मराठी राज्यांत महाराष्ट्रीय समाजांतील चातुर्वर्णिय समाजा पैकीं कोणत्या हि व्यक्तीने केलेलें कृत्य न्यायाचें अगर अन्यायाचें आहे ही बाब वरील उताऱ्यांत दर्शविल्याप्रमाणें ते कृत्य श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मात सांगितलेल्या वर्णा-

---

१ टीपः– मनुस्मृति अध्याय ७ श्लोक १४ ते २५ यांतील भावार्थ चिटणीस कृत राजनीतिकारानें या उताऱ्यांत दिला आहे.

श्रम धर्मास अनुसरून आहे अगर त्या धर्माच्या विरुद्ध आहे यावरून ठरविण्यांत येत असे हें वरील उताऱ्या वरून सिद्ध होत आहे. श्रुतिस्मृत्युक्त धर्मास अनुसरून जो राजा न्याय अन्यायाचा निर्णय करितो त्यास उत्तम गति प्राप्त होते अशी फलश्रुति वरील उताऱ्यांत सांगितली आहे. शिवाजी महाराजांनीं जी अष्टप्रधान संस्था निर्माण केली होती त्या संस्थेतील अष्ट प्रधान व राजा याना न्यायाधीशा प्रमाणे च त्यांच्या कडे निर्णयार्थ आलेल्या कोणत्या हि व्यवहाराचा निवाडा करण्याचा अधिकार होता. व्यवहारनिर्णय कोणत्या पद्धतीने करावा याचे उत्तम दिग्दर्शन सप्तप्रकरणात्मक चरित्राप्रमाणें च चिटणिसकृत राजनीतींतील खालील प्रमाणें केलें आहे: —

"प्रधानादि सांगितले यांणी वाद मनास आणणे ते पूर्वाण्हीं सभा करून मनास आणीत असावे. निर्णय करणे तो अर्थशास्त्र धर्मशास्त्र यास परस्परें विरोध पाहता दिसो लागला तरी अर्थशास्त्राहून सबल धर्मशास्त्रविधि होय, याजकरिता अर्थशास्त्रातील विचार ठेवून धर्मशास्त्र च पाहून निर्णय करावा. धर्मशास्त्रें आणि नितिशास्त्रे पाहिले त्यांत धर्मशास्त्रे निर्णय केला तो पाहतां नितिशास्त्रानें विरोध दिसलिया धर्मशास्त्र ठेवून नीतिशास्त्रे करून च सिद्धांत करावा. नीतिशास्त्र दोहींहून सबळ पक्ष दिसण्यास कारण सांगतो. देशाचार, वर्णाचार, कुलाचार ही लक्षणे पाहावी असे नीतिशास्त्री धरले आहे. तिन्ही आचारविधि ( याचा ) धर्मशास्त्र च करून उच्छेद केला तरी प्रजा क्षोभ होतो. येणे करून राजास अकल्याण होते. देशाचार पाहातां मातुल-कन्या परिणय व पलांडु भक्षण हे दक्षिण देशीं अनाचार प्राचीन आहेत व मध्य देशाचे ठायीं शिल्पिकार गवय भक्षणार आहेत. पूर्व देशाचे ठायीं मत्साहार करणें हा अनाचार आहे. उत्तर देशाचे ठायीं मद्यपान, व जार कर्मे व रजस्वला सपर्क करणे हे अनाचार आहेत. हे पाहू जाता धर्मशास्त्रास विरुद्ध पडते. धर्मशास्त्र च धरून करतां प्राचीन अनाचार ( त्यांचा उच्छेद )

---

१ टीपः— मुऱ्यांच्या देशपांडे वतनाचा निवाडा शके १६४४ सालांत शाहु महाराज, त्यांचे अष्टप्रधान, होनाजी अनंत न्यायाधीश, गोत व देशक यांच्या सभेनें कृष्णाकाठीं माहुलीसंगमीं केलेला पहा ( म. इ. सा. खंड २० पान ४४ ).

२ टीपः—शुक्रनीति अध्याय ४ प्रकरण पांच मधील श्लोक ९३ ते ९९ मध्ये वरील चालींचा उल्लेख आहे यावरून चिटणीसकृत राजनीति रचणाराने वरील श्लोकांचा आपल्या ग्रन्थांत समावेश केला असावा असा तर्क होतो.

करितां प्रजा क्षोभ होतो यास्तव प्राधान्यें नीतिशास्त्र च सबळ होय. देशाचार-रातास केवळ शिक्षाच करूं नये. वाणी, कृषिकार व शिल्पिकार व रंगारी आदिकरून सामान्य जातीचा न्याय करणें तो त्या त्या जातींतील शाहाणे आणवून त्यांज पासून न्याय करावा. त्याची विविक्षा करून निर्णय करणें तो मतास आणणारा प्रधानादिक यांनीं करावा. ज्ञातीतील शहाणे आणून त्याजपासून मनास आणवणें याचें कारण त्या त्या ज्ञातींतील विषय कळतो यास्तव करावा. हर कोणास वादविशीं बोलावणें तरी बाल अथवा वृद्ध तसाच रोगी अशक्त व ज्यांचे घरीं मंगलादिक कार्ये असतील त्यांस त्याच काळीं बोलावूं नयेत. या नीति अनुरूप न्याय प्रधान यांणीं ब्राह्मण व प्राड्विवाक व सभासद यासहित न्याय करावा. तो न्याय दंड करवणे त्यास यथायोग्य दंड करवावा. द्रव्यादिक घेववणे त्याज पासून द्रव्य घेववावें. कृपा करणे त्यासी कृपा करावी. दिव्य करवणें त्याज पासून दिव्य करवावें. ती दिव्ये सांगतो. एक अग्निदिव्य, जलदिव्यादिकरून. साक्षी, भोग्य व पत्र याचा अभाव असल्यास न्याय करून वाद निवाडा न होये तरी दिव्य करवावें. ब्राम्हणा पासून अग्नि दिव्य करवु नये, या प्रमाणें न्याय धर्मे करून करवावा.''

याज्ञवल्क्यस्मृति व तीवरील मिताक्षराटीकेंत व्यवहार निर्णय पद्धती संबंधीं जें प्रतिपादन केलेले आहे त्या प्रतिपादनाचा च अगदीं स्थूल अनुवाद राजनीतिकारानें वरील उताऱ्यांत केलेला आहे. स्वराज्य स्थापन केल्या नंतर श्रुतिस्मृत्युक्तधर्मांत सांगितलेली व्यवहार निर्णयपद्धति शिवाजी महाराजांनीं अमलांत आणली असें वरील उताऱ्यावरून स्पष्टपणे दिसून येत आहे. श्रुति-स्मृत्युक्तधर्माची स्थापना करणें हें स्वराज्यस्थापनेचे ध्येय असल्या खेरीज व्यवहार निर्णयाची वरील पद्धत अमलात आणण्याचा संभव नाहीं, ह्या खेरीज दुसरें अनुमान वरील उताऱ्यावरून काढता येणे शक्य नाहीं. मनु याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतींतील राजधर्म व व्यवहारधर्म प्रकरणांस अनुसरून मराठी राज्यांत व्यवहारनिर्णयाची व न्यायदानाची पद्धति बनविण्यात आली होती असें येथपावेतों केलेल्या चर्चेवरून सिद्ध होत आहे. आतां अशा प्रकारच्या

---

१ टीपः—भा इ. सं. मंडळाच्या शके १८३६, ३७ व ३८ सालाच्या संमेलन वृत्तांत "महाराष्ट्रांतील व्यवहार निर्णय पद्धति" या मथळ्या खालीं प्रसिद्ध झालेले आमचे लेख राजनीतीच्या वरील सूत्ररूप उल्लेखाची साधार विस्तृत चर्चा आहे असें ते लेख वाचले असतां वाचकांच्या निदर्शनास येईल.

पद्धतीनें स्वराज्याच्या अमला खालील प्रजेस कोणती फलप्राप्ति झाली ते पाहिले पाहिजे. या फलप्राप्तीचें स्वरूप सप्तप्रकरणात्मक चरित्राच्या कर्त्याच्या शब्दांत च सांगणें उचित असल्यामुळे आम्ही त्या चरित्रांतील या विषयींचा उतारा खाली देतों:--

" अशया प्रकारें नीतीकरून राज्य चालविते झाले. त्या योगें राज्याचें ठायीं बहुत सुभिक्ष व सर्व यथास्थित असून प्रजा मनुष्य मात्र सुखरूप असोन पृथ्वीचे ठायीं रस धान्यादिकांची, ज्या ज्या कालीं जे जे होणें तें होतें अशी उत्पत्ती बहुत झाली. कालाचे कालास वृष्टि झाली. मनुष्यमात्रास स्वल्प प्राप्ति झाली. तरी त्या योगें करून यथास्थित सुख होते झाले...
"राज्य द्रव्य येईल त्यांतच सर्व प्रपंचकार्य नित्य नैमित्तिक कर्मे हीं होऊन द्रव्य संग्रह होत असावा अशी वृद्धि आपआपले धर्मे करून चालविण्याची इच्छा झाली. या प्रमाणे धर्म स्थापून धर्मे करून राज्य संपादन करून नीती मर्यादें करून सर्वांचे, सेवक पदरचे यांचे व प्रजांचें पोषण करिते झाले. आणि नीती मर्यादेप्रमाणें दौलतही संपादन केली व त्याचा बंदोबस्त नीती, राजधर्म, राज्य करण्याचा आहे त्या प्रकारे केला. "

वरील उताऱ्यावरून हि शिवाजी महाराजाच्या स्वराज्यस्थापनेचें ध्येय स्वधर्मस्थापना व तद्वारें महाराष्ट्रीय जनतेचा अभ्युदय हें असल्याचें दिसून येतें. सप्तप्रकर्णात्मक चरित्रकारानें केलेले वरील वर्णन अतिशयोक्ति प्रचुर आहे असा या वर्णनावर आक्षेप येण्याचा संभव आहे. परंतु शिवाजी महाराजांच्या स्वराज्यांतील प्रजे विषयीं परद्विपस्त लोकांनीं ती सुखी व समाधानी असल्याचे इतिहासांत नमूद करून ठेविले असल्या कारणाने वरील वर्णन अतिशयोक्तिप्रचूर आहे असें कोणास हि म्हणतां येणें शक्य नाहीं. दुसरे बाजीराव पेशव्यांची कारकीर्द वगळली असतां मराठी राज्यांतील प्रजा एकंदरीनें सुखी असून सर्वत्र शांतता नांदत होती असें महाराष्ट्र इतिहास साधन ग्रथांत त्या काळच्या स्थिती बद्दलच्या आलेल्या उल्लेखावरून म्हणण्यास हरकत नाहीं. म. इ. सा. खंड ४ पान ६९ वरील खालील उल्लेख प्रस्तुत मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें महत्वाचा व विचार करण्या सारखा आहे. "

"श्रीमंत सवाई माधवराव यांनीं अवतार धारण केल्यापासून सड्यानीं पुण्यापासून दिल्ली पावेतों लाखो रुपयांचा जिन्नस, सोनें, रुपें व जवाहिर घेऊन गेले असतां मार्गांत निर्भय जाऊन यावें. पूर्व माहाराज

राजे राज्य रीती करून राज्य चालवित होते त्या आन्वयें नीती, राज्याचा उपभोग करून, प्रजापालन होत आहे." या उल्लेखा वरून न्याय, नीति, शांतता, सुख इत्यादिकांचा अनुभव मराठ्यांच्या स्वराज्यांतिल प्रजेस अनुभवण्यास सापडत असे हें सिद्ध होत आहे.

परधर्मसहिष्णुताः—मराठ्यांनीं ज्या मुसलमान राजकिय सत्तेचें उच्चाटन करून स्वराज्यस्थापना केली त्या मुसलमानी राजकीय सत्ते खालीं हिंदु प्रजेवर धार्मिक बाबतींत जो अनन्वित जुलूम होत असे तो लक्षांत घेतां स्वराज्य स्थापना झाल्यावर मराठ्यांनीं निवळ सूड घेण्याच्या भावनेनें मुसलमान लोकांच्या माशिदी व पूज्य स्थानें उद्ध्वस्त करण्याचें मनांत आणलें असतें तर त्यांना ती गोष्ट करितां येणें अशक्य नव्हतें. त्या च प्रमाणें महाराष्ट्राच्या अरबी समुद्रास लागून असणाऱ्या कोंकण प्रांतांतील महाराष्ट्रियांवर खिस्ती धर्मानुयायी पोर्तुगीज लोकांनीं मुसलमानां प्रमाणें च धर्माचे बाबतींत जो अनन्वित जुलूम केला त्याचा वचपा काढावयाच्या हेतूनें मराठ्यांनीं खिस्ती लोकांचीं देवालयें उद्ध्वस्त करण्याचें मनांत आणलें असतें तर तें हि त्यांस करितां येणें अशक्य नव्हतें. परंतु मराठ्यांनीं स्वराज्यस्थापन केल्यावर केव्हां हि कोणत्या हि धर्माच्या पवित्र स्थानास यत्किंचित् हि तोशीस दिली नाहीं. उलट योग्य प्रसंगीं त्यांस मान देण्यास कमी केलें नाहीं. ही गोष्ट लक्षांत घेतां मराठ्यांनीं परधर्मीयांच्या पवित्र स्थाना बद्दल वरील धोरण काय कारणास्तव स्वीकारलें या विषयीं प्रस्तुत स्थळीं चर्चा करणें अत्यंत अवश्य आहे. मराठ्यां विषया अत्यंत प्रतिकूल मनोवृत्तीच्या काफीखाना सारख्या मुसलमान इतिहासकारानें या बाबतींतील शिवाजी महाराजांच्या धोरणा संबंधीं काढलेले खालील उद्गार फार महत्त्वाचे असल्या कारणानें ते या ठिकाणीं नमूद करणें जरूर आहेः—

"He attacked the carvans which came from distant parts, and appropriated to himself the goods and women. But he made it a rule that whenever his followers went plundering, they should do no harm to Mosques, the book of God, or any one's women. Whenever a copy of the Holy Kuran came into his hands, he treated it with respect and gave it to some one of his Mahomedan followers. When the women of any Hindu or Mahomedan were taken prisoners

by his men, and they had no friend to protect them, he watched over them till their relations came to buy them their liberty." ( Elliot and Dowson VII 260 ).

अर्थः— " दूरदूरच्या प्रदेशांतून येणाऱ्या व्यापारी तांड्यावर तो ( शिवाजी ) हल्ले करीत असे व त्याचा माल व बायका हस्तगत करी. परंतु त्याने त्याच्या सैनिकां करितां असा सक्त नियम केला होता कीं, त्याचे सैनिक ज्या ज्या ठिकाणीं लुटालूट करण्या करितां जात तेथें त्यांनीं मशीदीस, कुराण ग्रंथास, अथवा कोणत्या हि स्त्रीस तोशीस अगर त्रास देऊं नये. जर एखादा कुराणाचा ग्रंथ त्याच्या हातीं आला तर त्या बद्दल तो पूज्यभाव बाळगून तो त्याचे मुसलमान नोकरास देत असे. कोणत्या हि हिंदु अगर मुसलमानाची स्त्री त्याच्या हातीं सापडल्यास व तिचें रक्षण करणारा तिचा कोणी संबंधी तिच्या जवळ नसल्यास तिचे नातेवाईक तिची सुटका करून घेण्याकरितां येई तों पर्यंत तो तिची चांगली काळजी घेत असे."

वरील उताऱ्या वरून परधर्मीयांस पूज्य असलेल्या वस्तूंस व स्त्रियांस शिवाजी महाराज कोणत्या प्रकारचा मान देत असत हे सिद्ध होत आहे. मराठ्यांच्या स्वराज्य स्थापनेच्या ध्येयाच्या स्वरूपा विषयीं ग्रांट डफच्या इतिहासांतील जो उतारा पहिल्या प्रकरणांत आम्हीं दिला आहे, त्यांत Freedom of Opinion म्हणजे मत स्वातंत्र्या पलीकडे हिंदु लोकांना मराठी राज्यसत्ते खालीं कांहीं एक लाभ झाला नाहीं असें ग्रॅन्ट डफनें म्हटलें आहे. वास्तविक विचार केला असतां मुसलमानी राज्यांत जी गोष्ट लाभणे दुरापास्त होती, ती गोष्ट मराठी राज्यात सहज रीतीने भरतखंडाच्या कोणत्या हि प्रांतांतील हिंदूस अगर इतर कोणत्या हि जातीच्या माणसास प्राप्त झाली हा वास्तविक कांहीं थोडा थोडका फायदा नाही. मराठ्यां विषयीं अत्यंत प्रतिकूल मनोवृत्तीच्या लेखकांनीं देखील मराठ्यांच्या परधर्मा विषयींच्या वागणुकीच्या धोरणाचे बाबतींत ज्या अर्थी वरील प्रकारचे अभिप्राय व्यक्त केले आहेत त्या अर्थी या अभिप्रायांची किंमत फार च मोठी समजली पाहिजे. परकीय लोकांच्या मराठ्याविषयींच्या या मतांचा विचार करितां मुसलमानी धर्म व त्या धर्माचे अनुयायी यांच्या विषयीं मराठ्यांचें सर्व साधारण धोरण उदारपणाचें होतें या विषयीं शंका घेण्यास यत्किंचित् हि जागा राहत नाहीं. मुसलमाना प्रमाणे च पोर्तुगीज लोकांनीं हि कोंकण प्रांतांतील हिंदु प्रजेवर अनन्वीत जुलूम केला होता. तथापि वसईच्या

वेळ्या नंतर पोर्तुगीज लोकांची राजकीय सत्ता कोंकण प्रांतांतून नष्ट होऊन तेथें स्वराज्य स्थापित झाल्यावर त्या प्रांतांतील पोर्तुगीज खिस्ती लोकां संबंधीं हि मराठ्यांनीं उदारपणाचें धोरण स्वीकारलें होतें.

काफीखानाचा वरील अभिप्राय शिवाजी महाराजा संबंधीं आहे. परंतु त्यांच्या पश्चात् मराठ्यांचें परधर्मीयां विषयीचे धोरण वरील स्वरूपाचें होतें असें ह्मणण्यास आधार काय अशी शंका उपस्थित होण्याचा संभव आहे. या शंकेचें समाधान करण्या सारखा उपलब्ध झालेला पुरावा या ठिकाणीं आम्हीं थोडा फार नमूद करून ठेवितों. मराठी राज्यांत मुसलमान लोकांच्या मशीदी, दर्गे वगैरेंस राजसत्ता धारण करणाऱ्या अधिकाऱ्यांनीं इनामें, देणग्या दिल्याचे अनेक दाखले म. इ. साधन ग्रंथांतून आढळून येतात. एक राजकीय सत्ता नष्ट होऊन त्या ठिकाणीं दुसरी राजकीय सत्ता स्थापित झाली ह्मणजे गत झालेल्या राजकीय सत्तेच्या अमलांत दिलेल्या देणग्या, इनामें वगैरे पूर्ववत् चालू ठेवावयाची ही गोष्ट करणे स्वार्थाच्या दृष्टीनें नूतन राजकीय सत्ता स्थापन करणारास प्राप्तच असतें. या तत्त्वास अनुसरून मुसलमानांनीं त्यांची राजकीय सत्ता स्थापित झाल्यावर हिंदु देवस्थानास पूर्वकाळीं दिलेल्या देणग्या व इनामें चालू ठेवल्याचीं अनेक उदाहरणें इतिहासांत आढळतात. त्या च प्रमाणे मराठ्यांनीं स्वराज्य स्थापना केल्यानंतर मुसलमानांच्या मशीदी पीर वगैरेंस देण्यांत आलेल्या पूर्वीच्या देणग्या व इनामें काढून न घेतां चालू ठेवल्याची हि अनेक उदाहरणें आहेत. परंतु वर दर्शविल्या प्रमाणें नूतन स्थापित करण्यांत आलेली राजकीय सत्ता लोकप्रिय व्हावी या हेतूनें हें धोरण स्वीकारण्यांत येत असल्या कारणानें याची किंमत विशेष नाहीं. मराठ्यांच्या या बाबी संबंधाच्या धोरणा विषयींचीं जीं उदाहरणें आम्ही देणार आहोंत तीं या स्वरूपाचीं नाहीत. मराठी राज्य स्थापन होऊन स्थिरस्थावर झाल्या नंतरच्या काळांत मुसलमानांच्या पवित्र स्थानास नूतन इनामें दिल्याचीं हि उदाहरणें आहेत, व यामुळें च या उदाहरणांचें महत्व फार आहे. ‘ पेशवे दप्तरांतील सनदापत्रांतील माहिती ’ या ग्रंथांतील पान २४२ वर बाळाजी बाजीराव यांचें इ. स. १७५८–५९ सालांतील तांबे परगण्यांतील तेनहळ्ळीं गांव विजापूर येथील पीर खंडाईत याच्या दरग्यास इनाम देण्या बद्दलचें आज्ञापत्र आहे. वरील गांव पूर्वी दरग्यास इनाम होता तो चालत नाहीं अशी फकीरांनीं बाळाजी बाजीराव यांच्याकडे तक्रार केली होती. त्या

वरून बाळाजी बाजीराव यांनीं तो गांव दरग्याच्या चिराख बत्ती व उद फुला बद्दल इनाम दिला असें वरील आज्ञापत्रा वरून दिसून येतें. त्या च प्रमाणें इ. स. १७४४-४५ सालांत मौजे सोपारे व मौजे बोलीज परगणा हवेली सायेवान येथें महंमद साले यांनीं बांधलेल्या मशीदींच्या दिवा बत्तीस व खिजमतगारास त्यास तीन बिघे जमीन बाळाजी बाजीराव पेशवे यांनीं इनाम दिली. इ. स. १७४६–४७ सालांत माहागिरी पाखाडी कसबे ठाणें येथील तळयाचे पाळ्यावर बांधलेल्या जुमा माशिदीच्या खिजमतीस व चिराख बत्तीस दीड बिघा पड जमीन याच पेशव्यांनीं इनाम दिली. ( सातारचे राजे आणि पेशवे यांच्या रोजनिशींतील निवडक वेचें भाग दोन बाळाजी बाजीराव पेशवे भाग २ पान १०० ते १०१ ). वरील प्रमाणें च सवाई माधवराव पेशवे यांनीं इ. स. १७७६–७७ सालांत प्रांत पुणें पैकीं मौजे कवडी येथील दलबादलशा तकियास चार बिघे जमीन चिराख बत्तीनिमित्त नूतन इनाम दिल्याचा दाखला आहे. ( वाड भाग ८ स. माधवराव पेशवे भाग ३ पान १८५ ). आतां खिस्ती धर्माच्या देवळाच्या बाबतींत मराठ्यांचें धोरण कोणत्या स्वरूपाचें होतें, याचें आम्ही थोडक्यांत दिग्दर्शन करितों. इ. स. १७६५।६६ सालांत पादरी फरेल्यान दरे माजरदेस यानें रेवदंडा येथील देवीच्या उत्साहाच्या प्रसंगीं शेवटच्या दिवशीं तोफेचा एक बार करावयाचा हूकूम आहे, परंतु जास्ती दोन बार करण्याची परवानगी असावी अशा बद्दल थोरले माधवराव पेशवे यांच्या कडे अर्ज केला. तो अर्ज पेशव्यांनीं मंजूर करून तीन बार करण्याचा हुकूम केला. इ. स. १७६७–६८ सालांत एका खिस्ती देवळाचें सामान एका पाद्यानें दुसरें देवालय बांधण्याकरितां मिळण्या बद्दल पेशव्यांकडे अर्ज केला. थोरले माधवराव पेशवे यांनीं या अर्जा संबंधीं खालील हुकूम केला:—

" पाद्री विगार याचें सेंटचे देवालय यांत देव नसलियास देवालय मोडकळीस आलें आसिल्यास व रोत वगैरे लाकडे असतील तीं सिनोर प्राद्री फेलपाद्र, माजर देश याजकडे देऊन पावलियाचें कबज घेणें. " ( वाड भाग ७ थोरले माधवराव पेशवे भाग २ पान ३३२ ) वरील देऊळ खिस्ती लोकांचें असल्यामुळें देवळांत मूर्ति असली तथापि त्या देऊळ पाडण्याची परवानगी असें न करितां देव नसल्यास व देऊळ मोडकळीस आलें असल्यास त्या देवळाचें सामान देण्याची परवानगी माधवराव पेशवे यांनीं दिली आहे. सवाई माधवराव पेशवे यांच्या

कारकीर्दीत खिस्ती देवळाच्या जीर्णोद्धारा प्रीत्यर्थ पेशव्यांनीं द्रव्य दिल्या बद्दलचें एक उदाहरण आह्मी येथें नमूद करितों—इ. स. १८८५-८६ सालांत रेवदंडा येथील मानर देवीची रमेद ( देऊळ ) मोडकळीस आल्या कारणानें पाद्रि फेल्याद्र यानें रमेदेचे दुरुस्ती करितां पेशव्यां कडे मदत मागितली असतां पेशव्यांनीं रुपये १०० दुरस्ती प्रित्यर्थ मंजूर केले. ( वाड भाग ८ सवाई माधवराव भाग ३ पान २०१ )

वरील उदाहरणा वरून हिंदूंच्या देवळां प्रमाणें च परधर्मीयांच्या मशीदीस व देवळांस मान द्यावयाचा ही भावना पेशव्यांच्या ठिकाणीं होती हें दिसून येतें. परधर्मांच्या बाबतीत मराठ्यांचें जें धोरण आम्हीं वर दर्शविलें आहे त्याचा उगम कोठें आहे याचें आतां आम्ही दिग्दर्शन करितों. याज्ञवल्क्य स्मृतींतील राजधर्म प्रकरणांत खालील वचन आढळतें.

**यस्मिन्देश च आचारो व्यवहाराः कुलस्थितिः।**
**तथैव परिपाल्योऽसौ यदा वशमुपागतः ॥ ३४३ ॥**

अर्थः—" जेव्हां दुसरा देश आपल्याला वश होईल तेव्हां आपल्या देशाचा आचार इत्यादि तेथें सुरू करून आचारादि संकर करूं नये. तर ज्या देशांत जो आचार, कुलमर्यादा व व्यवहार असेल तो शास्त्र विरुद्ध नसल्यास तसा च पाळावा. "

मनुस्मृतीच्या सातव्या अध्यायाच्या राजधर्म प्रकरणांतील खालील वचन वरल्या सारखें च आहेः—

**प्रमाणानि च कुर्वीत तेषां धर्म्यान्यथोदितान्।**
**रत्नैश्च पूजयेदेनं प्रधानपुरुषैः सह ॥ श्लो. २०३ ॥**

अर्थः-" या परकीय लोकांचे धर्मास:सोडून नसलेले व देशधर्म या दृष्टीनें शास्त्रानें हि मानलेले आचार प्रमाण मानावे व ज्यास अभिषेक केला आहे अशा राजाचा आमात्यादिकांसह रत्नादिकांनीं सत्कार करावा. "

धर्म स्थापना हें मराठ्याच्या स्वराज्य स्थापनेचें ध्येय असल्या कारणानें वरील स्मृतिवचनांच्या दृष्टीनें मराठ्यांच्या राजकीय सत्तेखालीं नांदणाऱ्या कोणत्या हि धर्मांच्या लोकांवर धार्मिक बाबतींत जुलूम अगर जबरदस्ती होणें शक्य नव्हतें. वरीस वचनांच्या विरुद्ध मराठ्यांनीं त्यांच्या सत्ते खालील कोणत्या हि प्रदेशांत वर्तन केल्याचें उदाहरण सांपडणें कठीण आहे. मराठ्यांच्या परधर्मसहिष्णुतेच्या सर्व साधारण धोरणा बद्दलची ही चर्चा पुरी करून मराठ्यांच्या राज्यपद्धतींतील दुसऱ्या एका बाबतींतील धोरणा विषयींच्या चर्चेकडे आतां आह्मी वळतों.

**शांतिक व पौष्टिक कर्में:**— ज्या श्रुतिस्मृतिप्रणीतधर्माच्या स्थापनार्थ मराठी राज्याची स्थापना करण्यांत आली त्या धर्माच्या अनेक मूलतत्त्वां पैकीं, एक तत्त्व असें आहे कीं, या जगांत जें जें कर्म करण्यांत येतें त्या त्या कर्माच्या इष्ट सिद्धीच्या आड अदृष्ट अशीं विघ्नें येत असतात व शांतिक व पौष्टिक कर्में केली असतां या विघ्नांचा नाश होऊन इष्ट सिद्धि प्राप्त होते. हें तत्त्व एखाद्या व्यक्ती कडून घडणाऱ्या कर्मास जसें लागूं आहे त्याच प्रमाणें राजा व त्याच्या हाता खालील अनेक अधिकाऱ्यांनीं चालविलेल्या राज्यासारख्या महत्कार्यास हि लागूं आहे. या तत्त्वाच्या दृष्टीनें विघ्न नाशनार्थ व इष्ट-सिद्धिप्राप्त्यर्थ शांतिक व पौष्टिक कर्में राजाने करणें हा राजाचा एखाद्या सामान्य व्यक्ती प्रमाणें च धर्म ठरतो व या कर्मास लागणारें द्रव्य प्रजे कडून घेतलेल्या द्रव्यांतून खर्च करण्याचा त्यास अधिकार प्राप्त होतो. मराठी राज्याची स्थापना श्रुतिस्मृत्युक्तधर्मस्थापने प्रीत्यर्थ असल्या कारणानें वरील तत्त्वाचा मराठी राज्यात अंगीकार करण्यांत आलेला होता; व त्या प्रमाणें अंमल हि करण्यांत येत असे ही बाब यापुढें आम्हीं जें विवेचन करणार आहों त्यावरून दिसून येईल.

याज्ञवल्क्य स्मृतींत कोणत्या हि कर्मास विघ्नें न येतां त्याची इष्टसिद्धि प्राप्त होण्या करितां विनायकाचें पूजन करावें असें सांगितलें आहे. त्याच प्रमाणें श्रीची प्राप्ति व्हावी अशी इच्छा असल्यास हि विनायकाचें पूजन सांगितलें आहे. याज्ञवल्क्य स्मृतीच्या ग्रहशांति प्रकरणांत खालील वचन आहे:—

**श्री कामः शांतिकामो वा ग्रहयज्ञं समाचरेत् ।**
**वृष्ट्यायुः पुष्टिकामो वा तथैवाभिचरन्नपि ॥ श्लो. २९५ ॥**

अर्थ:—“ ज्यास लक्ष्मीची इच्छा आहे, आपत्ति शांत व्हावी अशी आशा आहे, धान्यादिकांच्या वृद्धी करितां वृष्टि व्हावी अशी इच्छा आहे, अपमृत्यूचा नाश होऊन आयुष्य वाढावे व उत्तम प्रकारें शरीर पुष्ट व्हावें अशी इच्छा आहे त्यानें ग्रहयज्ञ करावा. त्या च प्रमाणें अभिचार करण्याची ज्यास इच्छा असेल त्यानें हि ग्रहपूजा करावी. ” अदृष्ट उपायानें शत्रूस पीडा करणें यास अभिचार ह्मणतात. या प्रमाणें याज्ञवल्क्य स्मृतींत सांगितलें असून सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहू व केतु या नवग्रहांची पूजा कशा रीतीनें करावी याची साग्र माहिती या च प्रकरणांतील पुढील श्लोकात दिली आहे. ग्रहशांति प्रकरणाच्या शेवटीं खालील वचन आहे:—

**ग्रहधीना नरेन्द्राणामुच्छ्रायाः पतनानिच ।**
**भावाभावौ च जगतस्तस्मात्पूज्यतमा ग्रहाः ॥ ३०८ ॥**

अर्थः— " अभिषिक्त क्षत्रिय राजांस हे ग्रह अतिशय पूज्य आहेत. कारण सर्व प्राण्यांचा अभ्युदय व नाश या ग्रहांच्या आधीन असतो. यास्तव अधिकाऱ्यांनीं त्यांची अवश्य पूजा करावी. राजा सर्व प्रजेचा ईश्वर आहे. यास्तव तिच्या योगक्षेमा करितां ग्रहास संतुष्ट करणे हें त्यांचें कर्तव्य आहे. शांतिक व पौष्टिक कर्मांचा अव्हेर न करणें हें सर्वांस हितकर आहे. "

मनुस्मृतीच्या सातव्या अध्यायाच्या राजधर्म प्रकरणांत खालील वचन आहेः—

**यजेत राजा क्रतुभिर्विविधैराप्तदक्षिणैः**
**धर्मार्थं चैव विप्रेभ्यो दद्याद्भोगान्धनानि च ॥ ७९ ॥**

अर्थः— " राजाने बहु दक्षिणायुक्त नाना प्रकारचे अश्वमेधादि यज्ञ करावे. धर्मार्थ ब्राह्मणांस स्त्री, गृह, शय्या इत्यादि भोग व सुवर्ण, वस्त्रें इत्यादि द्रव्यें द्यावींत. "

राष्ट्राच्या कल्याणाकरितां व राष्ट्रावरील आपत्ति टाळण्या करितां वरील कर्मे करणें हा राजाचा धर्म असल्याचें वरील वचनांत सांगितलें आहे. श्रुतिस्मृत्युक्तधर्मस्थापना हें मराठ्यांच्या स्वराज्याचें ध्येय असल्या कारणानें स्वराज्याची स्थापना झाल्यानंतर वरील वचनास अनुसरून शांतिक व पौष्टिक कर्मे करण्याचा प्रघात स्वाभाविक रीतीनें च महाराष्ट्रांत सुरू झाला. मराठ्यांच्या इतिहासाच्या साधन ग्रंथांत निरनिराळ्या प्रकारची शांतिक व पौष्टिक राजसत्ताधिकाऱ्यांकडून करण्यांत येत असत अशा विषयी बरा च पुरावा उपलब्ध झाला आहे. त्यां पैकीं कांहीं महात्वाचा या मुद्याच्या सिद्धीस्तव आम्हीं येथें नमुद करितों. हा पुरावा नमुद करण्या पूर्वी शांतिक व पौष्टिक कर्मे पार पाडण्याची जबाबदारी अष्टप्रधान संस्थे पैकीं कोणत्या प्रधानावर होती याचें आम्हीं थोडक्यांत दिग्दर्शन करितों. पंडितराव प्रधानपद धारण करणाऱ्या प्रधानानें कोणकोणतीं कामें करावयाचीं याचें दिग्दर्शन चिटणीसकृत जाबत्यांत केलें आहे. जाबत्यांत दिलेल्या तपशीला पेक्षां " भोसल्यांचे कुलाचार " या ग्रंथांत पंडितराव प्रधानानें करावयाच्या कामाचा थोडा अधिक तपशील दिलेला आहे. त्या तपशीलांतील प्रस्तुत मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें खालील कलमें महत्त्वाचीं आहेतः—

१ अनुष्टान करविणें व नित्यदान व नैमित्तिक देणें त्याचें काम तुमचें हातें घेतलें जाईल.

२ कार्यप्रस्थ व नित्यनैमित्तिक व तीर्थ पर्वणीस दान धर्म जो विधि येईल तो पूर्व दिवशीं सरकारास विनंति करून, आज्ञा येईल होईल त्याप्रमाणें त्यांस कळवून, त्यांचे साहित्याची याद लिहून सिद्धता राखावी. आज्ञे प्रमाणें करीत जावें.

३ सरकारचे राशीस ग्रह इष्ट अनिष्ट याची चालना नित्यानित्य ठेवून, ग्रहांचीं दानें घ्यावयाचा विधि करणें तो पूर्व दिवशीं सरकारास श्रुत करून, आज्ञा होईल त्या प्रमाणें कारभारी व देव घराकडील कारकून यास कळवून साहित्याची तयारी कामगार याजकडून करवून, दानें व विधि करणें तो करवीत जाणें. " ( भोसल्यांचे कुलाचार पान २ )

वरील उताऱ्या वरून शांतिक पौष्टिक कर्मे पंडितराव प्रधानांच्या मार्फतीनें व्हावयाचीं असा प्रघात होता. आतां मराठ्यांच्या स्वराज्यांत वरील वचनांस अनुसरून करण्यांत आलेल्या कांहीं कर्मांचीं उदाहरणें आम्ही खालीं देतों.

## शांतिक कर्मे.

इ. स. १७४०–४१ किल्ले माहुलीस सनदा सादर. किल्ले मजकुरीं दसऱ्याचे दिवशीं नवा झेंडा लाविला त्याजवर वीज पडली, खांब उभा चिरला, त्याची शांत करावी लागते ह्मणोन लिहिलें त्यावरून. शनीचा जप एक लक्ष ब्राम्हण भोजन १०० शांतीस दहा पाच रुपये लागतील ते लावणें, येणें प्रमाणें करणार म्हणोन पत्र ( वाड भाग २ बाळाजी बाजीराव भाग २ पा. १९६ ).

इ. स. १७५१–५२ प्रांत कल्याण भिवंडी निसबत राजेश्री सदाशिव चिंमणाजी यास सनद कीं, कल्याण प्रांती भूमीकंप जाहला. त्याचे शांतीस थोर शिष्ट ब्राम्हण मेळऊन शांत करणें म्हणोन सनद ( वाड भाग २ बाळाजी बाजीराव भाग २ पा. २०५ ).

इ. स. १७५३–५४ राजश्री येवजी लोहट हवलदार व कारकून किल्ले विसापूर यास सनद किल्लयावर दुखणेयाची साथी येऊन शें सवाशें माणूस दुखणाईत पडले; पंचवीस माणूस मेले, उपाय केला परंतु गुण येत नाहीं. सर्वांचे मतें अद्भुत शांत करावी येविशीं आज्ञा असावी म्हणोन लिहिलें, तरी अद्भुत शांत करणें कलम १ ( वाड भाग २ बाळाजी बाजीराव भाग २ पान २०५ ).

इ. स. १७७३–७४ नारो माहादेव कमाविसदार क्षेत्र पंढरपुर, दिंमत, परशराम रामचंद्र यांचे नांवे सनद कीं, श्री विठ्ठलदेव वास्तव्य पंढरपुर यांचे अंगावर पालीचा व सरड्याचा स्पर्श जाहला आहे. तेथील ब्राम्हणांचें मतें व स्वामीचे मते देवास महारुद्र करावा, व शांति करावी, सहस्र ब्राम्हण भोजन करावे, त्यास खर्च पाहतां चारशे रुपये लागतील म्हणोन शिवाजी बावाजी यांस लिहिलें त्याणी हुजूर विदित केलें; त्याजवरून हे सनद सादर केली असे, तरी देवास माहारुद्र करणें, व शांति करून सहस्र भोजन करणें, सदरहूचा खर्च मजूरा दिल्हा जाईल म्हणोन मशारनिलहेस सनद १

( वाड भाग ८ सवाई माधवराव भाग २ पा. २५५ )

वरील उताऱ्यावरून कोणत्या हि प्रकारची सार्वजनिक विघ्नें आलीं असतां श्रुतिस्मृत्युक्त धर्मास अनुसरून शांति कर्मे करण्यांत येत असत व तत्प्रीत्यर्थ सरकारांतून खर्च केला जात असे ही बाब सिद्ध होते. धर्मस्थापना हें मराठी राज्याचें ध्येय असल्या कारणानें हा खर्च सरकारी खजीन्यांतून करण्यांत येत असे. शांतिकर्मा प्रमाणें च रुद्र देवता व शनि, सूर्य, चंद्र इत्यादि नवग्रहांचा जप ब्राम्हणाकडून करविण्याचा त्या काळीं प्रघात होता. अशा प्रकारचें उदाहरण वाड भाग २ बाळाजी बाजीराव भाग २ पान १९६ वर आहे. रुद्र, मृत्युंजय, शनि, बृहस्पति, मंगळ, राहू इत्यादिकांचे जपा प्रीत्यर्थ रकम रुपये २८६८१० रामभट कर्वे यांच्या मार्फत खर्च करण्यांत आल्याचा या नोंदींत उल्लेख आहे. याच ग्रंथांतील १९९ पानावर पाली येथील श्री बल्ला-ळेश्वर याच्यावर विद्यार्थ्यानें जिव्हा वाहिली तेव्हां अर्चा शुद्ध करावी असा दृष्टांत झाल्यावरून दोनशें पासून चारशें रुपये अर्चा शुद्ध करण्याकरितां मंजूर करण्यांत आल्याचें नमूद आहे. किल्ले नारायणगडाच्या राशीस दुष्ट ग्रह असल्यामुळें शांती प्रीत्यर्थ दहा पासून पंधरा रुपये खर्च करण्यांत आल्याचें वरील पाना वर नमुद केलेलें आढळतें. युद्धांत यशप्राप्ति झाल्यास त्या बद्दल देवास केलेले नवस फेडण्याकरितां लागणारा खर्च त्या काळीं सरकारांतून करण्यांत येत असे या बद्दलचीं हि कांहीं उदाहरणें आढळतात. इ. स. १७८६–८७ सालांत शिव नेर व चास तालुक्यांत कोळ्यांचा दंगा जाहला होता ते वेळीं त्यांचें पारपत्य होऊन बंदोबस्त जाहला म्हणजे जुन्नर प्रांतातील बारव येथील पंचालिंग महादेवाचे देवालय बांधण्याचा बाळाजी महादेव यानीं नवस केला होता त्या प्रमाणें कोळ्यांचे पारपत्य होऊन बंदोबस्त जाहला तेव्हां श्रीचे देवालय

बांधण्या प्रीत्यर्थ खर्च रुपये २००० दोन हजार सरकारांतून मंजूर करण्यांत आले. ( वाड भाग ८ सवाई माधवराव भाग ३ पान २०२ ). या च प्रकारचें उदाहरण वाड भाग २ बाळाजी बाजीराव भाग २ पा. १०० वर आढळतें. किल्ला कुरग, कोळ्यांचे ताब्यांत होता तो हस्तगत होण्या करितां कांहीं भटजीस अनुष्ठान करण्यास सांगण्यांत आलें होतें. त्या प्रमाणें किल्ला हस्तगत झाल्यावर भटजीस सरकारांतून वर्षासन देण्यांत आलें. रतनगड व त्रिंबक किल्ले हस्तगत होण्या करितां केलेल्या नवसांची फेड केल्या बद्दल वाड भाग २ बाळाजी बाजीराव पेशवे भाग २ पान १०१ वर उल्लेख आढळतात.

## पौष्टिक कर्में

निरनिराळ्या प्रकारच्या अरिष्ट निवारणार्थ वर दर्शविल्या प्रमाणें करण्यांत येणाऱ्या कर्मांचा खर्च जसा सरकारांतून करण्यांत येत असे त्याचप्रमाणें कल्याणाची व सुखाची वृद्धि व्हावी एतदर्थ मराठी राज्यांत यज्ञादि कर्में करणारास सरकारातून द्रव्य सहाय्य करण्यांत येत असे. बाळाजी विश्वनाथ पेशवे यांनी माहुली संगमीं यज्ञ केला त्या प्रसंगीं मौजे काटापूर संमत कोरेगांव येथील दहा बिघे जमीन चावरे आग्नि होत्री यास इनाम दिली होती. ( पेशवे दप्तरांतील सनदापत्रांतील माहिती पान १५१ ). बाळाजी बाजीराव यांच्या कारकीर्दीत यज्ञास सरकारांतून द्रव्य सहाय्य व सामुग्री दिल्याचीं उदाहरणें आढळतात. " इ. स. १७४९-५० सालांत विरेश्वर दीक्षित यांनीं केलेल्या यज्ञा प्रीत्यर्थ चार सहस्र ब्राह्मणांचें साहित्य सामोग्री पुर्णाच्या पोळ्यांचे देण्यात आले. त्याचप्रमाणें यज्ञाचीं कुंडें व मंडप हीं सरकारी खर्चानें करून देण्यांत आली. ( वाड भाग २ बाळाजी बाजीराव भाग २ पा. २०२ ). इ. स. १७६५-६६ सालांत वेदमूर्ती शंकरभट सूरकर लोकाक्षी यांनीं गंगातीरीं सावखेडें येथें यज्ञ केला, ते वेळीं खालील सामान भटजीस देण्यांत आलें:-नक्त रुपये ६०० साहाशे गाई सवत्स खरेदी करण्याकरिता गाई ७ सर, २ वृषभ, ५ पशु, यज्ञास, सामोग्री मध्यम, शाक भाजी सुद्धा दोन हजार असामींची देणे. या शिवाय यज्ञाचे मंडपसाहित्य, पानपत्रावळ, लांकूड फाटे, व वैरण व कुंभार काम, सुतार काम व बुरुडकाम, दर्भ समिधा व गवंडी काम व बिगारी वगैरे किरकोळ उपसाहित्य तुम्ही खासा जाऊन

करणें अगर शाहाणा कारकून पाठवून यज्ञास कोणे गोष्टीनें कमी न होय तीं गोष्ट करणे. या खेरीज सोमवेलीचे गाडे दोन देणे, अशा प्रकारचा हुकुम नारो बाबाजी नेवासे परगण्याचे अधिकारी यांस देण्यांत आला होता " ( वाड भाग २ बाळाजी बाजारीब पेशवे भाग २ पान २०७ ). प्रस्तुत मुद्याच्या सिद्धीस्तव नमुन्यादाखल वरील प्रकारचीं कांहीं उदाहरणें आम्हीं दिलीं आहेत. अशा प्रकारचीं दुसरीं कित्येक उदाहरणें त्या काळच्या उपलब्ध झालेल्या कागदपत्रांत आढळून येतात परंतु तीं सर्व येथें देऊन पाल्हाळ करण्याचें कारण नाहीं. शांतिक व पौष्टिककर्मा संबंधीं खर्च सरकारी खाजिन्यांतून करणें हा मराठी राज्याचा च विशेष होता असा बरीक कोणी समज करून घेतल्यास तो चुकीचा होईल. मुसलमान लोकांचा भरतखंडांत प्रवेश होऊन त्यांची राजसत्ता स्थापित होण्या पूर्वीं श्रुतिस्मृत्युक्तधर्मानुयायी लहान मोठे राजे भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रांतांत जे होऊन गेले त्यांचे काळीं देखील वरील कर्मा प्रीत्यर्थ मराठी राज्यांत जितकें द्रव्य खर्च करण्यांत येत असे त्या पेक्षां किती तरी पटीनें अधिक द्रव्य त्या काळाचे राजे खर्च करीत असत. मध्ययुगीन भारत भाग पहिला पान १५२ वर रा. वैद्य यांनीं या विषयींचे केलेलें खालील वर्णन या मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें असल्या कारणानें तें आम्ही येथें देतो:—

" या देवांच्या पूजेबरोबर च जुनी वैदिक अग्निपूजा हि कोठें कोठें होत असे. ब्राह्मण लोक साधारणतः अग्निहोत्र पाळीत आणि क्षत्रिय तर कांहीं मोठे श्रौत यज्ञ करीत. अनेक ठिकाणच्या राजांनीं अश्वमेध केल्याचें प्राचीन लेखा वरून दिसून येतें. या कारणास्तव अश्वमेधाचा कलियुगांतील निषेध हर्षाच्या काळा नंतर प्रचारांत आला असें ह्मणणें गैर होणार नाही.........तात्पर्य असे कांहीं मोठे यज्ञ हि त्या काळीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य राजा कडून होत असत. "

वरील उताऱ्या वरून श्रुतिस्मृत्युक्तधर्मास अनुसरून यज्ञादि कर्मे करण्याचा प्रघात फार पुरातन काळा पासून भरत खंडांत सुरू होता, व धर्मस्थापनेच्या दृष्टीनें या पुरातन प्रघाताचा मराठी राज्यांत हि राजसत्ताधिकाऱ्यांनीं अंगिकार केला असें दिसून येतें. आतां मराठ्यांच्या राज्यपद्धतीच्या सर्व साधारण धोरणां पैकीं त्यांची युद्धपद्धति ही एक महत्वाची बाब आहे. श्रुतिस्मृत्युक्तधर्मास अनुसरून आचरण करणारे भरतखंडांतील पुरातन राजे शत्रू बरोबर युद्ध स्मृत्यादि ग्रंथांत व नीतिग्रंथांत वर्णिलेल्या अनेक युद्धपद्धतीं पैकीं एका विशिष्ट पद्धतीनें

करीत असत. मराठ्यांनीं स्थापन केलेलें स्वराज्य हें त्यांच्या विशिष्ट प्रकारच्या युद्ध पद्धतीचें च फळ होतें असें म्हटलें तरी चालेल. या कारणास्तव आम्ही आतां या युद्धपद्धतीच्या चर्चेकडे वळतों:—

युद्धपद्धति:—आतां पावेतों आम्हीं ज्या बाबींची चर्चा केली आहे त्या सर्व बाबी श्रुतिस्मृत्युक्तधर्मा पैकीं महत्वाच्या असून स्वराज्यस्थापना करण्यांत महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांचें प्रमुख ध्येय त्या धर्माची स्थापना करणें हें च असलें पाहिजे, अशा प्रकारच्या अनुमाना शिवाय दुसरें कोणतें हि अनुमान या चर्चे वरून निघणें शक्य नाहीं याचें आम्ही दिग्दर्शन केलें आहे. मागें नमूद केलेल्या बाबीं पेक्षां हि अत्यंत महत्वाच्या अशा एका बाबीच्या चर्चे कडे आतां आम्हीं वळतों. ही बाब म्हटली म्हणजे मराठ्याची युद्धपद्धति ही होय. शिवदिग्विजय बखरीच्या १८२ व्या पाना वरील एक उतारा मागील १०१ व्या पानावर आह्मी दिला आहे. त्या उताऱ्यांत ' वृकयुद्ध किंवा चित्याचे युद्ध माहाराष्ट्रधर्मी युक्त योजना केली ' असं नमूद केलेलें आढळतें. युद्धपद्धतीचा आणि महाराष्ट्र धर्माचा बादरायण संबंध काय ? अशी शंका वरील वाक्य वाचणारांच्या मनांत साहाजिक रीतीने उत्पन्न होण्याचा संभव आहे. यास्तव या प्रश्नाची चर्चा करून युद्धपद्धतीचा आणि महाराष्ट्रधर्माचा संबंध कशा प्रकारचा आहे याचें या ठिकाणीं विवेचन करणें जरूर आहे. मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतींत राजधर्म प्रकरणी युद्ध करणें हा राजाचा एक धर्म सांगितला असून राजानें कोण कोणत्या युद्धपद्धतीचे अवलंबन करावें व युद्धाच्या प्रसंगीं शत्रुप्रदेशांत कोणकोणतीं कृत्यें करावीं यांचें स्थूल दिग्दर्शन केलें आहे. राजधर्म हें श्रुतिस्मृतीप्रणीतधर्माचें एक महत्वाचें अंग असल्या कारणानें त्या संबंधीं नियम स्मृतिग्रंथांत ग्रथित करण्यांत आले आहेत हें युक्त च आहे. वरील दोन स्मृतीं पैकीं मनुस्मृतींतील विवेचन अधिक विस्तृत व पद्धतशीर आहे. मनुस्मृती पेक्षा हि महाभारतांतील युद्धपद्धती विषयींची चर्चा अधिक विस्तृत आहे. शिवाजी महाराजांनीं स्थापिलेलें स्वराज्य हें मुख्यत्वें करून त्याचे प्रतिस्पर्धी विजापूर व दिल्ली येथील बादशाहाच्या बरोबर त्यांनीं केलेल्या युद्धकर्माचें फल होय. कार्यकारण भावाच्या भाषेंत बोलावयाचें ह्मणजे मराठ्याचें स्वराय हें कार्य आणि त्यांची युद्धपद्धति हें त्याचें कारण होय. या दृष्टीने विचार केला असतां मराठ्यांची युद्धपद्धति ही

एक अत्यंत महत्वाची बाब होऊन बसते व या युद्धपद्धतींत कोणत्या प्रकारचा विशेष दृष्टोत्पत्तीस येतो व महाराष्ट्र धर्मांत या युद्धपद्धतीचा अंतर्भाव कसा होतो इत्यादि मुद्यांची चर्चा करणें प्राप्त आहे. ह्या मुद्यांचा योग्य प्रकारें उलगडा होण्या करितां ज्या काळीं व ज्या विशिष्ट परिस्थितींत शिवाजी महाराजांनीं स्वराज्य-स्थापनेचा उपक्रम केला ती विशिष्ट परिस्थिति कोणत्या प्रकारची होती याचें प्रथम दिग्दर्शन करणें जरूर आहे. ज्या शत्रू बरोबर झगडा करून शिवाजी महाराजांना स्वराज्य स्थापावयाचें होतें त्या शत्रूचें ह्मणजे विजापूर व दिल्ली येथील बादशाहांचें सैन्यबल व युद्धसामुग्री अमुप असून या बाबतींत शिवाजी महाराजाना त्यांच्या पासंगास हि लागणें शक्य नव्हतें. अशा प्रकारच्या परिस्थितींत ह्मणजे अल्प सैन्यबल व अल्प युद्धोपयोगी सामुग्री यांच्या आधारावर दोन प्रबल शत्रूंशीं टक्कर देऊन शिवाजी महाराजांना स्वराज्य निर्माण करावयाचे होतें. वरील परिस्थितींत शिवाजी महाराजांना हितकर असा एक मार्ग ह्मटला ह्मणजे दिल्लीचे मोगल बादशहा व विजापूरचे बादशहा यांच्या मध्यें एकी होऊं न देतां कायमचे द्वैत राहील अशी योजना करणे हा होता. दिल्लीकडील मोगल बादशाही सत्ता त्या काळी इतकी प्रबळ झाली होती कीं, त्या बादशाही सत्तेचीं सूत्रें धारण करणाऱ्या औरंगजेब सारख्या महत्त्वाकांक्षा बादशहाचें ध्येय दक्षिणे कडील मुसलमानी राज्यें नष्ट करून भरतखंडाच्या उत्तरे कडील हिमालय पर्वताच्या पायथ्या पासून तों दक्षिणे कडील रामेश्वराच्या टोंका पर्यंत मोंगल बादशाहाची सत्ता स्थापन करावी असें बनले होतें. या औरगजेबच्या ध्येयाच्या योगानें दक्षिणेकडील मुसलमानी राज्या संबंधीं शिवाजी महाराजांस वर दर्शविल्या प्रमाणें जी गोष्ट इष्ट व पथ्यकर होती ती अनायासें च अस्तित्वांत आली होती. औरंगजेबनें त्याच्या कारकीर्दीत वरील धोरणाच्या सिध्यर्थ दक्षिणेंतील मुसलमानी राज्या बरोबर सतत शत्रुत्व करून त्यांचा पाडाव करण्याचे प्रयत्न कसून चालविले होते. शिवाजी महाराजांना स्मृति व नीतिग्रंथ यात या पुढे वर्णिलेल्या कूटयुध्दांत अंतर्भूत होणाऱ्या भेदनीतीच्या अवलंबनानें जें कार्य घडवून आणणें इष्ट व जरूरीचें होतें तें कार्य अनायासेंच औरगजेबच्या वरील राजकीय धोरणामुळें घडून येत होतें. वरील दोन बादशाही सत्तेमध्यें वर दर्शविलेल्या कारणामुळें जें शत्रुत्व अस्तित्वांत होते त्याचा फायदा शिवाजी महाराजांनीं पूर्णपणें घेण्यास कमी केलें नाहीं. स्वराज्यस्थापनेचें जें महत्कार्य त्यांनीं हातीं घेतलें होतें त्या कार्याच्या

सिध्द्यर्थ प्रसंगानुसार ज्याची बाजू घेणें त्यांना हितप्रद वाटे त्याप्रमाणें ते कधीं मोंगलाची तर कधीं विजापुरकरांची बाजू घेत असत. शिवाजी महाराजांच्या वरील दोन प्रमुख व प्रबल शत्रूमध्यें जरी आपसांत वैर होतें व त्यांच्या विरुद्ध ते दोघे शत्रू एक होण्याचा जरी संभव नव्हता तथापि वरील दोन्हीं शत्रूंपैकीं व्यक्तिशः एक एक शत्रु देखील स्वतंत्रपणें शिवाजी महाराजांस भारी होता. दिल्लीचा मोगल बादशहा काय किंवा विजापुरचा बादशहा काय यांच्यापाशीं शिवाजी महाराजांच्या सैन्या पेक्षां किती तरी पटीनें अधिक सैन्य होतें. त्या च प्रमाणें शस्त्रास्त्रें, खजीना व इतर युद्धोपयोगी सामुग्री इत्यादि बाबतींत हि शिवाजी महाराजांच्यानें त्यांची बरोबरी करणें शक्य नव्हते. अशा स्थितींत अल्प सैन्यबल व अल्प युद्धोपयोगी सामुग्री यांच्या आधारा वर विपुल सैन्यबल व विपुल युद्धसामुग्री यांनीं युक्त असलेल्या शत्रू-बरोबर टक्कर देऊन त्यांत यशप्राप्ति कशी मिळवावयाची हा शिवाजी महाराजांपुढें प्रश्न होता; व हा प्रश्न शिवाजी महाराजांनीं मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतिग्रंथांत व शुक्रादि नीतिग्रंथांत वर्णिलेल्या कूटयुद्धपद्धतीचा अंगीकार करून सोडविला असे या पुढें आह्मीं जें विवेचन करणार आहों त्या वरून वाचकांच्या निदर्शनास येईल. वर दर्शविलेल्या परिस्थितींत शिवाजी महाराजांनीं ज्या युद्धपद्धतीचा स्वीकार केला त्या युद्धपद्धतीचें उत्तम दिग्दर्शन शिवदिग्विजय बखरींत केलें आहे. ते फार मार्मिक व महत्वाचें आहे व या च कारणामुळें त्या वर्णना पैकीं कांहीं महत्वाचा भाग आह्मी खालीं देऊन नंतर त्या वर्णनांतील युद्धपद्धतीचे स्मृति व नीति शास्त्रांत वर्णिलेल्या युद्धपद्धतीशीं कितपत साम्य आहे याचें आह्मीं दिग्दर्शन करण्याचे ठरविलें आहे.

"व्यूहरचना प्रकार आहे, त्या अर्थी हे पक्षियुद्ध लक्षात असावें. बैल, महिष, गज, काळवीट या जनावरांच्या युद्धाची चाल एकच आहे. संमुख युद्ध घ्यावें. बलाबल पडेल तसें याशापयश प्राप्त व्हावें. या अन्वयें मानवी दुंतर्फी सैन्य उभें राहून लढाया होतच आहेत. व्याघ्र, वृक, चित्ते यांची लढाई, गजाशी म्हैपवत्–विपरीत युद्धाचे ठायीं परस्पर जीवरक्षण भावना सर्वांठायीं आहेच; परंतु व्याघ्र सबळ; गज निर्बळ, असे असोन लढाई होती. कोण्हे समयीं प्राणरक्षण होतें, कोण्हे समयीं नाश होतो. त्यांत सर्व जीव जितके त्याहून, ज्ञानवान् मनुष्य देहीं सर्वोत्कृष्ट जे असेल, तेंच ध्यानांत धरून युद्ध करीत असावे. अल्प सैन्यानीं मोठे सैन्याशीं स्पर्धा

वाढविली, तरी त्याचे युक्ती कश्या लढाई करण्याच्या म्हणून विचारिल्या, त्यावरून पंचोपाख्याने ग्रंथीं हा विषय लिहिला आहे, तो मनन केला असतां ध्यानांत येईल; परंतु किंचितार्थ सुचवितों. लहानानीं थोराशीं स्पर्धा मुळींच करूं नये. केली असतां जसे कोल्ह्यास गज, वृषभ, मृग, उन्मत्त जनावरें यांचें मांस खाण्याची इछा झाली, ती त्याणें कोणतें साहसें साधली, दुसरीयास तिलःप्राय अंश दिल्हा नाहीं; तेव्हां कोल्ह्यास अशी मोठीं जनावरें मारण्याचें सामर्थ्य काय ? समजत आहे. दुसरियाचे हातें मारून आपण त्या विषयास मालक जाला. मारणारासहि विभाग न दिल्हा. या विचारें आधीं मनुष्य अनुकूल करून घ्यावें; त्याचे हातून यजमानांत कलह आपसांत लावून, कटाक्ष पाडावा. मग आपली प्रौढी उभयतांवर दाखवून, आपणच ऐश्वर्य संपादावें......दुसरी कथा वृकयुद्ध ह्मणजे पांच चार फौजेच्या टोळ्या कराव्या. त्या शत्रूस समजों न देतां संकेतानीं चालावें.एकानी तोंड लावावें. तों परसैन्य त्या अल्प सैन्यावर ‘ घे घे मार ’ करीत उठतें. त्या लोकांनीं पळ काढावा, म्हणजे मोडले सैन्य जाणून, पाठी लागणारास मोठे फौजेचा पळ निघाला, हें सर्वांस वाटून, सामान्य टोळ्यांनी, चहूकडून घालावी, तेव्हां ते पाठलाग करितां पळत्याचा प्रकार होतो. अल्प सैन्य मोठे सैन्यास मारते होऊन मोठे सैन्यास किती फौज आहे, तिची गणती न सांपडतां, हतविर्य होते. तेणें करून फत्तेह वृकयुद्धीं जाणावी. ”

“ चित्ते याचें युध्द शिकारीस जावें; तरी बाणाचे गोष्टीचे टप्पावरी, जनावर पाहून, चित्ता सोडावा. त्याचा स्वभाव जनावरास कळूं न देतां, लपत छपत जावें. लोळत लोळत हरयत्नें जवळ गांठ घालावी. उडी मारितांच जनावर साध्य होईल असें पाहून उडी मारावी. उडी मारतांच सांपडल्यास मोठा आनंद होऊन रक्षक मनुष्याशी लालित्य ठेवावें. ती उडी जातांच जनावर सावध होऊन उडी निर्फळ झाली तरी आंतीं लज्जित व्हावें. ते दरवेशी रक्षक, त्यांजला शिपाईपणाची उमेदवार भाषणें बोलोन, शूरत्व आणोन हुशार करता आहेत; तशींच नरयुध्दी शत्रूस, मुक्काम फौजेचा चालत कोठें आहे तें वर्तमान न समजतां, वीस, पंचवीस, पन्नास कोशांवरून रात-बेरात करून छापा देऊन दुसरियाची फौज लुटून, व्याघ्री चालता आघाडी पिछाडी मारावी हीं चित्याची युध्दें समजावी ......अशीं अनेक प्रकारचीं युध्दें; परंतु धर्मयुद्धाची चाल त्यामुळें व्यूह राहून मार्गानीं जातां, जो

शूरत्व धरून युद्ध करील, त्याचा पराभव करावा. मग पुढें आपलें धैर्य पोहचून, लढाई करवेल तेथ पर्यंत करून पुन्हां स्वसैन्यांत प्रवेश करीत. हल्लीं कलियुग धर्म. धर्मप्रवृत्तीचा लोप होऊन, तेव्हां प्रथम विचारें 'शत्रु उच्छेद करणें. त्या प्रसंगांत हत म्हणजे नष्ट झाला. तरी, वृकयुद्ध किंवा चित्याचें युद्ध, महाराष्ट्रधर्मीं युक्त योजना केली.''

वरील उद्गार शिवाजी महाराजांचे असल्याचें बखरकारानें नमूद केलें आहे. वृकयुद्धपद्धति व चित्याची युद्धपद्धति याचें बखरकाराने वरील उताऱ्यांत थोडक्यांत उत्तम प्रकारचे वर्णन केलें आहे. त्याच प्रमाणें धर्मयुद्धपद्धतीचा अंगीकार न करितां वृकयुद्धपद्धतीचा अथवा चित्त्याच्यायुद्धपद्धतीचा स्वीकार हल्लीं कलियुग असल्यामुळें करावयाचा हें कारण बखरकारानें दर्शविलें आहे. पृथ्वीराज चव्हाण आणि महंमद घोरी याच्यामध्यें झालेल्या युद्धाचीं वर्णनें जीं इतिहासांत दिलीं आहेत त्यावरून मुसलमानांशी धर्मयुद्धपद्धतीस अनुसरून युद्ध करण्यांत त्याची केवढी हानि झाली हे दिसून येतें. सच्चा क्षत्रिय या नात्यानें पृथ्वीराज चव्हाणाने महंमद घोरी याच्यापाशीं वर्तन केले व त्याचा पराभव होऊन तो पृथ्वीराजाच्या हातात सांपडला असतां त्यानें त्यांस जिवदान देऊन सोडून दिले. परंतु महंमद घोरीने सर्पासारखें वर्तन करून त्याचा जीवदाता जो पृथ्वीराज चव्हाण यास वरील युद्धानंतर झालेल्या युद्धांत रसातळास पोंहच-विण्यास कमी केलें नाहीं. पृथ्वीराज चव्हाणा नंतर उत्तर हिंदुस्थानांतील रजपूत व मोंगल बादशाहा यांचीं परस्परांशीं अनेक युद्धें झालीं. मुसलमान लोकां पैक्षां शौर्यांत रजपूत लोक यत्किंचित् हि कमी नव्हते. रजपूत आणि मुसलमान यांच्या मध्यें झालेल्या युद्धांत रजपूत लोकांनीं शत्रूस पाठ दाखवून समरभूमींतून पळ काढला अशीं उदाहरणें इतिहासांत क्वचित च आढळतात. रजपुतांच्या ठिकाणीं अशा प्रकारचें शौर्य असून हि युद्धांत मुसलमानां पुढें त्यांना का हार खावी लागत असे याचा जर बारकाईनें विचार केला तर महाभारत व स्मृति ग्रंथ यांत सांगितलेल्या धर्मयुध्द-पद्धतीस अनुसरून त्यांनीं मुसलमानां बरोबर युद्धें केलीं हें त्यांच्या पराजयाचे कारण असल्याचें दिसून येईल रजपुत लोकांनीं मुसलमानांचा स्वभाव ओळखून स्मृत्यादि ग्रंथांत सांगितलेल्या अनेक युद्धपध्दतीं पैकीं त्यांच्या विरुध्द झगडण्यास कोणती युध्दपध्दति यशस्वी होईल याचा विचार करून त्या पध्दतीचा स्वीकार त्यांनीं केल्याचे इतिहासा वरून दिसून येत

नाहीं. राजाराम छत्रपतींच्या कारकीर्दीत धनाजी जाधव आणि संताजी घोरपडे यांनीं चंदी चंदावरच्या बाजूस मुसलमानी सैन्या बरोबर केलेल्या युद्धांत जे चमत्कार दाखविले तशा नमुन्याचें युद्ध उत्तर हिंदुस्थानांतील कोणत्या हि रजपूत राजानें दिल्लीच्या मोंगल अगर मुसलमान बादशाहा बरोबर केल्याचें इतिहासांत क्वचित च दृष्टोत्पत्तीस येतें. रजपूतांच्या ज्या लढाया मुसलमानां बरोबर झाल्या त्या सर्व लढाया शत्रू समोर छातीठोक उभे राहून शिवदिग्विजय बखरींतील वर जो उतारा आह्मीं दिला आहे त्या उताऱ्याच्या सुरवातीस वर्णिलेल्या बैल, महिष इत्यादि जनावरां मधील युद्धाच्या स्वरूपाच्या झाल्या आहेत. धर्मयुद्धपद्धतीनें मोंगलादि मुसलमान लोकां बरोबर लढणाऱ्या उत्तरे कडील रजपूतांचा इतिहास शिवाजी महाराजांस पूर्णपणें अवगत असल्या कारणानें व त्या युद्धाचे परिणाम मुसलमानां बरोबर लढणाऱ्या लोकां वर कोणत्या प्रकारचे होतात याची व स्वतःच्या अल्प बलाची त्यांना पूर्ण जाणीव असल्या कारणानें त्यांनीं धर्मयुद्धपद्धतीचा त्याग करून स्मृति व नीति ग्रंथांत सांगितलेली वरील वृक व चित्त्याची युद्धपद्धति महाराष्ट्र देशाच्या त्या काळच्या विशिष्ट परिस्थितींत महाराष्ट्रीयांनीं आचरण करावयाच्या धर्मास उक्त असल्याचें ठरवून त्या पद्धतीस अनुसरून मुसलमानां बरोबर युद्धें केलीं; व जी गोष्ट रजपूतांना त्यांच्या ठिकाणीं अद्वितीय शौर्य असून हि तीन चार शतकें साध्य करतां आली नाहीं ती त्यांनीं त्यांच्या एकट्याच्या त्रेपन्न वर्षांच्या हयातींत साध्य करून दाखविली. रजपूत लोक मुसलमानांशीं तीन चारशें वर्षें झगडत असतां त्यांना दुष्प्राप्य झालेले स्वातंत्र्य व स्वराज्य शिवाजी महाराजांनीं आपल्या हयातींत वरील युद्ध पद्धतीचा आश्रय करून साध्य केलें. आतां महाभारत, स्मृति व नीति ग्रंथां मध्यें आढळण्यांत येणारी धर्मयुद्धपद्धति व तिच्या विरुद्ध असलेली कूट अथवा कपट युद्ध पद्धति या विषयींचे उल्लेख शिवदिग्विजयांतील वर्णनाशीं कितपत जुळतात याचें आम्ही थोडक्यांत दिग्दर्शन करितो. महाभारत काळाच्या युद्धांचीं वर्णनें अनेक ठिकाणीं त्या ग्रंथांत आलीं आहेत. युद्धास तोंड लागून सुरवात झाल्यावर रथात बसलेल्या योध्यांचे रथांतील योध्यां बरोबर, गजा वर बसलेल्या योध्यांचें गजांवर बसलेल्या योध्यां बरोबर, पाईकांचें पाईकां बरोबर, गदा धारण करणारांचे गदा धारण करणाऱ्यां बरोबर युद्ध सुरू होत असे. उभय दळांतील नामांकित योध्यांची समरभूमी वर ठिकठिकाणीं द्वंद्वयुद्धें

जुंपून सैन्यांतील आसपासचे लढवय्ये लोक हीं युद्धें पहात उभे राहात असत. ह्या पद्धतीनें चालू असलेल्या द्वंद्वयुद्धांत प्रत्यक्ष युद्ध करणाऱ्या योध्याच्या मदतीस दुसऱ्या योध्यानें जाणें हें धर्मयुद्धाच्या नियमा विरुद्ध समजलें जात असे. शिवदिग्विजय बखरींतील जो उतारा आह्मीं वर दिला आहे त्या उताऱ्यांत दर्शविल्या प्रमाणें महाभारत कालीं द्वंद्वयुद्धयुक्त लढाया होत असत. सैन्याच्या निरनिराळ्या प्रकारच्या व्यूहरचनांचा उल्लेख महाभारतांत आलेला आहे. त्यावरून एकदां केलेली सैन्य रचना बदलून लढाई चालू असतां निराळ्या प्रकारची सैन्य रचना करण्यांत येत असल्याचें क्वचितच दिसून येतें. परस्परांशीं युद्ध करणारीं दोन दळें समोरासमोर उभीं राहून उभयतां पैकीं कोणाचा तरी मोक्ष मोक्ष व्हावयाचा अशा पद्धतीनें त्या काळच्या लढाया होत. या युद्धाच्या पद्धतींत योध्यानें खालीं दर्शविलेल्या स्वरूपाचे कांहीं नियम पाळावयाचे असें ठरलें होतें व या नियमास अनुसरून करण्यांत आलेल्या युद्धास धर्मयुद्ध असें ह्मणण्याचा त्या काळीं प्रघात पडला होता. भीष्म पर्वांतील भीष्मांच्या खालील उद्गारांवरून धर्मयुद्धाच्या नियमांची कल्पना वाचकांस करतां येण्या सारखी आहे. भीष्म ह्मणतात:—"ज्या माणसानें आपलें शस्त्र खालीं ठेविलें आहे, जो भूमीवर पडला आहे, ज्यानें धारण केलेलें कवच काढून ठेवलें आहे, जो युद्धांतून पलायन करीत आहे, जो शरण आला आहे, ज्याचा पुत्र युद्धांत मारला गेल्यामुळे जो शोकाकुल झाला आहे आणि जो क्षुद्र आहे त्याच्यावर मी कधीं हि शस्त्र उपसणार नाहीं." या भीष्मांच्या उद्गारांत नमुद केलेल्या माणसा खेरीज झोंपी गेलेल्या, तह्यानेनें व्याकुळ झालेल्या, थकलेल्या, पळत सुटलेल्या, सैनिकांवर, त्या च प्रमाणें अंगावरचें कवच काढण्यांत गुंतलेल्या, युद्धास जाण्याच्या तयारींत असलेल्या, पाणी पिण्यांत अगर खाण्यांत गुंतलेल्या माणसांवर शस्त्र धरूं नये असें हि महाभारतांत सांगितलें आहे. या नियमांस अनुसरून युध्द करण्याचा प्रघात शिकंदराची भरतखंडावर स्वारी झाली त्या काळपावेतों हि चालू होता. शिकंदराच्या काळच्या ग्रीक इतिहासकारांनीं भरतखंडांतील वरील धर्मयुद्धाच्या नियमा बद्दल कौतुक व्यक्त केलें असून लढाई सुरू असतांना देशांतील शेतकरी आपापले व्यवसाय उत्तम प्रकारें चालवितात व त्यांस परस्परांशीं युद्ध करणाऱ्या लोकांकडून कोणत्या हि प्रकारचा त्रास पोहचत नाहीं असें नमूद करून ठेविलें आहे. आतां दर्शविलेली धर्मयुद्धपद्धति शिष्ट क्षत्रियास उचित अस-

काळीं खालीं दर्शविलेल्या स्वरूपाची ही युद्धपद्धति अस्तित्वांत असल्याचें महाभारता वरून दिसून येतें. शांतिपर्वाच्या एकोणसत्तराव्या अध्यायांत युद्धांत पराभूत झालेल्या राजानें कोणत्या युद्धपद्धतीचा आश्रय करावा या बद्दलचें वर्णन खालील प्रमाणें केलें आहे :—

" राजानें स्वतःच्या शत्रूंच्या द्रव्यादिकांचा अपहार करावा व जर त्याच्या देशामध्यें प्रवेश करतां आला नाहीं तर दावाग्नीनें तो प्रदेश दग्ध करून सोडावा; शेतांतील धान्यें हि जाळून टाकावीं, शत्रूच्या लोकांमध्यें फाटाफूट करून त्यांजकडून अथवा आपल्या च सैन्याकडून सर्वांचा नाश करवावा. नदीवरून गमन करण्याचे जे पूल वगैरे मार्ग असतील ते मोडून टाकावे; तलावादिकांतील सर्व जल फोडून देऊन नाहींसें करावें व फोडून देतां येत नसेल तें विषादिकांच्या योगानें दुषित करावें. " धर्मयुद्धपद्धतीच्या अगदीं उलट अशा प्रकारची ही युद्धपद्धति महाभारतकालीं अस्तित्वांत होती. आतां मनुस्मृतींत यूद्धपद्धती संबंधीं कोणत्या प्रकारचे उल्लेख आले आहेत याचें आह्मी दिग्दर्शन करितों. मनुस्मृतीच्या सातव्या अध्यायाच्या राजधर्म प्रकरणांत धर्मयुद्धपद्धतीचें वर्णन खालील प्रमाणें केलें असून त्या धर्मयुद्धा पासून क्षत्रियानें च्यूत होऊं नये असें सांगितलें आहे.

न कूटैरायुधैर्हन्या द्युध्यमाने रणे रिपून् ।
न कर्णिभिर्नापि दिग्धैर्नाग्निज्वलिततेजनैः ॥ ९० ॥
न च हन्यात्स्थलारूढं न क्लीबं न कृताञ्जालिम् ।
न मुक्तकेशं नासीनं न तवास्मीति वादिनम् ॥ ९१ ॥
न सुप्त न विसन्नाहं न नग्नं न निरायुधम् ।
नायुध्यमानं पश्यन्तं न परेण समागतम् ॥ ९२ ॥
नायुधव्यसनप्राप्तं नार्तनातिपरिक्षतम् ।
न भीतं न परावृत्तं सतां धर्ममनुस्मरन् ॥ ९३ ॥

अर्थः—" बाहेरच्या बाजूस केवळ काष्ठ दिसत असून त्याच्या आंत तीक्ष्ण शस्त्र असणें इत्यादि कूट आयुधांनीं रणांगणांत लढणाऱ्या क्षत्रियानें शत्रूंस मारूं नये. आग्रभागीं ज्यास कर्णाचा आकार आहे अशा, ज्यास विषाचा लेप दिला आहे अशा, ज्यांचीं अग्रें अग्नीनें दीप्त ( तापवून लाल केलेलीं आहेत ) अशा बाणांनीं शत्रूस मारूं नये. आपण स्वतः रथांत बसून भूमीवर असलेल्या योध्यास मारूं नये. नपूंसक, ज्यानें हात जोडलेले आहेत, ज्यानें आपले केंस मोकळे सोडले आहेत, जो खालीं बसला आहे व मी तुझा आहे

असें जो ह्मणत आहे त्यांस कधीं हि मारूं नये. जो निजला आहे, ज्यानें आपल्या अंगा वरील कवचादि काढून ठेविलें आहे, ज्याचें वस्त्र सुटलें आहे, ज्याच्या हातांत आयुध नाहीं, जो युद्ध करीत नसून केवळ चमत्कार पहात आहे व जो दुसऱ्याशीं युद्ध करण्यांत निमग्न झाला आहे अशा पुरुषांस मारूं नये. ज्याच्या हातांतील खड्गादि आयुध तुटलें आहे, जो पुत्रशोकादिकानें आर्त झाला आहे, जो अनेक प्रहारांनीं व्याकुल झाला आहे, जो भ्याला आहे व जो युद्धा पासून पराङ्मुख झाला आहे, अशा पुरुषांस शिष्ट क्षत्रियाच्या धर्मास स्मरणाऱ्या क्षत्रियाने मारूं नये."

महाभारतांतील धर्मयुद्धपद्धतीचें जें वर्णन आह्मीं वर दिलें आहे त्या वर्णनाशीं मनु स्मृतींतील वरील वर्णन तंतोतंत जुळत आहे. महाभारतांत धर्मयुद्धाच्या विरुद्ध अशी जी कूट युद्धपद्धति तिचें वर्णन मनुस्मृतीच्या वरील अध्यायांत केलें आहे, त्या पैकीं कांहीं महत्वाचीं वचनें आह्मीं खालीं देतों.

**मन्येतारिं यदा राजा सर्वथा बलवत्तरम् ।**
**तदा द्विधा बलं कृत्वा साधयेत्कार्यमात्मनः ॥ १७२ ॥**

अर्थः—"जेव्हां राजास आपला शत्रु सर्व प्रकारें अतिशय बलाढ्य आहे असें वाटेल तेव्हां त्यानें थोडेसें सैन्य आपल्या बरोबर घेऊन स्वतः दुर्गांत जाऊन रहावें व बाकीच्या सैन्याच्या द्वारा शत्रूशीं लढत रहावें. या प्रमाणें सैन्याचे दोन भाग करून आपलें कार्य साधावें."

कूट युद्धपद्धतीस अनुसरून चालविलेल्या युद्धांत शत्रूच्या प्रदेशांत कोणकोणत्या गोष्टी कराव्या या बद्दल खालील वचनें मनुस्मृतींत आढळतातः—

**उपरुध्यारिमासीत राष्ट्रं चास्योपपीडयेत् ।**
**दूषयेच्चास्य सततं यवसान्नोदकेन्धनम् ॥ ९५ ॥**
**भिन्द्याच्चैव तडागानि प्राकारपरिखास्तथा ।**
**समवस्कन्दयेच्चैनं रात्रौ वित्रासयेत्तथा ॥ ९६ ॥**

अर्थः—"शत्रु दुर्गाचा आश्रय करून राहिलेला असो, कीं त्याच्या बाहेर असो, व तो युद्ध करीत जरी नसला तरी त्यास वेढा देऊन बसावें. त्याच्या देशाचा विध्वंस करावा. त्या च प्रमाणें त्याचें गवत, अन्न व जल यांत वाईट पदार्थ मिळवून त्याची नासाडी करावी. शत्रूची ज्याच्यावर उपजीविका होत असेल अशा तडागादि जलाशयांचा नाश करावा. किल्ल्यांच्या भिंती फोडाव्या, त्यांच्या सभोंवार असलेला खंदक फोडून व त्यांत माती

दगड इत्यादि पदार्थ टाकून कोरडा करून सोडावा. आणि या प्रमाणें त्यास निःशंकपणें शक्तिशून्य करण्याचा प्रयत्न करावा. रात्रीं नगारे, नौबती इत्यादि वाजवून त्यास भयभीत करावें."

मनुस्मृतींतील वरील वचनां वरून धर्मयुद्धपद्धति अस्तित्वांत असतां तिच्या विरुद्ध असलेली कूटयुद्धपद्धीत अस्तित्वांत असल्याचें दिसून येतें. अशा स्थितींत फार पुरातन काळा पासून दोन्ही प्रकारच्या युद्धपद्धति भरतखंडांत अस्तित्वांत होत्या असें दिसून येतें. मात्र मनुस्मृतींतील वचनां वरून धर्मयुद्धपद्धतीस अनुसरून युद्ध करणें हा शिष्ट क्षत्रियांचा धर्म समजत असें दिसून येतें.

आतां शुक्रनीतींतील युद्धपद्धतीसंबंधीं कांहीं महत्वाच्या वचनांच आह्मी दिग्दर्शन करितों. शुक्रनीतीच्या चवथ्या अध्यायाच्या सातव्या प्रकारणाच्या ३५० व्या श्लोकांत युद्धाचें ध्येय काय याचा खुलासा खालील श्लोकार्धांत शुक्रानें केला आहे.

**धर्मयुद्धैः कूटयुद्धैर्हन्यादेव रिपुं सदा।**

अर्थः—"युद्धांत धर्म युद्धपद्धतीनें ह्मणा अगर कूटयुद्धपद्धतीनें म्हणा शत्रूचा नाश करावयाचा असतो." या प्रमाणें युद्धाचें ध्येय नमूद करून ३५१ व्या श्लोकापासून ३५८ व्या श्लोकापर्यंत मनुस्मृतींत वर्णन केल्या प्रमाणें च धर्मयुद्धाचें वर्णन शुक्रनीतींत केलें आहे. या प्रमाणें धर्मयुद्धाचें वर्णन केल्यावर शुक्र म्हणतातः—

**धर्मयुद्धे तु कूटे वै न सन्ति नियमा अमी।**
**न युद्धं कूटसदृशं नाशनं बलवद्रिपोः॥ ३५९॥**
**रामकृष्णेन्द्रादिदेवैः कूटमेवादृतं पुरा।**
**कूटेन निहतो वालिर्यवनो नमुचिस्तथा॥ ३६०॥**

अर्थः—"प्रबल शत्रूचा नाश करण्यास कूटयुद्धासारखे दुसरें साधन नाहीं. पुरातन काळीं राम, कृष्ण, इंद्र आणि दुसऱ्या देवांनीं याचा स्वीकार केला होता. वाली, यवन आणि नमूची यांचा नाश कूटयुद्धानें करण्यांत आला."

या प्रमाणें कूटयुद्धाची महति शुक्रानें वर्णन केली आहे. कूट युद्धपद्धतीच्या निरनिराळ्या बाबींचें वर्णन शुक्रनीतींत ठिकठिकाणीं आलें आहे. त्या पैकीं कांहीं महत्वाच्या बाबींचें दिग्दर्शन आम्ही येथें करितोः—

यन्त्रास्त्रैः शत्रुसेनाया भेदो येभ्यः प्रजायते ।
स्थलेभ्यस्तेषु सन्तिष्ठेत ससैन्यो ह्यासनं हितत् ॥
अ. ४ प्र. ७ श्लो. २८५

तृणान्नजलसम्भारा येचान्ये शत्रुपोषकाः ।
सम्यङ् निरुध्य तान् यत्नात् परितश्चिरमासनात् ॥ २८६ ॥
विच्छिन्नवीवधासारं प्रक्षिणयवसेन्धवम् ।
विगृह्यमाणप्रकृतिं कालेनैव वशं नयेत् ॥ २८७ ॥

अर्थः– " ज्या ठिकाणाहून शत्रूच्या सैन्यावर हल्ला करिता येईल अशा ठिकाणीं सैन्य घेऊन दबा देऊन रहावे. यास आसन ही संज्ञा आहे. आसन स्थितींत असता शत्रुसैन्यास दाणा, गोटा, पाणी, गवत, लांकूडफांटा इत्यादिकांचा पुरवठा ज्यांच्या कडून होत असेल त्यांचा मोठ्या दक्षतेनें छल करून नाश करावा. ह्या प्रमाणें वरील पदार्थांचा नाश करून हळुं हळुं शत्रूचा पाडाव करावा. "

वर दर्शविलेल्या पद्धतीनें ज्या प्रमाणें शत्रूस जेरीस आणण्या बद्दल शुक्रानें सांगितलें आहे त्या च प्रमाणें खालील श्लोकांत दर्शविलेल्या उपायानें शत्रूस जेरीस आणण्याचा एक दुसरा मार्ग शुक्रानें सांगितला आहे.

क्षणं युद्धाय सज्जेत क्षणं चापसरेत् पुनः ।
अकस्मान्निपते द्दूराद्दस्युवत् परितः सदा ॥ ३७१ ॥

अर्थ—" शत्रू वर एकाएकीं अचानक दुरून आलेल्या चोरा प्रमाणें हल्ला करावा व क्षणांत हल्ला करून पलायन करावें. "

कूटयुद्धांत कोण कोणत्या बाबींचा समावेश होतो याचें दिग्दर्शन शुक्रानें वरील प्रमाणें केलें आहे. युद्ध सुरूं होण्यापूर्वी अल्प बलयुक्त व महत्वाकांक्षी राजानें त्याच्या सभोंवतीं असणाऱ्या दुसऱ्या राजांशीं कोणतें धोरण स्वीकारावयाचें या विषयीं शुक्रनीतींत करण्यांत आलेलें विवेचन फार महत्वाचें आहे. कूटयुद्धपद्धतीचें हें धोरण हा एक महत्वाचा भाग असल्या कारणानें त्याचा उल्लेख प्रस्तुत स्थळीं करणें जरूर आहे. शुक्र म्हणतोः—

प्रबलं मानदानाभ्यां युद्धैर्हीनबलं तथा ।
मैत्र्या जयेत समबलं भेदैःसर्वान् वशं नयेत् ॥
अ. ४ प्र. ७ श्लो. ८८

शत्रुसंसाधनोपायो नान्यः सुबल भेदतः ।
तावत् परी नीतिमान् स्याद्यावत् सुबलवान् स्वयम् ।
मित्रं तावच्च भवति पुष्टाग्नेः पवनो तथा ॥
अ. ४ प्र. ७ श्लो. १८९

अर्थः— "प्रबल असेल त्याच्याशीं नम्र राहून व त्याच्या उपयोगी पडून त्यास खूष ठेवावें. अल्पबलाशीं युद्ध करावें. समबलाशीं स्नेह करावा आणि भेदानें सर्वांना अंकित करावें. शत्रूच्या सैन्यांत फितुर उत्पन्न करणें या सारखें शत्रूस जिंकण्याचें साधन नाहीं. जों पावेतों कोणी हि सशक्त असतो तों पावेतों ज्या प्रमाणें अग्नीस वारा प्रज्वलित करितो प्रमाणें त्याचे स्नेही त्याच्याशीं वागतात. शक्ति आहे तों पावेतों नीतीचा अवलंब करावा."

वरील वचनांत केलेला उपदेश शक्तिमान राजा करितां शुक्रानें केलेला नाहीं हें उघड आहे.

आतां चिटणीसकृत राजनीतींत धर्म युद्धपद्धतीचें व कूटयुद्धपद्धतीचें जें विवेचन केलें आहे तें कोणत्या स्वरूपाचें आहे याचें दिग्दर्शन प्रस्तुत स्थलीं करणें अवश्य आहे.

" याजउपरी कपटयुद्ध करून शत्रूस जिंकावा कसा तो सांगतों. शत्रु बहुत दुरून येऊन श्रांत झाला आहे असा पाहून त्यासमयीं अथवा क्षुधें करून व तृषेंकरून पीडित जाहला व व्याधी करून व महर्गता सैन्यांत पडून व माहामारीच्या उपद्रव्येंकरून सैन्यांत बहुत पीडा प्राप्त झाली आहे असे प्रकारचा व चोरानीं श्रमी केलेला असा व अग्नी ( करून ) पांसु म्हणजे धूलीकरून व मोठे मोठे पाट पाण्याचे यांत पडला आहे असें समयांत व निद्रा केली आहे त्या संधींत, अथवा भोजनाचे अवसरीं व पर्वतादि अडचणींत पुढें विषम देश असला तरी, या संधींत शत्रु गांठावा. व शस्त्रांस विषें लावावीं. ते शस्त्र शत्रूवर टाकावे. असे अनेक प्रकारें करून शत्रूस लोभ दाखवावा आणि असावध पाहून त्या समयीं आपण सावधपणें असोन चालून जाऊन शत्रूस जिंकावा. व रात्रीचे ठायीं शत्रूस निद्रा लागूं न द्यावी. म्हणजे दिवसाचे ठायीं स्वस्थ निद्रा करितो. समय संधी पाहून गांठावा. अथवा शत्रूस विश्वास दाखवावा तेणेंकरून तो रात्रीचे भागीं स्वस्थ निद्रा करितो. या अवसरीं सौप्तिक विधानें करून मारावा. सौप्तिक विधान काय म्हणाल तरी तेंच सांगतो. द्रोणाचार्य याचा पुत्र अश्वत्थामा त्याणें पांडवांचें पुत्रांदिकांस निद्रा भागींच मारले त्याप्रमाणें शत्रूवध करावा व त्यांत ब्राह्मणांस मारू नयेत. ब्राह्मणांस निद्राकालीं व अन्यकाळीं कदापि न मारावें. जर ब्राह्मण होत्साता शस्त्र धरून चालून आला तरि त्यास मारावा. त्याचा दोष नाहीं. आधीं त्यास वर्ज करावा. तेही न ऐकून चालूनच आला तरि त्यास आततायी म्हणावे. तेव्हां त्याचा वध

करावा. हें न करितां त्याचा वध न केला आणि त्याणेच येऊन आपणावरी शस्त्रघात केला येणेंकरून आपला मृत्यु जाहला त्यास आपणास आत्महत्येचें पातक घडतें. यास्तव वेद आज्ञा आहे कीं, आपणास मारावयास आला असतां ब्राम्हण थोर असो व आचारशिल व वेद विद्या पारंगत जाणणार असा होत त्साता युद्धास शस्त्र घेऊन मारावयास आला त्यास मारावा, त्याचे मारणे करून आत्महत्या संरक्षण केले असतां अश्वमेधाचे पुण्य फळ येते. आपणा व्यतिरिक्त दुसरियाचे वधास ब्राह्मण जात असतां आपण त्याचा वध करूं नये. याजप्रमाणें संधि पाहून शत्रूस गांठून वध करावा म्हणून सांगितलें यांत आपलें सैन्य याचें फार विचक्षणपूर्वक संरक्षण करून शत्रूस संधींस गांठावा. आपणास देशकाल सैन्यादी अनुकूल आहेत तरि शत्रु जो यास प्रकटच युद्धच करावें. हे गुण अनुकूल नसल्या सांगितल्याप्रमाणें संधि लक्षून शत्रु जिंकावा. व शत्रूच्या प्रजा आहेत त्या जो कालपर्यंत आपल्या जाहल्या नाहींत तोंवरी त्यास लुटाव्या, माराव्या, त्यांच्या अनेक प्रकारें करून नाश करावा. आपल्या असे जाहल्यावरि त्यांचे पालन पुत्रवत् करावे. त्या जप्रमाणें कपटयुद्ध करावे. ह्मणून सांगितलें त्याची विविक्षा करून सांगितलें.''

याजवरी आतां धर्मयुद्ध करावे तें कसें करावे ह्मणून म्हणाल यास्तव तेंच सांगतो. उत्तम अथवा मध्यम व कनिष्ट या तिन्ही प्रकारांतून कसा हि शत्रु असो त्याणें होऊन युद्धास पाचारिलें त्याजवरी युद्धास अगत्य जावें. याचें कारण सांगतो. जर त्याशी युद्धास न गेले तरि तो आपले प्रजेस पीडा देईल. पीडा प्रजेस केली असतां आपणांस दोष प्रजा रक्षण न केलें होय तो व क्षात्र धर्माचाही नाश होतो. यास्तव युद्धास बोलाविले असतां त्याजवरी जावे मग युद्धांचे ठायीं विन्मुख न होतां मरणही पावला असता स्वर्गाप्रति जातो. अथवा जय पावला असतां इह लोकांचें राज्य पावतो. ........आतां धर्मयुद्धाचें प्रमाण सांगतो. धर्मयुद्धाचे ठायीं गज जे याजवरी गजसादी याणींच जावें. तुरंग्यांनीं यांणीं अश्वारूढ याजवरिच जावें, रथीं याजवरी रथी यांणीं, पदाति याजवरी पदाति, याजप्रमाणें यथायोग्य पाहून युद्ध करावें. यास धर्मयुद्ध म्हणावे. व आणखी ही सांगतों. चतुरंग सेना असलिया जशास तसें योजावें. तें नसतां एक दोन अंगे करून सेना ज्याची असेल त्याशीं धर्मयुद्ध कसें करावें तेही सांगतो. अश्वारूढ झाले त्यांजवरी तीन पदाति यांणीं जाऊन युद्ध करावें, गजावरी रूढ झाले यांजवरी पांच अश्वारूढ जे यांणीं जावें. हे ही धर्मयुद्धच होय. आतां अवध्य म्हणजे वधू नयेत ते कोण

कोण म्हणाल तरी तेंच सांगतों. स्थलाचे ठायीं उभा आहे, वाहनावरी बसला नाहीं व नपुंसक व हात जोडून आला त्यास, ज्याचा केशपाश सुटला आहे व वाहनावरून उतरून पृथ्वीवर बसला आहे व मी तुझा आहें असे प्रकारें म्हणणार त्यास व निद्रिस्तास व युद्धास सज्ज झाला नाहीं त्यास व नग्न झाला आहे व आयुध हातचें टाकिलें आहे त्यास व जो युद्धास उभा न राहिला व युद्ध अवलोकन करीत असेल त्यास, व दुसऱ्याशीं युद्ध करीत असतां त्यास, आपण न मारावें व भय पावला असा त्यास व पलायन करून जाणार त्यास व आणखी वृद्ध तसे च बाल व स्त्री व ब्राह्मण व मुखाचे ठायीं तृण धरून उभे राहणार व जे पाणी पीत असतील त्यांस तसेच भोजन करणारास व ज्यांणीं युद्धकवच अंगांत न घातलें त्यास व हत्ती, अश्व, रथी व दूत यास न मारावें. व राजा जो आहे त्यास राजा व्यतिरिक्त दुसरे शूर यांणीं न मारावें. याजप्रमाणें धर्मयुद्धांत अवध्य सांगितलें त्याजप्रमाणें कपट युद्धाचे ठायीं हेच अवध्य आहेत. ( पान ८६ व ८७ )"

कूटयुद्धाला चिटणीस कपट युद्ध म्हणतो. महाभारत, मनुस्मृति, शुक्रनीति, व चिटणीस कृत राजनीति इत्यादि ग्रंथांतील दिलेल्या वचनां वरून धर्म व कूट युद्धासंबंधीं जी कल्पना येते ती स्थूलदृष्ट्या शिवदिग्विजय बखरींतील वरील उताऱ्या वरून येणाऱ्या कल्पनेशीं तंतोतंत मिळती आहे. आतां शिवाजी महाराजांनीं जो स्वराज्यस्थापना केली व ज्या स्वराज्याचा महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांनीं पुढें विस्तार केला त्या स्वराज्यस्थापनेस व त्याच्या विस्तारास वरील युद्धपद्धति कशा रीतीनें उपकारक झाली, याची आतां आम्ही थोडी बहुत चर्चा करितों.

सुरुवातीस च वर वर्णन केलेली धर्मयुद्धपद्धति शिष्ट क्षत्रियांच्या धर्मे असल्याचे मनुस्मृतींत नमूद असतां या युद्धपद्धतीचा त्याग करून कूटयुद्धपद्धतीचा शिवाजी महाराजांनी स्वीकार कां करावा हा प्रश्न उपस्थित होतो. या प्रश्नाचें उत्तर शिवदिग्विजयबखरींत दिलेलें आह्मीं वर नमूद केले च आहे. शिवाजी महाराज कलियुगांत जन्मास आल्या कारणानें या युगांतील परिस्थित्यनुरूप कूटयुद्धपद्धतीचा आपद्धर्म म्हणून स्वीकार करण्याचें त्यांनीं ठरविलें असलें पाहिजे असा तर्क होतो. मनुस्मृतीच्या पहिल्या अध्यायाच्या ८५ साव्या श्लोकांत युगपरत्वें धर्म निराळे कसे होतात हें नमूद केलें आहे:—

अन्ये कृतयुगे धर्मास्त्रेतायां द्वापरेऽपरे।
अन्ये कलियुगे नृणां युगह्रासानुरूपतः॥ अ. १ श्लो. ८५॥

अर्थः—" कृतयुगांत धर्म निराळे असतात; त्रेतायुगांत निराळे असतात, द्वापरांत निराळे असतात व कलियुगांत युगाच्या ऱ्हासानुरूप मनुष्यांचे धर्म निराळे असतात."

ह्या स्मृतिवचनास अनुसरून कलियुगांत धर्मयुद्धपद्धतीप्रमाणें आचरण करणें इष्ट नसल्याचें शिवाजी महाराजांचें मत झालें असलें पाहिजे असें दिसतें. युद्ध हें एकांगी कर्म नाहीं. या कर्मांत युद्ध ज्याच्या बरोबर करावयाचें असा एक प्रतिस्पर्धी असतो. या प्रतिस्पर्ध्याच्या युद्धपद्धतीच्या तोडीची युद्धपद्धति त्याच्याशी झगडणाऱ्यास स्वीकारल्या वांचून गत्यंतर नसतें व तोडीस तोड या दृष्टीने युक्त युद्धपद्धतीचा स्वीकार न केल्यास यश प्राप्त होणें दुर्लभ असतें. शिवाजी महाराजांचे त्या काळीं प्रमुख प्रतिस्पर्धी मुसलमान धर्मानुयायी लोक होते. या मुसलमान लोकांच्या युद्धपद्धतींत धर्मयुद्धाच्या ज्या कित्येक बाबी वर नमूद केल्या आहेत त्यांचा मागमूस हि नव्हता. कूट युद्धपद्धतींत अंतर्भाव होणाऱ्या सर्व बाबींचा त्यांच्या युद्धपद्धतींत समावेश होत होता. अशा स्थितींत मुसलमान प्रतिस्पर्ध्या बरोबर युद्ध करितांना धर्मयुद्धपद्धतीचा आश्रय करणें हें शिवाजी महाराजांचे कृत्य निव्वळ आत्मघातकीपणाचें झालें असतें. ही बाब लक्षांत घेऊन त्यांनीं श्रुतिस्मृत्युक्तधर्मांत समाविष्ट होणाऱ्या धर्म व कूट अगर कपटयुद्धपद्धती पैकीं कूटयुद्धपद्धति महाराष्ट्रधर्मास युक्त असल्याचे ठरवून टाकलें. एकदां हें तत्त्व निश्चित ठरवून त्याचा अंगीकार केल्या नंतर शिवाजी महाराजांनीं हातीं घेतलेल्या स्वराज्यस्थापनेच्या महत्कार्यांत या पद्धतीस चिकटून राहून तिचा त्यांनीं पूर्ण फायदा घेतला ही गोष्ट स्वराज्य स्थापनार्थ मुसलमान व स्वकीय जातीच्या प्रतिस्पर्ध्या बरोबर त्यांनीं जीं युद्धें केलीं त्यांच्या हकीकतीचें मनन केलें असतां वाचकांच्या निदर्शनास आल्या खेरीज राहणार नाहीं. प्रथमतः स्वराज्याची मुहूर्तमेढ ज्या प्रदेशांत शिवाजी महाराजांनीं रोवली तो मुलख मनुस्मृतीच्या सातव्या अध्यायाच्या १७३ व्या श्लोकांत व शुक्रनीतीच्या चवथ्या अध्यायाच्या सातव्या प्रकरणाच्या २८५ व्या श्लोकांत वर्णन केलेली युद्धपद्धति अमलांत आणण्यास योग्य अशा स्वरूपाचा होता. मनुस्मृतींतील व शुक्रनीतींतील वचनास अनुसरून शिवाजी महाराजांनीं सह्याद्री वरील पुरातन किल्ले हस्तगत

करणें व नूतन बांधणें हें कार्य अगदीं प्रथम जारीनें हातीं घेतलें, व या किल्ल्याचे आश्रयानें त्यांनीं सह्य पर्वताच्या लगतचा मुलुख हस्तगत करून स्वराज्याची स्थापना केली. शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीच्या सुरवातीच्या काळांत त्यांनीं स्थापन केलेल्या स्वराज्याचा सह्य पर्वत हा पृष्ठवंश व या पर्वता वरील ठिकठिकाणचे त्यांच्या ताब्यांतील डोंगरी किल्ले हे जणूं काय त्या पृष्ठवंशाचे मणके होते असें ह्मटलें तरी चालेल. राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें शिवाजी महाराजांनीं स्वराज्या खालील प्रदेशाची जी विभागणी केली होती तीत डोंगरी किल्ल्यास अग्रस्थान देण्यांत आले होतें. प्रत्येक डोंगरी किल्ला हा त्यांच्या राज्यांतलि प्रदेशाचा मुख्य घटक समजण्यांत येत होता व त्या किल्ल्याच्या आसपासच्या प्रदेशांतील शेपन्नास खेड्यांचें संरक्षण व नियंत्रण किल्ल्या वरील अधिकाऱ्या कडून होत असे. रामचंद्र नीळकंठ आमात्य यांच्या ‘ आज्ञापत्र ’ या नावानें प्रसिद्ध असलेल्या राजनीतीपर प्रबंधाचें आठवें प्रकरण, दुर्गाची महति, त्यांची व्यवस्था, त्या वरील अधिकाऱ्यांचीं कामें इत्यादि बाबी संबंधी तपशिलवार माहिती देण्याप्रीत्यर्थ खर्ची घातलेलें आहे. या प्रकरणांत रामचंद्र नीळकंठ म्हणतात ( पा. २७ ) :--

“ संपूर्ण राज्याचे सार ते दुर्ग. दुर्ग नसता मोकळा देश परचक्र येतांच निराश्रय, प्रजा भग्न होऊन देश उध्वस्त होतो. देश उध्वस्त झाल्यावरी राज्य असें कोणास म्हणावे ! याकरितां पूर्वीं जे जे राजे झाले त्यांणीं आधीं देशामध्यें दुर्ग बांधून तो तो देश शाश्वत करून घेतला, आणि आलें परचक्रसंकट दुर्गाश्रयीं परिहार केलें. हें राज्य तर तीर्थरूप थोरले कैलावासी स्वामींनीं गडावरूनच निर्माण केलें. जो जो देश स्वशासनवश न होय त्या त्या देशीं स्थलविशेष पाहून गड बांधिले, तसेंच जलदुर्ग बांधिले; त्यावरून आक्रम करीत करीत सालेरी अहिवंतापासून कावेरीतीरपर्यंत निष्कंटक राज्य संपादिले. औरंगजेबसारखा महाशत्रु चालून येऊन विजापुरभागानगरांसारखी महासंस्थानें आक्रमिलीं, संपूर्ण तीसबत्तीस वर्षेंपर्यंत या राज्यांशीं अतिश्रम केला. त्याचे यत्नास असाध्य काय होतें ? परंतु राज्यांत किल्ले होते ह्मणून अवशिष्ट तरी राज्य राहिलें. पुढें पूर्ववत् करावयास अवकाश जाहला. याउपर ही ज्यापेक्षां राज्य संरक्षण करणें आहे, त्यापेक्षां अधिकोत्तर साधनीं स्वतां गडकिल्ल्याची उपेक्षा न करितां परम सावधपणें असतील त्या गड किल्ल्यांची यथोक्त मजबुती करावी. नूतन देश साधणें त्या देशांत जीं स्थळें असतील तीं महाप्रयत्नें हस्त-

वश करावी. ज्या देशांत गडकोट नसतील त्या देशांत आपल्या राज्याच्या सरहद्दीपासून पुढें जबरदस्तीनें नूतन स्थळें बांधीत बांधीत तो देश आक्रमावा. त्या स्थळांची सेना ठेवून पुढील देश स्वशासनें वश करावा. असें करीत करीत राज्य वाढवावें. गडकोटचा आश्रय नसतां फौजेच्यानें परमुलखीं टिकाव धरून राहावत नाहीं. फौजेविरहित परमुलखी प्रवेश होणेंच नाहीं. इतक्याचें कारण तें गडकोटविरहित जे राज्य त्या राज्याची स्थिति ह्मणजे अभ्रपटल-न्याय आहे. याकरितां ज्यांस राज्य पाहिजे त्यांणीं गडकोठ हेंच राज्य, गड-कोठ ह्मणजे राज्याचें मूळ, गडकोठ ह्मणजे खजीना, गडकोठ ह्मणजे सैन्याचें बल, गडकोठ ह्मणजे राज्यलक्ष्मी, गडकोठ ह्मणजे आपलीं वसतिस्थळें, गडकोठ ह्मणजे सुखनिद्रागार, किंबहुना गडकोठ ह्मणजे आपलें प्राणसंरक्षण, असें पूर्ण चित्तांत आणून, कोणाचें भरंवशावर न राहतां आहे त्याचें संरक्षण करणें; व नूतन बांधण्याचा हव्यास स्वताच करावा. कोणाचा विश्वास मानूं नये. ”

या उताऱ्यावरून शिवाजी महाराजास डोंगरी किल्ल्याचे इतकें महत्त्व कोणत्या कारणास्तव वाटत असे ही गोष्ट दिसून येते. कूटयुद्धपद्धतींत अंतर्भूत होणाऱ्या तत्त्वास अनुरूप अशा प्रकारचे दुर्ग निर्माण करण्यास योग्य असा प्रदेश स्वराज्याची मुहूर्तमेढ रोंवण्या करितां शिवाजी महाराजांनी कसा निश्चित केला होता याचें दिग्दर्शन केल्या नंतर शिवाजी महाराजांनी त्यांच्या सभोवार असलेल्या स्वकीय व मुसलमानादि परकीय प्रतिस्पर्ध्यांशीं वागण्याचें धोरण शुक्रनीतीच्या चवथ्या अध्यायाच्या सातव्या प्रकरणाच्या १८८ व १८९ व्या श्लोकांत वर्णिलेलें स्वीकारलें होतें असे दिसून येते. शहाजी राजे यास विजापूरच्या बादशाहानें कैदेंत टाकून त्यांना जीवंत मारण्याचा घाट घातला त्या वेळीं, आपल्या वडिलांचा जीव वाचविण्या करितां व स्वतःचा बचाव करण्या करितां त्या च प्रमाणें मिर्झा राजा जैयसिंग याच्या स्वारीच्या वेळीं, मोंगल बादशहाशीं तह करून त्याचा स्नेह संपादण्यास कमी केलें नाहीं. त्यांच्या चरित्रांतील निरनिराळ्या प्रसंगांचें निरीक्षण केलें असतां शुक्रनीतींतील वचनास अनुसरून जसा प्रसंग त्यांच्या वर आला त्यास अनुरूप अशा प्रकारचें वर्तन ते करीत असत असें दिसून येतें. आतां कूटयुद्धपद्धती पैकीं च दुसऱ्या कांहीं महत्त्वाच्या मुद्यांचें दिग्दर्शन करून ही चर्चा पुरी करूं. ज्या दिल्लीच्या मोंगल व विजापूरच्या मुसलमान बादशाहांचे सैन्या बरोबर लढाया मारून स्वराज्याची स्थापना

शिवाजीमहाराजांना करावयाची होती तें सैन्य कोणत्या प्रकारचें होतें व कूट-युद्धपद्धतीच्या दृष्टीनें शिवाजी महाराजांना आपले सैनिक कोणत्या स्वरूपाचे बनवावे लागले याचें आम्ही थोडक्यांत दिग्दर्शन करितों. मुसलमानी सैन्याचे पायदळ व घोडदळ हीं दोन प्रमुख अंगें होतीं. बंदुका, तरवारी, धनुष्यबाण इत्यादि हत्यारांचा त्या सैन्यांतील लोक उपयोग करीत असत. तोफखाना हें हि मुसलमानी सैन्याचें एक महत्त्वाचे अंग होतें. भरतखंडांत मुसलमानांचा प्रथम प्रवेश होऊन त्यांनीं हिंदु राज्यें धुळीस मिळविलीं त्या वेळीं मुसलमानी सैन्यांतील बहुतेक लोक भरतखंडा बाहेरील प्रदेशांतले असून इस्लामी धर्माचा प्रसार करण्याच्या भावनेनें ते जीवावर लढण्यास उदार असत. या देशांत येऊन त्यांचें वास्तव्य फार दिवस झालें नसल्या कारणानें शारीरिक सामर्थ्य व काटकपणा हे गुण त्यांच्या ठिकाणीं भरतखंडांतील राजांच्या पदरीं असणाऱ्या सैनिकां पेक्षां अधिक होते. त्यामुळें या सैन्यांतील लोकांची लढण्याची धडाडी विलक्षण प्रकारची होती. शिवाजी महाराजांच्या काळीं मुसलमानी सैन्यांतील वरील गुण परिस्थिति बदलल्या मुळें बहुतेक नष्ट होऊन त्या ऐवजीं मिजास, बडेजावी, हालचालींचे मांद्य व काटकपणाचा अभाव इत्यादि दुर्गण त्यांच्यांत शिरले होते. अशा प्रकारच्या मोंगली अगर मुसलमानी सैन्यावर विजय प्राप्त करण्या करितां काटकपणा, साधेपणा, चापल्य व धाडस इत्यादि गुण त्यांच्यांशीं विरोध करणाऱ्या सैनिकाच्या ठिकाणीं असणें जरूर होतें. ही बाब लक्षांत घेऊन शिवाजी महाराजांनीं वरील गुण ज्या लोकांच्या ठिकाणीं स्वभावसिद्ध होते अशा मावळे लोकांचा आपल्या सैन्यांत भरणा केला. घोडदळा करितां लागणाऱ्या घोड्यांची निवड शिवाजी महाराजांनीं वरील धोरणास अनुसरून केली. कूटयुद्धांत अंतर्भूत होणाऱ्या बाबीं पैकीं महत्त्वाची बाब म्हटली म्हणजे एकाएकीं शत्रू वर अचानक हल्ला चढवून त्याची दाणादाण व नासधुस करून पोबारा करणें ही होय. ही बाब सिद्ध होण्यास अत्यंत चपल, काटक व लांब पल्ल्याचा मजला मारण्याची ताकद असणाऱ्या तट्टांची घोडदळ बनविण्यास जरूरी होती. ही बाब लक्षांत घेऊन सह्य पर्वताच्या लगतच्या खडकाळ मुलुखांत दौड करण्यास कसलेल्या देशी तट्टांचें शिवाजी महाराजांनीं आपलें घोडदळ बनविलें. या घोडदळांतील शिपायांचें एक लांब भाला हें मुख्य हत्यार असे. या प्रमाणें मुसलमानी सैन्याचा कोणत्या बाबतींत कमीपणा आहे याचें उत्तम प्रकारें निरीक्षण करून

त्यांना मारक अशा गुणांनीं युक्त असें मुसलमानी सैन्यावर मात करणारें सैन्य शिवाजी महाराजांनीं निर्माण केलें.

वरील प्रमाणें कूटयुद्धां पैकीं महत्त्वाच्या दोन मुद्यांच्या सिद्धी प्रीत्यर्थ शिवाजी महाराजांनीं केलेल्या योजनेचें दिग्दर्शन केल्या नंतर आणखी एका महत्त्वाच्या मुद्याचें आम्ही दिग्दर्शन करितों. हा मुद्दा म्हटला म्हणजे शत्रु-प्रदेशांत दाणागोटा, घास वैरण, लांकूड फाटा इत्यादि लुटून अगर जाळपोळ करून फस्त करणें व शत्रुप्रजेस भंडावून सोडणें हा होय. शत्रुप्रदेशांत शिवाजी महाराजांच्या सैनिकांनी पाळावयाच्या नियमांचा उल्लेख मागें आम्हीं केला च आहे. या नियमांत दर्शविलेल्या बाबी खेरीज बाकी गोष्टी शत्रुप्रदेशांत करण्याची शिवाजी महाराजांनीं त्यांच्या सैनिकांस पूर्ण मुभा दिली होती. या च स्वरूपाची कूटयुद्धांतील आणखी एक बाब म्हटली म्हणजे शत्रु निजलेला अगर बेसावध असतां रात्रीं बेरात्रीं त्याच्यावर अचानक घाला घालून त्यास पादाक्रांत करावयाचा ही होय. नुकत्या च प्रसिद्ध झालेल्या पर्णालाख्यान नांवाच्या काव्यांत या पद्धतीनें शिवाजी महाराज त्यांच्या शत्रूवर सहज लीलेनें कशी मात करीत असत व दुर्भेद्य अशीं स्थळें चुटकी सरशीं कशीं हस्तगत करीत असत हें दिसून येते. सिंहगडचा किल्ला शिवाजी महाराजांनीं फार थोड्या लोकां कडून शत्रु रात्रीं बेसावध असतां अचानक हल्ला करून, जो किल्ला वेढा घालून बसलें असतां कित्येक महिन्यांनीं हि हस्तगत होणें दुरापस्त झालें असतें तो अवघ्या एका रात्रीत सर केला. या दृष्टीने त्यांच्या चरित्रांतील निरनिराळ्या प्रसंगाची चर्चा करण्याचे मनांत आणल्यास विस्तार फार होईल सबब आम्ही त्या मोहास बळी न पडतां ही चर्चा आटोपती घेतों. वर दर्शविलेल्या कूटयुद्धपद्धतीच्या दृष्टीनें शिवाजी महाराजांच्या चरित्राचें खरें मर्म रामचंद्र नीळकंठ आमात्य यांच्या राजनीतीपर आज्ञापत्रांत शिवाजी महाराजांनीं राज्य कसें संपादन केलें या बद्दलचें जें वर्णन केलें आहे त्यावरून उत्तम प्रकारें वाचकांच्या लक्षांत येण्या सारखें आहे. सबब या विपर्याचा आज्ञापत्रांतील जरूर तेवढा उतारा आम्ही येथें देतों:—दक्षिण प्रांतीं इदिल-शाई, कुतुबशाही, निजामशाही हीं पराक्रमी महान सकलार्थं समृद्धिमंत संस्थानें, इंग्रज, वलंदेज, रामनगरकर, पाळेगार, सौंदे, बिदनूर, म्हैसुर-वाले, त्रचनापल्ली, आदिकरून संस्थानिक तसेंच जागां जागां पुंड चंदर-राव, शिरके, सांवत, दळवी, वरघांटे निंबाळकर, घाटगे आदिकरून

देशमुख व फाटक सकलही पराक्रमी सज्ज, ते सामान पुरें असतांही बुद्धिवैभव पराक्रमें कोणाची गणना न करितां, कोणावर चालून जाऊन तुंबळ युद्ध करून, रणाशीं आणिलें, कोणावर छापे घातले, कोणास परस्परें कलह लावून दिलें, कोणाचे मित्र भेद केले, कोणाच्या डेऱ्यांत शिरोन मारामार केली, कोणाशीं एकांगीं करून पराभविलें, कोणाशीं स्नेह केले, कोणाच्या दर्शनास आपण होऊन गेले, कोणास दर्शनास आणिलें, कोणास परस्परें दगे करविले, कोणी इतर प्रयत्नें न कळत त्यांच्या देशांत जबरदस्तीनें स्थळें बांधून अनुक्रमें आकळिले ; जलदुर्ग सहित होते त्यांस नूतनच जलदुर्ग निर्माण करून पराभविलें. दुर्घट स्थळें नौकामार्गे प्रवेशिलीं. असें ज्या ज्या उपायें तो तो शत्रु पादाक्रांत करून सालेरी अहिवंतापासुन चंजी कावेरीतीरापर्यंत निष्कंटक राज्य संपादिलें. ”

कूटयुद्धपद्धतीचीं जीं निरनिराळीं अंगे वर वर्णन केलीं आहेत त्या अगां पैकीं इष्ट हेतु सिध्यर्थ ज्या प्रसंगीं ज्या तत्वाचा आश्रय करणें युक्त वाटलें त्या तत्त्वाचा आश्रय शिवाजी महाराजांनीं केल्याचें वरील उताऱ्या वरून दिसून येतें. आतां शिवाजी महाराजांच्या महाराष्ट्रधर्मी युक्त ठरविलेल्या कूटयुद्धपद्धतीचा उत्कर्षापकर्ष कसकसा होत गेला याचें आम्ही थोडक्यांत दिग्दर्शन करितों. शिवाजी महाराजांच्या मरणा नंतर औरंगजेबची दाक्षिणे वर जी प्रचंड स्वारी झाली त्या प्रसंगीं शिवाजी महाराजांच्या तालमेंत तयार झालेल्या रामचंद्र नीळकंठ, धनाजी जाधवराव, संताजी घोरपडे इत्यादि कूटयुद्धप्रवीण अशा पुढाऱ्यांच्या कर्तबगारीचा प्रभाव सर्व भरतखंड भर पडण्याची उत्कृष्ट संधि अनायासें प्राप्त झाली. जगांतील कोणत्या हि राष्ट्राच्या इतिहासांत आढळून न येणारी अशी अजब कामगिरी या प्रसंगीं वरील पुढाऱ्यांनीं करून औरंगजेब सारख्या महाप्रतापी व बलाढ्य शत्रूस धुळीस मिळवून महाराष्ट्र देशाचें स्वातंत्र्य, स्वराज्य व स्वधर्म यांचें उत्तम प्रकारें रक्षण केलें. राजारामाच्या काळीं झालेल्या वरील युद्धाच्या सुरवातीस महाराष्ट्रांतील त्या काळच्या राजकारणी पुढाऱ्यांनीं एक विचारानें महाराष्ट्राचे छत्रपति जे राजाराम महाराज व त्यांच्या कुटुंबांतील माणसें यांनीं महाभारतादि ग्रंथांतील वर जीं वचनें आह्मीं दिलीं आहेत त्यास अनुसरून दक्षिणेंतलि लांब पल्ल्या वरील अशा जिंजीच्या किल्ल्याचा आश्रय करावा असें ठरवून सर्व महाराष्ट्रभर जे ठिकठिकाणीं डोंगरी किल्ले होते ते लढवून औरंगजेबास

व त्याच्या सैन्यास जेरीस आणावयाचें असा घाट घातला व या घाटास अनुसरून सतत पंचवीस वर्षे औरंगजेबशीं युद्ध चालू ठेविलें. एक किल्ला सर करून औरंगजेबनें दुसऱ्या किल्ल्याकडे आपला मोर्चा फिरविला कीं मराठ्यांनीं तो किल्ला मोंगलांच्या हातून हिसकावून घ्यावा अशा प्रकारचा क्रम मराठ्यांनीं सुरू ठेविला. या शिवाय ठिकठिकाणीं मराठी सैन्याच्या फिरत्या टोळ्या औरंगजेबच्या सैन्यावर अचानक घाले घालून त्याची रसद मारण्याचें काम करीत असत. अशा रीतीनें मराठी सैन्यानें औरंगजेबच्या सैन्यास " दे माय धरणी ठाय " करून टाकलें. राजाराम महाराजांच्या सैन्यानें औरंगजेबच्या सैन्याबरोबर वरील पद्धतीनें जें युद्ध केलें त्याचें बखरकारानें केलेलें वर्णन इतकें अप्रतिम आहे कीं, तें वाचल्या खेरीज कूटयुद्धपद्धति प्रत्यक्ष अमलांत आणण्याच्या बाबतींत मराठ्यांनीं कोणत्या प्रकारचें प्राविण्य संपादन केलें होतें याची कल्पना वाचकांस बरोबर रीतीनें होणार नाहीं. या कारणा करितां तो उतारा आम्हीं येथें जसाच्या तसा देतों:—

" सारांश राजाराम यांची फौज रामसैन्याप्रमाणें अकस्मात् भलतेकडून पांच दाहाशें, दोनशें गठ्यांनीं शिरून ( शत्रूस दुभंग करावें ) हाणावें, मारावें, पळून जावें. औरंगजेब पादशाहासारखा शत्रु ( ज्याची ) लाखो फौज व खजीना बेमुबलक, छकड्यास छकडे द्रव्याचें भरोन कोटिशा ( ज्याचे ) बरोबर चालत आहेत. ( अशाशीं लढणें ) आणि आपलें सैन्य ( तर ) थोडें यास्तव मनुष्य राखून, जायां होऊं न देतां मसलतीनें त्यांच्या सैन्याभोंवतें हिंडोन फिरोन त्यांस लांडगे[1] तोड करावी; रयतेची मात्र वैरण राखून रानांतील वैरण जाळून टाकावी; रसद चालूं देऊं नये; आपल्या फौजेंत मणाची धारण; त्यांच्या लष्करांत शेराची धारण; अशा तऱ्हेनें करीत मराठी फौज किती आहे हा आदमास ध्यानांत येऊं देऊं नये; त्यांचे फौजेस चैन पडूं( देऊं) नये त्यांचीं ठाणीं (व) त्यांजकडे प्रांत मुलुख वहिवाटींत होते, तेथील लोकांनीं इकडे लक्ष ठेवून वागावें; आपली फौज ज्या प्रांतीं जाईल त्या प्रांतांतील लोकांनीं, जमेदारांनीं, खंडणी देऊन त्यांचा बचाव करावा; मोंगलांची फौज असेल तेथें तेथें पंचविसां तिसां कोसांचे छद्यांनीं राहून त्या फौजेस चैन पडूं देऊं नये, असें माहाराज कारिते झाले. लोभ करीतच असत. मोंगलांचे घोडे पाण्यावर आले असतां पाणी न पीत त्यांस

---

१ टीप—लांडगे तोड म्हणजे लांडग्या सारखे अवचीत येऊन घाला घालून तोडातोड, मारामार करणें व पळून जाणें वगैरे.

मोंगली लोकांनीं म्हणावें जे पाण्यामध्यें धनाजी व संताजी दिसतो कीं काय ! रात्रीं दिवसा कोणीकडून येतील काय करतील असे केले. मोंगलाई फौजेंत आठही प्रहर भय बाळगीत. पादशाहासि बहुत आश्चर्य झालें कीं, " मराठी फौज ही बळावत आहे. अकस्मात यावे, बक, मच्छ उचलून नेतो तसा घाला घालावा, शिपाईगिरीची शर्त करावी, प्रसंग पडल्यास माघारें पळून जावें. खाण्यापिण्याचा दरकार बाळगीत नाहीत. पाऊस, ऊन थंडी व अंधारी कांहीं न पाहातां घोड्यावरच हरभरे व भाकरी, चटणी, कांदे खाऊन धावतात. त्यांस कसें जिंकावे ! एखद्या मुलकांत फौज आली म्हणोन त्याजवर फौजेची रवानगी करावी तों दुसरीकडे जाऊन ठाणीं घेतात. मुलूख मारितात. हे आदमी नव्हत. भूतखाना आहे. " ( थोरले राजाराम यांचें चरित्र पान ४६ )

वरील वर्णन वाचलें असतां शुक्रनीतीतील जीं वचनें वर दिलीं आहेत त्यांतील तत्वें तंतोतंत मराठ्यांनीं औरंगजेबा बरोबर चालविलेल्या युद्धांत अमलांत आणलीं होतीं, अशीं कोणाची हि खात्री झाल्या वांचून राहणार नाहीं. आतां पावेतों केलेल्या चर्चेवरून कूट युद्धपद्धती पैकीं वृकयुद्धपद्धति व चित्त्याची युद्धपद्धति हीं जीं दोन प्रमुख अंगें यांचा शिवाजी महाराजांनीं फार दूर वर विचार करून स्वीकार केला व महाराष्ट्रीय जनतेच्या भावी पिढ्यास महाराष्ट्राच्या स्वराज्याच्या व स्वातंत्र्याच्या बचावाचें उत्तम साधन तयार करून दिलें हें सिद्ध होत आहे. राजाराम महाराजांच्या नंतरच्या काळांत कूटयुद्धपद्धत्यातर्गत वृक व चित्त्याच्या युद्धपद्धतीचा आश्रय करून महाराष्ट्र राज्याचा व धर्माचा ज्या महाराष्ट्रीय पुढाऱ्यानें थेट दिल्ली पावेतो प्रसार केला असा पुढारी ह्मटला ह्मणजे थोरले बाजीराव पेशवे हा होय. यांच्या कारकीर्दीत बुंदेलखंड, माळवा इत्यादि प्रदेश मराठ्यांनीं जिंकून मराठी राज्याचा विस्तार थेट दिल्ली पावेतों केला. बाजीरावाने केलेल्या मोहिमांचीं वर्णनें वाचलीं असतां मुख्यत्वे करून वृकयुद्धपद्धतीचा अंगीकार करून उत्तर हिंदुस्थानांतील मराठ्यांच्या शत्रूस बाजीरावानें जेरीस आणून त्यांना पादाक्रांत केलें ही गोष्ट दिसून येतें. बाजीरावानें या युद्धपद्धतीस अनुसरून केलेल्या अनेक मोहिमां पैकीं नमुन्यादाखल इ. स. १७२८ सालांत त्याच्या कारकीर्दीच्या पूर्वार्धांत त्याने निजामावर केलेल्या स्वारीचे वर्णन मराठी रियासत मध्यविभाग पान २१८ वर आलेलें आह्मी खालीं देतो. त्या वरून बाजीरावाच्या युद्धपद्धती संबंधीं आम्हीं जे वर विधान केलें आहे त्याची सत्यता वाचकांच्या चांगली लक्षांत येईल:-" एकदम समोरासमोर युद्ध न करितां निरनिराळ्या ठिकाणीं हुलकावण्या दाखवून शेवटीं

कोठें तरी शत्रूस पेचांत पकडावयाचें असा बेत बाजीरावानें आरंभापासून करून त्या धोरणानें मोहीम चालविली. सेनानायकांचें उत्कृष्ट धोरण व युद्धाचे निरनिराळे डावपेच बाजीरावाचे अंगीं कसे होते हें या मोहिमेंत व्यक्त झालें. इसवी सन १७२७ च्या आगष्ट महिन्यांत बाजीराव बाहेर पडला. प्रथम औरंगाबाद जिल्ह्यांत शिरून जालना प्रांत त्यानें उध्वस्त केला. नोव्हेंबरच्या आरंभीं निजामचा सरदार ऐवजखान यानें बाजीरावा वर चाल केली. त्याजबरोबर थोडीशी चकमक झाडून बाजीराव अग्नेयीस माहूरकडे घूसला. तेथुन तावडतोब पुन्हः औरंगाबादेकडे येऊन ' बऱ्हाणपुरावर जाऊन ते शहर जाळून टाकतो ' असा पुकार करून तो लूट करीत खानदेशांत शिरला. तेव्हा बऱ्हाणपुरचा बचाव करण्यासाठीं निजाम व ऐवजखान तावडतोब बऱ्हाणपुराकडे गेले. बाजीरावानें नुसती हूल दाखविण्याकरितां एक टोळी बऱ्हाणपुराकडे रवाना केली आणि आपण मुख्य फौजेनिशीं पश्चिमेकडे वळून लूट करीत गुजराथेंत उतरला. गुजराथचा सुभा सरबुलंदखान व निजाम यांचे वाकडें होतें. सरबुलंदखानास बाजीरावानें असें कळविलें कीं, ' आमचा व निजामचा स्नेह होऊन त्याच्याच सांगण्यावरून आम्ही गुजराथेवर आलो आहो. ' इकडे निजाम बऱ्हाणपुरास येतांच बाजीरावानें आपणास फसविलें असे पाहून रागारागानें तो एकदम पुण्यावर चालून येण्यासाठीं परत फिरला. ही बातमी बाजीरावास गुजराथेंत कळतांच, करवंद बारीने घाट चढून, त्याने गोदावरीच्या पूर्व तीरावरचे वैजापूर व गांडापूर हे निजामचे परगणे लुटून फस्त केले. हि बातमी निजामास अहमदनगरास कळली. तेव्हां लगेच पुण्याच्या रोख सोडून तो गोदावरी उतरून पूर्वेकडून बाजीरावास आडवा झाला. तेव्हां बाजीरावानें पैठणच्या बाजूस पालखेड नजीक एका अत्यंत अडचणीच्या जागीं निजामास गांठून सभोंवारच्या प्रदेशांतील दाणा वैरण सर्व जाळून शत्रूस पाणी सुद्धा मिळण्याची बंदी केली. २५ फेब्रु. १७२८ पुढें चालणें घडेना; तेथेंच मुक्काम करून राहावें तर पाणी सुद्धां नाहीं, असे बहुत घाबरें झाले. तेव्हां ऐवजखानामार्फत निजामानें तहाचें बोलणें लाविलें. "

वरील वर्णना वरून वृकयुद्धपद्धतींत बाजीराव कसा हातखंडा होता हें दिसून येते. इ. स. १७३७ सालची बाजीरावची दिल्ली वरील मोहीम व त्याच प्रमाणे इ. स. १७३८ सालची निजामाबरोबर भोपाल नजीक झालेली

लढाई या प्रसंगीं वर वर्णिलेल्या युद्धपद्धतीनें च बाजीरावानें आपल्या शत्रूस पादाक्रांत करून दातीं तृण धरावयास लावलें. बाजीरावच्या निधना नंतर मराठ्यांच्या इतिहासांत वरील पद्धतीस अनुसरून केलेल्या प्रचंड स्वरूपाच्या मोहिमा क्वचित् च आढळतात. थोरल्या बाजीराव पेशव्यांच्या मरणा नंतर मराठेशाहीच्या उत्तरार्धांत मराठ्यांची ही विशिष्ट युद्धपद्धति मागें पडत जाऊन तिज कडे त्यांचें दुर्लक्ष झालें. या च काळांत इंग्रज, फ्रेंच इत्यादि राज्य लोलुप युरोपियन लोक भरतखंडाच्या राजकीय क्षितिजावर चमकूं लागले. कवाईत शिकवून तयार केलेले पायदळाचे कंपू व तोफखाना हीं इंग्रजादि पाश्चात्त्यांच्या सैन्याचीं प्रमुख अंगें होतीं. या सैन्यांतील शिपायांचें मुख्य शस्त्र ह्मणजे सुधारलेली लांब पल्ल्याची बंदुक हें होतें. भरत खंडांत मुलुख संपादन करून राज्यस्थापना करण्याचें इंग्रज फ्रेंच इत्यादि लोकांनीं ठरविल्यापासून या देशांत परस्परांशीं स्पर्धा करण्यांत गुंतलेल्या निरनिराळ्या राजसत्ताधिकारी व्यक्तींच्या भांडणांत या लोकांनीं आपला शिरकाव करण्यास सुरुवात केली. या नंतर थोडक्या च काळांत भरतखंडांतील लोकांशीं या लोकांच्या सैन्याचे युद्धप्रसंग होऊ लागून त्यांच्या सैन्याचें व युद्धपद्धतीचे श्रेष्ठत्व आपल्या कडील लोकांस कळून चुकलें. या अनुभवामुळें हिंदुस्थानांतील नांव घेण्यासारख्या राजसत्ताधिकारी व्यक्ति आपल्या पदरीं पाश्चात्त्य युद्धपद्धतींत निष्णात असे सेनानी नोकर ठेऊं लागलें व त्यांच्या हाता खालीं कवाईत शिकलेल्या शिपायांचे कंपू तयार करण्याचा उपक्रम त्यांनीं सुरूं केला. अशा प्रकारें तयार केलेल्या कंपूंतील सैनिकास लागणाऱ्या बंदुका व तोफा इकडील राजे रजवाडे पाश्चात्त्य देशांतील डच, पोर्तुगीज, जर्मन, फ्रेंच, इंग्रज इत्यादिकांकडून विकत घेत असत. इंग्रज फ्रेंचादि पाश्चात्त्य लोकांनीं ज्या भौतिक शास्त्राच्या ज्ञानाच्या साह्यानें उत्तम प्रकारच्या बंदुका व तोफा तयार करण्याची कला साध्य केली होती त्या ज्ञानाची व कलेची हिंदुस्थानांतील परपस्परांशीं राजसत्ते करितां स्पर्धा करणारे राजे अगर त्यांच्या प्रजा या पैकीं कोणास हि वार्ता नसल्या कारणानें पाश्चात्त्यांच्या युद्धपद्धतीचे उत्तम बंदुकी, तोफा व दारूगोळा हें जें महत्त्वाचें अंग त्या संबंधीं त्यांना नेहेमीं त्यांचे शत्रु जे इंग्रज फ्रेंचादि लोक यांच्या वर अवलंबून रहावे लागे. इंग्रज फ्रेंचादि पाश्चात्य लोक युद्धांत ज्या तोफा व दारूगोळा स्वतः करितां तयार करीत त्या प्रकारच्या बंदुका, तोफा व दारूगोळा हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांस देत नसत. यामुळें पाश्चात्त्य लोकांच्या कवाईत शिकलेल्या कंपूच्या सैन्या पुढें त्यांना हार खावी लागत असे.

सवाई माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दीत तळेगांव दाभाड्या नजीक मराठ्यांचे इंग्रजां बरोबर जें युद्ध झालें त्या युद्धा खेरीज मराठ्याची इंग्रजा बरोबर जीं युद्धें झालीं त्या युद्धांत मराठ्यांस इंग्रजांनीं चुटकी सरसें पराभूत करून टाकलें असें इंग्रजाच्या बरोबर मराठ्यांनीं केलेल्या युद्धांच्या हकीकती वरून दिसून येतें. मराठ्यांनीं पाश्चात्याचें अनुकरण करून त्यांच्या पासून उचललेल्या युद्ध-पद्धतींत वर नमूद केलेला भौतिक शास्त्रीय ज्ञानाचा त्यांच्या ठायीं असलेला अभाव ही मोठी गोम असल्या कारणाने युद्धांत इंग्रजांच्या वर मात करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं कधी च आलें नाहीं. या शिवाय कूट युद्धपद्धतीस उपकारक असे जे महाराष्ट्रदेश भर असलेले डोंगरी किल्ले त्यांचे हि महत्व दुसरे बाजीराव पेशव्यांच्या कारकीर्दीतील महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांस समजेनासे झालें होतें. किंबहुना रामचंद्र नीळकंठ आमात्य यांच्या राजनीतींतील " संपूर्ण राज्याचे सार ते दुर्ग " ह्या महावाक्याचा त्यांना पूर्ण विसर पडला होता असें म्हटले तरी चालेल. या च काळांत शिवाजी महा-राजांच्या कूटयुद्धपद्धतीच्या तालमींत तयार झालेल्या पुढाऱ्यां सारखे कांहीं थोडे पुढारी अस्तित्वांत असते तर मराठी राज्याचा अंत इ. स. १८१८ सालांत न होतां आणखी कित्येक वर्षे तरी खास लांबला असतां. मराठेशाही-च्या उत्तरार्धात इंदूर संस्थानचे अधिपति यशवंतराव होळकर ही कूटयुद्ध-पद्धतीचे महत्त्व जाणणारी एक च व्यक्ती होती व त्यांनीं त्यांच्या ठिकाणीं असलेल्या कूटयुद्धपद्धतींतील वाकबगारीचा प्रभाव इंग्रजांस दाखविण्यास कमी केलें नाहीं. मरेने केलेल्या हिंदुस्थानच्या इतिहासात यशवंतराव होळकरांच्या कूटयुद्धपद्धतींतील वाकबगारी विषयींचा खालील उल्लेख फार महत्त्वाचा आहे:—

" Holkar, seeing himself thus completely hemmed in, and all his schemes of conquest about to be chec-ked by the British, seems to have hastely determined to plunge into a contest with them. He threatened the territory of their ally the Rajah of Jyenagar; he made extravagant and even very insulting demands; and in a letter to Sir A. Wellesley, he said, " Countries of many hundred coss shall be overrun and plundered and calamities will fall on lacks of human beings

incontinual war by the attacks of my army, which overwhelms like the waves of the sea !" At the same time he earnestly invited Scindia, and the other princes who remained still independent to unite against the English as a common enemy."

अर्थः–" इंग्रजांकडून पूर्णपणें वेढला गेल्याचें व मुलख जिंकण्याच्या त्याच्या बेतास इंग्रजाकडून अडथळा होणार असल्याचें होळकराच्या दृष्टोत्पत्तीस येतांच त्याने इंग्रजाशी घाईनें युद्ध करण्याचें ठरविले. इंग्रजांचा दोस्त जयनगरचा राजा याच्या मुलुखावर स्वारी करण्याचा त्यानें इंग्रजांस धाक घातला, व त्यांच्याकडे त्याने त्यांस अपमानकारक अशा भलत्या च मागण्या केल्या. त्यानें सर ए. वेलस्ली यांस लिहिलेल्या पत्रात असें कळविले कीं, " शेकडों कोस प्रदेशांवर मी स्वारी करून तो लुटून फस्त करीन. सागराच्या लाटां प्रमाणे माझ्या सैन्याचे हल्ले लढाईंत झाल्यामुळे लाखों लोकांवर सकटे गुदरतील. " या च सुमारास त्यानें शिंदे व इतर स्वतंत्र राजे रजवाडे यांस इंग्रज हे सर्वांचे शत्रु असल्या कारणानें त्यांच्या विरुद्ध त्यास त्यानीं सामील व्हावें अशी निकड लावली. "

वरील उताऱ्यांत होळकरानें जी धास्ती इग्रजांस घातली होती त्याप्रमाणें त्यानें त्यांच्याशीं युद्ध करून कूटयुद्ध पद्धतीचा इंग्रजांस थोडा बहुत प्रभाव दाखविला. काहीं वर्षां पूर्वी झालेल्या बोअर युद्धांत सर्व प्रकारच्या नव्या पद्धतीचीं हत्यारें व दारु गोळा यानीं पूर्णपणे सज्ज असलेल्या इंग्रजांची कूटयुद्धपद्धतीने बोअर लोकांनीं कशी त्रेधा उडवून देऊन त्यास रडकुंडीस आणले हें सर्वांस विदित च आहे. बोअर युद्धातील हा ताजा अनुभव लक्षांत घेतां मराठ्यानीं महाराष्ट्रधर्मी युक्त असलेल्या स्वकीय वृक व चित्त्याच्या युद्ध-पद्धतीचा त्याग करून परकीयांच्या युद्धपद्धतीचा स्वीकार केल्यामुळें त्यांचें राज्य लवकर लयास जाऊन त्यांच्या पायांत पारतंत्र्याच्या शृंखळा पडल्या ही बाब आतां पावेतों केलेल्या विवेचना वरून सिद्ध होत असल्याचें नमूद करून मराठ्यांच्या युद्धपद्धती सबंधाची ही चर्चा आम्ही येथे पुरी करितों.

महाराष्ट्र धर्मस्थापना हे च मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेचें ध्येय होतें अशा प्रकारचे निश्चित अनुमान ज्या बाबींवरून निघतें. अशा बाबीं पैकीं मराठी राज्याच्या सर्व साधारण राजकीय धोरणांपैकीं कांहीं प्रमुख बाबींचे येथ पावेतों आम्हीं दिग्दर्शन केले असून त्या संबंधीं आम्ही यथामति चर्चा हि केली आहे. पुराव्याच्या दृष्टीनें वरील बाबींचें महत्त्व फार मोठें आहे. या शिवाय महाराष्ट्र

धर्माची व्याप्ति व या संज्ञेंत कोणकोणत्या बाबींचा समावेश होतो या मुद्याच्या विशदीकरणाच्या दृष्टीनें हि मागें नमूद केलेल्या बाबींचें महत्त्व कांहीं कमी नाहीं. या प्रकारणाच्या सुरवातीस आम्ही ज्या दोन प्रमुख बाबी नमूद केल्या त्या पैकीं एका प्रमुख बाबतींत अंतर्भूत होणाऱ्या अनेक पोट बाबींची चर्चा येथपावेतों आम्ही केली आहे. आतां सुरवातीस दर्शविलेल्या दुसऱ्या बाबतींत अंतर्भूत होणाऱ्या कित्येक पोट बाबींच्या चर्चेकडे आम्ही आतां वळतों. महाराष्ट्रधर्मस्थापना हें च मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेचें ध्येय असल्यामुळें अर्थात च त्या काळीं महाराष्ट्रीय समाजांतील प्रत्येक व्यक्तीस श्रुतिस्मृत्युक्तधर्मास अनुसरून आचरण करणें भाग पडत असलें पाहिजे व प्रत्येक व्यक्तीचें आचरण त्या धर्मास अनुसरून न झाल्यास त्याबद्दल राजसत्तेकडून त्यास शासन होत असलें पाहिजे हें उघड आहे. मराठ्यांच्या इतिहासाच्या साधन ग्रंथांत प्रसिद्ध झालेल्या शेंकडों तत्कालीन कागदावरून त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजांतील व्यक्तीस स्मृतिधर्मांत सांगितलेल्या विधीनिषेध रूपी आज्ञांचे उल्लंघन केल्यास त्याबद्दल शासन करण्यांत येते ही बाब सिद्ध झाल्यास महाराष्ट्रधर्म स्थापना हें च मराठ्यांच्या राज्यस्थापनेचे ध्येय होतें असें अनुमान काढणें स्वाभाविकपणें प्राप्त होईल. आतां या पुढें आम्ही जी चर्चा करणार आहों तींत वरील बाब सिद्ध करणारे कांहीं महत्वाचे लेख आम्ही वाचकास सादर करण्याचें ठरविलें आहे. सुरवातीस एक गोष्ट नमूद करणें जरूर आहे, ती ही कीं, आम्ही या पुढें जे लेख सादर केले आहेत तशा स्वरूपाचे शेंकडों लेख महाराष्ट्राच्या इतिहासाच्या साधनांचें संशोधन करणाऱ्या गृहस्थास उपलब्ध झाले असून त्या पैकीं फार अल्प लेख साधन ग्रंथांतून छापून प्रसिद्ध झाले आहेत. अशा प्रकारच्या प्रसिद्ध झालेल्या अल्प लेखा पैकी आम्ही या ठिकाणी सादर करण्याच्या ठरविलेल्या लेखांची संख्या अल्प असल्या कारणानें थोडाश्या पुराव्याच्या पायावर आम्ही टोलेजंग इमारत रचण्याचा प्रयत्न केला आहे, अशा प्रकारचा आक्षेप चिकित्सक वाचकांकडून येण्याचा संभव आहे सबब सुरवातीस च वरील बाब वाचकांच्या निदर्शनास आणणें जरूर वाटल्या वरून आह्मीं ती मुद्दाम नमूद केली आहे. ज्या मुद्याचे आह्मी विवेचन करण्याचें ठरविलें आहे तें करण्यापूर्वी प्रजेकडून कोणत्या धर्माचें पालन करवून घेतलें पाहिजे या संबंधाची मनुस्मृति व शुक्रनीतींतील

कांहीं महत्वाचीं वचनें वाचकांच्या निदर्शनास आणणें जरूर आहे. आम्ही जे लेख पुढें सादर करणार आहों त्या लेखांचें खरें महत्त्व वरील वचनें ध्यानांत घेतल्या खेरीज वाचकांच्या लक्षांत येणार नाहीं. मनूचीं वचने खालील प्रकारचीं आहेतः—

**तस्माद्धर्मंयमिष्टेषु स व्यवसेन्नराधिपः ।**
**अनिष्टं चाप्यनिष्टेषु तं धर्मं न विचालयेत् ॥**

( अ. ७ श्लो. १३ )

अर्थः-" यास्तव जो राजा आपल्या अपेक्षित लोकांमध्यें ज्या शास्त्राच्या विरुद्ध नसलेल्या धर्माची निश्चय पूर्वक स्थापना करील त्याचें कोणी उल्लंघन करूं नये. "

**स्वे स्वे धर्मे निविष्टानां सर्वेषामनुपूर्वशः ।**
**वर्णानामाश्रमाणां च राजा सृष्टोऽभिरक्षिता ॥**

( प्र. अ. ७ श्लो. ३५ )

अर्थः-" ईश्वरानें आपल्या धर्मामध्यें निष्ठा ठेऊन आचरण करणाऱ्या सर्व ब्राह्मणादि वर्णांचा व क्रमानें ब्रह्मचर्यादि आश्रमांचा सर्व प्रकारें रक्षक असा हा राजा निर्मिला आहे. "

वर्णाश्रमधर्मास अनुसरून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्रादि लोकांस आचरण करावयास लावणें हा पुरातन काळा पासून राजाचा धर्म समजण्यांत येत असे. शुक्रनीतींतील या संबंधाचीं वचनें अधिक स्पष्ट आहेत.

**स्वस्वजात्युक्तधर्मो यः पूर्वैराचरितः सदा ।**
**तमाचरेच्च सा जातिर्दण्ड्या स्यादन्यथा नृपैः ॥**

( अ. ४ श्लो. ९ )

अर्थः— " ज्या त्या जातीच्या लोकांनीं त्या त्या जातीस विहित असलेल्या धर्मास अनुसरून आचरण करावें. या प्रमाणें त्यांनीं आचरण न केल्यास राजानें धर्मास अनुसरून आचरण न करणारास दंड करावा. "

स्मृती व नीतीच्या वरील वचनांस अनुसरून मराठी राज्याच्या अमदानींत महाराष्ट्रीय समाजांतील प्रत्येक व्यक्तीस आपापल्या धर्मास अनुसरून आचरण करावें लागत असे व वर्णाश्रमधर्मास अनुसरून एखाद्या व्यक्तीनें आचरण न केल्यास त्या बद्दल त्यास राजसत्ता धारणकरणाऱ्या अधिकाऱ्यां कडून शासन होत असे. मराठी राज्य अस्तित्वांत असतां वरील

प्रकारची व्यवस्था अमलांत होती हें दर्शविणारे शेकडों लेख उपलब्ध झाले असल्याचें आम्ही वर नमूद केलें च आहे. या लेखां विषयीं साग्र चर्चा करण्याचें प्रस्तुतचें स्थळ नसल्या कारणानें आह्मीं त्या भानगडीत पडत नाहीं. ब्राह्मण क्षत्रियादि जातीच्या लोकांचे आचार, व्यवहार, प्रायश्चित्त इत्यादि धर्म, राजधर्म, स्त्रीधर्म इत्यादि धर्मांत अंतर्भूत होणाऱ्या प्रमुख बाबी संबंधीं मराठी राज्यांत कोणत्या प्रकारची व्यवस्था अमलांत होती हें दर्शविणारे कांहीं महत्वाचे लेख खालीं देऊन त्या लेखांच्या आधारें मराठी राज्यांत श्रुतिस्मृत्युक्त धर्मास अनुसरून आचरण करणें हा महाराष्ट्रीय समाजांतील प्रत्येक व्यक्तीचा धर्म समजला जात असे व त्या धर्मा विरुद्ध आचरण करणारास शासन करण्यांत येत असे ही बाब आम्ही सिद्ध करून दाखविणार आहोंत. तत्पूर्वी महाराष्ट्रीय समाजाच्या रचनेचें दिग्दर्शन करणें जरूर आहे. महाराष्ट्रीय मानवी समाज हा वर्ण, जाति व आश्रम भेद यांनीं युक्त आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चार प्रमुख वर्णांचे मानव, ह्या चारी वर्णां पैकीं निरनिराळ्या वर्णांच्या स्त्रिया व पुरुष यांच्या अनुलोम व प्रतिलोम पद्धतीनें झालेल्या शरीर संबंधा पासून उत्पन्न झालेल्या प्रजांच्या बनलेल्या निरनिराळ्या जातींचे मानव व अनार्य वंशांच्या जातींचे मानव या सर्व प्रकारच्या मानवी प्राण्यांचा समूहांचा महाराष्ट्रीय समाज बनलेला आहे. अशा प्रकारच्या ह्या मानवी समाजांतील निरनिराळ्या वर्णांच्या व जातींच्या लोकांचे आचार श्रुतिस्मृत्युक्तधर्मा प्रमाणें व परंपरागत चालत आलेल्या रूढीं प्रमाणें ठरले गेले आहेत. प्रत्येक वर्णांच्या व जातीच्या व्यक्तीनें त्या वर्णाच्या व जातीच्या ठरलेल्या आचारास अनुसरून आचरण करावयाचें असा श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माचा निर्बंध असल्या कारणानें वरील वर्णां पैकीं अगर जाती पैकीं कोणत्या हि व्यक्तीनें तिच्या वर्णविशिष्ट अगर जातिविशिष्ट आचारा विरुद्ध आचरण केल्यास त्या विषयीं तक्रारी त्या काळीं सरकारी अधिकाऱ्या कडे निर्णयाकरितां येत असत. महाराष्ट्रीय मानवीसमाजाच्या रचने विषयीं वरील प्रमाणें स्थूल कल्पना मांडल्या नंतर आचार धर्मासंबंधीं त्या काळीं उपस्थित झालेल्या वादाच्या निर्णयाचें नमुन्या दाखल एक उदाहरण आम्ही देतों. महाराष्ट्रीय मानवीसमाजांत ज्या अनेक जातींच्या लोकांचा अंतर्भाव होता या पैकीं कास्त वाणी लोकांची एक जात आहे. या ज्ञाती पैकीं एका इसमानें संन्यास घेऊन तो इसम ब्राह्मणवर्णाच्या लोकांच्या पंगतींत भोजनास बसूं लागला. पुढें ही गोष्ट

उत्कर्षीस आल्यामुळें कास्त वाणी ज्ञातीस वेदोक्त कर्म करण्याचा अधिकार आहे कीं नाहीं हा प्रश्न उपस्थित झाला. या प्रश्नाचा निकाल त्या काळीं जो करण्यांत आला तो इतिहास आणि ऐतिहासीक मासिकाच्या ऐतिहासिक विविध विषय भाग १ ला पान ३४० वर छापण्यांत आला आहे तो आम्ही खालीं देतों:—

"सके १६४१ विकारी नाम सवछरे मार्गेश्वर वदी २ गुरुवार ते दिवशीं समस्त सभे स्मार्थ भिक्षुक व ग्रहस्थ क्षेत्र श्री त्रिंबक व नाशिक व पुण्यस्तभ व पैठण व का। अकोलें यासी समस्त वानी कास्त का। अकोलें बीा।

श्री काळेश्वर प्रसादेन दादाजी तनयस्यच मल्हारि शर्मणः प्राप्त स्वस्ति मुद्रा विराजते

रामजी परडेकर शिवाजी बेल्हेकर अवधूतरा गोपाळ गुगरी विठोजी सबाजी विठ्ठल पांडुरंग परडेकर माधू परडेकर तिमाजी कान वगैरे समस्त कास्त यांनी लेहोन दिधलें ऐसजे आपले घरीं पूर्वापार पुराणोक्त कर्म चालत आले आहे. कदीम पुरोहित पाठक आहेत, त्यावरी दरम्यान शभूदेव नासिककर याचे हाते वेदोक्त यजुर्वेद कर्म करूं लागलो आनि कुलाजी अवधूत रायांनीं देशांतरास जाऊन जातिलोप करून संन्यास घेतला आणि पंढरपुरास आला ब्राम्हणाचा पंक्तिस व भिक्षा करूं लागला. तो गणेश ब्रम्हचारी अकोलाहून यात्रेस गेले तेथें कुलाजी मजकूर भ्रस्ट करून पंक्तीस बसला ऐसें देखोन समस्त ब्राम्हण मंडळीस ब्रम्हचारीयाने निवेदन केलें कीं कुलाजी मजकूर भिक्षेस व पूजेस पंक्तीयोग नाहीं त्यावरून समस्तानीं दूर उठविला. ज्या संन्याशाने कुलाजीस संन्यास दिधला होता त्यास दूषण ठेविलें त्यावरी ब्रह्मचारी व श्रीकेशव भारती ऐसे अकोल्यास आले तेथून किल्ले सातारी यास गेले तेथें ब्रह्मसभा श्रीकृष्णातीरीं माहोलीं संगमी केली. तेथील ब्राह्मणांहीं शास्त्रनिर्णय केला कुसाजी अवधूतराव वगैरे वाणी कास्त यास वेदोक्त कर्म नाहीं ऐसा निश्चये करून राजश्री शंकराजी मलहार राजश्री बालाजीपंत प्रधान यांची पत्रे राजश्री अंताजी मलहार सुभेदार प्रांत गंगथडी व गुमास्ते सरदेशमुख राजश्री अंताजी मल्हार यांसी आनिली कीं तुह्मीं याचा विचार पाहोन त्याला बोलावून आणून शासन करून विलहे लावणें. त्यावरून पंत मशार निल्हेनी आह्मास बोलावून आणिलें आणि महाक्षेत्र श्रीत्रिंबक व नासिक व पुण्यस्तंभ येथील पत्रे पंडितांची शास्त्रार्थ लिहून आला कीं,

समस्तास वेदी अधिकार नाहीं त्यावरून आह्मा समस्तास आज्ञा केली शास्त्रा-प्रमाणें चालणे अन्याय न करणे. ते आपण समस्ती मान्य करून लेहून दिधले आपले जातीमधे नवे आपले जातीचे भट करून कर्म चालवित होतो तें न चालवून पुरातन आपले उपाध्ये पाठक आहेत त्या हातीं पुराणोक्त कर्म करीत जाऊन ज्या प्रमाणें त्रिंबक नाशिक व पुण्यस्तंभ व पैठण येथुन निर्णये जाहला आहे त्याप्रमाणें कर्म चालवून. यामधे जो आपले जातीचा अन्यथा करील तो दिवाणाचा गुन्हेगार हें लिहिले सही बा। विठोजी अवधूत राऊ कारत (वरील नावांपैकीं चौघांच्या या ठिकाणीं सह्या आहेत).

साक्षी

| | |
|---|---|
| पांडुरंगभट धर्माधिकारी | गीरी जोशी का। आकोले |
| गणेशभट जेस्ते | बाळा जोसी कसबे आकोले." |

वरील लेखा वरून वर्ण व जाति धर्मास अनुसरून प्रत्येक व्यक्ती कडून आचरण करविण्याच्या बाबतींत लोक व सरकारी अधिकारी यांची जबाबदारी मराठी राज्यांत कोणत्या प्रकारची होती हें उत्तम प्रकारें व्यक्त होत आहे. एखाद्यानें वर्ण अगर जातिविशिष्ट आचारा विरुद्ध आचरण केल्यास त्यास कोणत्या प्रकारचें शासन करण्यांत येत असे याचें एक उदाहरण आम्ही खालीं देतों. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांच्या लोकांनीं मुलीच्या लग्न समयीं वरा कडून द्रव्य घेऊं नये असा स्मृतीचा निर्बंध आहे. या निर्बंधास झुगारून देऊन ब्राह्मण वर्णाचे लोक मुलीच्या लग्नप्रसंगीं द्रव्य घेतात असें निदर्शनास आल्या वरून असल्या प्रकारचें वर्तन स्मृति धर्मा विरुद्ध असल्या कारणानें या बाबतींत सरकारी हुकूम हा प्रघात बंद पाडण्या करितां काढण्यांत आला. "पेशव्यांची रोजनीशी दुसरे बाजीराव" या रा. ब. वाडांच्या ग्रंथांतील २५९ पानावर हा लेख छापला आहे:—

इ. स. १७९८।१७९९ ब्राह्मण ज्ञातीमध्यें कन्या विक्रय कारितात व नवा वर्षांपुढें अविवाहित कन्या ठेवितात म्हणोन हुजुर विदित जाले. त्याजवरून हें पत्र तुह्मास सादर केले आहे. तरी तुह्मी गावगन्ना समस्त ब्राह्मणांचे घरीं कन्या विक्रय करूं नये व नवा वर्षांपुढें कन्या ठेऊ नये अशी निक्षून ताकिद करणे. येविशी अंतर पडल्यास कार्यास येणार नाहीं. असे असोन जो करील त्याची चौकशी पत्राची पैवस्तगिरी पासून बारकाईनें करून कन्या विक्रयाचा पैसा घेईल त्यास बाहिष्कृत कर्णे त्याची शुद्धता करणें ते मनास आणून हुजुर केली जाईल. ह्मणोन तालुके हाय व महाल निहाय तेथील माम-

लेदार यांस वगैरे, व समस्त ब्राह्मणांस कीं मामलेदारास अलाहिदा पत्र सादर केले असें तरी सदरहु लिहिल्या प्रमाणें करणे ह्मणोन चि पत्रें २ तालुके आंजनवेल निसबत रघुनाथ त्रिंबक, तालुके रत्नागिरी निसबत लक्ष्मणराव मामलेदारास, समस्त ब्राह्मणास. "

स्मृतींनें प्रतिपादिलेल्या धर्मास अनुसरून वरील हुकूम प्रसिद्ध करण्यांत आला होता असें या संबंधाची स्मृति वचनें लक्षांत घेतलीं असतां दिसून येणार आहे. मनुस्मृतीच्या ९ व्या अध्यायाच्या ९८ व्या श्लोकांत कन्या विक्रयाचा स्पष्ट निषेध केलेला आहे.

आददीत न शूद्रोऽपि शुल्कं दुहितरं ददन् ।
शुल्कं हि गृह्णय कुरुते छन्नं दुहित विक्रयम् ॥९८॥

अर्थः—" शास्त्र न जाणणाऱ्या शूद्रानें हि कन्येस देताना तिचें शुल्क घेऊं नये. कारण शुल्क घेणारा पिता गुप्त रीतीनें कन्या विक्रय करितो. "

वरील वचनास अनुसरून वरील हुकूम करण्यांत आला असला पाहिजे हें उघड आहे. आतां व्यवहारधर्मा विषयीं दोन तीन उदाहरणें आम्ही देतों. मनु, याज्ञवल्क्य इत्यादि ग्रंथांत आचार, व्यवहार, प्रायश्चित्त इत्यादि बाबती संबंधीं जे धर्म ग्रथित केले आहेत ते भरतखंडांतील चातुर्वर्णीय समाजांतील सर्व व्यक्तीस लागू आहेत. हा सामान्य सिद्धांत जरी खरा आहे तथापि भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रांतांतील लोकांची कांहीं विशिष्ट स्मृति-ग्रंथांस अनुसरून आचरण करण्याची प्रवृत्ति दिसून येते. याज्ञवल्क्य स्मृती वरील मिताक्षरा या नांवाच्या टीकेंत ग्रथित केलेल्या धर्मास अनुसरून वाग-ण्याची महाराष्ट्रीय समाजांत प्रवृत्ति आहे. मराठी राज्यांत कोणता हि व्यवहार उत्पन्न झाल्यास त्या व्यवहाराचा निर्णय मिताक्षरा ग्रंथांत सांगितलेल्या तत्त्वास अनुसरून करण्यांत येत असें. म. इ. सा. खंड १८ पान २१ वर बाजी बिन बानजी व कृष्णाजी बिन सिद्धोजी रणनोरे यांच्या मधील उपस्थित झालेल्या मलघ्याच्या मोकदमी बद्दलचा निवाडा दिला आहे. शके १५६४ सालांत दादोजी कोंडदेव व इतर सभानायक यांनीं वरील व्यवहाराचा निकाल केला. या निवाड्याचा थोडक्यांत सारांश असा आहे.:—

सिदोजी बिन बाकोजी व बानजी बिन बाकोजी हे दोघे भाऊ होते. वडील सिदोजी धाकटा बानजी. या उभयतांनीं मोकादमीचे पान व हक्क निमे निम वाटून घेतले. या नंतर सिदोजी वारला. त्याचे मागें त्याचा मुलगा एसाजी व त्याची बायको पुताई ही हयात होती. एसाजी हा पुताईचा पोटचा मुलगा होता. तथापि तिनें

कृष्णाजी या नांवाचा एक पाचा दिवसांचा मुलगा त्याची आई मेल्या कारणानें मुला प्रमाणें वाढविला होता. बानजीच्या पश्चात् त्याचा मुलगा बाजी हयात होता. सिदोजीच्या व बानजीच्या मरणानंतर त्यांचे मुलगे एसाजी व बाजी हे दोघे हि आपापले हिश्याच्या मोकदमीचें उत्पन्न निमेनिम उपभोगित होते. पुढें एसाजी मयत झाला. त्याचे मागें पुताई व तिचा पालक पुत्र कृष्णाजी हे दोघे हयात राहिले. तेव्हां बाजीनें तक्रार उत्पन्न केली कीं, " कृष्णाजीस वाटा होत नाहीं. तरी ए बाबे विदन्यानें स्वरीं जैसें असेल त्या प्रमाणें समानाईक थोर थोर सांगतील तेणें प्रमाणें वर्तउनु जरी वर्तउना तरी आपण दिवाणीचे गुन्हेगार व गोताचे अन्याई. या प्रमाणें उत्पन्न झालेल्या वादचा निकाल सभा नाईकीं खालिल प्रमाणें केला. बानजी व सिदोजी हे मोकादमींचे हक्क व मान पान दो ठाईं बराबरी वाटून खात. ते दोघेजण मेल्याबरही बाजी व एसाजी हे खात असेती. या उपेरी पुताईचे पोटीचा पुत्र एसाजी असता पुताईनें पालक पुत्र कृष्णाजी घेतला; तथीही बाजी व एसाजी हे दोघे वरी लिहिल्या प्रमाणें वर्तत होते. यावरी एसाजी निवर्तलिया उपरी बाजी ह्मणतो जेः—कृष्णाजी पालक पुत्र आहे. यास विभाग नेदी तरी जरी सिद्धोजी निवर्तलिया उपेरी त्याचे पोटीचा पुत्र असतां पुताईनें पालक पुत्र कृष्णाजी घेतला तरी बानजीचे संततीस सिदोजीचे विभागास समंधु नाहीं. बानजीचे व सिदोजीचे विभाग पूर्वीच जाहाले आहेती. विभाग जालिया उपेरी विभागाची धणीण सिदोजीची पत्नी पुताई ते तो विभाग आपण भक्षूं अथवा पालक पुत्रास देऊं. बानजीचे संततीस संमध नाहीं. एदर्थी वचने याज्ञवल्क्यः ॥

पत्नी दुहितरश्चैव पितरो भ्रातरस्तथा ।
तत्सुतो गोत्रजो बंधु शिष्य सब्रह्मचारिणः ॥ १ ॥
पिंडदोंशहरश्चैषां पूर्वाभावे परः पर इति ॥

वृद्धमनुरपि

पत्न्याः समग्रधनसंबंध वाक्ये ॥
अपुत्रा शयनं भर्तुः पालयंती व्रते स्थिता ॥
पत्न्येव दध्यात्सपिंडं कृत्स्नमंश लभेत च ॥

बृहत्मनुरपि

कुल्येषु विद्यमानेषु पितृभ्रातसनाभिषु ॥
असुतस्य प्रमीतस्य-पत्नी तद्भागभागिनी ॥

**अस्मिन्नेवार्थे विज्ञानेश्वरस्य उपसंहारफक्किकापि ॥**
**तस्माद् पुत्रस्य स्वर्यातस्य विभक्तस्यासंसृष्टिनोधनं परिणिता**
**स्त्री सकलमेव गृण्हांतीत स्थितमिती ॥**

ऐसी वचनें शास्त्रांचीं असेती. तरी शास्त्र व साक्षी प्रमाणें उभे वर्गी वर्तावे.

एणें प्रमाणें निवाडा केला असें. या खेरीज त्यांच्या वडिलाचें सेत मोकदमीचे मिरासीचे असेल तेही बाजी बिन बानजीनें व निमे कृष्णाजी बिन सिदोजीनें घेऊन लेकुराचे लेकुरीं खाऊन सुखें असणें. यासी जो हिला हरकती करून निवडिले प्रमाणें वर्तेना तेणे दिवाणातु होन ५०० व सिसे पाच देणे व गोताचे अन्याई. हा महजर सही.

हा महजर काजी परगणें पुणें, हवलदार पुणे, दादोजी कोंडदेव सुभेदार किले कोंढाणा, मुजुमदार परगणे पुणे, देशमुख परगणे पुणे व दुसऱ्या चार गावचे मोकदम यांच्या सभेनें ह्मणजे ज्या सभेस देशक सभा असें त्या काळीं ह्मणत असत तिनें केला आहे ही गोष्ट लक्षांत ठेवण्या सारखी आहे. ह्या निवाड्या वरून स्वराज्यांतील प्रजेंत उत्पन्न होणाऱ्या वादाचा निर्णय मिताक्षरा ग्रंथास अनुसरून करण्यात येत असे ही बाब सिद्ध होत आहे. मराठी राज्य लयास जाईतों पर्यंत महाराष्ट्रीय समाजांतील दोन व्यक्तींत उत्पन्न होणाऱ्या वादांचा निर्णय मुख्यत्वें करून मिताक्षरा ग्रंथात प्रतिपादिलेल्या धर्मास अनुसरून होत असे ही बाब सिद्ध करणारे अनेक निवाडे आज पावेतों उपलब्ध झाले असून त्या पैकीं कित्येक छापून प्रसिद्ध झाले आहेत. स्थल संकोचास्तव ह्या सर्व निवाड्यांची चर्चा प्रस्तुत स्थलीं आह्मांस करितां येत नाहीं त्यास आमचा उपाय नाहीं.

आतां मराठी राज्यांत स्मृत्यादिग्रंथांत राजधर्म प्रकरणीं ग्रथित केलेल्या धर्मास अनुसरून छत्रपतींच्या गादीवर अधिष्ठित होणारे पुरुष कितपत आचरण करीत या विषयीं आह्मी थोडी फार चर्चा करितों. छत्रपति शिवाजी महाराज व त्यांच्या पश्चात् शाहू छत्रपति व राजाराम छत्रपति यांचें मराठी राज्य स्थाप-

१ टीपः— भारत इ. सं. मंडळाच्या शके १८३६, १८३७ व १८३८ च्या वार्षिक संमेलन वृत्तांत " महाराष्ट्रांतील व्यवहार निर्णय पद्धति ' या मथळ्याखालीं या विषयासंबंधीं इतिहास साधन ग्रंथांतून आज पावेतों प्रसिद्ध झालेल्या वरील प्रकारच्या कागदपत्रांच्या आधारें आम्हीं जे लेख प्रसिद्ध केले आहेत त्या वरून प्रस्तुत चर्चेत जो सिद्धांत आम्ही नमूद केला आहे तो पूर्णपणें सिद्ध होत असल्याचें दिसून येणार आहे.

नेच्या व त्या राज्याचा विस्तार करण्याच्या बाबतींत कोणत्या प्रकारचें ध्येय होतें या विषयीं आह्मी मागें जी चर्चा केली आहे त्या चर्चे वरून स्मृत्यादि ग्रंथांत प्रतिपादिलेल्या राजधर्मास अनुसरून ते तिन्ही छत्रपति आचरण करीत असत हे सिद्ध झाले आहे. या चर्चेची पुनरावृत्ति या ठिकाणीं करण्याचें प्रयोजन नाहीं. परंतु शाहू छत्रपतींच्या कारकीर्दींत राजधर्मा संबंधीं उपस्थित झालेल्या एका महत्वाच्या मुद्याचा उल्लेख प्रस्तुत स्थळीं करणें जरूर आहे. कोल्हापुरकर संभाजी राजे यांनीं शाहू छत्रपती पाशीं राज्याचा वाटा मिळण्या बद्दल मागणें केलें होते. तेव्हां सभाजी राजे यांस शाहू छत्रपति यांनीं खालील उत्तर दिल्याचा बखरींत उल्लेख आहे:—

" तुह्मास दौलत पाहिजे ती आह्मी नवीन सिद्ध करून देऊं. अगर यांत खर्चास नेमणूक अधिक करून मागावी. राजाचा वाटा ह्मणणें हें पुराणांतरी ही जाहले नाहीं. हें बुद्धि धरूं नये. "

शाहू महाराजांनीं संभाजी राजे यास दिलेला हा जबाब राजधर्मास कितपत संमत आहे हा प्रश्न विचार करण्या सारखा आहे. शुक्र नीतींतील खालील वचनें या प्रश्नाच्या दृष्टीने फार महत्त्वाचीं आहेत.

राजकुले तु बहवः पुरुषा यदि सन्ति हि ।
तेषु जेष्ठो भवेद्राजा शेषास्तत्कार्यसाधकः ॥

अ. १ श्लो. ३४१

अर्थः—" राजाच्या घराण्यांत अनेक पुरुष असल्यास सर्वांत वडील असेल त्यास राजा करावें. इतरांनी त्याचे सहाय्यकारी व मदतगार व्हावें. "

जेष्ठोऽपि बधिरः कुष्ठी मूकोऽन्धः षण्ड एव यः ।
स राज्यार्हो भवेन्नैव भ्राता तत्पुत्र एवहि ॥

अ. १ श्लो. ३४३

अर्थः- " जर वडील बहिरा, मुका, महारोगी, क्लीब असेल तर तो राजा होण्यास योग्य नाहीं. मग राजाचा भाऊ अथवा वडील मुलाचा मुलगा यास राजा करावें. "

स्वकनिष्ठेऽपि जेष्ठस्य भ्रातुः पुत्रस्तु राज्यभाक् ।
यथाप्रजस्य चाभावे कनिष्ठा राज्यभागिनः ॥

अ. १ श्लो. ३४४

अर्थः- " वरचांच्या अभावीं वडील मुलाच्या खालोखाल असलेल्या मुलास अगर राजाच्या भावाच्या मुलास राजा करावे. श्रेष्ठाच्या अभावीं कनिष्ठ हे राजाचे वारस होतात. "

शुक्रनीतींतील वरील वचनें लक्षांत घेतली असतां कोल्हापुरकर संभा
राजे यांनीं राज्याचा वांटा मिळण्या बद्दल केलेल्या मागणीचा शाहू छत्रप
यांनीं अव्हेर केला तें राजधर्मास अनुसरून योग्य च केलें हें उघड होत आ
आतां विवाहित स्त्रियांच्या अनेक धर्मांपैकीं एका धर्मा विषयीं प्रस्तुत स्थ
चर्चा करणें जरूर आहे. रा. ब. वाड आणि पारसनीस यांनीं प्रसिद्ध केलल
"शाहू छत्रपति व पेशव्यांचे रोजनिश्यांतील उतारे" या ग्रंथावरून मरा
राज्यांत पतीच्या मरणा नंतर ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य वर्णाच्या कित्येक स्त्रि
सती जात असें दिसून येत. मृत पती बरोबर सहगमन करणें अथवा स
जाणें हें धार्मिक व पुण्यप्रद समजलें जात असे. शाहू छत्रपतींचें कुटुंब स
वारबाई त्या च प्रमाणें थोरले माधवराव पेशवे याचे कुटुंब रमाबाई यांनीं त्य
च्या पती बरोबर सहगमन केल्याचें सर्वश्रुत आहे. मनुस्मृती मध्यें पतीच
मरणा नंतर स्त्रीनें सहगमन करावें असा उल्लेख नाहीं. परंतु महाराष्ट्रीय सम
याज्ञवल्क्य स्मृती वरील ज्या मिताक्षरा टीकेस सर्वमान्य समजतो त्या ग्रंथ
सती जाण्याच्या प्रघाताचा स्पष्ट उल्लेख आलेला आहे. विवाह प्रकरणांतील ८
व्या श्लोका वरील टीकेंत खालील उल्लेख आला आहेः—

"पतीच्या मरणा नंतर स्त्रीस दोन मार्ग असतात. एक त्याच्या बरो
सती जाणें व दुसरा यावज्जीव ब्रह्मचर्य व्रताने राहणें. या श्लोक
या दुसऱ्या पक्षीं स्त्रीचे कर्तव्य काय ते सांगितले आहे. पती बरोबर अन्वा
हण केलें असतां त्या स्त्रीपुरुषांचा परलोकीं मोठा अभ्युदय होतो. या विष
व्यास, शंख, अंगीरस, हारित इत्यादि स्मृतिकारांची अनेक वचनें प्रम
आहेत. हा सहगमन धर्म चांडाल स्त्री पर्यंत सर्वांस सारखा च सांगितले
आहे. ब्राह्मण स्त्री विषयीं जीं निषेधपर वचने आढळतात तीं ब्राह्मण स्त्र
पतीच्या चिते वाचून अन्य पृथक् चितेंत देह विसर्जन करूं नये अशा विष
आहेत. आतां सती जाणे ही एक आत्महत्त्या होय असें कोणी ह्मणेल पण त्य
कांहीं अर्थ नाहीं. कारण क्षत्रियाच्या सन्मुख मरणा प्रमाणें किंवा प्राये
वेशनादि व्रताप्रमाणें हे एक काम्य व्रत आहे व अधिक सुखा करितां क्षणि
दुःख सहन करण्यास तयार होणे हा मनुष्यमात्राचा धर्म आहे. तस्मात् स
जाणें ह्मणजे आपला देह जाळून घेणें असा जरी त्याचा खरा अर्थ असला त
तें कृत्य शास्त्रविहित असल्यामुळें व दोष आणि अदोष हें शास्त्रावरून
सिद्ध होत असल्यामुळें परम श्रद्धाळु स्त्रीने आपल्या प्राणाहून प्रिय प
बरोबर सहगमन केल्यास त्यांत धर्मदृष्ट्या अगर शास्त्रदृष्ट्या कांहीं दोष ना

तेव्हां स्वर्ग सुखाच्या दृढ भावनेने जिनें शरीरत्यागा सारखा विलक्षण स्वार्थत्याग केला आहे तिला पतीसह स्वर्गसुख मिळणे अगदीं अवश्य व न्याय्य आहे, हे निराळे सांगावयास नको च. आतां जिला स्वर्गसुखाची इच्छा नसेल व जी केवळ मुक्त होण्याची च इच्छा करीत असेल तिनें सह गमन न करितां ब्रह्मचर्यादि इतर साधनांनीं युक्त होऊन चित्त शुद्धि संपादन करावी. ' ( बापटकृत मिताक्षरा टीकेचें भाषांतर पा. २२ )

वरील उताऱ्यात दर्शविल्या प्रमाणें मृत पती बरोबर सहगमन करणे हें स्वर्गसुख संपादन करण्याचें एक धार्मिक काम्य व्रत त्या काळीं समजत असत. स्त्रीची इच्छा नसता तिला मुद्दाम सती जाण्याची जबरदस्ती केल्याचीं उदाहरणे त्या काळीं क्वचित च घडत असलीं पाहिजेत. प्रस्तुतच्या सुधारणेच्या युगात सुसंस्कृत समजल्या जाणाऱ्या पाश्चात्य राष्ट्राच्या पक्तीस बसलेल्या जपानी राष्ट्रात जपानी बादशाहाच्या निधना नंतर मार्शल नोगी सारख्या योद्धयाने आपला देह बळी दिल्याचे उदाहरण कांहीं वर्षां पूर्वी घडलेलें आहे. मार्शल नोगीनें ज्या उच्च भावनेनें प्रेरित होऊन स्वदेहाचा बळी दिला तशा च प्रकारच्या उच्च भावनेने प्रेरित होऊन महाराष्ट्रीय समाजांतील कांहीं स्त्रिया मराठी राज्यांत आपल्या मृत पती बरोबर सहगमन करीत असत. स्वराज्याची स्थापना होण्या पूर्वी मुसलमानी सत्ते खालीं सती जाण्याचा प्रघात बंद करण्यांत आला होता. परतु स्वराज्याची स्थापना झाल्या नंतर वरील प्रघात स्मृतिधर्मास संमत असल्या कारणाने तो फिरून सुरू झाला हें उघड आहे.

आतां प्रायश्चित्त धर्माच्या बाबतींत त्या काळीं कोणती व्यवस्था अस्तित्वात होती हे दर्शविणारी एक दोन उदाहरणे आम्हीं देतोः– शाहू छत्रपति वाड भाग १ पान २२८ वर खालील नोंद आढळतेः–" इ. स. १७५२-५३ राणोजी धुमाळ पाटील मौजे सोनके समत वाघोली प्रांत वाई याने बनाम उदी आंबाजी निकम या जवळीं मौजे पठार प्रांत मजकूर येथें विकत घेतली, चार वर्षे त्याचे घरीं आहे. अंबाजी निकम कोणीकडे गेला याचा थांग न लागे. ती बटीक हैबतजी सरक वस्ती मौजे तावबे प्रांत फलटण याची पळोन मुधोजी नाईक निंबाळकर याच्या घरास गेली. तेथून काढून अंबाजी निकम याणे आणून विकली. ती हैबतजी सरक यानें आपली उमगली आणि राणोजी पाटील पासून नेली. परतु त्यानें सांगितलें कीं, ती बटीक बाटगी मुसलमानाचा अन्न व्यवहार केला होता असे सांगितले त्या वरून राणोजी पाटील यास प्रायश्चित्त द्यावया विशीं पत्र."

खालील दुसरी नोंद ही महत्वाची आहे. शाहू छत्रपति वाड भाग १ पान २२६ पंक्तीपावन करून घेण्या विषयीं आज्ञापत्रः—

" इ. स. १७५२-५३. मोकदम मौजे अंगापूर तर्फ वंदन यासी आज्ञा नागोजी बीन नरसोजी कपशे परगणे मौजे मजकूर याचा चाकर पिराजी जाधव गावांत आंब्याचें झाड होतें त्यावर आंबे तोडावया चढला. त्यास झाडाखालीं मौजे मजकुरच्या चांभाराची पोरगी उभी होती. त्यास मौजे बारणे येथील महार झाडाखालीं आले, त्यास जाधव मजकुरानें झाडाखालीं उडी टाकून पळाला. त्यास चांभाराची पोरगी दोघे एके जागी पाहिली. त्यावरून माहारांनीं जाधवावर चांभारणीचें तुफान केलें त्यावरून किल्ले सातारियास वर्तमान कळलियावर किल्लेकरी यांणीं माणसे पाठवून तहकिकात करितां गोष्ट लटकी जाहली. त्यास जाधव मजकूरास गोतानें दिक्कत घेतली त्यावरून किल्लेकरी याणी हुजुर विदित केले त्यावरून हे आज्ञापत्र तुम्हास सादर केलें असें. तरी भोवरगाव मौजे मजकुरचे गोत मिळोन पिराजी जाधव यास पंक्तीपावन करणें. त्याजकडे कांहीं लिगाड नाहीं. त्याचा हुजुर येऊं न देणे. १ मोकदम मौजे अंगापूर १ राजश्री रगोजी मोहिते किल्ले सातारा.

अशा च प्रकारचीं शेकडों उदाहरणें त्या काळच्या प्रसिद्ध झालेल्या कागदपत्रांतील देतां येतील. सवाई माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दीत तोतयाचें बंड माजले होतें. ते वेळीं तोतया ज्या ज्या प्रांतांत गेला तेथें त्यांस मेजवान्या झाल्या व अनेक प्रतिष्ठित गृहस्थांनीं त्यांच्या पंक्तीस बसून भोजन केले. पुढें कांहीं दिवसा नंतर तोतया उमगला जाऊन त्यांचे खरे स्वरूप कळून आलें. नंतर तोतया बरोबर अन्न व्यवहार केलेल्या सर्व लोकांस प्रायश्चित्त देण्याचा हुकूम होऊन त्या प्रमाणें प्रायश्चित्तें देण्यांत आलीं. भा. इ. स. म. शके १८३५ च्या संमेलन वृत्तांत तोतयाशीं पंक्तीव्यवहार घडल्या बद्दल ज्या गृहस्थास प्रायश्चित्तें देण्याचा हुकूम झाला त्यांची व त्यांना घ्यावयाच्या प्रायश्चित्तांची यादी प्रसिद्ध करण्यांत आली आहे. वरील उदाहरणावरून श्रुतिस्मृतिप्रणीत आचारधर्मा विरुद्ध आचरण करणाऱ्या व्यक्तीस मराठ्यांनीं स्थापिलेल्या स्वराज्यांत धर्मशास्त्रान्वयें प्रायश्चित घेण्यास भाग पाडण्यांत येत असे ही बाब सिद्ध होत आहे. याज्ञवल्क्य स्मृतीच्या प्रायश्चित्त प्रकरणांत गोवध हें एक उपपातक सांगितलें आहे, व या पातकास प्रायश्चित्त हि सांगितले आहे. या शिवाय गोवध करणारास कडक शासन हि करण्यांत येत असे. गोप्रतिपाल या सदराखालीं आम्हीं जी चर्चा केली आहे ती वरून गाई

विषयीं मराठी राज्यांत किती पूज्यभाव बाळगीत असत हें दिसून येतें. हा पूज्यभाव लक्षांत घेतां गोवध करणारास कडक शासन मराठी राज्यांत देण्यांत येत असे यांत आश्चर्य करण्या सारखें कांहीं च नाहीं. वाड भाग ८ सवाई माधवराव पेशवे भाग ३ पान ११६ व १२१ त्या च प्रमाणें वाड भाग ७ थोरले माधवराव पेशवे भाग २ पान २१२ वर गोवध करणारास कोणत्या प्रकारच्या शिक्षा दिल्या जात हें दर्शविणारीं उदाहरणें आहेत. गोवध करणारास कैदेची शिक्षा देण्याचा प्रघात त्या काळीं होता असें या उदाहरणां वरून दिसून येतें. कांहीं मांगांनीं रानांत गाई मारल्या बद्दल त्यांचे हात तोडण्याची शिक्षा दिल्या बद्दलचें हि एक उदाहरण आढळून येतें. गोवधा पेक्षां हि मोठें असें मद्य पिणें हें एक पंच महापातक स्मृतिधर्मा प्रमाणें ठरलें आहे. यास्तव दारू पिणारास मराठी राज्यांत अत्यंत कडक शासन करण्यांत येत असें. दारू फार थोडी पाडण्यांत येत असे. वाड भाग ३ बाळाजी बाजीराव भाग १ पान ३३२ वर प्रांत फिर्गाण येथें दारू पाडण्याची इ. स. १७५४।५५ मध्यें सरकारांतून मनाई करण्यांत आली होती. पुढें तो हुकूम फिरविण्यात आला. त्या हुकूमाच्या शेवटील खालचें वाक्य फार महत्वाचें आहे. “ तरी भंडारी यांणी माड ताड वाहावें. सऱ्याच्या भट्या लावून सरा रयत खलकास विकावा. चाकर माने लोकास विकत न द्यावा. व जाजती सरा द्यावयाचा अधिकार नाहीं. ब्राह्मण, प्रभु, शेणवी, त्यास सरा विकत न द्यावा, व फुकट न द्यावा. येणे प्रमाणें परिच्छिन्न कैद चालविणें. यांत अंतर झालीया पारिपत्य होईल. ”

महाराष्ट्रांतील ब्राम्हण, प्रभु, शेणवी इत्यादि वरिष्ठ जातीच्या लोकांस दारूच्या व्यसना पासून अलिप्त ठेवण्याच्या बाबतींत कोणत्या प्रकारची खबरदारी मराठी राज्यांत घेण्यांत येत असे हें वरील हुकूमा वरून दिसून येतें. आतां दारू पिणारास त्या काळीं किती कडक शासन करण्यांत येत असे हें दर्शविणारें एक उदाहरण आम्ही येथें देतों. विठोजी बिन सुलतानजी सातकर पाटील कसबे खेड प्रात जुन्नर यास दारू प्याल्या बद्दल दहा हजार रुपये दंड करण्यात आला. तेव्हां बाळाजी पलांडे यानें तो फिरून दारू पिणार नाहीं; दारू प्यायलेला सापडल्यास त्याच्या कडून दहा हजार रुपये दंड घ्यावा अशी रदबदली केल्या वरून त्याच्या कडून दंड घेण्यांत आला नाहीं. या नंतर कांहीं

दिवसांनीं पुण्यास कोतवाल चावडी नजीक तो दारू प्यायलेला सांपडला. तेव्हां त्याच्या कडून दंड घ्यावयास साधन नसल्या मुळें त्याचें पाटीलकी वतन जप्त करण्यांत आलें.

**ब्रह्महत्या सुरापानं स्तेयं गुर्वङ्गनागमः ।**
**माहान्ति पातकान्याहुः संसर्गश्चापि तैःसह ॥**

( मनु. अ. ११ श्लो. ५४ )

अर्थः—" ब्रह्महत्या, मद्यप्राशन, सुवर्णाची चोरी, गुरुस्त्रीशीं गमन हीं चार कृत्यें करणें व हीं कृत्यें करणाराशीं संसर्ग ठेवणें हीं पाच महापातकें आहेत. "

ह्या वचना प्रमाणें दारू पिणें हें पंचमहा पातकां पैकीं एक पातक असल्या कारणानें वरील प्रकारचें कडक शासन त्या काळीं करण्यांत येत असे यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

स्वराज्य स्थापना होण्या पूर्वी महाराष्ट्रांत विधर्मी मुसलमानांचा अंमल असल्या मुळें चातुर्वर्णिया पैकीं कोणी हि श्रुतिस्मृत्युक्तधर्माच्या आचारा विरुद्ध आचरण केल्यास त्या बद्दल त्यास राजसत्ताधिकाऱ्या कडून कोणत्या हि प्रकारचें शासन होण्याची भीति नव्हती. या मुळें आचारधर्मास फार च मलीनता आली होती. स्वराज्य उर्फ धर्मराज्यस्थापन झाल्या नंतर ही मलीनता नष्ट करणें हें एक जरूरीचे व महत्वाचें कार्य झालें व हें कार्य प्रायश्चित्त धर्म अमलांत आणून साध्य करण्यांत आलें. श्रुतिस्मृतिप्रणीतधर्मस्थापना हें च मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेचे व विस्ताराचें ध्येय होतें ही बाब श्रुतिस्मृत्युक्तधर्माचीं आचार, व्यवहार, प्रायश्चित्त, राजधर्म, स्त्रीधर्म इत्यादि जीं प्रमुख अंगें त्या सबंधाचीं कांहीं उदाहरणें देऊन आम्हीं सिद्ध केली आहे. आतां आम्हीं दर्शविलेल्या वरील सिद्धांतास बळकटी आणणारा एक महत्वाचा लेख आम्ही येथे देऊन या मुद्याची चर्चा पुरी करितो. समर्थ रामदासांच्या " मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा " या सुप्रसिद्ध उक्तीचा यापूर्वी अनेक वेळा आम्हीं उल्लेख केला च आहे. मराठ्यांनी स्वराज्याची स्थापना केल्या नंतर " महाराष्ट्र धर्म वाढवावा " या समर्थांच्या उक्तीतील उपदेश कोणत्या रीतीनें पार पाडण्यांत येत असे याची उत्तम कल्पना या लेखा वरून होणार असून धर्मस्थापना हें च स्वराज्यस्थापनेचें मुख्य ध्येय होतें ही बाब हि या लेखा वरून सिद्ध होणार आहे. हा लेख म्हणजे यशवंतराऊ पवार यानीं

कमाविसदार वर्तमान भावी प्रा धार व धर्मपुरी व बदनार व कोठडे यांस लिहिलेलें आज्ञापत्र हें होये.

राजश्री कमाविसदार वर्तमान भावी प्रा धार व धर्मपुरी व बदनार व कोठडे गोसावी यासी.

अखंडित लक्ष्मी ( त ) अलंकृत राजमान्य स्नो यशवंतराऊ पवार दंडवत सु॥ इसने खमसैन मया अलफ प्र॥ मजकुरी पूर्वी यवनाचा अमल होता त्यामुळें ब्राम्हणाचा कितेक आचार लोप झाला त्यांस पुनरोक्त ब्राम्हणाचा आचार यथा पद्धत ज्या वेदींचे ब्राम्हण त्या पद्धतीनें चालावा ये विशी कुल श्रीाष्ठित ताकीद श्रीमंत राव पंत प्रधान स्वामी यांनी वेदमूर्ती राजेश्री मधुभट द्विवेदी वास्तव्य कसबेधार २ रेवातीर यांसी आज्ञा केली जे ब्राम्हणापासून यथा पद्धत आचार चालविणें ये विशीचा अर्थ प्रकर्ण करून यादी आलाहिदा करून दिली असे त्यावरून हें पत्र तुम्हास सादर केले असे जे वेदमूर्ती मजकूर अगर त्यांचे गुमास्ते प्र॥ मजकुरी येतील त्याचे विध्यमाने स्वधर्माचा न्याय मनास आणून सदहू यादीप्रमाणें यथापद्धतीनें चालविणें उजूर न करणें.

मोर्तब सूद

श्री ०
भवानी शंकर
चरणी तत्पर आनंदराव सुत यशवंत
राव पवार निरंतर

शके १६७३

यादी धर्मस्थापना शास्त्रप्रमाण वेदपुरुपाज्ञाप्रमाण नाना धर्म प्रवृत्त होत नाना स्थली

श्री ०
श्री भवानी शंकर चरणी तत्पर आनंदराव
सुत यशवंतराव पवार
निरंतर

शके १६७३

---

१ टीप:—हा लेख "महाराष्ट्रीय संस्कृतीचा उत्तर हिंदुस्थानावर परिणाम" या रा. काशिनाथ कृष्ण लेले यांच्या निबंधाच्या पान पंधरावर छापला आहे. या लेखांत शक १७९२ चुकीनें छापला आहे. लेखांत मुसलमानी सन नमूद केला आहे. त्यावरून लेखाचा शक १६७३ हा आहे

गोत्र प्रवर शाखा सूत्र वेदमंत्रपूर्वक स्नान संध्यादिक आन्हीक कर्म करावें; पूर्व संप्रदाय टाकावा.

ब्राम्हण जातीनें घरीं जवाळी मुचीची केली न घालावी. आपले घरी करून घालावी. ब्राम्हण जातीनें एकदशाह द्वादशाह भोजन न करावे. तेरावे दिवशीं ब्राम्हण सुखरूप भोजनास घालावे.

सौभाग्यवती स्त्रीनें काचळी धरावी, लाखेचा व नरोटीचा चुडा न धरावा.

सौभाग्यवती ब्राम्हण स्त्रीचे पंगतीमध्यें विधवेनें मधी बसोन भोजन न करावें.

सौभाग्यवतीनें विधवेचे पंगतीस भोजनास न बसावें.

विधवा स्त्रीनें सेंडी धरून विष्णु पूजन करितात ते सेंडी सोडावी; निर्मल मुंडण करावें.

ब्राह्मणाहीं विवाहामध्यें नवऱ्या नवरीचे पाई [1]मोत्रें घालून वैदिक कर्म न करावें कलम १

१ विवाहामध्यें षोडष संस्कारामध्यें ब्राह्मणजातीही भांड अपशब्दाचारणपूर्वक ब्राह्मण स्त्रीनें [2]माणि न धरावे. वेद मंत्रोच्चारणपूर्वक सकल कर्मे करावी.

गोत्र प्रवर सापिंड निर्णय पूर्वक स्वसूत्रोक्त वेद मंत्रे करून विवाहादिक षोडष संस्कार करावे : पूर्व संप्रदाय टाकावा.

ब्राह्मण जातीच्या समस्त विधवा स्त्रीनें प्रथम रजो दर्शन झाल्या नंतर केश मस्तकीं व आभूषण व चोळी काचोळी लहंगा न धरावी. एकवस्त्र सकच्छ धारण करावे.

सौभाग्यवती ब्राह्मण स्त्रीनें [3]नाडे मस्तकीं न बांधावे.

सौभाग्यवती ब्राह्मण स्त्रीनें गळ्यापासून मस्तक पर्यंत यथा सामर्थ्य सुवर्ण आभूषण धरावे; रुप्याचे नग मस्तकीं न धरावे.

सर्व ब्राह्मणाहीं ब्राह्मणापासून वेद मंत्राचा उपदेश घ्यावा. दंडी

---

१ टीप-मोत्रे=जोडे.

२ टीपः—मारवाडी वैश्य ज्ञातींत लग्नाच्या वेळीं मुलीचे हातावर माणीक ठेऊन त्यावर नवऱ्या मुलाचा हात ठेवण्याचा रिवाज आहे. हल्लीं माणका ऐवजीं रुपया ठेवतात.

३ टीपः— रंगित सुताच्या नाड्या वेणींत घालण्याचा मारवाडी वैश्य ज्ञातीच्या बायकांत प्रघात आहे.

सन्यासी जटिल गोसावी बैरागी मात्मसाद असे पाखंडी आहेत त्याचा त्याग मंत्र अथवा त्यांचे आज्ञेमध्यें न चालावें त्यांचा त्याग करावा.[1]

ब्राम्हण जातीनें ब्राम्हणापासून उपदेश घ्यावा.[2]

ब्राम्हण जातीनें आपली कन्या विक्रय करून विवाह न करावा.[3]

सकल ब्राम्हण जातीनें विवाहामध्यें तोटियाचा खेळ न करावा.[4]

---

१ टीपः– बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब पेशवे यांस दिक्षीत घराण्यांतील पुरुषानें केलेल्या खालील उपदेशाचे स्मरण वाचकांस करून देणें जरूर आहे. "कोणी मंत्रशास्त्री भेटतील आणि कांहीं अनुष्ठान करा म्हणतील तर ते गोष्ट न करणें, कोणाचा मंत्र न घेणे, शीव पूजन व विष्णू पूजन व गायत्रीचा जप व वेदोक्त अनुष्ठानें करीत जावे" इत्यादि.

२ टीपः– दासबोधांतील खालील वचनांचें स्मरण प्रस्तुत स्थळीं वाचकांस करून देणें जरून आहे.

नीच यातीचा गुरु । तोहि कानकोंडा विचारु ।
ब्रह्म सभेस जैसा चोरु । तैसा दडे ॥
ब्रह्म सभे देखतां । त्याचे तीर्थ नये घेतां ।
अथवा प्रसाद सेवितां । प्राश्चित पडे ॥
तीर्थ प्रसादाची सांडी केली । तेथें नीचता दिसोन आली ।
गुरुभक्ति ते सटवली । येका येकी ॥
गुरूची मर्यादा राखतां । ब्राह्मण क्षोभती तत्वता ।
तेथें ब्राह्मण्य रक्षूं जातां । गुरुक्षोभ घडे ॥
ऐसीं सांकडीं दोहीकडे । तेथे प्रस्तावा घडे ।
नीच यातीस गुरुत्व न घडे । या कारणे ॥
तथापि आवडी घेतली जीवें । तरी आपण चि भ्रष्टावें ।
बहूत जनांसी भ्रष्टवावें । हें तों दूषण चि कीं ॥
आतां असो हा विचारु । स्वयातीचा पाहिजे गुरु ।
नाहीं तरी भ्रष्टाकारु । नेमस्त घडे ॥ ५८-६४ द. ५ स. २

३ टीप.–मनुस्मृति अध्याय ९ श्लोक९८ व मागील पान वरील दुसरे बाजीराव पेशवे यांच्या कारकीर्दीतील या संबंधाचा हुकूम पहा.

४ टीपः– तोटियाच्या खेळाचा खुलासा येथें करणें जरूर आहे. मारवाडी वैश्य ज्ञातींत नवरा मुलगा नवरी मुलीच्या गावीं लग्नास गेला असतां नवऱ्या मुलाच्या घरच्या बायका गांवीं च राहतात, व कोणत्या तरी एका बाईस पुरुषाचा वेश देऊन पुरुष वेश दिलेल्या बाईच्या व त्याची बायको म्हणून ठरविण्यांत आलेल्या दुसऱ्या एका बाईच्या

[ पुढील पानावर पहा.

नवऱ्या नवरीहीं घरोघरीं बाना[1] न जेवावे, लहान मुलासहित समस्त ब्राम्हणास कलम १

सकल ब्राह्मण यांचे स्त्रीनें स्वयंपाक करते वेळेस, भोजन करते वेळेस दर्याशची चोळी घालावी किंवा धूत वस्त्र सोवळयात घालावें. ते चोळी वस्त्र धारण करावी.

स्नान करून अस्पर्श धौत वस्त्र परिधान करून संध्या व ब्रह्मयज्ञ तपर्ण वैश्वदेव भोजन करावे. पूर्व रीत टाकावी.

ब्राह्मण जातीनें प्रथम मागणी न करावी. तत्काल विवाह[2] करावा.

सौभाग्यवती ब्राह्मण स्त्रीनें चोळी धरावी. काचोळी टाकावी.

सौभाग्यवती ब्राह्मण स्त्रीनें काशा पितळेचे बिछवे[3] न धरावे रुपयाचे धरावे.

ब्राम्हणाहीं उदक व स्त्रियांनीं खांद्यांवरी व कडे वरी आणावें. मस्तकीं जल न आणावा.

ब्राम्हण जातीनें आटासाटा[4] न करावा.

---

पदरांची गाठ देऊन नवरा नवरी प्रमाणें त्यांना मिरवीत त्या च गांवांतील त्यांच्या सोयऱ्यांच्या घरी घेऊन जातात. तेथे एका लाकडाच्या चिमणीस लिंबाच्या झाडाच्या फांदीने ते वेषधारी नवरा नवरीचे जोडपे मारतें. नंतर घरीं आल्या वर शिमग्यांतील रिवाजा प्रमाणे हे नवरा नवरी अचकट विचकट शिव्या परस्परांस देतात व स्त्री पुरुष समागमाची बतावणी सर्व बायका समक्ष करतात. या प्रकारास तोटियाचा खेळ असें म्हणतात. मारवाडी वैश्य ज्ञातीचे अनुकरण म्हणून या खेळाचा मारवाडी ब्राह्मण ज्ञातींत शिरकाव झाला असला पाहिजे हें उघड आहे. स्मृतिग्रंथांत सांगितलेली ब्राम्हविवाह पद्धति सर्वात श्रेष्ठ असून अगदीं साधी व वरील प्रकारच्या आचरट व नीतीचा बिघाड करणाऱ्या रिवाजा पासून अलिप्त आहे. ब्राम्हणांचे स्मृत्युक्त आचार मारवाडी ब्राम्हण ज्ञातींत प्रवृत्त व्हावेत या हेतूनें हें कलम या हुकूमांत नमूद केलें आहे, हे उघड आहे.

१ टीपः— बाना म्हणजे लग्न झाल्या वर नवरानवरीनें दुसऱ्या कडे जेवावयास जाणें.

२ टीपः—मारवाडी वैश्य ज्ञातींत प्रथम मागणी करितात. त्यास मागणी कुंकू म्हणतात. त्या नंतर बऱ्या च दिवसांनीं लग्न लावतात. मारवाडी ब्राम्हण वैश्यांच्या या रिवाजाचे अनुकरण करून त्या प्रमाणे वागत असत.

३ टीपः-बिछवे=जोडवीं.

४ टीपः-एकास आपली मुलगी देऊन त्याच्या घराण्यांतील मुलगी आपल्या घराण्यांत करणें यास आटासाटा म्हणतात.

ब्राम्हण जातीनें पेडा देडा दान न करावे.

ब्राम्हणास ज्यास जेवावयास सांगितलें त्यानें जावें; पोरास समागमें न न्यावें.

ब्राह्मण-भोजन व स्त्री-सवाशीण भोजन या मध्यें विधवा पंक्तीस नसावी.

समस्त ब्राम्हण जातीनें निव्हाउ न करावे.

समस्त ब्राह्मण जातीनें मृत प्राण्याचे उत्तरक्रीया शास्त्रा प्रमाणें करावें.

यज्ञोपवीत राहाटाचें सुताची न करावी; आपले स्वहस्ते सूत काढून करावी. आणि धारण करावे समंत्रक.

ब्राम्हण जातीनें ब्राम्हणोदके करून सर्वदा स्नान करावें.

समाराधनादिक करावी; तेथे शूद्रोदक नसावे.

सर्व ब्राम्हण स्त्रीनें सव्य लुगडे नेसून कच्छ धरावा. लहंगा टाकावा.

सर्व ब्राम्हणाहीं जेवते समई एकास एकानें स्पर्श न करावा.

सौभाग्यवती स्त्रियाही सौभाग्यवती स्त्रीनें स्पर्श न करावे.

सकल ब्राम्हण जातीनें सात वर्षा नंतर दाहा वर्ष पर्यंत तत्काल विवाह करावा.

ब्राम्हण जातीने ज्या गांवीं वधु असेल तेथें सह कुटुंब जाऊन तेथें मंडप घालून देव प्रतिष्ठा करून लग्न संपादावे.

ब्राम्हणाही ब्राम्ह विधीनें विवाह करावा.

समस्त ब्राम्हण याचे पुत्राने वेदाध्यन करावें.

समस्त ब्राह्मणाही षोडश कर्म सांगता सिध्यर्थ ज्या ज्या संस्कारी यथा सामर्थ्य ब्राह्मण जेऊं घालावे.

समस्त ब्राह्मणाही भोजन कर्मांचें ठाई पवित्र होऊन स्वयंपाक करावा ; पक्वान्ने पापड लोणचे आदि करून.

समस्त ब्राह्मणाहीं विवाहामध्यें नवऱ्या नवरीचे मस्तकीं पुष्पमाला बांधाव्या. मुन्चियाचें घरचे मोर्ड न बांधावे.

समस्त ब्राह्मणाहीं समाराधना व पितृकार्य व विवाह कार्याचे स्वयंपाक करणें तो स्वयंपाक करणार याणीं उपोषण असतां पाक करावा. अथवा पीठ भक्षावयासी घ्यावे.

---

१ डीपः-पिंपळ पानाच्या मुंडावळी.

समस्त ब्राम्हण जातीचे स्त्रीनें गुलेचे वस्त्र एकंदर न धरावें.

जो ब्राह्मण मरेल त्याचे स्त्रीचे केश प्रथम अथवा दाहावे दिवशीं काढावे तेव्हां शुद्ध. समस्त ब्राह्मण स्त्रिया यांणीं प्रत्यहीं स्नान सवस्त्र करून वस्त्रें नित्य धुवोन परिधान करावीं. चोळी व लुगडी व सोवळीं धुवोन ठेवावीं.

जो ब्राम्हण अनाचार न सोडी त्यास वालीत घालावें.

यथोक्त प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून घ्यावे.

समस्त ब्राह्मण याचे पितृकार्यां वेदपाठी ब्राह्मण सांगावे. भोजनास समस्त ब्राह्मणाहीं पितृकार्यांचे ठाईं ब्राह्मण बोलाविले असतील तितके जेऊं घालावे.

ब्राम्हणांनीं शुद्राचे घरीं विवाहादिक कर्म मरणांत कर्म शूद्र कमलाकर ग्रंथ प्रमाण करावे. वेद प्रमाण न करावे.

धर्माचरणरीत्या धरून येणें प्रमाणें चालावें. मोर्तबसूद

चातुर्वर्णीय समाजांत ब्राम्हण वर्णाची प्रजा ही श्रेष्ठ स्थानीं असल्या कारणानें तिचे आचार तंतोतंत श्रुतिस्मृत्युक्तधर्मास अनुरूप असणें ही बाब अत्यंत महत्वाची आहे. वरील आज्ञापत्रांत नमूद केल्या प्रमाणे धार, बदनार वगैरे प्रातांत यवनांचा अम्मल असल्यामुळें मारवाडी ब्राम्हण ज्ञातीच्या लोकांच्या आचारांचा लोप झाला होता. अशा स्थितींत स्मृत्युक्त धर्मास अनुरूप असे आचार त्या प्रांतांतील ब्राह्मण प्रजेत रूढ करण्याची जबाबदारी धर्मराज्याची स्थापना करणारे व धर्मप्रसारार्थ स्वराज्याचा विस्तार करणारे या नात्याने मराठ्यां वर आली व ही जबाबदारी पार पाडण्या करितां पेशव्यांनीं वरील आज्ञापत्र काढलें हें उघड आहे. या पत्रांत ज्या आचार विषयक बाबी नमूद करण्यांत आल्या आहेत त्यां पैकीं कित्येक स्मृतिग्रंथांत सांगितलेल्या आचारास अनुरूप अशा आहेत. कांहीं बाबी स्मृतिग्रंथांत ग्रथित केलेल्या नसून पुणें प्रांतांतील ब्राह्मण प्रजेंत जो शिष्टाचार समजत त्यात अंतर्भूत होणाऱ्या आहेत. स्वराज्याची स्थापना केल्या नंतर ज्या ज्या प्रांता वर मराठ्यांनीं स्वाऱ्या करून तो स्वराज्यांत सामील केला त्या त्या प्रांतांतील पुरातन कागदपत्रांचें पुढें मागें संशोधन झाल्यास वरील स्वरूपाचीं आज्ञापत्रें निःसंशय सांपडल्या खेरीज राहणार नाहींत. स्वराज्य प्रसारा बरोबर श्रुतिस्मृत्युक्तधर्माचा प्रसार असा मराठी राज्याचा दंडक होता ही गोष्ट वरील लेखा वरून पूर्ण पणें सिद्ध झाली आहे. श्रुतिमृत्युक्तधर्मस्थापना हें मराठ्यांच्या

राजसत्तेचें ध्येय नसतें तर वरील आज्ञापत्रांत दृग्गोचर होणारी योजना अमलांत आणण्याचा खटाटोप करण्याच्या भानगडींत महाराष्ट्रीय राजकारणी पुरुष कधीं हि पडले नसते. याज्ञवल्क्य स्मृती वरील मिताक्षर टीका व त्या नंतर महाराष्ट्रांत आचार विषया वर रचल्या गेलेल्या निबंध ग्रंथांच्या आधारें वरील आज्ञापत्रांतील बहुतेक बाबी श्रुतिस्मृत्युक्त धर्मास अनुसरून आहेत असे सहज रीतीनें सिद्ध करून देतां येईल. परंतु आतां पावेता नमूद केलेला दुसरा पुरावा आमच्या सिद्धांतास बळकटी आणण्यास इतका भरपूर आहे कीं या मुद्याची इतकी बारीक चर्चा करण्याचे प्रयोजन राहिलेले नाहीं.

ह्या प्रकरणाच्या सुरवाती पासून तों येथ पावेतो महाराष्ट्र धर्मस्थापना हें च मराठ्याच्या स्वराज्य स्थापनेचे व प्रसाराचे ध्येय होते ही बाब सिद्ध करणारा त्या च प्रमाणें महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ व या संज्ञेत समाविष्ट होणाऱ्या बाबीं विषयींचा खुलासा ज्याच्या योगाने होईल असा महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी व हरिकथा निरूपणी पुढाऱ्याच्या विचारांचा व कृतीचा पुरावा आम्हीं नमूद केला आहे. त्या च प्रमाणे महाराष्ट्रिय व महाराष्ट्रेतर प्रांतातील सामान्य जनांची भावना मराठ्याच्या स्वराज्य स्थापनेचे व प्रसाराचे ध्येय श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मस्थापना हें च होतें हें सिद्ध करणारा पुरावा हि आम्हीं नमूद केला आहे. वरील सर्व पुराव्या संबंधीं यथायोग्य ठिकाणीं चर्चा करून नमूद केलेल्या पुराव्या वरून निष्पन्न होणाऱ्या सिद्धांताचें आम्हीं दिग्दर्शन केले आहे. या प्रकरणाचे सुरवातीस ज्या शंका व आक्षेप आम्हीं दर्शविले त्यांचे निरसन नमूद करण्यात आलेल्या पुराव्या वरून करण्यांत आले आहे. आतां वर दर्शविल्या प्रमाणें केलेल्या चर्चेवरून निष्पन्न झालेल्या सिद्धांताचे आम्ही त्रोटक रीतीनें दिग्दर्शन करितों:—

( १ ) "मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्र धर्म वाढवावा । ये विषयीं न करितां तकवा । पूर्वज हासती" या सुप्रसिद्ध समर्थोक्तींत जे ध्येय महाराष्ट्रीय जनतेनें साध्य करण्याचा समर्थांनीं उपदेश केला आहे तें ध्येय एकट्या समर्थांचे अगर शिवाजी महाराजाचें च होते अशांतला प्रकार नसून या दोन पुरुषाचे पश्चात् राजाराम छत्रपती, शाहू छत्रपती, रामचंद्र निळकंठ आमात्य, थोरले बाजीराव पेशवे, नानासाहेब पेशवे, थोरले माधवराव, नाना फडणीस, गोविंदराव काळे, यशवंतराव होळकर, दौलतराव शिंदे, कान्होजी अंग्रे इत्यादि महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांचे हि होते.

( २ ) शिवाजी महाराज उदयास येण्यापूर्वी महाराष्ट्रांत जे अनेक हरीकथानिरूपणी पुढारी व शहाजी महाराजा सारखे ज राजकारणी पुढारी झाले त्याचे ठाई श्रुतिस्मृत्युक्तधर्माची महाराष्ट्रीय समाजांत स्थापना व्हावी अशी उत्कट भावना वसत होती.

( ३ ) शिवकालीन महाराष्ट्रीय समाज्याच्या हरीकथानिरूपणी पुढाऱ्यांचे अग्रगणि समर्थ रामदास स्वामी यांचे सर्व भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रांतात संचार करणारे व मठस्थापना करून कायम चे वास्तव्य केलले असे दोन तीनशें शिष्य व या शिष्यांचे अनक शिष्य होते. श्रुतिस्मृतिप्रणितधर्मस्थापना हें समर्थांचें प्रिय ध्येय होतें. समर्थांच्या शिष्यांचें हि तें च ध्येय असलें पाहिजे असें अनुमान ओघानें च प्राप्त होतें. समर्थांनीं सर्व भरतखंड भर मठ व शिष्यस्थापनेचा जो प्रचंड खटाटोप केला तो त्यांच्या शिष्यांच्या निव्वळ उदरंभरणा प्रीत्यर्थ न करिता महाराष्ट्रधर्म वाढविण्या करिता केला होता.

( ४ ) स्वराज्यस्थापनेच्या पूर्व काळात महाराष्ट्रीय सामान्य जनतेस श्रुतिस्मृत्युक्तधर्माची स्थापना व्हावी असे उत्कटत्वानें भासूं लागलें होतें. स्वराज्यस्थापन करण्यांत हि महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्याचे ध्येय श्रुतिस्मृत्युक्त धर्मस्थापना हें च होते अशी महाराष्ट्रीय सामान्य जनतेची भावना होती.

( ५ ) महाराष्ट्रेतर प्रांतातील सामान्य जनतेची महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांच्या ध्येया बद्दलची कल्पना वरील कलमांत दर्शावलेल्या स्वरूपाची च होती.

आतां महाराष्ट्रधर्म या संज्ञेत कोणकोणत्या बाबींचा समावेश होतो हा जो दुसरा महत्त्वाचा मुद्दा त्याचे स्पष्टीकारण मागें नमूद केलेल्या पुराव्याचे योगाने कशा रीतीनें झालें आहे हें आम्ही दर्शवितो. महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी व हरीकथानिरूपणी पुढाऱ्याचे विचार व कृती संबधाचा जो पुरावा मागे आम्ही नमूद करून त्या संबधीं जी चर्चा केली आहे त्या वरून महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा दुसरा तिसरा कांहीं एक अर्थ नसून वेद अथवा श्रुति व मनु याज्ञवल्क्य इत्यादि स्मृति ग्रंथात प्रतिपादिलेला धर्म हा च या संज्ञेचा अर्थ असल्याचें सिद्ध होत आहे. कांहीं विशिष्ट बाबींच्या योगानें ( ज्या बाबींचें दिग्दर्शन आम्ही या पुढे करणार आहोंत ) महाराष्ट्रधर्म या संज्ञेस नुसत्या धर्म या संज्ञेनें व्यक्त होणाऱ्या अर्था पेक्षां अधिक सार्थकता येते ही गोष्ट खरी आहे. परंतु या विशिष्ट बाबी बाजूस ठेविल्यास धर्म व महाराष्ट्रधर्म या दोन्ही संज्ञांचे अर्थात् कोणत्या हि प्रकारचा फरक

नसून त्या एक च अर्थ व्यक्त करणाऱ्या संज्ञा आहेत असें मागें नमूद केलेल्या पुराव्या वरून सिद्ध होत आहे. मनुयाज्ञवल्क्य इत्यादि स्मृति ग्रंन्थांत प्रतिपादिलेले विधिनिषेधरूपी निरनिराळे धर्म म्हणजे च धर्म अथवा महाराष्ट्र धर्म अशी मागें नमूद केलेल्या पुराव्या वरून कोणाची हि खात्री झाल्या वाचून राहणार नाहीं. या सिद्धांताचे दृष्टीनें स्मृत्यादि ग्रंथांत प्रतिपादिलेल्या विधिनिषेधरूपी निरनिराळ्या धर्मांचें स्थूल दिग्दर्शन प्रस्तुत स्थळीं केल्या वाचून धर्म अथवा महाराष्ट्रधर्म या संज्ञेच्या व्याप्तीची कल्पना वाचकांस येणें शक्य नाहीं. परंतु हें कार्य करण्या पूर्वी श्रुतिस्मृत्युक्तधर्मांची ज्या दोन मूलभूत बाबीं वर उभारणी केली आहे त्या बाबींचें प्रथम दिग्दर्शन करणें अत्यंत अवश्य व जरूरीचें आहे. पहिली महत्त्वाची बाब म्हटली म्हणजे श्रुतिस्मृत्युक्तधर्म भरतखंडांतील ज्या मानवी समाजाचें नियंत्रण करितो त्या समाजाची विशिष्ट प्रकारची रचना ही होय. पृथ्वीचे पाठीवरील कोणत्या हि मानवी समाजाची घटना भरतखंडांतील मानवी समाजा सदृश नाहीं. भरतखंडांतील मुसलमान, ज्यू, पारशी व ख्रिस्ती धर्मानुयायी लोक वगळले असतां बाकी राहिलेले जे बहुसंख्यांक मानवी प्राणि आहेत व ज्यांस हिंदु या संज्ञेनें ओळखिलें जातें त्या मानवी प्राण्याचा समाज वर्णभेद, जातिभेद व आश्रमभेद यांनीं युक्त आहे. या समाजातील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार वर्णां पैकीं निरनिराळ्या वर्णांच्या स्त्रिया व निरनिराळ्या वर्णांचें पुरुष यांच्या अनुलोम व प्रतिलोम शरीरसंबंधाचे योगानें व उपजीविकेच्या साधनांच्या भिन्नत्वाचे योगानें अनेक निरनिराळ्या पोट जाती या समाजांत अस्तित्वांत आल्या. भरतखंडांत आर्यांची वसाहत होण्यापूर्वी ज्या अनार्य जाती अस्तित्वांत होत्या त्यांच्या वंशजांना स्वतंत्र जातीचें स्वरूप प्राप्त होऊन त्या हि या समाजांत अंतर्भूत झाल्या आहेत अशा प्रकारच्या या मानवी समाजाचें नियंत्रण श्रुतिस्मृत्युक्तधर्म करितो. वर दर्शविलेल्या चार प्रमुख वर्णांच्या मानवी प्राण्या पैकीं शूद्र वर्णाचे मानवी प्राणी खेरीज करून बाकीच्या तीन वर्णांच्या मानवी प्राण्यांच्या आयुष्याच्या ब्रह्मचर्य, ग्रहस्थाश्रम, वानप्रस्थ व संन्यास अशा चार अवस्था श्रुतिस्मृत्युक्त धर्मान्वयें ठरल्या असून या चारी अवस्थेंतील मानवी व्यक्तींचे धर्म निरनिराळे ठरविले गेले आहेत. वर्णभेद, जातीभेद, आश्रमभेद व या भेदाच्या दृष्टीनें विधिनिषेधरूपी आज्ञांचा भेद या बाबी श्रुतिमृत्युक्त धर्मांच्या जीव की प्राण आहेत. या महत्त्वाच्या बाबी खेरीज श्रुतिस्मृत्युक्तधर्मा संबंधीं लक्षांत ठेवावयाची दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे आचार ही होय. आचार हा या धर्माचा प्राण आहे. मनुस्मृतीचे पहिले अध्यायाचे १०७ वे श्लोकांतः—

**आचारः परमोधर्मः श्रुत्युक्तस्मार्त एवच ।**
**तस्मादस्मिन्सदा युक्तो नित्यं स्यादात्मवान्द्विजः ॥**

अर्थः—" वेदोक्त व स्मृत्युक्त आचार हा च परम धर्म आहे. यास्तव आपल्या हिताची इच्छा करणाऱ्या द्विजानें आचारा मध्यें सतत व अहर्निश तत्पर असावें. "

असें सांगितलें आहे. श्रुतिस्मृत्युक्त धर्माच्या प्राणभूत असलेल्या या दोन बाबींचें दिग्दर्शन केल्या नंतर मनुस्मृती अन्वयें धर्म या संज्ञेंत समावेश होणाऱ्या बाबींचें आह्मी स्थूल दिग्दर्शन करितों.

## धर्म या संज्ञेंत समावेश होणाऱ्या बाबींचा तपशील.

**( १ ) संस्कार विधि व व्रतचर्याः**—या सदरांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र इत्यादि वर्णांच्या लोकांचे व ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास इत्यादि आश्रमाचे धर्म यांचा समावेश होतो. या शिवाय संस्कार विधान, संस्कारांचे फल, विवाहविधि, महायज्ञ, श्राद्धकल्प, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र इत्यादिकांच्या उपजीविकेचीं साधनें, तीं मिळविण्याचे उपाय, भक्षाभक्ष निर्णय, अशौच व द्रव्यशुद्धी इत्यादि बाबींचा प्रामुख्यानें समावेश या सदरांत होतो.

**( २ ) राजधर्म व प्रजाधर्मः**--राजाचे गुण, प्रजापालन, दंडाची उत्पति व महात्म, सचीवांची योजना, त्यांचे धर्म, दुर्ग निर्मिती, यज्ञ यागादि करणें, गोब्राह्मणांचा प्रतिपाल करणें, ब्राह्मणांस दान देणें, युद्ध करणें, युद्धाविषयीं नियम, राष्ट्रसंरक्षण, प्रजेकडून कर घेणे, सेवकास वेतन देणें, संधिविग्रह करणें, शत्रूस जिकल्यावर त्याचे संबंधीं कर्तव्य, न्यायदान, न्यायदान करणाऱ्या सभासदांची लक्षणें, ऋणदान, वाक्पारुष्य, दंडपारुष्य, साहस, दायविभाग इत्यादि आठरा व्यवहार स्थानें इत्यादि बाबींचा या सदरांत समावेश होतो.

**( ३ ) विवाहित स्त्रीपुरुषांचे परस्परा संबंधीं धर्मः**—या सदरांत स्त्रियांची व पुरुषांची परस्परा संबधाचीं कर्तव्यें, स्त्रियांचे शुल्क घेण्या संबंधीं निषेध इत्यादि बाबींचा समावेश होतो.

**( ४ ) संकर जातीच्या लोकांचे धर्मः**--ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चारी वर्णां पैकीं निरनिराळ्या वर्णांच्या स्त्रीपुरुषांच्या अनुलोम प्रतिलोम शरीरसंबंधा पासून उत्पन्न झालेल्या प्रजांच्या ज्या पोट जाती त्या संकर जाती होत. अशा प्रकारच्या संकर जातीच्या लोकांच्या धर्मांचा या सदरांत समावेश होतो.

( ५ ) आपद्धर्मः–ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र इत्यादि वर्णांच्या लोकां वर संकट प्राप्त झालें असतां त्यांनीं पाळावयाच्या विधिनिषेधरूपी आज्ञा यांचा या सरदारांत समावेश होतो.

(६) प्रायश्चित्त धर्मः–ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चारी वर्णांच्या लोकांस आचार, व्यवहार इत्यादि बाबतींत ज्या विधिनिषेधरूपी आज्ञा श्रुतींत व स्मृतींत सांगितल्या आहेत त्या आज्ञांचें उल्लंघन ज्ञानानें अगर अज्ञानानें केलें असतां त्या पासून उत्पन्न होणाऱ्या दोषांचे निरसनार्थ श्रुति व स्मृतींनीं सांगितलेलीं कर्में यांचा या सदरांत समावेश होतो.

( ७ ) जातिधर्म, देशधर्म व कुलधर्मः–ब्राह्मणादिकांचे याजनादी जातीधर्म, देशांतील लोकांचे देशधर्म, वाणी कारागीर इत्यादिकांचे कुलपरंपरागत धर्म इत्यादिकांचा या सदरात समावेश होतो.

( ८ ) दशलक्षणयुक्त धर्मः–ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचे चारी आश्रमांतील दहा धर्म सांगितले आहेत त्यांचा समावेश ह्या सदरांत होतो. मनुस्मृतीच्या सहाव्या अध्यायाच्या ९१ व ९२ व्या श्लोकांत हा धर्म खालील प्रमाणें सांगितला आहे.

चतुर्भिरपि चैवैतैर्नित्यमाश्रमिभिर्द्विजैः ॥
दशलक्षणको धर्मः सेवितव्यः प्रयत्नतः ॥ ९१ ॥
धृतिः क्षमा दमोऽस्तेयं शौचमिन्द्रियनिग्रहः ॥
धीर्विद्या सत्यमक्रोधो दशकं धर्मलक्षणम् ॥ ९२ ॥

अर्थः—" या चारी आश्रमांच्या द्विजांनीं दहा लक्षणांनीं युक्त असलेल्या धर्माचें सतत मोठ्या प्रयत्नानें सेवन करावें. संतोष, दुसऱ्यानें अपकार केला असतां हि मनास विकार पावू न देणें हा दम, अन्यायानें धनादिकांचें ग्रहण न करणें हें अस्तेय, यथा शास्त्र मृत्तिका व जल यांच्या योगानें देह शुद्ध करणें हें शौच, विषयां पासून नेत्रादि इंद्रियांचा निरोध करणें हा इंद्रिय निग्रह, शास्त्रादिकांच्या तत्वांचे ज्ञान ही बुद्धि, आत्मज्ञान स्वरूप विद्या, यथार्थ कथनरूपी सत्य व क्रोधास कांहीं कारण झालें असतां हि क्रोध न करणें हा अक्रोध, हे दहा प्रकारचें धर्मलक्षण आहे." या च प्रमाणें मनुस्मृतीच्या दहाव्या अध्यायाच्या ६३ व्या श्लोकांत चारी वर्णांच्या प्रजाचे खालील धर्म सांगितले आहेत:—

अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिन्द्रियनिग्रहः ।
एतं सामासिकं धर्मं चातुर्वर्ण्येऽब्रवीन्मनुः ॥

अर्थः-"कोणाची हिंसा न करणें, यथार्थ भाषण, अन्यायानें परधन न घेणें, मृत्तिका व जल यांच्या योगानें शरीरास शुद्ध करणें व इंद्रियांचा संयम करणें हा धर्म मनूनें सक्षेपतः चारी वर्णांच्या लोकांस उद्देशून सांगितला आहे. ( प्रकरणावरून संकीर्ण जातींच्या लोकांचा हि हा धर्म आहे. )

वरील प्रमाणें मनुस्मृती मध्यें दशलक्षणयुक्त चारी वर्णांच्या लोकांच्या धर्माचें स्वरूप दर्शविलेलें आहे.

( ९ ) मोक्ष धर्मः—या सदरांत मोक्षाचें स्वरूप व मोक्षप्राप्तीचीं साधनें यांचा समावेश होतो. मनुस्मृति अध्याय बारावा श्लोक ८२ ते ९० मध्यें या संबंधाचे निरूपण उत्तम प्रकारचें केलेलें आहे. वरील कलमांत दर्शविलेल्या दशलक्षणयुक्तधर्मानें आचरण केलें असतां चातुर्वर्णीय समाजांतील मानवी प्राण्यास कोणत्या प्रकारची फलप्राप्ति होते याचें वर्णन मनुस्मृतीच्या सहाव्या अध्यायाच्या ९३ व्या श्लोकांत खालील प्रमाणें सांगितलें आहे.

दशलक्षणानि धर्मस्य ये विप्राः समधीयते ।
अधीत्यचानुवर्तन्ते ये यान्ति परमांगतिम् ॥

अर्थः—" जे ब्राह्मण या धर्माच्या दहा लक्षणांचा अभ्यास करितात व अभ्यास करून आत्मज्ञानाच्या साक्षार्थ त्या प्रमाणें चालतात त्यांच्या ब्रह्मज्ञानाचा अतिशय उत्कर्ष झाल्या मुळें ते मोक्षलक्षण परम गतीस जातात." याच कल्पनेचा अधिक विस्तारपूर्वक खुलासा खालील श्लोकांत करण्यांत आला आहे.

एष सर्वः समुद्दिष्टः कर्मणां वः फलोदयः।
नैश्रेयसकरं कर्म विप्रस्येदं निबोधत ॥
वेदाभ्यासस्तपोज्ञानमिन्द्रियाणां च संयमः ॥
अहिंसा गुरु सेवा च निःश्रेयस्करमं परम् ॥
सवषामपि चैतषां शुभानामिह कर्मणाम् ।
किंचिच्छ्रेयस्करतरं कर्मोक्तं पुरुषं प्रति ॥
सर्वैषामपि चैतेषामात्मज्ञानं परं स्मृतम् ।
तद्ध्यग्र्यं सर्वविद्यानां प्राप्यते ह्यमृतं ततः ॥
षण्णामेषां तु सर्वेषां कर्मणां प्रेत्य चेह च ।
श्रेयस्करतरं ज्ञेयं सर्वदा कर्म वैदिकम् ॥
वैदिके कर्मयोगे तु सर्वाण्येतान्यशेषतः ।
अन्तर्भवन्ति क्रमशस्तस्मिंस्तस्मिन्क्रियाविधौ ॥

सुखाभ्युदयिकं चैव नैःश्रेयसिकमेव च ।
प्रवृत्तं च निवृत्तंच द्विविधं कर्म वैदिकम् ॥
इह चामुत्र वा काम्यं प्रवृतं कर्म कीर्त्यते ।
निष्कामं ज्ञानपूर्वं तु निवृत्तमुपदिश्यते ॥
प्रवृतं कर्म संसेव्य देवानामेति साम्यताम् ।
निवृतं सेवमानस्तु भूतान्यत्येति पञ्चवै ॥ ९० ॥

अर्थः—" आतां ब्राह्मणाचें हें मोक्ष साधनभूत कर्म ऐका. उपनिषदासह वेदांचा ग्रंथतः व अर्थतः अभ्यास, कृच्छादि तप, ब्रह्मज्ञान, इंद्रियनिग्रह, हिंसावर्जन व गुरु शुश्रुषा हें मोक्षाचें परम साधन आहे. वेदाभ्यासादि हीं जीं शुभ कर्में सांगितलीं आहेत त्यांतील एकादें च कर्म पुरुषांच्या मोक्षाचें सर्वोत्तम साधन असेल तें कोणतें ? वेदाभ्यासादि या सर्व साधनांतील आत्मज्ञान हें च मुख्य सधन मानलेले आहे. कारण सर्व विद्यांतील तें च श्रेष्ठ असून त्याच्या योगानें च मोक्ष मिळत असतो. पण ह्या पूर्वोक्त सहा कर्मांतील वैदिक कर्म हें च ऐहिक व पारलौकिक श्रेयाचें मुख्य साधन आहे असें सर्वदां समजावें. कारण, या उपासनारूप वैदिक कर्मयोगा मध्यें हि सर्व वेदाभ्यासादि कर्में क्रमाने त्या त्या उपासनेच्या द्वारा अंतर्भूत होतात. ज्योतिष्टोमादि व प्रतीकोपासनादि वैदिक कर्म क्रमानें स्वर्गादि सुखप्राप्ति करून देणाऱ्या संसाराच्या प्रवृत्तीस कारण होणारें असल्या मुळें प्रवृत्त संज्ञक व संसाराच्या निवृत्तीस कारण होणारें असल्यामुळें निवृत्त संज्ञक असे दोन प्रकारचे आहे. ऐहिक कामनेचें साधन व पारलौकिक फलाचें साधन असे जें यज्ञयागादि कर्म ते प्रवृत्त होय व जें कोणत्या हि प्रकारची कामना न ठेवितां ज्ञानपूर्वक संसाराच्या निवृत्तीस कारण होणारें असें च कर्म केले जातें तें निवृत्त कर्म होय. प्रवृत्त कर्म केल्यानें पुरुष देवाशीं साम्य पावतो व जो निवृत्त कर्माचा अभ्यास करतो तो शरिरास कारण होणाऱ्या पंच भूतांचें उल्लंघन करितो ( अर्थात मोक्ष पावतो )." याज्ञवल्क्य स्मृतीच्या पहिल्या अध्यायाच्या ८ व्या श्लोकांत मोक्ष धर्माचें लक्षण खालील प्रमाणें सांगितलें आहे.

इज्याचारदमाहिंसा दानस्वाध्यायकर्मणाम् ।
अयंतु परमो धर्मो यद्योगेनात्मदर्शनम् ॥

अर्थः—" हे महवन, मनुष्याच्या उत्कर्षार्थ शास्त्रानें सांगितलेला आचार, मनाचें किंवा बाह्य इंद्रियांचें दमन, प्राण्यांस पीडा न देणें,

आपली वस्तु सर्वथैव दुसऱ्यास अर्पण करणें, वेद व शास्त्रें यांचें अध्ययन आणि काम्य कर्मे वर्ज्य करून इतर सर्व शास्त्रोक्त कर्मांचें अनुष्ठान या सर्वांत चित्ताचें एकाग्र्य करून आत्म्याचें साक्षात् दर्शन करणें म्हणजे त्याचा अनुभव घेणें हा च सर्वोत्तम धर्म होय. ”

मनुस्मृति अन्वयें धर्म या संज्ञेंत कोणकोणत्या बाबींचा समावेश होतो याचें स्थूल दिग्दर्शन वरील प्रमाणें आम्हीं केलें आहे. आतां महाराष्ट्रधर्म या संज्ञेंत कोणकोणत्या बाबींचा समावेश होतो याचें दिग्दर्शन करण्याकडे आम्ही वळतों. हें दिग्दर्शन करण्या पूर्वी महाराष्ट्रीय समाजाची रचना कशा रीतीनें बनली आहे याचा खुलासा प्रथम करणें जरूर आहे. अशा प्रकारचा खुलासा केल्या खेरीज धर्म व महाराष्ट्रधर्म या दोन संज्ञांत समाविष्ट होणाऱ्या बाबींचें महत्त्व वाचकांचे लक्षांत येण्यासारखें नसल्या कारणानें वरील खुलासा करणें आह्मास प्राप्त झालें आहे. ज्या प्रदेशास हल्लीं महाराष्ट्र देश असें ह्मणतात त्या प्रदेशास दोन तीन हजार वर्षां पूर्वी दंडकारण्य अगर दक्षिणपथ असें ह्मणत असत. हा प्रदेश अरण्यमय असून यांत मानवी वस्ति तुरळक होती. भरतखंडाचे उत्तर प्रदेशांत आर्य लोकांच्या वसाहति होऊन बरा च काळ लोटल्या नंतर त्या प्रांतांतील चातुर्वर्णीय आर्य लोक या प्रातांत वसाहत करण्याकरतां येऊ लागले. अशा रीतीनें वसाहत करणाऱ्या लोकांचा प्रवाह या प्रदेशांत अनेक शतकें सुरू राहिल्यामुळें हा अरण्यमय प्रदेश कृषीकर्म करणाऱ्या चातुर्वर्णीय प्रजाच्या शेंकडो खेड्यानीं कालांतरानें गजबजून गेला. शक ६०० चे सुमारास या प्रदेशास महाराष्ट्र ही संज्ञा प्राप्त झाली व या प्रदेशांतील लोकांस महाराष्ट्रीय अथवा मराठे या नांवानें भरतखंडाच्या इतर प्रातांतील लोक ओळखूं लागले. वर दर्शविल्या प्रमाणें या प्रदेशात वसाहत करणाऱ्या आर्य लोकां खेरीज मूळचे अनार्य वंशाचे लोक या प्रदेशांत कायम होते च. भिल्ल, कोळी, रामोशी, महार, मांग, कातकरी, वारली, मांगगारुडी इत्यादि अनार्यवंशीय लोकाचा समावेश महाराष्ट्र देशातील मानवी समाजांत होऊं लागला व या सर्व लोकांस महाराष्ट्रीय ही संज्ञा प्राप्त झाली. दंडकारण्यांत वसाहत करण्या करितां ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य इत्यादि आर्यवंशीय लोक ज्या भरतखंडाच्या उत्तरे कडील प्रदेशांत याज्ञवल्क्यस्मृतिप्रणीतधर्म परिपालन करणारे आर्य लोक होते त्या प्रदेशांतून आले असावेत असें बळकट अनुमान प्रस्तुतचा महाराष्ट्रीय समाज याज्ञवल्क्यस्मृतिधर्मानुयायी आहे यावरून निघतें.

४६

मानवी प्राणि एका प्रदेशांतून दूरच्या प्रदेशांत वसाहत करण्या करितां जातात तेव्हां ते नूतन प्रदेशांत आपले पूर्व धर्मास अनुसरून चालतात असा साधारण अनुभव आहे. फार पुरातन काळापासून महाराष्ट्रीय समाज हा याज्ञवल्क्यस्मृतिप्रणीत धर्मांचे परिपालन करणारा आहे असें सिद्ध करणारा पुरावा उपलब्ध झाला आहे. प्रस्तुत काळीं महाराष्ट्रीय लोकांस विवाह, दत्तविधान, दायभाग इत्यादि बाबतींत याज्ञवल्क्यस्मृती वरील मिताक्षरा टीकेंत प्रतिपादिलेले धर्म लागू करण्यांत येतात. पूर्व परंपरेस अनुसरून हा प्रघात अस्तित्वांत आला असला पाहिजे हें उघड आहे. म. इ. साधनें खंड १५ पान २७ वर पैठणच्या धर्माधिकाऱ्यांनीं केलेला शके १५२६ सालांतील एक निवाडा छापण्यांत आला आहे. त्या निवाड्यांत खालील उल्लेख आढळतो:—

"मग सभा नायकीं नेम केला कीं थोर ग्रंथ विज्ञानेश्वर तेथें पाहून निवाडा करावा."

या उल्लेखावरून याज्ञवल्क्यस्मृती वरील मिताक्षरा टीकेंत प्रतिपादिलेल्या धर्मास अनुसरून आचरण करण्याची प्रवृत्ति फार पुरातन काळापासून महाराष्ट्रीय समाजांत अस्तित्वांत आहे हें उघड होत आहे. मिताक्षराटीकाकार विज्ञानेश्वर हे गोदा तटाक प्रांतांतील चालुक्य घराण्याची राजधानी कल्याणी नगरी येथें शक ९९८ ते १०४८ चे दरम्यानचे कालांत चालुक्य वंशीय विक्रमादित्य राजाच्या कारकीर्दीत उदयास आले. त्यांच्या पश्चात त्यांनीं याज्ञवल्क्यस्मृतीवर केलेला मिताक्षरा या नांवाचा टीका ग्रंथ महाराष्ट्रीय समाजांत सर्व मान्यत्व पावला. या एका बाबी वरून हि महाराष्ट्रीय समाज फार पुरातन काला पासून याज्ञवल्क्यस्मृत्यानुयायी आहे ही बाब सिद्ध होत आहे. येथ पावेतों वांशिक दृष्ट्या महाराष्ट्रीय समाजाची रचना कशा प्रकारची आहे हें स्थूल दृष्ट्या दर्शवून या समाजांतील मानवी प्राण्यांचे नियंत्रण, आचार, व्यवहार, प्रायश्चित्त इत्यादि बाबतींत कोणत्या स्मृतीस अनुसरून होत आलें आहे याचें दिग्दर्शन आम्हीं केलें आहे. आतां मोक्षधर्मदृष्ट्या महाराष्ट्रीय समाजांत स्थित्यंतरें कोणती घडलीं व त्यांचे योगानें त्याची रचना कोणत्या रीतीनें बनली गली आहे याचें थोडक्यांत दिग्दर्शन करणे जरूर आहे. भरतखंडाचे उत्तरे कडील प्रदेशांत बौध्य धर्माची स्थापना होऊन त्या धर्माचा तिकडे प्रसार झाल्यानंतर त्याची लाट महाराष्ट्रावर येऊन कोसळली. बौध्य धर्मा प्रमाणे जैन धर्माचा हि प्रसार महाराष्ट्रांत झाला होता. आद्य शंकराचार्यांनीं श्रुतिस्मृतिप्रणीतधर्माची स्थापना भरतखंडाच्या

इतर प्रदेशा प्रमाणें महाराष्ट्रांत हि केल्यानंतर शके ८००।९०० चे सुमारास जैन धर्म महाराष्ट्रांत फिरून जोरावूं लागला. त्या नंतर शके ११०० ते १२०० च्या दरम्यान गोदा तटाकाच्या लगतच्या महाराष्ट्राच्या उत्तर व दक्षिण भागांत अनुक्रमें लिंगायत व मानभाव पंथ उदयास आले. महाराष्ट्रीय समाजा पैकीं वैश्य व शूद्र वर्णा पैकीं कित्येक लोक लिंगायत धर्मानुयायी बनले. शूद्र व अती शूद्र वर्गा पैकीं कित्येकांनीं मानभाव पंथ स्वीकारला. या दोन पंथांचा उदय झाल्या नंतर थोड्या च वर्षांनीं महाराष्ट्रीय समाजा वर उत्तरे कडून मुसलमान धर्मीयांची टोळधाड कोसळली. देवगिरीच्या यादवांचें महाराष्ट्रीय राजघराणें उत्तरे कडाल मुसलमानांनीं धुळीस मिळवून महाराष्ट्राच्या बऱ्याच मोठ्या भागावर त्यांनीं आपलें राजकीय वर्चस्व स्थापित केलें व महाराष्ट्रीय समाजांतील चातुर्वर्णीय समाजा पैकीं हजारों लोकांस तरवारींचे जोरावर मुसलमान धर्मांची दीक्षा दिली. मुसलमानांची राजकिय सत्ता महाराष्ट्रांत स्थापित झाल्या नंतर शें दीडशें वर्षांनीं महाराष्ट्राच्या समुद्र किनाऱ्या लगतच्या पश्चिम भागांत म्हणजे कोंकण प्रांतांत खिस्ती धर्मानुयायी पोर्तुगीज लोकांनीं आपली राजकीय सत्ता स्थापित करून महाराष्ट्रीय समाजा पैकीं कित्येकांस खिस्ती धर्मांचे गोटांत जबरदस्तीनें खेचून नेलें. आद्य शंकराचार्यां नंतर वर दर्शविल्या प्रमाणें अनेक स्थित्यंतरें घडून आल्या कारणानें महाराष्ट्रीय समाजांत श्रुतिस्मृत्युक्तधर्माशीं विरोध करणारे उपासना मार्ग, उपास्य दैवतें व उपासनाभिन्नत्वाच्या योगानें उदयास आलेले भिन्न आचार परिपालन करणाऱ्या जाती अस्तित्वांत आल्या. या शिवाय महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या अनेक अनार्य वंशीय लोकांची उपास्य दैवतें व आचार होते ते निराळे च. मनुस्मृती अन्वयें मोक्ष धर्माचें स्पष्टीकरण जें आह्मीं वर केलें आहे त्या मोक्ष धर्माचे स्वरूपांत हि बरें च स्थित्यंतर घडून आलें होतें. महाराष्ट्रांत मुसलमानाची सत्ता स्थापन होण्या पूर्वी श्रुतिस्मृत्युक्तधर्माच्या मोक्ष प्राप्तीच्या साधनांच्या बाबतींतला अकुंचितपणा, लिंगायत, मानभाव इत्यादि नूतन पंथ श्रुतिस्मृत्युक्तधर्माशीं विरोध करणारे पंथ उदयास आल्या कारणानें, नाहींसा करून मोक्ष प्राप्तीचा मार्ग महाराष्ट्रीय समाजांतील सर्व वर्णांच्या व जातींच्या लोकांस खुला करून देण्याचा उपक्रम शक १२०० चे सुमारास ज्ञानेश्वरांनीं केलेला होता. ज्ञानेश्वरांचे निधना नंतर थोडक्या च काळांत मुसलमानी धर्माचें अरिष्ट महाराष्ट्रीय समाजावर येऊन कोसळल्या मुळें श्रुतिस्मृत्युक्त धर्माचें ( विशेषतः आचार धर्माचें ) परिपालन महाराष्ट्रीय चातुर्वर्णीय समाजा

करून होणें दुरापास्त झालें. अशा स्थितींत महाराष्ट्रीय समाजाच्या हरीकथा निरूपणी पुढाऱ्यांनीं पंढरपूर येथील श्री विठ्ठल देवतेची भक्ति, ईश्वर नामस्मरण व ईश्वर नामसंकीर्तन इत्यादि द्वारा मोक्ष साधनाच्या सुलभ मार्गाचा महाराष्ट्रीय समाजास उपदेश केला. मुसलमानांचे राजकीय व धार्मिक वर्चस्व महाराष्ट्रा वर सतत तीनशें वर्षें कायम राहिल्या मुळें महाराष्ट्रीयांनीं मुसलमानी धर्माच्या गोटांत शिरूं नये एतदर्थ महाराष्ट्रीय समाजाच्या हरीकथा निरूपणी पुढाऱ्यांस वरील सुलभ मार्गाचा च उपदेश करणें भाग पडलें. शेवटीं श्रुतिस्मृत्युक्तधर्माच्या स्थापनेच्या ध्येयास्तव शिवाजी महाराजांनीं स्वराज्यस्थापना केल्या नंतर शिव छत्रपतींच्या सत्पप्रकर्णात्मक चरित्रांत ( पान ४३ ) वर्णन केल्या प्रमाणें ( " कलयुगाचे ठायीं मुख्य धर्म उपासना, नामस्मरण, कीर्तन हे सुलभ उपायांची स्थापनाही ते ( शिवाजी महाराज ) स्थापिते झाले." ) विठ्ठलभक्ति, विठ्ठलनामस्मरण, विठ्ठलनामसंकीर्तन इत्यादि साधनांचा मोक्ष धर्मांत समावेश होऊं लागला व महाराष्ट्रीय समाजांत या बाबीस सर्व मान्यत्व प्राप्त झालें. वर वर्णिलेल्या महाराष्ट्रीय समाजांत झालेल्या घडामोडींचे योगानें धर्म या संज्ञेंत कित्येक नूतन बाबींचा समावेश होऊं लागला. या प्रमाणें धर्म या संज्ञेंत नूतन बाबी समाविष्ट होण्यास कारणीभूत झालेल्या घडामोडींचें स्थूल दिग्दर्शन केल्या नंतर आह्मी आतां महाराष्ट्रधर्म या संज्ञेंत याज्ञवल्क्यस्मृति अन्वयें समाविष्ट होणाऱ्या बाबींचें त्रोटक रीतीनें दिग्दर्शन करितों.

( १ ) संस्कारविधि व व्रतचर्याः- मनुस्मृति अन्वयें पूर्वीं दर्शविल्या प्रमाणें व याज्ञवल्क्यस्मृती वरील मिताक्षरा टीके अन्वयें.

( २ ) राजधर्म व प्रजाधर्मः—मनुस्मृति अन्वयें पूर्वीं दर्शविल्या प्रमाणें व मिताक्षराटीके अन्वयें. कूटयुद्धपद्धात ( जी मध्यें वृक व चित्याच्या युद्धपद्धतींचा अंतर्भाव होतो. ) ही महाराष्ट्रधर्मांत युक्त समजण्यांत येते.

( ३ ) विवाहित स्त्रीपुरुषांचे परस्परा संबंधीं धर्मः—मनुस्मृति अन्वयें पूर्वीं दर्शविल्या प्रमाणें मिताक्षराटीके अन्वयें सती जाणें अगर सहगमन करणें हा महाराष्ट्रधर्माचा विशेष आहे.

( ४ ) संकर जातीच्या लोकांचे धर्मः-मनुस्मृति अन्वयें संकर जातींचे जे धर्म सांगितले आहेत ते या सदरांत पडतात. या शिवाय महाराष्ट्रीय समाजाच्या रचनेचें जें स्थूल दिग्दर्शन आम्हीं वर केलें आहे त्या अन्वय महाराष्ट्रीय समाजांतील भिल्ल, कोळी, रामोशी, मांग, महार, वारली, कातडी व या समाजांत अंतर्भूत होणाऱ्या दुसऱ्या अनेक अनुलोमज व प्रतिलोमज पोट

जाती त्याच प्रमाणें जैन, लिंगायत, मानभाव, मुसलमान, खिस्ती इत्यादि जातींच्या लोकांचे जाती विशिष्ट धर्म यांचा हि या सदरांत समावेश होतो.

( ५ ) आपद्धर्मः—मनुस्मृति अन्वयें पूर्वी दर्शविल्या प्रमाणें व मिताक्षरा टीके अन्वयें.

( ६ ) प्रायश्चित्त धर्मः—मनुस्मृति व मिताक्षरा टीके अन्वयें.

( ७ ) जातीधर्म, देशधर्म, कुलधर्मः—वाणी, कारागीर इत्यादि लोकांच्या अनेक जाति आहेत. या जातींच्या कुलपरंपरागत धर्मांचा या सदरांत समावेश होतो.

( ८ ) दशलक्षणयुक्तधर्मः—मनुस्मृति अन्वयें जो धर्म सांगितला आहे त्याच धर्मांचा या सदरांत समावेश होतो.

( ९ ) मोक्ष धर्मः—महाराष्ट्रीय समाजांत मोक्ष धर्म दृष्ट्या जें स्थित्यंतर झाल्याचें आम्हीं वर दर्शविलें आहे त्या मुळे अस्तित्वांत आलेल्या धर्मांचा म्हणजे वारकरी, रामदासी इत्यादि सांप्रदायांचा या सदरांत समावेश होतो. या शिवाय मनुस्मृतीमध्यें ज्या देवतांच्या उपासनेचा कोठें हि उल्लेख करण्यांत आला नाहीं अशा कांहीं देवतांच्या उपासना याज्ञवल्क्य स्मृतींत सांगितल्या आहेत. ह्या देवता म्हटल्या ह्मणजे गणपती, सूर्य व स्कंध इत्यादि होत. महाराष्ट्रधर्माचें अधिक विस्तृत व खुलासेवार विवेचन आह्मी जें पुढें करणार आहोंत त्यांत या देवतांच्या उपासना पद्धतींचे अधिक खुलासेवार वर्णन येणार आहे. महाराष्ट्र या सज्ञेनें संबोधिल्या जाणाऱ्या प्रदेशांत राहणाऱ्या मानवी समाजांतील व्यक्ती कडून आचरिला जाणारा जो धर्म ( ज्यांत वर दर्शविलेल्या विशिष्ट बाबी अंतर्भूत होतात ) त्यास महाराष्ट्र हें विशेषण संलग्न करण्यांत येऊन महाराष्ट्रधर्म ही संज्ञा प्रचारांत आली. ठाणें कोंकण प्रांताच्या वंशपद्धति या नांवाच्या बखरींतील मागें आह्मी जो विस्तृत उतारा दिला आहे त्यांत या सज्ञेचा अनेक ठिकाणीं उल्लेख आलेला आहे. गुरुचरित्रांतील या संज्ञेच्या उल्लेखा पेक्षां हि हा उल्लेख पुरातन आहे. ज्ञानेश्वरीच्या पूर्व कालांतील पुरातन लेख उपलब्ध झाल्यास त्यांत या संज्ञेचा उल्लेख खात्रीनें सापडेल असा अंदाज आहे. मराठी राज्य लयास जाऊन इंग्रजी सत्ता महाराष्ट्रांत स्थापित झाली तों पावेतों महाराष्ट्रधर्म ही संज्ञा कोंकण प्रांतांतील महाराष्ट्रीय जनतेस पूर्णपणें परिचित होती असें मागें आह्मीं त्या प्रांतांतील ज्या लखांतील उतारे दिले आहेत त्या वरून सिद्ध झालें आहे. श्रुतिस्मृत्युक्तधर्मा पैकीं आचार व व्यवहार प्रकरणांतील

विवाह, दत्तविधान व दायभाग इत्यादि बाबी संबंधीं महाराष्ट्रीय जनतेस जे धर्म प्रस्तुतच्या न्याय करणाऱ्या संस्था लागू आहेत असें समजतात त्या धर्मास Hindu Law obtaining in the Bombay Presidency (मुंबई इलाख्यांतील हिंदु धर्म) या इंग्रजी संज्ञेनें ओळखतात. या च प्रमाणें मद्रास, बंगाल इत्यादि प्रांतांतील हिंदु जनतेस जे धर्म लागू करण्यांत येतात त्यास Hindu Law obtaining in the Madras and Bengal Presidency अशा संज्ञेनें ओळखतात. हा च आशय Bomlay school of Hindu Law, Madras school of Hindu Law, Bengal school of Hindu Law इत्यादि दुसऱ्या प्रकारच्या संज्ञांनीं व्यक्त करण्याचा प्रघात प्रस्तुत काळीं अस्तित्वांत आहे. या च पद्धतीस अनुसरून धर्माचा जो विस्तृत प्रदेश आम्हीं वर दर्शविला आहे त्या प्रदेशांत महाराष्ट्रीय समाजद्दष्ट्या समाविष्ट होणाऱ्या बाबींच्या वैशिष्ट्यामुळें या धर्मास महाराष्ट्र धर्म या संज्ञेनें ओळखण्याचा प्रघात फार पुरातन काळापासून अस्तित्वांत आला असला पाहिजे अशी वरील चर्चा लक्षांत घेतली असतां कोणाची हि खात्री झाल्या वाचून रहाणार नाहीं.

याज्ञवल्क्यस्मृति अन्वयें महाराष्ट्रधर्म या संज्ञेत कोण कोणत्या बाबींचा समावेश होतो व ही संज्ञा कशा रीतीनें अस्तित्वांत आली याचें आह्मीं साधार विवेचन येथ पावेतों केलें आहे. आतां शिवाजी महाराजांचे उदयापासून तों मराठीराज्य लयास जाई तों पावतों स्मृतिस्मृत्युक्तधर्माची स्थापना करण्याच्या मराठ्यांच्या ध्येयास पोषक अशी जी दुसरी एक तीव्र भावना महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांचे ठाईं वसत होती व जी भावना मराठ्यांमध्यें उत्तम प्रकारची एक जूट उत्पन्न होण्यास कारणीभूत झाली त्या भावनेचें स्वरूप मागें नमूद केलेल्या गोविंदराव काळ्यांच्या शब्दांत च आह्मी या ठिकाणीं दर्शवितों. "अटक नदीचे अलीकडे दक्षिण समुद्र पावेतों हिंदूचें स्थान-तुरक स्थान नव्हे! हे आपली हद्द पांडवापासोन विक्रमाजित पावतों त्यानीं राखून उपभोग केला." पांडवापासोन विक्रमाजित पावतों भरतखंडांत जे क्षत्रिय अगर अन्य वर्णीय राजे होऊन गेले त्यांनी अटक नदी पासून दक्षिण समुद्रा पावेतों भरतखंडाचा प्रदेश ही आपली भूमि असून तिचें रक्षण करण्याचा व उपभोग घेण्याचा आपला हक्क आहे अशा प्रकारची जशी भावना होती तशा च प्रकारची भावना महा-

राष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांचें ठाईं शिवाजी महाराजांचे काळीं, उदित झाली होती. मराठ्यांच्या सत्तेचा प्रसार सर्व भरतखंड भर होण्यास महाराष्ट्रधर्मस्थापनेचें ध्येय जितकें कारणीभूत झालें तितकी च वरील भावना त्या सत्तेच्या प्रसारास कारणीभूत झाली. या भावनेस भरतखंडाभिमान, हिंदुस्थान देशाभिमान अगर स्वदेशाभिमान म्हटलें तरी अयुक्तिक होणार नाहीं. इंग्रजींतील Patriotism या संज्ञेनें व्यक्त होणारी भावना वरील भावने सारखी च आहे. Patriotism या इंग्रजी संज्ञेचें स्वरूप एका स्कॉट कवीच्या खालील सुप्रसिद्ध उक्तींत व्यक्त करण्यात आलें आहे.

" Breathes there the man with soul so dead who never to himself hath said this is my own my native land. "

वरील उक्तींत दिग्दर्शन करण्यांत आलेली भावना व गोविंदराव काळे यांच्या उक्तींत व्यक्त करण्यांत आलेली भावना एका च स्वरूपाची आहे. मागें या प्रबंधाच्या १० व्या पाना वर बंगाली ब्राह्मणांचा जो अभिप्राय नमूद केला आहे, " The virtue of Patriotism as understood in these days was unknown to the Peshawas. " तो वरील पुराव्या वरून सपशेल चुकीचा असल्याचें सिद्ध होत आहे. आतां या भावनेचा महाराष्ट्रधर्म या संज्ञेत अप्रत्यक्ष रीतीनें कसा अंतर्भाव होतो याचें आम्ही दिग्दर्शन करितों. मनु याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतींत प्रतिपादिलेल्या धर्माचा अथवा महाराष्ट्रधर्माचा पाया चातुर्वर्ण्यव्यवस्थे वर उभारलेला आहे. प्रजेचें रक्षण व पालन करणें हा क्षत्रियवर्णी लोकांचा धर्म आहे. राजा हा चातुर्वर्णीय धर्माभिमानी क्षत्रियवर्णां पैकीं च असला पाहिजे व प्रजेचें रक्षण करून राज्य करणें हा त्याचा धर्म आहे असें स्मृत्यादि ग्रंथांत प्रतिपादन केलेलें आहे. या प्रतिपादनान्वयें चातुर्वर्ण्यबाह्य असे जे श्रुतिस्मृत्युक्तवर्णाश्रमधर्माचा द्वेष करणारे मुसलमान धर्मानुयायी तुरुक यास भरतखंडांतील प्रजांचें रक्षण करण्याचा व त्यांचेवर राज्य करण्याचा कोणत्या हि प्रकारचा अधिकार नसता त्यांनीं जबरदस्तीनें आपली राजकीय सत्ता भरतखंडा वर स्थापित केली. ही राजसत्ता श्रुतिस्मृत्युक्तधर्मास संमत नसल्या कारणानें तिचें उच्चाटन करून त्या ठिकाणीं वर्णाश्रमधर्माभिमानी क्षत्रिय राजाची सत्ता स्थापित करणें हा भरतखंडांतील क्षत्रियवर्णी लोकांचा धर्म ठरला. या धर्मास अनुसरून शहाजी, छत्रपती शिवाजी महाराज इत्यादि महाराष्ट्रीय क्षत्रियांनीं

मुसलमानांच्या सत्तेचें उच्चाटन करून स्वतःची सत्ता महाराष्ट्रांत स्थापित केली हें युक्त च होतें. या विचारसरणी अन्वयें वर दर्शविलेल्या भावनेचा महाराष्ट्रधर्म या संज्ञेंत निःसंशयपणें अंतर्भाव होतो हें उघड आहे. शिवाजी महाराज ज्या काळीं महाराष्ट्रांत अवतीर्ण झाले त्या काळीं भरतखंडाच्या अन्य प्रांतांत हि हजारों क्षत्रियवर्णी लोक होते. वरील प्रकारची भावना त्यांच्या ठायीं हि अस्तित्वांत असण्याचा संभव आहे. परंतु ही भावना शिवाजी महाराज व त्याचे साह्यकारी व अनुयायी महाराष्ट्रीय समाजाचे राजकारणी पुढारी यांच्या मनांत जितक्या तीव्रतेनें व प्रखरपणें वसत होती तशा स्वरूपानें भरतखंडाच्या दुसऱ्या प्रांतांतील क्षत्रियवर्णी लोकांचे ठाईं वसत नसल्या कारणानें महाराष्ट्रांत स्वराज्यस्थापनेचा जो अपूर्व योग घडून आला तसा तो इतरत्र घडून आला नाहीं. पांडवा पासून विक्रमाजित पावेंतो झालेल्या पराक्रमी क्षत्रियांनीं ज्या भरतभूचें रक्षण केलें व उपभोग घेतला त्या भूमीचें रक्षण करण्याचा व उपभोग घेण्याचा क्षत्रिया खेरीज दुसऱ्या कोणास हि अधिकार नाहीं या शिवाजी महाराजांचे ठाईं वसत असलेल्या तीव्र व जाज्वल्य भावनेचे योगानें स्वराज्यस्थापनेचें महत् कार्य त्यांनीं मूर्तिमंत सिद्ध करून दाखविलें. ह्या प्रबंधाच्या १०१ व्या पानावर शिवदिग्विजय बखरीच्या २१२ व्या पाना वरील जो उतारा आम्हीं दिला आहे त्यांत शिवाजी महाराजांचे जे विचार दर्शविले आहेत ते कांहीं अंशीं गोविंदराव काळ्यांच्या वरील उद्गारांतील विचार सारखे च आहेत.

आतां जो एक महत्त्वाचा प्रश्न स्वाभाविकपणें आपल्या पुढें येतो, तो हा कीं महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांचें दुसरें कोणतें हि ध्येय न बनतां महाराष्ट्रधर्मस्थापना हें च ध्येय कां बनलें गेलें, या प्रश्नाची चर्चा प्रस्तुत स्थळीं करणें अवश्य आहे. मुसलमानांचा भरतखंडांत प्रवेश होऊन त्यांची राजकीय सत्ता या देशांत प्रस्थापित होण्या पूर्वी भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रदेशावर राजसत्ता चालविणारीं बहुतेक राजघराणीं क्षत्रियवर्णी असून मनु याज्ञवल्क्य इत्यादि स्मृतिग्रंथांत प्रतिपादिलेल्या विधिनिषेधरूपी आज्ञांस अनुसरून राज्य करणें हें च श्रेष्ठ प्रतीचें ध्येय त्या काळचे क्षत्रिय राजकर्ते समजत असत. अशा स्वरूपाची भावना भारतीय क्षत्रियवर्णी लोकांची अस्तित्वांत असतां मुसलमानांचा भरतखंडांत प्रवेश झाला. मुसलमानांचे हिंदुस्थानांत राजकीय सत्ता प्रस्थापित करण्याचें प्रमुख

ध्येय इस्लाम धर्माचा प्रसार करणें हें होतें. मन्वादि स्मृतिप्रणितधर्म व मुसलमानी धर्म यांचे मध्यें समाजरचना, आचार, उपास्य दैवतें, मोक्ष साधनाचे मार्ग, इत्यादि प्रमुख बाबतींत दक्षिण व उत्तर ध्रुवा इतका विरोध आहे. या विरोधा मुळें मुसलमानांना धर्माचा प्रसार म्हणजे श्रुतिस्मृत्युक्त धर्माचा नायनाट असा मुसलमानी राजसत्तेचा अर्थ भरतखंडातील लोकांस भासूं लागला. फार पुरातन काळा पासून भरतखंडांतील लोकांची मनोरचना अत्यंत श्रद्धाळु व भाविक स्वरूपाची आहे. या त्याच्या मनोरचनेच्या दृष्टीनें मुसलमानी धर्माच्या जुलमी प्रसारामुळें श्रुतिस्मृत्युक्तधर्माची होणारी पायमल्ली त्यांस अत्यंत दुःसह होऊन मुसलमानी राजकीय सत्ते विषयीं त्यांच्या मनांत तीव्र द्वेष उत्पन्न झाला. मुसलमान लोकांनीं भरतखंडांत प्रवेश करून तेथील संपत्तीचा ते उपभोग घेऊं लागल्या मुळें त्यांच्या विषयीं महाराष्ट्रांतील लोकांच्या मनांत जितका द्वेष उत्पन्न होत असे त्या पेक्षां शतपटीनें त्यांच्या विषयीं अधिक द्वेष श्रुतिस्मृत्युक्तधर्मास पूज्य असलेल्या बाबींच्या त्यांच्या कडून होणाऱ्या विटंबने मुळें होत असे. भरतखंडाच्या उत्तरे कडील मुसलमानधर्मी मोंगल बादशहांनीं हिंदु धर्माची विटंबना म्हणण्या सारखी केली नाहीं. एक औरंगजेब खेरीज बाकीचे मोगल बादशहा मुसलमानी धर्मवेडानें ग्रस्त झालेले नव्हते. दक्षिण हिंदुस्थानांतील मुसलमानी सुलतान मोंगल बादशहा सारखे उदार मनाचे नसून मुसलमानी धर्मवेडानें अत्यंत ग्रस्त झालेले होते व त्या मुळें महाराष्ट्रीय समाजांतील लोकांस त्यांच्या कडून धर्मदृष्ट्या अनन्वीत जाच सोसावा लागला. शिवछत्रपतीच्या सप्तप्रकरणात्मक चरित्राच्या १७ पाना वरील या बाबती संबंधाचा खालील उल्लेख महत्वाचा आहे.

"दक्षणेंतील धर्म उच्छेद झाला. ब्राह्मणास पीडा बहुत, गोवध अपरिमित, देवस्थानें, क्षेत्रें यांचा उच्छेद झाला. दिल्लीपती यानें हिंदु राजाचे तहामुळें बहुत धर्मोच्छेद केला नाहीं; परंतु साहा यवनांनीं फार अमर्यादा केली."

वरील उताऱ्या वरून दक्षिणेंतील आदिलशाही, निजामशाही, कुतुबशाही, इत्यादि मुसलमान राजघराण्याच्या सुलतानानी कोणत्या प्रकारचा जुलूम महाराष्ट्रीय प्रजे वर केला हें सिद्ध होत आहे. बखरींतील वरील वर्णन अतिशयोक्तीचें नसून पूर्णपणें त्या काळचे वस्तुस्थितिदर्शक आहे हें दर्शविणारा कांहीं पुरावा आम्ही येथें नमूद करितों. पहिला महत्वाचा पुरावा म्हटला म्हणजे विजापूरचा बादशहा सुलतान महमद यानें राज्यकारभाराच्या बाबतींत त्याच्या वंशजास

घालून दिलेले नियम हा होय. ऐतिहासिक स्फुट लेख भाग २ पान २६ ( पारसांनस यांच्या इतिहाससंग्रह मासिकांत प्रसिद्ध झालेले ) या लेखांत बरीं च कलमें आहेत. प्रस्तुत स्थळीं चर्चा विषयक मुद्याच्या दृष्टीनें महत्त्वाचीं तेवढीं च कलमें आम्ही येथें देतों.

७ आपल्या मुलखांतील एकंदर कारखान्यांत मुसलमान जातीचे माम-लेदार वगैरे अमलदार व हिंदु जातीचे कारकून ठेवावें. हिंदु लोकांस हुकमी काम देऊं नये. कारण कीं पृथ्वीची व धर्माची खराबी त्यांत च आहे.

२१ मुसलमानांस व मुसलमानांचे कायद्यांस अशा प्रकारें मजबूत ठेवावें; कोणता हि अधर्मी पुरुष म्हणजे हिंदु प्रबळ असला तत्रापि त्यास एखाद्या गरीब मुसलमानाची बरोबरी करण्याचें सामर्थ्य राहूं नये असा मुसलमानी धर्म प्रबळ ठेवावा.

२२ जर कदाचित् एखादे मुसलमानानें गैर समजुतीनें हिंदूचा नाश करण्याचा प्रयत्न केला तर त्या मुसलमानास युक्तीनें ताकीद द्यावी कीं, या वेळेस असें करूं नकोस, पुढें पाहून घेतां येईल, तूर्त समय टाळ, असा त्यास उपदेश करावा परंतु हिंदूचें रक्षण करण्या विषयीं हिंदूचा पक्ष धरून मुसलमानास उपद्रव करूं नये व त्यास दु:ख देऊं नये. दिवाळी व दसरा वगैरे हिंदूंचे सण येतात तेव्हां ते लोक ते सण उघडपणें करितात. त्यास सणाचे समारंभ उघडपणें करूं देऊं नये. गुप्तपणें करूं लागल्यास मनाई करूं नये.

४५ जो हिंदु व्यापार व कसब न करितां एक वर्ष किंवा एक वर्षा वर कांहीं दिवस प्रपच निर्वाह करील असा असेल त्या पासून दर महा एक तोळा पावणे पांच गुंजा रुपें घेत जावें.

४९ जो हिंदु द्रव्यवान् आहे त्या पासून द्रव्यवानाचे कायद्या प्रमाणें व जो हमेष दरिद्री असेल त्या हिंदू पासून दरिद्री लोकांचे कायद्या प्रमाणें दंड घ्यावा.

५० ब्राह्मण, भट मंडळी, जंगम लोक सर्वांशीं देवधेवीचा व्यापार करितात सबब ते खंड घेण्यास पात्र आहेत. त्या पासून खंड घेतला च पाहिजे.

५१ खंड देणारानें खुद्द जातीनें येऊन खंडाचा ऐवज आपले हातानें

द्यावा. खंड वसूल करणारा कामगार बसलेला असावा. खंड देणारानें उभें राहून ऐवज द्यावा.

या शिवाय अशा च स्वरूपाचा दुसरा पुरावा आम्ही खाली देतों. सनदापत्रें ( वाड व पारसनीस ) पान ७७ व ८१ मध्यें काजीच्या चाकरी बद्दल त्यास दिलेल्या इनाम जमिनीच्या सनदा छापल्या आहेत. त्या सनदांतील खालील उल्लेख फार महत्त्वाचे आहेत.

" धर्मा प्रमाणें सर्व लोकांस वागविणें व पुरलेला व बेवारिसदाराचे मालाचा शोध करणें, व मराठी देवळांतील मूर्ति वगैरे मोडणें " हें काजीनें करावयाच्या अनेक कामां पैकीं एक काम असल्याचें नमूद केलें आहे. दुसऱ्या सनदत खालील उल्लेख आहे. लोकांस निराकाराचे भजण्या करितां बोलाविणे व दारू पिणारे लोक व कैफ करणारे लोक व शिवाय वाईट करणारे लोक यास मर्यादा देणें व देवांच्या मूर्ति दगडाच्या वगैरे आकारी बिन आकारी मोडून टाकणें. " हें काजीनें करावयाच्या अनेक कामा पैकी एक काम असल्याचें नमूद आहे. समर्थांनीं तत्कालीन महाराष्ट्रीय समाजातील लोकांच्या स्थितीचीं दर्शक दोन तीन शद्बचित्रें काढलेलीं अलीकडे उपलब्ध झालीं आहेत त्या पैकीं एक चित्र श्रीसांप्रदायिक विविधविषय भाग १५ पान १३९ वर छापलें आहे तें आम्ही खाली देतों:—

पदार्थमात्र तितुका गेला । नुस्ता देशचि उरला ।
येणें करितां बहुतांला । संकट जालें ॥
लोकें स्थानभ्रष्ट झालीं । कितेक तेथें चि मेलीं ।
उरलीं तें मराया आलीं । गांवावरी ॥
कांहीं रेडे पाडे उरले । ते लोक गांवावरी आले ।
+रगा करितां मरोनि गेले । रेडे पाडे ॥
माणसा खावया धान्य नाहीं । आंथरुण पांघरुण तें हि नाहीं ।
घरा कराया सामग्री नाहीं । काये करिती ॥

---

१ टीप—यदुनाथ सरकार यांच्या " Shiwaji and his times " या पुस्तकाच्या ३४ सावे पानावर खालील टीप आहे. Basatin-i-Salatin 332 and 333 frankly describes in detail how the Hindus were depressed as a deliberate policy of the State of Bijapur in the palmy days of Mahamed Adil Shaha. वरील मजकुरा वरून टीपेंत व्यक्त केलेल्या मताचा उत्तम प्रत्यय मेतो.

पुढें आला प्रजन्य काळ । धान्य महर्ग दुःकाळ ।
शाकार नाहीं भळभळ । रिचवें पाणी ॥
कितेक अनाचारीं पडिलीं । कितेक याति भ्रष्ट जालीं ।
कितेक ते आक्रंदलीं । मुलेंबाळें ॥ इत्यादि

या शद्बचित्रास समर्थांनीं परचक्रनिरूपण असें म्हटलें आहे. या शद्बचित्रा वरून वं वर नमूद केलेल्या दुसऱ्या पुराव्या वरून मुसलमानी अमला खालीं महाराष्ट्रीय जनता किती निकृष्टावस्तेप्रत पोहोंचली होती व धार्मिक बाबतींत मुसलमानी राजसत्तेचा अमल महाराष्ट्रीयांस किती जाचक व असह्य झाला होता हें उत्तम प्रकारें सिद्ध होत आहे. श्रुतिस्मृत्युक्तधर्मास अनुसरून महाराष्ट्रीय समाजाची जी घटना बनली होती तिच्या वर मुसलमानी धर्माचे तडाखे सतत बसल्या कारणानें ती अगदीं खिळखिळी होऊन गेली होती. श्रुतिस्मृत्युक्तधर्मदृष्ट्या आचार, व्यवहार, प्रायश्चित इत्यादि बाबतींत महाराष्ट्रीय समाजाचे जें वैशिष्ट्य असावयास पाहिजे होतें तें पार नष्ट झालें होतें. या मुळें महाराष्ट्रधर्मस्थापने खेरीज अन्य अशा कोणत्या हि ध्येयाची आवश्यकता शिवाजी महाराज उदयास येई तों पावेतों झालेल्या महाराष्ट्रीय समाजाच्या हरिकथानिरूपणी व राजकारणी पुढाऱ्यांस भासणें अशक्य झालें. या काळांतील महाराष्ट्रीय समाजाच्या हरिकथानिरूपणी व राजकारणी पुढाऱ्यांची ज्या स्वरूपाची मनोरचना होती त्या च स्वरूपाची मनोरचना महाराष्ट्रांतील सामान्य जनतेची होती हें आम्हीं मागें साधार सिद्ध केलें च आहे. शिवाजी महाराज व त्यांच्या समकालीन महाराष्ट्रीय समाजाच्या पुढाऱ्यांना वरील कारणा मुळें या ध्येयाची च आवश्यकता भासूं लागून त्यानीं स्वराज्यस्थापनेच्या द्वारा तें ध्येय मूर्तिमंत सिद्ध करून दाखविलें. महाराष्ट्रधर्मस्थापना हें च ध्येय महाराष्ट्रीय समाजाच्या हरिकथानिरूपणी व राजकारणी पुढाऱ्याचें कां बनलें गेलें या संबधाच्या कारणांची मीमांसा केल्यानंतर या ग्रंथाच्या प्रथम भागात मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाविषयीं इंग्रज, महाराष्ट्रीय व महाराष्ट्रेतर इतिहास लेखकांनीं जे अभिप्राय व्यक्त केले आहेत त्यांत कितपत सत्य आहे याच्या परीक्षणाकडे आतां आह्मी वळतों. वरील तीन वर्गांच्या लेखकां पैकीं इंग्रज लेखकांनीं मराठ्याचा भौतिक इतिहास लिहितांना मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपासंबंधीं तुटपुंजे दिग्दर्शन करण्याचा थोडा बहुत प्रयत्न केला आहे. या ग्रंथकारांच्या विवेचनाचा निष्कर्ष या ग्रंथाच्या पहिल्या भागांत दिलेल्या उताऱ्या

वरून जो निघतो तो हा कीं मराठ्यांनीं स्वराज्यस्थापना व स्वराज्याचा विस्तार हें जें महत् कृत्य केलें ते त्यांनीं कोणत्या हि प्रकारच्या उच्च ध्येयानें उद्युक्त होऊन केलें नसून निवळ लूट व परद्रव्यापहार करण्याच्या बुद्धीनें केलें. आम्ही या प्रकरणांत या मुद्या संबंधीं जो पुरावा नमूद केला आहे तो इतका भरभक्कम आहे कीं त्या वरून इंग्रज ग्रंथकाराची वरील मीमांसा असत्य व निवळ वेडगळपणाची आहे अशी कोणत्या हि निःपक्ष-पाती व मराठ्यां विषयीं पूर्वग्रहानें ज्याचें मन दूषित झालेलें नाहीं अश्या माणसाची खात्री झाल्या वांचून राहणार नाहीं. इंग्रज हे चातुर्वर्ण्यबाह्य असल्या कारणानें त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी अथवा हरिकथानिरूपणी पुढा-ऱ्यांशीं त्यांचा निकट सहवास घडणें दुरापास्त होतें. त्या च प्रमाणें सामान्य प्रतीच्या महाराष्ट्रीय जनतेंत मिळून मिसळून वागून त्यांच्या अंतरंगाचें ज्ञान करून घेणें त्यांस दुरापास्त होतें. या शिवाय शिवाजी महाराज अवतीर्ण होण्या पूर्वी महाराष्ट्रीय समाजांत धार्मिक व राजकीय उलाढाली कोणत्या झाल्या होत्या व त्या कोणत्या कारणामुळें झाल्या या संबंधानें ऐतिहासिक ज्ञान त्यांस नव्हतें. अशा प्रकारच्या अडचणी मुळें मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष कोणत्या अंतस्थ कारणा पासून झाला हें त्यास अवगत न झाल्या कारणानें त्यांनीं केलेली वरील मीमांसा वेडगळपणाची व असत्य ठरावी यांत कांहीं आश्चर्य नाहीं. प्रस्तुत काळीं हि मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाची यथातथ्य कल्पना ज्यास करितां येईल अशा ऐपतीचा इंग्रज लेखक आढळणें दुरापास्त आहे. महाराष्ट्रीय समाजाची रचना पुरातन काळा पासून कोणत्या पद्धतीनें बनत आली आहे. त्यांत कोणकोणते तत्वज्ञानात्मक व धार्मिक पंथ उदयास आले, ते पंथ उदयास येण्यास कोणती परिस्थिति कारणीभूत झाली, महा-राष्ट्रांत वेळोवेळीं उदयास येऊन लय पावलेल्या राजकीय सत्तांचे परिणाम महाराष्ट्रीय समाजा वर कोणत्या प्रकारचे झाले इत्यादि बाबी संबंधीं ज्ञान मराठ्यांच्या इतिहास लेखकांस असणें अवश्य आहे. या शिवाय मराठी भाषेंतील हरिकथानिरूपणी पुढाऱ्यांनीं निर्मिलेलें वाङ्मय व मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें यांचा हि या लेखकांस चांगला परिचय पाहिजे व महाराष्ट्रीय समाजांतील निरनिराळ्या वर्णाच्या लोकांच्या अंतरंगाची त्यास ओळख पाहिजे. ही सर्व सामुग्री कोणत्या हि इंग्रजास सहज साध्य नसल्याकारणानें त्यास मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाची

ओळख पटून ती त्याचे हातून ग्रथित केली जाणें दुरापास्त आहे.

आतां महाराष्ट्रेतर प्रांतातील इतिहासकारांनीं मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाची केलेली मीमांसा कितपत बरोबर आह याच्या परीक्षणा कडे वळूं. महाराष्ट्रेतर प्रांतांतील मराठ्यांच्या इतिहास लेखकांत प्रामुख्यानें ज्यांचें नांव आढळतें असे गृहस्थ म्हटले म्हणजे यदुनाथ सरकार हे होत. प्रो. सरकार हे बंगाली गृहस्थ असून कोणत्या हि इंग्रज पेक्षां किती तरी पटीनें ते महाराष्ट्रास निकट आहेत. परंतु मोठ्या कष्टानें असें म्हणणें प्राप्त आहे की कोणत्या हि इंग्रजा पेक्षां ते महाराष्ट्रास इतकें निकट असून हि त्यांच्या निकटत्वाचा मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाच्या सत्य मीमांसेच्या बाबतींत त्याना यत्किंचित हि उपयोग झाल्याचें दिसत नाहीं. मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाची ओळख पटण्यास ज्या अडचणी इंग्रज ग्रंथकारांस पूर्व काळीं येत व हल्लीं हि येतात त्या अडचणी थोड्या बहुत प्रमाणानें महाराष्ट्रेतर प्रांतांतील माणसास हि येण्याचा संभव आहे ही गोष्ट खरी आहे. परंतु कोणत्या हि इंग्रजा पेक्षां महाराष्ट्रेतर प्रांतातिल मराठ्यांच्या इतिहास लेखकास या अडचणी स्वल्प प्रयासानें दूर करितां येण्यासारख्या आहेत व मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाची कल्पना त्यास प्राप्त करून घेणें अशक्य नाहीं. यदुनाथ सरकार यांनीं वरील अडचणी दूर करून मराठ्यांच्या आत्मिक इतिहास संबंधीं लेख लिहिण्याचे प्रयत्न केल्याचें आज पावेतों दिसत नाहीं. वरील अडचणी खेरीज यदुनाथ सरकार यांच्या हातून मराठ्यांच्या आत्मिक इतिहासाची सत्य मीमांसा न होण्याची दुसरीं हि कांहीं कारणें आहेत. मोंगल बादशाहांच्या काळांतले तवारिखनामे व पत्रव्यवहार यांच्या कडे हिंदुस्थानांतील इतिहास लेखकांचे बरे च दिवस लक्ष गेलें नव्हतें. विश्वविद्यालयपदवीविभूषित फारशी भाषेचें गाढ ज्ञान संपादन केलेल्या आधुनिक विद्वानां पैकीं यदुनाथ सरकार हे एक आहेत. त्यांचें लक्ष वरील इतिहाससामुग्री कडे वेधलें जाऊन त्यांनीं तिच्या आधारें औरंगजेब बादशाहाच्या कारकीर्दी विषयीं इंग्रजी भाषेंत लिहिलेले कांहीं ग्रंथ प्रसिद्ध केले व त्यांची इतिहासकार म्हणून प्रसिद्धी झाली. तथापि मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाची ओळख पटण्यास वरील सामुग्रीचा त्यांना कांहीं च उपयोग होण्यासारखा नव्हता. या सामुग्रीचा जो कांहीं थोडा बहुत उपयोग त्यांना झाला असेल तर त्याच्या योगानें मराठ्यां विषयीं त्यांचें मत दूषित झाले हा होय.

मराठी भाषा यदुनाथ सरकार यांना अवगत असून मराठी बखरी त्या च प्रमाणें मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें यांच्याशीं त्यांचा परिचय असल्याचें नुकते च प्रसिद्ध झालें आहे.[1] मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपाची यथायोग्य कल्पना येण्यास वरील वाङ्मयाच्या परिचयाची जितकी आवश्यकता आहे तितकी च आवश्यकता शके १२०० पासून शिवाजी महाराज उदयास येइ तों पर्यंत महाराष्ट्रीय समाजाच्या हरिकथानिरूपणी पुढाऱ्यांनीं निर्माण केलेल्या भक्तिप्रधान वाङ्मयाच्या ज्ञानाची आहे. या वाङ्मयाशीं यदुनाथांचा परिचय असल्याचें दिसत नाहीं. या मुळें मराठी बखरी वाचून हि मराठ्यांच्या सत्तेच्या उत्कर्षाच्या कारण मीमांसेचीं द्योतक अशी बखरकारांनीं बखरींत योजिलेलीं महत्त्वाचीं वाक्यें यदुनाथ यांच्या लक्षांत आलीं नाहींत मग त्या वाक्यांत भरलेला अर्थ त्यांच्या लक्षांत येणें लांब च राहिलें. या शिवाय दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, मोंगल बादशहा पैकीं हुमायून, बाबर, अकबर, जहांगीर व शहाजहान इत्यादि उदार मनाच्या बादशहांच्या कारकीर्दी कडे यदुनाथ यांचें लक्ष न जातां त्यांची संशोधन दृष्टि मुसलमानी धर्मवेडानें ज्याचें मन ग्रस्त झालेलें होतें व जो मराठ्यांचा कट्टा शत्रु म्हणून प्रसिद्ध पावलेला होता अशा अकुंचित वृत्तीच्या औरंगजेब बादशहाच्या कारकीर्दी कडे गेलें. औरंगजेबच्या कारकीर्दी संबंधीं यदुनाथांनीं जे ग्रंथ लिहिले ते मुख्यत्वें-करून फारशी तवारिखनामे व त्या काळचे फारशी लेख यांच्या आधारें लिहिले आहेत. औरंगजेब व शिवाजी यांचा परस्पर संबंध अहिनकुलवत् होता. ही गोष्ट लक्षांत घेतली असतां फारशी तवारिखा लिहिणारे औरंगजेबचें चित्र मनोवेधक व शिवाजी महाराजांचें चित्र भेसूर रंगांनीं रंगविणार हें उघड आहे. शिवाजी महाराजांच्या चरित्राशीं प्रो. सरकारांचा दाट परिचय वरील एकतर्फी तवारिखनाम्या वरून झाला. तत्पूर्वी विद्यार्थी दशेंत यदुनाथास इंग्रजांनीं लिहिलेल्या मराठ्यांच्या इतिहासा वरून शिवाजी महाराजांच्या चारित्राचा अल्प परिचय झाला असला पाहिजे हें उघड आहे. विद्यार्थीदशेंत इंग्रज ग्रंथकारांनीं लिहिलेल्या ग्रंथां वरून शिवाजी महाराजा विषयीं यदुनाथांच्या झालेल्या प्रतिकूल ग्रहांत तवारिखनाम्यांतील हकीकतीची भर पडल्या मुळें शिवाजी महाराजांनीं केलेल्या महत् कार्याचें खरें स्वरूप यदुनाथांच्या लक्षांत न

---

१ टीप:-केसरी वर्तमान पत्राचा बातमीदार व यदुनाथ यांचा सन १९२५ चे जुलई महिन्यांत प्रसिद्ध झालेला केसरीपत्रांतील संवाद पहा.

याचें यांत कांहीं आश्चर्य नाहीं. या शिवाय मराठ्यांचा व बंगाल प्रांतांतील लोकांचा स्वराज्याचे काळांतील संबंध लक्षांत घेतला असतां यदुनाथांची स्वाभाविक मनोरचना मराठ्यां विषयीं प्रतिकूल असणें अपरिहार्य आहे. इंग्रजी सत्ता भरतखडांत स्थापित होण्या पूर्वी बंगाल प्रांत मोंगल बादशाहांच्या ताब्यांत होता. पुढें मोंगल बादशाहांची सत्ता दुर्बल झाल्या वर तो प्रांत ज्या मोंगल सरदाराच्या ताब्यांत होता तो प्रबळ होऊन बंगाल प्रांताचा मालक बनला. शाहू महाराजांच्या कारकीर्दींत दिल्लीचे बादशाहा व मराठे यांचे मध्यें ठरलेल्या करारा पैकीं एक कलम खालील स्वरूपाचें होतें. "कान्होजी भोसले याणीं गोंडवण, वऱ्हाड, कटक अमल बसविला त्याप्रमाणें चालावे" ( थोरले शाहू महाराजांचें चरित्र पान ४१ ). या करारास अनुसरून बंगाल प्रांता वर साल दरसाल मराठ्यांच्या स्वाऱ्या होण्यास प्रारंभ झाला. या स्वाऱ्यांचें "पूर्व देश सेनापतीसाहेब सुभा थांजकडे वराड, गोंडवण, बंगाल, जगन्नाथ पर्यंत सांगितला." अशा प्रकारचें वर्णन शाहू महाराजांचें चरित्रांत केलें आहे. संयुक्तमराठाराजकियसंघापैकीं नागपुरकर भोसल्यांच्या स्वाऱ्या सालोसाल बंगाल प्रांतावर ज्या होत असत त्याची उपपत्ती या प्रकारची आहे. बंगाल प्रांतांतील प्रजा यद्यपि मराठ्याप्रमाणें हिंदु धर्मानुयायी होती तथापि ती प्रजा मुसलमान राजकर्त्यांच्या मुलुखांतील असल्याकारणानें या स्वाऱ्यांत शत्रुप्रजा या नात्यानें मराठ्यांच्या पासून बंगाली लोकांना अत्यंत हालअपेष्टा सोसाव्या लागल्या. मराठ्यांच्या या स्वाऱ्यांचें स्मारक प्रस्तुत काळीं हि मराठा डीच या नांवानें प्रसिद्ध असलेलें पाहावयास सापडतें. मराठे व बंगाली लोकांच्या या पूर्वकालीन संबंधा मुळें बंगाली लोकांची सर्वसाधारण मनोरचना मराठ्यां विषयीं प्रतिकूल बनली आहे. मराठ्यां विषयीं निःपक्षपात बुद्धीनें लिहिणें प्रोफेसर सरकार यास या मुळें हि दुरापास्त झालें असलें पाहिजे. मराठ्यांच्या इतिहासाच्या आत्मिक स्वरूपा विषयीं यदुनाथांनीं केलेली मीमांसा कोणत्या कारणा मुळें लंगडी व असमाधानकारक झाली आहे याचें दिग्दर्शन आम्हीं केलें आहे. औरंगजेबच्या कारकीर्दीचा इतिहास लिहितांना अनुषंगिक रीतीनें वर दर्शविलेल्या सर्व अडचणी अस्तित्वांत असतां शिवाजी महाराजांच्या चरित्राचा प्रोफेसर सरकार यांचा जो अभ्यास झाला त्याचें फल म्हणजे त्यानीं लिहिलेलें शिवाजी महाराजांचें चरित्र हें होय. स्वधर्म स्थापनेचें अथवा अधिक युक्त शब्द वापावयाचा म्हणजे महाराष्ट्रधर्मस्थापनेचें श्रेष्ठ ध्येय आपल्या पुढें ठेऊन

शिवाजी महाराजांनीं स्वराज्यस्थापनेचा व त्याच्या विस्ताराचा अवाढव्य खटाटोप केला या महत्वाच्या बाबींची अंधुक जाणीव हि यदुनाथास झाली नाहीं असें शिवाजी महाराजासंबंधीं त्यांनीं काढलेल्या खालील उद्गारा वरून दिसून येतें.

" His record is incomplete and we cannot confidently *deduce his political aim from his actual achievement.* It would be more correct to conjucture it from indirect sources like his regulations though this class of material is scanty and often inconclusive. ( Shiwaji and his Times Page 493 )".

" शिवाजी संबंधीं पुरेसे कागद उपलब्ध नाहींत व त्यामुळें त्याचें राजकीय ध्येय कोणत्या प्रकारचें होतें याची कल्पना त्यानीं केलेल्या कार्यावरून करितां येत नाहीं. त्यानीं केलेल्या कायदेकानू वरून ( हे हि फार थोडे व निश्चित अनुमान काढण्यास अपुरे आहेत ) त्याच्या ध्येया विषयीं कल्पना करणें अधिक प्रशस्त होईल. "

दुसऱ्या एका ठिकाणीं यदुनाथ म्हणतातः—

" He has proved that the Hindu race can still produce not only Jamaitdars ( commissioned officers ) and Chitnises ( clerks ) but also rulers of men and even a king of kings ( Chatrapati )."

" जमादार, चिटणीस, इत्यादि प्रकारचे अधिकारी च काय परंतु मनुष्यावर राज्य करणारे राजे व राजांचा राजा ( छत्रपति ) हिंदु लोकांत निर्माण होऊ शकतो हे शिवाजीनें सिद्ध करून दाखविलें आहे. "

वरील उद्गारा वरून शिवाजी महाराजांच्या चरित्राचें रहस्य प्रो. सरकार यांना जें कांहीं ज्ञात झालें तें हें कीं, भरतखंडात स्वराज्य स्थापून तें चालविण्याच्या ऐपतीचीं माणसें निपजूं शकतात. जणूं काय शिवाजी महाराज जन्मास येण्या पूर्वी भरतखंडांत मोठमोठी राज्यें स्थापन करून तीं चालविण्याच्या ऐपतीचें लोकोत्तर पुरुष झाले च नव्हते. शिवाजी महाराजा सारख्या महान् पराक्रमी विभूतीच्या चरित्राचें असल्या प्रकारचें रहस्य प्रो. सरकार सारख्या इतिहासकार म्हणून प्रसिद्धीस आलेल्या विद्वान् गृहस्थानें काढलेलें पाहून मराठ्यांच्या आत्मिक इतिहासाच्या त्याच्या अज्ञानाबद्दल मनांत कींव आल्यावांचून रहात नाहीं.

आतां खुद्द महाराष्ट्रीय इतिहासलेखकांनीं मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेच्या व विस्ताराच्या ध्येया विषयीं केलेली मीमांसा कितपत बरोबर आहे या मुद्याच्या चर्चेकडे आम्ही वळतों. मराठ्यांच्या आत्मिक इतिहासा विषयीं चर्चा करणाऱ्या महाराष्ट्रीय लेखकाच्या मतांचें दिग्दर्शन करणारे जे उतारे आम्हीं पहिल्या व दुसऱ्या प्रकरणांत दिले आहेत त्या उताऱ्यांचा साकल्यानें विचार केला असतां या प्रश्नासंबंधीं दोन पंथ असल्याचें आम्हीं मागें नमूद केलें च आहे. या दोन पंथां पैकीं पहिल्या पंथाचे प्रमुख कै. न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे हे होत. यास्तव न्यायमूर्तींनीं मराठ्यांच्या सत्तेच्या उत्कर्षा विषयीं केलेली मीमांसा कितपत बरोबर आहे याचें आम्ही प्रथम परीक्षण करतों शिवाजी महाराज ज्या काळीं उदयास आले त्याकाळीं महाराष्ट्रांत स्वराज्याचें बी रुजण्यास कोणत्या बाबी कारणीभूत झाल्या याचें दिग्दर्शन न्यायमूर्तींनीं "Rise of the Maratha Power" या ग्रथांत खालीलप्रमाणें केलें आहे.

"He did not create the Maratha Power; that Power had been already created, though scattered in small centres all over the country. He sought to unite it for a higher purpose by directing it against the common danger.

Thus was the ground prepared, partly by nature, partly by ancient History of the country, *partly by religious revival*, but chiefly by a long desclipine in arms which the country had undergone under Mahomedan Rule for three hundred years."

"मराठ्यांची सत्ता शिवाजीनें निर्माण केली नाहीं. शिवाजीच्या पूर्वीं च या सत्तेची लहान लहान केंद्रें महाराष्ट्रदेश भर ठिकठिकाणीं पसरलेली होतीं. सर्व देशावर आलेल्या संकटाच्या प्रतिकाराच्या श्रेष्ठ हेतूस्तव त्यानें ह्या सत्तेच्या केंद्रांचें एकीकरण केलें. अंशतः महाराष्ट्रदेशाच्या सृष्टिनिर्मित रचनेमुळें, त्याच्या पूर्वेतिहासामुळें व धार्मिक पुनरुज्जीवनामुळें परंतु मुख्यत्वें करून तीनशें वर्षांच्या मुसलमानी अमलाखालीं मराठ्यास शस्त्रें वापरण्याच्या मिळालेल्या शिक्षणामुळें स्वराज्यस्थापनेस अनुकूल अशी भूमी निर्माण झाली."

वरील उताऱ्यांत मराठ्यांच्या उत्कर्षा विषयीं जीं महत्त्वाचीं कारणें न्या-

यमूर्तींनीं दर्शविलीं आहेत त्यां पैकीं धार्मिक पुनरुज्जीवन हें एक मराठ्यांच्या सत्तेच्या उत्कर्षाचें कारण असल्याचें नमूद केलें आहे. ज्ञानेश्वरा पासून तों थेट तुकाराम महाराजा पर्यंतों महाराष्ट्रांत जे हरिकथानिरूपणी पुढारी होऊन गेले त्यांनीं सुरू केलेल्या विठ्ठलभक्तीप्रधान वारकरी सांप्रदायामुळें अथवा भागवतधर्मामुळें स्वराज्यस्थापनेस अनुकूल अशी महाराष्ट्रीय जनतेची मनोभूमी कशी तयार झाली या संबंधाच्या न्यायमूर्तींनीं केलेल्या प्रतिपादनाचें दिग्दर्शन मागें आम्हीं केलें आहे. युरोप खंडांतील त्या च सुमारास अस्तित्वांत आलेल्या रेफर्मेशनच्या स्वरूपाचा महाराष्ट्रांतील वारकरी सांप्रदाय अगर भागवत धर्म होता असें न्यायमूर्तींचें मत आहे. शिवाजी महाराज जन्मास येण्यापूर्वी ज्या धर्माची स्थापना करण्याबद्दलची आकांक्षा महाराष्ट्रीय समाजाच्या हरिकथानिरूपणी व राजकारणी पुढाऱ्यांचे मनांत उत्पन्न झाली होती त्या धर्माचें साम्य युरोप खंडांत उदयास आलेल्या रेफर्मेशनशीं बिलकूल नाहीं हें मागें आम्ही महाराष्ट्रीय हरिकथानिरूपणी पुढाऱ्यांचे जे उद्गार नमूद केले आहेत त्यां वरून सहज दिसून येण्यासारखें आहे. श्रुतिस्मृतिप्रतिपादीत आचार, व्यवहार, प्रायश्चित्त, राजधर्म इत्यादि लोप पावलेल्या धर्माचें महाराष्ट्रीय समाजात पुनरुज्जीवन करावयाचें उर्फ महाराष्ट्रधर्माचा स्थापना करावयाची हें मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेचें व स्वराज्याच्या विस्ताराचें ध्येय होत असें आम्हीं मागें नमूद केलेल्या पुराव्या वरून सिद्ध केलें आहे वारकरी सांप्रदाय व महाराष्ट्रधर्म एक च कीं भिन्न या प्रश्नाची साग्र चर्चा प्रस्तुत स्थळीं करण्याच्या भानगडींत तूर्त न पडतां वरील प्रश्ना संबधीं पुराव्याच्या आधारें निष्पन्न होणाऱ्या सिद्धांताचें आम्हीं थोडक्यांत दिग्दर्शन करितों. ज्ञानेश्वर काळीं जो विठ्ठलभक्तिप्रधान सांप्रदाय उर्फ वारकरी सांप्रदाय अस्तित्वांत आला तो महाराष्ट्रीय समाजांतील ब्राह्मणवर्णा खेरीज बाकीच्या जनतेंत आध्यात्मिक ज्ञानाचा प्रसार करून सर्वत्रास मोक्षप्राप्ति करून घेण्याचा मार्ग खुला करून देण्यास्तव उदयास आला. जैन, लिंगायत, मानभाव इत्यादि पंथात महाराष्ट्रीय जनतेने न शिरतां स्वधर्मास चिकटून राहावें हे या सांप्रदायाचें मुख्य धोरण होतें. ज्ञानेश्वर निजधामास गेल्या नंतर महाराष्ट्र देश मुसलमानांनीं पादाक्रांत करून त्या वर आपलें राजकीय वर्चस्व प्रस्थापित केलें. मुसलमानाच्या राजकीय सत्तेचें प्रमुख ध्येय इस्लाम धर्माचा प्रसार करणें हें असल्यामुळें वारकरी सांप्रदायाच्या वरील ध्येयाची आवश्यकता महाराष्ट्रीय समाजाच्या हरिकथानिरूपणी पुढाऱ्यांस ज्यास्त च भासूं लागली. किंबहुना

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य इत्यादि वर्णा खेरीज महाराष्ट्रीय जनतेंतील इतर लोकांना इस्लाम धर्माचे अनुयायी बनू न देतां हिंदु धर्माच्या गोटांत ठेवण्यास तो एक च मार्ग शिल्लक राहिला. मुसलमानांच्या राजवटींत महाराष्ट्रिय समाजांतील ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादि वर्णांच्या लोकांस श्रुतिस्मृत्युक्त धर्मानुसार आचरण करणे हि दुरापास्त झालें. या मुळें नामस्मरण व विठ्ठल भजन या दोन स्वल्प मार्गांचा सर्व वर्णांच्या महाराष्ट्रीय जनतेस महाराष्ट्रीय साधुसंतानीं सतत दोन अडीचशें वर्षे उपदेश करून तिजला कसे बसें त्यांनीं हिंदु धर्माच्या गोटांत राखून ठेविलें. महाराष्ट्रीय समाजाच्या हरिकथानिरूणी पुढाऱ्यांस विठ्ठलभक्तिप्रधानपंथ उर्फ वारकरी सांप्रदाय श्रुतिस्मृत्युक्तधर्मा पेक्षां श्रेष्ठ वाटत होता अशातला बिलकुल प्रकार नव्हता अशी महाराष्ट्रीय हरिकथानिरूपणी पुढाऱ्याचे मागें जे उद्गार आम्हीं नमूद केले आहेत त्यां वरून कोणाची हि खात्री झाल्या खेरीज राहणार नाहीं. कलियुगांत श्रुतिस्मृत्युक्त धर्मास अनुसरुन आचरण करणें दुरपास्त झाल्यामुळे विठ्ठलनामस्मरण व विठ्ठलभजन या सोप्या साधनाचा पुरस्कार महाराष्ट्रीय संतांनीं केला असें आम्हीं मागें नमूद केलेल्या उद्गारावरून सहज दिसून येण्यासारखें आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे इतकें च कीं, वारकरी सांप्रदायाचा उद्भव प्रथम श्रुतिस्मृत्युक्तधर्माच्या अनेक अंगां पैकीं मोक्षप्राप्तिस साधनीभूत अशा अध्यात्म तत्वज्ञानाचा ब्राह्मणा पासून तों थेट चांडाळा पावेतों सर्व वर्णांच्या व जातींच्या लोकांस परिचय करून देऊन त्यांचीं मनें जैन, लिंगाईत, मानभाव इत्यादि सांप्रदायांत सामील होण्यापासून परावर्त करण्या करितां झाला व त्यानंतर मुसलमान धर्माचें संकट महाराष्ट्रावर ओढविल्यामुळें त्या धर्मापासून हिंदु धर्मीयाचा बचाव करून त्याना स्वधर्माच्या गोटांत राखून ठेवण्यास्तव हा सांप्रदाय पुढें दोन अडीचशें वर्षे पावेतों म्हणजे शिवाजी महाराजाचा उदय होईतोपर्यंत जोमदार स्थितींत सुरू राहिला. वारकरी सांप्रदायाचे सुरवातीपासून शेवट पावेतों धोरण लगड्या लुल्या स्थितींत श्रुतिस्मृत्युक्तधर्मांचा जेवढा बचाव करितां येईल तितका करावयाचा या स्वरूपाचें होतें. या सांप्रदायाच्या सर्व पुढाऱ्यांनीं मग ते ब्राह्मण असोत अगर अन्य जातीचे असोत श्रुतिस्मृत्युक्तधर्म झुगारून द्यावा असा महाराष्ट्रीय जनतेस कधीं हि उपदेश केलेला नाहीं. उलट यवनांच्या संसर्गामुळें श्रुतिस्मृत्युक्तधर्म बुडाल्या बद्दल त्यांना अत्यंत

खेद वाटून त्या धर्मास चांगले दिवस दाखविण्या बद्दल त्यांनीं परमेश्वराचा धांवा केला आहे. श्रुतिस्मृत्युक्तधर्मास चागले दिवस येई तों पावेतों विठ्ठल-नामस्मरण व विठ्ठलभजन या स्वल्प साधनानीं महाराष्ट्रीय जनतेनें आपला उद्धार करून घ्यावा असें महाराष्ट्रीय संताच्या उपदेशाचें सार आहे. आता पावेतों आह्मी केलेली चर्चा लक्षात घेतां ज्ञानेश्वरादि महाराष्ट्रीय संतांनीं सुरूं करून सतत अडिचशे तीनशे वर्षें चालू ठेविलेली वरील प्रकारची धार्मिक चळवळ युरोपखंडांत प्रसिद्धीस आलेल्या रेफर्मेशनच्या चळवळीच्या स्वरूपाची होती असें म्हणणें कधी हि सयुक्तिक होणार नाहीं रेफर्मेशनची चळवळ कॅथॅलिक धर्मा विरुद्ध जसें एक प्रकारचें बंड होतें तसा पंढरपुरचा वारकरी संप्रदाय हा श्रुतिस्मृत्युक्त धर्मा विरुद्ध बंड करण्याच्या हेतूनें स्थापित करण्यांत आला होता असे विधान करणें सत्यास व प्रत्यक्ष वस्तुस्थितीस सोडून आहे असें या सांप्रदायाच्या संत पुढाऱ्याच्या उद्गागावरून सहज दिसून येण्यासारखें आहे. या सर्व गोष्टी विचारात घेतां वारकरी सांप्रदाय हा शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थापनेस खरोखरी च उपकारक झाला आहे किंवा काय व तो उप-कारक झाला असल्यास कोणत्या दृष्टीनें उपकारक झाला आहे असा प्रश्न साहजिक रीतीनें आपल्या पुढें उभा रहातो. ह्या सांप्रदायाच्या निर्मितीची आम्हीं जी मीमांसा वर केली आहे ती लक्षात घेतली असतां या सांप्रदायाने केलेले कार्य अप्रत्यक्ष रीतीने स्वराज्यास पोषक असें झालेलें आहे, हे कबूल करावें लागेल. मुसलमानांनीं आपलें राजकीय वर्चस्व महाराष्ट्रावर प्रस्थापित केल्या नंतर श्रुतिस्मृत्युक्तधर्मानुयायी महाराष्ट्रीय जनतेचा मुसलमानी धर्मा पासून बचाव करण्या करितां वारकरी सांप्रदाया सारखा एकादा सांप्रदाय अस्तित्वात आला नसतां तर महाराष्ट्रीय जनतेची काय अवस्था झाली असती याची कल्पना करणें कठीण नाहीं. जगांतील निरनिराळ्या राष्ट्रांच्या इतिहासा वरून असें दिसून येते कीं, कित्येक राष्ट्रांस मुसल-मानी धर्माचा कांहीं काळ संसर्ग घडतां च त्या राष्ट्रांतील सर्व जनतेनें मुसलमानी धर्माचा स्वीकार केला. श्रुतिस्मृत्युक्तधर्माचा बचाव करण्यास्तव वारकरी सांप्रदाय महाराष्ट्रांत अस्तित्वांत आला नसता तर मुसल-मानांच्या राजकीय वर्चस्वामुळें तो च प्रकार या देशांत सहज घडून आला असता. परंतु वारकरी सांप्रदायाच्या हरिकथानिरूपणी पुढाऱ्यांनीं दोन अडी-चशें वर्षें श्रुतिस्मृत्युक्तधर्मा बद्दल महाराष्ट्रीय जनतेत जो तीव्र अभिमान

जागृत ठेविला व विठ्ठलनामस्मरण व विठ्ठलभजन या दोन अत्यंत स्वल्प साधनांच्या योगानें स्वधर्माचा बचाव करून मुसलमानी धर्माच्या गोटात शिरण्या पासून महाराष्ट्रीय जनतेस पराङ्मुख केले त्यामुळें शिवाजी महाराजांच्या स्वराज्य-स्थापनेचें श्रुतिस्मृत्युक्तधर्मस्थापना अथवा महाराष्ट्रधर्मस्थापना हें जें ध्येय तें सिद्ध करणें शक्य झालें.

वारकरी सांप्रदायाच्या वरील कामगिरीच्या अभावी महाराष्ट्रीय जनता मुसल-मान धर्मानुयायी बनल्यामुळें श्रुतिस्मृत्युक्तधर्माची स्थापना करण्याच्या ध्येयाचें शिवाजी महाराज ज्या काळीं उदयास आले त्या काळीं प्रयोजन च उरलें नसतें. आतां दर्शविलेल्या या दृष्टीनें वारकरी सांप्रदायाचा स्वराज्यस्थानेस निःसंशय उपयोग झालेला आहे ही गोष्ट कोणास हि कबूल करणें भाग आहे. परंतु ही दृष्टि एका बाजूला ठेविली तर वरीक वारकरी सांप्रदायाचा शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थापनेशीं कांहीं एक संबंध पोंहोचू शकत नाहीं ही बाब हि वरील बाबी इतकी च स्पष्ट व निर्विवाद आहे. स्वराज्यस्थापनेच्या सुरवातीस शिवाजी महाराज व त्याचे साह्यकर्ते, सल्लागार व अनुयायी यांनीं केलेल्या कृत्यास लागणारें धाडस, शौर्य, स्वतःचें जीवित कस्पटा समान मानून वाटेल त्या संकटांत उडी घालण्याची सिद्धता, इत्यादि गुण त्यांच्या अंगीं वारकरी सांप्रदायाच्या शिकवणीमुळें उत्पन्न झालेले नव्हते. वारकरी सांप्रदायाचा बाणा त्या सांप्रदायांतील सुप्रसिद्ध हरिकथानरूपणी पुढारी जे एकनाथ त्यांच्या चरित्रातील गोदावरी नदी वरून स्नान करून घरीं परत येत असता त्यांच्या अंगावर यवन थुंकला असतां त्यानीं केलेल्या वर्तना विषयींची जी सर्वश्रुत कथा आहे ती वरून स्पष्ट होत आहे. दुष्टांचा दुष्टपणा त्यांच्याशीं सुष्टपणानें वागून नाहींसा करावयाचा असें वारकरी सांप्रदायाचें सर्व साधारण धोरण होतें. भक्तिलीलामृत संतलीलामृत इत्यादि ग्रंथांत वारकरी सांप्रदायानुयायीं भक्तावर आलेल्या संकटाचें निवारण श्री विठ्ठल कसें करीत असें या बद्दलच्या कथा वाचल्या असता त्यांत वरील तत्वाचा पुरस्कार केल्याचें दिसून येतें. या शिवाय कलियुगाच्या महिम्यामुळें मुसलमानांनीं चालविलेल्या अत्याचारा सारखे अत्याचार व्हावयाचे च अशी सव साधारण महाराष्ट्रिय जनतेची मनोरचना बनली गेल्यामुळें प्रतिकाराच्या कल्पनेचा उगम सामान्य प्रकारच्या महाराष्ट्रिय जनतेंत उदयास येणें च दुरापास्त झाले होते. प्रस्तुत स्थळीं त्या काळच्या सामान्य प्रकारच्या महाराष्ट्रीयांची मनो-

रचना कशा प्रकारची होती हें दर्शविणारी एक कथा या ठिकाणीं नमूद करणें अप्रयोजक होणार नाहीं. निजाम शाईंत बेदर शहरा पासून दोन मैल अंतरावर कर्नाटक प्रांतांतील ब्राह्मणांचे कुलदवत असें एक नरसिंहाचें प्राचीन देवस्थान आहे. या देवस्थानाचें मुसलमानी वर्चस्वाखालीं मशिदींत रूपांतर झाल्याचें दिसतें. मशिदीस लागून च एक भव्य दरवाजा असून त्याच्या आंत प्रवेश केला कीं एक पाण्याचे तळें आहे. तळ्याच्या एका बाजूस एक पोकळ दरड असून तीतून त्या तळ्यांत पाणी येतें. दरवाजा ओलांडून आंत जातां च ब्राह्मणादि हिंदु व मुसलमान एकत्र ठिकाणीं त्या तळ्यात स्नान करितांना व कपडे धुतांना आमचे दृष्टीस पडले. तेव्हा हा प्रकार कसा काय खपला जातो असे तेथील पुजाऱ्यास विचारितां कलियुगांत या ठिकाणीं स्पर्शास्पर्शभेद मानावयाचा नाहीं असे या स्थलाचें महात्म्य आहे असें त्यानें उत्तर दिलें. ज्या पोकळ दरडींतून पाणी येत होतें त्या दरडींत आम्ही प्रवेश करून दीडशें दोनशें हात आंत गेल्यावर पाण्याच्या वर असलेल्या दरडीच्या एका भागांत एक लहानसें खबदाड आमच्या बरोबर असलेल्या मशालीच्या उजेडाच्या योगानें आम्हास दिसलें. पुजारीबुवांनीं त्या ठिकाणीं गंध फूल इत्याद समुग्रीनें पूजा करण्यास आम्हास सांगितले. आम्ही स्वाभाविक रातीनें पुजारीबुवास नारसिंहाचें मुख कोठें आहे असा प्रश्न केला. तेव्हां या ठिकाणीं नारसिंहाच्या पाठीची पूजा करण्याचा प्रघात असल्याचें त्यानें आम्हांस सांगितलें. त्या नंतर असा विचित्र प्रघात कां पडला असें त्यास विचारतां त्यानें एक ऐतिहासिक कथा सांगितली. औरंगजेब बादशहाची स्वारी बेदर प्रांतीं आली त्या वेळीं त्या स्वारीची नजर या नारसिंहाकडे गेली. तेव्हां नारसिंहाची घाबरगुंडी उडून तो जो पळत सुटला तो त्या दरडींत शिरून वरील खबदाडांत पाठ भुयागाचे तोंडाकडे करून जो तो बसला तो तसा च त्या ठिकाणीं स्थित झाला. तेव्हांपासून नारसिंहाच्या पाटीची पूजा करण्याचा प्रघात या ठिकाणीं प्रशस्त मानण्यांत येऊं लागून तो अद्याप पावेतों तसाच सुरू आहे. वरील कथा म्हणजे तत्कालीन महाराष्ट्रीय जनतेची औरंगजेब सारख्या प्रबल शत्रू पुढें जी हतबल अवस्था झाली ती वर पांघरूण घालण्याकरितां रचलेली एक कोल्ह्या कोंबडिच्या काल्पनिक कथेसारखी कथा आहे ज्या नारसिंहानें हिरण्यकश्यपू सारख्या बलाढ्य दैत्याचीं आतडीं बाहेर काढून त्याचा प्राण घेतला त्या नारसिंहाची वरील प्रमाणें औरंगजेब सारख्या मशका कडून विटंबना व्हावी हें अतर्क्य आहे. वरील कथे वरून त्या काळच्या सामान्य

प्रकारच्या महाराष्ट्रीय जनतेचीं मनें किती पंगू व दुर्बल बनलीं होतीं हें उत्तम प्रकारें दिसून येत आहे. या च कारण स्तव आम्ही या कथेचा प्रस्तुत स्थळीं मुद्दाम उल्लेख केला आहे. या व असल्या च प्रकारच्या भक्तलीलामृत, संतलीलामृत इत्यादि ग्रंथांत वर्णिलेल्या त्या काळच्या कथां वरून तत्कालीन महाराष्ट्रीय जनतेची मनोरचना निमूटपणें जुलूम सहन करणारी अशी झाली होती असें दिसून येतें. श्री हनुमंतानें लंकाधिपतीच्या राजधानींत प्रवेश करून भेटेल त्या राक्षसास बदडून, जाळपोळ, हाणामारी करून चोहोंकडे जसा हाःहाःकार उडवून दिला अथवा शिवाजी महाराज व त्यांचे अनुयायी यांनीं रात्रीच्या वेळीं मोठ्या हिकमतीनें व धाडसानें शाइस्तेखानाच्या वाड्यांत प्रवेश करून त्याच्या अनुयायांपैकीं कित्येकांस यमसदनास पाठवून व खानास व दुसऱ्या काही जणास जखमा करून सुरक्षितपणें त्याच्या गोटातून जसा पोबारा केला तशा प्रकारचा चमत्कार शिवाजी महाराज अवतीर्ण होण्यापूर्वी तीनशे वर्षांत वारकरी सांप्रदायांतील कोणत्या हि हरीकथानिरूपणी पुढाऱ्यानें अगर त्याच्या अनुयायानें केल्याचें इतिहासांत आढळत नाहीं. वारकरी सांप्रदायांतील हरि-कथानिरूपणीं पुढाऱ्यांचें वैगुण्य दर्शविण्याच्या अगर त्यांचा उपहास करण्याच्या हेतूनें वरील विधान आम्हीं केलेलें नाहीं हें या ठिकाणीं नमूद करणें जरूर आहे. वरील विधान करण्यात आमचा उद्देश इतका च आहे कीं, वार-करी सांप्रदायांतील हरिकथानिरूपणी पुढाऱ्याचा पेशा व शिकवण क्षात्रवृत्तीची कधीं च नव्हती. शिवाजी महाराज व तुकारामबुवा याच्या भेटीचा अभंग-रूपानें वर्णिलेला प्रसंग ऐतिहासिक दृष्ट्या सत्य असला तर त्या वरून हि वार-करी सांप्रदायाची जी सामान्य मनोरचना वर आम्ही दर्शविली आहे ती च खरी असल्याचें सिद्ध होत आहे. वारकरी सांप्रदायास या जगांतील रोजच्या व्यवहारापेक्षां या नश्वर जगा पलीकडील अज्ञात अशा शाश्वत मोक्षाची किंमत शत पटीनें अधिक वाटत असे व या ध्येयास अनुरूप अशा प्रकारची या सांप्रदायाची शिकवण होती. महाराष्ट्रांतील ऐतिहासिक पुरुषांच्या मुद्रांचे प्रदर्शन या नांवाचा आम्हीं जो निबंध प्रसिद्ध केला आहे त्या निबंधांत जवळ जवळ तीनशें इतिहासप्रसिद्ध महाराष्ट्रीय व्यक्तींच्या मुद्रा आम्हीं दिल्या आहेत. त्यां-पैकीं श्री पांडुरंगा बद्दल भक्ति दर्शविणाऱ्या अशा दोन च मुद्रा आहेत. या दोन मुद्रा खेरीज बाकी सर्व मुद्रा शंकर, खंडोबा, देवी, गणपती, राम इत्यादि देवतां विषयीं भक्ति व्यक्त करणाऱ्या आहेत. यावरून हि महाराष्ट्रीय

समाजांतील ब्राह्मण व क्षत्रिय वर्णांपैकीं महाराष्ट्रीय समाजाचे जे नेते अगर पुढारी होते त्यांच्या मनावर या सांप्रदायाच्या तत्वांची छाप बसल्याचें दिसत नाहीं. न्यायमूर्ति रानड्यांनीं केलेल्या प्रतिपादना प्रमाणें या सांप्रदायाचा शिवाजी महाराजांच्या स्वराज्य-स्थापनेशीं जर इतका निकट संबध असतां तर स्वराज्यस्थापनेचें कार्य सिद्ध करणाऱ्या व्यक्तींपैकीं बऱ्याच व्यक्ति या सांप्रदायापैकीं होत्या, निदान या सांप्रदायाच्या तत्वांचे संस्कार त्यांच्या मनावर घडले होते अशा प्रकारचा पुरावा आपणांस उपलब्ध व्हावयास पाहिजे होता. परंतु अशा प्रकारचा कांहीं एक पुरावा अद्याप पावेतो उपलब्ध झालेला नाहीं, ही बाब विचारांत घेतां या सांप्रदायाच्या स्वराज्यस्थापनेच्या संबंधाच्या बाबतींत आम्हीं केलेलें वरील विवेचन बरोबर आहे असें मानण्या वाचून गत्यंतर नाहीं आतां पावेतों केलेल्या चर्चे-वरून स्वराज्यस्थापनेस अनुकूल अशी भूमी वारकरी सांप्रदायानें तयार केली हा जो न्यायमूर्ति रानड्यानीं प्रतिपादिलेला सिद्धान्त तो बरोबर नाहीं असें सिद्ध झालें आहे. शिवाजी महाराजांच्या उदयाच्या समयीं हा सांप्रदाय वार्धक्याच्या स्थितीप्रत पोहोंचला होता तुकारामबुवा हे या सांप्रदायांतील चमकणारा शेवटचा तारा होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. शिवाजी महाराजांच्या उदया समवेत महाराष्ट्रांत जो एक दुसरा सुप्रसिद्ध सांप्रदाय अस्तित्वांत आला तो समर्थ अथवा रामदासी सांप्रदाय हा होय. हा सांप्रदाय व वारकरी सांप्रदाय एक च कीं भिन्न याची चर्चा प्रस्तुत स्थळीं आम्ही करीत नाहीं या सांप्रदायाचा विकास शिवाजी महाराजांनीं स्थापन केलेल्या स्वराज्या बरोबर होत गेला. हा सांप्रदाय कोणत्या परिस्थितींत निर्माण झाला व या सांप्रदायाचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें होतें या संबंधाची चर्चा न करिता तूर्त आम्ही या ठिकाणीं इतकें च नमूद करून ठेवितों कीं, शिवाजी महाराजांनीं महाराष्ट्र-धर्मस्थापनेच्या ध्येयास्तव स्वराज्यस्थापनेचा जो प्रचंड खटाटोप केला त्या च ध्येयाच्या सिध्यर्थ या सांप्रदायाची स्थापना त्याचे मूळ उत्पादक जे समर्थ रामदास स्वामी यांनीं केली होती. आतां न्यायमूर्ति रानड्यांनीं एक वेळीं महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ " Duty or Dharm of a great Rashtra or united nation ' व दुसरे वेळीं " महाराष्ट्रधर्म हा हिंदु धर्मा हून भिन्न आहे. त्याच्या तोडीचा जेमतेम इंग्रजी शब्द Patriotism हा होईल " अशा प्रकारचा केला आहे तो कितपत बरोबर व यथार्थ आहे या विषयीं थोडीबहुत चर्चा करणें जरूर आहे. मागें महाराष्ट्रधर्म या संज्ञेच्या अर्था-

संबंधी जो पुरावा आम्ही नमूद केला आहे तो पुरावा लक्षांत घेतां वरील दोन्ही अर्थ चुकीचे आहेत हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. रानड्यांनी केलेल्या पहिल्या अर्थावरून महाराष्ट्रधर्म ही रामदासांनी एक नवीन कल्पना अगर भावना महाराष्ट्रीय जनतेंत निर्माण केली व या भावनेचा शिवाजी महाराजांनी जसा प्रसार केला तसा प्रसार करण्याविषयीं संभाजी महाराजास समर्थांनीं उपदेश केला अशी न्यायमूर्तींची कल्पना झाल्यासारखी दिसते. मागें नमूद केलेल्या पुराव्यावरून ही न्यायमूर्तींची कल्पना चुकीची असल्याचें सिद्ध झालें आहे. समर्थ रामदास स्वामी अवतीर्ण होण्यापूर्वी दोनशें वर्षें महाराष्ट्रधर्म ही संज्ञा अस्तित्वांत असल्याचें गुरुचरित्रांतील उल्लेखावरून व ठाणे कोंकण प्रांतांच्या बखरींतील उल्लेखावरून सिद्ध झालें आहे. या संज्ञेचा अर्थ महाराष्ट्रीय समाजाचें नियंत्रण करणारा श्रुतिस्मृत्युक्तधर्म असा त्या काळचे सर्व महाराष्ट्रीय लोक समजत असत, ही बाब हि वरील ग्रंथांतील उल्लेखावरून स्पष्ट झाली आहे. " मराठा तितुका मेळवावा, महाराष्ट्रधर्म वाढवावा " या सुप्रसिद्ध उक्तींत श्रुतिस्मृत्युक्तधर्माचा प्रसार शिवाजी महाराजांनीं जसा केला तसा त्या धर्माचा प्रसार करण्याविषयीं रामदासांनीं संभाजीस उपदेश केला आहे. या उपदेशाचें रहस्य लक्षांत येण्याकरितां ज्या काळीं समर्थांनीं हा उपदेश संभाजीस केला त्या काळचें महाराष्ट्रीय समाजाचें चित्र आपल्या मनःचक्षूपुढें किंचित् काळ पावेतों आणणें जरूर आहे. शिवाजी महाराजांच्या निधना नंतर व्यसनाधीन व तमोगुणप्रचुर असा त्यांचा मुलगा संभाजी हा मंचकारूढ झाला. शिवाजी महाराजाच्या तालमेंत तयार झालेल्या नामांकित मुत्सद्यां पैकीं कांहीं जणास संभाजीनें गादीवर बसतां च क्रूरपणें ठार मारलें व सर्व राज्याचीं सूत्रें कलुषा सारख्या क्षुद्र माणसाच्या हातीं देऊन तो अहर्निशीं व्यसनांत मग्न राहूं लागला. या च सुमारास श्रुतिस्मृत्युक्तधर्माचा पक्का द्वेष्टा व मुसलमानी धर्माचा कट्टा अभिमानी व पुरस्कर्ता असा औरंगजेबरूपी रावण प्रचंड सैन्य व अपरंपार खजिना बरोबर घेऊन दिल्लीहून निघून इस्लामी धर्माचा प्रसार करण्याकरितां महाराष्ट्रांत येऊन दाखल झाला. शिवाजी महाराजांच्या काळीं हि ज्या प्रकारचें भयंकर अरिष्ट महाराष्ट्रीय समाजावर व महाराष्ट्रधर्मावर प्रत्यक्ष ओढवलें नव्हतें अशा प्रकारचें भयंकर अरिष्ट महाराष्ट्रावर येऊन कोसळलें.तत्कालीन महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यापैकीं परशरामपंत प्रतिनिधि यांनी औरंगजेबाच्या महाराष्ट्रावरील स्वारीच्या केलेल्या खालील वर्णनावरून

हें संकट महाराष्ट्रियांस किती दारुण भासत होते याची कल्पना वाचकांस त्याच्या खालील उद्गाराबरून उत्तम रितीनें करितां येणार आहे.

स्वधर्मा रक्षावें असल तव चित्ति जारि हरा । तरी या दुष्टाचा कारि समुळ विध्वस हि पुरा । बहु याचे त्रासे क्षिति 'वरि सुरां तावि धडिजे । तया संहाराया तव नयन शंभो उघडिजे ।। आले संकट वारणे तुज असे हे शांभवी स्राकर । अैसं तों असतां विलंब करणे हे काय शंभो बरे। सर्वस्वे तुमचा चि तो भरवसा आहे कृपा सागरा । या दुष्टास हरा पराभव करा श्रीपार्वती शंकरा ।।

( भा. इ. स. मं. चतुर्थसंमेलनवृत्त पान ७२ )

अशा प्रकारच्या भयंकर परिस्थितींत सर्व महाराष्ट्रीयांचें एकीकरण करून महाराष्ट्रधर्मस्थापने प्रीत्यर्थ जो प्रचंड खटाटोप शिवाजी महाराजांनीं केला त्याची जाणीव संभाजीस करून देण्याची आवश्यकता समर्थांस भासली व म्हणून त्यांनीं वरील उक्तींत दर्शविलेला उपदेश संभाजीस केला. ज्या पत्रांत वरील उक्ति आली आहे त्या पत्रांतील या उक्तीच्या पुढील मजकूर वाचला असतां सर्व महाराष्ट्रीयांचे मन आपल्या कडे शिवाजी महाराजानीं ज्या गुणांनीं आकर्षून घेऊन स्वधर्म व स्वराज्य-स्थापनेच्या महत् कार्या कडे महाराष्ट्रीय जनतेस लावलें त्या सर्व गुणांचें कथन करून ते गुण अंगीं आणण्या बद्दल सभाजीस रामदासांनीं उपदेश केला आहे. आतां महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा रानड्यांनीं जो दुसरा अर्थ केला आहे तो हि कसा चुकीचा आहे याचें आह्मी दिग्दर्शन करितों. महाराष्ट्रधर्म हा हिंदुधर्माहून भिन्न आहे हें रानड्यांचें विधान चुकीचें आहे. मराठी साम्राज्याच्या उत्तरार्धांत महाराष्ट्रधर्म या संज्ञेस च हिंदुधर्म ही संज्ञा लावण्याचा प्रघात सुरू झाला होता. नाना फडणीस यानीं जैपुरच्या राजास लिहिलेल्या पत्रांतील उतारा आह्मीं जो मागें दिला आहे त्या पत्रांत हिंदुधर्म ही च संज्ञा नाना फडणीस यांनीं वापरली आहे. यशवंतराव होळकर याच्या पत्रांत हि हिंदुधर्म ही च संज्ञा आढळून येते. यावरून महाराष्ट्रधर्म हा हिंदुधर्माहून भिन्न आहे ह्या न्यायमूर्ति रानड्यांच्या विधानांत ते ज्या दृष्टीनें म्हणतात त्या दृष्टीनें कांहीं एक तथ्य नाहीं हें सिद्ध होत आहे. महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा जवळ जवळ इंग्रजी अर्थ " Patriotism " होईल असें जें रानड्यानीं दुसरें विधान केलें आहे तें हि चुकीचें आहे. इंग्रजी Patriotism या शब्दाचा अर्थ देशाभिमान असा आहे. स्वदेशाविषयीं प्रेम हा एक प्रकारचा मनाचा विकार आहे. महाराष्ट्रधर्म ही संज्ञा कोणता हि मनाचा विकार अगर भावना दर्शवीत नसून " श्रुति-

स्मृत्युक्तधर्म " हा अर्थ व्यक्त करणारी ही संज्ञा आहे, हें आम्ही वर सिद्ध करून दाखविलें च आहे. येथ पावेतों न्यायमूर्तींच्या विवेचनाचें परीक्षण केलें. आतां " महाराष्ट्रधर्म " या नांवाचा स्वतंत्र प्रबंध लिहिणारे कै. राजारामशास्त्री भागवत यांच्या मतांच्या परीक्षणाकडे आम्ही वळतों. सुरवातीस च एक बाब नमूद करणें जरूर आहे ती ही कीं, शास्त्रीबुवांचें विवेचन ऐतिहासिक पुराव्याच्या आधारावर रचलेलें नाहीं. त्यांच्या प्रबंधांतील बराचसा भाग तर्कटी स्वरूपाचा आहे. भागवती धर्म हा महाराष्ट्रधर्माचा पाया आहे किंबहुना भागवतधर्म म्हणजे च महाराष्ट्रधर्म असा शास्त्रीबुवांच्या विवेचनाचा निष्कर्ष आहे. त्यांच्या प्रबंधाच्या शेवटी त्यांनीं खालील सिद्धांत ग्रथित केला आहे.

" महाराष्ट्रधर्म म्हणजे ज्ञानेश्वरांनीं जीर्णोद्धार केलेला भागवतीधर्म ह्मणजे संतांचा विशाल धर्म. कर्मठांचा कोता धर्म नव्हे. "

न्यायमूर्ति रानड्यांच्या विवेचनाचें आतांपावेतों आह्मीं जें परीक्षण केलें आहे, त्या परीक्षणा वरून शास्त्रीबुवांचा वरील सिद्धांत कसा चुकीचा आहे हें सहज दिसून येण्यासारखें आहे. यास्तव शास्त्रीबुवांच्या सिद्धांताच्या सत्यासत्यतेबद्दल जास्त चर्चा करण्याची आवश्यकता राहिली नाहीं. आतां रावबहादूर भांडारकरांच्या मतात सत्याचा अंश कितपत आहे हा प्रश्न राहिला व त्यांच्या मतांच्या परीक्षणाकडे आतां आह्मी वळतो. शिवाजी महाराजानीं स्वराज्यस्थापनेचें अद्भूत कार्य केलें व त्यांनीं केलेल्या या कार्याशीं न्यायमूर्ति रानड्यांच्या ' मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष " या ग्रंथांत प्रतिपादिल्याप्रमाणें वारकरी संप्रदायाचा कांहीं एक संबंध नव्हता व वारकरी संप्रदाय जातीभेद नष्ट करण्याकरतां अस्तित्वांत आला अशा प्रकारचे रावबहादुरांचे सिद्धांत आहेत. वारकरी संप्रदायाप्रमाणें च रामदासी संप्रदायाचा हि शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थापनेशी कांहीं संबंध नव्हता असें हि रावबहादुरांनीं प्रतिपादन केलेले आहे. आतां वारकरी संप्रदायाचा संबंध स्वराज्यस्थापनेशीं कोणत्या प्रकारचा व कितपत होता याचें आम्ही दिग्दर्शन केलें च आहे. स्वराज्यस्थापनेचें शिवाजी महाराजानीं केलेलें अद्भुत कार्य कोणत्या ध्येयास्तव केले याचा उलगडा रावबहादुरांनीं आपल्या विवेचनांत कोठें च केलेला नाहीं ही त्यांच्या विवेचनांत एक मोठी उणीव आहे. न्यायमूर्ति रानड्यांचा सिद्धांत चुकीचा आहे एवढें प्रतिपादन करून रावबहादुर स्वस्थ बसले आहेत. अशा स्थितींत शिवाजी म-

हाराजांनीं स्वराज्य स्थापना कोणत्या ध्येयानें उद्युक्त होऊन केली या बद्दल रावबहादुरांचे कोणत्या प्रकारचे विचार असतील याची कल्पना करून त्या विषयीं चर्चा करीत बसणें निष्फळ आहे. आता वारकरी संप्रदाय हा जातीभेद नष्ट करण्या करितां अस्तित्वांत आला हा जो रावबहादुरांचा दुसरा सिद्धांत तो चुकीचा आहे असें महाराष्ट्रीय समाजाच्या हरिकथानिरूपणी पुढाऱ्यांचे जे उद्गार मागे आह्मीं नमूद केले आहेत त्या वरून कोणाची हि खात्री झाल्या वांचून राहणार नाहीं. मुसलमानी सत्तेच्या संसर्गानें वर्णाश्रमधर्मविहित आचाराचा महाराष्ट्रीय समाजांत लोप झाल्या बद्दल वारकरी सांप्रदायाच्या संतांनीं टाहो फोडला आहे. अशा स्थितींत वर्णाश्रमभेद नष्ट करणें हे वारकरी सांप्रदायाचें ध्येय होतें असें मानण्यास रावबहादुरांस संतांच्या उक्तींत कोठें आधार सांपडला असेल तो असो. मनाची यत्किंचित् हि शुद्धि झालेली नसतां वर्णाश्रमधर्मविहित आचार परिपालनांत च खरें रहस्य आहे, अशा प्रकारची मनोवृत्ति बाळगणाऱ्या कर्मठ ब्राह्मणांवर संतांनीं कडक टीका करून कोरडे ओढले आहेत ही गोष्ट खरी आहे. परंतु एवढ्या वरून वर्णभेद नष्ट करण्याचें वारकरी सांप्रदायातील संतांचें ध्येय होतें असा सिद्धांत काढणे तर्कशास्त्रास कधीं हि संमत व्हावयाचें नाहीं. वारकरी व रामदासी सांप्रदायाचा स्वराज्यस्थापनेशीं कितपत व कोणत्या स्वरूपाचा संबंध आहे हें आह्मीं नुकते च वर दर्शविलें आहे. त्या वरून रावबहादुरांच्या मतांत सत्याचा अंश कितपत आहे हें वाचकास समजून येण्या सारखें असल्या कारणानें त्याबद्दल अधिक चर्चा करण्याचें प्रयोजन राहिलेलें नाहीं.

आतां पुरातत्वभूषण रा. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनीं महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ व व्याप्ति या संबंधीं विवरण म. इ. साधनें खंड १ व ४ यांच्या प्रस्तावनेत केलें आहे ते या प्रकरणांत नमूद केलेल्या पुराव्याच्या दृष्टीनें कितपत ग्राह्य अगर अग्राह्य ठरतें याचें आम्ही दिग्दर्शन करितों. रा. राजवाड्यांचे सिद्धांत दुसऱ्या प्रकरणांत जे आम्ही नमूद केले आहेत त्यांत बराच तथ्यांश असल्याचें आह्मी त्या च ठिकाणीं नमुद केलें आहे. महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ व व्याप्ति या संबंधीं राजवाड्यांनीं विवेचन करून जीं मतें प्रकट केलीं आहेत तीं कितपत बरोबर आहेत या विषयीं त्यांची स्वतःची पूर्ण खात्री नसल्याचें त्यांनीं नमूद केलं आहे. वरील विस्तृत विवेचन केल्यानतर मधून मधून महाराष्ट्रधर्माबद्दल वेळोवेळीं राजवाड्यांनीं आपले

विचार प्रकट केले आहेत. महारट्टांची अशीं जीं कर्तव्यें त्या सर्वांना महाराष्ट्र-धर्म ही संज्ञा आहे असा अभिप्राय शके १८३९ सालच्या एका लेखांत राजवाड्यांनीं व्यक्त केला आहे. महाराष्ट्रांत वसाहत करणारे महारट्ट हे आर्यांच्या अनेक पोटभेदापैकीं लोक होते. श्रुतिस्मृतिप्रणीतधर्म हा आर्य या संज्ञेंत समाविष्ट होणाऱ्या सर्व लोकांचें नियंत्रण करणारा असल्या कारणानें महाराष्ट्रांत वसाहत करण्याकरितां भरतखंडाच्या उत्तरेकडून आलेल्या महारट्टांच्या लोकसमाजाचें ही नियंत्रण करीत असे. महारट्टांच्या समाजाची श्रुतिस्मृति-प्रणीतधर्मा विरहीत अशी नियंत्रण करणारी कांहीं स्वतंत्र शासनपद्धति अस्तित्वांत असल्याचा पुरावा नाहीं. ही बाब लक्षांत घेतली असतां रा. राजवाड्यांच्या वरील मताच्या योगानें महारट्टांच्या धर्माविषयीं अयथार्थ व अस्तित्वांत नसलेली अशी कल्पना वाचकांच्या मनांत विना कारण उत्पन्न होतें हें उघड आहे. रा. राजवाड्यांनीं प्रकट केलेल्या अगदीं अलीकडील मतासंबंधीं आमचें ह्मणणें नमूद केल्यानंतर मराठ्यांच्या इतिहासाच्या वर नमूद केलेल्या साधन खंडांत महाराष्ट्रधर्मासंबंधीं त्यांनीं केलेली मीमांसा कितपत बरोबर आहे तें पाहूं. " ख्रिस्तीधर्म, महंमदीधर्म अगर यहुदीधर्म यांच्या सारखा महाराष्ट्रधर्म नाहीं. त्या च प्रमाणें महाराष्ट्रधर्म म्हणजे केवळ हिंदुधर्म नव्हे. महाराष्ट्रधर्माची व्याख्या हिंदु धर्माच्या व्याख्येहून जास्त विस्तृत आहे " या प्रमाणें राजवाड्यांनीं आपलें मत नमूद करून खालीं दर्शविल्या प्रमाणें महाराष्ट्रधर्माचें पृथक्करण त्यांनीं केलें आहे. हिंदूधर्म+धर्मस्थापना+गोब्राह्मणप्रतिपाल=स्वराज्य स्थापना+एकीकरण+धुरीधारण=महाराष्ट्रांतील हिंदूधर्म. मागें जो पुरावा आह्मी नमूद केला आहे त्या वरून श्रुतिस्मृतिप्रणीतधर्माची स्थापना हें शिवाजी महाराज व त्यांचे साह्यकर्ते, सल्लागार व अनुयायी यांचें स्वराज्य स्थापना करण्यांत मुख्य ध्येय होतें हें सिद्ध केलें आहे. श्रुतिस्मृतिप्रणीतधर्मात स्वराज्यस्थापना, गोब्राह्मण प्रतिप्राल या दोन्ही बाबींचा समावेश होतो इतकें च नाहीं तर या दोन बाबी ह्या धर्माच्या जीव कीं प्राण आहेत या विषयीं तिळमात्र शंका घेण्यास आतां जागा राहिलेली नाहीं.

शिवाजी महाराजांच्या काळीं धर्मस्थापना या संज्ञेंत स्वराज्यस्थापनेचा अंतर्भाव होत असें अथवा धर्मस्थापना ह्मणजे च स्वराज्यस्थापना असें महाराष्ट्रांतील सामान्य लोक समजत असत. हें म. इ. सा. खंड २१

ले. ६ मध्यें नमूद करण्यांत आलेल्या त्या काळच्या एका महाराष्ट्रीयाच्या उद्गारा वरून दिसून येणार आहे. राजाराम छत्रपतीस लागलेलें औरंगजेबरूपी केतूचें ग्रहण सुटण्याच्या सुमारास रंगोबा नाईक बिन केशव नाईक सरदेसाई प्रभानवल्ली यानें आपल्या वतनाच्या बाबतींत राजाराम छत्रपती कडे दाद मागितल्या वरून ले. ६ चें वृत्तीपत्र राजाराम महाराजांनीं शके १६१७ माघ शु॥ १३ स रंगोबा नाइक यास करून दिले. तें वृत्तीपत्र म्हणजे वरील ले. ६ हा होय. या लेखांत रंगोबा नायकाचे खालील उद्गार आढळतात.

" संभाजी राजे याचे कारकोर्दीस हुजूर जाऊन या वतनानिसी विनंति केली. त्यावरी त्यानी मनास आणून आपल्या माथा सेरणी ठेऊन आपले वतन आपल्यास घ्यावे ऐसे केले होते. परंतु तेच समई तांम्राची धामधूम जाली. वतनाचा कागद आपल्या हातास आला नाहीं. याउपर महाराजे दिग्विजय करून धर्मस्थापना केली. महाराजे दयावंत होऊन आपले पुरातन वतन आपणास दुमाला केल पाहिजे इत्यादि. "

राजाराम महाराजांनीं औरंगजेब बरोबर चालविलेल्या झगड्यांत ते यशस्वी होऊन औरंगजेबनें आक्रमिलेला स्वराज्यांतील मुलुख मोकळा केला यास रंगोबा नाइक धर्मस्थापना असें म्हणतो ही बाब वरील उद्गारा वरून सिद्ध होत आहे. यावरून हिंदुधर्म या संज्ञेंत च स्वराज्यस्थापनेचा अंतर्भाव होतो अशी त्या काळची महाराष्ट्रियांची सर्वसाधारण समजूत होती व ही समजूत आम्ही मागें नमूद केलेलीं स्मृतिवचनें व त्या संबंधाची केलेली चर्चा यांचा विचार केला असतां बरोबर होती हें सहज ध्यानीं येण्या सारखें आहे. महाराष्ट्रधर्मास च हिंदुधर्म असें म्हणण्याचा प्रघात त्या काळीं अस्तित्वांत असल्याचें आम्ही दर्शविले च आहे. धर्म, हिंदुधर्म, महाराष्ट्रधर्म, स्वधर्म, इत्यादि संज्ञा श्रुतिस्मृतिप्रणीतधर्म व्यक्त करण्याकरितां योजण्यांत येत असत ही बाब मागें आम्हीं जे अनेक उतारे दिले आहेत त्यावरून सिद्ध झाली आहे. मराठ्यांच्या इतिहास साधनांच्या चवथ्या खंडाच्या प्रस्तावनेंत महाराष्ट्रधर्म म्हणजे सर्व महाराष्ट्राचे सर्व मराठा समाजाचें कर्तव्य दर्शविण्याकरितां समर्थांनीं ही संज्ञा प्रथम बनविली असें मत राजवाड्यांनीं प्रतिपादिलें आहे. परंतु पुराव्यावरून हें मत बरोबर नसल्याचें आतां सिद्ध झालें आहे. मराठ्यांच्या इतिहास साधनांच्या चवथ्या खंडांतील प्रस्तावनेच्या शेवटीं राजवाड्यांनीं खालील अभिप्राय व्यक्त केला आहे. " महाराष्ट्रधर्माच्या अर्थाची व्याप्ति किती

आहे याचा अंदाज बखरकारांच्या उल्लेखावरून व रामदासांच्या लिहिण्यावरून व्हावा तितका होत नाहीं. " रामदास व बखरकार यांनीं ज्याकाळीं ग्रंथरचना केली त्याकाळीं महाराष्ट्रधर्म ही संज्ञा महाराष्ट्रांतील सामान्य जनतेस परिचित होती ही बाब लक्षांत घेतली असतां या संज्ञेच्या अर्थाची फोड करण्याचें अगर या संज्ञेत कोणकोणत्या बाबींचा समावेश होतो याचें दिग्दर्शन करण्याचें त्यांस कोणत्या हि प्रकारचें प्रयोजन वाटण्याचें कारण नव्हतें. यामुळें वरील बाबींचा साग्र उहापोह एखाद्या विवक्षित स्थळीं त्यांच्या ग्रंथांत केलेला आढळत नाहीं ही गोष्ट खरी आहे. तथापि रामदासाच्या ग्रंथांत व बखरकारांच्या बखरींत निरनिराळ्या ठिकाणीं महाराष्ट्रधर्म या संज्ञेबद्दल जे उल्लेख आले आहेत ते उल्लेख व आज पावेतो मराठ्यांच्या इतिहासाच्या साधन ग्रथांत या संज्ञे संबंधीं आढळणारे उल्लेख यांचा साकल्यानें विचार केला असतां महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ व तिची व्याप्ति या विषयीं रा. राजवाडे यास एके काळीं वाटणारी साशंक वृत्ति या पुढें अस्तित्वांत राहण्याचें कोणत्या हि प्रकारचें कारण राहिलेले नाहीं. रा. राजवाडे यांनीं महाराष्ट्रधर्म या संज्ञे संबंधीं केलेल्या मीमांसेतील वैगुण्य जरी वरील प्रमाणें आह्मी दर्शविलें आहे तथापि या संज्ञेचा अर्थ व व्याप्ति निश्चित करण्याच्या बाबतींत प्रथम पासून च सत्पंथ दर्शविण्याचे सर्व श्रेय एकट्या त्यांना च दिलें पाहिजे ही गोष्ट वरीक निर्विवादपणें कबूल करणें भाग आहे. या प्रकरणाचे सुरवातीस दर्शविल्याप्रमाणें महाराष्टधर्म या संज्ञेचा अर्थ व व्याप्ति इत्यादि बाबीं संबंधीं युरोपियन व हिंदी इतिहास लेखकांनीं प्रदर्शित केलेले विचार, त्या संबंधीं उपस्थित होणारे आक्षेप या विषयीं साग्र व तपशिलवार चर्चा आह्मी केली असून श्रुतिस्मृतिप्रणीतधर्म ह्मणजे च महाराष्ट्रधर्म व या धर्माचें पुनरुज्जीवन करून या धर्माची स्थापना सर्व भरतखंडांत करणें हें ध्येय शिवाजी महाराज उदयास येण्यापूर्वी पासून तों थेट मराठी राज्याचा लय होई तों पर्यंत अखिल महाराष्ट्रीय राजकारणी व हरिकथानिरूपणी पुढाऱ्यांचें होतें व तें महाराष्ट्रीय जनतेस व भरतखंडाच्या इतर प्रांतांतील जनतेस विदित व मान्य होतें हें आह्मी पुराव्याच्या आधारें सिद्ध करून दाखविलें आहे. हें ध्येय अत्यंत श्रेष्ठ प्रकारचें व कोणत्या हि राष्ट्रांतील लोकास भूषणास्पद असें च आहे. या उच्च ध्येयानें प्रेरित होऊन सतराव्या व अठराव्या शतकांत प्रामुख्यानें महाराष्ट्रांतील क्षत्रिय व ब्राह्मण राजकारणी व हरिकथानिरूपणी

पुढाऱ्यांनीं ज्या प्रचंड हालचाली केल्या त्याचें दृष्य फळ म्हणजे शिवाजी महाराजांनीं महाराष्ट्रांत स्थापिलेलें व कालें करून त्यांच्या पश्चात् झालेल्या महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांच्या रक्तानें वृद्धिंगत पावलेलें मराठी राज्य हें होय.[1] पुढील भागांत धर्म व महाराष्ट्रधर्म याचा अल्प परिचय वाचकांस करून देण्याचें ठरवून हें बरें च लांबलेलें परंतु अत्यंत महत्वाचें प्रकरण आम्ही येथें पुरें करितों.

---

# प्रकरण ४ थें

## धर्म व महाराष्ट्रधर्म

सतराव्या शतकांत मराठ्यांनीं जी स्वराज्यस्थापना केली तिचें मुख्य ध्येय श्रुतिस्मृतिप्रणीतधर्माची अथवा महाराष्ट्रधर्माची स्थापना करणें हें होतें, हा सिद्धांत मागील प्रकरणांत नमूद केलेल्या पुराव्या वरून आह्मीं सिद्ध केला आहे. त्याचप्रमाणें त्या प्रकरणांत नमूद केलेल्या पुराव्याच्या आधारें धर्म व महाराष्ट्रधर्म या संज्ञांचा अर्थ काय व त्यांत कोणकोणत्या बाबींचा समावेश होतो याचें हि आम्हीं स्थूल दिग्दर्शन केलें आहे. प्रस्तुत प्रकरणांत या संज्ञांत अंतर्भूत होणाऱ्या बाबींचें जरा सूक्ष्म व विस्तृत विवेचन करण्याचें आम्हीं ठरविलें आहे. हें विवेचन करण्या पूर्वी कांहीं प्रास्ताविक स्वरूपाच्या महत्वाच्या बाबींची चर्चा करणें अवश्य आहे. या बाबीं म्हटल्या ह्मणजे:—

---

१ टीपः— अलिकडे अनेक धर्म ग्रंथ उपलब्ध होऊन छापले गेले आहेत. मनु याज्ञवल्क्य इत्यादि स्मृति व याज्ञवल्क्यस्मृती वरील मिताक्षरा टीका इत्यादि ग्रंथांची मराठी भाषांतरें छापून प्रसिद्ध झालीं आहेत. इंग्रजी भाषेत तर बऱ्या च स्मृति ग्रंथांचीं भाषांतरें छापलीं गेलीं आहेत. आपल्या समाजरचनेचें रहस्य समजण्यास या वाङमयाचा परिचय आपण करून घेणें अत्यंत अवश्य आहे. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं, या वाङमयाचा परिचय करून घेण्याच्या इतक्या सोई झाल्या असून हि पाश्चात्त्य शिक्षण ज्यास मिळालेले आहे व ज्यांना हे शिक्षण मिळालेलें नाहीं या दोन्ही वर्गा पैकीं ज्यांनीं कोणता हि एक स्मृति ग्रंथ साग्र वाचला आहे असे शेंकडा पाच लोक देखील महाराष्ट्रिय समाजांत सांपडण्याची वानवा आहे.ही बाब लक्षांत घेऊन प्रस्तुत विषयाचें स्वरूप व महत्व लक्षांत येण्यास्तव व विषयविवेचनाच्या पूर्ततेस्तव या विषयाचें विवेचन करणें आम्हास अत्यंत इष्ट व जरूरीचें वाटल्या वरून हें प्रकरण आम्हीं लिहिलें आहे. वे. शा. सं. विष्णु शास्त्री बापट यांच्या मनुस्मृति व मिताक्षरा टीका यांच्या भाषांतरांचा हें प्रकरण लिहिण्याचें कामीं आम्ही उपयोग केला आहे.

( १ ) धर्मवाङ्मयाच्या उत्पत्तीचें व विकासाचें स्थूल दिग्दर्शन.
( २ ) धर्म शब्दाची व्याख्या
( ३ ) धर्म व भारतीय समाज यांचा अन्योन्य संबंध व परस्परावलंबित्व.
प्रस्तुत प्रकरणांत धर्म व महाराष्ट्रधर्म या विषयीं आम्ही जें विवेचन करणार आहों त्या विवेचनाच्या वरील, तीन बाबींची चर्चा हा पाया आहे असें म्हटलें तरी चालेल.

धर्माची तपशीलवार माहिती मिळण्यास उपयुक्त अशी सामुग्री आपल्याकडे किती विपुल उपलब्ध झाली आहे व भारतीय मानवी समाजाची परिस्थिति जसजशी बदलत गेली तसतसा धर्माचा हि कसकसा विकास होत गेला यांची स्थूल कल्पना करून देण्याच्या हेतूनें वर नमूद केलेल्या तीन बाबींपैकीं पहिल्या बाबीच्या चर्चेकडे आतां आम्ही वळतों. फार प्राचीन काळापासून भारतीय आर्य विद्येचें दोन प्रमुख भेद मानीत आले आहेत. हे भेद म्हटलें म्हणजे एक परा व एक अपरा विद्या हे होत. अक्षर ब्रह्माची प्राप्ति ज्या विद्येच्या योगानें होते ती परा विद्या व ब्रह्माव्यतिरिक्त इतर विषयांचें ज्ञान जिच्या योगानें होतें ती अपरा विद्या होय. अपरा विद्येत, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, यांचा समावेश होतो. शिक्षा कल्प इत्यादिकास वेदांचीं उपांगें किंवा उपग्रंथ म्हणतात. प्राचीनकाळीं आर्य विद्यार्थ्यास वरील विद्यांचें ज्ञान स्वल्प रीतीनें देतां यावें एतदर्थ निरनिराळ्या विषयांची गद्यात्मक सूत्रें रचण्यांत येऊन तीं विद्यार्थ्यांकडून तोंड पाठ करून घेण्याचा परिपाठ सुरू झाला. पुष्कळ अर्थ व्यक्त करणारे त्रोटक शब्दसमुच्चयरूपी जें वाक्य त्याचें नांव सूत्र. विद्यार्थ्यांकडून सूत्र पाठ करून घेतल्या नंतर प्रत्येक सूत्राचें स्पष्टिकरण व त्या सूत्रांत अंतर्भूत होणारा सर्व अर्थ आचार्य विद्यार्थ्यास सांगत असत. कांहीं कालानंतर आचार्यांची सूत्रां वरील ही टीकारूप स्पष्टिकरणें स्वतंत्र ग्रंथ रूपानें अस्तित्वांत आलीं. वर दर्शविलेले सूत्ररूप ग्रंथ तीन प्रकारचे आढळतात. यज्ञविधीचें सविस्तर वर्णन ज्यांत केलें आहे अशीं सूत्रें यास च कल्प सूत्रें असें म्हणतात. यज्ञयागा संबंधीं ऋत्विजांस सहज रीतीनें ध्यानांत ठेवावयास सुलभ जावें म्हणून थोडक्या सांकेतीक शब्दांत जीं सूत्रें रचण्यांत आलीं त्या सूत्रांस श्रौत सूत्रें किंवा गृह्य सूत्रें ही संज्ञा प्राप्त झाली. श्रौत सूत्रांत तीन अग्नींवर करावयाचीं कर्मे व त्यांचे मंत्र दिलेले आहेत. गृह्य सूत्रांत आर्य समाजांतील प्रत्येक मानवी प्राण्याच्या जन्मा पासून मृत्यू पर्यंत करावे लागणारे सर्व संस्कार दिलेले

आहेत. त्याच प्रमाणें पंचमहायज्ञाचें वर्णन गृह्य सूत्रांत केलेलें आहे. या शिवाय श्राद्धविधीचें वर्णन हि या सूत्रांत केलेलें असतें. गृह्य सूत्राच्या तोडीचें च आणखी तिसऱ्या प्रकारचे असे कांहीं ग्रंथ आहेत कीं, ज्यांचा संबंध गृह्य सूत्रांशीं बरा च येतो. हे ग्रंथ म्हटलें म्हणजे धर्मसूत्रें हे होत. या ग्रंथांत गृह्य सूत्रांतील मंत्रांचें स्पष्टिकरण केलेलें असतें. धर्माविषयीं माहिती या ग्रंथांत असल्या कारणानें या ग्रंथास धर्मग्रंथ असें हि म्हणण्याचा प्रघात आहे. धर्म या संज्ञेत, न्यायतत्वें, कर्म, स्मृति, विधि चारी वर्णांचे व चारी आश्रमांचे धर्म यांचा समावेश होतो. अशा प्रकारचीं जीं धर्मसूत्रें तीं कल्पसूत्रांचा च एक भाग समजलीं जातात. प्रस्तुत काळीं अपस्तंभ, बौधायन, गौतम, वसिष्ठ इत्यादि ऋषींच्या नांवानें प्रसिद्ध असलेलें धर्मसूत्रग्रंथ अस्तित्वांत आहेत. धर्मवाङ्मयाच्या निर्मितीच्या काळच्या दृष्टीनें विचार केला असतां वरील वाङ्मय प्रथम काळविभागांतील समजण्यास हरकत नाहीं. आतां दुसऱ्या काळविभागांत पडणाऱ्या धर्मवाङ्मयाच्या स्वरूपाचें आह्मी स्थूल दिग्दर्शन करितों. या दुसऱ्या काळविभागास स्मृतिग्रंथ निर्मितीचा काळ असे म्हटलें तरी शोभण्या सारखें आहे. या काळांत अनेक स्मृतिग्रंथ निर्माण झाले. स्मृतिग्रंथ श्लोकबद्ध असून त्याची रचना धर्मसूत्र ग्रंथांचे पायावर करण्यांत आली आहे. परंतु धर्मसूत्र ग्रंथांत जे विषय आढळत नाहींत अशा कित्येक विषयांचें विवेचन या ग्रंथांत केलेलें आढळतें. स्मृतिग्रंथांत सर्वांत प्राचीन ग्रंथ ह्मटला ह्मणजे मनुस्मृति हा होय. या ग्रंथांची रचना मानवधर्मसूत्रानुसार झाली असावी असा तज्ञ विद्वानांचा तर्क आहे. हा ग्रंथ इ. स. पूर्वी दोनशें तें इ. सनोत्तर शंभर अगर दोनशें या दरम्यानच्या काळांत रचला गेला असावा असा हिंदी व पाश्चात्य संशोधकांचा. या प्रश्नाच्या चर्चेचा निष्कर्ष आहे. मनुस्मृति नंतर विष्णुस्मृति हा ग्रंथ इ. स. दोनशेंच्या सुमारास रचला गेला. त्या नंतर इ. स. तीनशें तें चारशेंच्या दरम्यान याज्ञवल्क्य स्मृति हा ग्रंथ मिथिला नगरींतील एका विद्वान् ब्राह्मणानें रचला. याज्ञवल्क्य स्मृती नंतर इ. स. पाचशेंचे सुमारास नारदस्मृती हा ग्रंथ रचला गेला. त्यानंतर इ. स तेराव्या शतकाच्या सुमारास पाराशरस्मृति हा ग्रंथ रचला गेला. प्रमुख स्मृतिग्रंथ व त्यांच्या रचना कालासंबंधीं आधुनिक काळच्या हिंदी व पाश्चात्य विद्वानांच्या मतांचा निष्कर्ष वर दर्शविलेल्या स्वरूपाचा आहे. एकंदर स्मृति ग्रंथ किती आहेत या संबंधीं निरनिराळ्या ग्रंथकारांनीं निरनिराळे अभिप्राय व्यक्त केले आहेत. विरमित्रोदयकारानें अठरा मुख्य स्मृति,

अठरा उपस्मृति, व एकविस इतर अशा एकंदर सत्तावन स्मृति-ग्रंथांची नांवें दिलीं आहेत. अठरा प्रमुख स्मृतींची नांवें खालील प्रमाणें आहेत. मनु, बृहस्पति, दक्ष, गोतम, यम, अंगिरस, योगिश्वर, प्रचेता, शातातप, पाराशर, समावर्त, उशनास, शंख, लिखित, अत्री, विष्णु, आपस्तंभ व हारित. अठरा उप स्मृतींचीं नांवें पुढें दिल्या प्रमाणें आहेत. जाबाली, नाचिकेता, स्कंद, लौगाक्षी, कश्यप, व्यास, सनत्कुमार, सुमंतु, पितामह, व्याघ्र, कृष्णजिनी, जातकर्ण, कंपिजल, बौधा-यन, कणाद, विश्वामित्र, पैथिनसी, आणि गोभिल. ह्या अठरा उपस्मृती खेरीज विरमित्रोदयकारानें दुसऱ्या एकविस स्मृतींचीं नांवें खालील प्रमाणें दिलीं आहेत. वशिष्ठ, नारद, सुमंतु, पितामह, वसु, कृष्णजिनी, सत्यावर्त, गार्ग्य, देवल, जमदग्नि, छागालेय, मरिची, वत्स, पारस्कर, ऋष्यशृग, वैजवर्ण. हेमाद्रिने वरील प्रमाणें च निरनिराळ्या प्रमुख स्मृतिकारांचीं नांवें दिलीं आहेत. भविष्यपुराण, अग्निपुराण, याज्ञवल्क्यस्मृति, धर्मसिंधु, निर्णयसिंधु, इत्यादि ग्रथांत, वरील स्मृती पैकीं कांहींचीं नांवें आहेत व कांहींचीं नाहींत. महाराष्ट्रांत सर्वमान्य मानल्या जाणाऱ्या याज्ञवल्क्यस्मृतति खालील स्मृतिग्रं-थांचा उल्लेख आहे. मनु, अत्रि, विष्णु, हारित, याज्ञवल्क्य, उशनस, अंगिरा यम, अपस्तंभ, संवर्त, कात्यायन, बृहस्पति, पाराशर, व्यास, शंख, लिखित, दक्ष, गौतम, शातातप, आणि वशिष्ठ. याज्ञवल्क्यस्मृतीच्या उपोद्घांत प्रकरणा-च्या चवथ्या व पाचव्या श्लोका वरील टीकेंत विज्ञानेश्वरांनीं कांहीं दुसऱ्या स्मृतींचा हि उल्लेख केला आहे, त्या स्मृतींचीं नांवें प्रचेता, बुध, देवल, सोम, जमदग्नि, विश्वामित्र, प्रजापति, नारद, पैतीनसी, पितामह, बौधायन, छागालेय, जाबाली, च्यवन, मरीचि व कश्यप अशी आहेत. एकंदर स्मृतिग्रंथां-ची स्थूल कल्पना वाचकांस करून दिल्या नंतर या ग्रंथांच्या कर्त्यांच्या चरित्रा संबंधीं जिज्ञासा साहजिक रीतीनें उत्पन्न होतें. परंतु ही जिज्ञासा तृप्त करण्याचें कांहीं एक साधन आज मितीस उपलब्ध नाहीं. कारण वरील ग्रंथांच्या कर्त्यांच्या चरित्रा संबंधीं विश्वसनीय अशी माहिती जवळ जवळ कांहीं एक आज पावेतों उपलब्ध झालेली नाहीं. आतां या ग्रंथांत कोणत्या विषयांचें विवेचन केलेलें असतें त्याचें आम्ही थोडक्यांत दिग्दर्शन करितों. विश्वाची उत्पत्ति, चातुर्वर्ण, त्यांचे आचार, व्यवहार, प्रायश्चित्त, राजधर्म स्त्रीधर्म आप-द्धर्म, संकर प्रजांचे धर्म, दान, शांति, श्राद्ध, द्रव्यशुद्धि, भक्षाभक्षविचार इत्यादि विषयांचें विवेचन स्मृति ग्रंथांत केलेलें असतें. वर दर्शविलेल्या सर्व

विषयांचें विवेचन ज्या स्मृति ग्रथांत केलेलें आहे असे स्मृतिग्रंथ फार च थोडे आहेत. मनु, याज्ञवल्क्य, नारद, वशिष्ट, बृहस्पती, विष्णु इत्यादि स्मृतिग्रंथांत वरील विषयां पैकीं बहुतेक विषयांचें विवेचन आलेलें आहे. बाकीच्या स्मृतिग्रंथांत वरील विषयां पैकीं कांहीं कांहीं विषयांचें विवेचन केलेलें आढळतें. स्मृतिग्रंथ रचनेचा हा जो धर्मवाङ्मयाच्या निर्मितीचा दुसरा काळविभाग तो इ. स. आठशेंच्या सुमारास समाप्त होऊन त्यानंतर स्मृतिग्रंथावरील टीकाग्रंथ रचनेच्या तिसऱ्या काळविभागास सुरवात झाली. या काळविभागांतील धर्मवाङ्मयाच्या विकासाचें स्थूल दिग्दर्शन करण्याकडे आतां आह्मी वळतों. या काळांत झालेल्या धर्मवाङ्मयाच्या विकासाचें बरें च श्रेय महाराष्ट्रीय ब्राह्मणांच्या वाट्यास पडत आहे. या काळांत असहाय, मेधातिथी, धारेश्वर, विश्वरूप, भरूची, श्रीकर इत्यादि स्मृतिग्रंथा वर टीका रचणारे नामांकित ग्रंथकार उदयास आले. असहाय आणि मेधातिथी हे इ. स. आठशें पन्नासच्या सुमारास हयात होते. या काळांत उदयास आलेल्या स्मृतिटीकाग्रंथकारांत नामांकीत समजले जाणारे ह्मणजे विज्ञानेश्वर व अपरार्क हे होत. इ. स. ११०० ते १२०० च्या सुमारास हे ग्रंथकार उदयास आले. वरील टीकाग्रंथापैकीं मनुस्मृती वर मेधातिथी यानें लिहिलेली टीका सर्वांत जुनी आहे. इ. स. पंधराशेच्या सुमारास काशी येथील कुल्लुकभट्ट या नांवाच्या विद्वान् ब्राह्मणानें मनुस्मती वर एक टीका लिहिली असून ती फार प्रख्यात आहे. इ. स. अकराशेंच्या सुमारास विज्ञानेश्वर यती यांनीं याज्ञवल्क्य स्मती वर मिताक्षरा या नांवाची टीका लिहिली. कल्याणी येथील चालुक्य राजघराण्यांतील विक्रमादित्य या नांवाचा एक राजा होऊन गेला. त्याच्या कारकीर्दीत हा ग्रंथ रचला गेला असावा असें अनुमान या टीका ग्रंथाच्या शेवटीं जे मंगलाचरणाचे श्लोक आहेत त्या वरून आपल्या कडील नामांकित विद्वानांनीं काढलेलें आहे. बाराव्या शतकाच्या सुमारास स्मृतिटीकाग्रंथरचनेचा काळविभाग समाप्त होऊन निबंधग्रंथरचनाकाळविभागास सुरवात झाली. इ. स. बाराशें ते आठराशें या ह्या काळविभागाच्या प्रारंभाच्या व शेवटच्या मर्यादा आहेत. जे निबंधकार झाले त्यांनीं या काळविभागांत केलेल्या कार्याचें स्वरूप पुढें दर्शविल्या प्रकारचें आहे. पूर्वीच्या ग्रंथकाराच्या विवेचनाचें परीक्षण, हजारों वर्षे निरनिराळ्या विषयासंबंधीं सांचलेल्या नानाविध माहितीची सुव्यवस्थित मांडणी, निरनिराळ्या ग्रंथकारांनीं प्रदर्शित केलेल्या नानाविध मतांचें परीक्षण व त्या पैकीं कोणतें मत ग्राह्य व कोणतें अग्राह्य याचें दिग्दर्शन इत्यादि बाबीं

विषयीं निबंधग्रथांत विवेचन केलेलें असतें. आतां निबंध ग्रंथांपैकीं कांही महत्त्वाच्या ग्रंथांचा आह्मी या ठिकाणीं निर्देश करितों. इ. स. बाराशें ते बाराशें एकाहत्तरच्या दरम्यान देवगिरीच्या यादव राजाचा हेमाद्री उर्फ हेमाडपंत या नांवाचा एक प्रधान होतो. त्यानें दान, व्रत, काळ इत्यादि विषयांवर चतुर्वर्गचिंतामणि या नांवाचा विश्वकोषाच्या स्वरूपाचा एक ग्रंथ लिहिलेला उपलब्ध आहे. मिथिला नगरीच्या राजाचा प्रधान चंडेश्वर या नांवाच्या एका विद्वानानें इ. स. तेराशेंत दान, व्यवहार, शुद्धि, पूजा, विवाह इत्यादि सात भागाचा एक प्रचंड ग्रंथ रचला. या ग्रंथाच्या प्रत्येक भागास रत्नाकर ( म्हणजे समूद्र ) अशी संज्ञा ग्रंथकर्त्यानें दिली आहे. मिथिल प्रांतांत विवाद रत्नाकर हा ग्रंथ प्रमाणभूत समजला जातो. इ. स. पंधराशेंच्या सुमारास निजाम घराण्याच्या संपस्थापकाचा प्रधान दलपती यानें महाभारत ग्रंथाच्या निम्या ग्रंथाएवढा नृसिंहप्रसाद या नांवाचा एक ग्रंथ रचला. संस्कार, श्राद्ध, काळ व्यवहार, प्रायश्चित्त, कर्मविपाक, व्रत, दान, शांति, तीर्थ आणि प्रतिष्ठा असे या ग्रंथाचे बारा सर आहेत. मदनसिंह या नांवाच्या राजानें समय, आचार, व्यवहार, प्रायश्चित्त, दान, शुद्धि आणि शांति अशा सात विषयावर सात उद्योताचा मदनरत्न या नांवाचा एक ग्रंथ केला आहे. इ. स. चवदाशें ते पंधराशेंच्या दरम्यान दानभाग प्रकरणावर रघुनंदन नांवाच्या विद्वानानें टीका लिहिली. त्या च प्रमाणें दान, संस्कार, शुद्धि, प्रायश्चित, तीर्थ, व्यवहार, प्रतिष्ठा इत्यादि अठ्ठावीस प्रकरणाचा स्मृतितत्व या नांवाचा एक ग्रंथ या च ग्रंथकारानें लिहिला आहे. रघुनंदन यांस स्मार्तभट्टाचार्य आणि गौडमिमांसक हीं हि नांवें होतीं. अकबर बादशहाच्या दरबारांतील प्रसिद्धीस आलेला तोडरमल्ल यानें धर्म, ज्योतिष, आणि वैद्यक या विषया वर तोडरानंद या नांवाचा ग्रंथ रचला यास सौख्य असें हि म्हणण्याचा प्रघात आहे. आचार, दान, व्यवहार, प्रायश्चित, समय, शुद्धि, व्रत, तिथी इत्यादि विषयांचें विवेचन या ग्रंथांत केलेलें आहे. या नंतर भगवंत देव या नांवाच्या बुंदेलखंडांतील एका राजाच्या पदरीं असलेल्या निळकंठ या नांवाच्या महाराष्ट्रीय ब्राह्मणानें भगवान भास्कर या नांवाचा आपल्या यजमानाचा बहुमान करण्या करितां एक प्रचंड ग्रंथ लिहिला. चंबळा आणि यमुना या दोन नद्यांच्या संगमावर असलेल्या

बान्हेया या शहरीं हा राजा रहात असे. या ग्रंथाचे बारा भाग असून प्रत्येक भागास मयूख ( म्हणजे किरण ) ही संज्ञा आहे. कोठें कोठें या ग्रंथास नुसते भास्कर अथवा विवादभास्कर असें हि म्हटलें आहे. भगवंत देव याच्या प्रोत्साहनानें किंवा त्याच्या आज्ञेवरून हा ग्रंथ लिहिला असें या ग्रंथकारानें आपल्या ग्रंथांत कांहीं ठिकाणीं म्हटलें आहे. संस्कार, आचार, समय, श्राद्ध, नीति, व्यवहार, दान, उत्सर्ग, प्रतिष्ठा, प्रायश्चित, शुद्धि आणि शांती अशा बारा विषयांचें विवेचन प्रत्येक मयुखांत केलेलें आहे. हा ग्रंथ इ. इ. सोळाशेंच्या सुमारास रचला गेला. मयुखकार निळकंठ भट्ट याच्या च घराण्यांत दिनकर भट्ट, कमलाकर भट्ट, व शिवछत्रपतीस राज्याभिषेक करणारे विश्वेश्वर भट्ट उर्फ गागा भट्ट असे तीन मोठे नामांकित विद्वान निपजले. दिनकर भट्टानें बारा ग्रंथ "उद्योत" या नांवाचे रचिले. कमलाकर भट्टानें कमलाकर या नांवाचे बारा ग्रंथ लिहिले. पैकीं निर्णयकमलाकरास च निर्णयसिंधु असें म्हणतात. हा ग्रंथ इ. स. सोळाशें बाराचे सुमारास रचला गेला. विश्वेश्वर उर्फ गागा भट्ट यानें श्रेष्ठ प्रतीची विद्वत्ता संपादन करून त्याच्या घराण्याचा लौकिक वाढविला. मीमांसा, न्याय, अलंकार व वेदान्त या विषयांत गागाभट्ट अत्यंत प्रविण होता. गागाभट्टाचा बाप दिनकर भट्ट यानें रचलेल्या दिनकरोद्योत नांवाच्या ग्रंथांत न आलेल्या विषयांची चर्चा गागाभट्टानें स्वतंत्र ग्रंथरूपानें केली. त्या च प्रमाणें जैमिनीसूत्रा वर गागाभट्टानें एक टीका लिहिली असून 'कायस्थधर्म प्रदीप ' या नांवाचा एक ग्रंथ चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंच्या संस्कारा विषयीं त्यानें लिहिला. यानंतर "धर्मसिंधु" या नांवाचा एक ग्रंथ पंढरपूर क्षेत्रस्थ बाबा पाध्ये या नांवाच्या एका विद्वान विठ्ठल भक्तानें इ. स. सतराशें पन्नासच्या सुमारास रचिला. त्या काळीं काशी क्षेत्रस्थ सर्व विद्वान मंडळीस हा ग्रंथ पसंत पडून त्या ग्रंथाची पालखींत मिरवणूक काढण्यांत आली होती अशी त्या काळची आख्यायिका प्रसिद्ध आहे. आतां पावेतों उल्लेख केलेले निबंध ग्रंथ हे अत्यंत प्रसिद्ध व ठळक असे आहेत. या खेरीज दुसरे शेंकडो धर्मविषयक लहान सहान निबंध ग्रंथ वरील काळविभागांत रचण्यांत आले आहेत. परंतु त्या सर्वांचा नामनिर्देश करून जागा आडविणें प्रशस्त होणार नाहीं. कै. रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक यांच्या हिंदु लॉ या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत ह्या निबंध ग्रंथाची एक लांबची लांब यादी दिली आहे त्यावरून निबंध वाङ्मयाच्या विस्ताराची बाचकास

कल्पना होईल. आतां पावेतों केलेल्या विवेचन वरून थेट वेदकाला पासून इंग्रजी राज्याची महाराष्ट्रांत स्थापना होई तों पर्यंत धर्मवाङ्मय कसें निर्माण झालें व त्या वाङ्मयाचा कसकसा विकास होत गेला याची स्थूल कल्पना वाचकांस आम्ही करून दिली. धर्मवाङ्मय निर्मितीचा जो चवथा कालविभाग त्यांत निर्माण झालेल्या वाङ्मयाचे पुष्कळ च श्रेय महाराष्ट्रीय ब्राह्मणांचे वाट्यास येते ही बाब वर दिर्शविलेल्या ग्रंथांच्या कर्त्यांच्या नांवावरून सिद्ध होत आहे. भरतखंडाच्या इतर प्रांतापेक्षां महाराष्ट्रांतील विद्वान् व विचारी लोकांचें लक्ष धर्माकडे अधिक असल्याचें वरील बाबीवरून उघड होत आहे. अशा स्थितींत महाराष्ट्रांत मुसलमानानी धर्माची पायमल्ली व धूळधाण केली असतां धर्मस्थापना करण्याची अवश्यकता महाराष्ट्रांतील एकंदर जनतेस भरतखंडाच्या इतर प्रांतांतील लोकापेक्षां अधिक भासावी हें अगदीं साहजिक होतें. असो. धर्मवाङ्मयाविषयीं इतकें विवेचन केल्यानंतर आतां धर्म या संज्ञेचा अर्थ काय याचें दिग्दर्शन करण्याकडे आह्मी वळतों. तिसऱ्या प्रकरणाच्या दोनशें सतराव्या पानावर धर्म या संज्ञेचा अर्थ आह्मी दिला आहे. परंतु वेद काळापासून या संज्ञेच्या अर्थांत कसकसा बदल होत जाऊन शेवटीं या संज्ञेचा कोणता अर्थ निश्चित झाला या दृष्टीनें या संज्ञेचा अर्थासंबंधीं प्रस्तुत प्रकरणांत थोडी फार चर्चा करणें अवश्य आहे. रा. रा. पांडुरंग वामन काणे यांनीं दैनिक लोकमान्य हिंदुस्थान अंकांत धर्मशास्त्र या विषयावर एक लेख प्रसिद्ध केला आहे. या लेखांत धर्म या संज्ञेच्या अर्थाची वरील दृष्टीनें रा. काणे यांनीं उत्कृष्ट चर्चा केली आहे. आह्मी प्रस्तुत ज्या मुद्यांचें विवेचन करणार आहों त्या मुद्याच्या विवेचनाच्या दृष्टीनें रा. काणे यांनीं केलेली चर्चा अत्यंत उपयुक्त असल्या कारणानें त्यांतील जरूर तेवढा उतारा आह्मी या ठिकाणीं उधृत करून घेतों.

" प्रथम धर्म हा शद्ब घेऊं. या शब्दाच्या रूपांत व विशेषत: अर्थांत अनेक फरक झाले. त्याचे हल्लींचे जे कांहीं अर्थ आहेत ह्मणजे पुण्य, यम, भाव, न्याय वगैरे त्यांच्या कडे लक्ष देण्याचें या लेखांत प्रयोजन नाहीं. फार प्राचीन वाङ्मयांत धर्म हा शब्द " धर्मन् " या स्वरूपांत दिसतो व तो बहुधा नपुसकलिंगी आढळतो. हा शब्द ऋग्वेदांत पन्नासाहून जास्त वेळा आला आहे. तीन ठिकाणीं तो पुल्लिंगी आहे. ( ऋग्वेद १' १८७' १; १०' २१' ३; १०'; ९२' २ ) ह्या तीन ठिकाणीं ' धर्मन् ' हा शब्द

विशेषण आहे व त्याचा अर्थ 'धारण करणारा' ( धारक ) हा आहे. उदाहरणार्थ पितुं नु स्तोषं महो धर्माणं तविषीम् ( ऋ. १·१८७·१ मोठ्या अशा सर्व जगाचें धारण करणारें बलयुक्त असें जें अन्न त्याचें मी स्तवन करितों. ). या तीन उदाहरणा खेरीज बाकी बहुतेक सर्व ठिकाणीं 'धर्मन्' शब्द नपुंसकलिंगी आहे. त्याच्या अर्था बद्दल थोडा संशय आहे. "त्रीणि पदा विचक्रमे विष्णुर्गोपा अदाभ्यः। अतो धर्माणि धारयन्" [ ऋग्वेद १·२२·१८ "पालनकर्ता व ज्याला कोणी इजा करूं शकत नाहीं असा जो विष्णु त्यानें धर्माचें धारण करण्या साठीं तीन पदें घेतलीं. ]. या ऋचेंत, त्या च प्रमाणे 'समिधानः सहस्रजिदग्ने धर्माणि पुष्यसि' [ ऋग्वेद ५·२६·६ ], विशां राजानमद्भुतमध्यक्षं धर्मणामिमम्। अग्नि मीळे सउश्रवत् ( ऋ. ८·४३·२४ सर्व लोकांचा अद्भुत राजा व धर्माचा अध्यक्ष असा जो अग्नि त्याचें मी स्तवन करितों; तो (स्तुति) ऐको.) यज्ञेन यज्ञ मयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ( ऋ. १०·९०·१६ ) इत्यादि ऋचां मध्यें 'धर्मन्' ह्मणजे अग्निहोत्र, यज्ञयागादि क्रिया असा अर्थ अभिप्रेत आहे. या च अर्थानें बहुतेक ठिकाणीं या शब्दाचा उपयोग ऋग्वेदांत केलेला आहे. दुसऱ्या कांहीं ऋचांत 'धर्मन्' शब्दाचा वरील अर्थ चालणार नाहीं, त्या ठिकाणीं 'आचाराचे किंवा सृष्टीचे नियम' असा अर्थ घ्यावा लागेल. उदाहरणार्थ 'धर्मणा मित्रावरुणा विपश्चिता व्रता रक्षेथे असुरस्य मायया ( ऋ. ५-६३-७ 'सर्वज्ञ मित्रा वरुण देव हो, ( वृष्टिरूप ) धर्मानें तुह्मी व्रतांचें रक्षण करितां' इत्यादि ) 'अचित्ती यत्तव धर्मा युयोपिम मा नस्तस्मादेनसो देव रीरिषः' ( ऋ. ७·८९·५ ) 'हे देवा, न कळत आह्मी तुझे धर्म ( घालून दिलेले नियम मोडतो ह्मणून त्या पापामुळें आमचा नाश करूं नको.' वाजसनेय संहिता व अथर्ववेद यांत हि धर्मन् शब्द येतो व ऋग्वेदांतील धर्म शब्दयुक्त बऱ्या च ऋचा वरील वेदांत आढळतात. या च दोन वेदांत प्रथम धर्म असा अकारान्त शब्द आढळतो. ( वाज. सं. १०-२९, २०-९ अथर्व वेद ११-९-१७ इत्यादि. ) ऐतरेय ब्राह्मणांत ( ७-१७ ) 'धर्माचें रक्षण करणारा उत्पन्न झाला' ( धर्मस्य गोप्ताजनि ) असें राज्याभिषेकाच्या संबंधानें म्हटलें आहे. ह्या ठिकाणीं 'धर्म ह्मणजे सर्व कर्तव्याचा समूह किंवा कलाप' असा अर्थ केला पाहिजे. छान्दोग्य उपनिषदांत ( २-२३ ) एक वाक्य असें आहे 'धर्माचे तीन स्कंध आहेत: यज्ञ, अध्ययन आणि दान ( ह्मणजे गृहस्थाश्रम ) हा एक, दुसरा

तपश्चरण ( म्हणजे वानप्रस्थाश्रम व संन्यास ) हा व तिसरा म्हणजे आचार्य कुळांत मरणापर्यंत राहून त्या ठिकाणीं च आपल्या देहाचा पात करणारा ब्रह्मचारी ' ( ' त्रयो धर्मस्कन्धा यज्ञोध्ययनं दानमिति प्रथमस्तप एवेति द्वितीयो ब्रह्मचार्याचार्यकुलवासी तृतीयोत्यन्तमात्मानमार्यकुलेवसादयन् ' ) या वाक्यांत धर्म म्हणजे वर्ण व आश्रम यांचीं कर्तव्यें असा अर्थ दिसतो. ह्याच अर्थानें धर्म हा शब्द तैत्तिरीयोपनिषदांतील ' सत्यं वद धर्मं चर ' ह्या वाक्यांत उपयोजिला आहे. मूळ यज्ञयागादि क्रिया ह्या अर्थावरून " मनुष्यमात्रांचे आर्य म्हणून, विवक्षित वर्णांतील व आश्रमांतील एक व्यक्ति म्हणून, जें जें कर्तव्य व जे जे हक्क असा अर्थ धर्म शब्दाला प्राप्त झाला. या च अर्थानें धर्म शब्दाचा उपयोग करून भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणतात ' स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि ' आणि ' स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ' ह्या ठिकाणीं क्षत्रिय म्हणून जें अर्जुनाचें परंपरागत कर्तव्य तो च त्याचा स्वधर्म. श्रीकृष्ण जेव्हां बोलले तेव्हां हिंदुधर्म, बुद्धधर्म, इस्लामीधर्म ह्या शब्द प्रयोगांत जी धर्म शब्दाच्या अर्थाची कल्पना आहे ती मुळीं नव्हती च. बौधायन, गौतम, आपस्तम्ब, वसिष्ठ यांची धर्मसूत्रें व मनुस्मृति वगैरे दुसरे स्मृतिग्रंथ या मध्यें हि वर्ण व आश्रम यांच्या कर्तव्या संबंधानें च नियम घालून दिलेले आहेत. फार प्राचीन काळा पासून समाजांत स्वास्थ्य नांदावें व त्यांतील व्यक्तींनीं समाज व त्याचीं अंगें या संबंधानें आपआपलीं कर्तव्यें योग्य रीतीनें बजावून समाजस्थैर्य साधावें व त्याची परंपरा कायम राखावी म्हणून धर्मसूत्रांत निबंध घालून एकत्र करण्यांत आले. इ. स. पूर्वी दुसऱ्या शतकांत झालेल्या पातंजल महाभाष्यांत हि अनेक वेळा धर्मसूत्रकारांची आज्ञा ईश्वराज्ञेसारखी समजली जाई असें सूचित केलें आहे. ' अपवादां कडून उत्सर्गांचा बाध होवो अशी ईश्वराची हि आज्ञा नाहीं किंवा धर्मसूत्रकार सुद्धां असें म्हणत नाहींत ' '( नैवेश्वर आज्ञापयति नापि धर्मसूत्रकाराः पठन्ति अपवादैरुत्सर्गा बाध्यन्तामिति–' मिदचोऽन्त्यात्परः ' या पाणिनिसूत्रा वरील महाभाष्य. ). धर्म शब्दाचा हा मुख्य अर्थ आहे. धर्मशास्त्रा वरील प्रमुख ग्रंथ पाहिले तर त्यांत मुख्यत्वें करून तीन गोष्टींचा अन्तर्भाव होतो. कांहीं विशिष्ट ( यज्ञादि ) क्रिया, विशिष्ट संस्कार व आचार; सत्य, दया, शम, दम, दान, इत्यादि नैतिक नियम; जड सृष्टि, मनुष्य व इतर प्राणी, आत्मा व परमात्मा

यांचें अस्तित्व व परस्पर संबंध इत्यादि आध्यात्मिक व तत्वज्ञानविषयक सिद्धांत; या तिन्ही गोष्टींचा धर्म या शब्दांत अंतर्भाव केलेला आहे. हा सिद्धांत सनातन धर्मा बद्दल च सत्य आहे असें नाहीं तर प्रचलित ख्रिस्ती धर्म, इस्लामी धर्म यांत हि हीं तिन्हीं अंगें थोड्या फार प्रमाणानें आढळतात. एखाद्या धर्मांत यांतील एक किंवा दोन अंगा वर च फार भर आहे, त्या च प्रमाणें सनातन धर्मांतील निरनिराळ्या ग्रंथांत हि एक किंवा दोन अंगावर च जोर दिलेला आढळतो.

धर्म शब्दांत वर सुचविल्या प्रमाणें तीन गोष्टींचा अंतर्भाव होतो व धर्मग्रंथांत तीन अंगा पैकीं एखाद्या च अंगा वर विशेष भर दिला जातो ही गोष्ट धर्म शब्दाच्या कांहीं व्याख्या पाहिल्या असतां जास्त स्पष्ट होईल. पूर्व मीमांसा सूत्रांत ‘ चोदना लक्षणार्थो धर्मः ’ अशी व्याख्या दिली आहे. चोदना म्हणजे क्रियेला प्रवृत्त करणारें (‘ स्वर्गकामो यजेत ’ अशा प्रकारचें ) वचन; त्यानें सूचित केलेली व मनुष्य प्राण्याला श्रेयस्कर अशी जी गोष्ट तो धर्म असा या व्याख्येचा अर्थ आहे. म्हणजे या व्याख्येनें ज्योतिष्टोमादि यज्ञयाग च अभिप्रेत आहेत म्हणून या व्याख्येंत धर्माच्या फक्त एका च अंगा वर जोर दिलेला दिसतो. ‘ अहिंसा परमो धर्मः ’ (अनुशासन पर्व ११५-१; ११६-३८, आदि पर्व ११-१३) हे शब्द महाभारतांत अनेक वेळा येतात. त्या च प्रमाणें ‘ आनृशंस्यं परो धर्मः ( वन पर्व ३७३. ७६, आनृशंस्य म्हणजे क्रूरपणाचा अभाव अर्थात् दया ) हे हि शब्द वारंवार येतात. तसें च ‘ इज्याध्ययनदानानि तपः सत्यं दया क्षमा । अलोभ इति मार्गोयं धर्मस्याष्टविधः स्मृतः ।। या व्याख्येंत विशेषतः नीतिविषयक नियमां वर च जास्त भर देण्यांत आला आहे. वैशेषिक सूत्रांत ज्या पासून अभ्युदय (स्वर्ग, कांहींच्या मतानें तत्वज्ञान) आणि निःश्रेयस ( मोक्ष ) यांची सिद्धि होते तो धर्म अशी व्याख्या दिलेली आहे. ( यतोभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः ). या व्याख्येंत अमुक च अंगावर विशेष भिस्त आहे असें जरी दर्शविलें नाहीं तरी मुख्यत्वें करून तत्वज्ञान व वेदोक्त आचार यांवर च भर आहे असें पुढील संदर्भा वरून दिसतें. मनुस्मृतींत ( १. १०८ ) ‘ आचारः परमो धर्मः ’ असें म्हणून आचाराला प्राधान्य दिलें आहे. शंकराचार्यांनीं भगवद्गीता भाष्याचे प्रारंभीं ‘ आपलें कल्याण व्हावें असें इच्छिणाऱ्या चार वर्णांतील व आश्रमांतील लोकांनीं आच-

रिलेला तो धर्म व तो प्रवृत्ति आणि निवृत्ति असा दोन प्रकारचा आहे' असें सांगितलें आहे. ही व्याख्या व्यापक असून, यांत उपरनिर्दिष्ट तीन हि अंगाचा अंतर्भाव होतो. " ( लोकमान्य हिंदुस्थान अंक शके १८४५ पान ५८ )

वरील उताऱ्याच्या शेवटीं भगवद्गीता भाष्याच्या प्रारंभीं आचार्यांनीं धर्म या शब्दाची जी व्याख्या केली आहे ती सर्वोत्कृष्ट असून ती च सर्वमान्य अशा प्रकारची आहे.

आतां धर्म व त्याच्या योगानें ज्या भरतखंडांतील निरनिराळ्या प्रांताच्या मानवी समाजाचें नियंत्रण केलें जातें त्या समाजाचा परस्पर संबंध व त्यांचे परस्परावलंबित्व याचें आतां आम्ही स्थूल दिग्दर्शन करितों. फार प्राचीन काळीं म्हणजे ऋग्वेद ऋचाच्या रचना काळीं त्या ऋचांचे कर्ते जे ऋषी हे ज्या आर्य वंशीय मानवी समाजांत निर्माण झाले तो समाज एक वर्णी होता. खानपान, शरीरसंबंध, इत्यादि बाबतींत त्या समाजांतील निरनिराळ्या व्यक्तींचा परस्पराशीं संबंध होण्यास कोणत्या हि प्रकारचा प्रत्यवाय नसे व समाजांतील प्रत्येक व्यक्तिच्या उपजीविकाव्यवसायस्वातंत्र्यावर कोणत्या हि प्रकारचे निर्बंध अस्तित्वांत नव्हते. भरतखंडाकडे या आर्यवंशीय मानवी समाजाचें स्थलांतर सुरू झाल्या नंतर या समाजाच्या स्थलांतरास प्रतिबंध करणाऱ्या दुसऱ्या मानवी समाजाची व त्याची गाठ पडून स्थलांतर करणाऱ्या आर्यवंशीय मानवी समाजास स्थलांतरास प्रतिबंध करणाऱ्या मानवी समाजा बरोबर युद्ध करणें अपरिहार्य झालें. या मुळें या आर्यवंशीय मानवी समाजांत निवळ युद्ध करणारा असा एक निराळा वर्ग निर्माण झाला व या वर्गास च क्षत्रियवर्ण ही संज्ञा कांहीं काळानें प्राप्त झाली. अशा रीतीनें एकवर्णी आर्यवंशीय मानवी समाजांत दोन वर्ण अस्तित्वांत येऊन हा समाज द्वैवर्णी बनला. आर्यावर्तांत या द्वैवर्णी मानवी समाजाचा प्रवेश झाल्या नंतर हा समाज या देशांत स्थिर होऊन यांतील कित्येक लोक कृषी, गोरक्षण, वाणिज्य इत्यादि व्यवसाय करूं लागले. कालांतरानें असल्या प्रकारच्या व्यवसाय करणाऱ्या लोकांचा एक तिसरा वर्ग निर्माण झाला व या वर्गास च वैश्य ही संज्ञा प्राप्त झाली व वरील द्वैवर्णी समाजाचा त्रैवर्णी समाज बनला. आर्यवंशीय मानवी समाजानें भरतखंड या नावानें पुढें प्रसिद्धीस आलेल्या ज्या भूभागांत प्रवेश करून कायमची वसाहत केली त्यांत राहणारे मूळचे मानवी प्राण्यांचे समाज अस्त्विांत होते. या मानवी प्राण्यांच्या समाजाची संस्कृति

आर्यवंशीय मानवी प्राण्यांच्या समाजा पेक्षां हीन प्रकारची होती. या कारणानें वरील तीन वर्णांच्या लोकांची ह्या समाजांतील लोक साहजिकपणें सेवा करूं लागले. त्रैवर्णिकांची सेवा करणाऱ्या या मूळच्या मानवी प्राण्यांच्या समाजास कांहीं काळानें शूद्र वर्ण ही संज्ञा प्राप्त होऊन वरील तिन्ही वर्णांच्या लोकांची सेवा करणें हा त्यांचा जीवनव्यवसाय ठरला गेला. वर दर्शविल्या प्रमाणें बनलेल्या त्रैवर्णी समाजांत चवथ्या शूद्रवर्णी समाजाची भर पडून फार पुरातन काळीं चातुर्वर्णीय समाज या भरतखंडांत अस्तित्वांत आला.

भारतीय आर्य समाजांत नवीन वर्ण जसजसें उत्पन्न होत गेले तसतसे त्या समाजांतील लोकांच्या धर्मांत स्थित्यंतर होत जाऊन नूतन धर्म कसकसे अस्तित्वांत आले याचें आम्ही आतां थोडक्यांत दिग्दर्शन करितों. ऋग्वेद ऋच्यांच्या रचना काळीं शुक्लवर्णी आर्य वंशीय मानवी प्राण्यांच्या एकवर्णी समाजांत अमुक एका वर्गानें दुसऱ्या करिता यज्ञकर्म करून आपली उपजीविका करावी, अमुक एका वर्गानें युद्ध करण्याचें काम करावें, अमुक एका वर्गानें कृषी गोरक्षण इत्यादी व्यवसाय करून आपली उपजीविका करावी अशा प्रकारचे कोणते हि निर्बंध अस्तित्वांत नव्हते. या मुळें या समाजांतील मानवी प्राणि उपासना, युद्ध, कृषी इत्यादि इच्छेस येईल तो व्यवसाय करीत असत.

---

१ टीपः– भरतखंडांतील चातुर्वर्णीय समाज कशा पद्धतीनें बनला गेला या संबंधीं दुसऱ्या प्रकारची एक उपपत्ति प्रतिपादण्यांत येते तिचा हि या ठिकाणीं उल्लेख करणें अवश्य आहे. कश्यप समुद्राच्या आसपासच्या प्रदेशांत शुक्ल वर्णाचे अग्नीउपासना करणारे आर्य फार प्राचीन काळीं रहात होते. अशा प्रकारच्या या शुक्लवर्णी आर्य समाजाचे स्थलांतर भरतखंडांकडे फार प्राचीचकाळीं सुरू झालें. हे स्थलांतर चालू असतां रक्तवर्णी युद्धप्रवीण असा एक मानवी प्राण्यांचा समाज या शुक्लवर्णी समाजास सामील होऊन शुक्लवर्णी आर्यांच्या एकवर्णी समाजाच्या ठिकाणीं द्वैवर्णी समाज अस्तित्वांत आला. कांही काळ लोटल्यानंतर कृषी गोरक्षण इत्यादि व्यवसाय करणारा पीतवर्णी मानवी प्राण्यांचा एक समाज वरील द्वैवर्णी समाजास सामील होऊन द्वैवर्णी समाजाच्या ठिकाणीं त्रैवर्णी समाज अस्तित्वांत आला. हा त्रैवर्णी मानवी प्राण्यांचा समाज आर्यावर्तांत स्थिर झाल्यानंतर या देशांतील मूळच्या रहिवाशांचा जो मानवी समाज होता त्यास शूद्र ही संज्ञा प्राप्त होऊन भरतखंडांत चातुर्वर्णीय समाज अस्तित्वांत आला. वरील दोन्ही उपपत्ती पैकीं कोणती हि उपपत्ति सत्य असली तथापि धर्म व समाज यांच्या अन्योन्य संबंधाच्या दृष्टीनें जें विवेचन करावयाचें आहे त्यांत कांहीं फरक होऊं शकत नाहीं हें पुढील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत येणार आहे.

परंतु ह्या एकवर्णी समाजाचे द्वैवर्णांत रूपांतर झाल्या वर वरील स्थितींत बदल झाला. दुसऱ्या करितां यज्ञ करण्याचा व्यवसाय एकट्या ब्राह्मण वर्णा कडे येऊन क्षत्रियवर्णी व्यक्तींने हें कर्म न करण्याचा निर्बंध अस्तित्वांत आला. युद्ध करणें हा क्षत्रियवर्णाचा व कृषि गोरक्षण व वाणिज्य हा वैष्यवर्णी लोकांचा धर्म वरील पद्धतीनें बनला जाऊन वरील कर्मे ही त्या वर्णाच्या लोकांच्या जीवनव्यवसायाचीं कर्मे ठरली गेलीं. एकवर्णी समाजाचें रूपांतर अनेकवर्णी समाजांत होतां च एकवर्णी समाजांतील मानवी प्राण्यांच्या धर्माचें रूपांतर अनेकवर्णी समाजास युक्त असें बनलें जाऊन नूतन धर्म समाजांत कसें उदयास आलें हें वरील विवेचना वरून वाचकांच्या ध्यानीं आलें असेल च. वर दर्शविलेल्या धर्मापेक्षां हि अधिक नूतन धर्म या समाजांत अस्तित्वांत येण्यास जी एक महत्वाची बाब पुढील काळांत कारणीभूत झाली ती अद्याप पावेतों अस्तित्वांत आली नव्हती. ही बाब म्हटली म्हणजे विवाह-विषयक निर्बंध ही होय. वर वर्णन केलेला समाज जावत्काल पावेतों द्वैवर्णी होता तों पावेतों या समाजांतील ब्राह्मण व क्षत्रिय स्त्रीपुरुषांचे विवाहसंबंध परस्परांशीं होत असत. ब्राह्मण ऋषींच्या कन्यांची क्षत्रिय राजा बरोबर व क्षत्रिय राजांच्या कन्यांचा ब्राह्मण ऋषीपुत्रां बरोबर विवाह करण्याचा प्रघात त्या काळीं अस्तित्वांत असून त्या काळच्या धर्मा प्रमाणें अशा प्रकारचा विवाहसंबंध निषिद्ध समजत नसत. या नंतर चातुर्वर्ण्य अस्तित्वांत आल्या वर मग वरील विवाह संबंधाच्या बाबतींत नूतन धर्म अस्तित्वांत आले. ब्राह्मण पुरुषास स्ववर्णाची एक व बाकीच्या प्रत्येक वर्णाची एक या प्रमाणें तीन, क्षत्रिय पुरुषास स्ववर्णाची एक व बाकीच्या प्रत्येक वर्णाची एक या प्रमाणें तीन, वैश्य पुरुषास स्ववर्णाची एक व शूद्र वर्णाची एक अशा दोन व शूद्र वर्णांतील पुरुषास त्याच्या वर्णाची एक च या प्रमाणें निरनिराळ्या वर्णाच्या पुरुषाबरोबर निरनिराळ्या वर्णाच्या स्त्रियांचे वि-वाह करण्याचा प्रघात अस्तित्वांत येऊन कालांतरानें विवाहाच्या बाबतींत वर दर्शविल्या प्रमाणें चातुर्वर्णीय समाजांत नूतन धर्म अस्तित्वांत आले. कांहीं काळ पावेतों वरील प्रकारच्या विवाहसंबंधा पासून उत्पन्न झालेली संतति बापाच्या वर्णाची समजली जात असे. आतां वर्णन केलेल्या विवाहसंबंधास अनुलोम ( म्हणजे वरिष्ठ वर्णाच्या पुरुषानें कनिष्ठ वर्णाच्या स्त्री बरोबर विवाह करणें ) विवाह म्हणत. अनुलोम विवाहा प्रमाणें च कनिष्ट वर्णाच्या पुरुषानें श्रेष्ठ वर्णाच्या स्त्री बरोबर विवाह करण्याचा प्रघात ( यास च प्रतिलोम

विवाह असें ह्मणत ) ब्राह्मण आणि क्षत्रिय वर्णा पुरता अस्तित्वांत असून धर्म्य समजला जात असे. परंतु इतर वर्णांच्या स्त्री पुरुषांचे अशा प्रकारचे विवाहसंबंध निषिद्ध समजले जात व अशा संबंधा पासून उत्पन्न झालेली संतति अगदीं हलक्या प्रकारची समजत असत. मनुस्मृतिरचनाकाळापूर्वी ह्मणजे इ. स. पूर्वी शंभर वर्षे पावेतों वर वर्णन केलेले विवाह धर्म्य समजले जात असल्याकारणानें त्या विवाहांच्या संततीचे धर्म सवर्ण स्त्री बरोबर झालेल्या विवाहांच्या संततीच्या धर्माप्रमाणें च समजत. मनुस्मृति-रचनाकाळाच्या सुमारास बरीक वरील प्रकारच्या विवाहासंबंधा पासून निर्माण झालेल्या प्रजांच्या निराळया जाती बनल्या जाऊन या जातींच्या लोकांचे जीवनव्यवसाय निरनिराळे ठरले गेले व हे विविक्षित व्यवसाय करणें हा च त्या जातींच्या लोकांचा धर्म समजला जाऊं लागला. मनुस्मृतीच्या दहाव्या अध्यायांत अनुलोम व प्रतिलोम शरीरसंबंधापासून निर्माण झालेल्या प्रजांच्या कोणकोणत्या जाती बनल्या याचें व त्या जातींच्या लोकांच्या जीवनव्यवसायांचे बरें च विस्तृत वर्णन केलेलें आहे. त्या वर्णना वरून समाजांत घडलेल्या स्थित्यंतरामुळें नूतन धर्म कसे अस्तित्वांत आले याची उत्तम कल्पना वाचकांस होण्या सारखी आहे. मनुस्मृती नंतर चारशें ते पांचशें वर्षांनीं याज्ञवल्क्य स्मृति रचली गेली. त्या सुमारास वरील प्रकारच्या विवाह संबंधा विषयीं भारतीय समाजांत प्रतिकूल ग्रह उत्पन्न झाला होता असें या संबंधीं याज्ञवाल्क्य स्मृतींत जीं वचनें आहेत त्यां वरून उघड दिसून येतें. याज्ञवल्क्यस्मृतिकाला नंतर शें दोनशें वर्षांनीं वरील प्रकारचे विवाह निषिद्ध मानण्यांत येऊन ते अजिबात बंद पडूं लागले व प्रस्तुत काळीं ज्या स्वरूपाचा वर्ण व जाती यांनीं युक्त असलेला भारतीय समाज आपणांस दृष्टीस पडतो तशा प्रकारचा समाज याज्ञवल्क्यस्मृतीच्या रचनाकाला पासून स्थिर होऊं लागला. भारतीय चातुर्वर्णिय समाजांत नूतन धर्म अस्तित्वांत येण्यास जी आणीक दुसरी एक बाब कारणीभूत झाली ती बाब आह्मी आतां नमूद करितों. ही बाब ह्मटली ह्मणजे आश्रमव्यवस्था ही होय. भरतखंडाच्या चातुर्वर्णिय समाजांतील शूद्रवर्णी लोकां खेरीज बाकीच्या वर्णांच्या प्रत्येक पुरुष व्यक्तीच्या आयुष्याचे चार भाग अथवा चार अवस्था मानण्यांत येतात. या चार अवस्था ह्मणजे ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास या होत. या चार अवस्थेंत असणाऱ्या पुरुष व्यक्तीचे धर्म निरनिराळे

असून त्या धर्मास अनुसरून ज्या त्या आश्रमांतील व्यक्तीस आचरण करावें लागत असे. शूद्रवर्णी पुरुष व्यक्तीच्या आयुष्याची एक च अवस्था मानण्यांत येते. ही अवस्था ह्मणजे गृहस्थाश्रम ही होय. धर्माच्या आणि भारतीय समाजाच्या परस्पर संबंधाचा विचार करतांना आश्रमव्यवस्था ही एक महत्वाची बाब आहे हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. श्रुतिस्मृत्युक्तधर्म आणि भारतीय समाज यांचा परस्पर संबंध व या दोघांचें परस्परावलंबित्व याज्ञवल्क्यस्मृतीच्या रचनाकाला पावेतों आह्मी स्थूल दृष्टया वर दर्शविलें आहे. या नंतर ह्मणजे इ. स. पांचशें नंतर भरतखंडाच्या वायव्य दिशेच्या सिंध प्रांता वर मुसलमानांच्या स्वाऱ्यास सुरुवात झाली व इ. स. अकराशेंच्या सुमारास उत्तर हिंदुस्थानांत मुसलमानांची राजकीय सत्ता स्थापित झाली. या पुढें शें दीडशें वर्षांनीं मुसलमानांनीं दाक्षिणे वर स्वारी करून तेथें हि आपलें राजकीय वर्चस्व स्थापित केलें व अशा रीतीनें सर्व भरतखंडभर त्यांच्या सत्तेचा प्रसार झाला. श्रुतिस्मृतिप्रणीत धर्म व मुसलमानी धर्म यांच्यांत आचार विषयक बाबतींत अत्यंत विरोध आहे. मुसलमानी धर्मास राजकिय सत्तेचें पाठबळ असल्या कारणानें श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माची मुसलमानांचें राजवटींत अत्यंत पिछेहाट झाली. त्यांतल्या त्यांत आचार व प्रायश्चित्त धर्माचा जवळ जवळ लोप होण्याचा प्रसंग आला. मुसलमानी धर्माची ही अपात्ति भारतीय चातुर्वर्णी समाजावर आल्यामुळें आचार व प्रायश्चित्तादि धर्मांची प्रखरता नष्ट होऊन त्यांचे स्वरूप सौम्य झालें. आतां पावेतों भरतखंडांतील मानवी समाजाच्या दृष्टीनें केलेलें वरील सर्व साधारण विवेचन महाराष्ट्र देश व त्यांतील मानवी समाजास हि जवळ जवळ लागू आहे. महाराष्ट्र देशावर मुसलमानांच्या राजकीय सत्तेच्या आपात्ति खेरीज ख्रिस्ती पोर्तुगीज लोकांच्या राजकीय सत्तेची आणिक एक आपत्ति इ. स. पंधराशेंच्या सुमारास ओढवली गेली. गोवा, वसई, ठाणें, दमण व दीव इत्यादि ठिकाणें व त्यांच्या आसपासचा प्रदेश पोर्तुगीज लोकांनीं काबीज करून तेथें त्यांनीं आपली राजकीय सत्ता स्थापित केली. मुसलमान लोकांपेक्षां हि पोर्तुगीज लोक ख्रिस्ती धर्म वेडानें अधिक ग्रस्त असल्या कारणानें त्यांनीं वरील प्रांतातील कित्येक महाराष्ट्रीय समाजांतील लोकांस जबरदस्तीनें ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली. या लोकांनीं स्वखुशीनें तो धर्म स्वीकारला नसल्याकारणानें ते हिंदु धर्माचा आचार पाळीत व हिंदु देवतांना भजत

असत. या लोकांच्या चातुर्वर्णीय समाजांत परत येण्याच्या आकांक्षे मुळें परधर्मांत गेलेल्या माणसास शुद्ध करून स्वधर्मांत परत घेण्याचा नूतन धर्म महाराष्ट्रांत झालेल्या वरील राजकीय उलाढालीचे योगानें उदयास आला. मुसलमानधर्मी लोकांच्या दास्यत्वा खालीं दोन तीनशें वर्षे राहिल्या कारणानें महाराष्ट्रीय समाजांतील निरनिराळ्या वर्णांच्या व जातींच्या लोकांचे आचारधर्म हीनत्वाप्रत पावले होते. पूर्व काळचें प्रायश्चित्तधर्म समाजाच्या बदललेल्या परिस्थितींत कडक भासूं लागल्यामुळें मृदु असें नूतन प्रायश्चितधर्म अस्तित्वांत आले. सुरवातीस दर्शविलेल्या प्रास्ताविक बाबी संबंधीं येथ पावेतों विवेचन केल्या नंतर महाराष्ट्रांत प्रमाणभूत मानण्यांत आलेला थोर ग्रंथ विज्ञानेश्वर म्हणजे याज्ञवल्क्यस्मृती वरील मिताक्षरा टीका इचे आधारानें धर्मांच्या अनेक बाबींचे आतां आम्ही दिग्दर्शन करितों. या दिग्दर्शनांत च महाराष्ट्रीय समाजांत दृग्गोचर होणाऱ्या विशिष्ट स्वरूपाच्या धर्म विषयक बाबी आह्मी योग्य स्थळीं नमूद करण्याचें ठरविलें आहे. अशा रीतीनें महाराष्ट्रिय समाजांत दृग्गोचर होणाऱ्या विशिष्ट स्वरूपाच्या धर्म विषयक बाबीं नमूद केल्या नंतर हि महाराष्ट्र धर्मांत अंतर्भूत होणाऱ्या कित्येक बाबी शिल्लक राहणार आहेत. अशा बाबींचें विवेचन प्रस्तुत प्रकरणाच्या शेवटीं आह्मी करणार आहों.

## धर्माची व्याख्या ( याज्ञवल्क्यांनीं केलेली )

याज्ञवल्क्य मुनीस, ब्राह्मणादि वर्ण, ब्रह्मचर्यादि आश्रम व वर्ण संकर होऊन उत्पन्न झालेल्या जाती यांचे सर्व धर्म कथन करा असा प्रश्न करण्यांत आल्या वरून याज्ञवल्क्य मुनींनीं निरनिराळ्या धर्मांचें कथन केलें असें याज्ञवल्क्य स्मृतीच्या प्रारंभीं नमूद केलें आहे. या प्रश्नांतील धर्म या शब्दा वर टीका करतांना विज्ञानेश्वरांनीं हा शब्द साही प्रकारचे स्मार्त धर्म व्यक्त करण्या करितां योजला आहे असें सांगून हे सहा धर्म म्हणजे वर्णधर्म, आश्रमधर्म, वर्णाश्रमधर्म, गुण-धर्म, निमित्तधर्म व साधारणधर्म होत असें नमूद केलें आहे. विज्ञानेश्वरांनीं या सहा धर्मांचें स्वरूप विशद करण्या करितां या साही धर्मांचीं उदाहरणें पुढें दर्शविल्या प्रमाणें दिलीं आहेत. ब्राह्मणानें कधीं हि मद्य पिऊं नये हा वर्णधर्म, ब्राह्मणानें सायंप्रातर्होम करावा हा आश्रमधर्म, ब्राह्मण ब्रह्मचाऱ्याचा दंड पळसाचा असावा हा वर्णाश्रम धर्म, शास्त्रिय अभिषेकादि गुणानें युक्त असलेल्या राजानें प्रजेचे पालन करावें हा गुणधर्म, शास्त्रानें ज्याचें विधान केलें

असेल तें न करणें व शास्त्रानें ज्याचा निषेध केला असेल तें करणें ह्या दोषा करितां करावें लागणारें प्रायश्चित्त तो निमित्त धर्म,व आहिंसा,सत्य भाषण इत्यादि ब्राह्मणा पासून चांडाला पर्यंत सर्व मनुष्यांस एकसारखा लागूं असणारा जो धर्म तो साधारण धर्म. या प्रमाणें साहीं धर्मांचीं उदाहरणें विज्ञानेश्वरांनीं देऊन त्या नंतर होमहवन, मनुष्याच्या उत्कर्षार्थ शास्त्रानें सांगितलेला आचार, मनाचें किंवा बाह्य इंद्रियांचें दमन, प्राण्यास पीडा न देणें, आपली वस्तु दुसऱ्यास सर्वथैव अर्पण करणें, वेद व शास्त्रें यांचें अध्ययन, आणि काम्य कर्में वर्ज्य करून इतर सर्व शास्त्रोक्त कर्मांचें अनुष्ठान करणें, या सर्वांत चित्ताचें एकाग्रय करून आत्म्याचें साक्षात् दर्शन करणें म्हणजे त्याचा अनुभव घेणें हा च सर्वोत्तम धर्म होय असा याज्ञवल्क्यांनीं आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. वर दर्शविलेल्या धर्मांचें दिग्दर्शन करण्या पूर्वी एक महत्वाची बाब लक्षांत ठेवावयाची ती ही कीं, ज्या महाराष्ट्रीय समाजाचें नियंत्रण धर्मानें केलें जातें त्या समाजांतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र इत्यादि चार प्रमुख वर्णाच्या लोकांचे व या समाजांतील अनुलोम प्रतिलोम संबंधा पासून उदयास आलेल्या निरनिराळ्या जातीच्या लोकांचे व अनार्य जातींच्या लोकांचे जीवनव्यवसाय फार पुरातन काळा पासून ठरले गेले आहेत. प्रत्यक्ष व्यवहारांत धर्मशास्त्र ग्रथांत सांगितलेल्या वचनांस अनुसरून वरील वर्णाच्या सर्व व्यक्ति प्रस्तुत काळीं जरी आचरण करीत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत नसलें तथापि धर्मशास्त्रग्रंथांत सांगितलेल्या वचनास अनुसरून प्रत्येक वर्णाच्या लोकांनीं आचरण करणें हा उच्च मार्ग आहे अशा प्रकारची भावना वरील महाराष्ट्रीय समाजांतील लोकांत अद्याप पावेतों जागृत आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. मानवी समाजांत कोणतें हि श्रेष्ठ प्रकारचें ध्येय अस्तित्वांत असणें ही च एक मोठी गोष्ट आहे. उच्च ध्येय समाजांत अस्तित्वांत असेल तर त्या प्रमाणें त्या समाजांतील लोकांचें आचरण पुढें मार्गे होण्याचा संभव असतो. परंतु ज्या समाजांत श्रेष्ठ ध्येयाची च जाणीव नाहीं त्या समाजाची उर्जित होण्याची आशा च नको असें म्हटलें तरी अतिशयोक्ति होणार नाहीं. श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माच्या ज्या विधिनिषेधरूपी आज्ञा आहेत त्यांचें खरें महत्त्व आतां दर्शविलेल्या दृष्टीनें समजावयाचें आहे हें कदापि हि विसरतां कामा नये.

---

## ( १ )

## संस्कारविधी व व्रतचर्या.

**महाराष्ट्रीय समाजांतील ब्राह्मणादि प्रमुख वर्ण व इतर जाती यांची उत्पत्ती व त्यांचे जीवनव्यवसायविषयक धर्मः**—महाराष्ट्रीय समाजांतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार प्रमुख वर्ण होत. यांच्या उत्पत्तीबद्दल ऋग्वेदांतील पुरुषसूक्तांत असलेलें वर्णन सर्वांस श्रुत च आहे. वेददृष्टी एका बाजूस ठेविली तर हे चार प्रमुख वर्ण कसे बनले असावे याचें दिग्दर्शन आम्हीं केलें च आहे. या चारी वर्णां पैकीं प्रत्येक वर्णांतील पुरुषास सवर्णाची एक व बाकीच्या प्रत्येक वर्णा पैकीं एक एक स्त्रीशीं विवाह करण्याची धर्माची मोकळीक आहे. सवर्ण स्त्री पासून झालेली संतति धर्मा प्रमाणें त्या च वर्णाची समजण्यांत येते. परंतु अन्य वर्णाच्या विवाहित स्त्री पासून झालेली प्रजा एका विशिष्ट काळा पासून बापाच्या वर्णाची समजण्याचा प्रघात बंद पडला. हा प्रघात बंद पडल्या नंतर अशा संबंधा पासून झालेल्या संततीच्या ज्या निरनिराळ्या जाती बनल्या गेल्या त्यांचे आम्ही या ठिकाणीं थोडक्यात दिग्दर्शन करितों. ब्राह्मण पुरुष आणि त्याची विवाहित क्षत्रिय स्त्री यांच्या पासून झालेल्या संततीस मूर्धावसिक्त, वैश्य जातीच्या स्त्री पासून झालेल्या संततीस आबंष्ट, शूद्र स्त्री पासून झालेल्या संततीस पारसव अथवा निषाध ह्या संज्ञा प्राप्त होऊन या संततीच्या निराळ्या जाती उदयास आल्या. ब्राह्मण पुरुषा पासून क्षत्रिय व वैश्य स्त्रीच्या ठायीं उत्पन्न झालेल्या वरील प्रजांस मातेच्या जाती प्रमाणें क्षत्रिय व वैश्य जातीचे धर्म विहित आहेत. यास्तव या प्रजांचे उपनयनादि संस्कार करितां येतात. विवाहित वैश्य व शूद्र स्त्रीच्या ठायीं क्षत्रिया पासून होणारे पुत्र क्रमानें माहिष्य व उग्र होत. वैश्यापासून विवाहित शूद्र स्त्रीच्या ठायीं करण जातीचा पुत्र होतो. ह्या अनुलोमज संततीच्या कांहीं काळानें निरनिराळ्या जाती बनल्या गेल्या. आतां प्रतिलोमज संबंधा पासून उत्पन्न झालेल्या प्रजांच्या बनलेल्या जातींचें आह्मी दिग्दर्शन करितों. ब्राह्मण स्त्रीचे ठायीं क्षत्रिय, वैश्य व शूद्र पुरुषा पासून क्रमानें सूत, वैदेहिक व चांडाल नामक पुत्र होतात. त्यांतील चांडाळ सर्व धर्मा पासून बहिष्कृत केलेला आहे. क्षत्रिय स्त्रीस वैश्या पासून झालेल्या संततीस मागध व शूद्रा पासून होणाऱ्या संततीस क्षत्ता असें म्हणतात. वैश्य स्त्रीस शूद्रा पासून होणाऱ्या पुत्रास अयोगन ही संज्ञा आहे.

संकर जातीचा पुरुष व संकर जातीची स्त्री यांच्या शरीरसंबंधा पासून उत्पन्न झालेल्या संततीस खालीं लिहिल्या प्रमाणें संज्ञा प्राप्त झाल्या. क्षत्रिया पासून वैश्य स्त्रीच्या ठायीं उत्पन्न झालेला माहिष्य व करणी ( शूद्र स्त्रीस वैश्या पासून झालेली कन्या ) यांच्या पासून उत्पन्न झालेल्या संततीस रथकार ही संज्ञा आहे. रथकार पुरुषांचे उपनयनादि संस्कार करण्यास धर्मशास्त्राची मोकळीक आहे. त्या च प्रमाणें ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या पासून झालेले जे मूर्धावसिक्त व माहिष्य यांच्या पासून अनुलोम संस्कार होऊन उत्पन्न झालेल्या पुत्रांची जाती त्यांच्याहून निराळी होते, पण त्यांच्या द्विजत्वा मुळें उपनयनादिकांचा त्यांस अधिकार आहे. मनुस्मृतींत दस्यु जातीचा पुरुष व अयोगव जातीची स्त्री यांच्या पासून निर्माण झालेला पुत्र सैरंध्री, वैदेह पुरुष व अयोगवी स्त्री यांचा पुत्र मैत्रेय, निषाध पुरुष व अयोगवी स्त्री यांचा पुत्र कैवर्त अथवा दास, निषाध पुरुष व वैदेही स्त्री यांचा पुत्र कारावर, वैदेही पुरुष व निषाद स्त्री यांचा पुत्र मेद, वैदेही पुरुष व कारावर स्त्री यांचा पुत्र अंध्र, चांडाल पुरुष व वैदेही स्त्री यांचा पुत्र पांडुसोपाख्य, निषाध पुरुष व वैदेही स्त्री यांचा पुत्र अहितुंडिक, चांडाल पुरुष व पुक्कस जातीची स्त्री यांचा पुत्र सोपाख्य व चांडाल पुरुष व निषाध स्त्री यांचा पुत्र अंत्यावसायी इत्यादी प्रजांच्या निरनिराळ्या जाती असल्याचें व त्यांचे जिवन व्यवसाय निरनिराळे असल्याचें नमूद आहे ( मनुस्मृति अध्याय १० श्लोक ५ ते ३२ ). ब्राह्मणादि मुख्य चार वर्णां पैकीं निरनिराळ्या वर्णांच्या स्त्री पुरुषांच्या शरिरसंबधा पासून ज्या प्रजा निर्माण झाल्या त्या प्रजांच्या निरनिराळ्या जाती बनल्या गेल्या अशी याज्ञवल्क्य स्मृतींत निरनिराळ्या जातींची उत्पत्ती दर्शविली आहे.

आतां महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या निरनिराळ्या जातींची उत्पत्ति व त्यांचे जातिविशिष्ट आचार यांचें दिग्दर्शन प्रस्तुत स्थळीं महाराष्ट्रधर्माच्या विवेचनाच्या दृष्टीनें करणें अवश्य आहे. या संबंधाची चर्चा ज्यांत केलेली आहे असे पुष्कळ ग्रंथ उपलब्ध झाले आहेत. मराठी राज्य लयास जाऊन महाराष्ट्रांत इंग्रजी राज्य सुरू झाल्या वर सात आठ वर्षांच्या आंत च महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या अनेक जातींच्या पुढाऱ्यां कडून वरील बाबी विषयीं विश्वसनीय माहिती मिळविण्याचा शिस्तवार प्रयत्न इंग्रज अधिकाऱ्या कडून केला गेला. या प्रयत्नाचें फळ म्हटलें म्हणजे इ. स. १८२६ सालांत प्रसिद्ध करण्यांत आलेला " Summary of the Law &

custom of Hindu castes within the Deccan Provinces subject to the Presidency of Bombay. " ' मुंबई इलाख्यांत अंतर्भूत होणाऱ्या दक्षिण प्रांतांतील हिंदु ज्ञातींच्या कायद्यांची आणि रूढींची त्रोटक माहिती ' हा ग्रंथ होय. या ग्रंथांत महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या देशस्थ, कोंकणस्थ, कऱ्हाडे इत्यादि पंच द्राविड, पंच गौडांत अंतर्भूत होणारे सारस्वत ब्राह्मण उर्फ शेणवी, चांद्रसेनीय कायस्थ, पाताणे प्रभु, मराठाक्षत्रिय, धनगर, सोनार, शिंपी, कासार, तांबट, वाणी, जैन, अगरवाले, माळी, तेली, लोहार, भंडारी, कुणबी, महार, चांभार व मांग इत्यादि अनेक जातींच्या उत्पत्ती बद्दल व त्यांच्या ज्ञातीच्या आचारा बद्दल साग्र व तपशीलवार माहिती नमूद केली आहे. या माहितींचें नुसतें स्थूल दिग्दर्शन करण्याचें मनांत आलें तथापि फार विस्तार होईल यास्तव त्या मोहांत आह्मी पडत नाहीं. महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या १३३ ज्ञाती विषयीं वरील ग्रंथांत माहिती नमूद केलेली आहे. आतां महाराष्ट्रीय समाजांतील कांहीं जाति विशिष्ट रूढींचें ( ज्या रूढीस महाराष्ट्रधर्म असें ह्मणतां येईल ) या ठिकाणीं आह्मी दिग्दर्शन करितों.

महाराष्ट्रधर्म :—धर्मास संमत नसलेल्या स्त्रीपुरुषांच्या शरीरसंबंधा पासून निर्माण झालेल्या संततीस ज्ञातींत समाविष्ट करून घेण्या संबंधाचे महाराष्ट्रीय समाजांतील कांहीं विशिष्ट ज्ञातींचे रिवाज आहेत त्यांचे आह्मी प्रस्तुत स्थळीं दिग्दर्शन करितों. महाराष्ट्रांत कोष्टी जात सर्वत्र आहे. सटवाजी कोष्टी या नांवाच्या बटकी पासून झालेला या ज्ञातींत एक गृहस्थ होता. त्यानें चांगले जातीचे कोष्टी लोकांस मिलाफी करून घेऊन परगणे संगमनेर येथील चांगल्या जातीच्या कोष्ट्यांच्या सोयरिका केल्या. तेव्हां मेहेत्रे कोष्टी यांनीं त्या संबंधीं अशी तक्रार केली कीं, " आमचे जातींत बटकीचा वंश गोत पतकरून चांगले जातींत घेत नाहींत." या नंतर वाई, कऱ्हाड, नाते पुते, ताऱ्हळे, बारामती, येवले, तिसगांव येथील कोष्टी ज्ञातींतील मेहेत्रे यांच्या या बाबतींत साक्षी घेण्यांत आल्या व कोष्टी ज्ञातींत बटकीच्या वंशाची गोत पतकरून त्यास गोतांत घेण्यांत येत नाहीं असें ठरविण्यांत येऊन सटवाजी यानें कडू जातींत वर्तावें असा निवाडा करण्यांत आला. ( वाड भाग ७ थोरले माधवराव भाग २ पान २३९). आतां या च प्रकारच्या गौळी ज्ञातींत उपस्थित झालेल्या प्रश्नाचा निर्णय कशा प्रकारें करण्यांत आला याचें

आह्मी दिग्दर्शन करितों. गौळी जातीच्या एका नवरा मेलेल्या स्त्रीचा संबंध तिच्या ज्ञातींतील एका पुरुषा बरोबर झाला. या संबंधा पासून तिजला एक मुलगा झाला. पुढें गोतांत घेण्या बद्दल या मुलानें विनंति केल्या वरून त्याजला गोतानें जातींत घेण्याचें कबूल केलें. पुढें या मुलाची सोयरीक पुण्यास ठरली. पुणे-कर गौळ्यांनीं त्याची गोत पतकरून त्यास जातींत घेण्याचें ठरविलें. त्या नंतर पुणें, महाड, पेण, चीरवाडी, भोरप, पाल, घामणी येथील गौळयास त्याजला जातींत वर्तविण्या बद्दल आज्ञापत्र देण्यांत आलें. ( वाड भाग ७ थोरले माधवराव पेशवे भाग २ पान ३२५ ). वरील उदाहरणांत दर्शविल्या प्रमाणें शाहू छत्रपतींच्या कारकीर्दींत ( शाहूछत्रपती चरित्र पान ५८ ) जाधवराव यांनीं नाटकशाळेच्या पोटीं झालेला पुत्र गोतांत सामिल करण्या संबंधीं केलेल्या प्रयत्नाचा उल्लेख आला आहे त्याचें आह्मी या ठिकाणीं दिग्दर्शन करितों:- " या संधीस जाधवरावास बुद्धि आठवली जे नाटकशाळेचे पोटीं पुत्र झाला होता, त्याजवर बहुत प्रीति ( होती ) त्यास राजे ( कोलहापुरचे छत्रपती ) यांनीं ताटांत घेऊन गोत पतकरून मराठे यांच्या सोइरिका कराव्या ऐसा मनांत निश्चय करून राजाशीं बोलणें लाविलें. तेव्हां ही गोष्ट साफ घडावयाची नाहीं असें जाधवरावास ( कोलहापुरचे ) छत्रपती यांनीं उत्तर दिलें. " आतां हीं जीं उदाहरणें आह्मीं नमूद केलीं आहेत त्यां विषयीं थोडी बहुत चर्चा करणें अवश्य आहे. महाराष्ट्रीय समाजांतील कांहीं विशिष्ट ज्ञातींत एकाद्या पुरुषाचा व स्त्रीचा ( धर्मास संमत नसलेला ) संबंध होऊन संतती झाल्यास ती संतती गोतांत सामील करून घेण्याची रूढी होती असें वरील उदाहरणा वरून दिसून येतें. अशा प्रकारच्या संततीस ज्ञातींत सामील करून घेण्याचा अधिकार त्या ज्ञातींतील लोकांस असे व ज्ञातींतील लोकांनीं त्या संततीस गोतांत सामील करून घेतलें ह्मणजे सरकारी अधिकाऱ्या कडून गोतांत सामील करून घेतल्या बद्दलचीं आज्ञापत्रें त्या ज्ञातीचे लोक ज्या ज्या गांवीं असत त्या त्या गांवीं जात असत. या प्रमाणें आज्ञापत्रें गेल्या नंतर असल्या प्रकारच्या संततीच्या उत्पत्तीच्या वैगुण्या मुळें जातींत वागण्यास त्यास येणाऱ्या अडच-णीचा परिहार होत असे. ज्या जातींत अशा प्रकारची रूढी अस्तित्वांत नसे त्या जातींत वरील प्रकारच्या संततीची एक कडू उपजात बनत असे व त्या उपजातींतील पुरुषांचीं लग्नें त्या जातींतील स्त्रीयांशींच होत असत. वर जीं दोन उदाहरणें दिलीं आहेत तीं कोष्टी व गौळी ज्ञातीचीं आहेत.

जाधवरावांच्या संबंधानें जो उतारा आम्हीं वर दिला आहे त्या वरून असा अंदाज होतो कीं, वरील प्रकारच्या संबंधा पासून झालेल्या संततीस गोतांत सामील करून घेण्याची रूढी महाराष्ट्रांतील बऱ्या च ज्ञातींत अस्तित्वांत असावी. महाराष्ट्रांतील भोसले, जाधवादि शाहाण्णव कुळीच्या मराठा क्षत्रिय ज्ञातींत वरील प्रकारच्या संततीस गोतांत सामील करून घेण्याची रूढी अस्तित्वांत नव्हती असें जाधवरावास कोल्हापुरकर छत्रपतींनीं जें उत्तर दिलें त्या वरून उघड दिसतें. परंतु महाराष्ट्रीय समाजांतील इतर ज्ञातींत वरील रूढी बऱ्या च प्रमाणांत अस्तित्वांत असल्यामुळें त्या रूढीच्या अनुकरण बुद्धीनें जाधवरावास नाटकशाळेचा मुलगा गोतांत सामील करून घेण्याचा मोह पडला असावा असें वाटतें. महाराष्ट्रांतील निरनिराळ्या ज्ञाती संबंधीं पुरातन कागदपत्र बरे च उपलब्ध झाल्यास त्यांच्या उत्पत्ती संबंधीं व त्यांच्यांत अस्तित्वांत असलेल्या वरील स्वरूपाच्या रूढीं विषयीं पुष्कळ नवी माहिती उपलब्ध होण्याचा संभव आहे.

## ब्राह्मणादि चारी वर्णांच्या व इतर जातींच्या लोकांचीं कर्में व जीवनव्यवसाय

**ब्राह्मणांचीं कर्में व जीवन व्यवसायः**—अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान व प्रतिग्रह ( म्हणजे दान घेणें ) हीं ब्राह्मणांचीं प्रमुख कर्तव्यें आहेत. या पैकीं यजन, अध्ययन व दान हीं कर्में धर्म संपादन करून देणारीं आहेत. प्रतिग्रह म्हणजे दान घेणें, यज्ञ करविणें व अध्ययन सांगणें हीं कर्में ब्राह्मणास उपजीविके करितां सांगितलेलीं आहेत.

**क्षत्रियांचीं कर्में व जीवनव्यवसायः**—प्रजेचें रक्षण करणें, दान यज्ञ, अध्ययन, विषया मध्यें आसक्त न होणें हीं क्षत्रियांचीं कर्में आहेत. या कर्मां पैकीं प्रजेचें पालन करणें हे क्षत्रियांच्या जीविके करितां कर्म सांगितलें आहे.

**वैश्यांचीं कर्में व जीवनव्यवसायः**—पशूंचें रक्षण, दान, अध्ययन, वाणिज्य ( व्यापार ) व्याजबट्टा व शेती ही वैश्यांचीं कामें आहेत. यां पैकीं व्याजबट्टा, शेती, व्यापार व पशूंचें पोषण हीं वैश्यांचीं उपजीविकेचीं कर्में सांगितलीं आहेत.

**शूद्रांचीं कर्में व जीवनव्यवसायः**- ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांच्या लोकांची सेवा करणें हा शूद्रांचा मुख्य धर्म आहे. नाना

प्रकारच्या शिल्पांनीं म्हणजे चित्र काढणें, गायन, नृत्य, वाद्यें वाजविणें, कारागिरी करणें इत्यादि व्यवसायांनीं शूद्रांनीं आपला निर्वाह करावा असें सांगितले आहे.

ब्राह्मणादि प्रमुख वर्णांच्या लोकांची प्रमुख कर्में व जीवनव्यवसाय वरील प्रमाणें धर्मशास्त्रांत सांगितलेले आहेत. वर दर्शविलेलीं निरनिराळया वर्णांच्या लोकांचीं कर्मे व जीवनव्यवसाय हीं ध्येय स्वरूपी आहेत. प्रत्यक्ष व्यवहारांत मनुस्मृतिकाला पूर्वी पासून हि वरील निरनिराळया वर्णांतील लोक त्यांच्या वर्णास धर्म शास्त्रानें विहित म्हणून सांगितलेले जीवनव्यवसाय न करितां दुसऱ्या वर्णांच्या लोकांस सांगितलेले जीवनव्यवसाय करीत असत. नाटक, तमाशे, नृत्य, गायनादि व्यवसाय करणारे ब्राह्मण मनुस्मृतीच्या काळीं हि समजांत अस्तित्वांत होते. धर्मा प्रमाणें आचरण करणाऱ्या ब्राह्मणांस राजा कडून कांहीं बाबतींत धर्मशास्त्राच्या वचना प्रमाणें सवलती मिळावयाच्या असें ठरलें आहे. अशा प्रकारच्या सवलती ज्या ब्राह्मणांचें धर्मशास्त्रास अनुसरून वर्तन नसे त्यांस मिळत नसत. त्या च प्रमाणें श्राद्धादि प्रसंगीं वरील प्रकारचे ब्राह्मण निषिद्ध समजले जात असत.

## अनुलोम प्रतिलोम संबंधा पासून निर्माण झालेल्या जातींचीं कर्में व जीवनव्यवसायः—

निरनिराळया जातींच्या उत्पत्ती विषयीं मागें आम्हीं जें दिग्दर्शन केले आहे त्यांत अनुलोम प्रतिलोम संबंधा पासून उत्पन्न झालेल्या प्रजांच्या बनलेल्या कांहीं जातींचीं जीं नांवें दिलीं आहेत त्यां पैकीं कांही जातींच्या लोकांच्या जीवनव्यवसायांचें आम्ही येथें थोडक्यांत दिग्दर्शन करितों.

| जात | जीवनव्यवसाय |
|---|---|
| सैरंध्रीः— | वेणी फणी, काजळ कुंकू करणें, अंग चेपणें पाश बांधून मृगादिकांचा वध करणें. |
| मैत्रेयः— | प्रातःकाळीं घंटा वाजवून राजा प्रधानादिकांची स्तुती करणें. |
| कैवर्तः— | नौका चालविणें. |
| कारावरः— | चामडें कमाविणें, कापणें व त्याचे जिन्नस करणें. |
| पांडुसोपाख्यः— | वेळूचे तट्ट, बुरड्या, पाट्या वगैरे जिन्नस करणें. |

सोपाक्यः— राजाच्या आज्ञेनें अपराध्यास जीवें मारणें.
अंत्यावसायीः- स्मशानांत राहून वृत्ति चालविणें.

या प्रमाणें मनुस्मृतींत अनुलोम प्रतिलोम संबंधा पासून उत्पन्न झालेल्या संततीच्या ज्या जाती बनल्या त्या जातींच्या लोकांचे जीवनव्यवसाय सांगितले आहेत ( मनु. अ. १० श्लो. ३१-३७ ). महाराष्ट्रांतील निरनिराळ्या जातींच्या लोकांचे ज्ञातीविशिष्ट जीवनव्यवसाय मागें उल्लेखिलेल्या रिटलचे ग्रंथांत नमूद केले आहेत. रिटलचे ग्रंथा पूर्वी आपल्या कडील निबंध ग्रंथांत हि महाराष्ट्रांतील निरनिराळ्या ज्ञातीच्या लोकांच्या जीवनव्यवसायांचा उल्लेख केलेला आहे. महाराष्ट्रांतील निरनिराळ्या जातींचे लोक बव्हंशीं फार पुरातन काळा पासून स्मृतिधर्मास अनुसरून आपले जीवनव्यवसाय चालवीत असत. मुसलमानांनीं महाराष्ट्रा वर आपली सत्ता स्थापित केल्या नंतर या बाबतींत मोठी च उलथापालथ झाली. ठाणे कोकण प्रांताच्या " वंशपद्धती " या नांवाच्या बखरींतील जो उतारा मागें आम्हीं दिला आहे त्यांत या उलथापालथीचें बखरकारानें उत्तम चित्र रेखाटलें आहे. नोकरी करणें मग ती सरकारी अगर अन्य प्रकारची असो हा स्मृतीअन्वयें सेवाधर्म असून तो शूद्र वर्णाच्या लोकांस युक्त व ब्राह्मण वर्णाच्या लोकास निषिद्ध असल्याचें सांगितलें आहे. महाराष्ट्रीय समाजांतील ब्राह्मणवर्णाचे लोक मुसलमानांचें राज्य महाराष्ट्रांत स्थापन होण्या पूर्वी कोणाची सेवा न करितां स्मृतींत सांगितलेल्या धर्मास अनुसरून आचरण करीत असत असें तत्कालीन उल्लेखा वरून दिसून येतें. फेरिस्ताच्या दक्षिणच्या इतिहासांत या मुद्या विषयीं खालील उल्लेख आढळतोः—

It is universally allowed that Kango was the first Brahamin who accepted an office in the service of a Musalman Prince. Before him the Brahamins never condescended to engage in Public affairs, but passed their lives in the duties of religion, and the study of the sciences, indifferent to fortune and esteeming the service of Princes as hurtful to virtue and hazardous to their eternal welfare. If as physicians, astronomers, moralists or historians, they sometimes associated with the rich or powerful, *they yet would never*

*wear the chain of sevitude* on their necks, though courted by gifts and high favours.

Since Kango's acceptance of employment the direction of finance has been committed generally to Brahamins, by all the Princes of the Deccan." ( फेरिस्ताच्या इतिहासाचें इंग्रजी भाषांतर पान १२ ).

अर्थः—"कानगो हा मुसलमान राजाचे पदरीं पहिला ब्राह्मण नोकर राहिला. त्या पूर्वी ब्राह्मण लोक सरकारी नोकरी कधीं करीत नसत, परंतु आपलें सर्व आयुष्य धर्मांत सांगितलेलीं कर्मे करण्यांत व निरनिराळया विद्यांचा अभ्यास करण्यांत घालवीत. द्रव्यार्जना कडे ब्राह्मणांचें लक्ष नसे आणि सरकारी नोकरी करणें हें नीतीस अपायकारक आणि शाश्वत सुखास विघातक असल्याचें ब्राह्मण लोक समजत असत. ज्योतिषी, सदाचाराचे प्रवर्तक अथवा इतिहासकार या नात्यानें श्रीमान् आणि वजनदार लोकाशीं जरी त्याचा संबंध आला तथापि द्रव्याच्या देणग्या मुळें अथवा इतर मोठ्या फायद्याच्या आशेनें दुसऱ्याच्या नोकरीचें जूं आपल्या माने वर लादून घेण्यास ते कधीं हि तयार नसत. कानगोनें नोकरी धरल्या पासून दक्षिणेंतील राजे लोकांनीं जमीन महसुलाचे खात्यांत ब्राह्मण लोकांस नोकर ठेवण्याचा प्रघात सुरूं केला."

मुसलमानांचें राज्य होण्या पूर्वी महाराष्ट्रीय समाजांतील ब्राह्मण ज्या प्रमाणें स्मृतींत सांगितलेल्या आचारास अनुसरून वागत असत त्या च प्रमाणें क्षत्रिय, वैश्य व शूद्र वर्णाचे हि लोक स्मृतिग्रंथांत सांगितलेल्या आचारांचें व जीवनव्यवसायाचें परिपालन करित असत ही बाब वंशपद्धतीतील उल्लेखा वरून स्पष्ट होत आहे आतां महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या व महाराष्ट्र-प्रांतांत आढळणाऱ्या कांहीं विशिष्ट जातींच्या लोकांच्या जीवनव्यवसाया संबंधीं स्वराज्यांत उत्पन्न झालेल्या वादांचे निकाल कसे करण्यांत येत असत यांचें आम्ही दिग्दर्शन करितों.

**महाराष्ट्रधर्म** ( जातीविशिष्ट आचार व जीवनव्यवसाय ) :— **हाटगर हे जंगमाचे** शिष्य असून त्यांनीं लिंग धारण करावें असें असतां पांच सात जणांनीं लबाडी करून जानवीं घातलीं व लिंग धारण ते च आपले आपल्यांत करूं लागले. या संबंधीं श्रीहरी मंदिरी जंगमांची व लिंगाइतांची पंचाईत जाली. हाटगर खोटे झाले. सबब त्यांचीं

आनेवीं काढविली व हटगारांनीं लिंगें जंगमी पासून धारण करून जंगमांचें शिष्यत्व करावें असा निवाडा झाला.(इ. स. १७५१।५२ वाडभाग २ पा. २०४).

**जोशी प्रांत पुणें व सोनार:**– पुणें प्रांताचे जोशी व सोनार यांचा उपाध्येपणाचा कजिया झाला. सोनाराचे उपाध्ये त्यांचे स्वजाती आहेत. त्यांनीं सोनाराचे उपाध्येपणाचा हक्क घ्यावा असें ठरलें. ( वाड भाग १ पान २१७ ).

**पटवेकरी व जंगम:**—यांचे मध्यें उदिमाचा कज्या लागला. तेव्हां या व्यवहाराचे निर्णया करितां पटवेकरी व जंगम पैठण थळास गेले. तेथील देशमुख, देशपाडे व महाजन, चौधरी व मोकदम व कासार, मण्यार व समस्त महास्थलिक लोक त्यांस आपले करीनें सांगितलें. तेव्हां थळिकांनीं सांगितलें समस्त सभा करितो. दोघेजण सभेस येणें. थळिकांनीं सभा केली. पटवेकऱ्यांस व जंगमांस बोलाविणें पाठविलें. पटवेकरी सभेस हजर राहिले. जंगम गैरहजर जाले. त्यांची थळिकांनी चार दिवस वाट पाहिली.जंगम हजर झाले नाहींत. तेव्हां स्थळिकांनी महाजन जेजूरी यास पत्र दिलें जेः–पैठणी चाली परंपरा रेशमी काम पटवेकरांनीं करावें. जंगमास संबंध नाही. सुती काम, कटदोरे व सूत वगैरे जितके पडेल ते जगमांनीं करावें ऐशी चाल आहे. हे थळपत्र पटवेकरांनीं छत्रपतीस सातारियाचे मुक्कामीं आणून दाखविलें त्या वरून छत्रपतींनीं पटवेकरास अभयपत्र दिलें.

**माहार व मांग:**—इंदापुर येथील महार व मांग यांचे मध्यें वृत्ती बद्दल तंटा लागला. तेव्हां उभयता महार मागास पैठणचे स्थलास पाठवलें. महार व मांग यांनीं राजीनामे लिहून दिले कीं निर्बंधी निवडेल त्यास आपण राजी असो. त्या वरून हजीर मजालसी यानीं पंडिता कडून निर्बंध काढून निबंधात असेल त्या प्रमाणें निवाडा करणेंचें ठरविलें. निर्बंध काढून पाहातां निर्बंधी खालीं लिहिल्या प्रमाणें निघालेः– पड पडेल ते माहारांनीं न्यावी, आपली जीववृत्ती करावी. प्रेताचे वस्त्र व चार रुके घेणें ते माहारानें घ्यावे व महालक्ष्मीची सुवासीन व पेढीयाची घागर गांवा भोंवतीं फिरवावी, मांगास संबंध नाहीं. मांगानें नाडे,कातड्याचे दोर व वादी करून आपली उपजीविका करावी. " ऐसा निर्बंध निर्वाह झाला. या प्रमाणें पैठणीहून सडी आली व तीस अनुसरून माहार मांगाचे वृत्तीच्या तंट्याच्या निकाल करण्यांत असला.

नमुन्या दाखल वरील कांहीं उदाहरणें दिलीं आहेत. त्या काळच्या कागदपत्रांचें संशोधन मोठ्या प्रमाणा वर झाल्यास महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या अनेक जातींच्या जीवनव्यवसाया विषयींचे वरील स्वरूपाचे निवाडे त्या काळचे आढळून येतील. वर जे निवाडे दिले आहेत त्यां पैकीं हाटगरांचा निवाडा हा त्यांच्या विवक्षित जातीच्या आचारा संबंधाचा आहे. हाटगर हे जंगमांचे शिष्य असतां व लिंगायत पंथास अनुसरून लिंग धारण करणे हा त्यांचा धर्म असतां तो धर्म सोडून देऊन ते जानवीं घालूं लागले. त्या वर जंगमांनीं तक्रार केली. हाटगरांच्या ज्ञातीच्या आचारा बद्दल चौकशी करून जो त्यांच्या ज्ञातीचा आचार होता त्यास अनुसरून आचरण करण्या बद्दल त्यांस आज्ञा करण्यांत आली. प्रस्तुत काळीं वरील निवाड्या बद्दल अशी टीका करण्यांत येईल कीं पेशवे ब्राह्मण असल्या कारणानें हाटगरांनीं जानवें घालूं नये असा त्याचे वर पेशव्यांनीं जुलूम केला परंतु ही टीका कधीं हि न्यायाची व्हावयाची नाहीं. हल्लीं इंग्रजांनीं ज्या ज्या बाबी संबंधीं कायदे केले आहेत त्या बाबी खेरीज इतर बाबतींत कोणत्या हि प्रकारचें मनमोक्त वर्तन करण्याची पूर्ण मुभा असल्या कारणानें वरील टीका वाजवी वाटण्याचा संभव आहे. परंतु अशा प्रकारची टीका अप्रस्तुत व मूर्खपणाची होईल. कोणत्या हि एखाद्या विशिष्ट ज्ञातींतील व्यक्तीच्या आचरणाचे बाबतींत करण्यांत आलेले वरील प्रकारचे त्या काळचे निर्णय योग्य अगर अयोग्य, न्याय्य अगर अन्यायी आहेत हें त्या काळीं जी शासनपद्धती अस्तित्वांत होती तीस अनुसरून ते निवाडे करण्यांत आले आहेत कीं नाहींत ही बाब लक्षांत घेऊन ठरविलें पाहिजे हें उघड आहे. मराठी राज्यांत प्रत्येक ज्ञातीच्या व्यक्तीनें त्या ज्ञातीचे स्मृतिधर्मान्वयें जे परंपरागत आचार असतील त्यांस अनुसरून आचरण केलें पाहिजे असा निर्बंध अमलांत असल्या कारणानें वरील प्राकरचे निवाडे त्या काळच्या सरकारी अधिकाऱ्यांस करणें प्राप्त होतें. या दृष्टीनें विचार केला असतां वर दर्शविलेल्या प्रकारची टीका अन्यायाची व असमंजसपणाची आहे हें न्यायबुद्धीच्या कोणत्या हि माणसास कबूल करावें लागेल.

## संस्कार

ऋतुकालीं गर्भादान, गर्भाचें चलन होण्या पूर्वी पुंसवन, साहाव्या किंवा आठव्या महिन्यांत सीमन्तोन्नयन, गर्भाशयांतून पुत्र बाहेर

आला असतां जातकर्म, आकराव्या दिवशीं नामकरण, चवथ्या महिन्यांत निष्क्रमण [ सूर्यदर्शन करणें ], साहव्या महिन्यांत अन्नप्राशन [ उष्टावण ] व कुळाचारा प्रमाणें [ पहिल्या किंवा तिसऱ्या वर्षी ] चूडा [ चौल ]. उपनयन व विवाह हे द्विजांचे मुख्य संस्कार आहेत. या संस्कारा पैकीं पुंसवन व सिमंतोन्नयन यांचा संबध मातेशीं असतो सबब ते एकदां च करावे. प्रत्येक गर्भाचे वेळीं पुनः करावयास नकोत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार वर्णां पैकीं पहिल्या तीन वर्णांचे लोकांस द्विज ही संज्ञा आहे.यांचे वरील संस्कार वैदीक मंत्रांनीं करावयाचें असा धर्मशास्त्राचा निर्बंध आहे.

महाराष्ट्रधर्मः– महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या कांहीं ज्ञातींच्या प्रजांचे संस्कार वैदीक मंत्रांनीं करावे अगर अमंत्रक करावे, या बाबतींत स्वराज्यांत वाद उपस्थित झाले होते. स्वराज्य संस्थापक छत्रपति शिवाजी महाराज ज्या भोसले कुळात जन्मास आले त्या कुळांत उत्पन्न झालेल्या संततीचे त्या च प्रमाणें त्या कुळाच्या दर्जाच्या महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या दुसऱ्या कुळात उत्पन्न झालेल्या संततीचे संस्कार वदीक मंत्रांनीं करावयाचे कीं अमंत्रक करावयाचे हा प्रश्न शिवाजी महाराजांना राज्याभिषेक करण्या पूर्वी महाराष्ट्रात उपस्थित झाला होता. भोसले कुळ व त्या च दर्जाचीं दुसरीं कुळें ( शाण्णव कुळीचे मराठे ही संज्ञा ज्यास आहे अशीं कुळें ) हीं सर्व महाराष्ट्रीय क्षत्रिय वर्णां पैकीं असल्या कारणानें या कुळांत उत्पन्न झालेल्या प्रजांचे संस्कार वैदीक मंत्रांनीं करण्यात यावेत असा त्या काळीं निर्णय होऊन छत्रपति शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेक प्रसंगीं त्यांचे उपनयनादि सर्व संस्कार वैदीक मंत्रांनीं करण्यांत आले. महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या ज्या दुसऱ्या एका ज्ञाती बद्दल स्वराज्यांत वरील प्रकारचा प्रश्न उपस्थित झाला होता ती ज्ञात म्हटली म्हणजे चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंची होय. शिवाजी महाराजास राज्याभिषेक करण्या करितां काशीहून आलेल्या गागाभट्ट ह्या विद्वान् पंडितानें कायस्थ ज्ञातींतील प्रजांच्या वरील संस्कारा संबंधाचें विवेचन " कायस्थ धर्मदीप " या ग्रंथांत केलेलें आहे. याज्ञवल्क्य स्मृतींत ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन प्रमुख वर्णांच्या प्रजांचे संस्कार वैदीक मंत्रांनीं करावे एवढें च दर्शविलें आहे. या प्रमुख वर्णां खेरीज ज्या इतर अनेक जाती आहेत त्या जातींच्या प्रजांचे संस्कार वैदीक मंत्रांनीं करावे अगर अमंत्रक करावे या बद्दल कोठें उल्लेख

नाहीं. याज्ञवल्क्यस्मृति हा ग्रंथ शक ४००।५०० च्या सुमारास उत्तर हिंदु-स्थानांतील मिथिला नगरीत रचला गेला असें तज्ञांचें मत असल्याचें आम्हीं मागें दर्शविलें च आहे. अर्थात् हा ग्रंथ ज्या काळीं रचला गेला तेव्हां ज्या स्वरूपाचा मानवी समाज मिथिला नगरीच्या आसपासच्या प्रदेशात अस्तित्वांत होता त्या समाजांतील मानवी प्राण्यांच्या आचाराचें नियंत्रण त्या ग्रंथांतील विधिनिषेधरूपी आज्ञांच्या योगानें होत असलें पाहिजे हें उघड आहे. या ग्रंथाच्या रचनाकाळा पासून मराठी राज्य उदयास येई तों पावेतों हजार बाराशें वर्षें लाटून गेलीं होतीं. मिथिला नगरी ज्या प्रदेशांत आहे त्या प्रदेशांतील ज्या मानवी समाजाचें नियत्रण करण्या करितां हा ग्रंथ अस्तित्वांत आला. त्या प्रदेशा पासून पाच सहाशें कोस दूर असलेल्या महाराष्ट्र देशातील भिन्न अशा मानवी समाजांतील प्रजांच या ग्रंथांतील विधीनिषेधरूपी आज्ञांच्या योगानें नियत्रण होऊं लागलें. अशा रीतीनें काळ, स्थळ व परिस्थिति इत्यादि बाबतींत घडलेल्या फेरफारा मुळें या ग्रंथांतील वचनांच्या आधारें महाराष्ट्रीय समाजांत धर्मविषयक बाबी संबंधा उत्पन्न झालेले नवीन प्रश्न सुटणें अर्थात् दुरापास्त होतें. या प्रश्नांची सोडवणूक करण्या करितां याज्ञवल्क्यस्मृतीस पुस्ती दाखल अनेक निबंधग्रंथ महाराष्ट्रांत वेळोवेळीं अस्तित्वांत आले. असल्या प्रकारच्या निबंधग्रंथात प्रतिपादिलेल्या धर्मांचा अतर्भाव महाराष्ट्रधर्मांत होता. गागाभट्टकृत कायस्थ धर्मदीप हा वरील कोटींतील निबंध ग्रंथा पैकीं असून चांद्रसेनीय कायस्थाच्या संस्कारांचें साग्र विवेचन या ग्रंथांत केलेलें आहे. महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या एका विशिष्ट ज्ञातीच्या संस्कारांचें विवेचन या निबंधात केलें असल्या कारणानें या ग्रंथांत प्रतिपादिलेल्या धर्मांचा अंतर्भाव महाराष्ट्रधर्मांत होतो हें उघड आहे.

## उपनयन

ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन ज्ञातींतील मुलांचा संस्कार करण्या विषयीं धर्मशास्त्राची आज्ञा आहे. हा संस्कार करण्याचा परम काल ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचा अनुक्रमें १६,२२ व २४ वर्षां पावेतों आहे. हा संस्कार झाल्या वर त्यास द्विज ही संज्ञा प्राप्त होते. वरील कालाच्या आंत हा संस्कार ज्याचा करण्यांत येत नाहीं तो सर्व वर्णधर्मा विषयीं अनधिकारी होतो व त्यास व्रात्य ही संज्ञा प्राप्त होते. व्रात्य स्तोम प्रायश्चित्त केल्यास असा द्विज उपनयनाचा अधिकारी होतो. उपनयन संस्कारांत गायत्रीमंत्राचा उपदेश मुलाचा

पिता मुलास करितो. हा संस्कार झाल्या नंतर त्या मुलास ब्रह्मचारी असें समजण्यांत येतें व विशिष्ट प्रकारचीं कर्में व आचार यांचें परिपालन त्यास करावें लागतें.

**ब्रह्मचाऱ्यानें करावयाचीं कर्में व पाळावयाचे आचार:**- प्रातःस्नान, त्या नंतर प्राणायाम, सूर्याचें उपस्थान, गायत्रीमंत्राचा जप, सायंसंध्या, दोन्ही संध्या समया गृह्यसूत्रांत सांगितलेल्या विधानानें अग्नांत समिधांचा होम करणें हीं ब्रह्मचाऱ्यानें करावयाचीं आवश्यक कर्में आहेत. माता, पिता, गुरु इत्यादि वडील माणसांस ब्रह्मचाऱ्यानें वंदन करावें. त्या च प्रमाणें गुरूची परिचर्या करावी. मन, वाणी आणि शरीर यांनीं सर्वदा गुरूचें हित करावें. ब्रह्मचाऱ्याच्या ठिकाणीं खालील गुण असावे. केलेले उपकार न विसरणें, दयाळुत्व, ग्रंथाचें ग्रहण व धारण करण्याचें सामर्थ्य, बाह्य व अंतरशौचसंपन्नता, शारीरिक व मानसिक पीडे पासून अलिप्तता, दुसऱ्याच्या दोषांचा उच्चार न करितां त्याचे गुण मात्र प्रकट करण्याचा स्वभाव, आचार संपन्नता, शुश्रूषा करण्याचें सामर्थ्य इत्यादि गुण शिष्याचे ठायीं अवश्य असावे.

**ब्रह्मचाऱ्याचा वेष:**—ब्रह्मचाऱ्यानें दंड धारण करावा, कार्पासादिकांचें यज्ञोपवीत व मुञ्जादि तृणाची मेखला धारण करावी.

**ब्रह्मचाऱ्याच्या उपजीविकेचें साधन:**—ब्रह्मचाऱ्यानें आपला निर्वाह भिक्षा मागून करावा. मागून आणलेली भिक्षा गुरूच्या स्वाधीन करून नंतर त्यांची आज्ञा घेऊन, होम करून, मौन धरून, अन्नाचा सत्कार करून त्याची निंदा न करितां अगोदर अपोशन करून भोजन करावें.

**ब्रह्मचाऱ्यास निषिद्ध पदार्थ व कर्में:**-मद्य, बकऱ्याचें वगैरे मांस, काजळ, आपलें किंवा दुसऱ्याचें उष्टें भक्षण करणें, निष्ठुर भाषण, उपभोगार्थ स्त्री, जीवांचा वध, उदय व अस्त समयीं सूर्याचें अवलोकन, अश्लिल व असत्य भाषण, दुसऱ्याच्या विद्यमान किंवा अविद्यमान दोषांचें कथन या गोष्टी ब्रह्मचाऱ्यास निषिद्ध आहेत. त्या च प्रमाणें अंगास उटी लावणें, गळ्यांत माळा घालणें, दिवसा निजणें, पायांत जोडा घालणें, छत्री घेणें, काम, क्रोध, लोभ, मोह, वाद्यें वाजविणें, उष्णोदकानें स्नान करणें, अति हर्ष, नृत्य, गीत, दुसऱ्यास भिवविणें या गोष्टी ब्रह्मचाऱ्यानें करूं नये.

**ब्रह्मचाऱ्याचें मुख्य कर्तव्य:**-एका वेदशाखेचें अध्ययन करण्या करितां ब्रह्मचाऱ्यानें बारा वर्षें ब्रह्मचर्य पाळावें. सामर्थ्य नसल्यास पांच वर्षें पाळावें.

वेदप्रोक्त व स्मृतिप्रोक्त यज्ञ, शरीरपोषण करणाऱ्या चांद्रायणादि तपश्चर्या व उपनयनादि शुभ संस्कार या सर्वां मध्यें वेद हा च द्विजास श्रेष्ठ मोक्ष-दाता आहे.

**ब्रह्मचाऱ्याचे प्रकार**:–आमरण ब्रह्मचर्य पाळण्याचा ज्यानें निश्चय केला आहे त्यास **नैष्टिक ब्रह्मचारी** असें म्हणतात. त्यानें वेद ग्रहण केल्या नंतर स्वतंत्र होऊं नये. यावज्जीवन आचार्या जवळ आचार्यांच्या अभावीं त्याच्या पुत्रा समवेत, पुत्राच्या अभावीं आचार्यपत्नी समवेत, आचार्यपत्नीच्या अभावीं आचार्यांच्या अग्नीच्या समीप राहावे. अशा प्रकारचा ब्रह्मचारी आपल्या देहास क्षीण करून जितेंद्रिय राहतो व ब्रह्मलोकाप्रत जातो.

**गुरूंचे प्रकार**:—ब्रह्मचाऱ्यानें वेदाध्ययन ज्या गुरू पाशीं करावयाचे त्याचे प्रकार खालील प्रमाणें आहेत. ( १ ) जो गर्भाधानादि उपनयनान्त क्रिया करितो ( अर्थात पिता ) हा एक गुरु ( २ ) जो उपनयन करून वेद व इतर विद्या शिकवितो तो आचार्य ( ३ ) मंत्र व ब्राह्मणरूप वेदाचा कांहीं भाग किंवा व्याकरणा सारखें एकादें अंग जो शिकवितो तो उपाध्याय होय ( ४ ) यजमानानें प्रार्थना पूर्वक वरणी दिली असतां जो पाकयज्ञ, अग्नीष्टोम इत्यादि यज्ञ करितो तो ऋत्विज होय. गुरु, आचार्य, उपाध्याय व ऋत्विज हे पूर्व क्रमानें मान्य समजावें.

## स्नातकाचे धर्म

मंत्र,ब्राह्मणरूप वेद किंवा ब्रह्मचाऱ्याच्या व्रता पैकीं कांहीं तरी एक अथवा दोन ब्रह्मचाऱ्यानें संपवून गुरूस जें इष्ट असेल तें आपल्या शक्ती प्रमाणें देऊन स्नान करावें. वेदाध्ययन याचा अर्थ केवळ वेदाक्षरें तोंडपाठ करणें इतका च नाहीं तर अक्षरग्रहणपूर्वक त्याच्या अर्थाचें ज्ञान करून घेणें असा आहे अशा रीतीनें ब्रह्मचाऱ्यानें स्नान केलें ह्मणजे त्यास स्नातक म्हणतात. या स्नातकाचे धर्म खालील प्रमाणें आहेत. द्यूतादि कर्मानें किंवा नृत्य, गीत इत्यादि प्रसंगानें द्रव्य संपादन करण्याची हाव स्नातकानें धरूं नये. सर्वदा शूची असावें. ज्यांत प्राण जाण्याचा संभव आहे असें कर्म करूं नये. अहितकर व असत्य भाषण बोलूं नये. असभ्य व बीभत्स वचन हि उच्चारूं नये. देश, ग्राम, कुलाचार, आयुष्य व आरोग्य यांच्या विरुद्ध असलेलीं कर्में वर्ज्य करावींत. उपाकर्म नामक कर्म ह्मणजे श्रावणी व वेदोत्सर्ग हीं कर्में करावींत. श्रुतीनें व स्मृतीनें सांगितलेला आचार नित्य व उत्तम प्रकारें करावा. आचारा

मुळें दीर्घ आयुष्य, मना सारखी संतति व अक्षय धन यांची प्राप्ति होते. शरीर, मन व वाणी यांच्या योगानें जो धर्म करावयाचा तो मोठ्या प्रयत्नानें व आदरानें करावा.

## गृहस्थाश्रमधर्म

**विवाह संस्कार:**—स्नातकानें विवाह केला म्हणजे त्यास गृहस्थ समजतात. अशा गृहस्थाचे आचारधर्म विशिष्ट प्रकारचे आहेत. ते सांगण्या पूर्वी विवाहसंस्काराचें स्थूल दिग्दर्शन करितों. स्नातकानें तो ज्या शाखेचा असेल त्या शाखेच्या गृह्यसूत्रांत सांगितलेल्या विधीनें **असपिंड व वयानें लहान कन्येशीं विवाह करावा.** सगोत्र व सप्रवर कन्येशीं जर कोणीं विवाह केला तर तिच्या ठिकाणीं शास्त्रीय दृष्टया पत्नित्व च येत नाहीं. विवाह तीन प्रकारचे आहेत. रती करितां, पुत्रा करितां व धर्मा करितां, सवर्ण स्त्रीशीं विवाह करणें हा मुख्य पक्ष आहे. ब्राह्मणानें स्ववर्णाची एक व इतर वर्णाची प्रत्येकीं एक या प्रमाणें चार भार्या, क्षत्रियानें स्ववर्णाची एक व वैश्य व शूद्रवर्णाची प्रत्येकीं एक या प्रमाणें तीन भार्या व वैश्यानें स्ववर्णाची एक व शूद्रवर्णाची एक या प्रमाणें दोन भार्या कराव्या, असा गौण पक्ष आहे. कलियुगांत असवर्ण कन्येशीं विवाह निषिद्ध मानला आहे. ज्याला पुत्र झाला असून भार्या मेली आहे व वानप्रस्थ आश्रम घेण्याचा अधिकार नाहीं परंतु गृहस्थाश्रमांत राहण्याची ज्यास इच्छा आहे त्यानें ब्राह्मण असल्यास तीन वर्णाच्या तीन, क्षत्रिय असल्यास दोन व वैश्य असल्यास आपल्या वर्णाची एक च भार्या करावी. शूद्रास एक शूद्र स्त्री च सांगितलेली आहे. वरील परिस्थितींत हि सवर्ण भार्या च मुख्य आहे. पण ती न मिळाल्यास क्षत्रियादि इतर वर्णाची करावी.

**विवाहाचे प्रकार:**—ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, असुर, गांधर्व, राक्षस आणि पैशाच हे विवाहाचे आठ प्रकार आहेत.

**कन्यादानाचा अधिकार:**—पिता, पितामह, भ्राता ( काका, मामा ), पित्याच्या कुळांतील कोणी हि व कन्येची माता यांस क्रमानें कन्यादानाचा अधिकार आहे. कन्यादान करणारा कोणी च नसल्यास वरण्यास योग्य अशा वराशीं स्वत: कन्येनें च विवाह करावा. कन्येचें दान एकदां च होते. यास्तव एकदां दिलेली कन्या पुन्हा दुसऱ्यानें वरली तर तो दंडास पात्र होतो. परंतु पहिल्या वरा पेक्षां दुसरा एखादा विद्या, कुल इत्यादिकांनीं अती उत्तम वर आला व

पहिला वर पापी व दुराचारी असला तर दिलेली कन्या परत घेतां येते. वाक्-दान झालें असून समंत्रक विवाह झाला नसल्यास कन्या परत घेतां येते. कन्येचे अंगीं असणारे दोष न सांगतां जो कन्या वरास देतो तो दंडास पात्र होतो, त्या च प्रमाणें कन्ये संबंधीं विवाहा पूर्वी जो खोटे दोष सांगतो तो दंडास पात्र होतो.

गृहस्थाश्रमी द्विजांचीं स्मार्त व श्रौत कर्मे:– गृहस्थाश्रमी द्विजांनीं दोन प्रकारचीं कर्मे करावयाचीं असतात. एक स्मार्त कर्मे व दुसरीं श्रौत कर्मे. स्मार्त कर्मांचें दिग्दर्शन करण्या पूर्वी प्रथम गृहस्थाश्रमी द्विजाच्या दिन-चर्येचें थोडक्यांत दिग्दर्शन करितों. गृहस्थाश्रमी द्विजानें ब्राह्म मुहूर्ता वर उठावें. शौच मुखमार्जन करावें. प्रातःसंध्या करावी. प्रातःसंध्ये नंतर आह-वनीय-अग्नी अग्नींत किंवा स्मार्त अग्नींत होम करावा. नंतर सूर्य देवतेचा एकाग्र मनानें जप करावा. त्या नंतर निरुक्त व्याकरण इत्यादिकांचें श्रवण करून वेदार्थ समजून घ्यावा. पूर्वी झालेल्या अध्ययनाची आवृत्ति करावी. मीमांसा इत्यादि धर्म, अर्थ व आरोग्य इत्यादिकांचें प्रतिपादन करणारी नाना प्रकारचीं शास्त्रें पाहावींत. वेतन घेऊन दुसऱ्यानें सांगितलेलें काम करणें यास सेवा अथवा श्ववृत्ति ह्मणतात. ब्राह्मणानें तिचा अंगिकार करूं नये. योगक्षेमा करतां अभिषिक्त राजा कडे किंवा आचारसंपन्न श्रीमाना कडे जावें. माध्यान्ह समयीं शास्त्रोक्त विधीनें नदी, सरोवर इत्यादि मध्यें स्नान करावें. नंतर देव, ऋषी व पितर यांचें तर्पण करावें. नंतर गंध, पुष्पें, अक्षता इत्यादि सामुग्रीनें हरिह-रादि इष्ट देवतांचें सम्यक पूजन करावें. या नंतर ब्रह्मयज्ञ करावा. त्या नंतर भूतयज्ञ, पितृयज्ञ, देवयज्ञ, ब्रह्मयज्ञ व मनुष्ययज्ञ हे पंच महायज्ञ नित्य करावे. बालक, विवाहा नंतर पित्याच्या घरीं राहिलेली कन्या, वृद्ध, गर्भिणी, रोगी, कुमारिका, अतिथी व सेवक यास अगोदर भोजन घालून नंतर शेष अन्न गृहस्थ व त्याची पत्नी यांनीं खावें. वैश्वदेव झाल्या नंतर चारी वर्णां पैकीं कोणत्या हि वर्णाचा अतिथी आल्यास त्यास जेऊं घालावें. अन्न देण्याची शक्ति नसल्यास सत्य व प्रिय वाणी, बसावयास भूमी, जल इत्यादिकांनीं त्याचा सत्कार करावा. यति व व्रत संपन्न ब्रह्मचारी याचा चांगला सत्कार करून भिक्षा घालावी. आतां अतिथी कोणास ह्मणावें तर मार्गांत असणारा वाटसरू, श्रोत्रिय, व वेदपारंगत हे अतिथी होत.

गृहस्थानें भोजना नंतरचा काळ इतिहास पुराणादि जाणणाऱ्या शिष्टा बरोबर काव्य, कथा इत्यादिकांची चर्चा करण्यांत घालवावा.

दिवसाचा आठवा भाग निर्वाहाचें साधन मिळविण्या करितां गृहस्थानें खर्च करावा. त्या नंतर स्नान संध्या करून अग्नींत होम करून भोजन करावें. नंतर रात्रीच्या दुसऱ्या अगर तिसऱ्या प्रहरीं झोप घ्यावी.

धर्मास प्राधान्य देऊन त्यास बाध येणार नाहीं अशा व्यवस्थेनें द्रव्य संपादन करावें.

आतां गृहस्थाश्रमी द्विजांच्या श्रौत कर्मांचें आम्ही थोडक्यांत दिग्दर्शन करितों. श्रौत कर्मांचे दोन प्रकार, एक नित्य श्रौत कर्में व दुसरीं काम्य श्रौत कर्में.

**नित्य श्रौत कर्में**:-प्रति वर्षी सोमयाग करावा. दक्षिणायन व उत्तरायण समयीं पशुयाग करावा. धान्याची उत्पत्ती झाली असतां अग्रयणेष्टि करावी व प्रति वर्षी चातुर्मास्य कर्में करावीं. या नित्य क्रियांचा असंभव झाल्यास वैश्वानरी इष्टि करावी. यज्ञ करितां ब्राह्मणानें शूद्रा जवळ द्रव्य मागूं नये.

**काम्य श्रौत कर्में**:- सर्व कुटुंबाच्या निर्वाहास तीन वर्षें पुरेल इतकें किंवा त्याहून अधिक अन्न ज्याच्या जवळ असेल त्यानें काम्य सोमयाग करावा. ज्याच्या जवळ एका वर्षा पुरतें च अन्न असेल त्यानें प्राक्सौमिकी म्हणजे अग्निहोत्र, दर्शपूर्णमास, पशु व चातुर्मास्य कर्में आणि त्यांच्या विकृति ह्या क्रिया कराव्या.

**गृहस्थाश्रमी द्विजांचे प्रकार**:— गृहस्थाश्रमी ब्राह्मणास विहित अशा कर्मांच्या निरनिराळ्या प्रकारच्या आचरण पद्धति वरून गृहस्थाश्रमी ब्राह्मणांचे खालीं दर्शविलेले निरनिराळे प्रकार समजले जातात. शेतांत पडलेलीं कणसें वेचून आणून त्यां वर उदरनिर्वाह करणें त्यास शिलवृत्ति म्हणतात. बाजारांत पडलेला एकेक धान्यकण वेचून आणून त्या वर निर्वाह करणें यास उंच्छ वृत्ति म्हणतात. जो धर्मप्रधान गृहस्थाश्रमी ब्राह्मण या वृत्ती वर आपली उपजीविका करितो त्यास यायावर असें म्हणतात. यायावराहून कनिष्ट शालीन गृहस्थ होय. दास, पशु, गृह, ग्राम, धन, धान्य यांनीं संपन्न असणारा, लौकिक मर्यादेनें चालणारा व यजन याजन इत्यादि षट्कर्मांत तत्पर असणारा शालीन नामक गृहस्थ होय. शालीन ब्राह्मणाचे चार प्रकार आहेत. यांतील पहिल्या प्रकारचा गृहस्थ यज्ञ करविणें, शिकविणें प्रतिग्रह करणें, शेती करणें, व्यापार करणें व पशु पाळणें या सहा कर्मां वर

निर्वाह करितो. दुसऱ्या प्रकारचा यज्ञ करविणें, अध्यापन व प्रतिगृह या तिन्हीं वर निर्वाह करितो; तिसऱ्या प्रकारचा याजन, अध्यापन याच्या वर उपजीविका करितो व चवथ्या प्रकारचा केवळ अध्यापना वर च उदरंभरण करितो.

गृहस्थाश्रमी द्विजांच्या दान श्राद्धादि कर्मांचे आतां आम्ही दिग्दर्शन करितों:—प्रथम दान म्हणजे काय याचा खुलासा आम्ही करितों. उत्तम पात्र पाहून यथाशक्ति देणें यास दान म्हणतात. ज्या वस्तू वर आपलें स्वत्व असतें ती वस्तु संकल्पानें स्वत्व सोडून दुसऱ्याची करणें म्हणजे तिच्या वरून आपला हक्क काढून घेणें ही दानाची दुसरी व्याख्या आहे. या व्याख्ये अन्वयें पुण्यादिकाचें हि दान करितां येतें कारण अमुक एक वस्तु माझी आहे किंवा ती माझी नाहीं असें समजणें हें मनाच्या अधीन आहे व संकल्प हें मनाचें कर्म आहे. दानाची व्याख्या वरील प्रमाणें नमूद केल्या नंतर दान देणारा, दान घेणारा व देय वस्तु या विषयींच्या नियमांचे आम्ही दिग्दर्शन करितों. दान घेणाराची पात्रता, जाती, विद्या, अनुष्ठान व तप यांच्या योगानें ठरली जाते. क्षत्रियादि इतर सर्व प्राण्यांहून ब्राह्मण जातीनें व कर्मानें श्रेष्ठ आहेत. ब्राह्मणांत हि शास्त्राध्ययन व वेदाध्ययन करणारे ब्राह्मण उत्कृष्ट होत. त्यांच्याहून हि शास्त्र विहित अनुष्ठान करणारे चांगले. अनुष्ठान करणाऱ्या ब्राह्मणा पेक्षां हि आत्मज्ञानी व शमदमादि संपन्न ब्राह्मण श्रेष्ठ आहेत. यास्तव ब्राम्हणास दान द्यावें. माता, पिता, भाऊ, बहिण, बहिणीचीं मुलें, स्त्री, पुत्र, कन्या इत्यादि माणसें गुणहीन व विद्याहीन असलीं तरी त्यांस यथाशक्ति देणें हें उत्तम कर्म आहे. आपले आप्त दुःखानें निर्वाह करीत असतां जो दुसऱ्यास दान देतो तो अधर्म करितो. दान देणाऱ्याच्या निरनिराळ्या हेतू वरून दानाचें धर्मदान, अर्थदान इत्यादि सहा निरनिराळे प्रकार आहेत. दाता, प्रतिग्रह करणारा, श्रद्धा, धर्मयुक्त देय, देश व काल हीं धर्माचीं सहा अंगें आहेत. दाता पापरोगानें युक्त नसणारा, धार्मिक, दानेच्छु, व्यसनशून्य, शुचि व अनिंद्य कर्मा वर निर्वाह करणारा असावा. दानास श्रद्धा अवश्य आहे. श्रद्धा म्हणजे प्रसन्न चित्तानें दान देणें. स्वतः संपादन केलेलें व ज्याच्या दानानें दुसऱ्या कोणास अथवा स्वतः दात्यास कोणत्या हि प्रकारें क्लेश होण्या सारखे नसतील असें थोडें किंवा फार द्रव्य हें देय होय. हें द्रव्य जेथें आणि ज्या कालीं दुर्लभ असेल त्याच्या दानाचा तो उत्तम व मुख्य देश व काल होय. दान देणाऱ्याची बुद्धि आणि ज्यास दान दिलें असेल त्याची पात्रता याच्या योगानें दुष्फल व निष्फल

इत्यादि दानांचीं सहा फलें उत्पन्न होतात. ध्रुव, आजस्रिक, काम्य व नैमित्तिक असे दानाचे चार प्रकार दानाच्या फला वरून समजण्यांत येतात.

आराम ( बाग ), तडाग इत्यादिकांच्या दानास ध्रुव दानें म्हणतात. प्रत्यहीं फलाची इच्छा न धरितां जें दान दिलें जातें तें आजस्रिक म्हणजे नित्य होय. अपत्य, विजय व ऐश्वर्य इत्यादिकांच्या इच्छेनें जें दान देतात तें काम्य होय. ग्रहणादि काल, यज्ञादि क्रिया व द्रव्यादि प्राप्ति या निमित्यांच्या योगानें दिलेलें दान नैमित्तिक होय. दानाचे इष्ट व पूर्त असे दोन विभाग आहेत. वेदी वर बसून दान देणें, अग्निहोत्र, आतिथ्य व वैश्वदेव हीं इष्ट दानें व मोठीं तळीं, विहिरी, मंदिरें, मठ, धर्मशाळा, अन्नछत्रें बांधणें हीं पूर्त दानें होत. इष्ट व पूर्त दानें सर्व द्विजांनीं करावीं व शूद्रांनीं केवळ पूर्त कर्मे करावींत.

अपात्र पुरुषानें दान घेऊं नये कारण तो दात्यास व स्वत:स अधोगतीस नेतो.

पात्र जेथें असेल तेथें स्वत: जाऊन त्यानें मागितल्या वाचून देणें हें अयाचित दान व पात्रभूत ब्राह्मणास आपल्या घरीं बोलावून त्यानें मागितलें नसतां त्यास दान देणें हें आहूय दान होय.

सर्व दानांत गोदान हें उत्तम मानलें आहे. खालील दानें गोप्रदानाच्या बरोबरीचीं समजतात.

जे थकले असतील त्यास आसन, शयन, इत्यादि देऊन त्यांचे श्रम दूर करणें, रोग्यांस यथाशक्ति औषधादि देऊन त्यांची परिचर्या करणें, हरीहर इत्यादिकांची गंध पुष्पादिकांनीं पूजा करणें, मोटमोठ्या आरोग्यशाला तयार करून त्यांत सर्व प्रकारच्या रोग्यांची चिकित्सा करविणें, अनेक औषधांचा व वैद्यांचा संग्रह करणें आणि रोग्यांस राहण्या करितां जागा, त्यांच्या अन्नवस्त्रादिका करितां द्रव्य व शुश्रूषे करितां मनुष्ये यांची व्यवस्था करणें हें एक उत्तमोत्तम पुण्य कर्म आहे. नैवेशिक हा असंख्य पुण्यप्राप्ति करून देणारा दानाचा एक प्रकार सांगितला आहे. ज्यास माता, पिता व आप्त नाहींत अशा अनाथ बालकांचें पोषण करून, त्यांचे सर्व संस्कार करवून त्यास विद्यादि निर्वाहाचीं व पुरुषार्थाचीं साधनें शिकवून व त्यांचा विवाह करून त्यास रहावयास गृहादि देणें, यास नैवेशिक दान असें म्हणतात. वेद हा सर्व धर्मांचें ज्ञान करून

देणारा आहे. त्या मुळें त्याच्या अध्ययनाच्या द्वारा दान देणें हें सर्व दानांहून अधिक आहे.

आता ज्या वस्तु दान देतां येत नाहींत त्यांचें आह्मी दिग्दर्शन करितों. समाईक मालकीची वस्तु, दुसऱ्याची मागून आणलेली वस्तु, ठेव, गहाण, स्त्री, स्त्रीधन, दुसऱ्या कोणास पोहोंचविण्या करितां कोणी दिलेली वस्तु व कुळा मध्यें लोक जीवंत असतांना आपलें सर्वस्व या वस्तु आदेय आहेत. स्त्री प्रमाणें च पुत्राचें हि दान करितां येत नाहीं व आपत्काला वाचून त्याचा विक्रय हि करतां येत नाहीं.

श्राद्ध:—श्राद्ध हें एक प्रकारचें दान आहे. खाण्यास योग्य असलेल्या पदार्थांचा किंवा द्रव्याचा मृत मनुष्यास उद्देशून श्रद्धेनें त्याग ( दान ) करणें यास श्राद्ध म्हणतात.

श्राद्धाचे पार्वण व एकोद्दिष्ट असे दोन प्रकार आहेत. एकाहून अधिक पितरांस उद्देशानें केलेल्या श्राद्धास पार्वण श्राद्ध म्हणतात व एक पितरास उद्देशून केलेल्या श्राद्धास एकोद्दिष्ट श्राद्ध म्हणतात.

नित्य, नैमित्तिक आणि काम्य असे श्राद्धाचे तीन प्रकार आहेत. नियत निमित्या मुळें होणारें जें श्राद्ध तें नित्य. फलकामने मुळें करण्यांत येणारें जें श्राद्ध तें नैमित्तिक. अहरह, पार्वण, वृद्धि, एकोद्दिष्ट व सपिंडकरण असे श्राद्धाचे दुसरे पांच प्रकार आहेत.

सतत वेदाध्ययन करणारे शास्त्रार्थज्ञान व वेदाध्ययन यांनीं संपन्न, ब्रह्मज्ञ इत्यादि गुणांनीं युक्त असे ब्राह्मण श्राद्धास योग्य आहेत.

श्राद्धा संबंधीं दुसरे बरे च नियम आहेत. परंतु अधिक विस्तार करण्याच्या भानगडींत आह्मी पडत नाहीं. श्राद्धप्रकरणाच्या शेवटीं श्राद्धा संबंधीं एक शंका नमूद करून तिचें निरसन करण्यांत आलें आहे. तिचे येथें दिग्दर्शन करणें जरूर आहे. श्राद्धकर्मा मध्यें ज्या मृत मनुष्यांचीं नावें उच्चारून पिंडादि देतात तीं मृत मनुष्यें च पितरादि होत असा पितरादि शब्दाचा मुख्य अर्थ आहे, असें समजूं नये. तर वसु, रुद्र व आदित्य या तीन अधिष्ठातृ देवतां सह मृत मनुष्यें हा पितरादि शब्दाचा अर्थ आहे. श्राद्धान्नादिकांच्या योगानें या देवता तृप्त होऊन त्या मृत मनुष्यास तृप्त करतात व या देवता श्राद्धकर्त्या पुत्रादिकांस योग्य फल देतात.

## वानप्रस्थाश्रम

वानप्रस्थ म्हणजे वनांत आश्रमधर्मानें व नियमानें जो वास करितो तो

वानप्रस्थ. वानप्रस्थाश्रम स्वीकारणारानें पत्नीला पुत्राच्या स्वाधीन करावें. परंतु पतीची परिचर्या करण्याची इच्छा धरून पती बरोबर वनांत जाण्याची स्त्रीची इच्छा असल्यास तिला हि बरोबर न्यावें. ज्यानें गृहस्थधर्म यथाविधि केला आहे असा पुरुष च वनवासाचा अधिकारी आहे. वानप्रस्थानें जटा वाढवून चीर (चिंधी) व अजिन यांचें परिधान करून नांगरलेल्या शेता वर निवास करूं नये. भूमि नांगरल्या वाचून च उत्पन्न झालेल्या फळ मूळां वर निर्वाह करावा व भूमी वर शयन करावें. इतरांस कांहीं यथाशक्ति द्यावें, पण स्वतः परिग्रह करूं नये. पांच महिन्या नंतर वैदिक मार्गानें अग्नीचें आधान करून व झाडाच्या मुळाशीं राहून देव, पितर, मनुष्य (अतिथी इत्यादि) यांस हव्यादि द्यावें. असें आचरण करणारा स्वर्गास प्राप्त होतो. एका दिवसाच्या भोजन याजनादि दृष्टार्थ व अदृष्टार्थ कर्मास पुरेल इतका धनसंचय करावा. अथवा एक महिन्याच्या, सहा महिन्याच्या व एक वर्षाच्या कर्मास पुरेल इतका धनसंचय करावा. याहून अधिक संचय करूं नये. पण असा नियमित संचय करीत असतां हि जर कांहीं कारणानें तो वाढला तर तो वाढलेला संचय आश्विन महिन्यांत देऊन टाकावा. दर्परहित, प्रातर, माध्यान्ह व अपराह्ण समयीं स्नान करणारा, प्रतिग्रह, याजन इत्यादिकां पासून पराङ्मुख झालेला, वेदाभ्यासा मध्यें रत झालेला, फल मूळादिकांचें भिक्षादान करणारा व सर्व प्राण्यांचें हित करण्यांत च निरत असें त्यानें व्हावें. वानप्रस्थाश्रम्यानें चांद्रायणादि व्रतांनीं काळ घालवावा अथवा कृच्छ्रांच्या योगानें निर्वाह करावा. आहार विहार यास लागणाऱ्या वेळे वाचून बाकीच्या वेळीं रात्रीं शुद्ध होऊन निजावें. कांहीं काळ फिरण्यांत व कांहीं काळ आसना वर बसण्यांत घालवावा किंवा योगाभ्यासानें दिवस व्यतीत करावा. आत्मसंसिद्धी करितां (ब्रह्मत्वप्राप्ती करितां) नाना प्रकारच्या उपनिषदांतील श्रुतींचा अभ्यास करावा असें मनूनें सांगितलें आहे. वानप्रस्थानें पीडा देणारा व सुख देणारा या दोघां विषयीं सम भाव धरून उदासीन असावें. ब्रह्मचारी–प्रकरणादिकांत सांगितलेल्या धर्मांतील स्नानाचमनादि जे धर्म वानप्रस्थाश्रमधर्मांच्या विरोधी नसतील ते वानप्रस्थाला हि अनुष्ठेय आहेत. या प्रमाणें धर्मांचें अनुष्ठान करणारा ब्राह्मण ब्रह्मलोकीं पूज्य होतो.

## संन्यासाश्रम

तीव्र तपाच्या योगानें शरीर शुष्क होऊन विषय परिपाक होई तों व

पुनः मदाचा उद्भव होण्याची शंका हि येणार नाहीं, असें होई तों वनवास करून त्या नंतर मन मोक्षा मध्यें लावावें. ब्रह्मचर्य, गृहस्थ व वानप्रस्थ या तीन आश्रमा नंतर संन्यास आश्रम घेण्याचा अधिकार प्राप्त होतो असा बरीक नियम नाहीं. ब्रह्मचर्याश्रमी माणसास संन्यास आश्रम घेण्याचा अधिकार आहे. केवळ ब्राह्मणाला च संन्यासाश्रम घेण्याचा अधिकार आहे. सर्व द्विजांना संन्यास आश्रम घेण्याचा अधिकार आहे अशीं हि कांहीं वचनें आहेत. संन्यास आश्रमास अधिकारी कोण हें दर्शविल्या नंतर संन्याशाचे धर्म कोणते तें थोडक्यात सांगतों. प्रिय व अप्रिय करणाऱ्या सर्व भूतां विषयीं उदासीन, शांत (बाह्य व आंतर इंद्रियांस अक्षुब्ध ठेवणारा) त्रिदण्डी ह्मणजे तीन वेळूचे दंड हातांत घेणारा व ब्रह्मविद्यापरायण हे गुण संन्याशाच्या ठिकाणीं अवश्य असावे. अहंमताभिमान व त्या मुळें हाणारें लौकिक कर्म व वैदिक नित्य काम्यादि कर्म यांचा संन्याशानें त्याग करावा. भिक्षा मिळविण्या करितां गांवांत शिरावें, सुख निवासा करितां नव्हे. वर्षा समयीं मात्र गांवांत निवास केल्यास दोष नाहीं. वाक् ,नेत्र इत्यादि इंद्रियांचें चापल्य सोडून भिक्षाटन करावें. यतीचीं पात्रें मातीचीं, वेळूचीं, लांकडी किंवा भोपळ्याचीं केलेलीं असावींत. चक्षुरादि इंद्रिय समूहास रूपादि विषया पासून चांगल्या रीतीनें निरुद्ध करून ईर्ष्या, असूया इत्यादिकांचा हि त्याग करून, भूतांस अपकाराच्या योगानें भयभीत न करितां शुद्ध चित्त होऊन अद्वैत साक्षात्कारानें संन्यासी अमृती ह्मणजे मुक्त होतो. विषयाभिलाष व द्वेष यांच्या योगानें उत्पन्न होणाऱ्या दोषांनीं ज्याचा आशय मलिन झाला आहे त्याच्या अंतःकरणाची शुद्धि प्राणायामाच्या योगानें करावी. त्यांच्या योगानें होणारी शुद्धि आत्माद्वैतसाक्षात्काररूप ज्ञानाच्या उत्पत्तीचें निमित्त आहे आणि असें झालें असतां विषयासक्ति व तिच्या मुळें उद्भवलेले दोष यांचा क्षय होऊन यति आत्मध्यान, धारणा इत्यादिकां विषयीं स्वतंत्र होतो. यास्तव संन्याशानें हि शुद्धि विशेषें करून संपादन करावी. कारण ती मोक्षाचें मुख्य साधन आहे. सत्य ( यथार्थ प्रिय वचन ), परद्रव्याचा अपहार न करणें, अपकार करणारा वर हि कोप न करणें, लज्जा, आहारादिकांची शुद्धि, हिताहितविवेक, इष्ट वियोग व अनिष्ट प्राप्ति झाली असतां अतिशय चंचल होणाऱ्या चित्ताला पूर्वी प्रमाणें स्थिर करणें, मदाचा त्याग, अनिषिद्ध विषयाच्या ठायीं हि अत्यासक्त न होणें व आत्मज्ञान यांचें अनुष्ठान केलें असतां सर्व धर्मांचें अनुष्ठान केल्या सारखें होतें. सत्प्रतिग्रहादि न्यायानें ज्यानें धन संपादन केलें आहे, जो नित्य व नैमित्तिक श्राद्धानुष्ठाना

मध्यें अत्यंत आसक्त आहे तो गृहस्थ हि ज्या अर्थी मुक्तीला पात्र होतो त्या अर्थी ऐहिक संन्यासाचा स्वीकार करणें हें च एक मुक्तीचें साधन नाहीं.

आतां संस्कारविधि व व्रतचर्या या प्रकरणांत येथ पावेतों दर्शविलेल्या बाबीं खेरीज आणिक दुसऱ्या दोन बाबींचा समावेश होतो. त्यांचें आह्मी दिग्दर्शन करितों. या दोन बाबी म्हटल्या म्हणजे भक्षाभक्ष व द्रव्यशुद्धि निर्णय या होत.

**भक्षाभक्ष निर्णयः**—कोणते पदार्थ खाण्यास योग्य व कोणते निषिद्ध या संबंधीं याज्ञवल्क्यस्मृति व मिताक्षरा टीका या ग्रंथां मध्यें विस्तृत विवेचन केलेलें आहे. विस्तार भयास्तव या विवेचनाचा सारांश हि प्रस्तुत स्थळीं देणें शक्य नाहीं. परंतु या विवेचनांतील खालील महत्त्वाचा मुद्दा या ठिकाणीं आम्ही नमूद कारितों. अन्न न मिळाल्या मुळें प्राण जाण्याचा प्रसंग आल्यास मांस भक्षण करावें. त्या च प्रमाणें एखाद्या रोगा वर मांस भक्षण हें च औषध असल्यास मांस सेवन करण्यास हरकत नाहीं. देवादिकांच्या उद्देशा वाचून पशूंची हत्या करूं नये. या कारणा वाचून हत्या केल्यास हत्या करणारा व त्याचे साथीदार नरकास जातात.

**द्रव्यशुद्धि निर्णयः**—द्रव्यशुद्धि प्रकरणांतील महत्त्वाचा भाग आह्मी येथें नमूद करितों. देवकर्मांत व पितृकर्मांत नेहमीं धुतलेलें वस्त्र नेसावें. अति मुल्यवान् लोकरीचीं वस्त्रें वायु, अग्नी, सूर्यकिरण व चंद्रकिरण यांच्या योगानें शुद्ध होतात. दुसऱ्याची शय्या, आसन, वस्त्र इत्यादि वस्तु अशुद्ध समजाव्या. रोग्याच्या वस्त्रादि वस्तूंशीं निरोग्यानें संबंध ठेवूं नये. जल, माती, रिठे, बेलफळ तांदुळ, सरशी इत्यादिकांच्या कल्क, क्षार, गोमुत्र, गोमय इत्यादि द्रव्यें सर्व पदार्थांस कमी अधिक प्रमाणानें शुद्ध करणारीं आहेत.

**महाराष्ट्रधर्मः**—संस्कारविधी व व्रतचर्या या प्रकरणांत समाविष्ट होणाऱ्या बाबींचें याज्ञवल्क्यस्मृति अन्वयें आह्मीं वरील प्रमाणें स्थूल दिग्दर्शन केलें आहे. आतां महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या एका ज्ञातीच्या विशिष्ट धर्माचे आह्मी दिग्दर्शन करितों. महाराष्ट्रांतील सुतार ज्ञातींत स्वजातींतील स्त्रीशीं शस्त्रपद्धतीनें विवाह करण्याचा रिवाज असे. अशा प्रकारच्या विवाहा पासून उत्पन्न झालेल्या संततीची गोत पत्करून त्या संततीस जातींत सामिल करून घेत असत. अशा प्रकारच्या संततीस जातींत सामिल करून घेतल्या नंतर त्याच्या शास्त्रोक्त विवाहीत स्त्री पासून झालेल्या

संतती प्रमाणें च या संततीचा दर्जा समजला जात असे [ वाड भाग २ बाळाजी बाजीराव भाग २ पान २०० इ.स. १७५५-५६ ]. शरीर संबंध व अन्न व्यवहार ज्या ज्ञातींचा परस्पराशीं होत नाहीं अशा ज्ञातीं पैकीं स्त्री पुरुषांचा लग्न संबंध झाल्यास तो धर्मा विरुद्ध ठरवून रद्द करण्यांत येत असे. लाळे या नांवाची खानदेशांत एक ज्ञात आहे. लाळे व यजुर्वेदी ब्राह्मण यांचा शरीर संबंध व अन्न व्यवहार होत नसतां लाळ्यानीं आपली जात छपवून यजुर्वेदी ब्राह्मणांच्या मुलां बरोबर आपल्या मुलींचीं लग्नें केलीं. पुढें ही गोष्ट समजल्या वर लाळ्या पासून गुन्हेगारी घेण्यांत आली व त्यांस अटकेंत ठेवण्यांत आले. त्या च प्रमाणे यजुर्वेदी ब्राह्मणा पासून राजदंड घेऊन धर्मशास्त्रमतें प्रायश्चित्त देऊन त्यांना शुद्ध करून घेण्यांत आलें. लाळ्याच्या मुली लाळ्या पाशीं राहिल्या. आतां दर्शविलेल्या स्वरूपाचे लग्न संबध झाल्यास त्याचे परिणाम कोणत्या प्रकारचे होत असत हे या उदाहरणा वरून स्पष्ट होत आहे. याज्ञवल्क्यस्मृतींत विवाहा संबंधीं जो नियम सांगितला आहे त्या नियमा प्रमाणें स्वजातींतील आणि भिन्न गोत्रातील कन्येशीं विवाह करावा एवढा च निर्बंध आहे. परंतु महाराष्ट्रीय समाजातील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या प्रमुख जातींच्या प्रांत भेदा मुळें अनेक पोट जाती झाल्या आहेत. या मुळें विवाहाच्या बाबतींत याज्ञवल्क्यस्मृतींतील वरील निर्बंध अकुंचित होत जाऊन एका पोट जातींतील स्त्रीचा अगर पुरुषाचा दुसऱ्या पोट जातींतील पुरुषाशीं अगर स्त्रीशीं शरीर संबंध होणें बंद पडलें. ब्राह्मण ज्ञाती पैकीं देशस्थ, कोकणस्थ, कऱ्हाडे, देवरूखे इत्यादि पोट ज्ञातींतील स्त्री पुरुषांचे विवाह संबध धर्मशास्त्रा विरुद्ध नसून रूढीस संमत नसल्यानें होत नाहींत. नाना साहेब पेशव्यांनीं पैठण येथील ऋग्वेदी देशस्थ घराण्यांतील मुलीशीं विवाह केल्याचें सुप्रसिद्ध आहे. धर्मशास्त्र दृष्ट्या जें आचरण करण्यास प्रत्यवाय नाहीं तें स्वत: करून रूढीचें जूं झुगारून देण्यास्तव वरील प्रकारचा विवाह संबंध नाना साहेब पेशव्यांनीं केला असला पाहिजे हें उघड आहे.

## ( २ )
## राजधर्म व प्रजाधर्म

**राजाच्या ठिकाणीं अवश्य असणारे गुण:**-राजानें महोत्साह असावें. पुष्कळ द्रव्य देण्या कडे त्याचें लक्ष असाव. दुसऱ्यानें केलेला उपकार व अप-

कार राजानें विसरूं नये. तप, ज्ञान इत्यादिकांच्या योगानें जे वृद्ध असतील त्यांची त्यानें सेवा करावी व त्यानें विनयसंपन्न व सत्वसंपन्न असावें. संपन्न स्थितींत हर्ष व विपन्न स्थितींत विषाद न मानणारा पुरुष सत्वसंपन्न असतो. त्या च प्रमाणें माता व पिता या दोन्ही पक्षी कुलीन, सत्य भाषण करणारा, बाह्य व अभ्यंतर शौच युक्त, अवश्य कर्तव्य कर्मांच्या आरंभास व आरंभिलेल्या कर्मांच्या समाप्तीस उशीर न लावणारा, समजलेल्या गोष्टीस न विसरणारा, असद्गुणांचा द्वेष करणारा, पर दोषांचे कीर्तन न करणारा, वर्णाश्रमधर्मयुक्त, व्यसनहीन, गंभीर, अर्थ जाणण्यास समर्थ, शूर, ( निर्भय ) गुप्त अर्थ गुप्त कसा ठेवावा हें जाणणारा, आपल्या प्रभु–अमात्यादि सात अंगांत कांहीं न्यूनता असल्यास ती प्रकट होऊं न देणारा आणि आत्मविद्या, अर्थशास्त्र, कृषि, वाणिज्य, पशुपालन इत्यादि वार्ता व व्याकरणादि अंगें, स्मृत्या, पुराणें, मीमांसा इत्यादिकां सह वेदविद्या प्रवीण असा राजा असावा.

मंत्रीः—मोठ्या हर्षविषाद प्रसंगीं हि हर्षादि न मानणारे व शुद्ध चित्त असे सात किंवा आठ मंत्री राजानें नेमावे. संधिविग्रहाचा विचार राजानें मंत्र्याच्या समवेत करावा.

पुरोहितः—ग्रहदशा, उत्पात इत्यादिकांस व त्यांच्या शांतीस जाणणारा, शास्त्रोक्त विद्या, कुल, अनुष्ठान इत्यादिकांनीं समृद्ध आणि अर्थशास्त्रांत व शांतिक पौष्टिक कर्मांत कुशल असा पुरोहित राजानें करावा.

ऋत्विजः—अग्निहोत्रादि श्रौत व उपासनादि कर्मांचें स्मार्त अनुष्ठान सिद्ध व्हावे यास्तव राजानें ऋत्विज करावे.

यज्ञः—राजसूयादि पुष्कळ दक्षिणायुक्त यज्ञ राजानें यथाशास्त्र करावेत. त्या च प्रमाणें भूमि, द्रव्य इत्यादिकांचीं दानें ब्राह्मणास द्यावींत.

दुर्गः—राजानें स्वसंरक्षणार्थ दुर्ग करून त्यांत रहावें.

अधिकारीः—धर्म, अर्थ, काम इत्यादि कृत्यांत दुसरा व्यापार न करणारे, त्या त्या व्यापारांत चतुर, चार प्रकारच्या कपटांनीं रहित, सुवर्णादिकांचीं उत्पत्तिस्थानें व दानस्थानें यांत आळस न करणारे आणि प्राज्ञत्वादि गुणयुक्त असे राजानें योग्य अधिकारी नेमावे. धर्मकृत्यात धार्मिकांस, अर्थकृत्यांत पंडितांस, स्त्रियांच्या अंतःपुरांत नपुंसकांस व नीच कृत्यांत नीचांस राजानें अधिकारी ह्मणून योजावें.

**प्रजापालन**:—न्यायानें व शास्त्रोक्त मार्गानें प्रजेचें परिपालन पित्या प्रमाणें राजानें करावें. ज्ञाना पेक्षां प्रजापालन अधिक फलदायक आहे. प्रजेंतील लोकांच्या पुण्याचा सहावा भाग राजास प्रजेचें न्यायानें व शास्त्रोक्त मार्गानें पालन केल्यास मिळतो. विद्वान् श्रोत्रियास दान, मान व सत्कार यांच्या योगानें प्रसन्न करून राजानें आपल्या राष्ट्रांत सदा ठेऊन घ्यावें. जो राजा आपल्या राष्ट्रांतून अन्यायानें द्रव्य घेऊन आपला कोश [ खजीना ] वाढवितो तो थोड्या च कालांत लक्ष्मीहीन होऊन आपल्या बांधवां सह नाश पावतो. जेव्हां दुसरा देश आपल्या वश होईल तेव्हां आपल्या देशाचा आचार इत्यादि तेथें सुरू करून आचारादि संकर करूं नये. तर ज्या देशांत जो आचार, कुलमर्यादा व व्यवहार असेल तो शास्त्रा विरुद्ध नसल्यास तसा च पाळावा. पण तो देश आपल्या वश होण्या पूर्वी या आचारादिकांचें पालन केलें च पाहिजे असें नाहीं कारण शत्रूच्या राष्ट्रास पीडा द्यावी, त्याचें अन्न, उदक इत्यादिकांस दूषित करावें असें सांगितलें आहे.

**युद्धप्रसंगीं राजाचें कर्तव्य**:–आपली चतुरंग सेना पराभूत झाली असतां हि शत्रूच्या सैन्या वर चालून जावें.

**शरणागताचें रक्षण**:–“ मी तुझा आहे ” असें म्हणणारा, नपूंसक, अयुधरहित, दुसऱ्याशीं लढण्यांत गुंतलेला, युद्धांतून परत फिरलेला व युद्ध पहात असणारा इत्यादिकांचा राजानें वध करूं नये. त्या च प्रमाणें सारथी, हात जोडून शरण आलेला, दूत किंवा ब्राह्मण आहे असें सांगणारा, पाणी पीत असलेला, कवचादि अंगांत घालीत असणारा, स्त्री व दूत हे अवध्य आहेत. राजास राजा वाचून दुसरें कोणी मारूं नये. सशस्त्र स्त्री अंगा वर चालून आली असतां तीचा वध करणे धर्म्य आहे.

**पर राज्याशीं व्यवहार करण्याची पद्धत**:–साम, दाम, भेद व दंड इत्यादि उपायांची राजानें शत्रु वश करण्या करितां योजना करावी.

**दंडाची योजना**:–शठ, धूर्त, पर स्त्री व पर धन यांचा अपहार करणारे, हिंसक इत्यादि लोकांच्या ठायीं दंडाची योजना करावी. माता, पिता, स्नातक, संन्यासी, पुरोहित, वानप्रस्थ व वेदाध्ययन; शील; शौच व आचार यांनीं युक्त असलेले हे दंडास पात्र नाहींत. व्यवहार दर्शना वाचून दंड करितां येत नाहीं. यास्तव राजानें व्यवहार दर्शन ( न्याय ) स्वतः करावा. राजानें सभासदा समवेत न्याय करावा. ब्राह्मणादिकांचीं कुलें, मूर्धावसिक्तादि जाति, तेली,

तांबोळी, इत्यादिकांच्या श्रेणी, एक च काम करणाऱ्या अनेक जातीच्या लोकाचे गण व लोहार, सुतार इत्यादि कारागीर हे आपल्या धर्मा पासून च्युत झाले असता राजानें अपराधानुरूप दंड करून त्यास स्व मार्गा मध्यें स्थापावें.

**दंडाचे प्रकार:**—दंड चार प्रकारचे आहेत. " तुला धिक्कार असो " असें ह्मणणें हा धिग्दंड, कठोर वचनें बोलणें व शिव्या देणें हा वाग्दंड, धन घेणें हा धनदंड, अडकवून ठेवणें, मारणे, फांशी देणें हे वधदंड होत. राजानें अपराधाच्या मानानें दंडाची योजना करावी.

**व्यवहारदर्शन:**–प्रजापालन योग्य प्रकारें होण्या करितां दुष्टांचा निग्रह करणें हें राजाचें कर्तव्य आहे. हें कर्तव्य योग्य प्रकारें पार पाडण्या करितां राजानें धर्मशास्त्राच्या अनुरोधानें व्यवहारदर्शन प्रत्यहीं करावें. दुसऱ्याच्या विरोधानें आपल्या संबंधीं राजसभेंत कांहीं सांगणें याला व्यवहार ह्मणतात. वेद, व्याकरण, धर्मशास्त्र इत्यादिकास जाणणाऱ्या ब्राह्मणां सह धर्मशास्त्राच्या अनुरोधानें राजानें व्यवहार पहावा. देशादि समयधर्मांचा धर्मशास्त्रांत अंतर्भाव होतो. सभासद तीन असावेत. वेतनादि देऊन नेमलेले सभासद यांस नियुक्त ह्मणतात. वेतनादि देऊन न नेमलेले ते अनियुक्त.

दुसऱ्या कामांत गर्क झालेल्या राजानें ब्राह्मणाची व्यवहारदर्शनांत योजना करावी. दान्त, कुलीन, मध्यस्त ( अपक्षपाती ), कोणास उद्वेग न करणारा, स्थिर, परलोकाची कीर्ति बाळगणारा, धार्मिष्ट, उद्युक्त व क्रोधरहित अशा ब्राह्मणांची व्यवहार दर्शनांत योजना करावी. व्यवहार दर्शना करितां नेमलेल्या वरील प्रकारच्या ब्राह्मणांचा जो मुख्य त्यास प्राड्विवाक असें ह्मणतात.

व्यवहार आठरा प्रकारचे मनुस्मृतींत सांगितले आहेत. ऋणदान ( कर्ज घेणें ), निक्षेप ( ठेव ), जो स्वामी नव्हे अशा पुरुषानें वस्तूचा विक्रय करणें, संभूय समुत्थान ( अनेकांनीं मिळून केलेला व्यापार ), दिलेलें धन क्रोधानें किंवा अपात्र बुद्धीनें परत घेणें, सेवकांचें वेतन न देणें, केलेल्या संकेताचे उल्लंघन करणें, विकत दिलेली अथवा घेतलेली वस्तु पसंत न पडल्या मुळें देणारास अथवा घेणारास पश्चात्ताप होऊन त्या मुळें उत्पन्न होणारा वाद, स्वामी व पशुपाल यांच्या मधील पशू विषयींचा वाद, ग्रामादि सीमांचा वाद, शिव्यागाळी हें वाक्पारुष्य, ताडनादि

दंडपारुष्य, स्तेय ( चोरी ), साहस ( बलात्कारानें धनादि ग्रहण करणें ), स्त्री व पुरुष यांच्या संगमा पासून होणारा वाद, स्त्रिया व पुरुष यांची धर्मा मध्यें व्यवस्था, पितृ संबंधीं धनाचा विभाग, द्यूतादि क्रीडांचे धर्म निश्चित करणें व पक्षी बकरे इत्यादि प्राण्यांची लढाई असे व्यवहाराचे अठरा प्रकार आहेत. निरनिराळ्या साध्या मुळें या अठरा प्रकारचे अनेक भेद झाले आहेत. नारद स्मृतींत एकशें आठ प्रकारचे व्यवहार नमूद आहेत. व्यवहार दर्शना विषयींचे अनेक नियम सांगितले आहेत त्यांचें साग्र विवेचन केलें असतां विस्तार फार होईल सबब आह्मी या भानगडींत पडत नाहीं. या संबंधीं साग्र माहिती जिज्ञासू वाचकांनीं स्मृतिग्रंथा वरून करून घ्यावी.

साहस, स्तेय, पारुष्य, दुभती गाय, अभिशाप ( पातकाचा आरोप ), अत्यय, कुलस्त्रीचें आचरण व दासीची मालकी इत्यादि विषयींच्या वादांत आरोपी कडून तत्काल उत्तर घ्यावें. असल्या वादांत उत्तरास कालावधि लावूं नये.

" राजानें धर्मशास्त्राच्या अनुरोधानें व्यवहार पहावा " असें मागें सांगितलें असल्या मुळें औशनसादिकांच्या अर्थशास्त्राचें निरसन होतें व राजनीति लक्षण अर्थशास्त्राचा अंतर्भाव धर्मशास्त्रांत च होतो. असल्या धर्मशास्त्राच्या स्मृतिवचनांचा व अर्थशास्त्राच्या वचनांचा परस्पर विरोध आला असतां अर्थशास्त्राहून धर्मशास्त्र बलवान् आहे व धर्मशास्त्राच्या वचनास अनुसरून व्यवहाराचा निर्णय करावा.

**व्यवहार निर्णयाचीं साधनें:**—ज्याच्या योगानें विषयाचें ज्ञान होतें तें प्रमाण. प्रमाण मानुष व दैव अशा दोन प्रकारचें आहे. मानुष प्रमाणाचे लिखित, भुक्ति व साक्षी असे तीन पोटभेद आहेत. लिखित प्रमाण शासन व चीरक अशा दोन प्रकारचे आहे. भुक्ति ह्मणजे उपभोग. वरील लिखितादि तीन प्रमाणांच्या अभावीं दिव्य प्रमाणाचा आश्रय करावा व त्याच्या सहाय्यानें व्यवहाराचा निर्णय करावा.

**साक्षी:**—साक्षीदार कोणत्या व्यवहारांत किती असावेत, कोणत्या जातीचे असावेत इत्यादि संबंधीं साग्र व विस्तृत चर्चा मिताक्षरा टीकेंत केली आहे. विस्तारभयास्तव तिच्या स्थूल स्वरूपाचें हि दिग्दर्शन या ठिकाणीं करणें शक्य नाहीं. आपल्या समाजाची जी विशिष्ट रचना आहे ती लक्षांत घेतां या संबंधाचे स्मृतींतील नियम अत्यंत उत्कृष्ट आहेत एवढें च आह्मी या ठिकाणीं नमूद करितों.

भुक्तिः—ज्याचा एखाद्या भूमीशीं अथवा धनाशीं संबंध नाहीं असा कोणी दुसरा च एखाद्या भूमीच्या अथवा धनाच्या मालका समक्ष तिचा उपभोग घेत असतां हि मालकानें ही माझी भूमि आहे तूं तिचा उपभोग घेऊं नकोस असें ह्मणून त्याचा निषेध न केल्यास वीस वर्षांच्या अव्याहत उपभोगानें मालकीची होते. हत्ती, घोडा इत्यादि धनाच्या मालकीची तर दुसऱ्याच्या त्या धनाची दहा वर्षांच्या उपभोगानें च हानी होते. वीस वर्षें नुसता उपभोग घेतल्या मुळें एखाद्या वस्तू वर परक्याचें स्वत्व येणें न्याय्य नव्हे कारण उपभोग हें स्वत्वाचें प्रमाण नव्हे.

लेख्यः—शासन व जानपद असे लेख्याचे दोन प्रकार आहेत. शासन ह्मणजे राजानें ताम्रादि पत्रा वर करून दिलेला लेख. जानपद स्वहस्तकृत व अन्य हस्तकृत असें दोन प्रकारचें असतें. स्वहस्तकृत साक्षीरहित असलें तरी चालतें, अन्यकृत ससाक्षि च असावें लागतें.

दिव्यः[1]—मानुषी प्रमाणाच्या अभावीं दैवी प्रमाणानें व्यवहाराचा

---

1 मराठ्यांच्या इतिहासाच्या साधन ग्रंथांत निरनिराळ्या प्रकारच्या दिव्यांच्या आश्रयानें कित्येक व्यवहारांचा निर्णय केल्याचीं अनेक उदाहरणें आढळतात. भारत इतिहास संशोधक मंडळाच्या शके १८३६, १८३७ व १८३८ या तीन सालच्या संमेलनवृत्तांत ' महाराष्ट्रांतील व्यवहार निर्णय पद्धति ' या मथळ्या खालीं जे आमचे लेख प्रसिद्ध झाले आहेत त्यांत दिव्या संबंधीं बरें च विस्तृत व तपशीलवार विवेचन आम्हीं केलेलें आहे.ज्यांना या विषया संबंधीं माहिती करून घेण्याची जिज्ञासा असेल त्यांनीं ते लेख अवश्य वाचावेत अशी आमची सूचना आहे. याज्ञवल्क्यस्मृतीच्या असाधारणमातृका प्रकरणाच्या खालीं दिलेल्या बावीसाव्या श्लोकांत दिव्याचा आश्रय केव्हां करावा हें सांगितलें आहे:—

प्रमाणं लिखितं भुक्तिः साक्षिणश्चेति कीर्तितम् ॥
एषामन्यतमाभावे दिव्यान्यतममुच्यते ॥ २२ ॥

अर्थः—'लेख,भोगवटा, साक्षी,या प्रमाणांच्या अभावीं दिव्याचा आश्रय करावा.' याज्ञवल्क्य स्मृतींतील हें तत्व महाराष्ट्रांतील सामान्य प्रतीच्या लोकांस पूर्णपणें विदित होतें असें त्या काळच्या एका निवड्यावरून सिद्ध होतें. महाराष्ट्रसरस्वतीमंदिर नांवच्या मासिकांत दुर्गादेवीच्या दुष्काळा नंतरचा पाटीलकी वतना बद्दलचा एक गोत निवाडा छापला आहे. तो निवाडा करणारे त्या गांवचे व आसपासच्या गांवचे पाटील होते. पाटीलकी बद्दल तक्रार करणाऱ्या इसमां पैकीं पाटी-

[ पुढें चालू ]

निर्णय करावा. तुला, अग्नि, जल, विष व कोश हे पाच दिव्याचे प्रकार आहेत. त्यांचें सविस्तर वर्णन विस्तार भयास्तव या ठिकाणीं करण्याचें भानगडींत आह्मी पडत नाहीं.

**ऋणादानादि व्यवहार स्थानें**:-या व्यवहार स्थानांचें नुसतें स्थूल दिग्दर्शन करावयाचें ह्मटले तरी विस्तार फार होईल सबब या प्रकरणा संबंधीं साग्र माहिती जिज्ञासु वाचकांनीं याज्ञवल्क्य स्मृति व मिताक्षरा टीका इत्यादि ग्रंथा वरून करून घ्यावी.

**दायविभागः**-स्वामीचा [ धनवानाचा ] संबंध या च एका निमित्तानें जें धन दुसऱ्याचें ' स्व ' होतें त्याला दाय ह्मणतात. तो दोन प्रकारचा आहे.एक अप्रतिबंधक व दुसरा सप्रतिबंधक. पित्याचें व पितामहाचें धन पुत्रत्व व पौत्रत्व या निमित्यानें पुत्रांचें व पौत्रांचें होतें यास अप्रतिबंध दाय समजतात. धनवानाला पुत्र नसल्या कारणानें त्याचें धन चुलत भ्राते यास प्राप्त होतें. यास्तव पुत्र असणें हा प्रतिबंध होय. यास्तव पुत्राच्या अभावीं पित्रव्यत्वानें अथवा मातृव्यत्वानें पित्रव्याचें अथवा भ्रात्याचें तें धन होणें याला सप्रतिबंध दाय ह्मणतात. अनेक प्रकारच्या धनाचा समुदाय एकत्र करून त्या वर स्वामित्व असणाऱ्या अनेक व्यक्तींना तें विभागून देणें याला दायविभाग ह्मणतात.

**दायविभाग कोणत्या वेळीं, कोणी व कसा करावा**:-जेव्हां पिता विभाग करण्याची इच्छा करीत असेल तेव्हां त्यानें पुत्रांना आपल्या इच्छे प्रमाणें विभाग देऊन आपल्या पासून दूर करावें. पित्याची संभोग इच्छा निवृत्त झाली आहे व मातेचा विटाळ गेला आहे अशा अवस्थेंत पित्याची इच्छा नसतां हि पुत्राच्या इच्छेने विभाग होऊं शकतो. मातेचें रज निवृत्त झालेलें नाहीं, पित्याची इच्छा हि नाहीं पण तो अधर्माचरण करणारा आहे अथवा

---

लकीचा खरा मालक कोण हें सांगणारे साक्षिदार असतां वाद्यापैकीं एक जणानें दिव्य करितो असें गोत सभेस सांगितले तेव्हां गोत सभासदांनीं " **दिवस असतां दीवा नाहीं गोही असतां रवा नाहीं** " असें धर्मशास्त्राचें तत्व असल्या मुळें दिव्य करण्या बद्दल त्यानें केलेलें मागणें मान्य करितां येत नाहीं असें सांगून पुराव्या वरून ज्याच्या मालकीची पाटिलकी असल्याचें शाबित झालें त्याच्या तर्फेचा गोत सभेनें निवाडा केला. याज्ञवल्क्य स्मृतींतील वर जें वचन दिलें आहे त्या वचनाचा अर्थ व्यक्त करणारे मराठी भाषेंतील हें सूत्र आहे हें उघड आहे.

दीर्घ रोगग्रस्त आहे अशा स्थितींत पुत्राच्या इच्छेनें दोन प्रकारचा विभाग होतो, एक सम व दुसरा विषम. पित्यानें स्वेच्छेनें सर्व पुत्रांस सारखा विभाग दिल्यास पुत्रा प्रमाणें च भार्यांना हि पुत्रा इतका च भाग द्यावा. स्त्रीधन दिले असल्यास अर्धांश द्यावा. माता व पिता यांच्या मरणा नंतर त्यांचें ऋण हें पुत्रांनीं सारखें वाटून घ्यावें व ते त्यानी द्यावें. आतां विभाग करण्यास अयोग्य असें कोणतें धन आहे तें आह्मी नमूद करितों. बापाच्या द्रव्याचा व्यय न करितां जें स्वत: संपादन केलेलें धन असेल, मित्रा पासून जें मिळालेलें असेल व विवाहा मुळें जें प्राप्त झालें असेल तें धन दायादांचें होत नाहीं. तसें च पितृक्रमानें प्राप्त झालेलें एखादें द्रव्य दुसऱ्यानें हरण केलेलें पण असामर्थ्या मुळें पित्रादिकानीं तें परत न मिळविलेलें पुत्रां पैकीं एखाद्याने इतरांच्या अनुज्ञेनें तें त्या अपहारका पासून परत मिळविलें तर तें त्यानें भ्रात्यास देऊं नये. पण तें च क्षेत्र असल्यास उद्धार करणारास त्या क्षेत्राचा चवथा भाग मिळतो, बाकीचें सर्वांनीं सारखे वाटून घ्यावें. त्या च प्रमाणें विद्येनें संपादन केलेलें धन हि दायदांस देऊं नये. तें द्रव्य मिळविणारानें च घ्यावें. परंतु पितृधनाचा व्यय करून विद्यादि संपादन केली असल्यास तें धन विभागास पात्र आहे. कोणी तरी एका भावानें अविभक्त भ्रात्यांच्या समायिक द्रव्यास शेती, व्यापार इत्यादि उपायांच्या योगानें वाढविलें असता वाटणीच्या वेळीं त्या द्रव्याचा सर्वांनीं सारखा च भाग घ्यावा. आतां पितामहाच्या द्रव्याची वाटणी कशी करावयाची हें दर्शवितों. पित्याच्या द्वारा पितामहाच्या द्रव्या वर नातवाचा हक्क प्राप्त होत असल्या कारणानें पितामहास जितके मुलगे असतील तितके त्याच्या धनाचे विभाग करून ते नातवास वाटून द्यावेत. आतां मुख्य व गौण पुत्र कोणते तें नमूद करतों. औरस, पुत्रिकासुत, क्षेत्रज, गूढज, कानीन, पौनर्भव, दत्तक, क्रित, स्वयंदत्त, कृत्रिम, सहोढ व अपविद्ध असे बारा प्रकारचे पुत्र आहेत. ह्या बारा पुत्रां पैकीं पूर्व पुत्राच्या अभावीं पत्नी, कन्या नंतर पिता, माता, भ्राता व त्याचे पुत्र, गोत्रज, बंधु, शिष्य आणि स्वाध्यायी हे क्रमाने मयत मनुष्याच्या धनाचे स्वामी होतात. वर दर्शविलेल्या बारा पुत्रां पैकीं औरस आणि दत्तक हे दोन च पुत्र मराठी राज्याच्या अमदानींत व प्रस्तुत काळीं वारस समजले जातात. दत्तक पुत्रा संबंधीं जरा अधिक खुलासा प्रस्तुत स्थळीं करणें जरूर आहे. पति कोठें प्रवासास गेला असतां त्याच्या आज्ञेने किंवा तो मरण पावला असतां माता किंवा पिता अगर दोघे हि जो पुत्र समान

जातीय पुरुषास देतात तो त्याचा दत्तक पुत्र होय. आपत्कालीं च पुत्र घ्यावा. आपत्ती नसल्यास आईबापांनीं आपला पुत्र कोणास देऊं नये व घेणारानें घेऊं नये.त्या च प्रमाणें वडील पुत्र दत्तक देऊ नये. ज्यास पुत्र घ्यावयाचा असेल त्यानें त्याच्या ज्ञातीच्या सर्व लोकांस बोलावून, राजास कळवून गृहा मध्यें भूः इत्यादि व्याहृतीनें होम करून सर्वांच्या समक्ष त्यानें ग्रहण करावें. दत्तका संबंधीं सर्वांत महत्वाचें तत्व लक्षांत ठेवावयाचें तें हें कीं, जो मुलगा दत्तक घ्यावयाचा त्याच्या आईचा कौमार्यावस्थेंत दत्तक घेणाराशीं धर्मशास्त्रान्वयें विवाह होण्यास प्रत्यवाय असता उपयो-गाचा नाहीं. अशा रीतीनें विवाह होण्यास प्रत्यवाय असल्यास तो मुलगा दत्तक घेण्यास अपात्र समजण्यांत येतो.

**स्त्रीधनाचें स्वरूप व वारसा:**—पिता, माता, पति व भ्राता यांनीं दिलेल्या व विवाह समयीं मातुलादिकांनीं दिलेल्या धनास स्त्रीधन म्हणतात. कन्या, कन्येची कन्या, पुत्र, पौत्र व पति हे क्रमानें स्त्रीधनाचे स्वामि होतात. जीवंत स्त्रीचें धन भर्त्ता वांचून दुसऱ्या कोणत्या हि दायादानें घेऊं नये' बांधवांनीं हें धन घेतल्यास त्यास राजाने दंड करावा. पति जीवंत असतां स्त्रीनें धारण केलेलें अलंकार वाटणीच्या वेळीं दायादांनीं वाटून घेऊं नये. घेतल्यास ते पतित होतात.

**महाराष्ट्रधर्म:**–राजधर्म व प्रजाधर्म यांत अंतर्भूत होणाऱ्या वर दर्शविलेल्या अनेक बाबीं पैकीं महाराष्ट्रांत निदर्शनास येणाऱ्या कांहीं विशिष्ट स्वरूपाच्या बाबींचें आम्ही आतां दिग्दर्शन करितों. शरणागताचें रक्षण करणें हा राजाचा धर्म असल्याचें मागें आम्हीं नमूद केलें आहे. स्वराज्याच्या काळांत लढाईत सांपडलेल्या शिपायांस अटकेत ठेवणें हें धर्मा विरुद्ध समजत असत असें इ. स. १७३४–३५ सालांतील ( वाड भाग १ पान १२३ ) शाहू छत्रपति यांनीं रघोजी भोसले यास लिहिलेल्या पत्रांतील खालील उल्लेखा वरून दिसतें. " मनेखान व मनसूरखान दिमत राजश्री कान्होजी भोसले हे लढाईत सांपडले त्यास अटकेंत ठेविले आहेत म्हणून हुजूर विदित झाले. ऐशास लढाईत सांपडले, त्यास कैदेंत ठेवणें हें राज्यांत कोठेहि झाले नाहीं. हल्लीं उभयतास हुजुर पाठविणें." छत्रपतींच्या अंकित असलेल्या सरदारांचा परस्पराशीं युद्धप्रसंग होऊन त्यांत एका सरदाराच्या सैन्यांतील शिपायी दुसऱ्या सरदाराच्या हातीं सापडल्यास हा नियम लागू करण्यांत येत असावा असे या लेखा वरून दिसतें. स्वराज्याच्या

काळांत निझाम, हैदर, दिल्लीचा बादशहा, इंग्रज, फ्रेंच, पोर्तुगीज इत्यादिकां बरोबर मराठ्यांच्या झालेल्या अनेक युद्ध प्रसंगांत परस्परांचे सैन्यांतील शिपायी परस्परांच्या हातात सापडत असले पाहिजेत अशा युद्धांत पाडाव केलेल्या सैन्यांतील शिपायांस अटकेंत ठेवणें धर्मा विरुद्ध असल्याची त्या काळीं भरतखंडांत सर्व साधारण समजून अस्तित्वांत असावी असें दिसत नाहीं. कदाचित् मराठ्यांच्या हातीं त्याच्या शत्रूंच्या सैन्यांतील शिपायी लढाईच्या प्रसंगीं सांपडल्यास त्यांना कैदेंत न ठेवतां सोडून देण्याची मराठ्यांची पद्धत अस्तित्त्वांत असण्याचा संभव आहे.

व्यवहार धर्म प्रकरणा पैकीं याज्ञवल्क्य स्मृतींत सांगितलेल्या दिव्यांच्या निरानिराळ्या प्रकारांचा मार्गे आह्मीं उल्लेख केला आहे. स्मृतिग्रंथांत न आढळणारा असा एक दिव्याचा प्रकार त्या काळीं अस्तित्त्वांत होता तो आह्मी येथें नमूद करितों. या दिव्याचें वर्णन [ वाड भाग १ शाहु छत्रपति पान १३२ वर ] खालील प्रमाणें केलें आहे. " त्यावरून पंचाइत गोतांनीं रायभान इंगळा याचे डोईवर गाईचे कातडे व गळा तुळशिच्या माळा व पांढरिचा जोडा बाधोन तुह्मी तीहीं गांवची शीव असेल ती चालवून घेणें ह्मणोन सांगितलें. त्या प्रमाणें रायभान मान्य होऊन कदीम शीव होती त्या प्रमाणें चालला. पाठिमागोन पंचाइत गोत वतनदार यांनीं शिवेवर धोंडे ठेविले. दस रात्र पंच रात्रीचा वायदा रायभानास दिल्हा. या प्रमाणें क्रियेस खरा झाला. क्रियेसमयीं गाईचें कातडें रायभानानें डोईवर घेतलें होतें. त्यास शुद्ध करावें त्याजबद्दल क्रियेचे दिवशीं पायाघ.ट व बालाघाटाचें गोत वतनदार होते. ते ब्राह्मण मिळोन रायभानास शुद्ध करून गोतानें आपलें साक्षी पत्र करून दिल्हें. " स्मृतींत न आढळणारा हा दिव्याचा प्रकार परंपरागता चालत आलेल्या रूढी पैकीं असला पाहिजे असें दिसतें.

राजधर्म प्रकरणा पैकीं व्यवहार धर्मांत अंतर्भूत होणाऱ्या दत्तक पुत्र संबंधाच्या कांहीं विशिष्ट धर्मांचा आह्मी आतां उल्लेख करितों. द्विज या संज्ञेंत समाविष्ट होणाऱ्या वर्णांच्या लोकांत धर्मा प्रमाण मुलीचा मुलगा, बहिणीचा मुलगा दत्तक घेतां येत नाहीं. हा निर्बंध स्वराज्याच्या काळांत व आज हि अस्तित्वांत आहे. स्वराज्याच्या काळांत एकुलता एक मुलगा अगर पर गोत्रांतील मुलगा धर्मा प्रमाणें दत्तक घेतां येत नसे. अशा प्रकारचा दत्तविधानें धर्मास संमत नसल्या मुळें जरी ती धर्म विरुद्ध असली तथापि विशिष्ट प्रकारच्या परि-

स्थितींत राजाच्या परवानगीनें ती धर्म्य ठरविण्यांत येत असा. " पेशवे दप्तरांतील सनदापत्रांतील माहिती " या ग्रंथांतील २६६ ते २६९ पाना वर मुलीचा मुलगा, बहिणीचा मुलगा, पर गोत्रांतील मुलगा, यांचीं दत्तविधनें धर्म्य ठरविण्यांत आल्याचीं उदाहारणें आहेत. " झालेले दत्तविधान फिरत नाहीं " या तत्वास अनुसरून असल्या प्रकारचीं दत्तविधानें सरकारांत दत्तक घेणाऱ्या कडून नजर घेऊन धर्म्य ठरविण्यांत येत असत.

( ३ )

## विवाहित स्त्री पुरुषांचे परस्परासंबंधीं धर्म

**स्त्री धर्मः**-गृहकृत्यात स्त्रीनें दक्ष असावें. फार खर्च करण्याचें शील ठेऊं नये. पतीच्या मरणा नंतर स्त्रीनें सती जावें अथवा यावज्जीव ब्रह्मचर्यव्रतानें रहावें. मनुस्मृतीच्या नवव्या अध्यायाच्या शंभराव्या श्लोकांत " भार्या व पति यांच्या मरणा पर्यंत धर्म, अर्थ व काम यां मध्यें परस्पर व्यभिचार न होणें हा च संक्षेपतः स्त्रीपुरुषांचा श्रेष्ठ धर्म होय " असें सांगितलें आहे. सवर्ण स्त्री असतांना असवर्ण स्त्रीस धर्मकार्यात योजूं नये. सवर्ण अनेक स्त्रिया असल्यास ज्येष्ठ स्त्री वाचून कोणतें हि धर्मकृत्य करू नये.

**पुरुषांचें स्त्रिया संबंधीं कर्तव्यः**-पति, भ्राता, पिता, आप्त, सासू, श्वशुर, दीर व इतर बंधु यांनीं यथाशक्ति भूषणें, वस्त्रें व अन्न यांच्या योगानें स्त्रियांचा सत्कार करावा. स्त्रिया प्रसन्न झाल्या असतां धर्म, अर्थ व काम यांची उत्तम प्रकारें वृद्धि होते.

**विवाहित स्त्रीचा त्यागः**—व्यभिचारी स्त्रीचे दानधर्म इत्यादि संबंधीं सर्व अधिकार काढून घ्यावे. तिचे प्राण राहतील इतकें च अन्न तिजला द्यावें. शूद्रा पासून स्त्रीस गर्भ राहिल्यास तिचा त्याग करावा. त्या च प्रमाणें गर्भाचा वध, ब्रह्महत्यादि महापातक, शिष्यसमागम या पातका बद्दल स्त्रीचा त्याग करावा. सुरापान करणारी, अप्रिय भाषण करणारी अशी स्त्री असल्यास दुसरी स्त्री करावी. हीं कारणें नसतां दुसऱ्या स्त्री बरोबर विवाह केल्यास तो स्त्रीचा अपमान होय. वर दर्शविलेल्या कारणा करितां दुसरी स्त्री केली तर पहिल्या स्त्रीचें पोषण करावें. तिचें पोषण न केल्यास पाप लागतें. कारणा वांचून स्त्रीचा त्याग केल्यास अन्नवस्त्रादिकांच्या योगानें नवऱ्यानें तिचें पोषण करावें. दुर्भिक्ष झालें असतां, कुटुंब पोषणार्थ, अवश्यकर्तव्य धर्म कार्यांत, व्याधी उत्पन्न झाली असतां व कैदेंत जाण्याचा प्रसंग टाळण्या करितां भर्त्यानें स्त्रीचें धन घेतल्यास तें त्यानें त्याच्या स्त्रीस परत देण्याचें कारण नाहीं.

विवाहित स्त्री पुरुषांच्या परस्परा संबंधीं धर्मांचें वरील प्रमाणें थोड-क्यांत दिग्दर्शन केलें आहे.

## (४)

## संकर जातीच्या लोकांचे धर्म

महाराष्ट्रीय समाजातील ब्राह्मणादि प्रमुख वर्ण व इतर जाति यांच्या धर्मांचें मागें जें दिग्दर्शन केलें आहे त्यांत निरनिराळ्या संकर जातींची उत्पत्ति व त्या जातींच्या लोकांचे जीवनव्यवसाय विषयक धर्म आह्मीं नमूद केले आहेत. अनुलोम संबंधा पासून उत्पन्न झालेल्या प्रजांचे उपनयनादि संस्कार करण्यास स्मृति धर्मांची आज्ञा असल्याचें त्या च ठिकाणीं आह्मीं दर्शाविलें आहे. गाय, ब्राह्मण, स्त्री, बालक यांतील कोणाचें हि रक्षण करण्या करितां, धनाची इच्छा न धरितां प्राणत्याग करणें हें प्रतिलोमज लोकांच्या स्वर्गप्राप्तीचें कारण असल्याचें मनुस्मृती मध्यें सांगितलें आहे. कोणाची हिंसा न करणें, यथार्थ भाषण करणें, अन्यायानें परधन न घेणें, मृत्तिका व जल यांच्या योगानें शरीरास शुद्ध करणें व इंद्रियांचा संयम करणें हे चारी वर्णांच्या जातीच्या लोकांचे जसे धर्म आहेत तसें च संकर जातीच्या लोकांचे हि हे धर्म आहेत.

## (५)

## आपद्धर्म

ब्राह्मणादि प्रमुख वर्णांच्या लोकांच्या धर्मांचें दिग्दर्शन मागें आह्मीं केलें आहे. ब्राह्मणाचें स्वकर्मा वर कुटुंब पोषण होत नसेल तर नगररक्षण इत्यादि क्षत्रियांस विहित असलेलें कर्म करून आपला निर्वाह करावा. परंतु ह्या हि कर्मा वर त्याची वृत्ति चालत नसेल तर ब्राह्मणानें शेती व पशुरक्षण हीं वैश्याचीं कर्मे करून निर्वाह करावा. सर्व रसयुक्त पदार्थ, पक्क अन्न, तिल, पाषाण, लवण, पशु व मनुष्यें यांस ब्राह्मण व क्षत्रिय यांनीं विकूं नये. त्या च प्रमाणें वस्त्रें, फळें मुळें, औषधीं, पशु, पक्षी, प्राणी, विकूं नयेत. आपत्तींत पडलेल्या क्षत्रियानें रसादि पदार्थांचा विक्रय करून वैश्य वृत्तीनें रहावें. पण ब्राह्मणाच्या वृत्तीचा त्यानें कधीं हि आश्रय करूं नये. आपल्या वृत्ती वर निर्वाह करण्यास असमर्थ झालेल्या वैश्यानें द्विजांची शुश्रूषा करीत शूद्रा प्रमाणें यथाशक्ति निर्वाह चाल-वावा. द्विजांची शुश्रूषा करण्यास असमर्थ झालेल्या व त्या मुळें ज्याचे पुत्र, स्त्री इत्यादि कुटुंब उपाशी मरत आहे अशा शूद्रानें कारुक वृत्ति करून निर्वाह

करावा. आपत्तींत पडलेल्या ब्राह्मणानें अति निंद्य लोकां पासून हि प्रतिग्रह घ्यावा. आपत्कालीं निंद्य लोकांस शिकविल्या मुळें, त्याच्या कडून यजन करविल्या मुळें व प्रतिग्रह घेतल्या मुळें ब्राह्मणांस कांहीं दोष लागत नाहीं. वैद्यविद्या, तर्कविद्या इत्यादि वेदा शिवाय इतर विद्या, शिल्प, दास होऊन वेतन घेणें, सवा, पशूंचें रक्षण करणें, व्यापार, स्वत: केलेली शेती, संतोष, भिक्षासमूह व व्याजा वर पैसे लावणें अशा दहा उपायांनीं ब्राह्मणांनीं आपत्कालीं आपला निर्वाह करावा.

## ( ६ )

## प्रायश्चित धर्म

प्रायश्चित्त धर्माचें प्रयोजन व महत्त्व लक्षांत येण्या करितां कर्मविपाक ह्मणजे काय हें प्रथम विशद करणें जरूर आहे. पंचमहापातकादिकांच्या ( यांचें वर्णन पुढें येणार आहे ) योगानें मानवी प्राणि घोर नरकास प्राप्त होऊन त्याचे कर्म फलोपभोगानें क्षीण झाल्या वर ते तीर्यग्योनींत पुन: उत्पन्न होतात. तीर्यग्योनींत दारुण दु:खाचा अनुभव घेतल्या नंतर पापाच्या बलानें मनुष्यप्राणि जन्मसमयीं च क्षयरोगादि लक्षणयुक्त निपजतो व मानुष शरीरांत संचार करितो. वरील कारणा मुळें निरानिराळ्या योनींत पापी मनुष्याचा जन्म होणें या स्थित्यंतरास कर्मविपाक असें ह्मणतात. मानवी प्राण्यानें कोणतें पाप केलें असतां त्यास कोणता रोग होतो याचीं कांहीं उदाहरणें याज्ञवल्क्यस्मृतींतील आह्मी येथे देतों. ब्राह्मणाची हत्या करणारा क्षयरोगी होतो. निषिद्ध सुरेचें प्राशन करणारा स्वभावत: च काळ्या दातानीं युक्त होतो. अन्नाचा अपहार करणारा अजीर्ण रोगग्रस्त होतो. गुरूनें आज्ञा दिल्या वांचून अध्ययन करणारा व पुस्तकांचा अपहार करणारा मुका होतो. या प्रमाणें मनुष्यप्राण्यास जे विकार होतात त्यांचें निवारण कोणास हि करितां येणें शक्य नाहीं. कारण हे विकार हे शेवटचें फल आहे. मनुष्यप्राण्यानें केलेल्या पापाचा क्षय झाल्या नंतर त्याच्या पूर्व जन्मांतील अवशिष्ट पुण्यांशानें धनधान्यसंपन्न अशा महा कुलांत तो उत्पन्न होतो. पापक्षयार्थ करावयाच्या प्रायश्चित्ता विषयीं रुची उत्पन्न करण्या करितां कर्मविपाकाचे स्मृतिग्रंथांत दिग्दर्शन केलेलें असतें. आतां प्रायश्चिताचें विवरण करण्याकडे आह्मी वळतों. शास्त्रानें ज्याचें विधान केलें आहे असें नित्य [ अवश्यक संध्योपासनाग्निहोत्रादिक ] व नैमत्तिक [ चांडाल स्पर्शादि निमित्तानें

शास्त्रविहित स्नानादिक]कर्म यांचें अनुष्ठान न केल्यानें आणि सुरापानादि निषिद्ध कर्मांचें सेवन केल्यानें व इंद्रियांचा निग्रह न केल्यानें पुरुष पतनास योग्य होतो. अशा पुरुषानें या लोकीं व परलोकीं हि चांगली शुद्धि व्हावी ह्मणून प्रायश्चित्त करावें. हा प्रायश्चित्त शब्द एका प्रकारच्या पापक्षालना करतां करावयाच्या नैमित्तिक कर्मा मध्यें रूढ झाला आहे. असें प्रायश्चित्त जो करितो त्याचा आत्मा शुद्ध व प्रसन्न होतो व लोक हि त्यास व्यवहारास योग्य समजतात. हा प्रायश्चित्ताधिकार नैमित्तिक असून त्याच्या योगानें पापक्षय होतो. मनूनें शुद्धी करितां प्रायश्चित्त नित्य करावें असें सांगितले आहे. प्रायश्चित्त करून पापाचें निराकरण न केल्यास जीव पुन्हा या लोकीं निंद्य लक्षणांनीं युक्त होऊन निपजतात. यास्तव प्रायश्चित्त अवश्य आहे. शास्त्रार्थाचा व्यतिक्रम केल्या मुळें उत्पन्न झालेल्या पापां मध्यें प्रसक्त झालेले व मी हें अकार्य केलें असें समजून मनांत उद्विग्न न होणारे दुःसह नरकास प्राप्त होतात.प्रायश्चित्ताच्या योगानें अज्ञानतः केलेलें पाप जातें, इच्छापूर्वक केलेलें पाप जात नाहीं. परंतु कामनापूर्वक केलेल्या पापाचें हि प्रायश्चित्त सांगितलेलें असल्यामुळें पाप करणारानें प्रायश्चित्त घेतल्यास तो लोकांत व्यवहारास योग्य होतो. पतित न करणारें पाप कामतः जरी केलें असलें तरी प्रायश्चित्तानें त्याचा क्षय होतो च. त्या च प्रमाणें पतित करणारें हि कर्म बुद्धिपूर्वक जरी केलें तरी त्याच्या क्षयार्थ मरणान्तिक प्रायश्चित केल्यास त्या पापाचा हि क्षय होतो.

ज्याच्या कृत्याच्या योगानें ब्राह्मणाचा प्राणवियोग होतो तो ब्रह्महा होय. निषिद्ध सुरेचें पान करणारास मद्यप म्हणतात. ब्राह्मणाचें सुवर्ण चोरणारा स्तेन व गुरुभार्यागमन करणारा गुरुतल्पग होय. हे ब्रह्महादि चार महा पातकी आहेत. उच्च स्थिती पासून पतित करतात किंवा दुःखांत पाडतात तीं हीं महा पातकें होत. या महा पातक्यांशीं जो सहवास करितो तो हि महा पातकी आहे.

गुरू वर मिथ्या आरोप करणें, वेदाची निंदा करणें, मित्राचा मग तो अब्राह्मण असला तरी त्याचा वध करणें, अध्ययन केलेल्या वेदांचा आळसानें विसर पडणें हीं ब्रह्महत्यें समान पातकें आहेत.

निषिद्ध पदार्थांचें सेवन करणें, आपला उत्कर्ष व्यक्त करण्या साठीं खोटें बोलणें हीं सुरापान सम पापें आहेत.

अश्व, रत्न, मानुष, स्त्री, भूमि, धेनु व सुवर्णा वांचून दुसरी ठेव यांचा अपहार करणें हें सुवर्णाच्या चोरी सम पाप आहे.

मित्राची भार्या, उत्तम जातीची कन्या, भगिनी, चांडाली, समान गोत्रांतील स्त्री व स्नुषा यांच्याशीं गमन करणें हें गुरुतल्पगमना सारखे पाप आहे.

या प्रमाणें महापातकें व तत्सम दुसरीं पातके यांचें दिग्दर्शन केल्या नंतर कांहीं उप पातकें दर्शवितों. गाईच्या शरिराचें छेदन, योग्य समयीं उपनयन न करणें, ब्राह्मणाचे सुवर्ण व तत्सम दुसरें धन या वांचून दुसरे कोणतें हि धन चोरणें, घेतलेलें ऋण परत न देणे व तसें च देवर्षि व पितृ संबधीं ऋणांची फेड न करणे, अधिकार असतां हि अनाहिताग्नी रहाणे, लवणादि वस्तूचा विक्रय व सोदर श्रेष्ठ भ्राता अविवाहित असतां कनिष्ठानें लग्न करणें इत्यादि उप पातकें आहेत. विस्तार भयास्तव ही सर्व यादी आह्मी येथे देत नाहीं. जिज्ञासु वाचकांनीं मिताक्षरा टीका वाचून आपली जिज्ञासा तृप्त करून घ्यावी. जातिभ्रंशकर, संकरीकरण, अपात्रीकरण व मलिनीकरण असे पापांचे निरनिराळे प्रकार समजण्यांत येतात.

**ब्रह्महत्त्या प्रायश्चित्तः**—आतां ब्रह्महत्त्येच्या निराकरणा करितां ज्या ब्राह्मणाचा वध केला असेल त्याच्या कपाळाची कवटी अथवा त्याची न मिळाल्यास दुसरी कवटी काठी वर ध्वजे सारखी ठेऊन ती काठी हातांत धरून ब्रह्महत्त्या करणारानें आपलें पाप सांगत बारा वर्षे दारोदारीं भिक्षा मागत फिरावें. या प्रमाणें बारा वर्षे व्रतचर्या केल्यानें ब्रह्महत्त्येच्या पाश पासून ब्रह्मघातकी मुक्त होतो. ब्रह्मघातक्याने अबुद्धिपूर्वक केलेल्या पापाचें क्षालन वरील प्रमाणें करितां येतें. बुद्धिपुरःसर ब्राह्मणवध केल्यास त्याची निष्कृति होऊं शकत नाहीं. जो आपला प्राण संकटांत घालून चोर, व्याघ्र इत्यादिकां कडून मारल्या जाणाऱ्या ब्राह्मणाचें अथवा बारा गाईचें रक्षण करितो अथवा अवभृथ नांवाच्या कर्माच्या अंगभूत स्नान समयीं स्नान करितो तो हि वरील व्रत संपूर्ण झालेले नसतां हि ब्रह्महत्त्येच्या पातका पासून मुक्त होतो. या च स्वरूपाची दुसरीं अशी कांहीं कर्मे सांगितलीं आहेत कीं तीं केलीं असतां ब्रह्महत्त्येचें निराकरण होतें. परंतु विस्तार भयास्तव तीं कर्मे येथें देण्याच्या भानगडींत आह्मी पडत नाहीं.

**सुरापान प्रायश्चित्तः**—प्रथम सुरा शब्दाची व्याख्या नमूद करणें जरूर आहे. पीठा पासून केलेलें जें मद्य ती सुरा. पीठा खेरीज गुड, मधु इत्यादि पदार्थां पासून बनविलेल्या मद्यास सुरा समजण्यांत येत नाहीं. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तिन्ही वर्णांच्या लोकांस सुरा ही निषिद्ध आहे. गौडी इत्यादि इतर मद्यांचा ब्राह्मणांना मात्र निषेध आहे. सुरा निषेध मुंज न झालेला मुलगा व अविवाहित कन्या यांना हि लागू आहे. शूद्राला सुरा व मद्य या

दोहोंचा हि निषेध नाहीं. आतां सुरापानाचे प्रायश्चित्त नमूद करितो. सुरा, जल, गाईचें तूप, गोमूत्र, गाईचें दूध हे शरीर भाजेल इतके तापवून प्राशन केल्यानें मद्यपान करणारा मरण पावतो व त्याने च तो शुद्ध होतो. हे प्रायश्चित्त बुद्धिपुरःसर एकवार च सुरापान केल्यास सांगितले आहे. अज्ञानतः जो द्विज सुरापान करील, त्यानें गाय, बकरा इत्यादिकांच्या केसांनी केलेले वस्त्र परिधान करून वर सांगितलेलें ब्रह्महत्त्या व्रत करावे म्हणजे तो या पापा पासून मुक्त होतो.

**मद्यपान प्रायश्चित्तः**—जो ब्राह्मण अज्ञानाने मद्य पितो तो तप्तकृच्छ्रपूर्वक त्याचें पुनरुपनयन केल्यानें शुद्ध होतो.

**सुवर्णस्तेय प्रायश्चित्तः**—ब्राह्मणाचे सुवर्ण ज्याने चोरले असेल त्याने आपल्या तोंडानें चोरी केली आहे असे सांगत राजास मुसळ द्यावें. राजानें त्या मुसळानें त्यास प्रहार करावा म्हणजे चोर शुद्ध होतो. मुसळाचा अर्थ हननोपयोगी पदार्थ असा समजावयाचा. बुद्धिपुरःसर सुवर्णस्तेया करितां हें प्रायश्चित्त सांगितलें आहे. सुवर्ण म्हणजे सोळा मासे भार सोनें असें समजावें. केसाच्या अग्रा इतकें सोनें चोरल्यास प्राणायाम करावा. सुवर्णादि अधीक प्रमाण सोन्याचा अपहार केल्यास मरणान्त किंवा ब्रह्मघातक्यास उक्त असलेलें प्रायश्चित्त करावें. ह्या प्रायश्चित्ता खेरीज दुसरी हि प्रायश्चित्तें सुवर्णस्तेया करितां सांगितलीं आहेत.

**गुरुतल्पगमन प्रायश्चितः**—तापवून लाल केलेल्या लोखंडी स्त्री प्रकृती सह गुरुतल्पगमन करणारानें शयन करावें ह्मणजे अशा रीतीनें निजून शरीर त्याग करावा. या शिवाय दुसरीं हि प्रायश्चित्तें या पापा करिता सांगितलीं आहेत.

**महापातक्याशीं संसर्ग ठेवणारास प्रायश्चितः**—महा पातक्यास जीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत तीं च महा पातक्याशीं संसर्ग ठेवणारानें करावीं.

**प्रतिलोमोत्पन्नाचा वध करणारास प्रायश्चित्तः**—सूतमागधादि प्रतिलोमोत्पन्नाचा वध केल्यास त्याच्या निराकरणार्थ चांद्रायण करावे

## उपपातकांचीं प्रायश्चित्तें

**गोवध करणारास प्रायश्चित्तः**-एक मास पर्यंत गोमूत्र, गोमय गोक्षीर, दही व घृत याचे मिश्रण करून ते दुसरा कोणता हि आहार न करितां पीत रहावें. त्या च प्रमाणे रात्रीं गाईच्या गोठ्यांत निजावें

व गाई मागून फिरत रहावें. एक महिना भर सावधान चित्तानें कृछ्र अथवा प्राजापत्य करावे. या शिवाय गोवधा सारखीं जीं दुसरीं उप पातकें आहेत त्याचें हि निराकरण वरील प्रायश्चित्ताच्या योगानें होतें.

## प्रायश्चित्तांचे निरनिराळे प्रकार

**सांतपन:**–आदल्या दिवशीं दुसऱ्या सर्व आहारांचा परित्याग करून गोमूत्र, गोमय, गोदुग्ध, गोदधि व गोघृत हीं पांच पचगव्यें घेऊन तीं कुशोदकांत मिसळून प्यावीं आणि दुसऱ्या दिवशीं उपवास करावा. यास द्वैरात्र सांतपन कृछ्र ह्मणतात.

**महासांतपनाख्यकृछ्र:**- सात दिवसांनीं साध्य होणारें महासांतपनाख्य कृछ्र जाणावें. पंचगव्याच्या पांच द्रव्यां पैकीं प्रत्यहीं एकेक द्रव्य पृथक प्राशन करून सहाव्या दिवशीं उपवास केल्यानें तें साध्य होतें.

**पर्णकृच्छ्र:**—पळस, औदुंबर, कमल व बिल्व यांचीं पानें आणि कुश यांतील एक एका जातीचीं पानें घालून उकळलेलें पाणी प्रत्यहीं पांच दिवस प्यावे ह्मणजे पांच दिवसांनीं साध्य होणारें ते पर्णकृच्छ्र होतें.

**तप्तकृच्छ्र:**—पहिल्या दिवशीं तापलेलें दूध, दुसऱ्या दिवशीं तापलेलें घृत, तिसऱ्या दिवशीं तापलेलें जल पिऊन चवथ्या दिवशीं उपवास करावा. हे चार दिवसांनीं साध्य होणारें महातप्तकृच्छ्र आहे.

**पादकृच्छ्र:**—केवळ दिवसा च एकदा भोजन केल्यानें, नक्तानें, अयाचितानें व उपवासानें पाद कृच्छ्र होतें.

**प्राजापत्यकृच्छ्र:**–पाद कृच्छ्राचें तीन वेळा अनुष्ठान केलें ह्मणजे त्याला च प्राजापत्य ह्मणतात.

**कृच्छ्र:**—तीन दिवस प्रातःकाळीं हविष्यान्न खाऊन रात्रीं भोजन करूं नये. पुढें तीन दिवस नक्त भोजन करावें. नंतर तीन दिवस कोणा पाशीं न मागतां यदृच्छेनें मिळेल तें खाऊन रहावें व शेवटीं तीन दिवस उपोषण करावें. जपादि काम नसेल तेव्हां दिवसा उभे रहावें आणि रात्रीं बसावें. सत्य भाषण करावें. त्रिकाल स्नान करावें. या व्रतास कृछ्र असें म्हणतात.

**अतिकृच्छ्र:**–अति कृच्छ्रांत इतका च विशेष आहे कीं पहिल्या नऊ दिवसांत केवळ हातांत मावेल तितकें च अन्न खाऊन रहावें.

**कृच्छ्रातिकृच्छ्र:**–एकवीस अहोरात्र नुसत्या दुधा वर रहाणे हें कृच्छ्राति

कृच्छ्र व्रत होय. बारा अहोरात्र नुसत्या जलावर रहाणें हें कृच्छ्रातिकृच्छ्र असल्याचें गौतमानें सांगितलें आहे.

पराकः–बारा दिवस उपवास केल्यानें पराक व्रत होतें.

सौम्यकृच्छ्रः--तेल काढून घेतललें तीळ, पेज, ताक, जल व सातु या पांच पदार्थांतील रोज एकेक खाऊन सातव्या दिवशीं उपवास करावा, याला सौम्य कृच्छ्र म्हणतात.

तुलापुरुषसंज्ञककृच्छ्रः--वर सांगितलेल्या पांच पदार्थांतील एकेकाचा क्रमानें तीन तीन दिवस अभ्यास केल्यास पंधरा दिवस चालणारें तुलापुरुष या नांवाचें कृच्छ्र होतें.

चांद्रायणः---मोराच्या अंड्या एवढाले घास जशी जशी तिथी वाढत जाईल तसतसे वाढवीत पौर्णिमेस पंधरा घास खाऊन कृष्ण प्रतिपदेस चवदा या प्रमाणें एक एक घास कमी कमी खात जाणें यास चांद्रायण असें ह्मणतात एका महिन्यांत कसे तरी दोनशें चाळिस ग्रास खाणें हा चांद्रायणाचा दुसरा प्रकार आहे. ज्या पापांचें विशेष प्रायश्चित सांगितलेलें नसते त्यांची शुद्धि चांद्रायणानें होतें. केवळ चांद्रायणानें च नव्हे तर नुसत्या प्राजपत्यादि कृच्छ्रांनीं हि होते. गुरूहून गुरु अशीं जीं कांहीं पापें असतील तीं सर्व कृच्छ्र, अति कृच्छ्र, चांद्रायण इत्यादिकांच्या योगानें क्षीण होतात असे षट्त्रिंशन्मतांत सांगितलें आहे.

याप्रमाणें प्रायश्चित्तधर्माचें थोडक्यांत दिग्दर्शन आह्मीं केलें आहे. आतां प्रायश्चित्ताच्या संबंधाचें एक महत्वाचें वचन या ठिकाणीं नमूद करून हें विवेचन आह्मी पुरें करितों.

**देशं कालं वयः शक्तिं पापं चावेक्ष्य यत्नतः ॥**
**प्रायश्चित्तं प्रकल्प्यं स्याद्यत्र चोक्ता न निष्कृतिः ॥ २९३ ॥**

( याज्ञवल्क्यस्मृति प्रायश्चित्त प्रकरण )

अर्थः–मागें सांगितलेली किंवा पुढे सांगावयाचीं जेवढीं प्रायश्चितें आहेत त्यांची—देश, काल, वय, शक्ति व पात्र यांचा विचार करून जशा रीतीनें कर्त्यांचे प्राण जाणार नाहींत अशा रीतीनें—विशेष विषया मध्यें योजना करावी, नाहीं तर प्रधानाची च ( कर्त्याची ) निवृत्ति होण्याचा प्रसंग यावयाचा. याज्ञवल्क्यस्मृतिकाला पासून मराठी राज्य लयास जाई तों पर्यंत महाराष्ट्रीय समाजांत अनेक स्थित्यंतरें व घडामोडी झाल्या. या स्थित्यंतराच्या व घडामोडींच्या योगानें याज्ञवल्क्यस्मृतिकाळाच्या महाराष्ट्रीय समाजांत व

महाराष्ट्रांत स्वराज्य स्थापना ज्या काळीं झाली त्या काळच्या महाराष्ट्रीय समाजांत महद्‌तर पडलें. अशा रीतीने बदललेल्या परिस्थितींत धर्माची छाप महाराष्ट्रीय समाजा वर कायम राहण्यास वरील वचनाचा फार उपयोग झाला आहे असें प्रायश्चित्तधर्म संबधाचे त्या काळचे पुरातन कागदपत्र मराठ्यांच्या इतिहासाच्या साधन ग्रन्थांत व इतरत्र छापण्यांत आलेले वाचले असता कोणाची हि खात्री झाल्या वांचून राहणार नाहीं. वरील वचनाच्या दृष्टीने प्रायश्चित्तधर्माचा अंमल स्वराज्यांत कोणत्या प्रकारें केला जात असे या बाबीचा ऊहापोह करण्याचा मोह विस्तार भयास्तव आम्ही बाजूस ठेऊन हें प्रकरण येथे पुरें करितों.

## ( ७ )

## जातिधर्म, देशधर्म, कुलधर्म

याज्ञवल्क्यस्मृतींत ज्या देशांत जो आचार, कुलमर्यादा व व्यवहार असेल तो शास्त्र विरुद्ध नसल्यास त्यांचे राजानें पालन करावे असें सांगितलें आहे. त्या च प्रमाणें शुक्रनीतींत "ज्या त्या जातीच्या लोकांनीं त्या त्या जातीस विहित असलेल्या धर्मास अनुसरून आचरण करावें. या प्रमाणें त्यांनीं आचरण न केल्यास राजानें धर्मास अनुसरून आचरण न करणारास दंड करावा' असा राजाचा धर्म सांगितला आहे. या तत्त्वास अनुसरून वर्तन करावयाचे ह्मणजे जातिधर्म, देशधर्म व कुलधर्म यांचे परिपालन करणें राजास प्राप्त आहे. महाराष्ट्रीय समाजांत दग्गोचर होणाऱ्या या प्रकारच्या धर्माचें आह्मी किंचित् दिग्दर्शन करितों. महाराष्ट्रांत अस्तित्वांत आलेल्या धार्मिक घडामोडी मुळे जैन, लिंगाईत, मानभाव इत्यादि नूतन पंथ अस्तित्वांत येऊन महाराष्ट्रीय समाजांतील अनेक लोक या पंथाचे अनुयायी बनले. या पंथाच्या अनुयायाच्या धर्माचा समावेश महाराष्ट्र धर्मांत होतो. धार्मिक घडामोडी प्रमाणें महाराष्ट्रात झालेल्या राजकीय घडामोडीच्या योगानें महाराष्ट्रीय समाजांतील कित्येक लोक खिस्ती व मुसलमान धर्मानुयायी झाले. या पंथाच्या अनुयायाच्या धर्माचा महाराष्ट्रधर्मांत समावेश होऊं लागला. वरील दोन कारणा मुळे अस्तित्वांत आलेल्या नूतन धर्मा खेरीज महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या कित्येक जातीचे विशिष्ट प्रकारचे जातिधर्म व कुलधर्म आहेत. त्याचा या सदरात समावेश होतो. गोत पत्करण्याच्या ज्या रिवाजाचा मागे आम्ही उल्लेख केला आहे तो एक प्रकारचा जातिधर्म च आहे. भारत

इतिहास संशोधक मंडळाच्या शके १८३८ सालच्या वार्षिक इतिवृत्ताच्या ११७० व्या पाना वर त्या च प्रमाणें शके १८४० सालच्या वार्षिक संमेलन वृत्ताच्या ४१ ते ५३ पानां वर महाराष्ट्रीय समाजांत दृष्टोत्पत्तीस पडणाऱ्या निरनिराळ्या जातिधर्मांची, देशधर्मांची व कुलधर्मांचीं उदाहरणें दिलीं आहेत. विस्तार भयास्तव त्यांचें स्थूल दिग्दर्शन करण्याच्या भानगडींत आह्मी पडत नाहीं. जिज्ञासु वाचकांनीं त्या ग्रंथाचे अवलोकन करून या विषया संबंधा जिज्ञासा तृप्त करून घ्यावी अशा आह्मी सूचना करितों. लग्नाच्या प्रसंगीं कोणत्या जातीच्या वराची मिरवणूक घोडा, बैल, हेला इत्यादि जनावरां पैकीं कोणत्या जनावरा वर काढावी व कोणत्या जातीच्या वरानें पायीं मिरवावें या संबंधाचे महाराष्ट्रीय समाजांत कांहीं रिवाज अस्तित्वांत होते. भारत इ. स. मंडळाच्या शके १८३८ सालच्या वार्षिक संमेलन वृत्ताच्या छपन्नाव्या पाना वर या संबंधाचा दामाजीपंताच्या काळचा एक पुरातन लेख छापला आहे. या लेखांत नमूद असलेल्या रिवाजांचा जातिधर्म इत्यादिकां मध्ये समावेश होतो हें उघड आहे. कोणत्या जातीच्या वराची मिरवणूक शहराच्या कोणत्या भागांतून व कशा रीतीनें काढावयाची या संबंधीं निर्बंध स्वराज्यांत अस्तित्वांत होते व त्या निर्बंधाच्या बाबतीत वाद उपस्थित झाल्यास सरकारी अधिकाऱ्यांस त्या वादांचा निकाल करावा लागत असे. वाड भाग ७ थोरले माधवराव पेशवे भाग २ पान ३३७ वर अशा स्वरूपाच्या वादाचा एक निवाडा छापला आहे. " कऱ्हाड प्रांतांतील सोमवंशी कासार लोकांच्या लग्नात वरात कलशा समवेत देवदर्शन घेऊन पेठेंतून जानवशाचे घरास मिरवत नेण्याचा रिवाज असतां कऱ्हाडच्या लिंगाईत वाण्यांनीं या संबंधीं कजिया केला. कासार हे सोमवंशी क्षत्री यांची वरात कलशा समवेत मिरवावी असें शास्त्रमतें असल्याचा जिल्ह्याचे सुभेदार यांनीं ठराव करून त्या प्रमाणें अमल करण्या विषयीं कासार, लिंगाईत वाणी व सरकारी अधिकारी यांस हुकूम केले. कासार, तांबट व सोनार वगैरे पंचाळ आणि वाणी बकाल या मध्यें लग्नाचे वराती बद्दल कजिया लागला होता. ते वेळीं पंचाळाचा नवरा हमरस्ता चारी पेठांतून वरात मिरवीत येतो कीं नाहीं, पूर्वी याचा कजिये जाहाले होते ते समयीं निवाडा कसा झाला, मलिक अंबराचे वेळेस इनसाफ झाला ते समयींचीं पत्रे पंचाळा जवळ आहेत त्या चा दाखला कसा आहे व परगणे मजकूरच्या पेठ्यांतून कैशी चाल चालते तें सत्य स्मरोन घेता-

लीस पूर्वक तपशिलवार हुजूर लिहून पाठविणें.'' अशा प्रकारचा हुकूम करण्यांत आल्याचें वाड भाग १ पान २२४ मध्यें नमूद आहे. महाराष्ट्रांतील निरनिराळ्या गांवच्या देशमुख देशपांड्यास व अष्ट प्रधानास हा हुकुम इ. स. १७४७–४८ सालात काढण्यांत आला होता. हल्लींच्या काळांत क्षुल्लक वाटणाऱ्या बाबींसंबंधीं स्वराज्यांत कशा प्रकारचे निर्बंध होते व त्या निर्बंधास अनुसरून आचरण होत आहे कीं नाहीं याबद्दलची खबरदारी घेण्यांत निरनिराळ्या ज्ञातीचे लोक किती दक्ष असत हे वरील उदाहरणा वरून दिसून येतें. ह्या विषया संबंधीं साग्र माहिती नमूद करावयाची ह्मणजे फार च विस्तार होणार आहे. सबब वरील स्थूल विवेचना वर च संतुष्ट राहणें प्राप्त आहे.

( ८ )

## दश लक्षणयुक्त धर्म.

या धर्माचें मागें दिग्दर्शन केलें असल्या कारणानें या संबंधाची अधिक चर्चा करण्याचें प्रयोजन राहिले नाहीं.

( ९ )

## मोक्षधर्म

मनुस्मृती अन्वयें मोक्षधर्माचें विवेचन मागें आह्मीं केलें आहे. त्या च प्रमाणें बाराव्या शतका पासून सतराव्या शतका पावेतों महाराष्ट्रीय समाजांत मोक्षधर्मदृष्ट्या कोणतें स्थित्यंतर घडून आलें व वारकरी सांप्रदाय अथवा भागवत धर्म यांत अंतर्भूत होणाऱ्या उपासना, नामस्मरण, कीर्तन इत्यादि बाबींचा महाराष्ट्रधर्मात कसा समावेश होऊं लागला हें हि आह्मीं दर्शविलें आहे. आता गणपति, सूर्य इत्यादि देवतांच्या उपासनेचा उल्लेख याज्ञवल्क्यस्मृतींत आलेला आहे त्या विषयींचें अल्प विवेचन आह्मी येथें करितों. कर्मास येणाऱ्या विघ्नांच्या निरसनांचे उपाय ह्मणून या देवतांची उपासना करण्या विषयीं याज्ञवल्क्यस्मृतींत सांगितलें आहे. "पुरुषार्थांचीं साधनें जीं कर्में त्यास विघ्ने करण्याकरितां विनायकाची योजना ब्रह्मदेव, विष्णु इत्यादि देवतांनीं केली. यास्तव विनायक देवतेस पूजनादिकांच्या योगानें संतुष्ट केलें असतां आत्मज्ञानाच्या द्वारें मोक्ष लक्षणासिद्धि प्राप्त होते. सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, शुक्र, शनि, राहु केतु इत्यादि नवग्रहां पासून होणारी पीडा नाहींशी करण्या करितां व लक्ष्मीची प्राप्ति होण्या करितां वरील देवतां प्रमाणें नवग्रहांचें हि

पूजन करावें." याज्ञवल्क्य स्मृतींत या देवतांच्या उपासने संबंधीं केलेल्या विवेचनाचा थोडक्यांत सारांश या प्रकारचा आहे. महाराष्ट्रीय समाज याज्ञवल्क्यस्मृति धर्मानुयायी असल्यामुळे गणपति, स्कद ह्मणज च खंडोबा या देवतांची उपासना करणारे अनेक लोक या समाजांत दृष्टोत्पत्तीस येतात. गणपति पूजनाचा उत्सव हा महाराष्ट्रीयांचा राष्ट्रीय उत्सव आहे असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. ठाणे कोंकण प्रांताच्या वंशपद्धति या नांवाच्या बखरींत सूर्योपासना करण्या बद्दल सांगितलें आहे. वरील आर्यांच्या दैवतां खेरीज अनार्य लोक महाराष्ट्रीय समाजांत समाविष्ट होऊं लागल्यापासून अनार्य दैवतांची उपासना हा हि महाराष्ट्र धर्मांचा भाग होऊन बसला. समर्थांनीं दासबोधाच्या चवथ्या दशकाच्या पांचव्या समासांत अर्चन भक्तीचें विवेचन केलें आहे. त्यांत समर्थांनीं खालील देवतांचा उल्लेख केलेला आहे तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

> ऐश्या परमेश्वराच्या मूर्ती । पाहो जातां उदंड असती ।
> त्यांचें अर्चन करावें भक्ती । पाचवी ऐसी ॥
> जाखमाता मायराणी । बाळा बगुळा मानविणी ।
> पूजा मांगिणी जोगिणी । कुळधर्में करावी ॥

या समर्थांच्या उक्तींत जाखमाता, मायराणी, बाळा, बगुळा, मानविणीं, मांगिणी, जोगिणी इत्यादि उल्लेखिलेल्या देवता महाराष्ट्रीय समाजात अंतर्भूत होणाऱ्या अनार्य जातींच्या लोकांच्या आहेत हे उघड आहे. परन्तु या देवतांचें पूजन करणें हें समर्थांच्या काळीं महाराष्ट्रधर्मास संमत होऊन महाराष्ट्रांतिल ब्राह्मणादि द्विज वर्णांचे लोकहि या अनार्य लोकांच्या देवतांस भजू लागले होते.

**धर्मभ्रष्टांचें शुद्धिकरण :**—आतां महाराष्ट्रीय समाजांत शके १२०० नंतर अस्तित्वांत आलेल्या घडामोडींच्या योगानें या समाजांतील कित्येक लोकांच्या धर्मांचें जें परिवर्तन घडून आलें त्या मुळें धर्मभ्रष्ट झालेल्या व्यक्तीस शुद्ध करून परत महाराष्ट्रधर्मांत समाविष्ट करून घेण्याच्या बाबतींत महाराष्ट्रांत जो नूतन धर्म अस्तित्वांत आला त्याचें अल्प दिग्दर्शन आम्ही करितों. मराठ्यांच्या इतिहासाच्या साधन ग्रंथांत व इतरत्र ठिकाणीं या संबंधाचे त्या काळचे बरे च कागदपत्र प्रसिद्ध झाले आहेत. या कागदपत्रांचा साकल्यानें विचार केला असतां याज्ञवल्क्यस्मृति व तीं वरील मिताक्षरा टीका

या मध्यें सांगितलेल्या प्रायश्चित्तास अनुसरून धर्मभ्रष्ट झालेल्या व्यक्तीस व जातीस महाराष्ट्रधर्मात स्वराज्याच्या अमदानींत सामील करून घेण्यांत येत असे ही बाब सिद्ध होतें. हें शुद्धिकरण दोन प्रकारचें होतें. वैय्यक्तिक शुद्धिकरण व अनेक व्यक्ति मिळून बनलेल्या जातीचें शुद्धिकरण.वैय्यक्तिकशुद्धिकरणा संबंधीं खालील निर्बंध अस्तित्वांत असल्याचें दिसून येतें.

( १ ) शुद्धिकरण करून स्वधर्मात परत येण्याची ज्या व्यक्तीची अपेक्षा असेल ती व्यक्ति स्वखुषीनें भ्रष्ट झाली असतां उपयोगी नाहीं. कपट,जबरदस्ती इत्यादि कारणां मुळे त्या व्यक्तीच्या ठिकाणीं भ्रष्टता आली असली पाहिजे.

( २ ) भ्रष्ट झालेल्या व्यक्तीस अनुताप होऊन स्वधर्मात परत येण्याची त्या व्यक्तीची अपेक्षा असली पाहिजे.

( ३ ) भ्रष्ट झालेल्या व्यक्तीच्या जातिबांधवांची त्यास शुद्ध करून स्वजातींत घेण्याविषयीं संमति असली पाहिजे.

( ४ ) भ्रष्टास शुद्ध करून स्वधर्मात घेण्याची त्याच्या ज्ञाति बांधवांची समति मिळाल्या नतर त्यास शुद्ध करून स्वधर्मात व स्वजातींत सामील करून घेण्याची राजाची आज्ञा पाहिजे.

वरील कलमात नमूद केल्या प्रमाणें धर्मभ्रष्टास शुद्ध करून परत स्वधर्मात व स्वजातींत सामील करून घेण्याची राजाची आज्ञा झाल्या नंतर कऱ्हाड, माहुली, वाई इत्यादि क्षेत्रांतील ब्रह्मवृंदा कडून त्यास स्मृति धर्मा अन्वयें प्रायश्चित्त देऊन शुद्ध करुन जातींत सामील करून घेत व त्या नंतर शुद्ध करून घेतलेल्या धर्मभ्रष्टाशीं त्याचे ज्ञातिबांधव अन्नप्राशन व शरीर संबंधादि व्यवहार करीत असत.

वर दर्शविलेल्या निर्बंधास अनुसरून महाराष्ट्रांतील कित्येक व्यक्तीस स्वराज्याच्या अमदानींत शुद्ध करून महाराष्ट्रधर्मात सामील करून घेतल्याचीं उदाहरणें आढळून येतात. वैयक्तिक शुद्धिकरणाचें बाबतींत अस्तित्वांत असलेल्या धर्माचें दिग्दर्शन केल्या नंतर व्यक्तिसमूहाच्या शुद्धिकरणांत आढळून येणाऱ्या धर्माचें आह्मी दिग्दर्शन करतों.

वसई,दमन, दिव इत्यादि ठिकाणें पोर्तुगीज लोकांनीं काबीज करून त्या वर व त्यांच्या आसपासच्या प्रदेशा वर आपली राजकीय सत्ता प्रस्थापित केल्या वर खिस्ती धर्माचा प्रसार पोर्तुगीज लोकांनीं करण्यास प्रारंभ केला. हें

खिस्तीधर्मप्रसाराचें कार्य त्यांनीं अत्यंत नीच व जुलमी उपायांनीं केलें. पोर्तुगीज लोकांच्या धर्मप्रसाराच्या वेडास ठाणें, वसई, साष्टी इत्यादि ठिकाणच्या व आसपासच्या प्रदेशांतील कित्येक हिंदु ज्ञाति बळी पडल्या. अशा रीतीनें बाटविलेल्या ज्ञातीस शुद्ध करून परत महाराष्ट्रधर्मांत सामील करून घेतल्याचीं उदाहरणें रावबहादुर पारसनीस यांनीं प्रसिद्ध केलेल्या ' पेशवे दप्तरांतील सनदा पत्रांतील माहिती ' या ग्रंथाच्या पान २६१ ते २६६ वर दिलीं आहेत. स्वराज्याच्या काळांत साष्टी तालुक्यांतील खार पाटील, शिंदे भंडारी, मोंगले या जातीच्या खिस्ती झालेल्या लोकांना सरकार नजर घेऊन शुद्ध करून हिंदु धर्मांत घेण्यांत आलें. या जातीच्या लोकांना शुद्ध करून घेतल्या संबंधीं जे वर नमूद केलेले लेख आहेत ते लक्षपूर्वक वाचले असतां असें दिसून येतें कीं, वरील जातीच्या लोकांनीं स्वखुषीनें खिस्तीधर्म स्वीकारला नसून त्यांना जबरदस्तीनें खिस्ती करण्यांत आलें होतें. याशिवाय या जातीच्या लोकांस जबरदस्तीनें खिस्ती केल्या नंतर ते लोक खिस्ती धर्मा प्रमाणें न वागतां हिंदुधर्माच्या आचारा प्रमाणें वर्तन करीत असत. पूर्वापार चालत आलेले कुलधर्म, कुलाचार पाळीत असत. अशा प्रकारच्या परिस्थितींत " ऐसी माहितगारी सांगितली व जोशी वृत्यांशी यांनीं जबानी लिहून दिल्ही. हें जाणून मोगले मजकूर यांनीं **मराठे यांचा धर्म सोडला नाहीं.** याजकरितां पेशजी, शिंदे भंडारी व साष्टी प्रांतातील खार पाटील यासी हिंदुधर्म लावून दिल्हा, त्याप्रमाणे तुम्हास क्रियापाल करून हिंदुधर्मास मोकळीक केली " असें कारण नमूद करून वरील लोकांस शुद्ध करून घेण्यांत आलें. या लेखा वरून एखाद्या जातीस शुद्ध करून परत हिंदुधर्मांत सामील करून घ्यावयाचें म्हणजे वर नमूद केलेल्या बाबी अस्तित्वांत असाव्या लागत ही बाब सिद्ध होते.

मराठी राज्यांत यातिभ्रष्टांस शुद्ध करून घेण्या संबंधीं अस्तित्वांत आलेल्या नूतन धर्माचें दिग्दर्शन वर दर्शविल्या प्रमाणें आम्हीं केले आहे. आतां हें प्रकरण येथें पुरें करून मराठ्यांच्या आत्मिक इतिहासांत अंतर्भूत होणाऱ्या कांहीं गौण बाबींच्या चर्चे कडे आम्ही वळतों.

---

# प्रकरण पांचवें

## मराठ्यांच्या आत्मिक इतिहासांत अंतर्भूत होणाऱ्या कांहीं गौण बाबींचें दिग्दर्शन व तत्संबंधींची अल्प चर्चा

मराठ्यांच्या आत्मिक इतिहासाची एक प्रमुख बाब या दृष्टीनें **महाराष्ट्रधर्म** या विषयाची चर्चा करणें हा प्रस्तुत प्रबंधरचनेचा आमचा मुख्य हेतु होता व या हेतूस अनुसरून आम्हीं आपल्या पुढे ठेविलेल्या कार्याची पूर्तता केली आहे. महाराष्ट्रधर्मा संबंधी आम्ही केलेल्या चर्चेत मराठ्यांच्या आत्मिक इतिहासाच्या प्रधान अंगाचें दिग्दर्शन करण्यांत आल्या नंतर या इतिहासांत अंतर्भूत होणाऱ्या ज्या कांहीं गौण बाबी शिल्लक राहतात त्यांचें दिग्दर्शन व चर्चा या प्रकरणात करण्याचें आह्मीं ठरविलें आहे. पुरातत्व भूषण रा. वि. का. राजवाडे यांनीं केलेली आत्मिक इतिहासाची जी व्याख्या या प्रबंधाच्या सुरवातीस आह्मीं दिली आहे त्या व्याख्येनुसार आत्म्याच्या अवनत वृत्ती मुळें राष्ट्राच्या पुढाऱ्यांत उत्पन्न होणाऱ्या तटांच्या योगानें राष्ट्राच्या चारित्र्या वर जे परिणाम घडतात त्यांचे दिग्दर्शन करणें हा कोणत्या हि राष्ट्राच्या आत्मिक इतिहासाचा एक भाग आहे. या दृष्टीनें विचार केला असतां मराठ्यांच्या आत्मिक इतिहासाची परिपूर्ण चर्चा करावयाची ह्मणजे वरील स्वरूपाच्या गौण बाबींचें दिग्दर्शन करणें ओघानेंच प्राप्त होतें. इतकी प्रस्तावना करून मराठ्याच्या आत्मिक इतिहासांत पडणाऱ्या वर दर्शविलेल्या स्वरूपाच्या बाबींच्या दिग्दर्शना कडे व चर्चे कडे आतां आह्मी वळतों.

कोणत्या हि मानवी समाजाचा अथवा राष्ट्राचा आत्मिक इतिहास ह्मणजे त्या राष्ट्राच्या अथवा समाजाच्या आत्म्याचा इतिहास होय. आतां राष्ट्राचा अथवा समाजाचा आत्मा कोणता समजावयाचा हा प्रश्न साहजिकपणें पुढे येतो. कोणत्या हि मानवी समाजाचे निरीक्षण केलें असतां असें आढळून येतें कीं, त्या समाजांत एक पुढारी अगर नेता वर्ग असतो. हा नेता अगर पुढारी वर्ग त्या समाजाच्या बऱ्या वाइटा विषयींचा विचार करण्याचें व त्याना सुचलेल्या विचारास अनुसरून त्या समाजांतील अगर राष्ट्रांतील लोकास वळण लावण्याचें कार्य करीत असतो. मानवी व्यक्तीच्या देहाच्या सर्व प्रकारच्या हालचालींचा प्रवर्तक जसा शिरोभागी असणारा मेंदु तसा अनेक मानवी व्यक्तींच्या सघाच्या बनलेल्या मानवी समाजाच्या हाल

चालींचा प्रवर्तक हा नेता अगर पुढारी वर्ग असतो. या नेत्या अगर पुढारी वर्गाच्या ध्येयरूपी ज्या कांहीं वासना असतात व ज्या वासनांच्या सिद्धयर्थ या पुढारी वर्गाच्या हालचाली त्या समाजांत सुरू असतात त्या वासना हा त्या समाजाचा आत्मा होय. असल्या स्वरूपाच्या वासनारूपी ध्येयाचें दिग्दर्शन व तपशिलवार वर्णन हा त्या समाजाचा अथवा राष्ट्राचा आत्मिक इतिहास होय. या विचारसरणीच्या दृष्टीनें मराठ्यांच्या आत्मिक इतिहासाच्या स्थूल स्वरूपाचें दिग्दर्शन पुढील वाक्यांत सांगितल्या प्रमाणें करावें लागेल. महाराष्ट्र या नांवानें प्रसिद्ध असलेल्या भरतखंडाच्या भूभागांत वास्तव्य करणारा जो मानवी समाज अथवा राष्ट्र व ज्या समाजास अथवा राष्ट्रास मराठा या संज्ञेनें संबोधिलें जातें व भरतखंडाच्या पर प्रांतांतील व विदेशीय लोक ज्यांना मराठा या नांवानें ओळखतात अशा या मानवी समाजाचा आत्मिक इतिहास ह्मणजे च मराठ्यांचा आत्मिक इतिहास होय. महाराष्ट्रीय अथवा मराठा समाज हा ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार प्रमुख वर्णाच्या प्रजा, या चार वर्णातील निरनिराळ्या वर्णाच्या स्त्री पुरुषांच्या अनुलोम प्रतिलोम शरीरसंबंधा पासून उत्पन्न झालेल्या जातींच्या प्रजा व अनार्य जातींच्या प्रजा यांचा बनलेला आहे. शिवाजी महाराज उदयास येण्या पूर्वी तीन चारशें वर्षे या समाजाचे मार्गदर्शक एक हरीकथानिरूपणी व दुसरे राजकारणी असे दोन प्रकारचे पुढारी होते. हरीकथानिरूपणी पुढारी बव्हंशीं ब्राह्मण वर्णा पैकीं असत. या पुढाऱ्यांत सोनार, शिंपी, वाणी, कुणबी, माळी, कुंभार, न्हावी, महार व चांभार वगैरे ज्ञातीचे हि कांहीं लोक होते. राजकारणी पुढारी मुख्यत्त्वे करून क्षत्रिय वर्णा मराठा व ब्राह्मणज्ञाती पैकीं असत. या दोन ज्ञाती खेरीज इतर ज्ञाती पैकीं लोक या वर्गात क्वचित असत. कोणत्या हि मानवी समाजाचा आत्मा ह्मणजे त्या समाजाच्या पुढाऱ्याच्या ध्येयरूपी वासना होत, हा जो सिद्धांत वर आह्मीं नमूद केला आहे त्या सिद्धांताच्या दृष्टीनें विचार करतां महाराष्ट्रीय समाजाचा अथवा मराठा राष्ट्राचा आत्मा ह्मणजे वर दर्शविलेल्या महाराष्ट्रीय समाजाच्या हरीकथानिरूपणी व राजकारणी पुढाऱ्यांच्या ध्येयरूपी वासना हा होय. या वासनारूपी ध्येयाचें वर्णन व दिग्दर्शन ह्मणजे च मराठ्यांचा आत्मिक इतिहास. मुसलमान धर्मीय लोकांची महाराष्ट्रांत राजकीय सत्ता स्थापन होऊन तिच्या संसर्गाच्या योगानें महाराष्ट्रीय समाजांत श्रुतिस्मृत्युक्तधर्माचा अथवा महाराष्ट्रधर्माचा लोप होण्याचा दारुण प्रसंग महाराष्ट्रीय समाजा वर जेव्हां कोसळला त्या वेळीं या धर्माचें रक्षण करण्याची उन्नत भावना महाराष्ट्रीय

समाजाच्या हरीकथानिरूपणी व राजकारणी पुढाऱ्यांत उदीत होऊन या भावनारूपी आत्म्यानें मराठी स्वराज्यरूपी देह शिवाजी महाराजांच्या काळीं धारण केला. शिवाजी महाराजांच्या पश्चात् महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यानीं त्या च मनोभावनेनें अथवा ध्येयानें प्रेरीत होऊन स्वराज्याचें रक्षण, पोषण व विस्तार केला. स्मृत्युक्तधर्म स्थापना अथवा महाराष्ट्रधर्म स्थापना करणे ही उन्नत व प्रधान भावना मराठ्यांच्या स्वराज्य स्थापनेस कारणीभूत झाल्याचें मागील प्रकरणांत आह्मीं सिद्ध केलें असून महाराष्ट्रधर्माची व्याख्या व व्याप्ति यांचें हि दिग्दर्शन व वर्णन केलें आहे व मराठ्यांच्या आत्मिक इतिहासकथनाचा मुख्य कार्यभाग आह्मीं आटोपला च आहे. आतां महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी व हरीकथानिरूपणी पुढाऱ्यांच्या मनोभूतींत कोणत्या प्रकारच्या अनवत मनोवृत्ति उदयास आल्या, त्या उदयास येण्यास कोणतीं कारणें झालीं व त्या मनोवृतीच्या योगानें मराठी राज्या वर कोणते इष्टानिष्ट परिणाम घडून आले इत्यादि बाबींचे आह्मी अत्यंत स्थूल दिग्दर्शन या प्रकरणांत करितों. प्रथम च जी एक गोष्ट नमूद करणें जरूर आहे ती ही कीं, महाराष्ट्रांत स्वराज्यस्थापना झाल्या नंतर महाराष्ट्रीय हरीकथानिरूपणी पुढाऱ्यां कडे मराठी राष्ट्रा संबंधीं जोखमीची अशी कोणत्या च प्रकारची जबाबदारी राहिली नाहीं. श्रुतिस्मृत्युक्तधर्मा वर आलेल्या मुसलमान धर्माच्या संकटाचें निवारण स्वराज्यस्थापनेच्या द्वारें झाल्या वर महाराष्ट्राचे हरीकथानिरूपणी पुढारी स्वराज्यांत मिळालेल्या इनाम, देणग्या, इत्यादिकांचा सुखनें उपभोग घेणारे मठाधिपती बनले. या मुळें महाराष्ट्राच्या राष्ट्रीय चारित्र्या वर या पुढाऱ्यांच्या हालचालीचा स्वराज्याच्या अमदानींत ह्मणण्या सारखा कोणत्या च प्रकारचा परिणाम झाला नाहीं. अशा रीतीनें हरीकथा निरूपणी पुढाऱ्यांची वासलात लागल्या नंतर महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांच्या अवनत मनोवृत्तीच्या खेळाचे परिणाम मराठी राज्या वर कोणत्या प्रकारचे झाले यांचें दिग्दर्शन करावयाचें एवढा च कार्यभाग काय तो शिल्लक राहतो.

कोणत्या हि उन्नत भावनेनें प्रेरित होऊन एखाद्या मानवी समाजांतील अनेक व्यक्ति एखादें उच्च स्वरूपाचें कार्य करण्यास प्रवृत्त होतात तेव्हां तें कार्य सिद्ध होई तों पावेतों ती उन्नत भावना त्यांच्या ठाई सतत जागृत असते व त्या भावनेस विघातक अशा अवनत वृत्ति त्यांच्या मनांत सहसा उदीत होत नाहींत. परंतु एकदां तें उच्च कार्य सिद्ध होऊन त्या कार्यास प्रवृत्त कर-

णाऱ्या उन्नत भावनांचा त्या समाजांतील पुढारी वर्गास विसर पडत चालला म्हणजे त्या समाजाच्या पुढाऱ्या मध्यें स्वार्थरूपी अवनत भावना हळु हळू डोकें वर काढूं लागतात. राष्ट्राच्या नेत्या अगर पुढारी वर्गांत समाविष्ट होणाऱ्या अनेक व्यक्तींचा वैयक्तिक स्वार्थ हा भिन्न व परस्पर विरुद्ध असल्या मुळें तो स्वार्थ त्या राष्ट्राच्या पुढाऱ्यांत फूट पाडण्यास कारणीभूत होऊन त्या राष्ट्रांत निरनिराळे तट उत्पन्न होतात व उच्च ध्येयाचा विसर पडत जाऊन वैयक्तिक स्वार्थ साधण्याच्या खटाटोपी त्या समाजाच्या अथवा राष्ट्राच्या पुढाऱ्यां कडून सुरूं होतात. असल्या प्रकारच्या अवनत वृत्तीं पासून उगम पावलेल्या खटप-टीच्या योगानें त्या राष्ट्राच्या चारित्र्या वर अनिष्ट प्रकारचे परिणाम घडतात व वेळेवर च असल्या अवनत वृत्ति दाबांत ठेवण्याचे प्रयत्न न झाल्यास तो समाज अथवा राष्ट्र अधोगतीस जातें. छत्रपति शिवाजी महाराजांनीं महाराष्ट्रांत स्वराज्य स्थापनेचें उच्च कार्य सिद्ध केल्या नंतर वर दर्शविलेल्या कारणांच्या योगानें मराठी राष्ट्रांत कोणकोणतीं स्थित्यंतरें घडून आलीं हें आह्मी नमूद करितों. शिवाजी महाराजांच्या पश्चात् औरंगजेब रूपी रावणाच्या स्वारीचें प्रचंड अरिष्ट मराठी राज्या वर येऊन कोसळलें. या अरिष्टांत संभाजीचा वध होऊन त्याची बायकामुलें औरंगजेबानें कैद केली. संभाजीच्या पश्चात् मराठी राज्याचा काय-देशीर वारस व मालक ह्मटला ह्मणजे संभाजीचा मुलगा छत्रपति शाहू महाराज हे होत. परंतु तो औरंगजेबाच्या कैदेंत पडल्या कारणानें मराठी राष्ट्राचें धूरिणत्व शिवाजी महाराजांचा दुसरा मुलगा ह्मणजे छत्रपति राजाराम याच्या कडे आलें. राजारामाची सर्व हयात औरंगजेबाबरोबर झगडण्यांत गेली. त्याच्या मरण समयीं मराठ्यांच्या गादीचे खरे वारस व मालक शाहू छत्रपति याची सुटका औरंगजेबाच्या कैदेंतून झालेली नव्हती. राजारामाची बायको ताराबाई ही मोठी महत्वाकांक्षी, राजकारणपटु आणि सत्ता लोलूप अशी एक स्त्री होती. राजारामाच्या निधना नंतर शाहू औरंगजेबाच्या कैदेंत असल्या मुळें या बाईच्या हातांत सर्व सत्ता अनायासें गेली व तिनें तिच्या स्वभावास अनुसरून तिचा मुलगा संभाजी याची मराठ्यांच्या गादी वर स्थापना केली. संभाजीच्या ठिकाणीं कर्तृत्वशक्ति बेताची च असल्या कारणानें मराठी राज्याचीं सूत्रें ताराबाई कडून च हालविलीं जाऊं लागलीं. या प्रमाणें संभाजीची स्थापना मराठ्यांच्या गादीवर झाल्या नंतर थोड्या च दिवसांनीं औरंगजेब मरण पावला व त्याच्या पश्चात् दिल्लीच्या तक्ता बद्दल त्याच्या मुलांत तंटे सुरू झाले. तेव्हां औरंगजेबाचा मुलगा बहादुरशा यानें माळवा

प्रांतांत असताना शाहू महाराजास बंधमुक्त करून दक्षिणच्या सहा सुभ्याच्या सरदेशमुखी वतनाच्या चौथाईच्या हक्कांचें फर्मान त्यास करून देऊन दक्षिणेंत जाण्याची त्यास आज्ञा केली. या प्रमाणें शाहू महाराजांची सुटका झाल्या नंतर ते दक्षिणेंत येण्यास निघाले. मराठी राज्याच्या खऱ्या वारसाची व मालकाची सुटका होऊन तो महाराष्ट्रांत येण्यास निघाला असतां वाटेंत त्यास पुष्कळ लोक सामील झाले. शाहू महाराजांच्या आगमनाच्या योगानें महाराष्ट्रीय ब्राह्मण व मराठा क्षत्रिय पुढाऱ्यां पुढें मराठी राज्याचा खरा वारस व मालक कोणास समजावयाचें हा प्रश्न उभा राहिला. शाहू महाराजांच्या बाजूस धर्म व न्याय होता. ताराबाईच्या पक्षास धर्म व न्याय हे दोन्ही नव्हते. तथापि स्वार्थबुद्धि ही धर्म व न्याय यांस झुगारून देऊन आपलें डोकें वर काढण्यास कमी करीत नाहीं या जगाच्या व्यवहारांत नेहमीं निदर्शनास येणाऱ्या तत्त्वास अनुसरून ताराबाई ही स्वार्थास बळी पडून तिनें शाहू महाराजास विरोध करण्याचें ठरविलें. या मुळें महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांत दोन पक्ष निर्माण झाले. एक शाहू महाराजांचा पक्ष व दुसरा ताराबाईचा पक्ष. या दोन पक्षांनीं परस्परास हाणून पाडण्याचें व आपलें वर्चस्व स्थापित करण्याचे कसून प्रयत्न सुरू केले. शाहू महाराजांचा सत्पक्ष असल्या कारणानें व महाराष्ट्रांतील बहुसंख्यांक राजकारणी पुढारी व त्यांच्या मागोमाग महाराष्ट्रिय जनता त्यांच्या पक्षास सामील असल्या कारणानें शाहू महाराजांची मराठ्यांच्या गादी वर अखेर स्थापना झाली. ताराबाईच्या पक्षास हि प्रथम पासून रामचंद्र निळकठ अमात्य व दुसरे कांहीं प्रमुख महाराष्ट्रिय राजकारणी पुढारी सामिल असल्या कारणानें तिच्या पक्षाचा पुरा मोड न होतां कोल्हापूर येथें मराठ्यांची स्वतंत्र गादी स्थापन करण्यांत येऊन त्या गादीचा संभाजी मालक झाला. अशा रीतीनें शिव छत्रपतीच्या घराण्यांत फूट पडल्या कारणानें मराठी राष्ट्रांत कायमची फूट पडली गेली. या फुटी मुळें महाराष्ट्रीय क्षत्रिय व ब्राह्मण राजकारणी पुढाऱ्यांत दोन तट उत्पन्न झाले. शाहू महाराजांचा पक्ष बाळाजी विश्वनाथ यानें स्वीकारिला. रामचंद्र निळकंठ अमात्य हा कोल्हापूरचे पक्षास जाऊन मिळाला. ही मराठी राष्ट्रांत पडलेली फूट नाहींशी करून सातारा व कोल्हापूर येथील दोन्ही गाद्या एकवटण्याचा शिकस्तीचा प्रयत्न नानासाहेब पेशवे यांनीं केला. परंतु त्यांत त्यास यश आले नाहीं. ताराबाईच्या स्वार्थ बुद्धी मुळें उत्पन्न झालेला हा पक्षभेद मराठी राज्य रूपी देहाच्या

राजकारणाच्या प्रदेशांत अखेर पावेतों एखाद्या शल्या सारखा सलत राहिला. राजकारण बाबत कोणता हि प्रश्न उपस्थित झाला असतां कोल्हापूरकर छत्रपति हे सातारकर छत्रपति व त्याच्या वतीनें राज्यकारभार करणारे भट पेशवे यांच्या विरुद्ध असावयाचें हें जसें कांहीं ठरून गेल्या सारखें होते. कोल्हापूरकर छत्रपति घराण्याच्या या स्वभावा मुळें पटवर्धन सरदार घराणीं उदयास आलीं. अमुक व्यक्ति शत्रु असे एकदां ठरलें म्हणजे त्याच्या कडून होणाऱ्या विरोधाचा बंदोबस्त करणें ओघाने च प्राप्त होतें. कोल्हापूरकरांच्या वरील प्रकारच्या विरोधी वृत्ती मुळें स्वसंरक्षणार्थ पेशव्याना पटवर्धन सरदारास सैन्य ठेवण्या करितां जहागिरी देणें प्राप्त झाले. मराठी राज्य लयास जाऊन इंग्रजी राज्य स्थापित झाल्यास आज जवळ जवळ शंभरा पेक्षां थोडी फार अधिक वर्षें होऊन गेलीं. तथापि या संस्थानाचा व पटवर्धन घराण्याचा त्या च प्रमाणें महाराष्ट्राच्या राजकारणाचे केंद्र जें पुणें शहर तेथील पुढाऱ्यांच्या परस्पर संबंधाचा बारकाईनें विचार केला असतां कोल्हापूरकर छत्रपति घराण्याच्या पूर्व स्वभावाची छटा अद्याप पावेतो कायम आहे असें निदर्शनास आल्या खेरीज राहणार नाहीं. इंग्रजी राज्य स्थापित झाल्या नंतर या घराण्यांतील दोन तीन पुरुष चमत्कारीक परिस्थितींत मरण पावले. त्या मुळें पुण्यश्लोक छत्रपति शिवाजी महाराजाच्या वंश या नात्याने महाराष्ट्रीय जनतेस कोल्हापूरकर छत्रपति घराण्या विषयीं बरी च सहानुभूति वाटूं लागली होती. नुकते च कैलासवासी झालेले कोल्हापूरचे शाहू छत्रपति हे सज्ञान होऊन संस्थानचीं अधिकार सूत्रें यांच्या कडे सोपविण्यांत आलीं त्या वेळीं महाराष्ट्रांतील प्रमुख पुढारी व वर्तमानपत्रकार यांनीं या घराण्यास सुखाचा दिवस लाभल्या बद्दल आपला परम आनंद व्यक्त केला होता. परंतु शेवटीं पूर्व परंपरेस अनुसरून ह्मणा अगर दैवाच्या विचित्र गती मुळें ह्मणा शाहू छत्रपति व बहुसंख्यांक महाराष्ट्रीय जनता यांच्या मध्यें तेढ उत्पन्न झाल्या खेरीज राहिली नाहीं. शिव छत्रपतींच्या घराण्यांतील या फूटीच्या योगानें मराठी राज्याच्या अंतस्थ व पर राष्ट्रीय राजकरणा वर कोणते घातुक परिणाम झाले या संबंधाची साद्यंत व तपशिलवार माहिती दिल्यास बरा च पाल्हाळ होईल सबब त्या भानगडींत आह्मी पडत नाहीं. मराठी राज्याचीं सूत्रें ताराबाई सारख्या स्त्रीच्या हातीं गेल्या मुळे तिची स्वार्थरूपी अवनत वृत्ति मराठी राज्यरूपी देहास क्षीणता आणण्यास कशी कारणीभूत झाली याचें दिग्दर्शन केल्या नंतर भट

पेशवे घराण्यांत घडलेल्या असल्या च स्वरूपाच्या दुसऱ्या एका बाबीचें आह्मी दिग्दर्शन करितों.

नानासाहेब पेशव्यांच्या मरणा नंतर त्यांचे बंधु राघोबा दादा यांच्या मनांत पेशवे पदा वर आरूढ होण्याची महत्त्वाकांक्षा त्यांची कारस्थानी स्त्री आनंदीबाई इनें उद्भुत केली. ताराबाई प्रमाणें च आनंदीबाई ही महत्वाकांक्षी, दुष्ट व मत्सरी स्वभावाची स्त्री होती. पेशवाईचीं अधिकार सूत्रें आपल्या नवऱ्याच्या हातीं यावीं अशी उत्कट लालसा तिच्या ठाई वसत होती. परन्तु पेशवे पदावर अधीष्ठित झालेला थोरला माधवराव पेशवा हा वयानें लहान असून हि अपूर्व कर्तबगारीचा, करारी व मुत्सद्दी असल्या कारणानें त्याच्या कारकार्दीत राघोबा दादाचे पेशवेपद प्राप्त करून घेण्याचे सर्व डाव फसले जाऊन त्यास मूग गिळून स्वस्थ बसणें भाग पडलें. थोरल्या माधवरावांच्या निधना नंतर नारायण-राव हा पेशवेपदा वर अधिष्टित झाला. थोरला माधवराव पेशवा जितका कर्तबगार व मुत्सद्दी होता तितका च नारायणराव हा दुबळा व कर्तृत्वहीन होता. या मुळें राघोबा दादा व आनंदीबाई यांच्या पेशवेपदाचीं सूत्रें हस्तगत करण्याच्या लालसेनें फिरून उचल केली. राघोबा दादा व आनंदीबाई यांनीं पेशवेपद प्राप्त करून घेण्या करितां सुरूं केलेल्या कारस्थानांत नारायणराव पेशव्याचा खून होऊन महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांत दोन तट उत्पन्न झाले. नारायणरावांचा खून झाला त्या वेळीं त्यांची स्त्री गरोदर होती व तिजला पुत्र झाल्यास पेशवेपदा वर त्यास अधिष्ठित करावा अशा प्रकारचा व्यूह त्या काळच्या प्रमुख महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यानीं रचला. यास च बारभाईचें कारस्थान असें ह्मणतात. या कारस्थाना मुळें राघोबा दादाचा बेत सपशेल फसला गेला. धर्माच्या व न्यायाच्या दृष्टीनें राघोबा दादाचा पक्ष लंगडा असल्या कारणाने त्या काळाच्या महा-राष्ट्रातील राजकारणी पुढाऱ्यां पैकीं नांव घेण्या सारख्या कोणत्या हि पुरुषाचा त्यास पाठिंबा मिळाला नाहीं. या शिवाय पुतण्याच्या खूना सारख्या अत्यंत हीन पातकाचा दोष त्याच्या माथीं आल्या कारणानें महाराष्ट्रांतील सामान्य जनतेचीं मनें हि राघोबा विरुद्ध होतीं. अशा स्थितींत मराठ्यांचे त्या काळचे शत्रु ह्मणजे इंग्रज व निजाम यांच्याशीं सख्य करून त्यांच्या आश्रयास जाण्या-वांचून राघोबास दुसरें गत्यंतर नव्हतें. नारायणरावाचा खून होण्याच्या पूर्वी पासून च मराठ्यांच्या राजकारणांत आपला हात कसा शिरकावितां येईल याची

इंग्रज काक दृष्टि ठेऊन वाट पहात बसले होते. पेशवाईपद मिळविण्या च्या राघोबाचा बेत हाणून पाडण्या करितां बारभाई चें कारस्थान उभारले गेल्य कारणान इंग्रजास अनायासे च ज्या गोष्टीची अपेक्षा होती ती घडून आली. या नंतर राघोबाचा व इंग्रजाचा स्नेह जुळून त्यास पेशवाई मिळवून देण्या करिता सर्व प्रकारचे साह्य करण्याचा इंग्रजांनीं त्याच्या बरोबर करार केला. पेशवे घराण्याचे पूर्वापार शत्रु कोल्हापूरकर छत्रपति व निजाम हे राघोबा दादास या राजकारणांत फिरून सामिल झाले. हें राजकारण अशा रीतीनें सिद्ध झाल्या नंतर इंग्रजांचें व मराठ्यांचे युद्ध सुरूं झालें. परंतु मराठी राज्याच्या आयुष्याची दोरी बळकट असल्या कारणानें राघोबाच्या पाठीराख्या इंग्रजांचा पुरा मोड होऊन पेशव्या कडून वार्षिक नेमणूक घेऊन राघोबास त्याच्या आयुष्याचे राहिलेले बाकीचे दिवस गोदा तटाकाच्या कोपरगांवीं हरी हरी ह्मणत स्वस्थ बसून घालवावे लागले. पेशवेपद मिळविण्या करिता राघोबा दादांनीं केलेल्या कारस्थानाच्या पश्चात् सवाईमाधवराव मृत्यु पावल्या वर त्या पदा बद्दल फिरून वाद उत्पन्न झाला. बाजीराव रघुनाथा विषयीं नाना फडणीसांचा प्रतीकूलग्रह असल्या कारणाने सवाईमाधवरावाच्या मरणा नंतर त्यांची स्त्री यशोदाबाई हिच्या मांडी वर बाजीराव रघुनाथाचा धाकटा भाऊ चिमाजी आप्पा यास दत्तक देऊन त्याची पेशवेपदा वर स्थापना करावयाचा असा नाना फडणीस यांनीं व्यूह रचला व त्या प्रमाणें चिमाजी आप्पाचे दत्तविधान उरकून घेण्यांत आलें. नाना फडणीसांनीं या कारस्थानाची उभारणी चालविली असता बाजीरावाने दौलतराव शिंद्यांचें साह्य मिळवून पेशवेपद मिळविण्याची खटपट सुरूं केली. पेशवेपदा संबंधीं उपस्थित झालेल्या या कारस्थानाचा इतिहास वाचला असता त्या काळाच्या महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यात आत्म्याच्या अनेक अवतन वृत्ती पैकीं वैयक्तिक स्वार्थ साधण्याची अनन्वत वृत्ति किती परमावधीस पोहोचली होती हें उत्तम रीतीनें दिसून येतें. या कारस्थानाच्या पायीं "खुप शर्तीनें राज्य राखिले फडणीस नाना" या शब्दांनीं गौरवण्यांत आलेल्या व प्रसिद्ध पावलेल्या नानास कारागृहवास भोगावा लागला. त्या च प्रमाणें नाना आणि परशुराम भाऊ पटवर्धना सारखे जन्माचे स्नेही वैरी बनले. या व असल्या च प्रकारच्या विचित्र घटना या कारस्थानात अस्तित्वांत आल्या. त्या काळाच्या या कारस्थानात सामिल असलेल्या महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांच्या वर्तनाचें निरीक्षण केलें असता वैयक्तिक स्वार्थ बाजूस ठेऊन व सर्वांची एक जूट

करून मराठी राज्य गिळंकृत करण्यास टपून बसलेल्या इंग्रजा सारख्या प्रबळ शत्रूचा प्रतिकार करण्याची भावना यत्किंचित् हि कोणाच्या मनास भासत असल्याचें दिसून येत नाहीं. या कारस्थानांत त्या काळाच्या महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्याच्या ठाईं दृष्टोत्पत्तीस आलेल्या वैयक्तिक स्वार्थाचा १७।१८ वर्षां नंतर अतिरेक होऊन मराठी राज्य लयास जाऊन महाराष्ट्राच्या पायांत पर सत्तेच्या शृंखळ्या पडल्या गेल्या. छत्रपतीच्या घराण्यांत पडलेल्या फूटी मुळे मराठी राज्यरूपी देहास ज्या प्रमाणें यातना भोगाव्या लागल्या तशा च प्रकारच्या यातना भट पेशवे घराण्यातील फूटी मुळें मराठी राज्यास भोगणें प्राप्त झालें. मराठी राज्यरूपी देहास क्षीणता आणणाऱ्या वरील प्रमुख कारणांचें दिग्दर्शन केल्या नंतर आत्म्याच्या अवनत वृत्ती मुळें मराठी राष्ट्रास जर्जर करणाऱ्या दुसऱ्या कांहीं कारणांच्या दिग्दर्शना कडे व चर्चे कडे आतां आह्मी वळतों.

ज्या मानवी समाजास महाराष्ट्रीय समाज अथवा मराठी राष्ट्र असें ह्मणतात तो मानवी समाज वर्ण व जाती भेद यांनीं युक्त आहे असें या प्रकरणाच्या सुरवातीस च आह्मीं दर्शविलें आहे. या समाजाच्या वर्ण व जाती विशिष्ट रचनेच्या योगानें या समाजांतील निरनिराळ्या वर्णांच्या व जातीच्या लोका मध्यें भिन्नता व असमता अस्तित्वांत आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार प्रमुख वर्णांतील लोकांचा परस्परांशीं रोटी बेटी व्यवहार होत नाहीं. या प्रमुख वर्णांचे अनेक पोट भेद असून निरनिराळ्या पोट भेदांतील लोकांचा परस्परांशी रोटी व्यवहार होतो परंतु बेटी व्यवहार होत नाहीं. अशा प्रकारच्या निरनिराळ्या वर्णांच्या व जातीच्या लोका मधील भेदा मुळें व असमते मुळें प्रत्येक प्रमुख वर्ण व जाती यांत समाविष्ट होणाऱ्या लोकाच्या स्वार्थांत विरोध उत्पन्न होण्यास सहज च वाव सांपडते. या स्वार्थमूलक विरोधा मुळें महाराष्ट्रधर्म स्थापनेचे श्रेष्ठ ध्येय साध्य होतां च महाराष्ट्रीय समजांतील राजकारणी पुढाऱ्याची दृष्टि श्रेष्ठ ध्येया पासून च्युत होऊन वैयक्तिक स्वार्था कडे झुकावयास लागली. महाराष्ट्रीय समाजांत मराठी राज्याच्या अमदानींत वर दर्शविलेल्या भेदा पासून उत्पन्न होणारी स्वार्थबुद्धि मराठी राष्ट्रांत फूट उत्पन्न होण्यास बरी च कारणीभूत होऊन तिच्या योगानें मराठी राज्य अखेर लयास गेलें. महाराष्ट्रीय समाजातील नुसत्या पंच द्रवीड ब्राह्मणात देशस्थ ( अश्वलायन, शुक्ल यजुर्वेदी ), कोकणस्थ, कऱ्हाडे, काणव, देवरुखे इत्यादि

प्रमुख भेद असून या परस्परांत बेटी व्यवहार होत नाहीं. त्या च प्रमाणें पंचगौड ब्राह्मणांत अंतर्भूत होणाऱ्या सारस्वत ब्राह्मणांत हि चार पांच प्रमुख भेद असून परस्परांत बेटी व्यवहार होत नाही. या शिवाय महाराष्ट्रीय समाजांत अंतर्भूत होणाऱ्या इतर वर्णांच्या लोकां मध्यें हि अनेक पोट भेद आहेत. महाराष्ट्रीय राजकारणी पुढारी ब्राह्मण व क्षत्रिय या दोन ज्ञाती पैकीं च बव्हंशीं असल्या कारणानें या वर्णांच्या पुढाऱ्यांतील भेदा मुळे उत्पन्न झालेले परस्परविरोधी वैयक्तिक स्वार्थ मराठी राज्यास बरें च जाचक झालें. या दोन वर्णांच्या लोकां खेरीज बाकीच्या वर्णांच्या लोकां पैकीं मराठ्यांच्या राजकारणांत प्रामुख्यानें भाग घेणारे पुढारी क्वचित् च असल्या कारणानें या वर्णांच्या लोकांतील पोट भेदाच्या योगानें मराठी राज्या वर म्हणण्या सारखे घातुक परिणाम झाले नाहींत. महाराष्ट्रीय समाजांत ब्राह्मण व क्षत्रीय वर्णांच्या लोकां पेक्षां इतर वर्णांच्या व जातींच्या लोकांची संख्या फार मोठी आहे. या लोकाचा मराठी राष्ट्राच्या राजकारणाशीं महाराष्ट्रीय समाजाच्या चातुर्वर्ण्यविशिष्ट रचनेच्या योगानें म्हणण्या सारखा निकट संबंध नसल्या मुळें त्यांची मनोवृत्ति राष्ट्राच्या राजकारणा विषयीं उदासीन असे व त्या मुळें राष्ट्रांत होणाऱ्या राजकीय घडामोडी राष्ट्रास अपायकारक झाल्या तरी त्या बद्दल त्यांना सुख अगर दुःख असें कांही च वाटत नसे. वर दर्शविल्या प्रमाणें महाराष्ट्रांतील निरनिराळ्या वर्णांच्या व पोट जातींच्या लोकांत अस्तित्वात असलेल्या भेदा मुळे व असमते मुळे मराठ्यांच्या राष्ट्र प्रकृती वर कोणते अनिष्ट परिणाम घडले याचें आह्मी स्थूल दिग्दर्शन करितों.

महाराष्ट्रीय ब्राह्मण वर्णा पैकीं देशस्थ, कोकणस्थ व कऱ्हाडे या तीन पोट भेदां पैकीं लोक मराठी राज्याची स्थापना होऊन तें लयास जाई तों पावेतों प्रामुख्यानें महाराष्ट्रीय समाजाचे राजकारणी पुढारी होते. शिवाजी महाराजांनीं स्वराज्य स्थापनेचा उपक्रम सुरू करण्या पूर्वी शहाजी राजाच्या पदरीं असलेले मुत्सद्दी देशस्थ ब्राह्मण होते. स्वराज्य स्थापने पूर्वी शहाजी राजांनीं शिवाजी महाराजांची रवानगी त्यांच्या सुपे प्रांतांतील जहागिरी कडे जेव्हां केली त्या वेळीं या पुढाऱ्यां पैकीं त्यांच्या विश्वासांतले व राजकारणपटु असे संक्राजी निळकंठ, बाळकृष्ण मजमदार, सोनोपंत डबीर व रघुनाथ बल्लाळ कोरडे यांची त्यांनीं शिवाजी महाराज बरोबर रवानगी केली. या मुत्सद्या खेरीज दादोजी कोंडदेव हा

पूर्वी पासून च पुणें व सुप्या कडील शहाजीच्या जहागिरीचा कारभार पहात होता. शिवाजी महाराजांनीं स्वराज्यस्थापना केल्या पासून थेट त्यांच्या कारकीर्दीच्या अखेर पावेतों त्यांचे अष्टप्रधान, सर कारकून, सर सुभेदार, सुभेदार इत्यादि अधिकारी या वर्गा पैकीं च होते. लष्करी खात्यातील हुद्देदार शिवाजी महाराजांच्या कारकीर्दींत पासलकर, कंक, मालुसरे, घाडगे, निंबाळकर, गुजर, पालकर, जगताप, शिर्के, मोहिते, येवले, दाहातोंडे इत्यादि मराठा क्षत्रिय वर्णा पैकीं होते. चिटणिसी कामा वर कायस्थ प्रभू ज्ञातींतील लोक होते. शिवाजी महाराजांच्या पश्चात् संभाजी व राजाराम महाराजाच्या कारकीर्दींत जवळ जवळ ही च स्थिति कायम होती. शाहू महाराजाच्या कारकीर्दी पासून या स्थितींत बाळाजी विश्वनाथ पेशव्यांच्या उदया मुळें एकदम स्थित्यंतर घडून आलें. बाळाजी विश्वनाथ व त्याच्या पश्चात् त्यांचा मुलगा पहिला बाजीराव हे जबरदस्त कर्तृत्ववान् असे पुरुष निपजल्या कारणानें कोकणस्थ ब्राह्मणाचा मराठ्यांच्या राजकारणात शिरकाव होऊन त्यानी मराठी राज्याच्या राजकारणात अग्रस्थानाची जागा प्राप्त करून घेतली. कोकणस्थ भट पेशव्या प्रमाणे भानू, रास्ते, पटवर्धन इत्यादि दुसरीं कित्येक कोकणस्थ घराणीं कोकणातून वर घाटी आलीं व मराठ्यांच्या राजकारणाच्या प्रदेशात त्यांचा शिरकाव होऊन या घराण्यांतील पुरुष मराठी राष्ट्राचे पुढारी बनले. भट पेशव्याच्या राजकारणात झालेल्या शिरकावा पासून घडून आलेल्या स्थित्यतराच्या योगानें शिवाजी महाराजांच्या काळाच्या देशस्थ राजकारणी पुढाऱ्यांस अर्थात्च विषाद वाटू लागला. प्रतिनिधी व भट पेशवे यांच्या वैमनस्याच्या बुडाशीं हा च विषाद वसत होता. या विषादा मुळें प्रतिनिधी घराण्यातील पुरुषांनीं बाजीरावास व त्याच्या पश्चात् नानासाहेब पेशवे यास खालीं ओढण्याचा आटोकाट प्रयत्न केला व या मुळें या दोन घराण्यातील वैमनस्याचा अपायकारक परिणाम मराठ्यांच्या राजकाणावर घडल्या वाचून राहिला नाहीं. भट पेशवे घराण्याच्या हातांत पेशवाईचीं सूत्रे गेल्या मुळें देशस्थ ब्राह्मण मराठ्यांच्या राजकारणाच्या प्रदेशांतून अंतर्धान पावले असा प्रकार बरीक घडला नाही. भट पेशवे घराण्याशीं ऋणानुबंध व स्नेह असणाऱ्या पुरंदरे, विंचुरकर, राजे बहाद्दर, पानशे, बोकील, मुजूमदार इत्यादि नूतन देशस्थ घराण्यांतील पुरुष उदयास येऊन त्यांचा मराठ्यांच्या राजकारणात प्रवेश झाला. तथापि देशस्थ व कोकणस्थ ह्या भिन्न भावाच्या अस्तित्वाचा अनिष्ट परिणाम मराठी राजकाणा वर झाल्या खेरीज

रहात नसे. मराठी राज्याच्या पूर्वार्धांत शिवाजी महाराजांच्या अष्ट प्रधानां पैकीं सारस्वत ब्राह्मणांचे मंत्री घराणें हें एकेंट च प्रसिद्धीस आले होते. या ज्ञाती पैकीं जिवबा दादा बक्षी हे शिंद्यांच्या पदरीं मुत्सदी व लढवय्ये या नात्यानें पेशवाईच्या उत्तरार्धांत प्रसिद्धीस आले. यांच्या मुळे शिंद्याच्या दरबारी कित्येक सारस्वत ब्राह्मण घराण्यांचा प्रवेश झाला. महादजी शिंदे व नाना फडणीस या उभयतां मध्ये पेशवाईच्या उत्तरार्धांत जेव्हां स्पर्धा सुरू झाली, तेव्हां शिंद्यांचे आश्रित या नात्यानें जिवबा दादा बक्षी याची पेशव्याच्या दरबारातील पुण्याच्या कोकणस्थ व देशस्थ मुत्सदी मंडळींशीं स्वाभाविकपणे तेढ उत्पन्न झाली. कऱ्हाडे ब्राह्मण ज्ञातींतील ब्राह्मणांचा प्रवेश मराठ्यांच्या राजकारणांत पेशवाईच्या उत्तरार्धांत झाला. या ज्ञाती पैकीं प्रसिद्ध घराणें ह्मणजे गोविंदपंत बुंदेले यांचे होय. या घराण्याचा उदय थोरल्या बाजीराव पेशव्यांच्या मुळें च झाला. महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांत या ज्ञाती पैकीं थोड्या च व्यक्ति असल्या कारणानें देशस्थ व कोकणस्थ या भेदा मुळे उत्पन्न होणाऱ्या स्वार्थबुद्धीचे परिणाम मराठी राज्यास जितके जाचक झाले तितके या ज्ञातींतील राजकारणी पुढाऱ्यांच्या ठायीं असणाऱ्या भेदाभावा मुळें उत्पन्न होणाऱ्या स्वार्थबुद्धीचे परिणाम मराठी राज्यास जाचक झाले नाहींत. आतां महाराष्ट्रांतील दुसरी प्रमुख ज्ञात ह्मटली ह्मणजे मराठा क्षत्रियाचा होय. शिवाजी महाराजांच्या काळीं लष्करी खात्यांतील सर्व प्रमुख पुढारी या वर्गांतील होते. शिवाजी महाराजांचे सर्व सेनापति मराठा क्षत्रिय होते. त्यांच्या पश्चात् संभाजी व राजाराम यांच्या कारकीर्दींत हि मराठ्यांच्या सर्व लष्करी हालचालींचे धूरिणत्व या च वर्गांतील पुरुषां कडे होतें. महाराष्ट्राच्या स्वातंत्र्य रक्षणार्थ सतत पंचवीस वर्षे सुरू असलेल्या युद्धाचा सर्व भार धनाजी जाधवराव व संताजी घोरपडे यांनीं आपल्या शिरा वर घेतला होता. मराठी राज्य व महाराष्ट्राचें स्वातंत्र्य शाबूत ठेवण्याचें सर्व श्रेय या दोन व्यक्ति व ब्राह्मण ज्ञाती पैकीं रामचंद्र निळकंठ अमात्य यांस च देणें प्राप्त आहे. शाहू महाराजांस छत्रपतिपद प्राप्त झाल्या नंतर धनाजी जाधवराव शाहू महाराजां वर नाखुष होऊन निजामास जाऊन मिळाले. त्या नंतर बाळाजी विश्वनाथ यास सेनाकर्ते हें पद प्राप्त होऊन मराठी राष्ट्राचे लष्करी पुढारपण हि भट पेशवे घराण्या कडे आले. या मुळें शिवाजी महाराजांच्या काळचीं जीं लष्करी पेशाची मराठा क्षत्रिय घराणीं होतीं तीं भट पेशवे घराण्या वर नाराज

झाली. अशा घराण्यांच्या स्वार्थ बुद्धीच्या योगानें मराठी राष्ट्रास घातुक अशा प्रकारच्या थोड्या बहुत खटपटी त्यांच्या कडून होत असत. तथापि पुरातन मराठा क्षत्रिय घराण्यां पैकीं कित्येक लोक पेशव्यांच्या बाजूचे होते व मराठ्यांच्या लष्करी मोहिमांत हे लोक प्रामुख्यानें भाग घेत असत. शाहू महाराजांच्या कारकीर्दीत उदयास आलेले नूतन मराठा क्षत्रिय घराणें ह्मणजे नागपूरकर भोसल्यांचें होय. या घराण्याचें व भट पेशवे घराण्याचें रहस्य नव्हते. याच्या मुळें मराठी राज्या वर थोडा बहुत अनिष्ट परिणाम घडल्या खेरीज राहिला नाहीं. या दोन घराण्यांचा परस्परांशीं विशेष संबंध येऊं नये ह्मणून प्रथम पासून च बंगाल, ओरीसा इत्यादि प्रांत काबीज करून त्यां वर मराठ्यांची सत्ता स्थापित करण्याचा कार्यभाग शाहू छत्रपतींनीं नागपूरकर भोसले घराण्या कडे सोंपविला होता. नागपूरकर भोसल्या खेरीज गायकवाड, शिंदे, होळकर, पवार इत्यादि मराठा क्षत्रिय घराण्यांतील पुरुषांस त्यांच्या अंगाच्या शौर्य, कर्तबगारी इत्यादि गुणां मुळें सरदार पदाप्रत पहिल्या बाजीरावानें चढविलें. शिवछत्रपतींच्या काळाच्या सरदार घराण्याना पेशव्यानीं निर्माण केलेल्या या नूतन सरदाराबद्दल हेवा व मत्सर वाटत असे. परंतु हे सर्व सरदार आद्वितीय कर्तबगारीचे असल्या कारणानें त्यांच्या विषयीं इतरांस वाटणाऱ्या हेव्या मुळें अगर मत्सरा मुळें स्वराज्यास ह्मणण्या सारखा अपाय झाला नाहीं. मराठा क्षत्रिय ज्ञातीच्या खालोखाल मराठ्यांच्या राजकारणाशीं ज्या ज्ञातीचा संबंध होता अशी ज्ञात ह्मटली ह्मणजे चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंची होय. शिवपूर्वकालीं देवगिरीच्या यादव घराण्याचा मोड मुसलमानांनीं केल्या नंतर ठाणें कोकण प्रांतांत ज्या राजकीय उलाढाली झाल्या त्या काळीं ह्या ज्ञातीचे लोक अधिकारी या नात्यानें महाराष्ट्रांत प्रथम आले. स्वराज्यांतील लेखनाचें कार्य या घराण्या कडे शिवाजी महाराजांनीं सोपविलें होतें. शिवाजी महाराजांच्या पश्चात् औरंगजेबा बरोबर स्वराज्य रक्षणार्थ जें युद्ध राजारामाच्या कारकीर्दीत सुरू होतें त्या युद्धांत या ज्ञातींतील कांहीं पुढाऱ्यानीं मर्दुमकीचीं कामें केलीं. शाहू छत्रपतींच्या कारकीर्दीत भट पेशवे घराणें पुढें आलें. त्या समयीं चिटणीस घराण्यांतील पुरुषांची सहानुभूति पेशवे घराण्यांतील पुरुषां विषयीं होती. परंतु ही स्थिति थोरल्या माधवराव पेशव्याच्या निधना नंतर नारायणराव पेशव्यांच्या हातीं पेशवाईचीं सूत्रें आल्या पासून पालटण्यास सुरुवात झाली. कायस्थ प्रभूंच्या आचार विषयक वादा मुळें

पेशव्या विषयीं या ज्ञातीच्या लोकांच्या मनांत तेढ उपस्थित झाली. श्रुतिस्मृत्युक्तधर्मास अनुसरून कायस्थ प्रभूनीं मुंज, विवाह इत्यादि संस्कार वेदोक्त मंत्रांनीं करावें कीं पुराणोक्त मंत्रांनीं करावे हा वाद उपस्थित होऊन त्या मुळें ही तेढ उपस्थित झाली. ब्राह्मण ज्ञातीच्या शास्त्रीमंडळात कायस्थ प्रभूंचे संस्कार वेदोक्त मंत्रांनीं करण्यास प्रत्यवाय नाहीं असें प्रतिपादन करणारे कांहीं लोक होते. कांहीं या मताच्या विरुद्ध मत प्रतिपादन करणारे व कायस्थ प्रभूनीं आपले संस्कार पुराणोक्त मंत्रांनीं करावें असें ह्मणणारे होते. अशा प्रकारचा विरोध ह्या प्रश्ना संबंधीं उत्पन्न झाल्या कारणानें या बाबतींत श्रेष्ठ राजसत्ताधिकारी या नात्यानें हुकूम करणें पेशव्यास प्राप्त झालें. महाराष्ट्रीय समाजांतील प्रत्यक व्यक्तीनें ती व्यक्ति ज्या ज्ञातीची असेल त्या ज्ञातीच्या आचारास अनुसरून वर्तन केलें पाहिजे असा धर्माचा निर्बंध होता. त्या च प्रमाणें या नियमास अनुसरून एखाद्या व्यक्तीनें आचरण न केल्यास त्या बद्दल शासन करणें हें धर्मा प्रमाणें राजसत्ताधिकाऱ्यांचें कर्तव्य समजलें जात होते. या मुळें कायस्थ प्रभू ज्ञातींतील लोकांच्या आचार विषयक बाबती संबंधीं श्रुतिस्मृत्युक्तधर्मास अनुसरून पेशव्यांनीं त्या काळीं विशिष्ट प्रकारचे हुकूम केले. वेदोक्त मंत्रांनीं मुंज, विवाह इत्यादि संस्कार करण्याचा कायस्थ प्रभू ज्ञातींतील लोकांस अधिकार नाहीं असा या हुकूमाचा मतितार्थ होता. पेशव्यांनीं केलेल्या ह्या हुकूमान्वयें त्या काळाच्या कायस्थ प्रभू ज्ञातींतील पुढारी नारायणराव पेशव्या विरुद्ध होऊन राघोबा दादांच्या पक्षास सामिल झाले. नारायणराव पेशव्याच्या खुनाशीं राघोबा दादाचा संबंध असल्या कारणाने त्याच्या पक्षास सामील झालेल्या कायस्थ प्रभू ज्ञातींतील पुढाऱ्यां वर राघोबा दादाच्या विरुद्ध पक्षाचा अत्यंत रोष झाला. ह्या रोषा मुळें कायस्थ प्रभू ज्ञातींतील कांहीं पुढाऱ्यांस अत्यंत हालअपेष्टा सोसाव्या लागल्या. प्रस्तुत काळीं कोंकणस्थ भट पेशव्यांनीं निव्वळ जातीमत्सरा मुळें कायस्थ प्रभू ज्ञातीच्या आचार विषयक वादाच्या बाबतींत धर्मा विरुद्ध हूकूम सोडण्याचा अव्यापारेषु व्यापार केला असे या प्रश्नाची चर्चा करणाऱ्या लेखकांचें मत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. परंतु हें मत कितपत योग्य आहे ह्या प्रश्नाचा विचार त्या काळची वर दर्शविलेली जी शासन पद्धति अस्तित्त्वांत होती ती लक्षांत घेऊन केला पाहिजे. मराठ्यांनीं स्थापिलेल्या स्वराज्यांत मनु, याज्ञवल्क्य इत्यादि स्मृति ग्रंथ, विज्ञानेश्वरादि टीका ग्रंथ व निरनिराळ्या धर्म बाबीं संबंधी वेळोवेळीं रच-

ण्यांत आलेले प्रबंध ग्रंथ यांत सांगितलेल्या विधिनिषेधरूपी आज्ञास अनुसरून स्वराज्यांतील प्रजेनें वागलें पाहिजे व या आज्ञा विरुद्ध आचरण करणारा राजसत्ताधिकाऱ्यां कडून दंडास पात्र समजला जात असे, असा त्या काळीं दंडक होता. ही बाब लक्षांत घेतली असतां नारायणराव पेशव्यांच्या कारकीर्दींत कायस्थ प्रभु ज्ञातीच्या आचारा संबंधीं करण्यांत आलेले हुकूम अव्यापारेषु व्यापार अशा स्वरूपाचे होते असें विधान करणें न्यायास व वस्तुस्थितीस धरून होणार नाहीं. प्रस्तुत काळीं धार्मिक आचाराच्या बाबतींत सर्वत्र बेबंदशाही माजून महाराष्ट्रीय समाजांतील ब्राह्मणा पासून चांडाला पावेतों सर्वांस मनसोक्त आचार करण्याची मुभा मिळाल्या कारणानें व मराठ्याच्या राज्यांत अस्तित्वांत असलेल्या शासनपद्धती विषयींच्या अज्ञाना मुळें वरील प्रश्ना संबंधीं प्रस्तुत काळाच्या लेखकांचा ग्रह वरील प्रकारचा व्हावा यांत कांहीं आश्चर्य नाहीं. प्रभू ज्ञातीच्या आचार विषयक बाबीं मुळें ब्राह्मण व प्रभू ज्ञातींत जी तेढ उत्पन्न झाली त्या तेढीचे दुष्परिणाम मराठ्यांच्या स्वराज्यास चांगले च भोगावे लागले हें इतिहासा वरून सहज दिसून येण्या सारखें आहे. वर्ण व जातीभेदा मुळें उत्पन्न होणाऱ्या स्वार्थ, मत्सर, द्वेष इत्यादि आत्म्याच्या अवनत वृत्ती पासून मराठ्यांच्या स्वराज्या वर अनिष्ट परिणाम कशा प्रकारचे घडले या संबधाचे त्रोटक दिग्दर्शन येथ पावेतों केले आहे. या च स्वरूपाची आणखी एक बाब या ठिकाणीं नमूद करणें जरूर आहे. महाराष्ट्रीय समाजात अस्पृश्य मानलेल्या महार, माग ज्ञातीच्या लोकांची संख्या बरी च मोठी आहे. इंग्रजांचा महाराष्ट्रांत प्रवेश होऊन इंग्रजी राज्य स्थापन करण्याची महत्त्वाकांक्षा इंग्रजां मध्यें उत्पन्न झाल्या नंतर इंग्रजांनीं त्यांच्या सैन्यांत एतद्देशीय लोकांची भरती करण्यास सुरवात केली. इंग्रज हे चातुर्वर्ण्य बाह्य असल्या कारणानें महाराष्ट्रीय समाजांतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्यादि जातींतील लोक सुरवातीस त्यांना मिळणें दुरापास्त झालें. जातीभेद, वर्णभेद या बाबी इंग्रजांस पारख्या होत्या. त्या च प्रमाणे स्पृश्यता व अस्पृश्यता या हि बाबींची त्यास वार्ता नव्हती. अशा स्थितींत महाराष्ट्रीय समाजातील अस्पृश्य मानलेल्या महार मांगादि जातीच्या लोकांची इंग्रजांनीं आपल्या सैन्यांत सुरवातीस भरती केली. या लोकांस इंग्रज अस्पृश्य मानीत नसल्या कारणाने या वर्णातील लोकांस इंग्रजां विषयीं सहाजिक

रीतीनें प्रेम वाटूं लागलें. इंग्रजांच्या मराठ्यां बरोबर ज्या लढाया झाल्या त्या लढायांत इंग्रजाच्या वतीनें मराठ्यांच्या बरोबर लढणाऱ्या सैन्यांत अस्पृश्य मानलेल्या ज्ञातीचे पुष्कळ लोक असत. या ज्ञातींतील लोकांस मराठ्यानीं ज्या ध्येयास्तव स्वराज्याची स्थापना केली त्या ध्येयाची जाणीव हि नव्हती व स्वराज्या बद्दल त्यांना प्रेम असें कधीं च वाटलें नाहीं. या मुळें या वर्गांतील लोकांना मराठ्यांचे प्रतिस्पर्धि व शत्रु जे इंग्रज त्यांना सामील होणें आत्मघातकीपणाचें आहे असे कधी च भासलें नाहीं. अस्पृश्य मानण्यांत आलेल्या वर्णांतील लोक मराठी राज्याचा पाडाव करण्यास कोणत्या कारणा मुळें व कशा रीतीनें कारणीभूत झालें हें आह्मी वरील विवेचनांत स्पष्ट करून दाखविलें आहे. वर्ण व जाति यांनीं युक्त नसलेल्या राष्ट्रांत आत्म्याच्या अवनत वृत्ती पासून राष्ट्र रूपी देहा वर अपायकारक परिणाम घडण्यास ज्या बाबी कारणीभूत होतात त्या पेक्षां निराळ्या स्वरूपाच्या वरील बाबी मराठ्यांच्या आत्मिक इतिहासाची चर्चा करतांना दृष्टोत्पत्तीस आल्या त्या आम्हीं नमूद केल्या आहेत. महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यां पैकीं सखाराम बापू बोकील, नाना फडणीस, मोरोबादादा फडणीस, महादजी शिंदे, तुकोजी होळकर, दौलतराव शिंदे, परशरामभाऊ पटवर्धन इत्यादि अनेक व्यक्तींत निरनिराळ्या राजकारणप्रसंगानुसार परस्परा विषयीं मत्सर व द्वेष उत्पन्न होऊन मराठ्यांच्या राष्ट्ररूपी देहा वर अनिष्ट परिणाम घडल्या खेरीज राहिले नाहींत. या सर्व प्रसंगांची साद्यंत हकिगत दिली असतां बराच पाल्हाळ होणार असल्या मुळें आह्मी या भानगडींत पडत नाहीं. मत्सर व द्वेष इत्यादि आत्म्याच्या अनवत वृत्तींच्या योगानें मराठी राष्ट्रा वर जे अनिष्ट परिणाम घडले त्या हि पेक्षां पेशवे, शिंदे, होळकर, नागपूरकर भोसले, गायकवाड, पटवर्धन इत्यादि मराठी राज्याच्या प्रमुख घटकांत आत्म्याच्या अनवत वृत्ती पासून उदयास आलेल्या स्वार्थबुद्धीचे परिणाम मराठी राष्ट्रास अत्यंत अपायकारक होऊन त्याच्या च योगानें मराठी राज्याचा अंत झाला. प्रस्तुत प्रकरणांत ही स्वार्थबुद्धि मराठी राष्ट्रास कशी घातुक झाली या संबंधीं थोडें फार विवेचन करणें जरूर आहे. मनुष्य प्राण्याचा स्वाभाविक कल वैयक्तिक स्वार्थ साधण्या कडे असतो. तथापि ही स्वार्थबुद्धि आटोक्यांत ठेऊन कोणत्या हि मानवी समाजाच्या अथवा राष्ट्राच्या सामुदायिक हितास विघातक होणार नाहीं अशी खबरदारी राष्ट्राच्या पुढाऱ्यांनीं घेणें यांत च त्यांचें श्रेष्ठत्व असतें. परंतु कित्येक प्रसंगीं या वैयक्तिक स्वार्थ-

बुद्धीचा राष्ट्रीय पुढाऱ्यांत अतिरेक होऊन कित्येक राष्ट्रें लयास जातात. मराठी साम्राज्याच्या उत्तरार्धांत महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांच्या वैयक्तिक स्वार्थबुद्धीचा अतिरेक होऊन त्याच्या योगानें मराठी राज्याचा लय झाला, असे मराठ्यांच्या इतिहासा वरून दिसून येतें. मराठी साम्राज्यरूपी वृक्ष अस्तित्वांत आल्या नंतर त्याच्या शाखा भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रातांत गायकवाड, शिंदे, होळकर, नागपूरकर भोसले, पवार, पटवर्धन, रास्ते इत्यादि महाराष्ट्रीय राजकारणी घराण्यांच्या पुढाऱ्यांच्या कर्तबगारी मुळें अल्पावधींत पसरल्या गेल्या. सुरवातीस बऱ्या च काळ पावेतों या सर्व पुढाऱ्यांच्या हालचाली मराठी राज्याचे मुख्य प्रधान या नात्यानें पेशवे घराण्याच्या सूत्रानें होत असत. मराठी राज्याचे घटक या नात्यानें मराठी राज्याच्या प्रसाराची जी कामगिरी शिंदे, होळकरादि घराण्यांतील पुढाऱ्यांनीं निरनिराळ्या प्रदेशांत केली त्या योगानें ज्या ज्या प्रांतांत या पुढाऱ्यांनीं राज्यविस्तार केला त्या त्या प्रांतांत त्याना कायमचें वास्तव्य करणें प्राप्त झालें. या मुळें वरील सरदार घराण्यांच ज्या ज्या प्रांतात कायमचे वास्तव्य झालें त्या त्या प्रांतांत त्यांची राजकीय सत्ता दृढ होऊन त्यांना फार मोठें राजकीय महत्त्व प्राप्त झालें. मराठी राज्याच्या पूर्वार्धांत वरील घराण्यांचे पुढारी महाराष्ट्रधर्मस्थापनेच्या उच्च ध्येयानें प्रेरित होऊन मध्यवर्ती सत्तेशीं राजनिष्ठेनें वागत असत. परंतु मराठी राज्याची घडी एकदा नीट बसून त्या राज्याचा विस्तार सर्व भरतखंड भर झाल्या वर मध्यवर्ती अशा पेशवे घराण्या विषयीं त्यांच्या मनांत वैषम्य उत्पन्न होण्यास सुरुवात झाली व पेशव्याचें वर्चस्व झुगारून देऊन स्वतःचें प्रस्थ वाढविण्याच्या व वैयक्तिक स्वार्थ साधण्याच्या खटपटी त्यांच्या कडून सुरू झाल्या. उत्तर हिंदुस्थानात महादजी शिंदे यांचे वरील प्रकारचें धोरण मराठी राज्याच्या उत्तरार्धांत स्पष्टपणें दिसूं लागले. पानिपतच्या युद्धप्रसंगीं मल्हारराव होळकर यांनीं अशा च प्रकारच्या स्वार्थबुद्धीनें प्रेरित होऊन तें युद्ध यशस्वी करण्याच्या कामीं कुचराई केली असा त्यांच्या वर आरोप आहे. शिंदे व होळकराच्या स्वार्थीपणाचें उत्तम चित्र अली बहादर यानें इ. स. १७८८ सालांत नाना फडणीस यांस लिहिलेल्या एका पत्रांत खालीं दर्शविल्या प्रमाणे काढलें आहे.

" कच्ची हकिकत समजण्यांत येत नाही. त्यांची त्यांची [ गुलाम कादर व शिंद्यांचे सरदार ] काय खलबतें होतात, त्यांचे वकील तेथें जातात

व त्यांचे येथें येतात. मजकूर गुप्त आहेत. सारांश द्रव्याचें कार्य आहे कळ साऱ्यासच लागली आहे. या करितां सरकारांत समजावयास मानस दुसऱ्याचें होत नाहीं. जरबेनें विचारावे तर ज्याची जमियत अधिक तो जबरदस्त. राजश्री तुकोजी बावा जवळ होतो तेव्हांहि हीच अवस्था जाहली. आंतूनच खंडण्या करीत. सरकारांत एक पैसा देखील दिल्हा नाहीं. ऐसे मजकूर आहे. मुख्य ज्याची फौज तो जबरदस्त...... राजश्री पाटील बावा जवळ पैक्याची विसी बहुत निकड केली. परंतु देऊं दिलाउ करितात.''

मराठी राज्याचे शिंदे होळकरादि जे निरनिराळे घटक त्यांच्या ठायीं मराठी राज्याच्या उत्तरार्धात स्वार्थ किती प्रबळ होत चालला होता, हें वरील वर्णना वरून उत्तम प्रकारें दृष्टोत्पत्तीस येतें. दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत यशवंतराव होळकर यांचे जे उद्गार आह्मी मागें दिले आहेत त्यां वरून हि या स्वार्थबुद्धीचा केवढा भयंकर अतिरेक झाला होता हें स्पष्ट होत आहे. मराठी राज्याच्या नाशास जीं अनेक कारणे झालीं त्या पैकीं वरील स्वार्थबुद्धि हे एक प्रमुख कारण होतें हें केव्हां हि नाकबूल करून चालावयाचे नाहीं. मराठ्यांच्या स्वराज्य-स्थापनेच्या आरंभींच्या काळांत व नंतर हि कित्येक वर्षे महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांनीं वैयक्तिक स्वार्थास पूर्णपणें तिलांजली देऊन स्वराज्यस्थापनेची व विस्ताराची अनुपमेय कामगिरी केली ही गोष्ट निर्विवाद आहे. उच्च ध्येयाच्या सिद्धीस्तव वैयक्तिक स्वार्थाची राखरांगोळी करण्यास तयार होणें ही जी आत्म्याची उन्नत वृत्ति ती अनेक महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांच्या ठायीं वसत असल्या मुळें च स्वराज्यस्थापनेचें व त्याच्या विस्ताराचें महात्कार्य महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांच्या हातून सिद्ध झालें. मराठेशाहीच्या पूर्वार्धात ही आत्म्याची उन्नत वृत्ति दर्शविणारे एका थोर मराठा घराण्यांतील स्त्रीचे नमुनेदार उद्गार या ठिकाणी आह्मी नमूद करितों. थोरले बाजीराव पेशवे यांनीं कान्होजी आंग्रे यांची स्त्री लक्ष्मीबाई इजला तिचा मुलगा सेखोजीच्या मरणा नंतर दुखवट्याचें पत्र लिहिलें होतें. या पत्रास लक्ष्मीबाईनें दिलेल्या उत्तरांतील खालील उद्गार वरील मुद्याच्या दृष्टीनें लक्षांत ठेवण्या सारखे आहेत. " ईश्वराच्या इच्छेने जो प्रसंग ज्या समयीं यावयाचा

तो येतच आहे. भवितव्य कधींही टळणार नाहीं. तेव्हां घडलेल्या गोष्टीबद्दल खेद करण्यांत काय अर्थ आहे ! दुःखाचें परिमार्जन करून आमच्या घराण्यानें जो पूर्वापार लौकिक संपादला आहे त्याचें संरक्षण करणें हाच माझा स्वधर्म आहे असें मी समजतें. आणि स्वामीकार्यावर दृष्टि देऊन, ते सिद्धिस नेण्यांतच सर्व कृतार्थता आहे असें मी मानतें. मजला माझ्या पुत्रापेक्षां स्वामिकार्याच्या यशः सिद्धीचे महत्त्व अधिक वाटतें. पुत्रशोकांत गुंतून मी सरदारीचा लौकिक कधींही गमविणार नाहीं. " लक्ष्मीबाईच्या वरील उद्गारात व्यक्त होणारी मनोवृत्ति अनेक महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांच्या ठायीं मराठे-शाहीच्या पूर्वार्धांत वसत होती यात संशय नाहीं व ह्मणून च औरंगजेबा सारख्या प्रबळ शत्रूच्या कचाटीतून मराठ्यांचें स्वराज्य शाबूत राहूं शकलें. मराठी राज्याच्या उत्तरार्धांत ह्या उच्च मनोवृत्तीचा महाराष्ट्रीय राजकारणी पुढा-ऱ्यांस विसर पडल्या कारणानें मराठ्यांच्या सत्तेचा जितक्या अल्प काळांत सर्व भरतखंड भर प्रसार झाला तितक्या च अल्प काळांत ती सत्ता लयास गेली हें उघड आहे.

आतां मराठ्यांच्या आत्मिक इतिहासांत अंतर्भूत होणाऱ्या एका शिल्लक राहिलेल्या महत्त्वाच्या बाबीचें दिग्दर्शन करून आम्ही हें प्रकरण आटोपतें घेतों. समर्थ रामदास स्वामींची सुप्रसिद्ध उक्ति " मुख्य हरिकथा निरूपण, दुसरें तें राजकारण, तिसरे तें सावधपण, सर्व विषयीं " ही सर्वश्रुत च आहे. हा च आशय " हरिकथा निरूपण नेमस्तपणें राजकारण वर्तायाचे लक्षण ते ही असावें " [ ११-६-४ ]. हरिकथा निरूपण । बरेंपणें राजकारण । प्रसंग पाहिल्या विण । सकळ खोटें ॥१-२२-२९.इत्यादि ओव्यांत समर्थांनीं निराळ्या रीतीनें व्यक्त केला आहे. समर्थांच्या या उक्ती विषयीं थोडीबहुत चर्चा प्रस्तुत स्थळीं करणें जरूर आहे. फार पुरातन काळा पासून भरतखंडांत जें तत्त्वज्ञान अस्तित्वांत आहे त्या तत्वज्ञान पद्धती प्रमाणें मानवी प्राण्याच्या ऐहिक अस्तित्वा पेक्षां त्याच्या पारलौकिक अस्तित्वाचें महत्व अधिक मानण्यांत येतें. या समजूती मुळें भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रांतांतील मानवी प्राणि हरिकथानिरूपण [ पारलौकिक कल्याण साध्य करण्याचा मार्ग ] हें मानवी जीवितांचें श्रेष्ठ कर्तव्य मानीत आले असून या कर्तव्यास अनुसरून आचरण करीत आहेत. या तत्वज्ञानात्मक समजुतीची भरतखंडांतील अखिल मानवी प्राण्यां वर इतकी जबरदस्त

छाप बसली आहे कीं, या समजूतीच्या योगानें भरतखंडांतील अखिल मानवी प्राण्यांचा एक विशिष्ट प्रकारचा स्वभाव बनून गेला आहे. समर्थ रामदास स्वामींनीं वयाच्या चोवीस वर्षे पावेतों तप करून भरतखंडांतील तीर्थे व क्षेत्रे यांच्या दर्शना निमित्त सर्व भरतखंड भर बारा वर्षे पर्यटन केलें. या पर्यटनांत निरनिराळ्या प्रांतांतील मानवी प्राण्यांच्या समाजाचे समर्थांनीं निरीक्षण केलें. समर्थांनी केलेल्या या निरीक्षणांत त्यांस ज्ञात झालेली बाब त्यांनीं वरील उक्तींत ग्रथित केली आहे. आपल्या कडील प्राचीन तत्वज्ञानाची शिकवण हि समर्थांच्या निदर्शनास आलेल्या भरतखंडांतील मानवी प्राण्यांच्या वरील स्वभाव विशेषास पोषक असल्याचें हि त्यांस दिसून आलें. या दोन्ही कारणा मुळे वरील उक्तींत समर्थांनीं हरिकथा निरूपणास प्रथम स्थान देऊन त्या नंतर राजकारणाचा उल्लेख केला आहे व शेवटीं सावधपण सर्वत्र विषयी बाळगण्या बद्दल सागितलें आहे. मानवी प्राण्यांच्या पारलौकिक कल्याणाच्या दृष्टीनें हरिकथा निरूपणास अग्रस्थान समर्थांनीं दिल्या नंतर ऐहिक अस्तित्वाच्या दृष्टीनें मानवी प्राण्याचें श्रेष्ठ कर्तव्य कोणते हा प्रश्न स्वाभाविकपणे समर्थां पुढें येऊन राजकारणास त्यांनीं दुय्यम स्थान दिलें आहे. या प्रमाणें भरतखंडांतील मानवी प्राण्यांच्या स्वभावा वरून दृष्टोत्पत्तीस आलेली त्यांच्या ऐहिक व पारलौकिक अवस्थांच्या दृष्टीने त्याची श्रेष्ठ कर्तव्यें, त्या कर्तव्यांच्या महत्वाच्या दृष्टीनें समर्थांनीं दर्शवून सावधपण सर्वत्र विषयीं बाळगण्या बद्दल मानवी प्राण्यास इशारा दिला आहे. हा बहुमोल उपदेश महाराष्ट्रीय समाजांतील प्रत्येक व्यक्तीला समर्थांनीं केलेला आहे इतकें च नव्हे परंतु अनेक मानवी व्यक्ति मिळून बनलेल्या महाराष्ट्रीय समाजास उद्देशून हि हा उपदेश त्यांनीं केलेला आहे. सजीव कोटींतील अत्यंत सूक्ष्म कीटका पासून तों श्रेष्ठ प्रकारच्या मानवी प्राण्या पर्यंत देहांत वसणाऱ्या आत्माचें देहा वर अत्यंत प्रेम असतें व यामुळें स्वशरीर रक्षणाच्या बाबतींत जीवकोटींतील प्रत्येक प्राणि दक्ष असतो.मानवी देहाच्या द्वारें च समर्थांनीं सांगितलेली हरिकथा निरूपण व राजकारण हीं श्रेष्ठ कर्तव्यें साध्य करणें शक्य असल्या कारणानें वैयक्तिक मानवी देहाचें त्या च प्रमाणें अनेक मानवी व्यक्ति मिळून बनलेल्या मानवी समाजाच्या देहाच रक्षण होणें अत्यंत अवश्य आहे. ही महत्वाची बाब साध्य होण्यास्तव समर्थांनीं 'सावधपण सर्वत्र विषयीं' बाळगण्याचा

महाराष्ट्रीय समाजांतील व्यक्तीस व महाराष्ट्रीय समाजास इशारा दिला आहे. गाफीलपणा मुळें देहाचा नाश झाल्यास हरिकथा निरूपण व राजकारण हीं जीं महाराष्ट्रीय समाजांतील प्रत्येक व्यक्तीनें साध्य करावयाचीं श्रेष्ठ कर्तव्यें त्यांस तो मुकणार हें निश्चितपणें ठरलें असल्या कारणानें सावधपण सर्वत्र विषयीं बाळगण्याचा उपदेश करणें समर्थांना प्राप्त झालें. महाराष्ट्रीय समाजांतील प्रत्येक व्यक्तीनें समर्थांनीं केलेला हा उपदेश पाळणें जितकें महत्वाचे आहे तितकें च हा उपदेश अनेक व्यक्ति मिळून बनलेल्या महाराष्ट्रीय समाजानें अथवा राष्ट्रानें पाळणें महत्वाचें आहे, असे या बाबीचा जरा बारकाईनें विचार केला असतां दिसून येणार आहे. मानवी समाजांतील प्रत्येक मानवी प्राण्याच्या सभोंवती जसे अनेक शत्रु असतात व त्यांच्या कडून त्याच्या देहास जसा अपाय होण्याचा अगर त्याचा देह नष्ट होण्याचा संभव असतो त्या च प्रमाणें या पृथ्वीतलाच्या ठायीं अस्तित्वांत असलेल्या अनेक मानवी प्राण्यांच्या समाजास अथवा राष्ट्रास त्या समाजाच्या अगर राष्ट्राच्या सभोंवती असणाऱ्या इतर प्रतिस्पर्धि मानवी समाजा कडून अथवा राष्ट्रा कडून अपाय होण्याची भीति असते. पृथ्वीच्या पाठीवर अस्तित्वांत असलेल्या निरनिराळ्या मानवी समाजांत स्वार्थबुद्धीच्या योगानें परस्परां विषयीं वैर, हेवा, मत्सर इत्यादि विकार उत्पन्न होत त व या विकारांनीं प्रेरित होऊन एक मानवी समाज दुसऱ्या मानवी समाजास आपल्या दास्यत्वा खालीं आणण्याचा प्रयत्न करीत असतो. एका मानवी समाजानें दुसऱ्या मानवी समाजास अंकित करणें किंवा आपल्या दास्यत्वा खालीं आणण ह्मणजे च परदास्यत्वा खालीं जाणारा मानवी समाज मृत होणें आहे. ह्या विचार-सरणीच्या दृष्टीनें पाहिलें असतां व्यक्तिशः प्रत्येक मानवी प्राण्यास मृत्यु टाळण्याची खबरदारी घेणें जितकें महत्वाचे आहे तितके च एका मानवी समाजानें दुसऱ्या मानवी समाजाच्या अंकित होण्याचें किंवा त्या समाजाच्या दास्यत्वांत जाण्याचें टाळणें हें महत्वाचें आहे.

आतां मराठ्यांनीं स्थापन केलेल्या स्वराज्याच्या काळीं समर्थांच्या वरील उक्तींत दर्शविलेल्या उपदेशाच्या दृष्टीनें मराठा राष्ट्ररूपी देहाच्या रक्षणार्थ " सावधपण सर्वत्र विषयी " बाळगण्यांत आलें होतें कीं नाहीं हा एक महत्वाचा प्रश्न स्वाभाविकपणें आपल्या पुढे येतो. मराठ्यांनीं स्थापन केलेल्या

स्वराज्याच्या आवती भोंवती निजाम, इंग्रज, फ्रेंच, पोर्तुगीज, हैदर इत्यादि प्रतिस्पर्धि राजसत्ता अस्तित्वांत असून या राजसत्ता धारण करणाऱ्यां पैकीं प्रत्येकाचे इतरांस आपल्या कह्यांत आणून आपलें राज्य त्यांच्या वर स्थापण्याचे कसून प्रयत्न चालले होते. अशा प्रकारच्या परिस्थितींत वरील प्रतिस्पर्धि शत्रुराष्ट्रा कडून मराठी राष्ट्ररूपी देहास अपाय पावणार नाहीं अशा प्रकारची खबरदारी समर्थोक्तीस अनुसरून महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांनीं घेतली होती कीं नाहीं याची शहानिशा करणें जरूर आहे. मराठ्यांच्या स्वराज्याचा लय होऊन मराठी राष्ट्र इंग्रजांच्या दास्यत्वा खालीं कसें गेलें या संबंधाच्या इतिहासाचा बारकाईनें विचार केला असतां मराठ्यांच्या स्वराज्यरूपी देहाचें रक्षण करण्या करितां जशा प्रकारचा सावधपणा महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांनीं बाळगावयास पाहिजे होता तशा प्रकारचा सावधपणा बाळगला नाहीं अशी कोणाची हि खात्री झाल्या वांचून राहणार नाहीं. शिवाजी महाराजांचा जन्म होण्या पूर्वीं शें दीडशें वर्षें अगोदर युरोप खंडांतील पोर्तुगीज डच, इंग्रज, फ्रेंच, इत्यादि पाश्चात्य राष्ट्रांची नजर भरतखंडा कडे वळली होती. भरतखंड ही सुवर्णभूमि असून तींत अलोट संपत्ति आहे अशा प्रकारच्या अफवा युरोपिअन राष्ट्रांच्या कानां वर गेल्या मुळें त्या देशांतील दर्यावर्दी धाडसी लोकांनीं भरतखंडाचा समुद्रा वरील मार्ग शोधून काढ-ण्याच्या प्रयत्नास सुरुवात केली. या प्रयत्नांत पोर्तुगीज लोकांना प्रथम यश येऊन त्यांचा व त्यांच्या मागोमाग डच लोकांचा भरतखंडांत प्रवेश झाला. व्यापाराच्या मिषानें या दोन राष्ट्रांनीं या देशांत प्रवेश केल्या नंतर थोडक्या च वर्षांत त्यांनीं आपली सत्ता भरतखंडांतील कांहीं प्रदेशा वर स्थापित केली. या दोन लोकां पैकीं पोर्तुगीज लोकांचा महाराष्ट्राशीं निकट संबंध घडून आला. हिंदुस्थानाच्या पश्चिम किनाऱ्या वरील मुंबई, ठाणें, वसई इत्यादि ठिकाणें व त्याच्या आसपासच्या प्रदेशा वर त्यांनीं आपली सत्ता स्थापित केली. पोर्तुगिज लोका प्रमाणें च डच, फ्रेंच, इंग्रज इत्यादि लोकांनीं हि मुलुख संपादण्याचा क्रम सुरू केला. हजारो मैल दूर असलेल्या देशांतून आलेले पोर्तुगीज, डच, इंग्रज, फ्रेंच इत्यादि लोक हिंदुस्थानांत आपली राज-कीय सत्ता कशाच्या जोरावर स्थापित करूं शकतात या बाबीचा छडा लाव-ण्या कडे त्या काळाच्या महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांचें बिलकूल लक्ष गेलें नाहीं असें दिसतें. पोर्तुगीज, डच, फ्रेंच, इंग्रज इत्यादि पाश्चात्य राष्ट्रां-

तील लोक आपले हातपाय पसरून या देशांत बद्धमूल होतील सबब त्यास स्वराज्याच्या मुलखात जागा देणें इष्ट नाहीं ही बाब महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्याच्या मनांत येऊन चुकली होती. परन्तु हे लोक कोणत्या शक्तीच्या जोरावर परकीय मुलखांत आपली राजसत्ता स्थापन करूं शकतात या बाबीचा छडा महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यां कडून लावण्याचा जशा प्रकारचा प्रयत्न व्हावयास पाहिजे होता तशा प्रकारचा प्रयत्न महाराष्ट्राच्या दुर्दैवानें मागें नमूद केलेल्या समर्थोक्तीचें महत्व त्या काळाच्या महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांच्या लक्षांत न आल्यामुळें झाला नाहीं ही गोष्ट बरीक निर्विवाद आहे. युरोप खंडांतील पोर्तुगीज, डच, इंग्रज, फ्रेंच इत्यादि पाश्चात्य लोकांनीं व्यापाराच्या मिषानें भरतखंडांत प्रवेश करून त्यांनीं आपलें राजकिय वर्चस्व ज्या दोन बाबींच्या जोरा वर स्थापित केलें त्या दोन बाबी ह्मटल्या ह्मणजे कवाईत शिकलेल्या पायदळाचे कंपू व तोफखाना या होत. या दोन बाबींच्या जोरा वर हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांच्या सैन्याचा मोड पाश्चात्य लोक करितात ही बाब हिंदुस्थानांतील लोकास शिवाजी महाराज उदयास येण्या पूर्वी च विदित झाली असली पाहिजे. शिवाजी महाराज उदयास येण्या पूर्वी इंग्लंडांत ईस्ट इंडिया कंपनीची स्थापना होऊन मुंबई, सुरत, राजापूर इत्यादि ठिकाणीं त्यांच्या व्यापारी वखारींची स्थापना होऊन मराठ्याच्या भावी शत्रूंचें बीजारोपण महाराष्ट्रांत मराठ्यांच्या उदया बरोबर च झाले होतें. पोर्तुगीज लोकांनीं आपली सत्ता महाराष्ट्रांत ज्या वरील दोन बाबींच्या जोरा वर स्थापित केली होती त्या च दोन बाबी पोर्तुगीज लोकां पेक्षा हि इंग्रजां जवळ श्रेष्ठ प्रकारच्या होत्या. या दोन बाबीं पुढें मराठे कसे हताश होऊन टेकीस येत असत यांचें वर्णन त्या काळीं पोर्तुगीज व इंग्रजांच्या मराठ्यां बरोबर झालेल्या युद्धांच्या हकिकतींतून आढळून येतें. वसईच्या वेढ्याच्या प्रसंगीं मराठ्यांनीं केलेल्या शेवटच्या हल्ल्याच्या वर्णनांतील खालील उतारा वरील विधानाच्या पुष्टिकरणार्थ आह्मी येथें देतों:—"**बरकंदाजी व तोफाजी फिरंगीयाची निस्सीम ह्मणावी तैशी**......फिरंगीयांनी सफेलीच्या आंतून मेढा घालून पेटी भरून तोफा लाऊन तयार होतांच तेथें फिरंगी बळाऊन हुके गरनाळाच्या दारूच्या पोत्यांस आगा लाऊन मार केला व रेजगिरीचा मार सीमे परता केला. **लोकांवरी अग्नीचा पर्जन्य करून भाजून काढलें.** लष्करचे व हशमचे लोक सुरंगानें उडाले व जाया ठार अदमासें पाच हजार किंबहुना विशेष होतील. तैसे च फिरंगीयाचे सात

आठशें माणूस ठार व या निराळे जखमी जाले. श्रीचें सुदर्शन धर्मद्वेष्ट्याचे मस्तकीं वज्रप्रहार होऊन टोपीकर म्लानत्व पावले. अन्यथा वसई व सई न होती व फिरंगी अग्नीचा पुला होता." या वर्णना वरून पाश्चात्य राष्ट्रांचा तोफखाना मराठ्यांच्या सैन्यात किती कहर उडवून देत असे हें दिसून येतें. मराठ्याच्या इतिहासाच्या साधन ग्रंथातून मराठ्यांचीं इंग्रजांशीं झालेल्या युद्धाचीं जीं वर्णनें आढळतात त्यात इंग्रजांच्या तोफाजींची वर्णनें वरील प्रकारचीं आलीं असून इंग्रजांची आग असह्य असतें असें या वर्णनांत नमूद केलेलें आढळतें. इंग्रजी राज्याचा प्रसार करण्या कारितां भरतखडांत जे इंग्रज राजकारणी पुरुष प्रथम आले त्यांच्या लक्षांत मराठ्यांची लंगडी बाजू कोणती आहे हे तत्काळ येऊन चुकलें होतें व सर्व भरतखंड पुढें मागें थोडक्या च अवधींत आपल्या ताब्यांत येणार अशी त्यांची बालंबाल खात्री केव्हां च झाली होती. इ. स. १७६७ सालांतील अलेकझ्यँन्डर डाऊ या इंग्रज इतिहासकाराच्या खालील उद्गारां वरून आम्हीं वर जें विधान केलें आहे त्याची सत्यता वाचकांस पटल्याखेरीज राहणार नाहीं.

" It is apparent that the immense regions of Hindustan might well be reduced *by a handful of regular troops*. Ten thousand European infantry together with the sepoys in the Company's service are not only sufficient to conquer all India, but with proper policy to maintain it for ages as an appandage of the British crown.

अर्थ:--" हिंदुस्थान सारखा अवाढव्य मुलूख थोड्याशा कवाईत शिकलेल्या सैन्याच्या सहाय्यानें पादाक्रांत करितां येईल ही बाब उघड दिसून येणारी आहे. दहा हजार गोरे पायदळ आणि कंपनीचे हिंदी शिपाई हिंदुस्थान देश पादाक्रांत करण्यास पुरे आहेत इतकें च नाहीं परंतु यांच्या आधारा वर इंग्रजी राज्याच्या दास्यत्वा खालचा एक प्रदेश या नात्यानें हा देश अनेक शतकें इंग्रजांस आपल्या ताब्यांत ठेवणें शक्य आहे. "

वर जे उतारे आम्हीं दिले आहेत त्यां वरून पाश्चात्य राष्ट्रांची शक्तिस्थानें आणि मराठ्याचा मर्मस्थानें कोणतीं होतीं हें उघड होत आहे. इंग्रजांच्या शस्त्रोचीं हीं दोन स्थानें लक्षांत घेऊन मराठी राज्यरूपी देशाचें रक्षण कश्या रीतीनें करावयाचें या बद्दलची विवेचना करणे व या विवचनच्या अती सुच-

लेले उपाय ताबडतोब अमलांत आणणें हें त्या काळाच्या महाराष्ट्रीय पुढाऱ्यांचें निःसंशयपणे आद्य कर्तव्य होतें. या कर्तव्याच्या दृष्टीने महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांनीं कोणत्या योजना अंमलांत आणल्या व कोणत्या आणल्या नाहीत व ज्या योजना अंमलांत आणण्याची त्यानीं कसूरी केली त्यांचे अनिष्ट परिणाम मराठ्यांच्या स्वराज्यरूपी राष्ट्रदेहा वर कोणते घडले या संबंधीं थोडी फार चर्चा प्रस्तुत स्थळीं करणें अवश्य आहे. मराठी राज्याच्या पूर्वार्धांत पाश्चात्य राष्ट्रांशीं महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांचें विशेष संगट्टण घडले नसल्या कारणाने त्यांच्या श्रेष्ठत्वाच्या ज्या बाबी त्यांच्या लक्षांत आल्या नव्हत्या या बाबी मराठी राज्याच्या उत्तरार्धांतील महाराष्ट्रीय राजकारणी पुढारी ह्मणजे नाना फडणीस, महादजी शिंदे, तुकोजी होळकर यांच्या लक्षात येऊन गेल्या होत्या असें त्या काळाच्या उपलब्ध झालेल्या पुराव्या वरून दिसून येतें. इ. स. १७९६ सालीं झांशीचे सुभेदार रघुनाथ हरी व बुइल्यम हंटर या नांवाच्या एका इंग्रज गृहस्थाच्या मुलाखतीचे वर्णन एके ठिकाणीं खालील प्रमाणें केलेलें आढळतें.

He had discernment enough to perceive our superiority in arts & sciences over his countrymen and possessing spirit of liberal inquiry and an exemption from national prejudices which is very uncommon among the natives of Hindustan. He was very desireous of gaining a knowledge of our improvements. He showed us several books among which was the second edition of Encyclopedia Britannica. Of this he had got all the plates neatly copied by artists of his own. To get at the stores of science which those volumes contain, he had even at that advanced period of life formed the project of studying the English language. He exhibited an electrical machine constructed by a man of his own service. He did not look on the experiments with an eye of mere childish curiosity which is amused with novelty, but had a desire to investigate the cause of the phenomena ( रा. ब. पारसनिस यांच्या जुन्या ऐतिहासिक गोष्टी पान ४२ )

अर्थ:—कलाकौशल्य आणि भौतिक शास्त्राचें ज्ञान या दोन बाबतींत त्याच्या स्वदेश बांधवां पेक्षां आमचा [ इंग्रजांचा ] श्रेष्ठपणा किती आहे हें पारखण्याची त्याच्या ठिकाणीं ऐपत होती. हिंदुस्थानांतील लोकांच्या ठिकाणीं साधारणपणें आढळून येणारे स्वभाव दोष त्याच्या ठिकाणीं नसल्या कारणाने व सर्व विषयांचें ज्ञान करून घेण्याच्या बाबतींत त्याच्या ठिकाणीं मनाच्या अकुंचितपणाचा अभाव असल्या मुळें आमच्या भौतिक कलाकौशल्यांतील व भौतिक शास्त्रांतील सुधारणांची माहिती करून घेण्याची त्याची उत्कंठा फार दिसून आली. त्यानें आह्मांस पुष्कळ ग्रंथ दाखविले. त्यांत ब्रिटिश विश्वकोशाची दुसरी प्रत आह्मी पाहिली. या पुस्तकांत असलेल्या चित्रपटाचें तरजुमे त्याच्या पदरीं असलेल्या चितार्‍या कडून त्यानें नीट रीतीनें तयार करविले होते. या ग्रंथांतील शास्त्रीय ज्ञानाचा सांठा हस्तगत करण्या करितां त्यानें त्याचें उतार वय झालें असून हि इंग्रजीचा अभ्यास करण्याचें ठरविलें होतें. त्यानें आह्माला एक विजेचें यंत्र त्याच्या नोकरानें तयार केलेलें दाखविलें. या यंत्राच्या प्रयोगाकडे कोणत्या हि नवीन गोष्टी विषयीं दिसून येणार्‍या शिशु जिज्ञासेच्या दृष्टीनें तो पहात नसून त्या यंत्राच्या हालचालींचीं कारणें शोधून काढण्याच्या बुद्धीनें तो पहात असल्याचें आमच्या निदर्शनास आलें. " पाश्चात्य लोकांच्या कलाकौशल्याच्या आणि भौतिक शास्त्राच्या ज्ञानाच्या बाबतींतील श्रेष्ठत्वाची जाणीव महाराष्ट्रीय समाजातील पुढार्‍यां मध्यें उत्पन्न झाली असून तें ज्ञान संपादन करण्याच्या जिज्ञासेचा उदय महाराष्ट्रीय राजकारणी पुढार्‍यांत मराठी राज्याच्या उत्तरार्धात होण्यास सुरुवात झाली होती हें वरील उतार्‍या वरून उघड दिसून येत आहे. पाश्चात्त्य राष्ट्रांची शस्त्रास्त्रें व तोफखाना इत्यादिकांचें महत्त्व मराठ्यांच्या लक्षांत आले होतें. इब्राहिमखान गारदी यास पेशव्यांनीं त्याच्या तोफखान्याच्या नैपुण्या बद्दल मुद्दाम आपल्या नोकरींत दाखल करून घेतले होतें. वडगांवच्या लढाईत प्रसिद्ध इस्टुर फाकड्यास तोफेचा गोळा अचूक नेमानें मारून त्यास ठार मारणारा पानश्यांच्या तोफखान्याचा कप्तान मुसा नारज हा पोर्तुगीज होता. ( रा. ब. पारसनिस टिपणे पान ७७ ). नाना फडणीस यांनीं दिलावरजंग या नांवाच्या फिरंगी इसमास मराठी सैन्यास लष्करी कवाईत शिकविण्या करितां इ. स. १७८२–८३ सालाच्या सुमारास नोकर ठेविले

होतें. रा. ब. पारसनिस यांच्या " जुन्या ऐतिहासिक गोष्टी " पान ६५ वर या अधिकाऱ्यास देण्यांत येणाऱ्या पगाराची यादी छापली आहे. या यादींत मुसा दराज कुली यांचें वर्णन " तोफा, बंदुका वगैरे ओतणार व पलटणें तयार करणार " अशा प्रकारचे केलें आहे. नाना फडणीस प्रमाणें च लष्करी कवाईत व तोफखान्याच्या बाबतींतील इंग्रजांचें श्रेष्ठत्व महादजी शिंदे यांच्या लक्षांत येऊन चुकलें होतें. डिबाईन, पेरू फिलोज, स्किनर इत्यादि फ्रेंच युद्धकलाविशारद सेनापति महादजी शिंदे यांनीं नोकर ठेऊन कवाईत शिकलेल्या शिपायांचे कंपू व तोफखाना तयार केला व त्याच्या जोरावर उत्तर हिंदुस्थानांत अजिंक्य पद प्राप्त करून घेतलें. महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांचें लक्ष वरील बाबींच्या महत्वाकडे वेधल जाऊन पाश्चात्त्य लोकांपासून स्वत:चें रक्षण करण्या करितां या बाबींचा त्यांनीं अंगिकार करण्यांत तत्परता दाखविली ही बाब जरी खरी असली तथापि वरील बाबी ज्या भौतिक शास्त्राच्या ज्ञाना पासून प्राप्त होतात तें भौतिकशास्त्रीयज्ञान महाराष्ट्रांतील लोकांस प्राप्त करून देण्याची कोणत्या हि प्रकारची तजवीज महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांनीं केली नाहीं व त्या मुळें परदास्याचा घाला मराठ्यांवर अखेर पडल्या खेरीज राहिला नाहीं. त्या काळाचे पोर्तुगीज, इंग्रज, फ्रेंच इत्यादि पाश्चात्त्य राष्ट्रांतील लोक व महाराष्ट्रांतील ब्राह्मण क्षत्रियादि वरिष्ठ लोक यांच्या शास्त्रीय ज्ञानांत किती अंतर होतें हें दर्शविणारा इतिहास साधन प्रथांत आह्मास आढळलेला एक महत्वाचा लेख आह्मी या ठिकाणी सादर करितों.

## फराशीसांची युद्धविद्या[१]

यादी टोपीवाले फिरंगी गोंवेकर शिपाई मर्द माणूस चांगले सुमातिसैन मया व अलफ. कलमबंदी कलमें.

कवाईत फराशीस गारदी तयार करून हिकमतीने लढाई बुरुज बांधोन वगैरे करूं. फराशिसी कवाईत इग्रजापेक्षां व फिरंग्यापेक्षां अधिक आहे. फराशीस रेजमी गारदी असामी २४००. तोफा पाहून गोळा व दारू किती पाहिजे ती सांगूं. कलम १

---

१ गोव्यांतील कोणी फिरंगी युद्धकलानिपुणानें पेशव्यांच्या वकीलामार्फत नाना फडणविसांस हें पत्र लिहिलें आहे.

दारू तयार करण्याबद्दल सामान

१ पाण्यावरील राहाट करून मुसळे लावून दारू कुटून तयार करूं.

१ सरंजाम असल्यास सातवे दिवशीं दारु तयार करूं. कलम १

---

२

किल्ला नवा जिन्नसवार बांधोन तयार करूं. कलम १

किल्ल्यांतून बाहेरले मोरच्यावर सुरुंग चालवून दारू घालून मोरचा उडवून देऊं. सुरुंगामध्यें वारें जावयाची हिकमत बेमालूम करून देऊं. कलम १

बंब तयार करून पावकोस पर्यंत पाणी उडवून देऊं. किल्ल्यानजिक पाणी असल्यास बंब लावून किल्ल्यावर पाणी टाकूं. कलम १

हातगरनालाचे गोळे तयार करवूं. कलम १

ग्राहाणाची चाल ठाऊक आहे. कलम १

विमान उडवावयाचें तयार करूं. कलम १

सोन्याचा गोळा शेराचा करावयाचा फर्मा पाहोन वरकड धातूचे गोळे केवढे होतील त्याचे फरमे व वजनें सांगों. कलम १

मुलखांतील रचनेचे नक्षे, प्राचीन कोणते शहर कोठें, कोणत्या शहरापासून कोणतें शहर किती कोस हे सांगोन देऊं. प्राचीन रचनेचा नक्षाच दाखवूं. कलम १

विलायती मॅथेमेटिक शास्त्रविद्या निपुण शिकलों आहों. जी हिकमत शास्त्राचे आधारानें पुसाल तितकी सांगोन देऊं. याचा दाखला इंग्रजांचे वकील आहेत त्यांस पुसावा. कलम १

आरमारची तिरकटी तरांडी चालवूं व नवीन तयार करवून आरमार लढाई इंग्रजांची व फरासी करूं. फिरंगी लढाई कमी. कलम १

साहा भाषांचे अक्षराचे फरमे आहेत १ ब्राह्मण भाषा, १ सिरयाला, १ ग्रहक, १ कलदाईक, १ मलबार, १ एकरा ६ कलम १

---

६

तोफा व गरनालाची मारणीची कवाईती गोलदांज तयार करूं. कलम १

तोफेचा गोळा दाहा शेराचा असल्यास दारु सव्वा तीन शेर घालून दीड कोस गोळा चालवूं. दारू आमचे हिकमतीची तयार पाहिजे. कलम १

कारागीरांचे हातीं तयारी करवूं येणें प्रमाणें:--

१ दारू १ गरनाला मोर्त्येल

१ तोफा कानो १ बंदूक फुझील कलम १

---

४

सदरहू प्रमाणें तयार करून देऊं

पीठ करावयास हिकमत

१ पाणचक्की. १ वाऱ्यावरची चक्की

---

२ कलमें १

किल्ला पाडावयासी हिकमती

१ बाहेरून सुरूंग चालवून आंत दारू भरून किल्ला ढासळून देऊं.

१ तोफा लागू करून भिंताड पाडूं.

---

२ कलम १

१ दरवाजा फोडावयासी पंचरसी पेताड करूं. त्यानें दरवाजा फुटेल.

--- कलम १

३

गलीमाचा किल्ला आहे तो दुरून पाहोन, त्याचा लांबी व उंचीचा पल्ला कितीक आहे हें सांगो. किल्ला शास्त्राचे आधारें बांधिला असल्यास, एकीकडून एक आंग दृष्टीस पडल्यास,त्याचा नक्षा लांबी, रुंदी उंचीचा,बुरूज दरवाजे सुद्धां, नक्षा काढून दाखवूं. त्याप्रमाणें लढवय्यी सामान तरतूद करून मोरचे बसवूं. कलम १

सोन्याची अगर इतर धातूची चौकी लांबी, रुंदी, उंची सामान करून द्यावी. त्या चौकीचे मोज घेऊन वजनें सांगों. कलम १

गोळा तयार करून तोफेतून उडवूं. तो गोळा दाहा जागां टीप खात जाईल, अकरावे जागां फुटेल आणि कारीगर करील. गोळ्यांत रेजगाण असेत. कलम १

सोन्यामध्यें रुपें अगर तांबे घालून गोळा केला, त्यांतील तांबे किती व रुपें किती व सोनें किती आहे हे सांगूं. या प्रमाणें सारे धातूंचें सांगूं. कलम १

मुलखाचा नक्षा करून देऊं. कलम १

माणसाचें अंगांतील शिरा व हाडें कसकशी, कोणत्या ठिकाणीं शीर व हाड कसें राहतें हें सांगोन देऊं. कलम १

सदरहू कलमें लिहिलीं आहेत. त्यास आह्मी कारागिरी करावयासी आलों नाहीं; शिपाई आहों. आमची गौरशी करून आज्ञा होईल त्या प्रमाणें वर्तणुकेस हजीर आहों. आह्मी चाकरी करूं तेव्हा दाखला पडत जाईल.

( रा. ब. पारसनिस यांचे ऐतिहासिक स्फुट लेख पान ५९ )

वरील यादींतील प्रत्येक कलमाचा विचार केला असतां त्या वरून भौतिक शास्त्रांत पाश्चात्त्यांचे तत्कालिन महाराष्ट्रीय लोकां पेक्षां केवढें श्रेष्ठत्व होतें हे दिसून येतें. या भौतिक शास्त्राच्या जोरा वर इंग्रजांनीं मराठ्याचा मोड करून त्याच्या माने वर पारतंत्र्याचे जूं अडकवून दिलें ही बाब येथ पावेतों केलेल्या विवेचना वरून सिद्ध झाली आहे. स्वराष्ट्र रक्षणार्थ “ सावधपण सर्वत्र विषयीं ” बाळगण्या-विषयींच्या उपदेशाचें मर्म महाराष्ट्रीय समाजाच्या राजकारणी पुढाऱ्यांच्या लक्षांत न आल्यामुळें परदास्याचा दारुण प्रसंग मराठ्यां वर कसा ओढवला यांचें दिग्दर्शन केल्या नंतर पाश्चात्त्य राष्ट्रांत ज्या भौतिक शास्त्राच्या ज्ञानाचा उदय व विकास झाला तशा प्रकारच्या ज्ञानाचा उदय व विकास महाराष्ट्रीय लोकांत कां झाला नाहीं यांचें हि या स्थळीं थोडें फार दिग्दर्शन व विवेचन करणें जरूर आहे. प्रस्तुत काळीं ज्या पाश्चात्य राष्ट्रांनीं भौतिक शास्त्रीय ज्ञानांत प्राविण्य संपादन केलें आहे, त्याच्यांत भौतिक शास्त्रीय ज्ञानाचा उदय व विकास केव्हां, कोणत्या परिस्थितींत व कोणत्या कारणा मुळें झाला याचा बारकाईनें विचार केला असतां खालील बाबी आपल्या निदर्शनास येतात. इ. स. १५०० च्या सुमारास इंग्लंड व फ्रान्स या दोन देशा मध्यें या ज्ञानाचें प्रथम बीजारोपण झालें असें दिसून येतें. तत्पूर्वी त्या देशांतील विद्वान् लोक आपल्या कडील शाब्दिक वेदांत तत्त्वज्ञाना सारख्या तत्त्वज्ञान पद्धतीच्या चर्चेत बुड्या मारण्यांत आनंद मानीत होतें. परंतु इ. स. १५०० च्या सुमारास वरील पाश्चात्त्य देशांतील विद्वान् लोकांत एक मोठी विचारक्रांति घडून आली. शाब्दिक तत्त्वज्ञानाचा कीस काढून त्याचा काथ्याकूट करीत बसण्याचा तिकडील विद्वानांस वीट येऊन सृष्टींतील निरनिराळया शक्तींची गूढ तत्त्वें उकलून काढून त्यांचें ज्ञान करून घेण्याची नवीन मानसिक प्रवृत्ति त्यांच्या मध्यें उदयास आली व या प्रवृत्तीचें

अखेर पर्यवसान भौतिकशास्त्रज्ञानाच्या उदयांत झाले. भौतिकशास्त्रांचा अभ्यास करणारास या ज्ञानाची एकदां चटक लागली कीं, तो वेडावून जाऊन त्यास ज्ञात झालेल्या गूढ तत्त्वांच्या योगानें त्याचें समाधान न होतां अज्ञात अशी गूढ तत्त्वें हस्तगत करून घेण्या कडे त्याची बुद्धि धाव ठोकूं लागते व अशा रीतीनें या शास्त्रांचा अभ्यास करणाऱ्या कडून या ज्ञानाची सारखी प्रगति होत जाते. इ. स. १५०० पासून आज मिती पावेतों पाश्चात्त्य राष्ट्रां पैकीं फ्रान्स, जर्मनी, इंग्लड इत्यादि देशांतील भौतिकशास्त्रीयज्ञानाच्या प्रगतीचा व विकासाचा इतिहास लक्षांत घेतला तर आह्मीं केलेल्या वरील विधानाची कोणास हि सत्यता पटल्या वांचून राहणार नाहीं. इ. स. १५०० पासून इ. स. १८०० पावेतों पाश्चात्त्य देशांत भौतिकशास्त्रीय-ज्ञानाची जितकी प्रगति झाली त्या मानानें इ. स. १८०० पासून १९०० पावेतों या ज्ञानाची फार च भयंकर प्रगति झाली आहे. भौतिकशास्त्रीयज्ञानाच्या प्रगतीचें प्रमाण यूरोपखंडांत हें च कायम राहिल्यास इ. स. २००० च्या सुमारास ज्या गोष्टी आज मितीस स्वप्नांत येणें हि संभवनीय नाहींत अशा गोष्टी प्रत्यक्ष अस्तित्वात येतील असा संभव आहे. पाश्चात्त्य राष्ट्रांत भौतिक शास्त्राच्या ज्ञानाचा उदय होण्यापूर्वी कोणत्या स्वरूपाचें तत्वज्ञान अस्तित्वांत होतें व हें तत्वज्ञान मागें पडून भौतिकशास्त्रीयज्ञानाच्या नव्या युगाचा उदय केव्हां व कसा झाला याचें मार्मिक वर्णन लॉर्ड बेकनच्या चरित्रा वर मेकॉलेनें लिहिलेल्या एका टीकारूपी निबंधांत केलें आहे. या निबंधा पैकीं वरील मुद्या संबंधीं कांहीं महत्वाचे उतारे आह्मी खाली देतों. पाश्चात्य देशातील जुन्या तत्वज्ञानाच्या स्वरूपाचें वर्णन मेकॉलेनें खालीं दर्शविल्या प्रमाणें केलें आहे.

The ancient philosophy disdained to be useful, and was content to be stationary. It dealt largely in theories of moral perfection which were so sublime that they never could be more than theories; in attempts to solve unsoluble enigmas; in exhorstations to the attainment of unattainable frames of mind. It could not condescend to the humble office of ministering to the comfort of human beings. All the schools condemned that office as degrading; some considered it as immoral. Once indeed Posidonius, a distinguished writer of the

age of Cicero and Ceasar, so far forgot himself as to ennumerate among the humbler blessings which mankind owed to philosophy, the discovery of the principle of the arch and the introduction of the use of metals. This eulogy was considered as an affront and was taken up with proper spirit. Seneca vehemently disclaims these insulting compliments. Philosophy according to them has nothing to do with teaching men to rear arched roof or any roof. Philosophy has nothing to do with teaching men the use of metals. She teaches us to be independent of all material substances, of all mechanical contrivances. The wise man lives according to nature. Instead of attempting to add to the physical comforts of his species, he regrets that his lot was not cast in that golden age, when the human race had no protection against the cold but the skins of the wild beasts, no screen from the sun but a cavern. To impute to such a man any share in the invention or improvement of a plough, a ship or a mill is an insult. "In my own time" says Seneca "there have been inventions of this sort, transperent windows, tubes for diffusing warmth, equally through all parts of a building, short—hand which has been carried to such a perfection that a writer can keep pace with the most rapaid speaker. But the invention of such things is drudgery for the lowest slaves; philosophy lies deeper. It is not her office to treat, men how to use their hands. The object of her lessons is to form the soul.

The ancient philosophy was a treadmill,not a path. It was made up of revolving questions, of controversies which were always begining again. It was a contrivance for having most exertion and no progress.......what is the higest good, whether pain be an evil, whether

all things be fated, whether we can be certain of any thing ,whether we can be certain that we are certain of nothing, whether a wise man can be unhappy, whether all departures from right be equally reprehensible; these and all other questions of the same sort occupied the brains, the tongues and the pens of the ablest men in the civilised world during several centuries. This sort of philosophy it is evident could not be progressive. It might indeed sharpen and invigorate the minds of those who devoted themselves to it. But such disputes could add nothing to the stock of knowledge. The human mind accordingly instead fo marching merely marked time. It took as much trouble as would have sufficed to carry it forward; and yet remained in the same spot. There was no accumulation of truth, no heritage of truth acquired by the labour of one generation and bequeathed to another, to be again transmitted with large addition, to a third. Where this philosophy was in the time of Cicero, there it continued to be in the time of Seneca and there it continued to be in the time of Favoranius. The same sects were still battling with the same unsatis. factory arguements about the same interminable questions. There had been no want of ingenuity, of zeal, of industry. Evry trace of intellectual cultivation was there, except a harvest. There had been plenty of ploughing, harrowing, reaping, thrashing. But the same garners contained only Smut & and stubble."

अर्थः—" पुरातन तत्वज्ञान उपयुक्ततेस तुच्छ लेखून स्थैर्यीत संतोष मानीत असे. उपपत्तिच्या चर्चे पलीकडे ज्याची मजल कधीं जावयाची नाहीं अशा नैतिकपूर्णत्व साध्य करण्याच्या निरनिराळया उन्नत मर्गांचें विवेचन, कधीं हि न सुटणारीं कूटें सोडविण्याचा खटाटोप आणि जी

मन:स्थिति कधीं हि प्राप्त व्हावयाची नाहीं ती साध्य करण्या बद्दलचा उपदेश या विषयांचें विवेचन प्रामुख्यानें या तत्त्वज्ञान पद्धतींत केलेलें आढळतें. मानवी प्राण्यांच्या सामान्य प्रकारच्या गरजा भागविण्याच्या मार्गाविषयीं चर्चा करणें क्षुद्रपणाचें व तत्त्वज्ञान पद्धतीस कमीपणा आणणारें आहे असें या पुरातन तत्वज्ञान पद्धतीचें अभिमानी समजत. पुरातन काळीं ज्या निरनिराळ्या तत्त्वज्ञान पद्धति अस्तित्वांत होत्या त्या सर्वांच्या मताप्रमाणें असल्या प्रकारच्या विषयांची चर्चा करणें अशिष्टपणाचें समजत इतकें च नव्हे, तर कांहीं तत्त्वज्ञानांच्या मता प्रमाणें असल्या विषयांची चर्चा करणें अनीतिकारक समजले जात असे. सिसेरो आणि सिझरचा समकालीन पॉसिडोनियस या नांवाच्या एका प्रसिद्ध तत्त्वज्ञान्याने नकळत तत्त्वज्ञानात्मक शोधापासून मानवी प्राण्यास झालेल्या अनेक फायद्या पैकीं कमानीच्या तत्त्वाच्या शोध आणि धातूंचा उपयोग हे हलक्या सलक्या प्रतीचे फायदे असल्याचे त्यानें नमूद केले. हे त्या तत्वज्ञान्यानें केलेलें वर्णन तत्त्वज्ञानाची स्तुति नसून बदनामी आहे असें समजण्यांत येऊन त्याची याबद्दल संभावना करण्यांत आली. सेनेकानें तत्त्वज्ञानाची बदनामी करणाऱ्या या स्तुतीचा जोरानें निषेध केला आहे. त्याच्या मता प्रमाणें मानवी प्राण्यास कमानीचें तत्व शिकविणें, अगर घरावर दगडाचें अगर विटेचें छत घर झांकण्या करितां तयार करण्यास शिकविणें, अथवा धातूचा उपयोग काय आहे याचें ज्ञान करून देणें हें तत्त्वज्ञानाचें काम नाहीं. सृष्ट पदार्थांचा उपयोग, त्याच प्रमाणें यांत्रिक युक्त्या यांच्या वांचून मानवी प्राण्यास कसें राहतां येईल हें त्यास शिकविणें हें सेनेकाच्या मता प्रमाणें तत्त्वज्ञानाचें काम आहे. मानवी प्राणि ज्या निसर्गसिद्ध स्थितींत निर्माण झाला त्या च स्थितींत त्यास कसें जगतां येईल हें त्यास शिकविणें हे खऱ्या तत्त्वज्ञानाचे ध्येय आहे. मानवी प्राण्याच्या सुखाची अभिवृद्धि करण्याची खरा तत्त्वज्ञानी खटपट करीत नाहीं. वन्य पशूंच्या कातड्यानें थंडी पासून व गुहांचा आश्रय केल्यानें सूर्याच्या तापा पासून मानवी प्राण्यांचा बचाव ज्या सुवर्ण युगांत होत असे त्या युगांत जन्म न झाल्या बद्दल खऱ्या तत्त्वज्ञान्यास खेद वाटे. एखादा नागर, जहाज अथवा गिरणी या संबंधाचा शोध अगर त्यांत सुधारणा करण्याचा एखाद्या तत्त्वज्ञान्यानें प्रयत्न केला अशा प्रकारचें विधान करणें ह्मणजे त्या तत्त्वज्ञान्याची नालस्ती करणें असें

पुरातन काळीं समजत असतें. सेनेका ह्मणतो असले अगर असल्याच प्रकारचे दुसरे शोध ह्मणजे खिडक्यांचीं पारदर्शक तावदानें तयार करणें, घरांत सर्वत्र ठिकाणीं सारखी उष्णता निर्माण करण्या करितां उष्ण पाण्याच्या नळया बसविणे, वाटेल तितक्या जलद बोलणाऱ्या वक्त्याचें भाषण जसेंच्या तसें उतरून घेण्याची लघुलेखन पद्धति निर्माण करणें इत्यादि नवीन कला शोधून काढण्यांत आल्या आहेत; परंतु असल्या कलांचे शोध लावणें ही अत्यंत नीच प्रकारची गुलामास उचित अशी गुलामगिरी आहे. असल्या कला शोधून काढण्या पेक्षां तत्त्वज्ञानाचें कार्य अधिक श्रेष्ठ स्वरूपाचें आहे. मनुष्य प्राण्यानें आपल्या हाताचा उपयोग कसा करावा हें त्यास शिकविणें हें तत्त्वज्ञानाचें काम नसून मानवी प्राण्याचा आत्मा कसा बनवावयाचा हें तत्त्वज्ञानाचें खरें काम आहे असें त्या काळीं समजत.

पुरातन तत्त्वज्ञान हा एखाद्या विशिष्ट ध्येया कडे जाणारा मार्ग नसून स्वतः भोंवतीं फिरणाऱ्या चक्रा सारखें आहे. स्वतः भोंवतीं फिरणाऱ्या भोंवऱ्याच्या स्वरूपाचे प्रश्न व चर्वित चर्वण स्वरूपाचे वाद हे पुरातन तत्वज्ञानाचे मुख्य विषय होते. बुद्धीला पुष्कळ शाण परंतु प्रगतीचा अभाव अशा प्रकारची पुरातन तत्वज्ञान ही एक अजब चीज होती. सर्वांत श्रेष्ठ प्रकारचें कल्याण कशांत आहे, वेदना हें दुःख आहे कीं काय, जगांत घडणाऱ्या गोष्टी दैवा मुळें घडतात किंवा कसें, कोणत्या हि गोष्टी बद्दल निश्चित असें कांहीं च विधान करितां येत नाहीं असें खात्रीनें ह्मणतां येणें शक्य आहे कीं काय, ज्ञानी मनुष्य दुःखी असणे शक्य आहे किंवा कसें, खऱ्या मार्गा पासून निरनिराळ्या मानवी प्राण्याचे परिवर्तन हें सारखें च दोषास्पद आहे कीं काय या व असल्या प्रकारच्या प्रश्नांचा उहापोह करण्यांत सुधारलेल्या राष्ट्रांतील अत्यंत हुशार माणसांचे मेंदु, जिभा व लेखण्या अनेक शतकें गुंतल्या होत्या. असल्या प्रकारच्या प्रश्नांची चर्चा करण्यांत गुंतलेल्या लोकांची मनें तरतरीत आणि तीव्र होण्याचा संभव आहे. परन्तु त्याच्या योगानें ज्ञानाच्या साठ्यांत भर पडणें अशक्य होतें. मानवी बुद्धीचे या मुळें पुढें पाऊल पडण्या ऐवजीं तो एका च ठिकाणीं स्थिरावली गेली. मानवी बुद्धीची प्रगति करण्यास जितक्या परिश्रमाची आवश्यकता आहे तितके च परिश्रम वरील मार्गांत करावे लागत. परन्तु मानवी बुद्धी जागच्या

जागीं च राही. या पुरातन तत्त्वज्ञान पद्धतींत ज्ञानाचा संचय होत नव्हता. एका मानवी पिढीनें कमाविलेला ज्ञानाचा सांठा दुसऱ्या पिढीस देऊन तिनें त्यांत भर टाकून व तो वृद्धिंगत करून तो पुढील पिढीस द्यावयाचा असा प्रकार त्या काळीं घडत नव्हता. सिसेरोच्या काळीं हें तत्वज्ञान ज्या स्थितींत होते त्यास स्थितींत तें सेनेकाच्या काळीं होतें आणि फाव्हेरानियुसच्या काळीं कोणत्या हि प्रकारचा फरक न होतां तें सुरवातीस ज्या स्थितींत होतें त्याच स्थितींत तें कायम राहिलें. ज्याच्या योगानें कधीं हि कोणाचें समाधान व्हावयाचें नाहीं अशा कारणांच्या आधारानें ज्या वादांचा कधीं हि निकाल लागावयाचा नाही असे वाद करण्यांत ते च ते च तत्त्वज्ञानात्मक पंथ परस्परांशी झगडत असल्याचें आढळतें. बौद्धिक-कौशल्य, दक्षता, परिश्रम, इत्यादि बाबींची वरील वाद करणारांत कमतरता नव्हती. प्रत्यक्ष फळा खेरीज बुद्धीची मशागत केल्याचीं सर्व चिन्हें आढळून येत असत. जमीनीची नांगरणी, वखरणी, पेरणी, धान्याची मळणी, इत्यादि सर्व गोष्टी भरपूर रीतीने केलेल्या आढळत. परंतु धान्य साठविण्याच्या कोठ्यांत फक्त भूस आणि कोंडा या खेरीज दुसरें कांहीं सांपडत नसे.'

फार पुरातन काळा पासून भरत खंडाच्या महाराष्ट्र व इतर प्रांतांतील विद्वान लोक अद्वैत, द्वैत, विशिष्टाद्वैत इत्यादि ज्या निरनिराळ्या तत्त्वज्ञानपद्धति आपल्या या भरतखंडांत अस्तित्वांत आहेत त्यांच्या अभ्यासांत व चर्चेत गढून गेलेले आहेत. या स्थितींत इंग्रजी राज्य सुरू झाल्या नंतर पन्नास पाउणशे वर्षांनीं उगी च कोठें थोडे बहुत स्थित्यंतर घडण्यास सुरुवात झाली असून भौतिक शास्त्रांच्या अभ्यासा कडे महाराष्ट्रांतील लोकांचें किंचित् लक्ष अलीकडे वेधूं लागलें आहे. या नूतन स्थित्यंतरास सुरुवात होण्या पूर्वी महाराष्ट्रांत प्रचलीत असलेल्या वरील पुरातन तत्वज्ञानपद्धतीस पाश्चात्त्य राष्ट्रांत भौतिक शास्त्रांचा उदय होण्या पूर्वी अस्तित्वांत असलेल्या पद्धतीचें मेकॉलेनें केलेलें वरील वर्णन शब्दशः लागूं पडतें. वाळूच्या रगडण्या पासून तेलाची निष्पत्ति जितकी व्हावयाची तितकी च निष्पत्ति वेदांत तत्वज्ञानाच्या चर्वितचर्वणा पासून महाराष्ट्रांतील लोकांच्या ऐहिक अभ्युदयास होत असे. शके ११०० पासून १६०० पावेतो महाराष्ट्रांत जे अनेक हरिकथानिरुपणी पुढारी होऊन गेले त्यांनी रचलेल्या ग्रंथांचा साकल्यानें विचार केला असतां

त्या पैकीं एक हि पुढारी असा सांपडावयाचा नाहीं कीं, ज्यानें वर दर्शविलेल्या तत्वज्ञानात्मक पद्धतींत अंतर्भूत होणाऱ्या एखाद्या विषयाची चर्चा केलेली नाहीं. या पुढाऱ्यांनीं निर्माण केलेल्या वाङ्मया पैकीं प्रमुख भाग वरील तत्त्वज्ञान पद्धतींच्या प्राकृत भाषेत केलेल्या विवरणाच्या स्वरूपाचा आहे. मेकॉलेच्या वरील उताऱ्यांत दर्शविलेली पाश्चात्य देशांत प्रचलित असलेली तत्वज्ञान पद्धति कोणत्या कारणा मुळें मागें पडली गेली, भौतिकशास्त्रांच्या ज्ञानाचा उदय युरोप खंडांतील देशांत कसा झाला, या उदयास कोणती व्यक्ति कारणीभूत झाली, या व्यक्तीनें निर्माण केलेल्या नूतन तत्वज्ञान पद्धतींचें स्वरूप व ध्येय कोणत्या प्रकारचें होतें व या नूतन तत्वज्ञान पद्धती पासून मानवी जातीस कोणता लाभ झाला इत्यादि मुद्या संबंधाचे या च निबंधांतील विवेचन महत्वाचे असल्या कारणानें त्या पैकीं अवश्य तितका उतारा आह्मी येथें देतों.

At length time arrived when the barren philosophy which had during so many ages, employed the faculties of the ablest of men was destined to fall. Words and more words had been all the toil of all the most renowned sages of sixty generations. But the days of this sterile exuberence were numbered. Many causes predisposed the public mind to a change. The study of a great variety of ancient writers, though it did not give a right direction to Philisophical Research did much towards destroying that blind reverence for authority whieh had prevailed when Aristotle ruled alone......Thus before the brith of Bacon the Empire of Scholastic Philosophy had been shaken to its foundations. There was in the intellectual world an anarchy resembling that which in the political world often follows the overthrow of an old and deeply rooted Govt. Antiquity, presscription, the sound of great names had ceased to awe mankind. The Dynasty which had reigned for ages was at an end and the vacant throne was left to be sturggled for by pretenders.

That leader at length arose. The philosophy which he tought was essentially new. It differed from that of the celebrated ancient teachers, not merely in method but also in its object. Its object was the good of mankind, in the sense in which the mass of mankind always have understood the word good.

To sum up the whole, we should say that the aim of Platonic Philosophy was to exalt man into a god. The aim of the Baconian Philosophy was to provide man with what he requires while he continues to be man. The aim of Platonic Philosophy was to raise us far above vulgar wants. The aim of the Baconian Philosophy was to supply our vulgar wants.The former aim was noble, but the latter was attainable. Plato drew a good bow; but like Acestas in Virgil, he aimed at the stars; and therefore, though there was no want of strength or skill, the shot was thrown away. His arrow was indeed followed by a track of dazzling radiance, but it struck nothing...... Bacon fixed his eye on a mark which was placed on the earth and within bow shot and hit it in the whole. The Philosophy of Plato began in words and ended in words, noble words indeed, words such as were to be expected from the finest of human intellects exercising boundless dominion over the inest of human languages. The Philosophy of Bacon began in observations and ended in arts......They ( ancient philosophers ) promised what was impracticable; they despised what was practicable; they filled the world with long words and long beards, and they left it as wicked and as ignorant as they found it.

What was then the end which Bacon proposed to himself ? It was to use his own emphatic expression

" fruit. " It was the multiplying of human enjoyments and the mitigating of human sufferings. It was the " relief of man's estate. " This was the object of all his speculations in every department of science, natural Philosophy, in legislation, in politics, in morals. These words form the key of Baconian Doctrine, Utility and Progress.

What Bacon did for inductive Philosophy, may, we think be fairly stated thus. The objects of preceding speculators were objects which could be attained without careful induction. Those speculators therefore, did not perform the inductive Process carefully. Becon stirred up men to pursue an object which could only be attained by induction and induction carefully performed; and consequently induction was carefully performed. It was not by furnishing philosophers with rules for performing the induction Process well but by furnishing them with a motive for performing it well, that he conferred so vast a benefit on society.

Some people may think the object of Baconian Philosophy a low object, but they cannot deny that high or low, it has been attained. They cannot deny that mankind have made and are making great and constant progress in the road which he (Bacon) pointed out to them. Was there any such progressive movement among the ancient Philosophies ? After they had been declaiming eight hundred years had they made the world better than when they began ?

अर्थ:-शेवटीं एक काळ असा आला कीं अनेक शतकें अत्यंत हुशार लोकांची बुद्धि वेधून घेणारें हें पोकळ तत्त्वज्ञान ढांसळून पडलें. साठ पिढ्यांतील नामांकित विद्वानांच्या परिश्रमाचें फल ह्मणजे शब्द आणि शब्दांचें

अवडंबर हें होय. या शाब्दिक अवडंबराचा घडा अखेर भरत आला. अनेक कारणांच्या योगानें पुष्कळ लोकांचीं मनें स्थित्यंतरा कडे झुकत चालली होती. कित्येक पुरातन ग्रंथकारांच्या ग्रंथवाचनानें तत्त्वज्ञानात्मक संशोधनास योग्य वळण जरी मिळ लें नाहीं, तरी पण तत्त्वज्ञानाच्या प्रदेशात एकट्या आरिस्टॉटलचें साम्राज्य असतांना अधिकारी माणसाच्या शब्दास आंधळेपणानें जो मान देण्याची पद्धत पडली होती ती नष्ट झाली. बेकनच्या जन्मा पूर्वी स्कोलॅस्टिक तत्त्वज्ञानाच्या साम्राज्यास धक्का बसला होता. राजकारणाच्या प्रदेशात फार दिवस बद्धमूल झालेल्या एका घराण्याची सत्ता नष्ट झाली ह्मणजे ज्या प्रकारची बेबंदशाही माजते त्या प्रकारची बेबंदशाही मानवी जातीच्या बौद्धिक प्रदेशांत उत्पन्न झाली. मोठ्या धेंडाच्या नांवाचा उच्चार करितां च मानवी मन दचकून जाण्याचे बंद झाले. अनेक शतके पावेतों तत्वज्ञानाच्या प्रदेशांत ज्या पद्धतीचें साम्राज्य अस्तित्वांत होतें तें नष्ट होऊन या साम्राज्याच्या रिकाम्या पडलेल्या सिंहासना वर अधिष्ठित होण्याचे प्रयत्न अनेक तोतयां ( तत्वज्ञान पद्धती ) कडून होण्यास सुरवात झाली.

सरते शेवटीं एक महान् पुढारी उदयास आला. त्यानें ज्या तत्वज्ञानाचा उपदेश केला ते तत्वज्ञान प्राधान्यें करून नवीन स्वरूपाचें होते. तत्त्वज्ञानाचे ध्येय आणि पद्धत या दोन्ही बाबतींत हें नवीन तत्वज्ञान जुन्या तत्वज्ञाना पासून भिन्न होतें. या नवीन तत्त्वज्ञानाचें ध्येय मानवी प्राण्याच्या सुखाची ( आखिल मानवी प्राणि सुख या शब्दाचा जो अर्थ समजतात तो या शब्दाचा अर्थ या ठिकाणीं समजावयाचा ) वृद्धि करणें हें होतें.

थोडक्यांत सांगावयाचें ह्मटले ह्मणजे प्लेटोच्या तत्वज्ञानाचें ध्येय मानवी प्राण्यास ईश्वर बनविणे हे होतें. मानवी प्राणि हा मानवी प्राणि या नात्यानें जों पावेतो अस्तित्वांत आहे तो पावेतो त्यास जरूर असलेल्या सर्व गोष्टींची तरतूद करणें हे बेकनच्या तत्वज्ञानाचें ध्येय होतें. मानवी प्राण्याच्या ज्या सामान्य गरजा आहेत त्या त्यास भासू नयेत अशी तरतूद करणे हें प्लेटोच्या तत्वज्ञानाचें ध्येय होतें. बेकनच्या तत्वज्ञानाचें ध्येय अशा गरजा भागविण्याची तरतूद करणे हें होतें. प्लेटोचे ध्येय उदात्त होतें. परतु बेकनचें ध्येय उदात्त नसलें तरी साध्य कोटींतले होते. एखाद्या निष्णात तिरंदाजा प्रमाणें प्लेटो धनुष्य खेचण्यात तरबेज होता. परंतु व्हर्जिल मधील असेटास प्रमाणें तो आकाशांतील ताऱ्याकडे नेम धरीत असल्या मुळें त्याच्या ठायीं शक्तीची किंवा कौशल्याची जरी

कमतरता नव्हती तथापि त्याच्या धनुष्या पासून सुटणाऱ्या बाणाच्या योगानें कोणत्या हि प्रकारची फलप्राप्ति न होतां तो फुकट जात असे. प्लेटोच्या धनुष्या पासून सुटणाऱ्या बाणाच्या मागें चकाकणाऱ्या ठिणग्यांची रांग लागलेली दिसे परंतु त्या बाणाचा आघात कोणत्या हि वस्तू वर होत नसे. बेकनने आपलें लक्ष पृथ्वीतला वरील बाणाच्या टप्प्यांतील ध्येया वर ठेविले होतें, आणि त्याच्या बाणांचा आघात नेमक्या वस्तू वर होत असे. प्लेटोच्या तत्त्वज्ञानाचा उगम शब्दात, खरोखर अत्यंत उदात्त अशा शब्दात—जे शब्द पृथ्वी वरील अत्यंत सुरेख अशा ग्रीक भाषे वर प्रभुत्व गाजविणाऱ्या सर्वोत्कृष्ट बुद्धिमान् माणसाच्या डोक्यांतून निर्माण होत—होऊन त्यांत च त्यांचा लय होत असे. बेकनच्या तत्त्वज्ञानाचा उगम सृष्ट पदार्थांच्या पृथक्करणांत होऊन त्याचा लय कला-कौशल्याच्या निर्मितींत होत असे. पुरातन तत्त्वज्ञानी शक्यतेच्या कोटी बाहे-रील गोष्टी साध्य करण्याची आशा दाखवून साध्य कोटींतील गोष्टीं विषयीं तिरस्कार प्रगट करीत. लांबलचक शब्दांनीं व लांबलचक दाढ्यानीं पुरातन तत्त्वज्ञान्यांनीं हें जग भरून काढलें व त्यांना हें जग जितकें अज्ञानांत बुडालेलें व दुष्ट स्वभावाचे आढळलें त्या च अज्ञा-नात व दुष्ट स्वभावांत त्यानीं त्यास सोडून दिलें.

बेकनचें ध्येय कोणतें होते ? त्यानें च वापरलेल्या जोरदार शब्दप्रयोगांत सांगावयाचें ह्मणजे **फल** हे त्याच्या तत्त्वज्ञानाचें ध्येय होते. मानवी प्राण्याच्या सुखांत भर घालून त्याच्या दुःखाचें निराकरण करणें हा बेकनच्या तत्त्वज्ञानाचा मुख्य कटाक्ष होता. भौतिकशास्त्रज्ञान, कायदा, राजकारण, नीति इत्यादि तत्त्वज्ञानाच्या प्रदेशांत समाविष्ट होणाऱ्या निरनिराळ्या विषया संबंधीं बेकननें ज्या कल्पना प्रतिपादलेल्या आहेत त्या सर्वांचें धोरण मानवी प्राण्यांच्या ऐहिक सुखाची अभिवृद्धि करणें हे आहे. बेकनच्या तत्त्वज्ञानाचें दोन च शब्दांत वर्णन करावयाचें असल्यास ते दोन शब्द ह्मटले ह्मणजे **उपयुक्तता आणि प्रगति** हे होत.

बेकननें इन्डक्टिव्ह (Induction=विशेष गोष्टी वरून सामान्य सिद्धांत काढणें, inductive हें विशेषण) तत्त्वज्ञाना संबधीं जी कामगिरी केली आहे तिचें रास्त वर्णन खालील प्रमाणें करितां येईल. पुरातन तत्त्वज्ञानास ज्या बाबी सिद्ध करावयाच्या होत्या त्या बाबी विशेष प्रकारचें इन्डक्शन न करितां साध्य होण्या सारख्या होत्या. या मुळें इन्डक्शन काळजी पूर्वक करण्याची खबरदारी घेण्याचें

त्या काळाच्या तत्त्वज्ञान्यांस प्रयोजन नव्हतें व तशा प्रकारची खबरदारी ते कधीं घेत हि नसत. कोणता हि सिद्धांत इन्डक्शन पद्धतीनें करण्याविषयीं व तें इन्डक्शन काळजी पूर्वक व योग्य रीतीनें करून तो स्थापित करण्या विषयीं बेकनेनें उपदेश केला व या मुळे इन्डक्शन योग्य प्रकारें करण्याचा परिपाठ सुरू झाला. तत्वज्ञान्यांनीं कोणत्या पद्धतीनें इन्डक्शन करावयाचें या संबंधाचे नियम बनविण्याच्या बेकनच्या कामगिरी पेक्षां कोणत्या ध्येयास्तव इन्डक्शन योग्य प्रकारें करावयाचें हें त्यानें दर्शविल्या मुळे मानवी समाजाचें फार मोठें कल्याण साधण्यास तो कारणीभूत झाला.

बेकनच्या तत्त्वाज्ञानाचें ध्येय सामान्य प्रकारचे आहे असें त्यानें प्रतिपादिलेल्या तत्त्वज्ञाना संबंधीं कित्येक लोकांचें मत होण्याचा संभव आहे. बेकनचें ध्येय उच्च प्रकारचें असो अगर सामान्य प्रकारचें असो तें ध्येय सिद्ध झालें आहे ही गोष्ट मात्र कोणास हि नाकबूल करतां येणें शक्य नाहीं. बेकननें मानवी समाजास जो मार्ग दर्शविला त्याच्या योगानें मानवी समाजाची फार मोठी अशी सतत टिकणारी प्रगति झाली असून हल्लीं हि ती प्रगति चालू आहे. अशा प्रकारची प्रगति पुरातन तत्त्वज्ञान्यांच्या तत्वज्ञान पद्धतीने झाल्याचे दृष्टोत्पत्तीस येतें काय? सतत आठशें वर्षे ज्या तत्वज्ञान पद्धतीचा पुरातन तत्वज्ञान्यांनी उपदेश केला तिच्या योगानें जगाचें पाऊल सुधारणेच्या बाबतींत पुढें पडलें असें ह्मणतां येणें शक्य आहे काय?

वरील उतारे बरे च विस्तृत आहेत. परंतु महाराष्ट्रा वर पारतंत्र्याची आपत्ति ओढविण्यास जी एक बाब प्रामुख्याने कारणीभूत झाली त्या बाबीचें खरे मर्म व महत्व वाचकांच्या लक्षांत आणून देण्या करितां आह्मांस निरुपायाने एवढे विस्तृत उतारे देणे भाग पडत आहे. बेकनचा जन्म इ. स. १५६१ सालीं झाला, व तो इ. स. १६२६ सालांत मरण पावला; ह्मणजे शके १४८३ पासून १५४८ पावेतों तो हयात होता. बेकन हा महाराष्ट्रांतील प्रसिद्ध हरिकथानिरुपणी पुढारी एकनाथ यांचा समकालीन होता ( एकनाथाचा समाधी शक १५२१ ह्मणजे इ. स. १५९९ हा होता. ). पाश्चात्य देशांतील ज्या पुरातन तत्त्वज्ञान पद्धती पासून तिकडील विद्वान लोकांचीं मनें परावर्त होऊन बेकननें प्रतिपादिलेल्या भौतिक शास्त्राच्या उदयास कारणीभूत होणाऱ्या नवीन तत्त्वज्ञान पद्धती कडे [ Inductive Philosophy या नांवानें जी

तत्त्वज्ञान पद्धति प्रसिद्ध आहे ] वेधलीं गेलीं होतीं तशा प्रकारच्या तत्त्वज्ञान पद्धतीचा प्रवर्तक व प्रसारक महाराष्ट्राच्या दुर्दैवानें त्या सुमारास कोणी निर्माण झाला नाहीं. ज्या तत्वज्ञान पद्धतीचा युरोपांतील विद्वान् लोकांनीं त्याग करण्यास सुरुवात केली होती त्या च स्वरूपाच्या तत्वज्ञान पद्धतीच्या तत्वांचा महाराष्ट्रीय जनांत प्राकृत भाषेच्या द्वारें प्रसार करण्यांत त्या च सुमारास एकनाथ गुंतले होते. या मुळें पाश्चात्य देशांत घडून आलेल्या स्वरूपाची विचारक्रांति महाराष्ट्रांत अस्तित्वात आली नाहीं; व आपल्या देशांतील विद्वान् घटपटादि शाब्दिकवादप्रचुर अद्वैतादि तत्वज्ञान पद्धतीच्या चर्वित चर्वणांत गटांगळ्या खात राहिले. याचा परिणाम असा झाला कीं, पाश्चात्य देशांतील व महाराष्ट्रांतील लोकांचा संबंध बेकनच्या निधना नंतर थोड्या च वर्षां नंतर जेव्हां घडून आला त्या वेळीं भौतिक शास्त्रीय ज्ञान व त्या ज्ञानाच्या योगानें प्राप्त होणारीं कला कौशल्यें या बाबतींत महाराष्ट्रीय व इंग्रजादि पाश्चात्य देशांतील लोक यांच्या मध्यें महदंतर पडून महाराष्ट्रीयांचा पाश्चात्य लोकानीं पाडाव केला; व त्यांच्या वर त्यानी आपलें राजकीय वर्चस्व प्रस्थापित केलें. नाना फडणीस यास एका फरासीस गृहस्थानें लिहिलेलें जें पत्र मागें आह्मीं दिलें आहे त्या पत्राच्या प्रत्यक कलमांत नमूद केलेल्या बाबींचा विचार केला असतां तीं पाश्चात्य राष्ट्रांस भौतिक शास्त्रीय ज्ञानानें प्राप्त झाली असल्याचें वरील उताऱ्यानें रहस्य ज्यांच्या लक्षांत आलें असेल त्यांस दिसून आल्या वाचून राहणार नाहीं. समर्थोक्तींतील " सावधपण सर्वत्र विषयीं " या उपदेशाचें पूर्ण रहस्य महाराष्ट्रीय समाजांतील राजकारणी पुढाऱ्यांच्या ध्यानांत त्या काळीं काय कारणा मुळें आलें नाहीं याचा खुलासा वरील प्रमाणें आह्मी यथामति केला आहे. वरील विवेचना वरून आपल्या कडील वेदांतादि तत्वज्ञान पद्धति कुचकामाच्या व निरुपयोगी आहेत असा मात्र कोणी आपला समज करून घेतल्यास तो चुकीचा होईल. सांगण्याचा मुख्य कटाक्ष हा आहे कीं आधुनिक काळीं जगाची जी प्रगति भौतिक शास्त्रांच्या योगानें होत चालली आहे ती लक्षांत घेतली असतां वेदांत तत्वज्ञाना पुढें जगांतील बाकीच्या तत्वज्ञान पद्धति तुच्छ असून त्यांच्या कडे लक्ष देण्याचें कारण नाहीं अशी समाधान वृत्ति महाराष्ट्रीय जनतेस बाळगून भागावयाचें नाहीं. वेदांतादि तवत्ज्ञान पद्धतींचें आपल्या राष्ट्रास दोन हजार वर्षांचे अजीर्ण झालें आहे व तें मोडण्याकरितां भौतिक शास्त्रीय ज्ञान

हें च पथ्यकर औषध असून हें औषध घेतल्या खेरीज आपली राष्ट्रप्रकृति कधीं हि ताळ्यावर येणार नाहीं. ही बाब आपल्या देशाची गत कालची व प्रस्तुतची स्थिति लक्षांत घेतली असतां कोणास हि कबूल करणे भाग आहे. मेकॉलेनें पुरातन पाश्चात्य तत्वज्ञान पद्धतीं संबंधीं जो अभिप्राय व्यक्त केला आहे तो शिळा असल्या मुळें कुचकामाचा आहे व शिवाय मेकॉलेच्या विवेचनांत वेदांत तत्वज्ञान प्रद्धतीचा साक्षात् उल्लेख नसल्या कारणानें तो विचारांत घेण्या सारखा नाहीं असा कित्येकां कडून आक्षेप येण्याचा संभव आहे. असल्या प्रकारच्या आक्षेपास वाव मिळूं नये ह्मणून आपल्या कडील तत्वज्ञान पद्धती विषयीं अगदीं अलीकडे लॉर्ड हॅाल्डेन यांनी व्यक्त केलेला महत्वाचा व विचार करण्या सारखा अभिप्राय आह्मी खालीं देतों:-

" Indian philosophy has a larger History than that even of Græcean thought which it preceeds. I am struck at the same time, with the way in which some of the most complete developments of post Kantian objective Idealism in Europe are anticipated in several of the Indian systems which you describe. *Where the west however, appears, to have been stronger is the strenuous effort which it has made since the days of Bacon to avoid loosing touch with* actual experience. It is difficult to think for instance, that Enistein or Niels Bhor could have done their work under any but European moulding influence." (Modern Review January 1925 page 110)

अर्थ:-" ग्रीक तत्त्वज्ञानाच्या पूर्वी उदयास आलेल्या भारतीय तत्वज्ञानाचा इतिहास ग्रीक तत्वज्ञाना पेक्षां फार च विस्तृत आहे. भारतीय तत्त्वज्ञान पद्धतींचें तुम्हीं जे वर्णन केलें आहे तें वाचून कांट तत्त्वज्ञान्याच्या पश्चात् उदयास येऊन पूर्णत्वास पावलेल्या ऑवजेक्टिव्ह आयडियालिझमच्या स्वरूपाची तत्त्वें तुम्हीं वर्णिलेल्या भारतीय तत्त्वज्ञान पद्धती पैकीं कित्येकात आढळून आल्या मुळें मला विस्मय वाटला. तथापि प्रत्यक्ष अनुभवास न सोडण्याच्या बाबतींत बेकनच्या काळा पासून पाश्चात्त्य तत्त्वज्ञान पद्धतीनें जे कसून प्रयत्न केले ते लक्षांत घेतां पाश्चात्त्य तत्त्वज्ञान भारतीय तत्त्व-

ज्ञाना पेक्षां मात्र निःसंशय जोरदार आहे. एन्स्टीन अथवा निल्सभोर सारखे तत्त्वज्ञ युरोपियन तत्त्वज्ञानाच्या संस्कारा खेरीज निर्माण झाले असते अशी कल्पना हि करणें दुरापास्त आहे. "

लॉर्ड हॉलडेन यांनीं वरील अभिप्रायांत दर्शविल्या पेक्षां हि अधिक खुलासेवार रीतीनें वेदांत तत्वज्ञान भौतिक शास्त्राच्या अभ्यासाच्या प्रवृत्तीस कशा रीतीनें विघातक आहे याचें दिग्दर्शन प्रबुद्ध भारताच्या सन १९२५ च्या जून महिन्याच्या अंकांत "*Mysticism*" "गूढतत्ववाद" या मथळ्या खालीं प्रसिद्ध झालेल्या एका लेखांत करण्यांत आलें आहे. त्या लेखा पैकीं महत्वाचा तेवढा च भाग आह्मी येथें देतों:-

Nevertheless, the mystic state of consciousness and the 'faith' that it engenders, cannot be said invariably to make for action the positive side of Life. It certainly cannot be said to do so in Vedantism, that apotheosis of Monism, where separatiou with all its attendent difficulties, is not simply overcome by the one, but its very existence is denied! Such a conception as this affords, as James points out "a perfect Sumptuosity of security." This is the faith par excellence of the "tender hearted" section of humanity. It is also the religion for those who are bewildered and frightened by the endless round of adventures of futile existence. It is the religion of men reduced to their last sick extremity, of men who are morally afraid of more experience in short afraid of Life.

"This sort of Panthestic monism is, moreover, not only easy but as Schiller observes specious. At the various stages of its development it seems capable of satisfying all men's needs; to the end it satisfies one craving of only perhaps the most reflective Souls. Whoever conceives religion as nothing more than an emotional appreciation of the Unity of the Universe may rest content with Pantheism and even

derive from its obliteration of all difficulties the most delirious satisfaction. Whoever demands more, such as, e. g. a moral order and a guiding and sympathising personality will ultimately fail to get it from any theory which equiates God with the totality of being. A mighty effort of clear and persistent thinking is needed to perceive those limitations and scientifically at first pantheism seems adequate enough." It needs a very clear grasp of the nature of science to perceive that the one is useless scientifically as it is morally, because a principle which explains every thing whether it be called "God" or the "devil" or can be conceived as the "higher synthesis," of both really explains nothing. If however, we seem to ourselves to have reached the conviction *that the one thing really worth the goal of knowing is that all is Brahman or the Absolute and that plurality is phenomenal illusion, why should we trouble labouriously to unravel the intricate web of a multitude of partial processes, to study the relations of a multitude of partial beings as if they were real and important and indepedent and as if any thing they could do or suffer could in any wise affect the absolute and immutable truth of the one reality* ?

No real Indian mystic can ever have this "clear grasp of the nature of Science, for Monistic Pantheism is prejudicial to Science."

**अर्थः**-आत्मसाक्षात्काररूपी गूढ स्वरूपाच्या ज्ञानाच्या योगानें व त्या ज्ञाना पासून उत्पन्न होणाऱ्या श्रद्धेच्या योगानें मानवी चारित्र्याच्या सगुण भागास उपकारक होणाऱ्या कर्मांची प्रवृत्ति मानवी प्राण्याच्या ठायीं निर्माण होते च असें नाहीं. द्वैत भाव आणि द्वैत भावा पासून उत्पन्न होणाऱ्या सर्व अडचणी ज्या एकतत्ववादाच्या अत्यंत श्रेष्ठ स्वरूपाच्या अद्वैत वेदांत तत्वज्ञानाच्या योगानें लयास जातात इतकें च नाहीं परंतु ज्या तत्वज्ञानांत एकतत्वा-

चें अस्तित्व हि मानण्यांत येत नाहीं त्या तत्वज्ञानाच्या योगानें कर्मप्रवृत्ति होते असें खात्रीनें ह्मणतां येत नाहीं. वेदांत तत्वज्ञान ज्या वरील कल्पने वर रचलें आहे तिच्या योगानें जेम्स ह्मणतो त्या प्रमाणें पूर्ण निर्धास्त स्थिति उत्पन्न होते. मानवी प्राण्या पैकीं कोमल अंत:करणाच्या प्राण्यांचा जो एक वर्ग आहे त्या वर्गास वेदांत तत्वज्ञान हा सर्वोत्कृष्ट सांप्रदाय वाटतो. निष्फळ अशा जन्ममरणाच्या फेऱ्याच्या योगानें ज्यांचीं मनें गांगरून जाऊन भयभीत होतात असे मानवी प्राणि ह्या सांप्रदायाचा आश्रय करितात. जे मानवी प्राणि शेवटच्या रोगी स्थितीप्रत पोहोंचले आहेत, ज्यांच्या ठिकाणीं नूतन अनुभव घेण्यास लागणाऱ्या नैतिक धैर्याचा अभाव आहे; थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे जे जगण्यास भीतात अशा मानवी प्राण्यांना हा सांप्रदाय आवडतो.

अनेक देवतांच्या अस्तित्वाच्या कल्पने पासून निर्माण झालेला हा एक तत्ववाद शिलर ह्मणतो त्या प्रमाणें सत्याभासात्मक आहे. या एकतत्त्ववादाच्या विकासाच्या निरनिराळया स्थितींत सर्व मानवी प्राण्यांचें समाधान करण्याची शक्ति असल्याचें दिसतें व विचारमग्न असणाऱ्या मानवी प्राण्यांची एक च वांछा शेवट पावेतों या च योगानें तृप्त होते. दृश्य सृष्टीच्या बुडाशीं असलेल्या एकतत्वाचें बौद्धिक ज्ञान प्राप्त करून घेणें या पेक्षां धर्माचें ध्येय दुसरें कांहीं नाहीं अशी ज्यांची समजूत आहे त्यांनीं ईश्वरमयत्ववादा (Pantheism) वर समाधान मानून त्याच्या योगानें द्वैता पासून उत्पन्न होणाऱ्या सर्व अडचणींचे निरसन होत असल्या मुळें भ्रामक समाधान मानून घ्यावें. एकतत्ववादानें प्रतिपादिलेल्या सृष्टीच्या उपपत्ती पेक्षां हि मानवी प्राण्या विषयीं सहानुभूति बाळगणाऱ्या व्यक्तीच्या स्फूर्तीनें सृष्टि चालली आहे अशा प्रकारची सृष्टीच्या निर्मितीची निराळी उपपत्ति असली पाहिजे असें ज्यांचें मत आहे अशा लोकांचें समाधान दृष्य सृष्टि आणि ज्या तत्वा पासून ती निर्माण झाली आहे तें तत्व यांचें समीकरण केल्यानें कधीं हि होणार नाहीं. जें एकतत्व सर्व गोष्टीचा उलगडा करतें मग त्यास तुह्मी ईश्वर ह्मणा अथवा सैतान ह्मणा अगर या दोघाचें हि श्रेष्ठ स्वरूपाचें संयोगिकरण ह्मणा त्याच्या योगानें कोणत्या च गोष्टींचा खरोखर उलगडा होत नसल्या कारणानें तें शास्त्रीय दृष्ट्या तसें च नैतिक दृष्ट्या निरुपयोगी आहे. ज्या एक वस्तूचें ज्ञान करून घेण्या करितां सर्व खटाटोप करावयाचा ती वस्तु ह्मणजे सर्व ब्रह्म आहे आणि बहुविधत्व हा मायारूपी भ्रम

आहे ही च होय अशी जर आपली पक्की खात्री असेल तर अपूर्ण अशा निरनिराळ्या दृष्य पदार्थांच्या संयोगानें बनलेल्या सृष्टिरूपी जाळ्याची गुंतागुत सोडविण्याचे परिश्रम, त्या च प्रमाणें अपूर्ण अशा नानाविध दृष्य वस्तूंच्या परस्पर संबंधाचा (त्या वस्तु सत्यरूपी, महत्वाच्या व स्वतंत्र आहेत असे समजून ) अभ्यास करण्याचे परिश्रम, ( जर या परिश्रमाच्या योगानें ब्रह्मरूपी विकार न पावणाऱ्या व परिपूर्ण अशा सत्यांत कांहीं फेरफार अगर बदल व्हावयाचा नाहीं तर ) आपण कां करावे हा प्रश्न आहे.

कोणत्या हि खऱ्या हिंदी गूढतत्ववाद्याच्या लक्षांत भौतिक शास्त्राच्या खऱ्या स्वरूपाची कल्पना येणे शक्य नाहीं, कारण अनेक देवतांच्या कल्पनेपासून निर्माण झालेला एकतत्ववाद हा भौतिक शास्त्रास अपकारक आहे. ”

वेदांत तत्वज्ञान भौतिक शास्त्राच्या अभ्यासास कसे अपकारक आहे याचें थोडक्यांत दिग्दर्शन वरील उताऱ्यांत उत्तम रीतीने करण्यांत आलेलें आहे व या च उताऱ्यांत नमूद केलेल्या कारणा मुळें भौतिक शास्त्रांची प्रगति व विकास आपल्या या भरतखंडांत झाला नाहीं ही गोष्ट आपल्या देशाच्या पूर्वोतिहासाचा विचार केला असतां कोणास हि पटण्या सारखी आहे. समर्थोक्तीतील ‘ सावधपण सर्वत्र विषयीं ’ या उपदेशाचे खरे महत्व महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांच्या लक्षांत कोणत्या कारणा मुळें आलें नाहीं व त्याचा दारुण परिणाम महाराष्ट्रास कशा रीतीनें भोगावा लागला याचे दिग्दर्शन आम्हीं येथ पावेतों केले आहे. मराठी राष्ट्राच्या पूर्व चारित्र्याची मीमांसा करितांना त्याच्या नाशास कोणत्या बाबी किती प्रमाणांत कारणीभूत झाल्या या विषयींची सत्य मीमांसा करणें अत्यंत महत्त्वाचे आहे. मराठी राज्याच्या नाशास ज्या अनेक बाबी कारणीभूत झाल्या त्यां पैकीं कोणती बाब प्रामुख्याने कारणीभूत झाली व त्या बाबीचें महत्त्व कितपत आहे या संबंधाची मीमांसा करतांना जर प्रमाद घडला तर त्याच्या योगानें महाराष्ट्रीयांची दिशाभूल होऊन भविष्यकाळी खऱ्या राष्ट्रोन्नतीच्या मार्गास महाराष्ट्रीय जनता लागणें दुरापास्त आहे ही गोष्ट कोणी हि कबूल करील. या दृष्टीनें विचार करितां मराठ्यांच्या आत्मिक इतिहासांत अंतर्भूत होणाऱ्या मागें दर्शविलेल्या गौण बाबी मराठी राज्याच्या नाशास अंशतः कारणीभूत झाल्या ही गोष्ट जरी खरी असली तथापि पाश्चात्य लोकांच्या भौतिक शास्त्रांतील प्राविण्या मुळें महाराष्ट्रीयांस त्यांच्या पुढें हात टेकावे लागले ही बाब बरीक आपण कधीं हि विसरतां कामा नये.

बाराव्या शतकांत महाराष्ट्र देशा वर आलेल्या पारतंत्र्याच्या संकटांतून आपल्या या देशाची सुटका महाराष्ट्रीय राजकारणी पुढाऱ्यांनीं शके १७०० च्या सुमारास कोणत्या ध्येयानें प्रेरित होऊन केली व कोणत्या साधनांनीं केली या संबंधीं आह्मीं या प्रबंधांत यथामती चर्चा केली आहे. त्या च प्रमाणें आपल्या या देशास कोणत्या कारणा मुळें परवशता आली याचें सत्य दिग्दर्शन आह्मीं या प्रबंधांत केलें आहे. पूर्वेतिहासाचा अभ्यास, मनन व चिंतन भविष्य काळीं आपल्या राष्ट्राच्या अभ्युदयाचा खरा मार्ग आपणास समजून आपण त्या मार्गानें पुढें पाऊल टाकावें या हेतूच्या सिद्धीस्तव करावयाचें असतें. हा हेतु योग्य प्रकारें साध्य होण्यास आह्मीं या प्रबंधांत केलेलें विवेचन उपकारक होईल अशी आह्मास थोडी बहुत आशा वाटत आहे. " नरदेह हा स्वाधेन सहसा नव्हे पराधेन " ( दासबोध द. १–१०–२५ ) ही अखिल मानवी प्राण्यांची स्वाभाविक स्थिति समर्थांनीं वर्णिली आहे. प्रस्तुतच्या परदास्याच्या स्थितींतून सुटका करून आपणा महाराष्ट्रीयांस समार्थांनीं वर्णिलेली वरील स्थिति साध्य करावयाची आहे. या प्रबंधांत वर्णिलेला महाराष्ट्राचा आत्मिक पूर्वेतिहास लक्षांत घेतला असतां प्रस्तुतच्या परदास्यांतून डोके वर काढून स्वाधिन स्थिति प्राप्त करून घेण्याच्या बाबतींत महाराष्ट्रीयांस निराश होण्याचें कारण नाहीं इतकी भावना या प्रबंधाच्या योगानें महाराष्ट्रीयांत उद्भुत होऊन ती त्यास पटल्यास या प्रबंधाच्या योगानें थोडें बहुत कार्य झालें असें पाहून आह्मास समाधान झाल्या खेरीज राहणार नाहीं इतकें नमूद करून हा प्रबंध आह्मी समाप्त करितों.

समाप्त



# एक शंका आणि तिचा खुलासा

या प्रबंधाच्या पान २०५ वर नांदगांव मुरूड येथील जोशी व उपाध्ये यांच्या भिक्षुकी वृत्ती संबंधाचा निवाडा छापला आहे. त्या निवाड्यांत आलेल्या " महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ करण्यांत आमची चूक झाली आहे असें रा. पांडुरंग यादव पेंडसे वकील मुरूड--जंजिरा यांनीं आमचे मित्र रा. शंकर श्रीकृष्ण देव यास पत्रद्वारें कळविलें. या निवाड्यांतील " महाराष्ट्रधर्म " या संज्ञेचा अर्थ रा. पेंडसे याच्या मता प्रमाणें काय करावयाचा याचें दिग्दर्शन त्यांनीं आपल्या पत्रांत केलें आहे तें जसेंच्या तसें च आह्मी येथें देतों:--

" कलमांतील साहा खुमाखेरीज माहाराष्ट्रधर्म आहे " याचा अर्थ त्या लेखांत दर्शविलेल्या साहा खुमाखेरीज वैदिक, पुराणोक्त, किंवा इतर हिंदुधर्मी ह्मणजे भंडारी, कोळी, आग्री, कुणबी, परीट, न्हावी, बुरुड, साळी, मराठे, मोकाशी, लोहार, जिनगर, कुंभार, धनगर, चांभार, वगैरे प्रचलित हिंदुधर्मा प्रमाणें आचरण करणाऱ्या जाती असा आहे. " पुढें जंगम क्रिया, कुंभार क्रिया व कांबळे याची क्रिया ज्याची आहे, त्याचे अशुभाचे क्रियेस आह्मी जात नाहीं या वाक्यांत कुंभार, जंगम व कांबळे हे शब्द जातिवाचक नाहींत. अशुभाची क्रिया चालविण्याचे हे प्रकार आहेत. या प्रकारांत ज्या प्रमाणे जोशी क्रिया चालवितात, त्या प्रमाणें वर सांगितलेल्या कांहीं जातींत अशुभाची क्रिया जोशी किंवा उपाध्ये याज कडून चालवून न घेतां जंगम किंवा काबळे यांचे कडून करण्यांत येते ह्मणजे क्रिया चालविण्याचे काम जंगम, कुंभार किंवा कांबळे हा उपाध्या जोशी याच्या ऐवजीं करितो. ह्मणून पुढे या च कलमांत सदरहू जवळोन ते च क्रिया कारितात बाकी वहिवाट आह्मा कडे असें जोशी यांचें ह्मणणें आहे.

याचा एकंदर अर्थ असा स्पष्ट आहे कीं, सहा खुमांत शुभाशुभ सर्व कर्मे चालविण्याचा हक्क उभयता जोशी व उपाध्ये यांचा. साहा खुमा शिवाय बाकी सर्व खुमांत सर्व प्रकारची शुभाशुभ कर्मे चालविण्याचा हक्क एकट्या जोशांचा व त्यास फक्त अपवाद ह्मणजे ज्या जातींत अगर कुळात जंगम, कुंभार किंवा कांबळे याज कडून अशुभाची क्रिया करून घेणें इतका च. हा अर्थ लक्षांत न आल्या मुळें महाराष्ट्रधर्माचा अर्थ भलता च झाला आहे. "

" निबंधकार म्हणतात त्या प्रमाणें चर्चाविषयक लेखांतील महाराष्ट्रधर्म या शब्दाचा अर्थ जंगम, लिंगायत वगैरे वेदशास्त्रानुयायी नसणारे लोक नैमित्तीक कर्मे ते ब्राह्मण उपाध्यायां कडूनच करवीत, अशा प्रकारच्या महाराष्ट्र प्रांतांतील आचारांचा निर्देश महाराष्ट्रधर्म या संज्ञेनें केला आहे, असा नसून त्या ठिकाणीं महाराष्ट्रधर्म हा शब्द साहा खुमा खेरीज बाकीच्या वेदशास्त्रानु यायी जातीच्या लोकांच्या धर्मशास्त्रान्वयें ठरलेल्या आचारांचा निर्देश करण्या करितां योजिला आहे. "

रा. बापट यांचे कडून आलेल्या या पत्राचें उत्तर देण्या करितां माझे मित्र रा. देव यांनीं तें माझ्या स्वाधिन केलें. त्या नंतर रा. बापट यांच्या पत्रास ते च वेळीं आह्मीं उत्तर देऊन आमचा खुलासा कळविला आहे. मुरुड प्रांतांत ज्या निरनिराळ्या जाती आहेत त्यांच्या आचारा संबंधाची त्या प्रांतांत आमचें कधीं जाणें झालें नसल्या कारणानें आह्मांस प्रत्यक्ष माहिती कांहीं एक नाहीं. त्या प्रांतांतील हिंदुधर्मानुयायी लोकां पैकीं कांहीं कनिष्ट जातींतील लोक जोशी अगर उपाध्या यांच्या ऐवजीं अशुभाची क्रिया जंगम, कुंभार अथवा कांबळे या ज्ञातींतील लोकां कडून करवितात ही माहिती वरील लेखांतील " महाराष्ट्रधर्म " या संज्ञेचा अर्थ आह्मीं केला ते वेळीं आह्मांस नव्हती ती रा. बापट यांच्या पत्रा वरून आह्माला प्रथम समजली. ज्या वेळीं या प्रबंधाच्या २०९ व्या पृष्ठा वरील मजकूर आह्मीं लिहिला ते वेळीं ही माहिती आम्हास नसल्या कारणानें महाराष्ट्र प्रांतांतील विशिष्ट जातीच्या अशुभाच्या क्रिया चालविण्याच्या पद्धतीस अनुलक्षून महाराष्ट्रधर्म ही संज्ञा निवाडा करणारानें योजिली असावी असा समज होण्या कडे आमची स्वाभाविक प्रवृत्ति झाली. तथापि रा. बापट यांच्या पत्रांतील वर जो उतारा आह्मीं दिला आहे व जंगम क्रिया, कांबेळ क्रिया, कुंभार क्रिया या संज्ञांचा अर्थ त्या प्रांतांतील प्रत्यक्ष वस्तुस्थिति पाहून रा. बापट यांनीं त्यांच्या पत्रांतील वरील उताऱ्यांत जो नमूद केला आहे तो लक्षांत घेतां या प्रबंधाच्या २०९ व्या पाना वरील निवाड्यात उल्लेखिलेल्या महाराष्ट्रधर्म या संज्ञेचा अर्थ आह्मीं केला आहे तो बरोबर नसून रा. बापट जो अर्थ करितात तो च बरोबर आहे हे आह्मीं नमूद करून रा. बापट यांनीं केलेल्या सूचने बद्दल आह्मी त्यांचे आभार मानतों.